# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] आगस्ट १९०९. [अंक १ ला.

विषयानुक्रम.






4252

मुंबई येथें
तुकाराम जावजी ह्यांनीं
'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

B

# ऐतिहासिक चरित्रें.

## भाग २ रा.

### १. सुरजमल जाट.

रजपुतान्यांत भरतपूर ह्या नांवाचें जें इतिहासप्रसिद्ध संस्थान आहे, तेथील सुरजमल जाट हा एक शूर, प्रतापी व साहसी राजा होय. ह्यानें, उत्तरहिंदुस्थानामध्यें इ. स. १७४५ पासून इ. स. १७६३ पर्यंत मराठे, मुसलमान व रजपुत ह्यांच्यामध्यें स्वसंरक्षणार्थ व स्वराज्याभिवृद्ध्यर्थ जे कलह व जीं युद्धें झालीं, त्यांमध्यें प्रमुख भाग घेऊन, आपल्या शौर्यबलानें आपला उत्कर्ष करून घेतला, व आपलें एक पृथक् राज्य संस्थापित केलें. ह्याचा संबंध मराठ्यांशीं बराच आल्यामुळें व पानिपतच्या घनघोर रणसंग्रामानंतर ह्यानें मराठ्यांना अप्रतिम साह्य केल्यामुळें ह्याचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. ह्मणून, ह्या प्रसिद्ध पुरुषाचा संक्षिप्त वृत्तांत येथें सादर करितों.

भरतपुरचे जाट लोक हे मूळचे दीग शहरचे दक्षिणेस ८ मैलांवर सिनसिनी ह्मणून एक गांव आहे तेथील रहिवासी होत. हे शरीरानें धष्टपुष्ट व फार सामर्थ्यवान् होते. ह्यांच्या पैकीं ब्रिज ह्या नांवाचा एक पुढारी, औरंगजेब बादशाहाच्या कारकीर्दींत, लूटमार व पुंडावे करून प्रसिद्धीस आला; व त्यानें सिनसिनी येथें आपलें लहानसें राज्य स्थापन केलें. जाट लोकांचा बादशाही मुलखास अतिशय उपसर्ग झाल्यामुळें त्यांच्या पारिपत्यासाठीं १८ व्या शतकाच्या प्रारंभास बादशाहानें सैन्य रवाना केलें. त्या सैन्याची व ह्याची चकमक उडून तींत ब्रिज ठार मारला गेला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा चूडामण हा जाट लोकांचा पुढारी झाला व त्यानें जाट लोकांचें मोठें सैन्य जमवून तो बादशाही प्रांत काबीज करूं लागला. दीग, कुंभेर वगैरे बळकट जागा त्याच्या हस्तगत झाल्यांमुळें तो दिल्लीच्या बादशाहासही शिरजोर झाला. तेव्हां दिल्लीचा बादशाहा फरुकशियर ह्यानें जाट लोकांस लहानशी जहागीर देऊन, त्यांना संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो ह्मणावा तसा यशस्वी झाला नाहीं.

तेव्हां इ. स. १७१८ मध्यें, जयपुरचा राजा सवाई जयसिंग ह्यास कांहीं सैन्य देऊन जाट लोकांवर पाठविलें. त्यानें थून व सिनसिनी हे दोन्ही किल्ले मोठ्या हिय्यानें

मुलूख व सन्मान मिळाले. दिल्लीचा वजीर सफदरजंग ह्याची सत्ता नाहींशी होऊन गाझीउद्दीन ह्याची सरशी झाली. तेव्हां त्यानें, मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे ह्या मराठे योद्ध्यांचें साह्य घेऊन, सफदरजंगाचा पक्षपाती जो सुरजमल जाट त्याच्यावर स्वारी केली. मल्हारराव होळकरांचा जयपूर-प्रकरणापासून सुरजमल जाटावर दांत होताच. तेव्हां त्यांनीं ही संधि साधून, जाटांच्या बळकट जागा भरतपूर, दीग व कुंभेर ह्यांस वेढा दिला. सुरजमल जाटाचें सैन्य, संपत्ति व राज्यविस्तार पुष्कळ वाढल्यामुळें त्याला जेरीस आणणें बरेंच कठीण होतें. परंतु ह्या वेळीं मराठे सरदार, अजमीर वगैरे प्रांतांत आपला अंमल बसवून व रजपुतांस आपले मांडलिक करून, विजयोत्साहानें उत्तर दिशा पादाक्रांत करीत चालल्यामुळें त्यांना सुरजमल जाटास अंकित करणें अवश्य वाटलें. हें पाहून सुरजमल जाट भरतपुरच्या किल्ल्याचा चांगला बंदोबस्त करून कुंभेरच्या किल्ल्यांत येऊन राहिला. ह्या वेळीं मराठ्यांनीं कुंभेरीस तीन महिने वेढा दिला. परंतु जाट लोकही लढाईच्या कामांत मराठ्यांप्रमाणें तरबेज असल्यामुळें त्यांनीं त्यांस दाद दिली नाहीं. त्यांनींही तोफांची मारगिरी शत्रूवर एकसारखी चालविली होती. अशा रीतीनें उभय पक्षांचें निकराचें झुंज चाललें असतां, मराठ्यांच्या सैन्यांतील तरुण योद्धा, व मल्हारराव होळकराचा एकुलता एक पुत्र, आणि जगद्वंद्य साध्वी महाराणी अहल्याबाई होळकर हिचा पति, खंडेराव हा १७५४ मध्यें तोफेचा गोळा लागून मृत्यु पावला. त्यामुळें सर्व मराठी सैन्यास अत्यंत त्वेष येऊन तें जाटांशीं निकरानें लढूं लागलें.

मल्हारराव होळकरांचा एकुलता एक पुत्र मृत्यु पावल्यामुळें दुःखातिरेकानें संतप्त होऊन त्यांनीं असा पण केला कीं, "सुरजमल जाट याचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन, तरीच जन्मास आल्याचें सार्थक. नाहींतर प्राणत्याग करीन." हें वर्तमान सुरजमल जाटास कळलें. तेव्हां सुरजमलानें, आपला चतुर मुत्सद्दी रूपराम कटारी ह्याचे मार्फत, जयाप्पा शिंद्याकडे सूत्र बांधून पेशव्यांशीं तह केला. ह्या तहामध्यें सुरजमल ह्यानें पेशव्यांस ३० लक्ष रुपये खंडणी देण्याचें मान्य केलें.* ह्याप्रमाणें मराठे व जाट ह्यांचा सल्ला झाला. ह्यानंतर सुरजमल जाट व मराठे ह्यांचा हर्षामर्ष न होतां, त्याचें व त्यांचें बरेंच सौरस्य राहिलें.

दिल्ली येथें ह्याच सुमारास राज्यक्रांति झाली. वजीर गाझीउद्दीन ह्यानें दिल्लीचा

* भाऊसाहेबांच्या बखरीमध्यें ६० लक्ष रुपये खंडणी मराठ्यांनीं जाटाकडून घेतली असें लिहिलें आहे; परंतु ३० लक्ष रुपये हीच संख्या बरोबर दिसते. (बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांची रोजनिशी–पृष्ठ १४८).

सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घेऊन अहमदशाहा बादशाहास पदच्युत केलें व सालेमगड येथें कैदेंत ठेविलें, आणि अझीमुद्दीन नांवाच्या एक राजपुत्रास दिल्लीच्या तक्तावर बसवून, दुसरा अलमगीर ह्या नांवानें त्याची द्वाही फिरविली. अशा रीतीनें गाझीउद्दीन ह्याचें दिल्लीच्या दरबारांत विशेष प्राबल्य झाल्यामुळें सुरजमल जाट ह्यानें त्याच्याशीं तह केला. ही गोष्ट इ. स. १७५४ च्या आगष्ट महिन्यांत घडली.

अशा रीतीनें सुरजमल ह्यानें मराठे व दिल्लीचा वजीर ह्यांच्याशीं सख्य करून कांहीं काल शांतता मिळविली. तों इ. स. १७५५ मध्यें, त्याचा बाप बदनसिंग हा मृत्यु पावला, व जाट लोकांचें राज्यपद सुरजमल ह्यास मिळालें. ह्यानंतर दिल्लीचा बादशाहा, रजपुत राजे व मराठे ह्यांच्यामध्यें अनेक राजकारणें व घडामोडी झाल्या. त्या सर्वांचें इत्थंभूत वर्णन इतिहासांतरीं प्रसिद्ध आहे. दिल्लीच्या राज्याची शोचनीय व दुर्बल स्थिति, तेथील अंतःकलह, रजपुत राजांचीं वैमनस्यें आणि परस्पर मत्सर, ह्या अनुकूल परिस्थितीचा फायदा घेऊन अबदालीनें इ. स. १७५७ मध्यें दिल्लीवर स्वारी केली; व मथुरा, आग्रा, वृंदावन वगैरे जागा लुटून अपार संपत्ति नेली. ह्या वेळीं सुरजमल जाटानें आपल्या प्रांतांचें रक्षण करून दिल्लीचा वजीर गाझीउद्दीन ह्यास बरेंच साह्य केलें.

गाझीउद्दीन ह्यास नजीबखान रोहिला व सुजाउद्दौला हे दोन फार प्रबळ प्रतिस्पर्धी होते. त्यांनीं गाझीउद्दीन ह्याचा पाडाव करून, दिल्लीची राजसत्ता आपल्या हातीं घेण्याकरितां पुनः अबदालीस हिंदुस्थानांत बोलाविलें. ह्मणून गाझीउद्दीन ह्यानें, मल्हारराव होळकर व सुरजमल जाट ह्यांच्या मार्फत, दक्षिणेंतून मराठ्यांचें साह्य मागितलें. ह्या वेळीं पेशव्यांना दिल्लीपर्यंत मराठ्यांच्या यशोदुंदुभि गाजवून दिल्लीचें तक्त काबीज करण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली व त्यांनीं दिल्लीवर स्वारी केली. ह्याच स्वारीचें पर्यवसान सुप्रसिद्ध पानिपतचें तुमुल रणकंदन होय. ह्याचा समग्र वृत्तांत मराठी बखरी व इतिहासग्रंथ ह्यांतून प्रसिद्ध झालेला आहे. ह्या पानिपतच्या युद्धामध्यें पेशव्यांच्या वतीनें सदाशिवराव भाऊ व विश्वासराव हे मुख्य सेनापति होते. त्यांनीं विजयानंदाच्या भरामध्यें मल्हारराव होळकर व सुरजमल जाट ह्यांचा पोक्त सल्ला ऐकिला नाहीं. त्यामुळें मराठ्यांची कधींही न भरून येणारी अशी भयंकर हानि झाली.

भाऊसाहेबांनीं ज्या वेळीं दिल्ली घेतली व अलीगौर बादशाहाचा पुत्र शहाअलम ह्यास तक्तावर बसविलें, त्या वेळीं गाझीउद्दीनखान ह्यास वजीर करावें, ह्मणजे

दिल्लीचे मोंगल अनुकूल होऊन प्रतिपक्षाचा बराच कमजोर होईल, अशी सुरजमल जाटाची सूचना होती; व शिंदे होळकरांची तीस संमति होती. ही गोष्ट भाऊसाहेबांनीं मान्य केली नाहीं. त्याचप्रमाणें, त्यांनीं सुरजमल जाटाचा सदुपदेश न ऐकितां, बादशाही तक्तावरील छत फोडिलें. त्यामुळें सर्व मुसलमानांस संताप व त्वेष उत्पन्न होऊन त्यांनीं मराठ्यांचा सूड घेतला. सुरजमल जाटानें भाऊसाहेबांस असा उपदेश केला कीं, "भाऊसाहेब, पादशाही तक्ताची जागा मर्यादेची आहे. पूर्वीं नादरशाही जाली होती. ते वेळेस तक्तावर सोन्याचे कळस होते ते नेले; परंतु या छतास हात लाविला नाहीं. त्याजवर खंदाराचा बादशाहा अबदुलअल्ली दोन वेळ चालून आला. त्याणें तोफा देखील काढून नेल्या, परंतु याची मर्यादा राखिली प्रस्तुत मी पादशाही उमराव, तुह्मांपाशीं आहें. आह्मां देखत ह्या गोष्टी होऊं नयेत. आह्मांस या गोष्टीनें यश येणार नाहीं, आणि स्वामिद्रोहही पदरीं पडेल. यास्तव अर्ज करितों की, आजिचे प्रसंगीं एवढी जोड मजला द्यावी. तुह्मांस तंगचाई जाली, तर मजला आज्ञा करावी. मी पांच लक्ष रुपये साहेबांस देतों." परंतु ही सल्ला त्यांस पसंत पडली नाहीं. उलट, सुरजमल जाट पांच लक्ष रुपये तक्त वांचविण्यासाठीं देण्यास तयार आहे, त्या अर्थीं तक्ताची किंमत अधिक आहे, असा त्यांस संशय उत्पन्न झाला. ह्मणून, त्यांनीं दिल्लीच्या दिवाणी-आम महालाचें रुप्याचें छत फोडून टाकिलें. त्यांत त्यांस फक्त तीन लक्षांचा ऐवज प्राप्त झाला! ह्या वेळीं दिल्ली येथें फार अनर्थ झाले व जनमनें अतिशय प्रक्षुब्ध झालीं. सुरजमल जाट ह्यास फार वाईट वाटलें, व त्यानें शेवटीं भाऊसाहेबांजवळ असे करुणोद्गार काढिले की, "भाऊसाहेब, आह्मी जवळ असतां, तुह्मीं तक्तविध्वंस केला! येणेंकरून आह्मांस दूषण!! ज्या गोष्टीचा साहेबांस आह्मीं अर्ज करावा, ते समयीं आपण अव्हेर करितात. आमचे चित्तांत हिंदुधर्म आहे. राज्य स्वस्थ राहावें. तुमचें आमचें इमान जालें, यमुनेचें पाणी हातांत घातलें, त्याचें सार्थक हेंच कीं काय?"

इतकें झालें तरी पुनः सुरजमलानें भाऊसाहेबांस अशी सल्ला दिली कीं, "आमचें ऐकाल तरी छताचें रुपें काढिलें आहे, मागतीं छत यथास्थित करावें. येणेंकरून आपला जय होईल. दुसरें, गाजुदीखान ह्याची वजारत त्याची त्यास द्यावी. येविशीं शिंदे होळकर यांचें व आमचें ईमानप्रमाण गुंतलें. पुढें आणखी छोटा मोठा अर्ज ऐकत जावा. ह्मणजे, मी सर्वस्वें तुमचे पदरीं आहें. लागेल तो दाणा व साहित्य पुरवीन. दिल्ली सोडून जाऊं नये. येथूनच सर्व मजकूर मसलती कराव्या. कदाचित् तुह्मांस कुंजपुरियाचें पारिपत्य करणें, तरी लक्ष प्रकारें करावें. परंतु तेथें गुंतून

राहूं नये." परंतु भाऊसाहेबांनीं ह्याही मसलतीचा अव्हेर करून व निष्ठुर उत्तर देऊन, सुरजमल याची नाउमेद व निराशा केली. त्यामुळें सुरजमल खिन्न होऊन, "आह्मी आलों हेंच मूर्खपण झालें!" असा पश्चात्ताप पावून, मागच्या पायीं आपल्या मुलुखांत परत गेला.* अर्थात् एका हिंदुधर्माभिमानी व हिंदुपक्षपाती अशा अनुभवी, बलाढ्य व प्रतापी राजास भाऊसाहेबांनीं दुखविलें, ही मोठी अनुचित गोष्ट केली. पानिपतच्या अपयशाचीं जीं अनेक कारणें घडून आलीं, त्यांपैकीं हें एक होय असें मानण्यास हरकत नाहीं. असो.

सुरजमल जाटाचा भाऊसाहेबांनीं असा अपमान केला, तथापि त्यानें तो मनांत ठेविला नाहीं. पानिपतच्या रणसंग्रामांतून जे मराठे हताश होऊन व जीव घेऊन पळून आले, त्यांच्यावर अशा संकटप्रसंगीं त्यानें जे उपकार केले आहेत, ते चिरस्मरणीय असे आहेत. त्याच्या ह्या थोर उपकारांमुळें त्याचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत सदैव सुवर्णाक्षरांनीं लिहिलेलें राहील. ह्या दुर्धर प्रसंगीं, सुरजमल जाटानें मराठ्यांच्या अपजयाचें वर्तमान ऐकून, हिंदुधर्मास जागून, आपल्या मुलुखांत तमाम सांडणीस्वार पाठवून, गांवगन्ना अशी ताकीद केली कीं, "कोणास न छळितां, ज्यास जैसें अनुकूल पडेल, तसें त्यानें अन्नवस्त्रें द्यावीं." एवढेंच नव्हे, तर त्यानें व त्याच्या पत्नीनें, मथुरा, दीग, भरतपूर येथें निराश्रित व भयभीत होऊन आलेल्या मराठे लोकांस चांगला आश्रय दिला, व त्यांचें आदरातिथ्य केलें. ह्या वेळीं भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई, समशेरबहादूर वगैरे खाशी मंडळीही सुरजमल जाटाच्या आश्रयास आली. समशेरबहादूर भरतपूर येथें मृत्यु पावला.† पार्वतीबाई व इतर सरदार दक्षिणेंत परत आले. सर्व ब्राह्मणांस सुरजमल जाटाच्या पत्नीनें पांच रुपये दक्षिणा व वस्त्रप्रावर्णें ह्याप्रमाणें देऊन बहुत दानधर्म केला. ह्या प्रसंगीं दीनांचा प्रतिपाल करण्यांत सुरजमल जाटानें दहा लक्ष रुपये खर्च केले. त्याचे हे उपकार खरोखर अवर्णनीय होत, असें कोण ह्मणणार नाहीं ?‡

---

* भाऊसाहेबांची बखर. पृष्ठ ९५ । ९६.

† समशेरबहादुराची कबर भरतपूर येथें 'व्हिक्टोरिया आस्पिटल'जवळ आहे.

‡ सर जॉन माल्कम ह्यांनींही ह्या उपकारांचा उल्लेख केला आहे. ते लिहितातः—

"The feeling of all Mahrattas towards the Jauts of Bhartpoor is strong, from a recollection, which still exists, of the protection the Raja of that place afforded their ancestors after the disastrous battle of Panipat. He not only clothed and fed the fugitives who came to his territories, but furnished them with means of reaching their homes in the Deckan. In consequence, there is hardly a family of any note in this nation that has not a tradition of a debt of gratitude to the Jauts of Bhartpoor."—*Malcolm's Central India*, Vol. I. Page 157.

सुरजमल जाट ह्यानें पानिपतच्या लढाईच्या अस्वस्थतेचा व अंदाधुंदीचा प्रसंग पाहून, आपला चांगला फायदा करून घेतला. त्यानें मथुरा, आग्रा वगैरे प्रांत काबीज केले. आग्र्याचा किल्ला व त्यांत असलेली अकबरच्या वेळेपासूनची अगणित संपत्ति आपल्या ताब्यांत घेतली; आणि आपल्या राज्याचा विस्तार चारी दिशास वाढविला. सांप्रतचा अलवार प्रांत, दुआबमधील हरियानाचा भाग, आणि चंबला नदीपर्यंत दक्षिणेकडील प्रांत, हे सर्व सुरजमल जाटाच्या ताब्यांत होते. त्याचे १२ हजार घोडेस्वार व ३० हजार पायदळ हे जाट जातीचे असून, ते मोठे लढवय्ये होते. त्यांच्या शौर्यबलावर सुरजमल जाटानें आपलें संस्थान फार नांवारूपास आणिलें.

पानिपतच्या लढाईनतर सुरजमल जाट ह्यास नजीबखान रोहिला हाच एक मुख्य शत्रु राहिला होता. त्याच्या व जाट सैन्याच्या अनेक चकमकी उडाल्या. सुरजमलाच्या जाट सैन्यापुढें रोहिले लोकांचें पराक्रमतेज फारसें पडलें नाहीं. परंतु इ. स. १७६३ मध्यें, सुरजमल ह्यानें फरुखनगरच्या फौजदारीवर आपला हक्क सांगून तेथील किल्यास वेढा दिला, व तेथील फौजदार मुसाखान ह्यास कैद करून दीगच्या किल्यांत कैदेंत टाकिलें. त्यामुळें त्याचा दुय्यम बहादुरखान हा नजीबखानाकडे दाद मागण्यास गेला. नजीबखानानें अबदालीचा भाऊ याकूब अलीखान यांस तोडजोडीचे बोलणें करण्याकरितां सुरजमलाकडे पाठविलें. त्यानें त्याचा आदरसत्कार केला नाहीं. तेव्हां तो रागावून परत गेला, व त्यानें झालेला वृत्तात नजीबखानास विदित केला. त्याने सुरजमल जाट शिरजोर झाल्याचें पाहून, त्याजवर स्वारी करण्यासाठीं मोंगल सैन्य रवाना केलें. हें सैन्य दिल्लीहून निघतें न निघतें, तोंच, सुरजमल स्वतःच जाट सैन्यानिशीं दिल्लीवर चालून गेला, व त्यानें दिल्लीच्या पुढें सहा मैलांवर शहादरा येथें आपल्या सैन्याचा तळ दिला. तेथें तो विशेष सावधपणानें न राहतां, एके दिवशीं थोड्याशा घोडेस्वारांनिशीं बादशाहाच्या खास कुरणामध्यें शिकारीस गेला. ती संधि साधून मोंगल सैन्यानें त्याजवर चाल केली, व त्याचें शीर कापून नजीबखानास नजर केलें. ही गोष्ट जाट सैन्यामध्यें कळतांच, त्यांना त्वेष येऊन त्यांनीं मोंगल सैन्यावर हल्ला केला; आणि दिल्ली येथें उभय सैन्यांची हातघाईची लढाई झाली. परंतु जाट सैन्य मान्याच्या जागीं सांपडल्यामुळें तें सर्व कापलें गेलें. येणेंप्रमाणें सुरजमल जाटाचा शोकपर्यवसायी शेवट झाला. ही गोष्ट ता. ३१ दिसेंबर इ. स. १७६३ रोजीं घडली.

सुरजमल मृत्यु पावल्यानंतर त्याचा मुलगा जवाहिरसिंग हा गादीवर बसला. तो 'बापसे बेटा सवाई' ह्या म्हणीप्रमाणें सुरजमलापेक्षांही पराक्रमी निघाला.

# जुन्या ऐतिहासिक गोष्टी.

## भाग २ रा.

### १ नाना फडणविसांची कैद.

नाना फडणविसांस दौलतराव शिंद्याचा फ्रेंच सेनापति मेजर फिलोज ह्यानें विश्वासघातानें ता० ३१ दिसेंबर इ. स. १७९७ रोजीं कैद केलें. ही बातमी तेव्हांच सर्व हिंदुस्थानभर पसरली. नानांचा लौकिक सर्व हिंदुस्थानभर गाजत असल्यामुळें सर्वांस फार वाईट वाटलें; व त्यांच्या मुक्ततेबद्दल पुष्कळ लोकांनीं प्रयत्न केले. त्यांमध्यें एक फ्रेंच इसम होता. ह्याचें नांव मेजर रिचमंड असें असून, तो निजामाच्या सैन्याचा अधिपति होता. त्याला, एका युरोपियननें वचनभंग करून नानांसारख्या थोर पुरुषास कैद केलें, ही फार अनुचित गोष्ट केली व आपल्या जातीस कलंक लाविला, असें वाटलें. तेव्हां त्यानें गुप्त रीतीनें मेजर फिलोज ह्यास नानांची सुटका करण्यांबद्दल एक पत्र लिहिलें आहे. त्यावरून नानांविषयीं परदेशीय लोकांच्या मनांतही किती आदरबुद्धि वसत होती, हें चांगलें व्यक्त होतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"I have no other interest in speaking of this, but that which I take for every European, whose reputation is dear to me— for we have not yet had an example of European officers having falsified their oaths. I perceive a considerable storm which is forming, and which undoubtedly will burst, to the disadvantage of Dowlat Rao Sindhia: The Nabab Nizamalli, the English, Raghoji Bhonsla and even Tippu Sultan, will be fully sufficient to give liberty to Balaji Pandit. So, if your credit, or your rights (since you are the guarantee of the treaty,) can contribute towards it—if you are able to effect this liberty of which I speak, I am not able to calculate the honour that this proceeding will do to you on one side, and the great advantages you will derive from the other. If you can enter into my views, I will be able to grant you one fourth more than all you have with Sindhia, and a Jahagir of one *lack* of rupees a year; and I will be shortly on the frontiers, where we shall be able to keep up correspondence."

("युरोपियन अधिकाऱ्यांनीं आपल्या शपथा मोडल्याचें अद्यापि एकही उदाहरण घडलें नसल्यामुळें, त्यांचे कीर्तीबद्दल माझे मनांत जें प्रेम व आदर वसत आहे व त्यांचे कीर्तीस कलंक लागूं नये म्हणून मला जी कळकळ वाटत आहे, त्यामुळें हें पत्र पाठविण्यास मी उद्युक्त झालों आहें. जें सांप्रत वादळ उत्पन्न होत आहे, त्याचें पर्यवसान

निःसंशय दौलतराव शिंदे यांचे नुकसानींत होईल असें मला वाटतें. निजाम, इंग्रज, रघोजी भोंसले व टिपू सुलतान हे सर्व, बाळाजी पंडित यांची मुक्तता करण्यास पूर्ण समर्थ आहेत. परंतु जर तुमचें वजन व अधिकार हीं (कारण, तहनामा योग्य रीतीनें पाळला जावा एतदर्थ तुह्मी ज़बाबदार आहां) मी ज्या गृहस्थांविषयीं लिहीत आहें, त्यांचे सुटकेस कारणीभूत होतील, तर या तुमच्या कृत्यानें तुह्मांस किती मोठेपणा मिळेल व तुमचा किती फायदा होईल याचें मला बराबर अनुमान करितां येत नाहीं. जर माझे विचार तुह्मांस पसंत असतील व त्याप्रमाणें तुह्मी कराल, तर मी तुह्मांस शिंद्यांकडून जें कांहीं मिळत आहे त्यापेक्षां एक चतुर्थांश जास्त देण्याचें करीन व तुह्मांस दरसाल एक लाख रुपये उत्पन्नाची जहागीरही देईन. लवकरच मी सरहद्दीवर येणार आहें. तेव्हां आपणांस पत्रव्यवहार करण्यास सोईचें पडेल.)

* * *

## २ रूपराम कटारी.

रूपराम कटारी हा कटारी जातीचा हिंदुस्थानी ब्राह्मण असून, हा मोठा विद्वान् पंडित व मुत्सद्दी होता. हा सुरजमल जाटाचा राजपुरोहित असून त्याचा मुख्य सल्लामसलतगार होता. त्याचें नांव मराठ्यांच्या राजकारणांत पुष्कळ वेळां आलेलें आहे. शिंदे, होळकर व पेशवे ह्यांच्या बरोबर सुरजमल जाटाचीं जीं राजकारस्थानें होत, तीं ह्याच्या मार्फत होत असत. कुंभेरीच्या लढाईनंतर जाटांचा व मराठ्यांचा इ. स. १७५४ मध्यें जो तह ठरला, तो ह्याच्याच मध्यस्थीनें ठरला. सुरजमल जाटानें मराठ्यांस पहिल्या वर्षी ३० लक्ष रुपये खंडणी देण्याचें मान्य केलें असें दिसतें. त्यावर दर शेंकडा दोन रुपये पेशव्यांनीं रूपराम कटारी ह्यास खंडणी वसूल करून देण्याबद्दल अंतस्थ करार केले होते. त्याप्रमाणें पेशव्यांनीं रूपरामास ६०००० रुपये देविल्याचा दाखला सांपडलो. सुरजमल जाटाकडून सालाची खंडणी ८ लक्षांची ठरली होती. त्याबद्दल रूपरामास १६ हजार रुपये मिळत असत. रूपरामानें आपल्या शहाणपणानें पुष्कळ द्रव्य संपादन केलें होतें. तो मोठा कृष्णभक्त होता व त्यानें आपल्या द्रव्याचा सर्व उपयोग दानधर्मांत केला. मथुरेजवळ व्रज व नंदगाव बरसाना ह्मणून कृष्णलीलेचीं पुराणप्रसिद्ध पुण्यस्थानें आहेत, त्या ठिकाणीं रूपरामाचें नांव अद्यापि प्रसिद्ध आहे. बरसाना येथें रूपरामानें अतोनात द्रव्य खर्च करून देवमंदिरें, राजवाडे, बागा, तलाव वगैरें बांधिलीं. त्यांपैकीं 'लाडलीजीचें[१] मंदिर' ह्या नांवानें प्रसिद्ध असलेलें—श्रीकृष्णाची आवडती गोपी जी राधिका तिचें—भव्य मंदिर आहे, तें रूपरामानेंच बांधिलें आहे. ह्याच गांवीं त्यानें ६४ रमणीय उद्यानें व एक जलमहाल बांधिला आहे. हीं सर्व स्थानें आतां जीर्णावस्थेप्रत पोहोंचलीं आहेत. परंतु तीं रूपरामाच्या औदार्याची व दानशूरतेची कीर्ति अद्यापि गात आहेत. रूपरामाची माहिती कोणी प्रसिद्ध करील, तर ती फार मनोरंजक होईल. रूपरामाची छत्री बरसाना येथें आहे. बरसाना हें गांव मथुरा व भरतपूर ह्यांच्या सरहद्दीवर असून हें मंहादजी

१ हिंदुस्थानी लोक कृष्णभक्त राधिकेस प्रेमळपणानें 'लाडलीजी' असें ह्मणतात.

शिंद्यांचें राहण्याचें ठिकाण असे. महादजी शिंद्यांनीं इंग्रजांशीं इ. स. १७८५ मध्यें जो तह केला, तो येथेंच झाला.

❀ ❀ ❀

## ३ 'माने' ह्या उपनांवाची उत्पत्तिं.*

(म्हसवडकर माने यांच्या बखरीच्या आधारें.)

माने घराण्याचें मूळचें नांव गवर असें होतें. हे आपणास अंदारकर राजे असें म्हणवीत असत. ह्या घराण्याचा मूळ पुरुष अंताजी नांवाचा होता. अंताजीस सात पुत्र होते. त्यांपैकीं कृष्णाजी हा आपल्या इतर सर्व बंधूंबरोबर नेहमीं भांडत असल्या-कारणानें, त्यास वडिलांनीं घरांतून निघून जाण्यास सांगितलें. वडिलांच्या सांगण्या-वरून कृष्णाजी घराच्या बाहेर पडला व बेदर शहरीं जाऊन बादशाहाकडे आपली दाद लावण्याची खटपट करूं लागला. सुमारें एक मासपर्यंत त्याची दाद लागली नाहीं. कृष्णाजीस घोड्याच्या रोगांची परीक्षा चांगली असून त्यांवर उत्तम प्रकारचीं रामबाण औषधेंही त्यास माहीत होतीं; व हें ज्ञान त्याची दाद बादशाहाकडे लागण्याच्या कामीं उपयोगी पडलें.

एके दिवशीं बादशाहाचा उत्तम आवडता घोडा अतिशय आजारी पडला व तो बरेच उपाय केले असतांही बरा होईना. तेव्हां बादशाहास बरीच चिंता लागली. ही बातमी कृष्णाजीस समजली. तेव्हां बादशाहाजवळ आपली दाद लागण्याची ही उत्तम संधि आलेली पाहून त्यानें बादशाहाकडे स्वतः जाऊन कुरनिसात करून म्हटलें कीं, "खाविंद, जर हुकूम असेल तर घोडा नीट करून फिरवून दाखवीन." बादशाहास आनंद जाहला व कृष्णाजीस घोडा नीट करून आणण्याची आज्ञा केली. कृष्णाजीनें घोड्यास औषधें वगैरे देऊन आठ दिवसांत घोडा नीट करून स्वारीस तयार केला. हें अलौकिक ज्ञान पाहून बादशाहा फार खुष झाला व ह्याबद्दल कृष्णाजीस किल्ल्याची नाइकी दिली; व साडेचारशें लोकांची तैनात दिली.

पुढें माण देशीं पाळेगार, चोर वगैरे लोकांनीं बरीच पुंडाई माजविली होती. ती मोड-ण्यासाठीं बादशाहानें कृष्णाजीस तिकडे पाठविलें. कृष्णाजीनें बादशाहाची आज्ञा घेऊन माण देशीं जाऊन चोरांचा बंदोबस्त केला. ह्या कामगिरीबद्दल बादशाहानें कृष्णाजीस त्या प्रांताची देशमुखी दिली. पुढें कांहीं दिवसांनीं कृष्णाजीचा अंत झाला, व त्याचे सर्व हक्क त्याचा पुत्र गोपाळजी नाईक यास मिळाले. गोपाळजीस तीन पुत्र होते. त्यांपैकीं नागोजी फारच शूर असून धाडसी होता. तो आपल्या ताब्यांतील लोकांस फारच जरबीनें वागवी. हें त्या लोकांस न आवडून त्यांनीं त्यास कैद केलें. तेव्हां देशमुखी व पाटिलकी भरमजी पाटील ह्यास मिळाली. नागोजीनें स्वतःस सोडण्याविषयीं लोकांस बरेंच सांगितलें. परंतु ते म्हणाले कीं, ज्या अर्थी आम्ही तुम्हांस जरब दाखविली आहे, त्या

* ही माहिती आमचे मित्र रा. सा. लक्ष्मणराव माने संस्थान बडोदें ह्यांनीं पाठविली आहे.

अर्थी तुह्मी आमचा सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं; ह्मणून आमच्यानें तुह्मांस सोडतां येत नाहीं. परंतु नागोजी युक्तीनें तेथून निसटला व बादशाहाकडे जाऊन सर्व हकीकत निवेदन केली. तेव्हां बादशाहा इतका रागावला कीं, त्यानें त्यास कैद करण्याचा हुकूम केला. अशा रीतीनें तो सुमारें १७ महिने कैदेंत होता. पुढें बेदरवर अर्काटचा राजा चाल करून आला व त्यानें बेदरच्या बादशाहाचा बराच मोड केला. लोक सैरावैरा पळूं लागले. हें पाहून नागोजीनें शिपायाचा पट्टा हिसकावून घेऊन बिड्यांसह किल्ल्यावरून उडी टाकली व तो लोकांस उत्तेजन देत फार नेटानें लढूं लागला. त्यामुळें लोकांस नवीन उत्साह येऊन ते जोमानें लढूं लागले, व त्या योगें शत्रुपक्षाचा मोड झाला व बेदरच्या बादशाहाचा जय झाला. ह्या नागोजीच्या अचाट व अलौकिक शौर्यानें बादशाहा फारच खुष जाहला व त्यास बोलावून आणण्यास दिवाणास अमीर उमराव बरोबर देवून पाठविलें. त्याप्रमाणें तो दिवाणाच्या बरोबर मोठ्या सन्मानानें आला, परंतु बादशाहास कुरनिसात न करितां रामराम करून बसला. ह्या चमत्कारिक वर्तनानें बादशाहास राग येऊन त्यानें विचारलें कीं, 'तुह्मी जमीदार असतां कुरनिसात केली नाहीं? ही जमीदाराची रीत नव्हे.' त्यावर नागोजी यानें उत्तर दिलें कीं, 'जमीदाराची बेडी पायांत आहे, पण ह्लीं कचेरींत उमराव शिपाई या नात्यानें आलों आहें; ह्मणून त्याप्रमाणें रामराम केला.' हें उत्तर ऐकून बादशाहानें खुष होऊन सांगितलें कीं, 'तुह्मीं रामराम करूनच असावें. तुह्मांस ताजीम देऊं.' ह्यानंतर नागोजीचा नातू शिदोजीच्या वेळेपर्यंत कोणासही दरबारीं येण्याचें झालें नाहीं. परंतु बंडाळी वाढल्यामुळें बंडखोर लोकांचें पारिपत्य करण्यास शिदोजींस हुकूम झाला. शिदोजी पुंडावा मोडून बादशाहाचे भेटीस गेला. ह्या वेळीं इब्राहिम *बादशाहा राज्य करीत होता. बादशाहास रामराम करून उभे राहिले. बादशाहानें कारण विचारितां रीतीप्रमाणें करीत असल्याचा जबाब दिला. तेव्हां बादशाहानें, प्रतीती पाहण्याच्या हेतूनें, अशी व्यवस्था करविली कीं, कचेरींत शिरण्याच्या दरवाजावर तरवारी आडव्या बांधल्या, व कचेरींत ताठच्या ताठ येण्यास सांगितलें. दुसरे अमीर उमराव खालीं लवून मुजरा करून बसले. शेवटीं शिदोजी आला. त्यानें आपल्या बरोबरच्या लोकांस सांगितलें कीं सरळच जावें. तेव्हां बरोबरचे लोक कापले गेले. शेवटीं शिदोजीस दरबारांत येण्याचा प्रसंग आला. तो स्वाभिमानी व पाणीदार पडल्यामुळें नम्र न होतां, तसाच ताठपणें येऊं लागला. तों मान कापावयास लागली. तेव्हां बादशाहानें शिदोजीस मागें हटण्यास सांगून तरवारी काढून घेवविल्या, व खुष होऊन सांगितलें कीं, 'तुमचा बाणेदारपणा पाहून मी संतुष्ट झालों. आजपासून तुमचें नांव 'माने' ठेवण्यांत आलें आहे. तुह्मीं रामरामच करावा.' ही 'माने' नांवाची मूळ उत्पत्ति होय व त्या वेळेपासून 'माने' ह्मणवूं लागले. हीच मिसल सातारच्या दरबारांत तशीच राहिली.

* * *

*माने प्रथम बेदरच्या बादशाहीमध्यें प्रसिद्धीस आले व पुढें विजापूरदरबारीं गेले असें दिसतें.

होत्या. बाई आपलेंही तापत्रय बोलली जे, "कैलासवासी सुभेदार होते, त्यांनीं एकनिष्ठतेनें श्रीमंतांची चाकरी करून उत्तम परिणाम करून गेले. अलीकडे आमच्या कपाळास हे ढगढग आली. एक झाड बंशीं असतें तर इतकी फजिती कशास होती? आमचें दैव!" श्रमी जाली. तदोत्तर केसो पंतांनीं उभे राहून, बाईस विनंति केली जे, "श्रीमंतांनीं ममतापुरस्कर लिहिलें आहे. हा उत्साह, देवांब्राह्मणांचा आशीर्वाद व श्रीमंतांचे पदरीं तुह्मांसारखीं मनुष्यें दानधर्म तपश्चर्या करितां, या योगेंकडून हा शुभ दिवस प्राप्त जाला आहे. सांप्रत तुह्मी वडील. या प्रसंगीं आपण अगत्यरूप चलावें." बाईही बोलली जे, आह्मांसही या संतोषापेक्षां दुसरें काय आहे? परंतु पूर्वसूचना नाहीं व लग्नतीथ फार समीप आली. इतकें बोलणें जालें. रात्र फार जाली. आह्मीही आपल्या स्थळास आलों. दुसरे दिवशीं पुराणसमयीं उभयतांही गेलों. दों प्रहरां पुराणसमाप्ति जालीयावर एक दोघे मुत्सद्दी होते. ते समयीं फिरून बाईस विनंति केली कीं, आपण लग्नास चलावें. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, "लक्ष प्रकारें आह्मीं जावें, परंतु पूर्वसूचना असती तर दहा पांच हजार फौज आह्मीं जमा केली असती. सरंजाम केला असता. जाणें विहित होतें. आतां तीथ समीप आली. ये वेळेस फौज कशी कोठून जमा करावी? एकलें पांच सातशें लोकांनिशीं गेल्यानें वडिलांच्या स्वरूपास योग्य कीं काय, हें तुह्मीच सांगा." यांनींही उत्तर केलें जे, "आपण चालल्यास दहा पांच हजार फौज समागमें असावी, तरच आपलें जाणें युक्त. परंतु आपला निश्चय चलवयाचा असल्यास मी श्रीमंतांस पत्रें लिहितों. पुढें दो चौ दिवसांच्या अंतरानें तिथिनिश्चय करवितों." बाई बोलली जे, "इतकें कांहीं करूं नये. शुभकार्य होतें तें होऊं द्यावें. तोच आह्मांस उत्साह आहे. तेथें तुकोजीबावाही आहेत, तेथें आह्मीच आहों. नवी फौज जमा करावयास महिना दीड महिना पाहिजे. सांप्रत जें होत आहे तें फार उत्तम आहे." असें बोलून भोजनास उठली. यांनीं विनंति केली जें, फिरून मी रात्रीं येईन. बाई बोलली जे, "वारंवार तेंच काय बोलणें बोलावयाचें आहे?" संध्याकाळींही प्रहर रात्रीं गणेशचतुर्थीचीं भोजनें होऊन खबर आणविली. तों बाई निजली. तदोत्तर दुसरे दिवशीं दों प्रहरां गेलों. तेव्हांही बाईस लग्नास चलावयाची विनंति केली. बाई बोलली जे, "मी एकदां बोललें तें बोललें. वारंवार काय बोलावें?" केसोपंत बोलले जे, आणीकही दोन चार दिवस रात्रंदिवस विनंति करावयास दिवस आहेत. श्रीमंतांची आज्ञाही आह्मांस अशीच आहे. आतां रात्रीं येऊं. ह्मणून उठून आलों. येथील मर्जी पाहतां, पहिलें एक त्यांनीं उत्तर केलें, तेंच शेवटवर बोलतील. वारंवार तोच ज़ाबसाल केल्यानें आपली मात्र ग्लानता! त्यांचें उत्तर

तेंच. यांचें मानस बोलल्यांत कळतें, तर पूर्वसूचना विनंतिपत्रीं लिहिली असती. असो. शेवटला जाबसाल काय होईल तो पहावा. कासीदजोडीबरोबर मशारनिल्हेचीं व सेवकाचीं विनंतिपत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावतील हे विनंति विज्ञापना: बाईस लग्नपत्र आलें. त्याबरोबर सेवकासही लग्नास येणें ह्मणून आज्ञापत्र आलें. त्यास बाईचें तों राहणें जालें. मीच उठून आलों, तर स्वामी रागें भरतील कीं काय ह्मणून संदेह प्राप्त जाला. राजश्री केसोपंतही ह्मणाले जे, सर्वां लग्नपत्रें गेलीं, तसें तुह्मांसही आलें. एकदां श्रीमंतांस लिहून पाठवावें. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करावी. मी निघून येतच होतों. परंतु स्वामी रागें भरतील कीं काय ह्मणून सेवेसीं विनंति. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. येथें पांच सहाशें रुपये लोकांचें देणेंही जालें आहे. यास काय उपाय करूं? धन्याव्यतिरिक्त येथें कोणी त्राता नाहीं. स्वामी कृपाळू समर्थ. डाकेबरोबर जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. अहल्याबाई शिवरात्रीस श्रीओंकारेश्वराच्या यात्रेस जाणार आहेत. तेथें ध्वजोत्सव करणार. तेथून उज्जनीस श्रीमहाकाळाच्या दर्शनास जावें अशी वदंता आहे. परंतु जरूर जातील. पहिले ऐवजाविषयीं सरकारचीं पत्रें केसोपंतांकडेस आलीं. बाईचें पत्र बाईस दिलें. यांनींही जाबसाल करणें ते केले. बाईचीं उत्तरें काय जालीं तीं मशारनिल्हेंनीं सेवेसी विनंति लिहिलीं आहेत. त्यावरून सविस्तर विदित होईल. लग्नपत्रिकेचे विषयीं बाईशीं बोलणें जालें. तोही मजकूर सेवकानें लिहिला आहे. त्यांनींही विनंतिपत्रें सेवेसी लिहिलीं आहेत. विदित होईल. सेवकास जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन हे विज्ञप्ति. चंद्र १९ मिनहूस रात्रींही बाईकडेस गेलों होतों. बहुत प्रकारें लग्नास येण्याविषयीं बोललों. परंतु बाईनीं फौजेचीं वगैरे उत्तरें केलीं. शेवटीं केसोपंत बोलले जे, श्रीमंतांस आह्मीं काय लिहावें? त्यास बाई बोलली जे, सकाळीं आह्मी उत्तर श्रीमंतांस लिहून देऊं. तें पत्र आलें ह्मणजे मागाहून सेवेसी पाठवूं. बाई सांडणीस्वाराबरोबर वस्त्रें व जवाहीर तुकोजीबावांकडेस पाठविणार असें बोलली. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना."

---

**लेखांक ८२.** ता. २६ जानेवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. पौष वद्य ८ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ सफरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः—लग्नास येण्याविषयीं बाईस बहुत प्रकारें विनंति केली.

त्यास त्यांनींही बाईनीं शपथपूर्वक सांगितलें जे, माझ्या चित्तांत लग्नास येण्याचें होतेंच. परंतु पूर्वसूचना असती तर खामखा येणेंच होतें. तेथें गेल्यानें माझींही कामें फार होतीं. परंतु दिवस थोडे राहिले. असो. मुख्य गोष्ट श्रीमंतांचें लग्न शुभकार्य जालें. यांत आह्मांस समाधान आहे. असें बिनकिलाफ बोलली. बाईनीं पत्र लिहिलें आहे. केसोपंतांनींही बहुत वृत्त सांगितलें. बाईनीं पत्र लिहिलें आहे. सेवेसी डांकेबरोबर रवाना केलीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

**लेखांक ८३.** ता. ३० जानेवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. पौष वद्य १३ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २६ सफरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमानः—मातुश्री अहल्याबाई यांनीं येथून श्रीमंतांस लग्नाकरितां आहेरवस्त्रें व जवाहिराच्या रकमा पाठविल्या आहेत. त्यांचा तपसील. ऐकिला तोः— मुख्यांस दोन पोषाख, एक बादली व एक कच्या रंगाचा; जवाहीर, शिरपेंच नवरत्नांच्या व तुरा पाचांचा, व कंठी मोत्यांची व पोंच्या दोन हिऱ्यांच्या, एकूण पांच. वधूस वस्त्रें बादली व जवाहीर सरी हिरे जडावाची व चांपेकळाहार जडावाचा, एकूण दोन रकमांशिवाय पोषाख, थोरले मातुश्रीस शालजोडी व पैठणी पात्तळ. मातुश्री सगुणाबाईसाहेबांस पातळ व शालजोडी. सौभाग्यवती मातुश्री काकूबाईसाहेबांस पातळ, चोळी व शालजोडी; व सौभाग्यवती मातुश्री दुर्गाबाईस पैठणी लुगडें व चोळी. याशिवाय दोन पोषाख एक आपल्यास व एक तात्यांस, कच्या रंगाचा एक व साधा शुभ्र. दोन खिनखाब याप्रमाणें वस्त्रें व जवाहीर सांडणीवर घालून, समागमें कारकून राजश्री बापूजी आनंदराव निसबत उष्टरखाना यांस येथून चंद्र मजकुरीं रवाना केले आहेत. यांस येथील आज्ञा कीं, परभारें वाफगांवास जाऊन, राजश्री तुकोजी होळकर व नारो गणेश उभयतांस पत्रें लिहिलीं आहेत जे, यांत अधिक उणें पाहून तेथील मर्जीप्रमाणें आहेर करणें, असें लिहिलें आहे. जवाहीर व वस्त्रें काल त्रितीय प्रहरीं बाई व गोविंद रघुनाथ उभयतां बसून कांढलीं. तदोत्तर राजश्री विसाजी शामराज व हरकूबाई उभयतांस बोलावून वस्त्रें व जवाहीर त्यांस दाखविलें. त्यांनींही पाहून पसंत केलें. तदोत्तर रवाना केलें. याप्रमाणें एक वर्तमान. जवाहीर काय काय पाठविलें ह्मणून राजश्री केसो भिकाजी दातार यांनीं बाईस विचारिलें.

मीही जवळच होतों. बाईनीं उत्तर केलें जे, मोघम लिहा. अमकें ह्मणून सांगितलें नाहीं. याप्रमाणें ऐकिलें तें वर्तमान. दुसरें बाईनीं शिवरात्रीस श्रीओंकारेश्वरास जायाचा निश्चय केला आहे. परंतु राजश्री चिमाजी बुळे यांनीं गांगलीकडे फौज व पेंढारी जमाव केला आहे. झाबेवाला पाळेगार बेबदल जाला आहे. त्याच्या पारिपत्यास जातों ह्मणून बाईसही सांगून पाठविलें आहे, कीं एक थोरली तोफ पाठवावी. परंतु हे कांहीं तोफही पाठवीत नाहींत व बुळेमजकुराचा विश्वासही करीत नाहींत. इकडे खरगोणाकडे काशी रंगनाथ दोन चारशें पागा घेऊन आले आहेत. यामुळें येथें बाईस संदेह प्राप्त जाला आहे. ह्मणून शिवरात्रीची यात्रा राहीलसें दिसतें. तेथें ध्वजोत्सव करणार आहेत. त्यास धोंड दीक्षित व सदाशिव भट उभयतांस पाठवावयाचा निश्चय करणार असें ऐकिलें. अद्याप संदिग्धच आहे. काय ठरेल तें पाहावें. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान बावनबुर्जीगढीस लागले आहेत. तीही सर जाली असेल. तेथून ग्वालेर अगर गोहद दोहींतून एका स्थळास मोर्चे लावतील. ग्वालेरींतील जकिरा अखेर जाला आहे. एकदां राघो मल्हार ग्वालेरीस गेले होते. शहरपन्हा घेऊन आंत गेले होते. परंतु बालेकिल्ल्यावर हजार आठशें माणूस चांगलें होतें. त्यांनीं खालीं येऊन मोर्चा उधळून दिला. त्यामुळें पाटीलबावांनीं राघो मल्हार यांजवर इतराजी केली. त्यांजकडील पागा काढली. खांसा स्वारी पाटीलबावाच जाणार. याप्रमाणें वर्तमान येथें आलें. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विनंति."

---

**लेखांक ८४.** ता. १८ फेब्रुवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. माघ वद्य १ शके १७०४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसी विज्ञापना. बाईनीं पत्र द्यावयास आज्ञा केली आहे. दोन चार वेळां लेखकांस विचारलें. परंतु देतों देतोंच ह्मणतात. यास्तव जालें वर्तमान सेवेसी पाठवावें ह्मणून डांकेबरोबर मीं व केसो भिकाजी यांणींही सेवेसी विनंतिपत्रें लिहिलीं आहेत. डांकेबरोबर येथून पत्रें ल्याहावीं, ते सेवेसी पावतात कीं नाहीं हें कांहींच कळत नाहीं. हरएकविशी बाईचीही सावधता आहे. श्रीमंतांच्या लग्नाच्या पत्रिका तों माघ शुद्ध नवमीच्या येथें आल्या होत्या. परंतु तेथें बोलतात जे माघ वद्य किंवा फाल्गुन शुद्धांत होणार असें बोलतात. निश्चयें कांहीं कळत नाहीं. अलीकडे पत्रेंही येत नाहींत. बाई श्रीओंकारेश्वरास पौर्णिमेस जाणार होती. परंतु इकडे चिमाजी बुळे झाबेप्रांतीं जमावसुद्धां आले आहेत. काशी रंगनाथ पागा घेऊन खरगोण वगैरे

प्रांतीं फिरतात. यास्तव बाई गेली नाहीं. सदाशिवभट उपाध्ये यांजबरोबरच पांचां हजारांचें कापड, कांहीं सफेत, कांहीं छिटें, व पांच खंबाईत व पंचवीस कद रेशमी, ऐसें ध्वजोत्साहाचा सरंजाम भटजीबरोबर ओंकारेश्वरास पाठविला. पौर्णिमेस ध्वजा लागली असेल. संतर्पणेंही करविलीं आहेत. शिवरात्रीस सडी गेली तर नकळे. परंतु जाणार नाहींत असें दिसतें. महेश्वरच्या किल्ल्याची माबजत करितात. कारखाने लागले आहेत. याप्रमाणें येथील वर्तमान. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. येथें लोकांचें देणेंही फार जालें आहे. देणेंदारांचा उपद्रव व नित्य कृत्य चाललें पाहिजे. फार संकट आहे. धनी कृपाळु समर्थ. येथें एक कवडीचा आश्रय नाहीं. स्वामींनीं उपेक्षा केली तर सेवकाची गत काय होईल? धन्याच्या पायावितरिक्त दुसरा आश्रय नाहीं. मजविशीं तेथें स्मरणही कोण देतो? खर्चावांचून फार श्रम आहेत. धनी कृपाळु समर्थ. श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ८५.** ता. २० फेब्रुवारी इ. स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. माघ व॥ ३ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल श्यामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंति सेवकाचें वर्तमान तागाईत चंद्र १७ रबिलावलपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वृत्त राजश्री केसो भिकाजी यांनीं बाईशीं बोलले जे, श्रीमंतांनीं तुह्मांसही पत्र लिहिलें आहे. आह्मांसही आज्ञापत्र लिहिलें आहे, जें रेवा उत्तर तीरच्या महालचा ऐवज बाईशीं बोलून ऐवज लवकर पाठवून देणें. त्यास तेथें राजश्री तुकोजीबावांस दहा हजार फौज ठेवायास सांगितली आहे. यास्तव ऐवजाची निकड तेथें फार आहे ह्मणून वरचेवर श्रीमंत लिहितात. आह्मीही आपल्यास वारंवार विनंति करीतच आहों. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, आह्मांकडे ऐवज काय आहे? कोठें असेल तो घ्या. यांनीं उत्तर केलें जे, आह्मींच घ्यावा असें असतें, तर आह्मांसच निक्षून लिहिते कीं आमके जागां ऐवज आहे, तो हुंड्या करून पाठवा. तो प्रकार नाहीं. तुमचा तालुका. वहिवाट सारी आपल्या हातची. आह्मांस काय ठाऊक ह्मणून वारंवार श्रीमंत तुह्मांस लिहितात. त्यास बाईनीं साफ उत्तर केलें जे, इकडील महालचा ऐवज ह्मटलें तर तुकोजीबावांनींच कांहीं महाल सावकारांस दिले आहेत. ते त्यांजकडे

ऐवज जातो. कांहीं आह्मांकडे असेल तो आमचा आह्मांस खर्च लागला आहे. आह्मांपाशीं ऐवज कोठें? द्यावा कोठून? यांनीं उत्तर केलें जे, आह्मीं श्रीमंतांस काय लिहावें? बाई बोलली जे, आह्मी बोलतों असें लिहा. यांनीं उत्तर केलें जे आह्मीं असें लिहूं नये. आपणही असें सांगूं नये. यांत श्रीमंतांची मर्जी ठीक रहाणार नाहीं. बाई बोलली जे, आह्मीच बोलतों त्यापक्षीं तुह्मांस लिहावयास काय चिंता आहे? यांनीं उत्तर केलें जे, असें लिहिल्यानें जाबसाल चढीस पडेल. बाई बोलली जे, आह्मी उखळांतच डोई घातली आहे; तेथें मागें पुढें काय पहावयाचें आहे? अशीं हजारों पत्रें येतच आहेत. आह्मांस पत्र त्यांचें आलें आहे. त्याचें उत्तर आह्मीही देतों. त्याअन्वयें तुह्मीही लिहून पाठवा. याप्रमाणें चंद्र १२ रोजीं संध्याकाळीं जाबसाल जाला. बाईनींही आपल्या पत्राचें उत्तर द्यावयास फडनीसास सांगितलें. याप्रमाणें जाबसाल जाला. वारंवार महालच्या ऐवजाविषयीं स्वामी यांस लिहितात. येथील तों उपेक्षा आहे. धन्यांची मर्जी! राजश्री पाटीलबावांकडील वर्तमानः–गोहजवाला राणा पाटीलबावांशीं सख्यत्वाचे जाबसाल करीत आहे. तुमचा स्थापित असें ह्मणतो. ग्वालेरहीं देतो. ठाणें बसलें असेल कीं बसेल. तिकडील फडशा जाहल्यावर तिकडील बंदोबस्त करून पाटिलबावा फिरणार. भिंडभदावरचाही बंदोबस्त करून, आणीक कोणी राजेरजवाडे मवास आदिकरून त्यांचा परामर्ष यथायुक्त करून, चौ मासांचे छावणीस उज्जनीस येणार. असें बाजारी वर्तमान ऐकिलें. कलमी नाहीं. अलीकडे बाईकडेही कांहीं कागदपत्र येत नाहीं. अंतस्थ कांहीं येत असतील हें न कळे. हैदरनायकाचा वकील नरसिंगराव तमाजी पाटीलबावाकडेस गेला होता. तो पाटीलबावांची एक भेट जाली नी मयत जाला. तिकडे हैदरनायकही मयत जाला. यास्तव येथें कित्येक बोलतात कीं इंग्रजांचा काच तुटला. आतां कांहीं इंग्रज डोई उचलतील असें बोलतात. हेंही बाजारी वर्तमान. देखिलें ऐकिलें सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८६. 

ता. २ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. माघ वद्य १४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रबिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष–इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून चंद्र २३ मिनहूस पत्रें डांकेबरोबर रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वृत्त छ २३ मिनहूस संध्याकाळीं राजश्री संताजी होळकर यांचें पत्र

सेंदव्याहून बाईस आलें जे, इंग्रजांचीं चार पलटणें सोनगडावर आलीं. तेथें दोन पलटणें रातोरात निघून कोंडाईबारीवर फौज सरकारची होती. मालोजी राजे व बाघ असे होते. त्यांजवर इंग्रजांनीं छापा घातला. दोनशें माणूस ठार जालें, व शंभर माणसें धरून नेलीं. कांहीं जखमी जाले, ते तळावरच राहिले. फौज उधळली. इंग्रजांचा आणीक जमाव होतच आहे. खानदेशांत नंदुरबारास पूर्ववत्‌प्रमाणें येणार, ह्मणून खानदेश तमाम खलबलाट जाहला आहे. याचा बंदोबस्त काय करणें तो करावा ह्मणून बाईस पत्र आलें. तें वाचून पाहिलें. बाईनींही पत्र वाचून पाहून, दोन काशीदजोड्या कोंढाईबारीकडेस बातमीस पाठविल्या व एक जोडी सेंदव्यास पाठविली कीं, पक्की बातमी राखून बरचेवर बातमी पाठवीत जाणें. याप्रमाणें पहिलें वर्तमान. राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून एक ब्राह्मण आला. त्यास वीस रोज जाले. त्यानें जबानीं वर्तमान सांगितलें जे, पाटीलबावा ग्वालेरीपासून अर्धकोसावर लष्करसुद्धां उतरले आहेत. किल्याभोंवतालीं फौज उतरवली आहे. किल्याचा शहरपन्ना घेतला. बालेकिल्यावर सात आठशें माणूस झुंजतें आहे. लढाई सुरू आहे. गोहजवाला पाटीलबावांशीं विनयें संधानेंकडून बोलत आहे कीं, ग्वालेर घ्या आणि माझा मुलूख जो घेतला आहे तो सोडा. हे स्वारीखर्च मागतात. नाहींतर हा किल्ला घेऊन गोहजेस लागावें असें पाटीलबावांचें मानस आहे. त्यावरून गोहजवाला इंग्रजांच्या वकिलाशींही कांहीं अंतस्थ बोलत आहे. याप्रमाणें ऐकिलें वर्तमान. राजश्री चिमाजी बुळे झाबे प्रांतीं गेले आहेत. त्यांचें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. येथें किल्याचे शहरपन्ह्याचा कारखाना दक्षिणेकडे जारी आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं नर्मदेस घांट पहिलेंच बांधला आहे. त्या घांटावर श्रीचें देऊळ बांधावयास चौथरा बांधून ठेवला होता. तेथें त्या चौथऱ्यावर बाईनीं देऊळ बांधावयास काम लावलें आहे. जागां जागां किल्याचे वगैरे मरामतीस कारखाने जारी आहेत. इकडे भिल्लांचा शिलशिलाट होईल असें दिसतें. दिल्लीकडील वर्तमानः—नजबखान मेल्यावर त्याचे चेले व खानमजकुराची बहीण त्यां आपसांमध्यें कलह लागला होता. दिल्लीसच होते. पादशाहास आपल्या हुकुमांत ठेऊन होते. तेथेंही आपसांत कलह बहुत जाला, ह्मणून महदबेग व आमदानी हे उभयतां दिल्लीहून रुसून आगऱ्यास गेले. मागाहून आगा सफी व खानाची बहीण अशीं उभयतां फौजसुद्धां आमदानीवर चढून गेलीं. तेथें कोणी मध्यस्थ पडून उभयतांचा सलूख जाला. फिरून कांहीं वर्तणुकींत व्यत्यय पडला, त्यावरून फिरून बिघाड जाहला. ह्मणून आमदानी आपले फौजेसुद्धां आगऱ्याहून कूच करून ग्वालेरीस पाटीलबावांकडेस रवाना जाहला. पाटीलबावांचें व

त्या आमदानीचे पहिल्यापासून एकलास आहे. सूत्रही आहे. हिंदुस्थानांत जागां जागां राजेरजवाडे आदीकरून सर्वांत आपसआपसांत फितूर व लढाई झगडे फार लागले आहेत. अशा समयांत दक्षिणी फौज हिंदुस्थान प्रांतीं येती, तर सरकारकिफायत फार होती; ह्मणून कोणी गृहस्थ स्नेहित आहे त्यानें जयपुराहून लिहिलें होतें. तें वीस दिवसांचें वर्तमान आहे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची विपत्य फार आहे. देणें लोकांचें फार जालें. त्यांचा उपद्रव निराळा. पोटास नाहीं ती विपत्य वारंवार दर पत्रीं विनंति लिहितों. धनी रागें भरतील. मी आणीक कोणास लिहूं? कोण माझेविषयीं धन्यास स्मरण देतो? स्वामी सर्वज्ञ. गरिबांचा प्रतिपाळ करणार. धनी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति. डांकेबरोबर येथून पत्रें सेवेसी लिहितों. हे तेथें कधीं पावतात किंवा नाहीं पावत, हें कांहीं कळत नाहीं. डांकेचे कासीदही खर्चाचा बोभाट करितात. सेवेसी श्रुत होय हे विनंति."

---

## लेखांक ८७. ता. ७ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. फाल्गुन शु॥ ४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ रबिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर व जासूदजोडीबरोबर विनंतिपत्रें रवाना केलींच आहेत. सांप्रत नवीन अधिकोत्तर वर्तमान कांहीं नाहीं. बाई स्वस्थचित्तें स्नान देवतार्चन करून आहेत. राजश्री पाटीलबावांकडीलही बाजारी अफवेचें वर्तमान आहे कीं, गोहजचा किल्ला लवकरीच हस्तगत होईल. किल्ल्यांत महागाई फार आहे. दोन तीन हजार मनुष्य व हजार पांचशें स्वारही आहेत. अडीच तीन शेरांची धारण किल्ल्यांत आहे. याप्रमाणें बाजारी वर्तमान. सेवकास चार महिने जाले आज्ञापत्र येऊन. येथें सातशें रुपये देणें. त्या पेंचामुळें साहुकार येऊं देईनात. बाईकडून मजला कांहीं पावत नाहीं, हें स्वामींस विदित आहे. तत्रापि, दोन चार वेळां कोणी मातबराकडून बाईस हटकलें. त्यास बाईनीं साफ उत्तर केलें जे, आपल्या धन्यास लिहून पाठवावें. तेथून खर्चास आणऊन येथें देणेदाराचा फडशा करून जावें. अशीं दोन चार वेळां उत्तरें जालीं, वारंवार त्यांस काय हटकावें? धन्याचें नांव पदरीं. कोण कोणास ग्लान सांगावी? सेवकावर इतकी इतराजी व्हावी अशी सेवकापासून वर्तणूक कांहीं जाली नाहीं. बरें. मी चाकर पदोपदीं अपराधी. क्षमा

करणार स्वामी कृपाळू समर्थ. हरी बावाजीबरोबर लुटला गेलों. एक वस्त्रानशीं येथें आलों. त्यावर धन्याचे आज्ञेप्रमाणें आज साडेपांच वर्षें येथें चाकरीवर आहें. मजवर गरिबावर इतकी इतराजी जाली, तर, सेवक गरिबाचा वाली धन्याव्यतिरिक्त कोण? स्वामींनीं परामर्ष न केला, तर माझा येथें कोणी वाली नाहीं. अबरू धन्याची आहे. बाईस वारंवार हटकायाची सीमा जाली. आतां कोठवर ग्लान सांगावी? या संकटांतून काढणार धनी कृपाळू समर्थ. फार दिवस जाले, धन्याच्या चरणदर्शनाची खंत वाटते. घरीं मातुश्रीचें पंच्याऐशीं नव्वद वर्षांचें वय. त्यांची भेट नाहीं! मुलेंमनुष्यें अशा सवंगाईत अन्नवस्त्रावांचून हैराण. तेथें ते श्रम आहेत; येथें मी अशा संकटांत आहें! धनी कृपाळू सर्वज्ञ समर्थ. सर्व संकटापासून सोडविणार स्वामी समर्थ. स्वामींनीं उपेक्षा केल्यानें सेवकाची अबरू रहणार नाहीं. स्वामी सर्वज्ञ. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८८. ता. २ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. माघ वद्य १४ शके १७०४.

"श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

आज्ञांकित सेवक विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रबिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष:—बहुत दिवस जाले, स्वामींकडून अगर सरकारचें आज्ञापत्र येत नाहीं. वर्तमानही कांहीं कळत नाहीं. आज तीन महिने अधिकच पत्रें येत नाहींत. श्रीमंतांच्या लग्नाच्या लग्नपत्रिका शुद्ध ९ नवमीचे येथें आल्या होत्या. तेथें लग्न लागलें असें कोणाचेंही येथें पत्र आजपर्यंत आलें नाहीं. आतां वद्य पक्षीं जालें असेल ह्मणून येथें बोलतात. राजश्री केसो भिकाजी दातार यांचें परवां घरचें सतरा अठरा दिवसांचें पत्र आलें. त्यांत लिहिलें होतें कीं, शुद्ध पंचमीस देवदेवक बसवून षष्ठीस थत्त्यांचे मुलीचा निश्चय करून वाग्निश्चय केला, इतकें वर्तमान होतें. अलीकडे लग्न लागल्याचें वर्तमान आजपर्यंत आलें नाहीं. येथें दरबारांत पुसतां, त्यास काय सांगावें? नवाबाचे पुत्र साहेबजादे व साताऱ्याचे राजेश्री व भोंसल्यांचे चिरंजीव चिमणाराजे वगैरे पंचवीस तीस हजार फौज मिळाली आहे. ह्मणून बाजारी आफवा मात्र ऐकिल्यांत येतात. बाईही ह्मणत होती जे, 'फौजा फार मिळाल्या आहेत. सुरक्षित लग्न लागो.' श्रीमंतांच्या कल्याणांत आमचें सर्व जगताचें कल्याण आहे.' असें ह्मणत होती. नवीन इंग्रजांचें वर्तमान:—इंग्रजी चार पलटणें

सोनगडास आलीं, त्यांतून दोन पलटणें रातव्यानें कोंडाईबारीस येऊन, तेथें फौज सरकारची व होळकराची होती, त्यांजवर छापा घातला. फार खराबी जाली म्हणून पेंढाऱ्यांचे राऊत पळून सेंदव्यास आले. तेथून संताजी होळकरानें बाईस पत्र लिहिलें होतें, तें वांचून पाहिलें. त्यावरून वर्तमान सेवेसीं लिहिलें असे. वरकड ऐकिलें वर्तमानः—श्रीमंतांच्या पत्रांवरून विदित होईल. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. येथें सातशें रुपये देणें लोकांचें जालें आहे. देणेदारांचा उपद्रव, नित्यकृत्यांची विपत्य अशा श्रमांत आहें. येथें बाईकडून एक कवडीची प्राप्त नाहीं. आम्हांवर रागें आहेत कीं, हे येथें बसून मनास येईल तसें वर्तमान लिहितात. कोणी कर्ज देखील देईना, अशा श्रमांत आहें. बाईस एक दोन वेळां कोणाकडून हटकाविलें. त्यांनीं उत्तर केलें जे, "आपल्या धन्याकडून खर्चास आणवावें नी बसून खावें, खर्चास पाठवीत नाहींत, तर यांस कशास येथें ठेविलें आहे? आम्हांजवळ कांहीं नाहीं." साफ उत्तर केलें. आतां येथें माझें कोण आहे? धन्यांनीं उपेक्षा केली, तर येथील कर्ज वारून माझें येणें कसें होईल? काय उपाय करूं? श्रीमंतांस विनंति आपण करून, येथील ब्रह्मस्वापासून मुक्तता होऊन श्रीमंतांचे चरण दृष्टीस पडेत असें करणार स्वामी कृपाळू. माझेविषयीं तेथें कोण विनंति करितो? ईश्वर श्रीगणपति आपणास स्मरण देवो. चार वर्षें येथें जालीं. धन्याच्यां चरणदर्शनाची खंत वाटती. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८९. ता. ८ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. फाल्गुन शु॥ ६ शके १७०४.

"सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ रबिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं डांकेबरोबर विनंतिपत्रीं लिहून पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसीं पावलीं असतील. सांप्रत सरकारचीं पत्रें जासूदजोडीबरोबर चंद्र १९ रबिलावलचीं स्वामींनीं पाठविलीं, तीं चंद्र २ मिनहूस संध्याकाळीं येथें पावलीं. सरकारचीं आज्ञापत्रें मातुश्री अहिल्याबाईस व राजश्री केसो भिकाजी यांस व एक सेवकास ऐशीं व राजश्री तुकोजी होळकर यांनींही बाईस पत्र लिहिलें होतें जे, 'श्रीमंतांच्या लग्नपद्धीचा ऐवज सर्वांबरोबर आपल्यावरही दोन लक्ष रुपये देणें ठरले आहेत. त्यास, तुम्हांकडून मागील ऐवज येणें त्यापैकीं देविले असेत. वडिलीं द्यावे.' म्हणून पत्र त्यांचें होतें. तें पत्र केसो भिकाजी व मी वाचून

पाहून रात्रींच पत्रें बाईकडे घेऊन जावीं, तों राजश्री रंगराव वोढेकर ते दिवशीं बाईचे भेटीस आले होते. त्यांस रात्रौ फराळास वाड्यांत बाईंनीं बोलविलें होतें. त्यास, बारा घटका रात्रपर्यंत त्यांस वस्त्रें देऊन बिदा केलें. तदोत्तर बाईंनीं निद्रा केली. मीही ते वेळस कांहीं बोललों नाहीं. दुसरे दिवशीं त्रितीय प्रहरीं, दरबारच्या समयास, केसो भिकाजी व मी पत्रें घेऊन वाड्यांत गेलों. राजश्री बाजीराव बर्वेही दरबारास आले होते. दोन घटका दिवस राही तोंवर दरबार होता. तदोत्तर बरखास्त होऊन बाई उठली. ते वेळेस विनंति केली कीं, एकीकडे बसावें. सरकारचीं पत्रें मुजवद जासूदजोडी घेऊन आले, तीं वाचून पहावीं. तेव्हां एकीकडे बसली. केसोपंत व मी व फडणीस मुजुमदार व बाई असे पांच जण होतों. सरकारचें व तुकोजीबावांचें दोन्हीं पत्रें पुढें ठेविलीं. फडणिसांनीं पत्रें वाचून दाखविलीं. ऐकून बाई बोलली जे, 'तुकबांनीं येथें लिहिलें, तें तेथें ऐवज देयास नाहीं कीं काय? तत्रापि, त्यांनीं आह्मांस लिहिलें आहे कीं, मागील ऐवज तुह्मांकडून येणें त्यापैकीं देणें. त्यास, मागील ऐवज आह्मांकडे कोणता, काय राहिला आहे, तो त्यांजकडून लिहून आणवावा व तुकबास पत्र लिहून पाठवावें. कोणता ऐवज आह्मांकडे पोकळी राहिला आहे, तो त्यांजकडून लिहून आणवा.' इतकें बोलून उठली. आह्मांसही निरोप दिला. केसोपंतही ह्मणाले जें, 'आज आपण पत्रें दिलीं आहेत. तीं आपल्यांत आपण बोलली, त्यांत आपण कशास बोलावें? उद्या परवां विचारूं. कळलें कीं तुकोजीबाकांस पत्रें लिहितील. तेथून उत्तरें आल्याखेरीज हे कांहीं जाबसाल निक्षून करीत नाहींत. मग आपण आजच कशास बोलावें? तुकोजी-बावांकडे यांचीं पत्रें गेलीं ह्मणजे आपणही श्रीमंतांस लिहून पाठवूं. तोंवर मध्यें बोलूं. काय उत्तरें करितात तें पाहून लिहूं.' जालें वर्तमान स्वामींस विदित व्हावें ह्मणून सेवेसीं विनंति लिहिली असे. धोरणा पुढें दिसतो कीं तुकोजीबावांस लिहितील. तिकडे पाटीलबावांसही लिहितील. दोहींकडील उत्तरें आल्यावर जो जाबसाल करणें तो करितील. असें दिसतें. वरकड वर्तमान अलीकडे पाटील-बावांकडूनही इकडे कांहीं वर्तमान आलें नाहीं. पेशजीं कोंडाईबारीवर इंग्रजांनीं गडबड केली ह्मणून संताजी होळकराचें पत्र आलें होतें. त्या पत्रावरून सेवेसीं विनंति लिहिली होती; परंतु तें वर्तमान अद्याप दुणावलें नाहीं. राजश्री माधवराव निंबाळकर यांजकडीलही कारकून गोविंद खिजमतरायांचा पुतण्या येथें आला आहे. शोध करितां बोलले जे, रोजगाराच्या उद्देशें आलों आहों. याप्रमाणें देखिलें ऐकलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय, हे विज्ञप्ति. तुकोजी,

होळकरांस बाई येथून पत्र पाठवून जाब आणविणार. त्यास दिवसगत लागेल. यास्तव तेथेंच होळकरास विचारून, अमके ऐवज मागील येणें त्यांपैकीं दोन लक्ष रुपये देणें ह्मणून तुकोजीबावांचें पत्र बाईच्या नांवें येतें, तर बरें आहे. मीं हें लिहिलें, असें येथें न कळावें. यांचे कोणी तेथें आहेत, त्यांसही असें पत्र आलें ह्मणून न कळावें. सेवकाविषयीं उगीच राग आहेत ह्मणून सूचना, हे विज्ञप्ति."

---

लेखांक ९०. ता. १५ मार्च इ. स. १७८३.

श्रीगजानन. मि. फाल्गुन शु॥ १३ शके १७०४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब विज्ञापना:—

मातुश्री अहिल्याबाई श्रीशिवरात्रीस श्रीओंकारेश्वरास जाणार आहेत. माघ शुद्ध पौर्णिमा होऊन तृतीयेस येथून निघून तेथें जाणार. ओंकारेश्वरीं ध्वजा लावणार आहेत. पांच हजारांचा संकल्प आहे. शिवाय संतर्पण व महापूजा. तदोत्तर ग्रहणास उज्जनीस जावें. श्रीमहांकाळाचे दर्शनास बहुत दिवस जाले, जाणार, अशी बोलवा आहे. तेथें जातील असा निश्चय नाहीं. ओंकारच्या स्वारीची सरंजामी करितात. इंदुराम फार दिवस गेलों नाहीं, असेंही ह्मणतात. जांबेच्या घाटावर तळें बांधलें आहे, व घाटामध्यें उतारचढांत पाणी नव्हतें, तेथेंही लहानसें तळें केलें आहे. तेंही पहावयाची उत्कंठा आहे. इतक्यांत ओंकार व जांब पाहून येतीलसें दिसतें. पलीकडील बोलवा मात्र आहे. घडेल तें खरें. राजश्री केसो भिकाजी यांजकडे सरकारचीं पत्रें बाईस व मशारनिल्हेस आलीं. तें यांनीं बाईस पत्र दिलें. त्या पत्राचें उत्तर बाईनीं त्यांशीं केलें. तो तपशील मशारनिल्हेनीं सेवेसीं पत्रीं लिहिला असेल. त्यावरून विदित होईल. परंतु अद्यापि प्रथम दिवसच आहे. येविषयींचा तपशील पेशजीं विनंतिपत्रीं सेवकानें लिहिलाच आहे. सारांश, बाईचा प्रकार खुद्दपसंतीचा आहे. हिताहिताचा विचार, तोडमोड करून समजावी असा मनुष्यही कोणी नाहीं. तत्रापि, पुरातन मनुष्यांपैकीं राजश्री विसाजी शामराज लांबहाते तेथें आहेत. त्यांनीं एखादी गोष्ट दूरआंदेशीची सांगावी, तर त्यांस सल्लामसलतींत घेत नाहींत. असा प्रकार येथील आहे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय. सेवकाची खर्चाची विपत्य फार आहे. सातशें रुपये येथें लोकांचें देणें जालें आहे. नित्यकृत्याचेंही संकट! धनी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

---

होत्या. बाई आपलेंही तापत्रय बोलली जे, "कैलासवासी सुभेदार होते, त्यांनीं एकनिष्ठतेनें श्रीमंतांची चाकरी करून उत्तम परिणाम करून गेले. अलीकडे आमच्या कपाळास हे दगदग आली. एक झाड वंशीं असतें तर इतकी फजिती कशास होती? आमचें दैव!" श्रमी जाली. तदोत्तर केसो पंतांनीं उभें राहून, बाईस विनंति केली जे, "श्रीमंतांनीं ममतापुरस्कर लिहिलें आहे. हा उत्साह, देवांब्राह्मणांचा आशीर्वाद व श्रीमंतांचे पदरीं तुह्मांसारखीं मनुष्यें दानधर्म तपश्चर्या करितां, या योगेंकडून हा शुभ दिवस प्राप्त जाला आहे. सांप्रत तुह्मी वडील. या प्रसंगीं आपण अगत्यरूप चलावें." बाईही बोलली जे, आह्मांसही या संतोषापेक्षां दुसरें काय आहे? परंतु पूर्वसूचना नाहीं व लग्नतीथ फार समीप आली. इतकें बोलणें जालें. रात्र फार जाली. आह्मीही आपल्या स्थळास आलों. दुसरे दिवशीं पुराणसमयीं उभयतांही गेलों. दों प्रहरां पुराणसमाप्ति जालीयावर एक दोघे मुत्सद्दी होते. ते समयीं फिरून बाईस विनंति केली कीं, आपण लग्नास चलावें. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, "लक्ष प्रकारें आह्मीं जावें, परंतु पूर्वसूचना असती तर दहा पांच हजार फौज आह्मीं जमा केली असती. सरंजाम केला असता. जाणें विहित होतें. आतां तीथ समीप आली. ये वेळेस फौज कशी कोठून जमा करावी? एकलें पांच सातशें लोकांनिशीं गेल्यानें वडिलांच्या स्वरूपास योग्य कीं काय, हें तुह्मीच सांगा." यांनींही उत्तर केलें जे, "आपण चालल्यास दहा पांच हजार फौज समागमें असावी, तरच आपलें जाणें युक्त. परंतु आपला निश्चय चलावयाचा असल्यास मी श्रीमंतांस पत्रें लिहितों. पुढें दो चौ दिवसांच्या अंतरानें तिथिनिश्चय करवितों." बाई बोलली जे, "इतकें कांहीं करूं नये. शुभकार्य होतें तें होऊं द्यावें. तोच आह्मांस उत्साह आहे. तेथें तुकोजीबावाही आहेत, तेथें आह्मीच आहों. नवी फौज जमा करावयास महिना दीड महिना पाहिजे. सांप्रत जें होत आहे तें फार उत्तम आहे." असें बोलून भोजनास उठली. यांनीं विनंति केली जें, फिरून मी रात्रीं येईन. बाई बोलली जे, "वारंवार तेंच काय बोलणें बोलावयाचें आहे?" संध्याकाळींही प्रहर रात्रीं गणेशचतुर्थीचीं भोजनें होऊन खबर आणविली. तों बाई निजली. तदोत्तर दुसरे दिवशीं दों प्रहरां गेलों. तेव्हांही बाईस लग्नास चलावयाची विनंति केली. बाई बोलली जे, "मी एकदां बोललें तें बोललें. वारंवार काय बोलावें?" केसोपंत बोलले जे, आणीकही दोन चार दिवस रात्रंदिवस विनंति करावयास दिवस आहेत. श्रीमंतांची आज्ञाही आह्मांस अशीच आहे. आतां रात्रीं येऊं. ह्मणून उठून आलों. येथील मर्जी पाहतां, पहिलें एक त्यांनीं उत्तर केलें, तेंच शेवटवर बोलतील. वारंवार तोच जाबसाल केल्यानें आपली मात्र म्लानता! त्यांचें उत्तर

तेंच. यांचें मानस बोलल्यांत कळतें, तर पूर्वसूचना विनंतिपत्रीं लिहिली असती. असो. शेवटला जाबसाल काय होईल तो पहावा. कासीदजोडीबरोबर मशारनिल्हेचीं व सेवकाचीं विनंतिपत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावतील हे विनंति विज्ञापना: बाईस लग्नपत्र आलें. त्याबरोबर सेवकासही लग्नास येणें ह्मणून आज्ञापत्र आलें. त्यास बाईचें तों राहणें जालें. मीच उठून आलों, तर स्वामी रागें भरतील कीं काय ह्मणून संदेह प्राप्त जाला. राजश्री केसोपंतही ह्मणाले जे, सर्वां लग्नपत्रें गेलीं, तसें तुह्मांसही आलें. एकदां श्रीमंतांस लिहून पाठवावें. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करावी. मी निघून येतच होतों. परंतु स्वामी रागें भरतील कीं काय ह्मणून सेवेसीं विनंति. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. येथें पांच सहाशें रुपये लोकांचें देणेंही जालें आहे. यास काय उपाय करूं? धन्याव्यतिरिक्त येथें कोणी त्राता नाहीं. स्वामी कृपाळु समर्थ. डाकेबरोबर जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. अहल्याबाई शिवरात्रीस श्रीओंकारेश्वराच्या यात्रेस जाणार आहेत. तेथें ध्वजोत्सव करणार. तेथून उज्जनीस श्रीमहाकाळाच्या दर्शनास जावें अशी वदंता आहे. परंतु जरूर जातील. पहिले ऐवजाविषयीं सरकारचीं पत्रें केसोपंतांकडेस आलीं. बाईचें पत्र बाईस दिलें. यांनींही जाबसाल करणें ते केले. बाईचीं उत्तरें काय जालीं तीं मशारनिल्हेंनीं सेवेसी विनंति लिहिलीं आहेत. त्यावरून सविस्तर विदित होईल. लग्नपत्रिकेचे विषयीं बाईशीं बोलणें जालें. तोही मजकूर सेवकानें लिहिला आहे. त्यांनींही विनंतिपत्रें सेवेसी लिहिलीं आहेत. विदित होईल. सेवकास जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन हे विज्ञप्ति. चंद्र १९ मिनहूस रात्रींही बाईकडेस गेलों होतों. बहुत प्रकारें लग्नास येण्याविषयीं बोललों. परंतु बाईनी फौजेचीं वगैरे उत्तरें केलीं. शेवटीं केसोपंत बोलले जे, श्रीमंतांस आह्मीं काय लिहावें? त्यास बाई बोलली जे, सकाळीं आह्मी उत्तर श्रीमंतांस लिहून देऊं. तें पत्र आलें ह्मणजे मागाहून सेवेसी पाठवूं. बाई सांडणीस्वाराबरोबर वस्त्रें व जवाहीर तुकोजीबावांकडेस पाठविणार असें बोलली. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.''

## लेखांक ८२. ता. २६ जानेवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. पौष वद्य ८ शके १७०४.

''सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ सफरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः—लग्नास येण्याविषयीं बाईस बहुत प्रकारें विनंति केली.

त्यास त्यांनींही बाईनीं शपथपूर्वक सांगितलें जे, माझ्या चित्तांत लग्नास येण्याचें होतेंच. परंतु पूर्वसूचना असती तर खामखा येणेंच होतें. तेथें गेल्यानें माझींही कामें फार होतीं. परंतु दिवस थोडे राहिले. असो. मुख्य गोष्ट श्रीमंतांचें लग्न शुभकार्य जालें. यांत आम्हांस समाधान आहे. असें बिनकिलाफ बोलली. बाईनीं पत्र लिहिलें आहे. केसोपंतांनींही बहुत वृत्त सांगितलें. बाईनीं पत्र लिहिलें आहे. सेवेसी डांकेबरोबर रवाना केलीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

**लेखांक ८३.** ता. ३० जानेवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. पौष वद्य १३ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २६ सफरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमानः—मातुश्री अहल्याबाई यांनीं येथून श्रीमंतांस लग्नाकरितां आहेरवस्त्रें व जवाहिराच्या रकमा पाठविल्या आहेत. त्यांचा तपसील. ऐकिला तोः— मुख्यांस दोन पोषाख, एक बादली व एक कच्च्या रंगाचा; जवाहीर, शिरपेंच नवरत्नांच्या व तुरा पाचांचा, व कंठी मोत्यांची व पोंच्या दोन हिऱ्यांच्या, एकूण पांच. वधूस वस्त्रें बादली व जवाहीर सरी हिरे जडावाची व चांपेकळाहार जडावाचा, एकूण दोन रकमांशिवाय पोषाख, थोरले मातुश्रीस शालजोडी व पैठणी पातळ. मातुश्री सगुणाबाईसाहेबांस पातळ व शालजोडी. सौभाग्यवती मातुश्री काकूबाईसाहेबांस पातळ, चोळी व शालजोडी; व सौभाग्यवती मातुश्री दुर्गाबाईस पैठणी लुगडें व चोळी. याशिवाय दोन पोषाख एक आपल्यास व एक तात्यांस, कच्च्या रंगाचा एक व साधा शुभ्र. दोन खिनखाब याप्रमाणें वस्त्रें व जवाहीर सांडणीवर घालून, समागमें कारकून राजश्री बापूजी आनंदराव निसबत उष्टरखाना यांस येथून चंद्र मजकुरीं रवाना केले आहेत. यांस येथील आज्ञा कीं, परभारें वाफगांवास जाऊन, राजश्री तुकोजी होळकर व नारो गणेश उभयतांस पत्रें लिहिलीं आहेत जे, यांत अधिक उणें पाहून तेथील मर्जीप्रमाणें आहेर करणें, असें लिहिलें आहे. जवाहीर व वस्त्रें काल त्रितीय प्रहरीं बाई व गोविंद रघुनाथ उभयतां बसून काढलीं. तदोत्तर राजश्री विसाजी शामराज व हरकूबाई उभयतांस बोलावून वस्त्रें व जवाहीर त्यांस दाखविलें. त्यांनींही पाहून पसंत केलें. तदोत्तर रवाना केलें. याप्रमाणें एक वर्तमान. जवाहीर काय काय पाठविलें म्हणून राजश्री केसो भिकाजी दातार यांनीं बाईस विचारिलें.

मीही जवळच होतों. बाईनीं उत्तर केलें जे, ' मोघम लिहा. अमकें ह्मणून सांगितलें नाहीं. याप्रमाणें ऐकिलें तें वर्तमान. दुसरें बाईनीं शिवरात्रीस श्रीओंकारेश्वरास जायाचा निश्चय केला आहे. परंतु राजश्री चिमाजी बुळे यांनीं गांगलीकडे फौज व पेंढारी जमाव केला आहे. झाबेवाला पाळेगार बेबदल जाला आहे. त्याच्या पारिपत्यास जातों ह्मणून बाईसही सांगून पाठविलें आहे, कीं एक थोरली तोफ पाठवावी. परंतु हे कांहीं तोफही पाठवीत नाहींत व बुळेमजकुराचा विश्वासही करीत नाहींत. इकडे खरगोणाकडे काशी रंगनाथ दोन चारशें पागा घेऊन आले आहेत. यामुळें येथें बाईस संदेह प्राप्त जाला आहे. ह्मणून शिवरात्रीची यात्रा राहीलसें दिसतें. तेथें ध्वजोत्सव करणार आहेत. त्यास धोंड दीक्षित व सदाशिव भट उभयतांस पाठवावयाचा निश्चय करणार असें ऐकिलें. अद्याप संदिग्धच आहे. काय ठरेल तें पाहावें. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान बावनबुर्जीगढीस लागले आहेत. तीही सर जाली असेल. तेथून ग्वालेर अगर गोहृज दोहींतून एका स्थळास मोर्चे लावतील. ग्वालेरींतील जकिरा अखेर जाला आहे. एकदां राघो मल्हार ग्वालेरीस गेले होते. शहरपन्हा घेऊन आंत गेले होते. परंतु बालेकिल्ल्यावर हजार आठशें माणूस चांगलें होतें. त्यांनीं खालीं येऊन मोर्चा उधळून दिला. त्यामुळें पाटीलबावांनीं राघो मल्हार यांजवर इतराजी केली. त्यांजकडील पागा काढली. खांसा स्वारी पाटीलबावाच जाणार. याप्रमाणें वर्तमान येथें आलें. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विनंति."

---

**लेखांक ८४.** ता. १८ फेब्रुवारी इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. माघ वद्य १ शके १७०४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसी विज्ञापना. बाईनीं पत्र द्यावयास आज्ञा केली आहे. दोन चार वेळां लेखकांस विचारलें. परंतु देतों देतोंच ह्मणतात. यास्तव जालें वर्तमान सेवेसी पाठवावें ह्मणून डांकेबरोबर मीं व केसो भिकाजी यांणींही सेवेसी विनंतिपत्रें लिहिलीं आहेत. डांकेबरोबर येथून पत्रें ल्याहावीं, ते सेवेसी पावतात कीं नाहीं हें कांहींच कळत नाहीं. हरएकविशी बाईचीही सावधता आहे. श्रीमंतांच्या लग्नाच्या पत्रिका तों माघ शुद्ध नवमीच्या येथें आल्या होत्या. परंतु तेथें बोलतात जे माघ वद्य किंवा फाल्गुन शुद्धांत होणार असें बोलतात. निश्चयें कांहीं कळत नाहीं. अलीकडे पत्रेंही येत नाहींत. बाई श्रीओंकारेश्वरास पौर्णिमेस जाणार होती. परंतु इकडे चिमाजी बुळे झाबेप्रांतीं जमावसुद्धां आले आहेत. काशी रंगनाथ पागा घेऊन खरगोण वगैरे

प्रांतीं फिरतात. यास्तव बाई गेली नाहीं. सदाशिवभट उपाध्ये यांजबरोबरच पांचां हजारांचें कापड, कांहीं सफेत, कांहीं छिटें, व पांच खंबाईत व पंचवीस कद रेशमी, ऐसें ध्वजोत्साहाचा सरंजाम भटजीबरोबर ओंकारेश्वरास पाठविला. पौर्णिमेस ध्वजा लागली असेल. संतर्पणेंही करविलीं आहेत. शिवरात्रीस सडी गेली तर नकळे. परंतु जाणार नाहींत असें दिसतें. महेश्वरच्या किल्ल्याची माबजत करितात. कारखाने लागले आहेत. याप्रमाणें येथील वर्तमान. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. येथें लोकांचें देणेंही फार जालें आहे. देणेंदारांचा उपद्रव व नित्य कृत्य चाललें पाहिजे. फार संकट आहे. धनी कृपाळू समर्थ. येथें एक कवडीचा आश्रय नाहीं. स्वामींनीं उपेक्षा केली तर सेवकाची गत काय होईल? धन्याच्या पायावितरिक्त दुसरा आश्रय नाहीं. मजविशीं तेथें स्मरणही कोण देतो? खर्चावांचून फार श्रम आहेत. धनी कृपाळू समर्थ. श्रुत होय हे विज्ञप्ति.''

---

**लेखांक ८५.** ता. २० फेब्रुवारी इ. स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. माघ व॥ ३ शके १७०४.

''सेवेसी विठ्ठल श्यामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंति सेवकाचें वर्तमान तागाईत चंद्र १७ रबिलावलपर्यंत मुक्काम महेश्वर येथें स्वामींच्या कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वृत्त राजश्री केसो भिकाजी यांनीं बाईशीं बोलले जे, श्रीमंतांनीं तुम्हांसही पत्र लिहिलें आहे. आम्हांसही आज्ञापत्र लिहिलें आहे, जें रेवा उत्तर तीरच्या महालचा ऐवज बाईशीं बोलून ऐवज लवकर पाठवून देणें. त्यास तेथें राजश्री तुकोजीबावांस दहा हजार फौज ठेवायास सांगितली आहे. यास्तव ऐवजाची निकड तेथें फार आहे म्हणून वरचेवर श्रीमंत लिहितात. आम्हीही आपल्यास वारंवार विनंति करीतच आहों. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, आम्हांकडे ऐवज काय आहे? कोठें असेल तो घ्या. यांनीं उत्तर केलें जे, आम्हींच घ्यावा असें असतें, तर आम्हांसच निक्षून लिहिते कीं आमके जागां ऐवज आहे, तो हुंड्या करून पाठवा. तो प्रकार नाहीं. तुमचा तालुका. वहिवाट सारी आपल्या हातची. आम्हांस काय ठाऊक म्हणून वारंवार श्रीमंत तुम्हांस लिहितात. त्यास बाईनीं साफ उत्तर केलें जे, इकडील महालचा ऐवज म्हटलें तर तुकोजीबावांनींच कांहीं महाल सावकारांस दिले आहेत. ते त्यांजकडे

ऐवज जातो. कांहीं आह्मांकडे असेल तो आमचा आह्मांस खर्च लागला आहे. आह्मांपाशीं ऐवज कोठें? द्यावा कोठून? यांनीं उत्तर केलें जे, आह्मीं श्रीमंतांस काय लिहावें? बाई बोलली जे, आह्मी बोलतों असें लिहा. यांनीं उत्तर केलें जे आह्मीं असें लिहूं नये. आपणही असें सांगूं नये. यांत श्रीमंतांची मर्जी ठीक रहाणार नाहीं. बाई बोलली जे, आह्मीच बोलतों त्यापक्षीं तुह्मांस लिहावयास काय चिंता आहे! यांनीं उत्तर केलें जे, असें लिहिल्यानें जाबसाल चढीस पडेल. बाई बोलली जे, आह्मी उखळांतच डोई घातली आहे; तेथें मागें पुढें काय पहावयाचें आहे? अशीं हजारों पत्रें येतच आहेत. आह्मांस पत्र त्यांचें आलें आहे. त्याचें उत्तर आह्मीही देतों. त्याअन्वयें तुह्मीही लिहून पाठवा. याप्रमाणें चंद्र १२ रोजीं संध्याकाळीं जाबसाल जाला. बाईनींही आपल्या पत्राचें उत्तर द्यावयास फडनीसास सांगितलें. याप्रमाणें जाबसाल जाला. वारंवार महालच्या ऐवजाविषयीं स्वामी यांस लिहितात. येथील तों उपेक्षा आहे. धन्यांची मर्जी! राजश्री पाटीलबावांकडील वर्तमानः—गोहजवाला राणा पाटीलबावांशीं सख्यत्वाचे जाबसाल करीत आहे. तुमचा स्थापित असें ह्मणतो. ग्वालेरहीं देतो. ठाणें बसलें असेल कीं बसेल. तिकडील फडशा जाहल्यावर तिकडील बंदोबस्त करून पाटिलबावा फिरणार. भिंडभदावरचाही बंदोबस्त करून, आणीक कोणी राजेरजवाडे मवास आदिकरून त्यांचा परामर्ष यथायुक्त करून, चौमासांचे छावणीस उज्जनीस येणार. असें बाजारी वर्तमान ऐकिलें. कलमी नाहीं. अलीकडे बाईकडेही कांहीं कागदपत्र येत नाहीं. अंतस्थ कांहीं येत असतील हें न कळे. हैदरनायकाचा वकील नरसिंगराव तमाजी पाटीलबावाकडेस गेला होता. तो पाटीलबावांची एक भेट जाली नी मयत जाला. तिकडे हैदरनायकही मयत जाला. यास्तव येथें कित्येक बोलतात कीं इंग्रजांचा काच तुटला. आतां कांहीं इंग्रज डोई उचलतील असें बोलतात. हेंही बाजारी वर्तमान. देखिलें ऐकिलें सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८६. ता. २ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** ' मि. माघ वद्य १४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रबिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून चंद्र २३ मिनहूस पत्रें डांकेबरोबर रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वृत्त छ २३ मिनहूस संध्याकाळीं राजश्री संताजी होळकर यांचें पत्र

सेंदव्याहून बाईस आलें जे, इंग्रजांचीं चार पलटणें सोनगडावर आलीं. तेथें दोन पलटणें रातोरात निघून कोंडाईबारीवर फौज सरकारची होती. मालोजी राजे व वाघ असे होते. त्यांजवैर इंग्रजांनीं छापा घातला. दोनशें माणूस ठार जालें, व शंभर माणसें धरून नेलीं. कांहीं जखमी जाले, ते तळावरच राहिले. फौज उधळली. इंग्रजांचा आणीक जमाव होतच आहे. खानदेशांत नंदुरबारास पूर्ववत्-प्रमाणें येणार, ह्मणून खानदेश तमाम खलबलाट जाहला आहे. याचा बंदोबस्त काय करणें तो करावा ह्मणून बाईस पत्र आलें. तें वाचून पाहिलें. बाईनींही पत्र वाचून पाहून, दोन काशीदजोड्या कोंढाईबारीकडेस बातमीस पाठविल्या व एक जोडी सेंदव्यास पाठविली कीं, पक्की बातमी राखून बरचेवर बातमी पाठवीत जाणें. याप्रमाणें पहिलें वर्तमान. राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून एक ब्राह्मण आला. त्यास वीस रोज जाले. त्यानें जबानीं वर्तमान सांगितलें जे, पाटीलबावा ग्वालेरीपासून अर्धकोसावर लष्करसुद्धां उतरले आहेत. किल्याभोंवतालीं फौज उतरवली आहे. किल्याचा शहरपन्हा घेतला. बालेकिल्यावर सात आठशें माणूस झुंजतें आहे. लढाई सुरू आहे. गोहदवाला पाटीलबावांशीं विनयें संधानेंकडून बोलत आहे कीं, ग्वालेर घ्या आणि माझा मुलूख जो घेतला आहे तो सोडा.· हे स्वारीखर्च मागतात. नाहींतर हा किल्ला घेऊन गोहदेस लागावें असें पाटीलबावांचें मानस आहे. त्यावरून गोहदवाला इंग्रजांच्या वकिलाशींही कांहीं अंतस्थ बोलत आहे. याप्रमाणें ऐकिलें वर्तमान. राजश्री चिमाजी बुळे झाबे प्रांतीं गेले आहेत. त्यांचें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. येथें किल्याचे शहरपन्हाचा कारखाना दक्षिणेकडे जारी आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं नर्मदेस घांट पहिलेंच बांधला आहे. त्या घांटावर श्रीचें देऊळ बांधावयास चौथरा बांधून ठेवला होता. तेथें त्या चौथऱ्यावर बाईनीं देऊळ बांधावयास काम लावलें आहे. जागां जागां किल्याचे वगैरे मरामतीस कारखाने जारी आहेत. इकडे भिल्लांचा शिलशिलाट होईल असें दिसतें. दिल्लीकडील वर्तमानः—नजबखान मेल्यावर त्याचे चेले व खानमजकुराची बहीण त्यां आपसांमध्यें कलह लागला होता. दिल्लीसच होते. पादशाहास आपल्या हुकुमांत ठेऊन होते. तेथेंही आपसांत कलह बहुत जाला, ह्मणून महदबेग व आमदानी हे उभयतां दिल्लीहून रुसून आगऱ्यास गेले. मागाहून आगा सफी व खानाची बहीण अशीं उभयतां फौजसुद्धां आमदानीवरैं चढून गेलीं. तेथें कोणी मध्यस्थ पडून उभयतांचा सलूख जाला. फिरून कांहीं वर्तणुकींत व्यत्यय पडला, त्यावरून फिरून बिघाड जाहला. ह्मणून आमदानी आपले फौजेसुद्धां आगऱ्याहून कूच करून ग्वाल्हेरीस पाटीलबावांकडेस रवाना जाहला. पाटीलबावांचें व

त्या आमदानीचे पहिल्यापासून एकलास आहे. सूत्रही आहे. हिंदुस्थानांत जागां जागां राजेरजवाडे आदीकरून सर्वांत आपसआपसांत फितूर व लढाई झगडे फार लागले आहेत. अशा समयांत दक्षिणी फौज हिंदुस्थान प्रांतीं येती, तर सरकारकिफायत फार होती; ह्मणून कोणी गृहस्थ स्नेहित आहे त्यानें जयपुराहून लिहिलें होतें. तें वीस दिवसांचें वर्तमान आहे. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची विपत्य फार आहे. देणें लोकांचें फार जालें. त्यांचा उपद्रव निराळा. पोटास नाहीं ती विपत्य वारंवार दर पत्रीं विनंति लिहितों. धनी रागें भरतील. मी आणीक कोणास लिहूं ? कोण माझेविषयीं धन्यास स्मरण देतो ? स्वामी सर्वज्ञ. गरिबांचा प्रतिपाळ करणार. धनी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति. डांकेबरोबर येथून पत्रें सेवेसी लिहितों. हे तेथें कधीं पावतात किंवा नाहीं पावत, हें कांहीं कळत नाहीं. डांकेचे कासीदही खर्चाचा बोभाट करितात. सेवेसी श्रुत होय हे विनंति."

---

**लेखांक ८७.** ता. ७ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. फाल्गुन शु॥ ४ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ रबिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर व जासूदजोडीबरोबर विनंतिपत्रें रवाना केलींच आहेत. सांप्रत नवीन अधिकोत्तर वर्तमान कांहीं नाहीं. बाई स्वस्थचित्तें स्नान देवतार्चन करून आहेत. राजश्री पाटीलबावांकडीलही बाजारी अफवेचें वर्तमान आहे कीं, गोहजचा किला लवकरीच हस्तगत होईल. किल्यांत महागाई फार आहे. दोन तीन हजार मनुष्य व हजार पांचशें स्वारही आहेत. अडीच तीन शेरांची धारण किल्यांत आहे. याप्रमाणें बाजारी वर्तमान. सेवकास चार महिने जाले आज्ञापत्र येऊन. येथें सातशें रुपये देणें. त्या पेंचामुळें साहुकार येऊं देईनात. बाईकडून मजला कांहीं पावत नाहीं, हें स्वामींस विदित आहे. तत्रापि, दोन चार वेळां कोणी मातबराकडून बाईस हटकलें. त्यास बाईनीं साफ उत्तर केलें जे, आपल्या धन्यास लिहून पाठवावें. तेथून खर्चास आणऊन येथें देणेदाराचा फडशा करून जावें. अशीं दोन चार वेळां उत्तरें जालीं, वारंवार त्यांस काय हटकावें ? धन्याचें नांव पदरीं. कोण कोणास ग्लान सांगावी ? सेवकावर इतकी इतराजी व्हावी अशी सेवकापासून वर्तणूक कांहीं जाली नाहीं. बरें. मी चाकर पदोपदीं अपराधी. क्षमा

करणार स्वामी कृपाळू समर्थ. हरी बावाजीबरोबर लुटला गेलों. एक वस्त्रानशीं येथें आलों. त्यावर धन्याचे आज्ञेप्रमाणें आज साडेपांच वर्षें येथें चाकरीवर आहें. मजवर गरिबावर इतकी इतराजी जाली, तर, सेवक गरिबाचा वाली धन्याव्यतिरिक्त कोण? स्वामींनीं परामर्ष न केला, तर माझा येथें कोणी वाली नाहीं. अबरू धन्याची आहे. बाईस वारंवार हटकायाची सीमा जाली. आतां कोठवर ग्लान सांगावी? या संकटांतून काढणार धनी कृपाळू समर्थ. फार दिवस जाले, धन्याच्या चरणदर्शनाची खंत वाटते. घरीं मातुश्रीचें पंच्याऐंशीं नव्वद वर्षांचें वय. त्यांची भेट नाहीं! मुलेंमनुष्यें अशा सवंगाईत अन्नवस्त्रावांचून हैराण. तेथें ते श्रम आहेत; येथें मी अशा संकटांत आहें! धनी कृपाळू सर्वज्ञ समर्थ. सर्व संकटापासून सोडविणार स्वामी समर्थ. स्वामींनीं उपेक्षा केल्यानें सेवकाची अबरू रहणार नाहीं. स्वामी सर्वज्ञ. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८८. ता. २ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. माघ वद्य १४ शके १७०४.

"श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

आज्ञांकित सेवक विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रबिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—बहुत दिवस जाले, स्वामींकडून अगर सरकारचें आज्ञापत्र येत नाहीं. वर्तमानही कांहीं कळत नाहीं. आज तीन महिने अधिकच पत्रें येत नाहींत. श्रीमंतांच्या लग्नाच्या लग्नपत्रिका शुद्ध ९ नवमीचे येथें आल्या होत्या. तेथें लग्न लागलें असें कोणाचेंही येथें पत्र आजपर्यंत आलें नाहीं. आतां वद्य पक्षीं जालें असेल ह्मणून येथें बोलतात. राजश्री केसो भिकाजी दातार यांचें परवां घरचें सतरा अठरा दिवसांचें पत्र आलें. त्यांत लिहिलें होतें कीं, शुद्ध पंचमीस देवदेवक बसवून षष्ठीस धत्त्यांचे मुलीचा निश्चय करून वाग्निश्चय केला, इतकें वर्तमान होतें. अलीकडे लग्न लागल्याचें वर्तमान आजपर्यंत आलें नाहीं. येथें दरबारांत पुसतां, त्यास काय सांगावें? नवाबाचे पुत्र साहेबजादे व सातान्याचे राजेश्री व भोसल्यांचे चिरंजीव चिमणाराजे वगैरे पंचवीस तीस हजार फौज मिळाली आहे. ह्मणून बाजारी आफवा मात्र ऐकिल्यांत येतात. बाईही ह्मणत होती जे, 'फौजा फार मिळाल्या आहेत. सुरक्षित लग्न लागो.' श्रीमंतांच्या कल्याणांत आमचें सर्व जगताचें कल्याण आहे.' असे ह्मणत होती. नवीन इंग्रजांचें वर्तमानः—इंग्रजी चार पलटणें

सोनगडास आली, त्यांतून दोन पलटणें रातव्यानें कोंडाईबारीस येऊन, तेथें फौज सरकारची व होळकराची होती, त्यांजवर छापा घातला. फार खराबी जाली ह्मणून पेंढाऱ्यांचे राऊत पळून सेंदव्यास आले. तेथून संताजी होळकरानें बाईस पत्र लिहिलें होतें, तें वांचून पाहिलें. त्यावरून वर्तमान सेवेसीं लिहिलें असे. वरकड ऐकिले वर्तमानः—श्रीमंतांच्या पत्रांवरून विदित होईल. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. येथें सातशें रुपये देणें लोकांचें जालें आहे. देणेदारांचा उपद्रव, नित्यकृत्यांची विपत्य अशा श्रमांत आहें. येथें बाईकडून एक कवडीची प्राप्त नाहीं. आह्मांवर रागें आहेत कीं, हे येथें बसून मनास येईल तसें वर्तमान लिहितात. कोणी कर्ज देखील देईना, अशा श्रमांत आहें. बाईस एक दोन वेळां कोणाकडून हटकाविलें. त्यांनीं उत्तर केलें जे, "आपल्या• धन्याकडून खर्चास आणवावें नी बसून खावें, खर्चास पाठवीत नाहींत, तर यांस कशास येथें ठेविलें आहे? आह्मांजवळ कांहीं नाहीं." साफ उत्तर केलें. आतां येथें माझें कोण आहे? धन्यांनीं उपेक्षा केली, तर येथील कर्ज वारून माझें येणें कसें होईल? काय उपाय करूं? श्रीमंतांस विनंति आपण करून, येथील ऋणस्वापासून मुक्तता होऊन श्रीमंतांचे चरण दृष्टीस पडेत असें करणार स्वामी कृपाळू. माझेविषयीं तेथें कोण विनंति करितो? ईश्वर श्रीगणपति आपणास स्मरण देवो. चार वर्षें येथें जालीं. धन्याच्यां चरणदर्शनाची खंत वाटती. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ८९.** ता. ८ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. फाल्गुन शु॥ ६ शके १७०४.

"सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ रबिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं डांकेबरोबर विनंतिपत्रीं लिहून पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसीं पावलीं असतील. सांप्रत सरकारचीं पत्रें जासुदजोडीबरोबर चंद्र १९ रबिलावलचीं स्वामींनीं पाठविलीं, तीं चंद्र २ मिनहूस संध्याकाळीं येथें पावलीं. सरकारचीं आज्ञापत्रें मातुश्री अहिल्याबाईस व राजश्री केसो भिकाजी यांस व एक सेवकास ऐशीं• व राजश्री तुकोजी होळकर यांनींही बाईस पत्र लिहिलें होतें जे, 'श्रीमंतांच्या लक्षपट्टीचा ऐवज सर्वांबरोबर आपल्यावरही दोन लक्ष रुपये देणें ठरले आहेत. त्यास, तुह्मांकडून मागील ऐवज येणें त्यापैकीं देविले असेत. वहिलीं द्यावे.' ह्मणून पत्र त्यांचें होतें. तें पत्र केसो भिकाजी व मी वाचून

पाहून रात्रींच पत्रें बाईकडे घेऊन जावीं, तों राजश्री रंगराव वोढेकर ते दिवशीं बाईचे भेटीस आले होते. त्यांस रात्रौ फराळास वाड्यांत बाईंनीं बोलविलें होतें. त्यास, बारा घटका रात्रपर्यंत त्यांस वस्त्रें देऊन बिदा केलें. तदोत्तर बाईंनीं निद्रा केली. मीही ते वेळस कांहीं बोललों नाहीं. दुसरे दिवशीं त्रितीय प्रहरीं, दरबारच्या समयास, केसो भिकाजी व मी पत्रें घेऊन वाड्यांत गेलों. राजश्री बाजीराव बर्वेही दरबारास आले होते. दोन घटका दिवस राही तोंवर दरबार होता. तदोत्तर बरखास्त होऊन बाई उठली. ते वेळेस विनंति केली कीं, एकीकडे बसावें. सरकारचीं पत्रें मुजवद जासूदजोडी घेऊन आले, तीं वाचून पहावीं. तेव्हां एकीकडे बसली. केसोपंत व मी व फडणीस मुजुमदार व बाई असे पांच जण होतों. सरकारचें व तुकोजीबावांचें दोन्हीं पत्रें पुढें ठेविलीं. फडणिसांनीं पत्रें वाचून दाखविलीं. ऐकून बाई बोलली जे, 'तुकबांनीं येथें लिहिलें, तें तेथें ऐवज देयास नाहीं कीं काय? तत्रापि, त्यांनीं आह्मांस लिहिलें आहे कीं, मागील ऐवज तुह्मांकडून येणें त्यापैकीं देणें. त्यास, मागील ऐवज आह्मांकडे कोणता, काय राहिला आहे, तो त्यांजकडून लिहून आणवावा व तुकबास पत्र लिहून पाठवावें. कोणता ऐवज आह्मांकडे पोकळी राहिला आहे, तो त्यांजकडून लिहून आणवा.' इतकें बोलून उठली. आह्मांसही निरोप दिला. केसोपंतही ह्मणाले जें, 'आज आपण पत्रें दिलीं आहेत. तीं आपल्यांत आपण बोलली, त्यांत आपण कशास बोलावें? उद्या परवां विचारूं. कळलें कीं तुकोजीबाकांस पत्रें लिहितील. तेथून उत्तरें आल्याखेरीज हे कांहीं जाबसाल निश्चून करीत नाहींत. मग आपण आजच कशास बोलावें? तुकोजी-बावांकडे यांचीं पत्रें गेलीं ह्मणजे आपणही श्रीमंतांस लिहून पाठवूं. तोंवर मध्यें बोलूं. काय उत्तरें करितात तें पाहून लिहूं.' जालें वर्तमान स्वामींस विदित व्हावें ह्मणून सेवेसीं विनंति लिहिली असे. धोरणा पुढें दिसतो कीं तुकोजीबावांस लिहितील. तिकडे पाटीलबावांसही लिहितील. दोहींकडील उत्तरें आल्यावर जो जाबसाल करणें तो करितील. असें दिसतें. वरकड वर्तमान अलीकडे पाटील-बावांकडूनही इकडे कांहीं वर्तमान आलें नाहीं. पेशजीं कोंडाईबारीवर इंग्रजांनीं गडबड केली ह्मणून संताजी होळकराचें पत्र आलें होतें. त्या पत्रावरून सेवेसीं विनंति लिहिली होती; परंतु तें वर्तमान अद्याप दुणावलें नाहीं. राजश्री माधवराव निंबाळकर यांजकडीलही कारकून गोविंद खिजमतरायांचा पुतण्या येथें आला आहे. शोध करितां बोलले जे, रोजगाराच्या उद्देशें आलों आहों. याप्रमाणें देखिलें ऐकलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय, हे विज्ञप्ति. तुकोजी,

**लेखांक ९१.** ता. ७ एप्रिल इ. स. १७८३.

**श्रीगजान.** मि. चैत्र शु॥ ५ शके १७०५.

"सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ जमादिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून चंद्र २६ रविलाखरीं डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचा मजकूर राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून राजश्री माधवराव गंगाधर यांनीं येथें बाईस पत्रें लिहिलीं होतीं. तेथील चंद्र १० रविलाखरचीं पत्रें येथें चंद्र २७ रविलाखरीं संध्याकाळीं पावलीं. राजश्री वासुदेव चिमणाजी व विनायक बाजी या उभयतांनीं दरबारास रात्रीं जाऊन एकांतीं बाईस पत्रें वाचून दाखविलीं. त्यांत मजकूर होता कीं, कलकत्त्यांत इष्टीनसाहेब मुख्यत्वें आहे. त्यानें पाटीलबावांस पत्र लिहिलें होतें कीं, 'आमचा वकील तुह्मांजवळ आहे. त्यांचे तुमचे शपथपूर्वक भाषणें जालीं आहेत, करारमदार जे ठरले आहेत, त्याप्रमाणें आह्मांस मान्य आहेत. केवळ हैदरनाईकाच्या सल्ह्या-बिघाडावर मदार नाहीं. तुमचें वचनयुक्त खचीत बोलणें जालें आहे. त्याच तुमच्या वचनावर आह्मी कायम आहों. मध्यें तुमच्या चित्तांत कोणी विपर्यास घालतील. ते तुह्मीं ध्यानांत न आणावे. आह्मीही आणणार नाहीं. साष्टी वगैरे दोन स्थळें तुह्मीं आह्मांस देविलीं आहेत. तेंच आह्मांस मान्य आहे. वरकड कोंकणपट्टीचीं स्थळें आह्मी सोडितों. अतःपर तुमच्या आमच्या सल्ह्यांत बिघाड होऊं नये.' अशीं बहुत गौरसीचीं पत्रें आलीं. यांनीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस आपल्याजवळ आणावें. तेथें इंग्रजांनीं सुरतवाल्यांनीं दादासाहेबांस कांहीं अटकाव करूं नये. सुखरूप आह्मांकडेस येऊं द्यावें ह्मणून पाटीलबावांनीं कलकत्तेवाल्यास पत्रें लिहिलीं होतीं. त्यास त्यांनीं सुरतवाल्यास पत्रें पाठविलीं कीं, दादासाहेब पाटीलबावांकडेस येतील. त्यांस अटकाव न करितां सुखरूप येऊं देणें. अशीं पत्रें पाटीलबावांकडेच पाठविलीं. तीं पत्रें व पाटीलबावांनीं आपला कारकून केसो अनंत, असे दादासाहेबांस आणावयास पाठविले, याखेरीज कलकत्तेवाल्यांनीं कांहीं विलायतप्रांतींचे अपूर्व अपूर्व जिन्नस एक नांव भरून सांगातें पाटीलबावांकडेस पाठविले. इंग्रजांचा व पाटीलबावांचा पक्केपणें स्नेह जाहला ह्मणून फार स्तव लिहिला होता, व राजश्री आबाजी नाईक बानवळे यांनीं पाटीलबावांस एकवीस लक्ष रुपये दिले. आणीकही तीस चाळीस लाख रुपये देणार. नाईकाचा स्तवच फार लिहिला होता. दुसरें, श्रीमंत राजश्री दादासाहेबांशीं पाटीलबावांचें बोलणें अंतस्थ जालें आहे कीं, दहा

लक्ष रुपयांचा वसुली सरंजाम अगर नक्त द्यावे, .आणि दादासाहेबांनीं स्वस्थ स्नानसंध्या करून कोठें गंगातीरीं बसावें. बाजीरावसाहेबांस पुण्यास श्रीमंत रावसाहेबांजवळ पाठवावें. असे आणीक कित्येक प्रकारचे करारमदार अंतस्थ पाटीलबावांनीं करून घेतले आहेत. ते दादासाहेबांनींही मान्य केले आहेत. त्यावरून पाटीलबावांनीं कलकत्तेवाल्यांचीं पत्रें आणवून, कारकून पाठवून दादासाहेबांस आपल्याकडेस आणविलें आहे. तिसरें वर्तमान, ग्वाल्हेरीसही पाटीलबावांचे मोर्चे शहरपन्हा घेऊन बालेकिल्ल्याच्या दरवाज्यापावतर लोक गेले आहेत. गोहदवालाही फार अर्जू आहे कीं, ग्वाल्हेर घेऊन माझा मुलूख सोडून द्यावा. पाटीलबावांचें बोलणें आहे कीं, आमचे आज्ञेत राहावें. सांगूं ते चाकरी करावी. त्यांचें बोलणें आहे कीं, ये प्रांतीं जे चाकरी कामकाज सांगाल तें करीन. परमुलूख परराज्यांत घडणार नाहीं. इतका जाबसाल पडला आहे. ग्वाल्हेर घेतल्यांत कांहीं बाकी नाहीं. याप्रमाणें वर्तमान ऐकून बाईनींही पाटीलबावांचा स्तव फार केला. राजश्री तुकोजीबावाही पाटीलबावांस सामील असते, तर या यशकीर्तीस पात्र होते. तिकडे जाऊन काय मिळविलें, असेंही आपसोसयुक्त बोलली. बारीक शोध करितां याप्रमाणें वर्तमान ऐकिलें तें सेवेसीं श्रुत होय. विलायतेंत इंग्रजांचा पादशाहा आहे त्याच्या पादशाहाजादीनें कारभारी यांस विचारिलें जे, 'दक्षिणेंत इतका मुलूख सर केला ह्मणून ऐकतों. त्यास त्या मुलुखचा पैका कोठें आहे व आठ दहा वर्षांचा उदमांचा पैसा काय आकारला, तो दाखवा ?' . तेव्हां कारभारी यांनीं अर्ज केला जे, 'दक्षिण्यांशीं आद्याप बिघाडच आहे. त्यामुळें मुलकी पैसा वसूल होत नाहीं व सावकारी मालही बंद आहे. मालाचा खप दक्षिणेंत. त्या दक्षिण्यांशीं बिघाड! यास्तव पैसा कोणीकडील येत नाहीं.' 'दक्षिण्यांशीं बिघाड कसा ?' त्यांनीं दादासाहेबांचें प्रकर्ण सांगितलें व सावकारही फिर्याद जाहले कीं, दहा बारा वर्षे महाल पडले आहेत. दक्षिणेशिवाय महालचा खप होत नाहीं. त्यावरून पातशाहाजादीची ताकीद कलकत्तेवाल्यास आली कीं, दक्षिणवाल्यांशीं बिघाड न करणें. त्यास सलूख करून कोठ्या चालू होय तें व मुलकी पैसा वसूल होय तें करणें. त्यावरून कलकत्तेवाल्यानें सलुखाचा डौल घातला आहे ह्मणून हें सावकान्यांत वर्तमान ऐकिलें. तें सेवेसीं श्रुत होय. लग्नपट्टीबद्दल दोन लक्ष रुपये होळकरांकडून यावे, सबब सरकारची जोडी पत्रें घेऊन येथें आले. त्यास यांनीं राजश्री तुकोजी होळकर यांस, कासीदजोडीबरोबर पत्रें पाठविलीं आहेत. त्याविषयीं जे वेळेस हटकावें ते समयीं ह्मणतात. ' (अपूर्ण.)"

**लेखांक ९२.** ता. २० एप्रिल इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. चैत्र वद्य ३ शके १७०५.

"श्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीं:-सेवक विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ जमादिलावल-पर्यंत मुक्काम महेश्वैर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- आपण कृपा करून पत्र व खर्चास पाठविलें तें पावलें. राजश्री गबाजी सदाशिव कमाविसदार यांनींही मान्य केलें. आठ पंधरा दिवसां ऐवजही येईल, येथें देणें निवडतां साडे-सातशें यांचा भरणा जाहला. बरें, हे पांचशें रुपये यानें त्यांस भरंवसा जाला. एकशें शेहेचाळीस रुपये व्याजबट्टा मनोतींत गेला. बाकी साडेतीनशें रुपये त्यांच्या मुदलांत दिले. पुढें त्याजवळूनच कर्ज घेऊन खात आहें. स्वामींस हें तापत्रय कळलें ह्मणजे श्रीमंतांसच श्रवण जालें. घरचें वर्तमान तर चिरंजीवानें विदित केलेंच असेल. तात्या, माझा वशिला दरबारांत कोणी नाहीं. एकनिष्ठ चाकरी करितों, परंतु धन्यास सांगणार कोणी नाहीं. बरें, ईश्वर आपलें कल्याण करो. गरीबांस त्राते आपण आहांत. बाणांचा मजकूर पेशजीचा आपण लिहिला. त्यास, आपले पसंतीस त्यांतून बाण आला नाहीं. येथें तों रेवामाहात्म्यांत आहे कीं, चर्पट त्रिकोण कसाही बाण श्रीओंकारक्षेत्रींचा असल्यास त्याची भावेंकरून पूजा केल्यास श्रेयस्कर आहे. चांगले सलक्षण बाण कोठें निघत नाहींत. तत्रापि, निघाला तर येथील भिल्ल व ब्राह्मण मनास येईल तसा रुपया सांगतात. पाऊणशें, शंभर, चाळीस, पन्नास, असें मोल सांगतात. कित्येक ब्राह्मणांस चटक लागली आहे. ते, कांहीं चांगले, त्यांत कांहीं कृत्रिम, असे पुण्याकडे घेऊन जातात. तिकडे त्यास रुपया मिळतो. फार चांगला तो कृत्रिम घांसून करितात, असें आहे. असो. प्रस्तुत एक बाण पुजेस बाईजवळून मीं मागून घेतला आहे. पंचायतनांत पुजाया ठेवला होता. आपण दोन चार वेळां लिहिलें. प्रस्तुत तो बाण चांगला कोठें मिळत नाहीं, ह्मणून तोच बाण पाठविला आहे. बाईजवळ बाणांची परीक्षा फार आहे. त्यांजवळील परीक्षेचा बाण चांगला आहे. पसंतीस ये असाच आहे. पूजेंत ठेवावा. कोणास देऊं नये. कपुरा कासीदाबरोबर पाठविला आहे. बाण फार चांगला आहे. धोतरजोड्याविषयीं लिहिलें. तीन जोडे, बारा, नऊ, सात या पद्धतीचे लिहिले, त्यास मातबर सोबतीशिवाय वाटेनें सणंग निभावत नाहीं. बऱ्हाणपुराजवळ व औरंगाबादेजवळ या दोहीं स्थळीं जकात मनास येईल तशी मागतात. येथील दस्तकास देखील मानीत नाहींत. असा प्रकार आहे. जशी आज्ञा पाठवाल तसें करून, कोणी मातबर सोबती निघेल त्यांजबरोबर

पाठवूं. आपल्या पत्रांत सरकारचा लखोटा घालून पाठविला आहे. हा लखोटा एकांतीं श्रीमंत नानासाहेबांजवळच द्यावा. वाचून पाहात तोंवर आपण जवळ असावें. पत्रें वाचून काय उत्तर करितात, तेंही श्रवण करावें. फिरून तीं पत्रें श्रीमंतांस प्रस्तुत पाठविलीं नाहींत. मागाहून पाठवीन. बाण दोन पाठविले आहेत. हे घ्यावेत. फार चांगले आहेत. आपले पसंतीस पडतील ते ठेवावे. राहतील ते याच कासिदाबरोबर आमचे घरीं पाठवावे. कासिदांस रोजमुरा देऊन लवकर उत्तरें देऊन पाठवावें. श्रीमंतांसही विनंति करावी हे विज्ञापना."

---

पौ॥ चंद्र ३ जमादिलाखर | लेखांक ९३. | ता. २८ एप्रील इ. स. १७८३.

सलास समानीन. | श्रीगजानन. | मि. चैत्र वद्य १२ शके १७०५.

"सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ जमादिलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून चंद्र १७ मिनहूम कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसीं पावलीं असतील. साप्रत सरकारचीं आज्ञापत्रें राजश्री केसो भिकाजीस व सेवकास दोन्हीं पत्रें चंद्र ९ मिनहूचीं डाकेबरोबर रवाना जालीं, तीं चंद्र २१ मिनहूस दो घटका रात्रीं येथें पावलीं. पत्रें वाचून केसोपंत व मी पत्रें घेऊन दरबारास गेलों. बाईस एकांतीं पत्रान्वयें बहुत प्रकारें बोललों की, लग्नपट्टीच्या ऐवजाविषयीं वारंवार सरकारचीं पत्रें येतात. जासूद बसलाच आहे. हा लग्नोत्साहाचा ऐवज आपल्याकडून लवकर पोंहचल्यानें अति संतोष होईल. विषयही थोडका, तथापि अन्यथाजवळून या पट्टीचा ऐवज बहुतकरून वसूल जाला. आपण मातबर. प्रौढता आपल्याकडे. श्रीमंतांच्या लग्नोत्साहाचा ऐवज संतोषेंकरून लवकर पोंहचल्यानें श्रीमंतांस बहुत संतोष होईल. या रीतीनें उभयतांही बोललों. बाईनीं उत्तर केलें जे, 'तुकबास पत्र लिहिलें आहे. त्याचें उत्तर आल्यावर काय बोलणें तें बोलूं.' केसोपंतांनीं उत्तर केलें जे, 'तुकोजीबावांचें पत्र आपल्यास आलें ह्मणून श्रीमंतांनीं लिहिलें आहे.' बाई बोलली जे, 'पत्र आल्यावर आह्मी नाहीं कां ह्मणूं ? आधीं तुह्मांस सांगूं. तुमचीं पत्रें डाकेबरोबर पुढें आलीं. आमचीं पत्रें त्यांनीं रवाना केलीं असलीं, तर कासीदजोडीबरोबर दो चौ दिवसां मागून येतील. त्यांचीं पत्रें आल्यावर काय बोलणें तें बोलूं.' इतकेंच बाईनीं उत्तर केलें. देण्याचा जाबसाल येथें कठीण. तत्रापि उत्तरेंही आढ्यतेचीं. असो. हे मातबरच आहेत, राजश्री तुकोजीबावांचीं पत्रें बाईस आलीं ह्मणून आज्ञापत्रीं केसोपंतांस लिहिलें. त्यास

नानासाहेब यांचे पायांवर डोई ठेविली. नानासाहेब बोलले कीं, 'काका, हें काय?' मानाजीबावांनीं हात जोडोन सांगितलें कीं, 'कुलाबा संस्थान आपलेंच आहे. स्वार व गाडदी जावयाचा इतका अट्टहास कशास पाहिजे? रयतेची चोळण होईल. याजकरितां भलते कोणास पाठवून संस्थानचा बंदोबस्त करवावा. आह्मी आपले संनिधच राहूं.' तेव्हां नानासाहेबांनीं उत्तर केलें कीं, 'आमचे मनांत बहुतच होतें. जी अवस्था तुळाजी आंगरे यांची, तशीच आपली. परंतु काका, आपणच आलां, त्यापेक्षां आमचे मनांतील सर्व कांहीं गेलें. इतःपर जी तुह्मांकडे दौलत आहे, ती तुह्मांस कायम आहे. तिजकडे आह्मी पाहाणार नाहीं. पाहूं तरी बाजीरावसाहेबांचे पायाची शपथ. यास साक्ष श्रीगणपती.' अशी शपथ निखालसपणाची केली. तेथून पुण्यास येतेसमयीं मानाजीबावांस घोडी चांगली बसावयास नाहीं. तेव्हां नानासाहेबांनीं आपली खाशी घोडी व्याहागडी होती, ती बक्षीस दिल्ही; आणि नानासाहेब व भाऊसाहेब दोहों बाजूंनीं, मधें मानाजीबावांस घेऊन, सरकारवाड्यांत आले. तेथें भेटीची जडावाची कट्यार खाशांस दिली. आणि त्याच वेळेस आठ रोजांचे सारे लोकांसुद्धां उलफा व घोड्याची वगैरे चंदी गोठांत पाठवून दिल्ही, व खाशांस वाड्यांतून ताट आलें.

इकडेस मानाजीबावांची व नानासाहेब व भाऊसाहेब यांची भेट होऊन पुण्यांत आले. तेव्हां चिटणीसबावांस, खासे आले अशी बातमी समजली. एक महिना पुण्यांतच होते. नंतर रामदासपंत नवाबाचा दिवाण मारिला, ते समयीं राक्षसभुवनावर नानासाहेब व भाऊसाहेब गेले. तेव्हां दत्ताजी शिंदे यास गोळीची जखम जाहली. ते समयीं इभ्रतीचा मनुष्य असावा ह्मणोन, नानासाहेब यांहीं, त्रिंबकरावमामांस लिहिलें कीं, मानाजी यांस जो सरंजाम लागेल तो देऊन जलद लष्करांत रवाना करावें. त्याजवरून मानाजींची तयारी करून देऊन रवाना केलें. राक्षसभुवनावर जाऊन लष्करांत दाखल जाहले. इतक्यांत नानासाहेबांचा व नवाबाचा तह ठरोन भेटीचा समारंभ जाहला. बाहेर डेरा दिला होता. नवाबांचे लोकांची लयन (लाईन?) तिकडून व यांचे लोकांची इकडून होती. नानासाहेबांनीं बराबर मानाजीबावांस घेतलें होतें. मोठमोठे मानकरीही होते. नानासाहेब व भाऊसाहेब इकडून व नवाब तिकडून. त्यांचे यांचे लोकांची गर्दी एकच जाहली. तेव्हां ते व हे डेऱ्यांत जातांना नानासाहेब व भाऊसाहेब यांजबराबर पांच सात खासे आंत गेले. नवाबाकडील चाळीस पन्नास पठाण आंत गेले. नानासाहेबांनीं माघारा पाहिलें, तों पांच सात असामी बराबर. तेव्हां विचार पाहिला. ते समयीं मानाजीबावांनीं गळ्यांत भंडारी व कपाळीं भंडार भव्य फासला होता, व कंबरेस दोन

पिस्तुलें, व दोहों हातीं दोन पट्टे मळ मोडलेले; डेऱ्याजवळ नवाबाकडील लयन उभी होती, त्यांत मुसडा देऊन, फळी फोडून आंत गेले, आणि नानासाहेब व भाऊसाहेब बसले होते तेथें, दोघांचे मध्यें आपण मांडेखुटी बसोन, दोघांस दो हातां- खालीं घेऊन बसले. मागाहून दुसरही मानकरी वीस पंचवीस डेऱ्यांत घुसले. तेव्हां नानासाहेबांस व भाऊसाहेबांस धीर आला. मानाजीबावांनीं नानासाहेबांचे कानांत सांगितलें कीं, चिंता करूं नये. बलकुबल तरी इतक्यांची चटणी पट्याचे हुलींनीं करून देईन. मानाजीबावांची नजर कावरीबावरी नवाबांनीं पाहिली. तेव्हां नानासाहेबांस विचारिलें कीं हे कोण? नानासाहेबांहीं सांगितलें कीं, हे दर्यांतील राजे आहेत. भेटीचीं वस्त्रें परस्परें व्हावयाचीं. नवाबांनीं जवाहीर वस्त्रें द्यावयास आणविलीं. तेव्हां नानासाहेबांनीं आधीं मानाजीबावांस देवविलीं. ते समयीं मोत्यांची कंठी व तुरा शिरपेंच व वस्त्रें देववून, मग आपण उभयतांनीं घेतलीं. बैठक बरखास्त होऊन गोठांत आले. आणि मानकरी वगैरे सरदार यांस नानासाहेब व भाऊसाहेब याहीं शिर्वागाळ मनस्वी केली कीं, आज मानाजीबावा होते ह्मणोन आमचे प्राण वांचले. ते दिवसापासोन खाशांवर नानासाहेबांची बहुतच मर्जी बसली. ते समयीं दरमाल एकलाख दहा हजार रुपये व दहा हजारांचें कापड आख व हजार खंडी भात व दोनशें सागवानी सोट आरमाराचे डागडुजीस द्यावयाची सनदशी नानासाहेब यांहीं करून दिली. नंतर लष्करांत कांहीं दिवस खाशांस सर उद्भवले. ह्मणोन कारभारी यांनीं नानासाहेबांस विनंति करून संस्थानीं जावयाचा निरोप घेतला. नानासाहेबांनीं रवानगीचीं वस्त्रें देऊन बराबर जासूद व तालुक्यास ताकीदपत्रें कीं, मानाजी आंगरे वजारतमाहा हे आपले संस्थानीं कुलाब्यास जात आहेत. तरी यांस कोणतेही गोष्टीची हिलाहरकत न करणें, व जेथें मुक्कामास रहातील तेथें शिधा, उलफा व घांसदाणा देत जाणें. याप्रमाणें रवानगी केली. ते कुलाब्यास दाखल जहाले.

नंतर नानासाहेब यांहीं हापशी याचे जंजिऱ्यावर मसलतीचा आरंभ करून रामाजी महादेव याची रवानगी केली. ते उरणास आले. नानासाहेबांचें पत्र खाशांस येऊन हेही उरणास गेले. तेथें मसलतीचा घाट होऊन रामाजीपंत खुष्कीनें गेले, व मानाजीबावा आरमारावर जलमार्गीं गेले. ते जाऊन राजपुरी लुटून, जंजिऱ्याजवळ राजकोटची चौबुर्जी काबीज करून तेथें व बाळराज्यावर मोर्चा दिला. असे चौफेर मोर्चे देऊन जंजिऱ्यास महसरा दिला. चार महिने खासे तेथेंच होते. नंतर कांहीं प्रकृत बिघडली, ह्मणोन तेथून निघोन कुलाब्यास आले. नंतर पांचवे साहावे दिवशीं काळ जहाला. रामाजीपंत रेवदंड्यास आले होते.

त्यांनीं पुण्यास नानासाहेबांस लेहून, राघोजी आंगरे दिवाणसाहेबांस संस्थान-पदाचीं वस्त्रें आणवून, रामाजीपंतांनीं दिवाणसाहेबांस रेवदंड्यांत दिलीं. नंतर दिवाणसाहेब मोर्चेबंदीस गेले. तेथें अडीच वर्षें मोर्चेबंदीस होते. गलबताची सांगड बांधोन त्यावर मोर्चे रचोन कांशावर मारगिरी केली. तो कांसा काबीज जाहला. कौल घ्यावा, इतकियांत भाऊसाहेब हिंदुस्थानांत गेले होते, तेथें गिलच्याचे लढाईत पाणपत जहाले. ही बातमी इंग्रजांकडे मुंबईस सत्ताविसावे दिवशीं आली. तेव्हां इंग्रजानें हापशाचे कुमकेस येण्याविसीं आरमारची तयारी करून, आठरा तरांडीं भरून हांकारणी केली. तीं येऊन जंजिऱ्यास दाखल होतांच, पेशव्यांकडील वगैरे आरमार होतें, त्यांनीं पावडें काढून आरमार निघोंसें जहालें. तेव्हां जंजिऱ्याचा साराच महसरा उठोन आला. पुढें दिवाणसाहेबीं विचार केला कीं, कान्होजीबावांपासोन सरखेली ही आपले कुलांतून गेली नाहीं. ती जाऊं देऊं नये. ह्मणोन पेशव्यांकडे तीस बत्तीस हजार रुपये दरबारखर्च करून, राघोजी आंगरे वजारतमाहा सरखेल असा मरातब करून घेतला.

पुढें कांहीं वर्षांनीं भाऊसाहेब म्हणोन तोतया जहाला. त्यांनीं बहुतेक कोंकणपट्टी सर केली. त्याचा मोड रत्नागिरीवर होऊन, पळोन सुरतेकडे जळमार्गें जात होता. तीं गलबतें वादळानें रेवसास लागलीं. ही बातमी दिवाणसाहेबांस समजली. ते समयीं दिवाणगिरीचा कारभार गोविंदशेट करीत होते. त्यांजबराबर अडीच तीनशें माणूस देऊन रेवसास रवाना केलें. त्यांनीं जाऊन युक्तीनें आणभाष करून तोतयास घेऊन कुलाब्यास आले. हें वर्तमान नाना फडणिसांस समजलें. त्यांहीं पुण्यास न्यावयास महादजी शिंद्यांकडील बाळाराव कुलाब्यास पाठविले. तेव्हां दिवाणसाहेब यांहीं बाळाराव यांस सांगितलें कीं, 'तुमचे हवाला करणार नाहीं. आह्मीच घेऊन येऊं. मग जसें ठरेल तसें ठरो.' तेव्हां दिवाणसाहेब हे तोतयास घेऊन पुण्यास गेले. तेथेंही शिंदे यांचे हवाला केला नाहीं. आपलेच गोटांत ठेविला होता. चौकशी होऊन भाऊसाहेब नव्हे, तोतयाच खरा, असें ठरल्यावर नाना फडणीस यांचे स्वाधीन केला. ते समयीं लाख रुपयांचा सरंजाम व माणीकगड किल्ला बक्षीस दिला. गोविंदशेटचे शहाणपणाची कांहीं तारीफ पुण्यास जाली. दिवाणसाहेबांस रवानगीचीं वस्त्रें होऊन कुलाब्यास आले. पुढें गोविंदशेट शहाणपणाचे योगें चढोन गेले. धणीपणाची व चाकरपेशाची कांहीं मर्यादा राहिली नाहीं. हें दिवाणसाहेबांचे मनांत येऊन गोविंदशेट यांस घरीं बसवून, गोपाळशेट पुढें करून, त्यांचे हाताखालीं कारभारी मायाजी कुबडे व दौलतराव हरी व

महादाजी विश्वनाथ दप्तरदार यांचे हातोन कारभार चालविला. ते समयीं दादासाहेब मुंबईस आले. नाना फडणीस पुरंदरचे किल्ल्यावर चढले व मोरोबादादा पुण्यांत होते. दादासाहेब यांजकडे सामान सरंजाम न पाठवावा तरी ते श्रीमंतच. पाठविला असतां, नाना फडणीस यांहीं, नारायणराव-साहेबांची स्त्री गंगाबाई गरोदर होती ह्मणोन, पुरंदरचे किल्ल्यावर नेऊन ठेविली. तेव्हां दोन्हीं साधनें कशीं होतात, हा विचार दिवाणसाहेबांस पडला. ते समयीं आनाजी त्रिंबक डबीर यांस बोलावून नेऊन सांगितलें कीं, 'यामागें तुमचे वडील या दौलतींत अंतस्थ नाजूक कामकाजें उत्तम रीतीनें करीत आले, आणि तुमचा इनाम-गांव व सरंजाम मोइनी वगैरे बक्षिसें सरकारांतून चालवीत आहों. तुमचा उपयोग कां न घडावा?' तेव्हां आनाजी त्रिंबक यांनीं अर्ज केला कीं, 'साहेबीं चाकरी सांगितली कधीं, व आह्मांपासोन घडली नाहीं कधीं? जे समयीं आज्ञा होईल ते समयीं हजीर आहों.' तेव्हां आज्ञा जाहाली कीं, या समयीं दादासाहेबांचा संतोष होऊन, नानांची व मोरोबादादांची मर्जी न बिघडे असा बंदोबस्त, कोणास न कळतां, करून या. यांणीं सांगितलें कीं. साहेबांचे पुण्यप्रतापें हा बंदोबस्त येथूनच पत्रांनीं होईल. ते समयीं नानांजवळ जिवाजी बल्लाळ ममतेंतच होते. तेव्हां नानांस एक पत्र व मोरोबादादांस एक व जिवाजी बल्लाळ यांस, एकूण तीन पत्रें लिहून दिवाणसाहेब यांहीं वाड्यांत शिक्के करून पत्रें दिलीं. तीं जिवाजी बल्लाळ यांजकडे रवाना केलीं. तीं पत्रें नानांजवळ गुजरोन बोलणें केलें. पत्राचें उत्तरें लिहावयास नानांनीं जिवाजी बल्लाळ यांस सांगितलें. त्यांनीं उत्तर लिहून नानांनीं आपले स्व-दस्तुर सात आठ ओळी लिहिल्या कीं, 'तुमचा बचाव जाहला पाहिजे. याजकरितां दादासाहेबांकडेस सामानसरंजाम पाठविला असतां चिंता नाहीं.' त्यांजकडील शिलशिला राखोन आपला बचाव करून घ्यावा. येविषयीं इकडून कोणतेंही वांकडें पडावयाचें नाहीं,' असें लिहिलें. तें पत्र जिवाजी बल्लाळ यांनीं पुण्यास येऊन मोरोबा-दादांस दाखविलें. त्यांहीं त्याचप्रमाणें उत्तर लिहून दिलें. हीं उत्तरें, येथून पत्रें रवाना जाहल्या दिवसापासोन दहावे अकरावे दिवशीं, दिवाणसाहेबांजवळ आनाजी त्रिंबक यांनीं नेऊन दिलीं. खुष मर्जी होऊन आज्ञा जहाली कीं, त्रिंबकजीबावामागें तुह्मीही सरकारउपयोगी कामेंकाजें येखाद्या रीतीनें कराल, ही खातरजमा जाहाली. तुमचें पेशजीं चालत आलें, त्याप्रमाणेंच निर्वेधपणें चालेल.

दादासाहेब यांजकडेस मुंबईस सामानसरंजाम रवाना केला. त्यांत दौलतराव हरी यांनीं पंधराशें रुपयांची घालमेल केली. ती गोपाळशेट यांस समजली. तो मुद्दा धरून, त्यांनीं दिवाणसाहेबांचे कानावर घालोन सांगितलें कीं, हे मजला बुड-

वितील, हें उपयोगी नाहीं. तेव्हां दारीं प्यादे बसवून बेअबरू करून पंधराशें रुपये घेऊन त्यांस घरीं बसविलें, आणि आनाजी त्रिंबक व जिवाजी विठ्ठल यांचे हातोन कारभाराचें कामकाज चालविलें. पुढें इंग्रज वसईवर चढाई करून आला. त्या वेळेस कुमकेस दिवाणसाहेब यांहीं पांचशें स्वार व अडीचंहजार पायदळ एकूण तीन हजार जमीयतीनिशीं वसईस जावें, ह्मणोन नाना फडणीस यांहीं जिवाजी बल्लाळ यांची रवानगी कुलाब्यास केली. ते आल्यावर दिवाणसाहेबांस मोठाच विचार पडला कीं, या वेळेस दोन लाख रुपयांचे खर्चाखालीं यावें लागतें. जिवाजी बल्लाळ यांहीं जाण्याची निकड बहुत लाविली. तेव्हां दिवाणसाहेब व जिवाजी बल्लाळ व आनाजी त्रिंबक एके जागां बसोन, जिवाजी बल्लाळ यांस आनाजी त्रिंबक यांनीं सांगितलें कीं, "ही दौलत सध्यां ओढीखालीं बहुत आहे; याजकरितां ही वेळ सांभाळोन घेतली पाहिजे. नानांची मर्जी बिथर जाल्यास पुढें परिणाम नाहीं. इंग्रज वसई घ्यावयाम ठेवीत नाहीं. त्यापेक्षां जाण्याचे औडंबराखालीं लोटावें, असें ठरविलें. तेव्हां चारशें माणूस व पन्नास स्वार आपल्यावर माणीकगडाखालीं पाठविले. तयारीचे औडंबराखालीं महिना पाऊण महिना लोटिला. इतक्यांत इंग्रजांनीं वसईचा किल्ला घेतला. त्या वेळेस जिवाजी बल्लाळ बहुत उपयोगीं पडले.

पुढें सवाई माधवरावसाहेब यांचे लग्नसमारंभास दिवाणसाहेब पुण्यास गेले. त्या वेळेस नानांनीं झाडून संस्थानी व सरंजामी यांजवर लग्नपट्टी केली. तेव्हां दिवाणसाहेब यांजवर लाख रुपयांची पट्टी घातली. ते समयीं आनाजी त्रिंबक यांस विचारिलें कीं, हें लचांड तुमच्यानें चुकेल किंवा नाहीं? यांनीं जिवाजी बल्लाळ व बाबुराव यांचे द्वारें नानांस विनंति केली कीं, 'दौलतींत अर्थ नाहीं. आरमाराचा वगैरे खर्च बहुत आहे. तेव्हां राघोजीबावा यांचे निभावणीची आज्ञा जाहली पाहिजे.' उभयतांचे सक्त रदबदलीवरून पन्नास हजार रुपये ठरावांत आणिले. दिवाणसाहेबांस सांगितलें कीं, पन्नास हजारांशिवाय चुकणार नाहीं. तेव्हां महादाजी विश्वनाथ हे गोपाळशेटजवळ बोलूं लागले कीं, आह्मी पंधरा हजार रुपयांत चुकवितों. तेव्हां दिवाणसाहेबांस शेटजींनीं समजाविलें कीं, पंधरा हजारांत चुकत असतां पन्नास हजार काय ह्मणोन खर्च करावे? दिवाणसाहेब यांहीं गोपाळशेट यांस सांगितलें कीं, तुमची खात्री असल्यास बरें आहे. तेव्हां शेटजींनीं आनाजी त्रिंबक यांजकडील नाद सोडून, महादाजी विश्वनाथ घाटूं लागले. तेव्हां यांस नानांचें साफच उत्तर जाहलें कीं, लाख रुपयांशिवाय चुकणार नाहीं. तेव्हां दिवाणसाहेब बोलले कीं, चिबडा जाला. ते समयीं शेटकडील नाद सुटून बाळाजीपंत फाटक बोलूं लागले. त्या वेळेस नवद हजार रुपये खर्च पडला. तेव्हां बाळाजीपंत

फाटक कारभारी जाहले. त्यांचे तर्फेनें बाळकृष्णपंत पेठे कारभार करूं लागले. पुढें आनंदीबाईसाहेब यांचे बंधु माधवराव रघुनाथ भोंसले यांजकडे, बाबाजी हरी यांणीं भोंसले यांचे कारभारी बगाजीबावा यांचे हातोन, माधवराव याजकडोन बाईसाहेबांस समजाविलें कीं, 'दौलतींत खर्च बहुत वाढला आहे. तरी आपले समजुतीशिवाय कारभार होऊं नये. म्हणजे पैका जमेल.' त्याजवरून बाईसाहेब यांहीं दिवाणसाहेबांस सांगितलें कीं, आमचे समजुतीशिवाय कारभार होऊं नये. बाईसाहेब यांचा आग्रह बहुत पाहून मान्य केलें. ते समयीं बाबाजी हरी व दौलतराव हरी कारभार करूं लागले. पुढें दिवाणसाहेबांचे प्रकृतीस बेआराम जाला. तों दिवसेंदिवस प्रकृत जडावत चालली. तेव्हां काल होण्याचे पूर्वीं चारपांच दिवस कोणकोणच्या शपथा घ्यावयाच्या त्या घेऊन, आनाजी त्रिंबक व वासुदेवपंत फडणीस यांस बलाऊन नेऊन, बाईसाहेबांसमक्ष सांगितलें कीं, 'आमची अवस्था ठीक दिसत नाहीं, आणि दौलतींत बखेडा दिसतो. याजकरितां आबासाहेब व बाबासाहेब हे लहान, यांस अंतर देणार नाहीं, अशी आमचे पायावर हात ठेवून शपथ करावी.' याप्रमाणें दोघांनीं दिवाणसाहेबांचे पायावर हात ठेवून शपथा केल्या. नंतर तिसरे दिवशीं शके १७१४ सुरू सन सलास तिसैन मया व अलफ चैत्र शु॥ १५ पौर्णिमेस दिवाणसाहेबांचा काल जाला.

नंतर एकविसावे दिवशीं कोळी व सोरटी व बाळाजी पांडुरंग पातेणा व आणखी मराठे वगैरे जयसिंगराव-आंगरे यांस मिळोन कुलाब्यांत गर्दी करून दौलतराव हरी व बाबाजी हरी या दोघांस जिवें मारिलें. आणि जयसिंगराव आंगरे यांणीं सारे दौलतींतील मंडळी यांस बलावणीं पाठवून किल्ल्यांत आणिलें. तावत्काल किल्ल्यांत ज्याचे त्याचे हातीं नागवीं हत्यारें होतीं. जयसिंगराव यांहीं आनाजी त्रिंबक यांस विचारिलें कीं, 'जालें तें जालें; पुढें पुण्याचा वगैरे दौलतीचा बंदोबस्त जाहला पाहिजे, याचें कसें? तरी, तुम्हीं पुण्यास जाऊन तेथील बंधारण करावें.' यांणीं सांगितलें कीं, आम्ही कारकून, ह्या नागव्या तलवारी पाहून या भयानें आमचा बोलावयास दम निघत नाहीं. तेव्हां जयसिंगराव यांहीं तरवारीस मेण करून सार्‍यांस सांगितलें कीं, तरवारीस मेणें करावीं. तेव्हां सार्‍यांनीं मेणें केलीं. नंतर आनाजी त्रिंबक यांणीं विचारिलें कीं, आपला पुढें डौल कसा आहे? जयसिंगराव यांहीं सांगितलें कीं, तुम्ही वडील. परंपरा सरकारआखत्यारी. सर्व सांगाल तसें करावयाचें. यांणीं सर्वांचें संमत घेऊन सांगितलें कीं, धणी आबासाहेब. यांचे नांवाचे शिक्का मोर्तब पदाधिकाराचीं वस्त्रें आबासाहेबांचीं. यांहीं गादीवर बसोन शिक्का मोर्तब करावें, आणि आपण दौलतीचा कारभार कुलआखत्यारी करावा. तरी

निभावणी होईल. नाहीं तरी कठीण दिसतें. याप्रमाणें सर्व संमतें ठरलें. नंतर जयसिंगराव यांस सांगितलें कीं, अशी समजूत वेगळे वाटेनें बाईसाहेबांची केली पाहिजे. तरी कोणास पाठवून करावी? जयसिंगराव यांहीं सांगितलें कीं, तुम्हींच जाऊन याप्रमाणें समजूत करावी. आनाजी त्रिंबक यांणीं उत्तर केलें कीं, बराबर कोणी दुसरा असावा. तेव्हां गोविंद जोशी थळकर बराबर घेऊन वाड्यांत बाईसाहेबांकडेस गेले. तेथें जाहला वांका समजाविला. बाईसाहेब यांची आज्ञा जाहली कीं, तुम्ही शिलकी सरकारचे पदरचे, तुमचें कसें? यांणीं उत्तर केलें कीं, 'आमचें पुण्यास जाणें जाहलें असतां, जयसिंगराव यांस तेथेंच नेऊन गुंतवितों. येविसीं आपण चिंता करूं नये.' तेथेंही साहेबांनीं शफत करून घेतली. नंतर जयसिंगराव यांस सांगितलें, बाईसाहेबांची आज्ञा कीं, आबासाहेब व बाबासाहेब लहान. बापूसाहेब यांणीं दौलतींतील काजकारभार पहावा हें चांगलें. तेव्हां पुण्याचे रवानगीचा बेत केला. बाजीराव त्रिंबक डबीर व मोरोपंत थत्ते फडणीस यांस पुण्यास पाठविलें. यांणीं नाना फडणीस व हरिपंत फडके यांची भेट, जिवाजी बल्लाळ यांचें विद्यमानें घेऊन, येथील हरिद्र समजाविलें. नानांनीं उत्तर केलें कीं, बरें आहे. जयसिंगराव यांस येथें आणोन गुंतविल्याशिवाय तेथील बखेडा मोडणार नाहीं. नंतर दुसरे भेटीस जिवाजी बल्लाळ यांचे विद्यमानें ठराव जाहला कीं, जयसिंगराव यांस पुण्यास आणोन गुंतवावें आणि आबासाहेब यांस पदाधिकाराचीं वस्त्रें पाठवावीं. नंतर पन्नास हजार रुपये सरकारची नजर द्यावी. याप्रमाणें ठरलें. मोरोपंत फडणीस कुलाब्यास आले. बाजीराव त्रिंबक तेथेंच राहिले. मोरोपंतांनीं जयसिंगराव यांस सांगितलें कीं, 'नानांची आज्ञा, जयसिंगराव आंगरे मर्द आहेत, त्यांणीं पुण्यास येऊन दिवाणगिरीचीं वस्त्रें घेऊन, मानाजी आंगरे यांस पदाधिकाराचीं वस्त्रें घेऊन जावीं; आणि पन्नास हजार रुपये सरकारची नजर द्यावी.'. याप्रमाणें ठरलें. नंतर जयसिंगराव व धरम सारंग व बाळाजी पांडुरंग व बाळकृष्णपंत पेठे यांचें खलबत जाहलें. त्यांत ठराविलें कीं, 'आज पन्नास हजार रुपये काय ह्मणोन खर्च करावे? आतां कोण आहे? मुलें लहान. आपणही दिवाणसाहेबांचे लेक. आपणही गादीवर बसोन शिक्का मोर्तब केलें असतां योग्य आहे. जसे ते, तसेच आपण.' असा बुद्धीस भ्रंश घालोन याप्रमाणें आचार चालविला. बाळकृष्णपंत पेठे यांणीं कबूल केलें कीं, पन्नास हजार रुपये खर्च करावयाचें कारण नाहीं. पंधरा वीस हजार रुपयांत पुण्याहून आपले नांवें वस्त्रें मी आणितों. असें कित्येक प्रकारें समजाविलें. त्याजवरून जयसिंगराव यांचे मनांत येऊन बाळकृष्णपंत पेठे यांची

रवानगी पुण्यास केली. यांणीं जाऊन बहिरोपंत मेहेंदळे यांचे विद्यमानें नानांची व हरिपंतांची भेट घेतली. त्या वेळेस बाळकृष्णपंत पेठे यांस उभयतांचें उत्तर जाहलें कीं, जयसिंगराव आंगरे यांणीं पुण्यास येऊन वस्त्रें घेऊन जावें. जयसिंगराव पुण्यास जात नाहीं, यास्तव बाळकृष्णपंत यांचें त्या दरबारांत कांहीं चालेनासें जाहलें. तेव्हां बाळकृष्णपंत यांणीं जयसिंगराव यांस लेहून पाठविलें कीं, येथें बखेडा बाजीराव त्रिंबक डबीर व तेथें वासुदेवपंत फडणीस करितात. याज-करितां त्यांचीं मुलेंमाणसें कैद करून ठेवावीं. ही बातमी समजतांच जिवबादादा नाना फडणिसांकडे जाऊन हा मजकूर समजाविला. तेव्हांच अवचितगड व रेवदंडा व उंदेरी या तीन तालुक्यांस सनदा पाठविल्या कीं, डबीर व फडणीस यांचीं कुटुंबें तालुक्यांहून स्वाऱ्या पाठवून रेवदंड्यास आणून ठेवणें. ह्या सनदा येतांच, तालुक्याहून स्वारी जाऊन, शके मजकुरीं भाद्रपदमासीं डबीर व फडणीस कुटुंब-सुद्धां आणोन रेवदंड्यांत ठेविले. जयसिंगराव पुण्यास येत नाहीं. तेव्हां सरकारां-तून स्वार व गाडदी व विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग वगैरे येथील आरमार रवाना करावें असें ठरलें. तेव्हां जिवबादादांस हरिपंत फडके यांहीं सांगितलें कीं, आमचे चिरं-जीव माधवराव आत्या यांस नेमून घ्यावें. त्याजवरून जिवबादादांनीं नानांस विनंति केली कीं, बराबर सरदार माधवराव आत्या द्यावयाची आज्ञा असावी. त्याजवरून माधवराव आत्यांची नेमणूक जाहली. इकडे जयसिंगराव यांणीं भोंसले कुटुंब-सुद्धां किल्यांतून बाहेर घालविले, व बाईसाहेब यांस कांहीं अडचण होऊं लागली. तेव्हां बाईनीं गोविंद जोशी थळकर यांजबराबर खूण आंगठी रेवदंड्यास पाठविली कीं, तुह्मांस कळेल तसें करून, आमचे प्राण वांचवा. ती खूण जिवबादादांकडेस पाठविली. ती जिवबादादांनीं घेऊन महादजी शिंदे पाटिलबावा यांजकडे वानव-डीस जाऊन हा मजकूर समजाविला. पाटिलबावांचा व दिवाणसाहेबांचा घरोबा बहुत होता. सबब, जिवबादादांनीं खूण दाखविली, आणि सांगितलें कीं, आपले अभयाशिवाय त्यास धीर पुरत नाहीं. तेव्हां पाटिलबावांनीं स्वदस्तुर बाईस चिठी लिहिली कीं, 'सरकारांतून पारिपत्य होत आहे. हें शेवटास न गेल्यास, आह्मी येऊन जयसिंगाचें पारिपत्य करून मुलांस गादीवर बसवूं. तुह्मीं चिंता करूं नये.' ती चिठी कुलाब्यांत बाईकडे रवाना केली. फिरोन जिवबादादांनीं पाटिलबावांस विचारिलें. त्यांहीं सांगितलें कीं, 'हरिपंतांचे चिरंजीव घेऊन जा ह्मणजे बरें पडेल. त्यांच्यानें शेवटास नच लागे, तरी चिंता करूं नका. मी खुद्द येऊन जयसिंगाचें पारिपत्य करून मुलांची स्थापना करीन.' याप्रमाणें उत्तर जालें. नंतर नानांनीं

माधवराव आत्यांची व जिवबादादांची रवानगी सन आर्बा तिसेन मया व अलफ यांत आश्विनमासीं केली. ते रेवदंड्यास आल्यावर मागाहून आनंदराव धुलप वगैरे आरमार घेऊन आले. तों महादजी शिंदे वारले. तीन चार महिने महसरा चांगलाच होता. पुढें हरिपंत तात्याही वारले. महिना दीड महिना जाहल्यावर आत्यांनीं जयसिंगराव यांजकडे कांहीं कावा दावा मांडला. जिवबादादांनीं आत्यांस सांगावें एक व त्यांणीं करावें एक, याप्रमाणें चाललें. तेव्हां जिवबादादा निघोन पुण्यास गेले. तेथें दुसरा सरदार नेमून घ्यावा, इतक्यांत नवाबांवर खरड्याचे मसलतीची तयारी जाली. माधवराव आत्या यांणीं या मसलतीस खर्चेव्यर्च बहुत जाला अशी बाब लावून, समेट करून पुण्यास गेले. मागाहून नानांचें पत्र तालुक्यास येऊन वासुदेवपंत फडणीस व आनाजी त्रिंबक व गोविंद जोशी व बापुजीपंत ओक पुण्यास जाऊन, नानांचे समक्ष आत्यांचें व त्यांचें बोलणें होऊन, तेथें आत्यांस नानांनीं बहुत, खजिल केलें. नंतर जिवबादादांनीं नानांस विनंति केली कीं, पुढें काय करावें ? नानांनीं सांगितलें कीं, स्वारीहून आल्यावर चांगलाच बंदोबस्त करावयास येईल. तावत्काल तुमचा इलम चालल्यास करावा. पूर्वीं बाईसाहेब यांचें कारस्थान सोरट्याकडे चाललें होतें. सोरटी भास्करपंत फडणीस यांचे हातोन फोडून जयसिंगराव यांस कैद केलें, आणि बाईसाहेबांनीं पुण्यास लिहून पाठविलें. तों श्रीमंतांची स्वारी खरड्यास गेली. तिकडून मशरूलमुलुकास कैद करून आणिल्यावर आश्विन शुद्ध चतुर्दशीस सवाई माधवराव हवेलीवरून पडले, आणि पौर्णिमेस काळ जाहाला.

पुढें त्यांहीं दौलतींत बखेडा जाला. बाजीरावसाहेब व आपासाहेब पुण्यास जुन्नराहून आले. परशुरामभाऊ पटवर्धन आपासाहेबांस घेऊन निघोन नाना रायगडास आले. पुण्यामध्यें दौलतराव शिंदे यांचें प्राबल्य बहुत जालें. त्यांचे मामा बाबूराव आंग्रे यांचेंही स्तोम वाढलें. इकडेस आनाजी त्रिंबक व गोविंद जोशी व बापुजीपंत ओक नागांवास आले. वासुदेवपंत पुण्यास राहिले. इकडे जाफराबादेस कांहीं सोरट्यांचे कबिले तेथील हाबसी यांणीं कैद केले. हें येथील सोरट्यास समजलें. त्यास भास्करपंतांनीं समजाविलें कीं, हें कारस्थान आनाजी त्रिंबक डबीर यांणीं केलें. त्याजवरून सारे सोरटी साहेबांजवळ अडून बसले कीं, आनाजी त्रिंबक यांस गडावर नेऊन ठेवावें, तरच आमचे कबिले सुटतील. त्याजवरून साहेबांहीं भास्करपंतांस व सोरट्यांस सांगितलें कीं, त्यांचे आंगीं मुद्दा लावा. मग त्यांचें पारिपत्य करूं. भास्करपंतांचे सांगितल्यावरून सोरटी ऐकेनात. अडून बसले. इलाज नाहीं. त्या आग्रहानें साहे-

कांहीं सोरटी वगैरे पन्नास माणूस नागांवीं पाठवून, आनाजी त्रिंबक यांस गडावर नेऊन ठेविलें. इकडेस जयसिंगराव यांणीं सोरट्यांत भेद करून, जयसिंगराव पळून रेवदंड्यास आले. महादजी शिंदे यांणीं दौलतराव शिंदे दत्तपुत्र घेतले. त्यांची पहिली मातुश्री मैनाबाईसाहेब ती बाबूराव आंगरे यांची सखी बहीण. तेव्हां दौलतराव यांचे मामा, त्यांजकडेस यशवंतराव शिंदे यांचे अनुसंगानें [गेले]. वानवडीस जयसिंगराव गेले; आणि बाबूराव आंग्रे यांस सागरगड किल्ला व शिरगांव तपा देऊं करून, त्यांजजवळून पैका व लोक घेऊन नागोठण्याचे मुक्कामीं आले. तेव्हां आनाजी त्रिंबक यांस गडावरून उतरून कुलाब्यास आणिलें. साहेबांहीं सांगितलें कीं, 'आह्मांस सोद्यांनीं खोटें समजावून आणि मोरट्यांचे अडचणींत घालोन, उपाय नाहीं सबब तुह्मांस दुखवलें. हें तुह्मीं मनांत न आणोन शपथ केली आहे तें स्मरण करून, जसें कळेल तसें शत्रूचें पारिपत्य करावें.' यांणीं साहेबांस सांगितलें कीं, 'सुबत काळीं दौलत खाणारे निराळे, संकटकाळीं आह्मी. असो! दिवाणसाहेबीं आमची शपथ घेऊन गुंतविलें, त्यापेक्षां जी दौलतीची वाट तीच आमची.' साहेबांनीं सांगितलें कीं, आधीं सोद्यांचें पारिपत्य करावें. यांणीं सांगितलें कीं, शत्रु दरवाज्यांत येऊन बसला; या समयीं कोणास दुखवावयाचें नाहीं. आंत बहुतेक फितूर. तेव्हां सोरटीयांचे जमातदार आणोन, निखालसपणाच्या साहेबांजवळ शपथा घेतल्या. मागाहून आनाजी गोळे व जावजी नाईक साटम वगैरे सरदार यांच्या शपथा घेतल्या. इकडे जयसिंगराव नागोठण्याहून निघोन चेऊलास श्रीभवानीचे देवळास आले. दुसरे दिवशीं बाईसाहेब यांहीं पांच सातशें माणूस तयार करून चेऊलास आली. तेथें लोकांची चर्या पाहिली. तों सोरटी खेरीज करून, आपाजी गोळे व रावजी नाईक साटम वगैरे हेटकरी यांमध्यें बहुतेक फितुर आढळला. तेव्हां सोरटी व एक दोन सरदार हेटकरी व खासपथक मिळोन अडीच तीनशें माणूस घेऊन निघोन कुलाब्यास आलीं. बाकी बहुतेक जयसिंगराव यांस मिळोन, दुसरे दिवशीं यशवंतराव शिंदे यांचे तर्फेचे बाळाजी शिवाजी व साजो शिवाजी व बाबूराव दादाजी वगैरे पातेणें यांणीं कांहीं दारूगोळी देऊन, जयसिंगराव यांणीं आठ नऊशें लोकांचा जमाव घेऊन, भाद्रपद शु॥ चतुर्थीस चेऊलाहून पहांटेस निघोन नागांवास डबिरांचीं घरें चार पांच जाळून, तेथून आकसीस फडणीस यांचीं दोन घरें जाळून अलिबागेस गेले. तेथें साहेबांकडील सोरटी वगैरे मिळोन अडीच तीनशें माणूस बाहेर होतें. त्यांची एक लढाई जाली. ते लोक कचकरून निघोन कुलाब्यांत आले. जयसिंगराव यांणीं अलिबाग काबीज केलें. कुलाब्यांत लोकांचा

भरणा नाहीं, व भात दारू वगैरे सामान नाहीं. तेव्हां हावशाकडे जंजिऱ्यास संधान करून बाजीराव त्रिंबक डबीर यांणीं भात व दारू वगैरे सामान खरेदी करून हाबसी यांजकडून गलबतें भरून, पन्नास माणूस कुमकेस कासीम गोवलगोळ्या वगैरे लोक गलबतावर चढवून, सामान गलबतांत भरून कुलाब्यांत आणिलें. ते समयीं जयसिंगराव यांजवळ आखत्यारी पाताणें मंडळ रेवदंडकर व अलिबागकर. त्यांत साजो शिवाजी व बाळाजी शिवाजी दिवाण व बाबूराव दादाजी मुत्सद्दी व कोणी फडणीस व चिटणीस, दप्तरदार खाजगी वगैरे कारकूनमंडळ पाताणें जमलें. जयसिंगराव यांणीं हजार अकराशें माणूस जमवून कुलाब्यावर हल्ला केला. तेव्हां हाबसी यांजकडील पन्नास माणूस बाहेर धक्क्यावर होते. ते व दरवाज्याची दिंडी उघडून आंतील दीडशें माणूस बाहेर घालून, किल्ल्याची हुशारी जाली. जयसिंगराव यांजकडील लोकांनीं सोनधक्क्याची आलग होती तीस आग घातली. तेव्हां सरज्याच्या व कुलाब्याच्या छन्याच्या तोफा भरल्या होत्या, त्या एकदाच उजळल्या. त्याणें पन्नास पाऊणशें माणूस ठार जाहलें. शंभर जखमी जाहले. नंतर बाहेर दोनशें माणूस होते ते तुटून पडले. त्यांणीं शंभर सवाशें मुरदा केला व कांहीं जखमी केले. हल्ला फिरविला. दुसरे दिवशीं सारे मुरदे अलिबागेस जयसिंगराव यांजकडे पाठवून दिल्हे. कुलाब्यांत लोकांचा भरणा थोडका, सबब दुसरे दीडशें सोरटी लोक आणिले. ते कुलाब्यांत दाखल जाल्यावर जयसिंगराव यांनीं साखरेच्या गुराबा गलबतें तयार करून, सरज्या खालून गुराबा कधींच बाहेर पडावयाची वाट नाहीं, असे पाणी उथाणाचे वाढोन, त्या वाटेनें आरमार बाहेर काढोन, कुलाब्याभंवतीं जखडबंदी केली. आंत बाहेरून सरंजाम पोंहचेनासा जाला. हाबसी याचीं गलबतें होतीं, तीं पळोन गेलीं. कुलाब्यांत श्रीदेवीचें अनुष्ठान केलें. पूर्णाहुतीसमयीं तोफेंत गोळा भरून मारली. तेव्हां जयसिंगराव व त्यांचे कारभारी बाहेर मेंडीखालीं बसले होते. जयसिंगराव बावभर चुकोन गोळ्याचे तावडींत साजो शिवाजी व बाबुराव दादाजी सांपडले. तेव्हांच ठार जाहले. कुलाब्यांत पैका व भातसरंजाम नाहीं. मोठीच पेचाटी पडली. यशवंतराव शिंदे यांनीं अलिबागेहून चोरट्यानें स्वारी आणोन, डबीर व फडणीस यांस धरून अलिबागेस न्यावें असें संधान मांडलें. तेव्हां साहेबांकडे किल्ल्यांतून पंधरा असामी चांगले रेवदंड्यास पाठवून, दोनशें माणूस ठेवावयाची परवानगी आली. त्याजवरून बाजीराव त्रिंबक यांनीं शंभर सवाशें माणूस दुसरें ठेविलें. आणि यशवंतराव शिंदे यांस सांगितलें कीं, अलिबागेहून येऊन आम्हांस नेणार म्हणोन ऐकितों. त्यास येणेंकरून सरकार ठिकाणाचा बदनक्षा तुमचे पदरीं

येईल. हुजूरचे परवानगीनें जाल्यास ठीकच आहे. नाहीं तरी याचा विचार पडेल. त्याजवरून त्यांचा तो मजकूर राहिला. बाईसाहेबांनीं जिवबादादांस पत्र पाठविलें कीं, जो पैका लागेल तो सावकार पाहून, दोन हजार माणूस पाठवून शत्रूचें पारपत्य करावें. आह्मी पैक्याची फेड करूं. तुह्मीं पैक्याविसीं चिंता करूं नये. आणि जो सावकार पैक्यास उभा कराल, त्यास दोन हजारांचा गांव इनाम देईन. त्याजवरून जिवबादादा यांहीं विठ्ठलराव गोळे दोन लक्षांस सावकार उभे केले. नंतर मुसावास (?) व मुसाफीत (?) फिरंगी यांजवळ ठराव केला कीं, दीड हजार गाडदी व पांचशें स्वार एकूण दोन हजार जमीयतेनिशीं जाऊन जयसिंगास धरून बाईचे स्वाधीन करावा. आणि उक्त पन्नास हजार रुपये घ्यावे. याप्रमाणें ठराव होऊन फिरंगी यांस गोळ्यान्नी निशा दिली. त्यांस तूर्त दारूगोळी वगैरे सरंजामास पंचवीस हजार रुपये द्यावे. त्यांनीं आपला जामीन मुसा नारज फिरंगी दिल्हा. बाकी पंचवीस हजार रुपये जयसिंगराव धरून दिल्यावर द्यावे. याप्रमाणें ठराव जाला. फिरंगी यांनीं आपली राहुटी पुलाबाहेर दिली. पुढें गोळ्यांनीं पैका पदरीं घालावा, तों इतकियांत एकाएकी बाईसाहेब वारली. हें वर्तमान जिवबादादांकडेस जातांच, गोळे यांनीं आंग काढिलें. जिवबादादांस सांगितलें कीं, आतां कोणाचे भिस्तीवर पैका द्यावा? ज्यांचे भिस्तीवर द्यावा तीच वारली. आतां पैक्याचे निभावणीचा मजकूर कठीण. तेव्हां ती मसलत ढासळली.

पूर्वीं चारशें माणूस हेटकरी वगैरे ठेविलें होतें, तें घेऊन डबीर व फडणीस आले. त्या लोकांस चौलावर घातलें. तेथें जयसिंगराव यांजकडील दीड दोनशें माणूस होतें, त्यांची यांची लढाई जुंपली. इतक्यात अलिबागेहून आठ नऊशें माणसांचा जमाव आला. तेव्हां हे लोक उधळोन रोह्यास गेले. तेथें जमाव धरिला. अलिबागेस धाकजी व बाजीभट शेंडे मुंबईहून आले होते. बाबूराव आंगरे यांचे लोक जयसिंगराव यांनीं आणिले होते, ते माघारा लाविले. तेव्हां बाबूराव आंगरे यांचे व जयसिंगराव आंगरे यांचें बिघडलें. ह्मणोन बाबूराव यांनीं धोंडजी लवांडे यांजबरोबर लोक देऊन रवाना केले. ते रेवदंड्यास यशवंतराव शिंदे यांजकडेस आले. बाबूराव आंगरे मसलत करितात. तेव्हां दोघांचा कलह आणि तिसराच शिरीं पाहतो, सबब समेट करावा. कारण, दौलतराव शिंदे यांचे वतीनें बाबूराव आंगरे जबरदस्त; आणि बाजीरावसाहेब आज त्यांचे नादीं. तेव्हां परिणाम लागणार नाहीं. तेव्हां धाकजीस दरम्यान घालोन, आनाजी त्रिंबक व वासुदेवपंत फडणीस अलिबागेस गेले. तेथें ठराव जाहला कीं, तुमचे तर्फेचे लोकांची तलब चढली असेल, तिचा फडशा जयसिंगराव यांनीं करावा; आणि तुमचे सरंजामगांव इनाम आहेत

ते चालवावे. ही जिम्मा धाकजींनीं घेऊन, आणि मुलाकडे धनीपणा वागवावा असें ठरोन, लोक अलिबागेस हजेरीस आणावे ह्मणोन गणेश बल्लाळ आचारी व अमृतराव जिवाजी डबीर रोह्यास पाठविले. त्यास यशवंतराव शिंदे यांनीं फिताऊन लोक अलिबागेस न्यावे, ते रेवदंड्यास आणोन धोंडिबास मिळाले. जयसिंगराव यांनीं विचारिलें कीं, तुमचे लोक अलिबागेंत यावे, ते रेवदंड्यास गेले हें काय? यांनीं सांगितलें कीं, आह्मीं लोक आणावयास पाठविले, ते धोंडिबास मिळाले. यास आमचा उपाय काय? आमचा निश्चय दिवाणसाहेबांचे वंशाकडे. दुसरा विचार नाहीं. तेव्हां किल्ल्यांतील व अलिबागेंतील समेट जाला. पुढें बाबूराव आंगरे यांची मसलत यशवंतराव शिंदे यांचे विद्यमानें चालली. धोंडजी लवांडे याणें चारशें माणूस ठेविले. मागाहून बाबूराव यांहीं पांचशें माणूस कडवे पाठविले. एकूण हजार अकराशें माणूस घेऊन धोंडजी लवांडे साखरेस जाऊं लागले. तेव्हां कुलाब्याहून पांचशें सहाशें माणूस येऊन आक्षीचे मैदानांत यांची व त्यांची गांठ पडोन लढाई जाली. धोंडिबाकडील चार पांच असामी ठार होतांच, लोकांचा पळ सुटला; आणि कुलाबेकर पाठीस लागोन थेरोडचे खाडीपावेतों पोंहोचविले. ते लोक रेवदंड्यास आले. तेव्हां आनाजी त्रिंबक यांचे घरास धोंडिबांनीं चौकी बसविली. बाजीराव त्रिंबक, यशवंतराव शिंदे यांजजवळ गेले. त्यांस विचारिलें कीं, आमचे घरास चौकी काय ह्मणोन बसविली? त्यांणीं सांगितलें कीं, तुह्मीं बाबूराव यांस मिळावें. बाजीराव यांणीं सांगितलें कीं, आतां आमचे हातीं काय आहे? आह्मांस आतां तेंही समजत नाहीं, व हेंही समजत नाहीं. तेव्हां यशवंतराव यांणीं धोंडिबास सांगून चौकी उठविली. धोंडिबाच्यानें परिणाम न लागे. तेव्हां अमृतराव जिवाजी व गणेशपंत आचारी, बाबूराव आंगरे यांजकडेस गेले; आणि बाबूराव यांस समजाविलें कीं बाजीराव त्रिंबक येथें आणविल्याशिवाय ठीक नाहीं. तेव्हां बाजीराव त्रिंबक यांस पत्र पाठवून वानवडीस नेलें. आणि बाबूराव यांनीं सांगितलें कीं, तुह्मी ही मसलत पतकरा. यांनीं सांगितलें कीं, जयसिंगराव यांनीं सारें बळकाविलें; आतां आमचे हातीं काय आहे? व आह्मांस सावकार कोण मिळतो? तेव्हां बाबूराव यांनीं दाबदूब बहुत केली कीं, बेडी ठोकीन व किल्ल्यावर घालीन. यांनीं उत्तर केलें कीं, येरवीं जयसिंगराव करणार, तें तुह्मींच ह्लीं करावें. आमचे दैवींच असल्यास उपाय काय? नंतर विठोबा लोखंडे यांची भीड बाबुरावाजवळ बहुत होती. त्यांनीं बाजीराव त्रिंबक यांस बोलाऊन नेलें. आणि सांगितलें कीं, आज बाबूराव यांचा बोलबाला आहे. ह्मणेल तें करील. तरी तुह्मीं यांत पडावें. तुमची निभावणी मी करीन. यांनीं सांगितलें कीं, 'आज बाबूरावबावाचा बोलबाला आहे. त्यापेक्षां दौलतींत काय आहे?

या समयीं अशा दहा पांच दौलती करूं म्हटल्यास करतील. मुलें लहान. त्यांस हे वडील. या समयीं मुलांकडे संस्थान कायम करितील, तरी हा लौकिक मोठा. या दौलतीची आशा धरून आम्हांस स्वामिद्रोहांत कां बुडवितात? जर करितां मुलाकडे दौलत कायम राखितात अशी आणभाष केल्यास आह्मी यांत पडूं. नाहीं तरी जें करतील तें करोत.' त्याणें सांगितलें, ठीकच आहे. मी बाबूरावांजवळ बोलतों. नंतर विठोबा लोखंडे यांचें व बाबूराव यांचें बोलणें होऊन, नंतर दुसरे दिवशीं देवपूजेसमयीं बाजीराव यांस बोलाऊन नेऊन सांगितलें कीं, जयसिंगराव यानें आह्मांस सागरगड किल्ला व शिरगांव तपा देऊं केला होता. तोच आह्मी घेऊन बाकी दौलत मुलाची मुलाकडेस कायम करीन. यास साक्षी हा बाळकृष्ण. तो उचलोन बाजीराव यांचे हातावर ठेविला. नंतर बाजीराव यांनीं हरिपंत भावे दिवाण उभे केले. बाबूराव यांस भेटवून, दिवाणगिरीचीं वस्त्रें देववून, बराबर सरदार यशवंतराव कडवे शिंद्यांकडील एक पलटण देऊन रवाना केले. त्यांनीं येऊन अलिबाग सर केली. नंतर पाचां सातां दिवशीं जयसिंगराव यांनीं हरिपंतांकडे बोलणें लाविलें. आणि रेवदंड्यास आनाजी त्रिंबक यांजकडेस बाबाजी करबंत व आप्पा फडके व अलीखान यांस पाठविलें. त्यांहीं विचारिलें कीं, पुढें कसें करावें? यांणीं विचारिलें कीं, तेथील आचार कसाकाय आहे? यांनीं सांगितलें कीं, पैका व दारूगोळा भात वगैरे सरंजाम नाहीं; आणि बाबूराव आंगरे यांची जबरी बहूत. किल्ल्यांतील लोक हवालदिल जहाले. यांनीं सांगितलें कीं, मग विचार काय विचारितां? जयसिंगराव यांनीं योजिलें असेल तें खरें."

* * * * *

[वरील बखरीपुढील हकीकत, आंगरे यांचे कारभारी नारायण खंडेराव डबीर यांनीं इंग्रज सरकारास अर्ज करण्याचा एक मसुदा केला आहे, त्यावरून कांहीं समजण्यासारखी असल्यामुळें ती येथें देतों.]

## पुरवणी.

"अर्ज करितों ऐसी जे, आह्मी आंगरे सरखेल यांचे पदरचे कान्होजी आंगरे याजपासून आमची कारकीर्द चालत आली. पुढें संभाजी आंगरे यांचे व मानाजी आंगरे यांचें कांहीं गृहकलहामुळें बनेनासें जाहालें. सबब, कुलाब्याहून मानाजी आंगरे निघून रेवदंड्यास आले. नंतर आमचे पणजे यांचे वडिलांस पत्र पाठविलें कीं, तुमचेशिवाय इंग्रज सरकार अनुकूल होणार नाहीं व शामळही अनुकूल होणार नाहीं व सातारकर महाराज अनुकूल करून घेतले पाहिजेत. सबब तुमचा पदर धरला आहे. तरी तुह्मीं यावें. आह्मांस कुलाब्याची दौलत प्राप्त जाली किंवा घांटावरील आंगणी दौलत मेळविली, तरी या दौलतीचे तुह्मी विभागी

आहां. असें पत्र मानाजी आंगरे यांहीं पाठविलें. त्याजवर भरंवसा ठेऊन, संभाजी आंगरे यांस सोडून, मानाजी आंगरे यांचे पत्रावर भरंवसा ठेऊन, आमचे वडील माहादाजीबावा पारसनीस हे कुटुंबसुद्धां, मानाजी आंगरे रेवदंड्यास होते तेथें त्यांजवळ जाऊन मिळाले. आणि आमचे वडील माहादाजीबावा पारसनीस हे मुंबईस जाऊन इंग्रज सरकार अनुकूल करून घेतले. तेथून येऊन शामळ याजकडे जाऊन त्यासही अनुकूल करून घेतलें. नंतर त्यांची दौलत कुलाब्यास मिळाली. तेव्हां आमचे वडील माहादाजीबावा पारसनीस यांस इनामें वगैरे करून दिलीं. गांव मौजे बोरघर तर्फ उमटें हा गांव व मंहाल नागांव येथील वाडी लालघोडा असें गांव व वाडी यांच्या सनदा वंशपरंपरेनें करून दिल्या, व पालखीचे सरंजामाबद्दल नेमणूक बाराशें रुपयांची करून दिली, आणि त्याप्रमाणें चालविलें. कांहीं वर्षांनीं मानाजी आंगरे मृत्यु पावले. नंतर त्यांचे मुलगे राघोजी आंगरे यांहीं वडिलांची कारकीर्द पाहून त्यांहींही आपले कारकीर्दींत सनदा करून दिल्या. त्याही चालत आल्या. पुढें कांहीं वर्षांनीं राघोजी आंगरे आजारी पडले. तेव्हां आमचे वडील यांस विचारिलें कीं, तुह्मी पिढीजाद आमचे आहां. त्यापेक्षां तुह्मांस सांगतों कीं, आमचे मुलगे दोघे. वडील मुलाचें ( नांव ) मानाजी आंगरे व धाकटे याचें नांव कान्होजी आंगरे. असे दोन मुलगे यांस माझे मागें तुह्मीं अंतर देऊं नये. ह्मणोन राघोजी आंगरे बोलिले. तेव्हां आमचे वडील यांहीं सांगितलें कीं, अंतर देणार नाहीं, असें बोलिलें. नंतर कांहींक दिवसांनीं तेही मृत्यु पावले. तेव्हां मानाजी आंगरे व कान्होजी आंगरे हे लहान होते. त्यांस वस्त्रें द्यावयाचीं. त्याचा उद्योग आमचे वडील यांहीं श्रीमंतांकडे चालविला होता. आणि श्रीमंतांहीं कबूलही केलें कीं, कुलाबे येथील संस्थानचे मालक दोघे मुलें आहेत. त्यास वस्त्रें द्यावीं असें ठरलें. तें वर्तमान बाबूराव आंगरे यांस समजतांच, बाबूराव आंगरे यांहीं शिंदे यांस सांगून जबरदस्तीनें आपण वस्त्रें घेतलीं. आणि कुलाब्यास येणार असें वर्तमान आमचे आजे यांस समजतांच, दोघे मुलगे यांस घेऊन रेवदंडियास कुटुंबसह येऊन राहिले. नंतर बाबूराव आंगरे हे कुलाब्यास आले, आणि चौकशी करूं लागले कीं, दोघे मुलगे घेऊन रेवदंडियास आहेत. तेव्हां आमचे आजे यांस चिठ्ठी पाठविली कीं, दोघे मुलगे आमचे स्वाधीन करावे. ह्मणजे तुमचीं जशीं इनामें चालविलीं होतीं, त्याजपेक्षां जाजती करून देऊं. असें लिहून रेवदंड्यास आमचे आजे यांस आलें. त्याचें उत्तर आमचे आजे यांहीं लिहिलें कीं, दोघे मुलगे तुमचे स्वाधीन करावयाचे नाहींत. त्या रोषांनीं आमचीं घरें मोठे इमारतीचीं होतीं, तीं जाळलीं; आणि गांव व वाडिया इनाम होत्या त्या बंद केल्या, आणि आमचे वडिलांवर द्वेष ठेविला. नंतर शिंद्यांकडून श्रीमंतांचे कानावर घालून श्रीमंतांचीं पत्रें आणिलीं. तेव्हां दोघे मुलगे बाबूराव आंगरे यांचे स्वाधीन केले. आणि कांहीं महिन्यांनीं बाबूराव आंगरे हे हिंदुस्थानांत जाऊं लागले. तेव्हां दोघे मुलगे यांस बरोबर घेऊन गेले. नंतर आमचे वडील यांहीं श्रीमंतांकडे बोलणें चालविलें होतें कीं, हे मुलगे संस्थानचे मालक असोन बाबूराव आंगरे

यांस वस्त्रें दिलीं, हें चांगलें जालें नाहीं. असो. त्या दोघां मुलांचें दैव! श्रीमंतांवर काय म्हणोन रुसावें? कांहींका वर्षांनीं बाबूराव आंगरे हे कुलाब्यास येऊं लागले. तेव्हां दोघे मुलगे बरोबर आणिले. नंतर बाबूराव आंगरे यांस कांहीं शरिरास उपद्रव होऊन ते जांबगांव येथें मृत्यु पावले. नंतर कांहीं दिवस बाबूराव आंगरे यांची लहान कन्या यमुनाबाई इजला गादीवर बसवून काम चालवीत असत. ते वेळेस राजश्री बाबाजी दिवाणजी हे कारभारी होते. ते समयीं श्रीमंतांकडे आमचे वडील यांहीं बोलणें चालविलें होतें. श्रीमंतांहीं सांगितलें कीं, थोरले मुलगे मानाजी आंगरे यांस वस्त्रें संस्थानीं पाठवून देतों. याप्रमाणें ठरलें. हें वर्तमान बाबाजी दिवाणजी यांस कळलें. बाबाजी दिवाणजी यांचें बोलणें त्रिंबकजी डेंगळे यांजकडे चाललें होतें कीं, बाबूराव आंगरे यांची थोरली कन्या आहे. तिचा मुलगा, काशीबाई-बाबूराव आंगरे यांची बायको—यांचे मांडीवर द्यावा. असा उद्योग चालविला होता. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. म्हणून तो रोष बाबाजी दिवाणजी यांचे मनांत होता. नंतर मानाजी आंगरे यांस वस्त्रें आलीं. आमचे वडील पुण्यास होते. ते समयीं बाबाजी दिवाणजीही तेथें होते. तेव्हां बाबाजी दिवाणजी यांहीं आमचे वडिलांस सांगितलें कीं, तुमचे गांव व वाडी इनामें बंद, बाबूराव आंगरे यांजपासून बंद झालीं आहेत, तीं मोकळीं करून देऊं; परंतु तूर्त तुमची नेमणूक करून देतों. असें आमचे वडिलांस सांगितलें. वडिलांहीं कबूल केलें. ते समयीं नेमणूक ठराऊन दिल्ही. ती सुमारें पांच चारशें रुपये नक्त व खेरीज ऐन जिन्नस भात खंडी घाटी दहा व सरकारचे थट्टीतील दुभत्या म्हशी दोन व मिठागरावरील मीठ मण सुमारें चार व शाकारणीस झावळ्या नारळीच्या सुमारें सात आठशें व पेढा सुमारें दोन हजार याप्रमाणें नेमणूक करून चालविलें होतें. नंतर दोन तीन वर्षांनीं नेमणूक कमी करीत गेले. याचें कारण आमचे वडिलांस आस्रा नाहींसा झाला. कारण, श्रीमंतांची गादी इंग्रज सरकारांत आली. आमचा आस्रा इंग्रज सरकारांत नाहीं. सबब नेमणूक कमी करीत आले. नंतर आमचे वडील निवर्तले. आणि आम्हीं बाबाजी दिवाणजी यांस विचारिलें. त्यांहीं सांगितलें कीं, तुम्हांस कांहीं मिळावयाचें नाहीं. असें सांगितल्यावरून आम्ही तेथून निघून ठाण्यास राहिलों. त्यास वर्षें सुमारें वीस बेवीस होत आलीं, व आमचा दरकी रोजगार पेण पंचमहाल येथील कारखान्निशी तोही दरक इंग्रज सरकार यांचेकडे गेला. अशी व्यवस्था माझी आहे. ती कंपनी सरकारास जाहीर करितों. कारण, कुटुंबाचें कसें चालेल या चिंतेंत रात्रंदिवस आहें. या कारणास्तव सरकार खावंदाकडेस अर्ज केला आहे. तर माझी दाद देणार खावंद परमेश्वर आहेत. कुलाबा संस्थान हें इंग्रज सरकारांत आलें. तेव्हां बाबाजी दिवाणजी यांहीं मागील अमलाची माहितगारी सांगितली असती, तर इंग्रज सरकार माझी कांहीं तरी तजवीज पेन्शनाची आमचे वडिलांचे लौकिकाप्रमाणें करून दिली असती. असो, हल्लीं अर्ज करितों. तर माझे कुटुंबाची दया आणून चालविणार खावंद समर्थ आहेत.



# ऐतिहासिक टिपणें.



## भाग २ रा.



### १. नानांचा नकाशे मिळविण्याचा प्रयत्न.

नाना फडणवीस ह्यांस हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांची माहिती करून घेण्यासाठीं त्या त्या प्रांताचे नकाशे मिळविण्याची फार जरूर असे. ह्मणून त्यांनीं, पाश्चात्य लोकांकडून व आपल्या लोकांकडून मुद्दाम नकाशे तयार करविण्याचा प्रयत्न केला होता. नानांस भूगोलज्ञान चांगलें असून त्यांनीं मराठ्यांच्या राज्याचे नकाशे तयार केले होते. त्याचप्रमाणें, मराठ्यांच्या आरमाराचे, लढाऊ किल्यांचे व युद्धांच्या जाग्यांचेही नक्षे ऊर्फ नकाशे तयार करविले होते. ह्या नकाशांचा संग्रह फार मूल्यवान् व मनोरंजक होता. नानांनीं, टिपूच्या मोहिमीवर इंग्रजांच्या मदतीस पाठविलेले पेशव्यांचे सेनापति हरिपंत फडके ह्यांस, बंगळूर, नंदीगड व श्रीरंगपट्टण वगैरे किल्यांचे नक्षे पाठविण्याबद्दल कशीं पत्रें पाठविलीं होतीं, व त्यांनीं इंग्रजांकडून कसे नक्षे मिळविले, ह्याबद्दलचें एक अस्सल पत्र येथें दाखल करितों. त्यावरून मराठ्यांची शोधकबुद्धि चांगली व्यक्त होते.

[मेणवलीदप्तर.] श्री. ता. ३ दिसेंबर इ. स. १७९१.

"सेवेसी विज्ञापना तागायत चंद्र ६ रबिलाखर वर्तमान यथास्थित असे. विशेषः— स्वामींनीं चंद्र १९ रबिलावलचीं पत्रें लाखोट्यावरील रवानगीचीं पाठविलीं, तीं चंद्र ५ रबिलाखरीं पावलीं. "नंदीगड इंग्रजांनीं घेतला. पुढें होसुराकडे जाणार. त्यास दसरा जाल्यावर पटणास जाण्याचा इरादा. त्यास कार्तिक तिकडेच होईल. पुढें पोलादजंग व मध्यस्त आल्यावर मनसुबा ठरेल असें दिसतें. बेंगरूलचा किल्ला इंग्रजांनीं तुह्मांस दाखविला, व नंदीगड घेतला. यांचे नकसे व पटणचा, कोणी माहित असला तर त्याजपासून करऊन माफजतीनें पाठऊन देणें, ह्मणून आज्ञा. त्यास नंदीगड घेऊन होसुराकडे गेले. तिकडे फार दिवस लागले नाहींत. चिनापटणची रसद घाटावर आली. मग कूच केलें, तें बेंगरूलाजवळ येऊन राहिला. रसद येऊन पोहोंचली. मग बेंगरूल तीन कोस मागें टाकून मागडीचे सुमारें मुक्काम केला आहे. पटणास जाण्याची जलदी आहे. परंतु मधीं मागडी घेतल्याखेरीज रस्ता नीट होत नाहीं. याजकरितां घ्यावयाचे विचारांत आहेत. घडेल तें लिहूं. पोलादजंग येणार हेही मार्गप्रतीक्षा आहे. पुरुमकुंड्यास

आले, असी बातमी आली. आल्यावर लेहून पाठऊं. नकशाविसीं आज्ञा केली, त्यास बेंगरूळचा नक्षा स्वामींकडे पाठवावयासाठीं इंग्रजांनीं तयार केला आहे. येका दो रोजीं तयार होईल. तो व नंदीगडचा व श्रीरंगपटणाचा नक्षा करून, तिन्ही नक्षे पाठऊन देतों. विदित जालें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## २. बच्याजी रघुनाथ मेहेंदळे ह्यांचें पत्र.

बच्याजी रघुनाथ हे, बहिरो रघुनाथ मेहेंदळे ह्मणून जे इंग्रज रेसिडेंट सर चार्लस मालेट ह्यांजकडे पेशव्यांच्या तर्फे वकील होते, त्यांचे धाकटे बंधु होत. हे पेशव्यांच्या वतीनें लार्ड कॉर्नवालिस ह्यांच्या बरोबर इ. स. १७९१ सालीं टिपूच्या मोहिमेवर गेले होते. त्यांनीं ह्या मोहिमीसंबंधाचीं पुष्कळ बातमीपत्रें लिहिलीं असलीं पाहिजेत. तीं उपलब्ध झालीं, तर इंग्रज सैन्याच्या रचनेची व हालचालीची त्या वेळची संपूर्ण माहिती समजेल. बच्याजी रघुनाथ ह्यांनीं गोविंदराव काळे ह्यांस पाठविलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यामध्यें लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांनीं बंगळूर ता. २१ मार्च इ. स. १७९१ रोजीं घेतल्याचा उल्लेख आहे.

[बेणवलीदप्तर.] श्री. ता. २१ एप्रिल इ. स. १७९१.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंदरावजी बापू स्वामींचे सेवेसीः— पोष्य बच्याजी रघुनाथ मेहेंदळे साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र १७ साबान मुक्काम व्यंकटगिरी जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेषः— बहुतां दिवसां कृपा करोन पत्रें चंद्र १ जमादिलाखरचे रवानगीचें व चंद्र १७ मिनहूचें व चंद्र १ रजबेचें पाठविलीं, तीं कालच तिसरे प्रहरीं पावलीं. सविस्तर मजकूर कळला. संतोष जाहला. इकडील वर्तमान ल्याहावें ह्मणोन लिहिलें, त्यास चेनापट्टणचे मुक्कामीं आपणाकडील जोडी बराबर होती, तिजबराबर पत्रें पाठविलींच होतीं. त्या अलीकडील वर्तमानः—चेनापट्टणाहून निघोन चंदावरास आलों. तेथून निघोन त्रिचनापल्लीस येऊन चंद्र २० रबिलाखरीं जनराल मंडोसाची भेट जाली. तेथून मशारनिल्हे कूच करून चेनापट्टणाजवळ आले. लाट कॉर्नवालिस बंगालेहून पट्टणास आले होते. ते चंद्र २३ जमादिलावलीं लष्करांत दाखल जाले. आठ दिवस राहून, चंद्र १ जमादिलाखरीं कूच करोन, चंद्र १५ जमादिलाखरीं मोंगली घाट चढोन वर आले. चार रोज घाटावर मुक्काम करोन, दरोबस्त सरंजाम भारी तोफखाना घाटावर आलेयावर निघाले. ते गुडवागल, कोल्हार, हुसकोटा या मार्गे बेंगरुळास चंद्र २९ जमादिलाखरीं दाखल जाले. मार्गांत एक वेळ टिपूकडील स्वाराचा मुकाबला जाला, परंतु लाटसाहेब बहुत मजबुदीनें

सांभाळोन फौजसुद्धां बेंगरुळास पावले. चंद्र १ रजबीं किल्ल्याजवळ पेठ आहे, ती हल्ला करोन घेतली, आणि मोर्चे बांधावयाचें काम चालतें केलें. आठां रोजांनीं मोर्चे तयार होऊन यांकडील तोफांची मारगिरी सुरवात जाली. किल्ल्यांतीलही तोफांची मारगिरी नेहमीं रात्रंदिवस होतच होती. चंद्र १५ रजबीं बारा घटका रात्रीस इंग्रजांकडील गोरे लोकांनीं हल्ला करोन किल्ला सर केला. टिपूकडील लोक आंत होते, ते दक्षणेकडील दरवाजानें फरारी जाले. कांहीं सांपडले, ते एक दिवस कैदेंत ठेऊन सोडून दिले. किल्ल्यांत सरंजाम बारुद वगैरे बहूत आहे. एक दिवस गोरे लोकांस आंतील लूट माफ केली होती. उत्तरेकडील दरवाजेयाचे बुरजावर तोफांचा मारा करोन एक बुरूज जमीनदोस्त केला; आणि त्याच मार्गानें हल्ला करोन लोक किल्ल्यावर गेले. किल्लेदार बहादरखान म्हणोन पोख्ता माणूस होता, तो कामास आला. आणखी दीडशेंपावेतों मनुष्य कामास आले. याप्रमाणें वर्तमान जालें. सविस्तर कळावें म्हणोन लिहिलें आहे. किल्ला सर जाल्यावर आठ रोज मुक्काम करोन चंद्र २२ रजबीं स्वार जाले, ते चिकबालापुरावरोन दासरपल्लीचे मुक्कामीं फौज मुद्धां येऊन दाखल जाले. नवाबाकडील फौज राय भारामल तेजवंतबहादर चंद्र ९ साबानीं गंजीकोटेयाहून निघोन मुक्काममजकुरीं दाखल जाले. त्याच दिवशीं लाटसाहेबांच्या व त्यांच्या भेटी जाल्या. चंद्र १० साबानीं दुसरे दिवशीं कूच करोन मजल दरमजल व्यंकटगिरीस आले आहेत. उभयतांचीं लष्करें जवळच उतरतात. एक वेळ लाटसाहेब जनरल मंडोस भारामलाचे डेरेयासी गेले होते. तेही दोन वेळ लाटसाहेबांचे डेरेयासी आले होते. प्रथम भेटीचे दिवशीं इंग्रजांनीं आपले बारवाले तोफखाना दरोबस्त त्यास दाखविला. नंतर त्यांनींही आपली फौज तयार करोन गोटाबाहेर माळावर उभी कोरबंदीनें केली, आणि लाटसाहेबांस दाखविली. बहूत चांगले लोक आहेत म्हणोन डेरेयासी गेले. सदरहू वर्तमान त्यांनीं लिहिलें यावरोन आपणास कळलेंच असेल. हल्लीं घाटाखालोन कांहीं रसद आणविली, ती येत आहे. आली म्हणजे कूच करोन बेंगरुळचे मार्गें श्रीरंगपट्टणास नमूद होणार आहे. कळावें. आपणाकडील वर्तमान बहूत दिवस कळत नव्हतें. हल्लीं पत्रें आल्यावरोन समजलें. सदैव पत्रीं तोषवीत असावें. आपणाकडील राजश्री गोविंद बल्लाळही भेटले होते. पतकसुद्धां सुखरूप आहेत. बहूत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."



## ३ पुण्याची टंकसाळ व पेशव्यांचा शिक्का.

पुण्यास टंकसाळ कधीं केली तें नक्की समजत नाहीं. परंतु इ. स. १७६१ सालचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यामध्यें पुण्यास टंकसाळ घालावी व पातशाही शिक्क्याचे रुपये पाडावे, असा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें, ह्या वर्षी 'सरकारांत ऐवजाची ओढ बहुत, रोजमुरे यांस ऐवज बहुत लागेल' असा उल्लेख आहे. इ. स. १७६१ सालीं पानिपतच्या युद्धामुळें ऐवजाची ओढ पेशव्यांस

फार लागावी, हें साहजिकच आहे. ह्या संबंधाचें पुढील पत्र वाचण्यासारखें आहे. ह्या पत्रावरून पुण्यामध्यें इ. स. १७६१ च्या पूर्वी टंकसाळ स्थापन झाली नसावी हें उघड होतें. त्याचप्रमाणें, पेशव्यांनीं आपल्या नांवाचा शिक्का कधीं पाडिला नसून 'पातशाही शिक्का' च कायम ठेविला होता, हेंही सिद्ध होतें.

[चिरणोळ.] श्री. ता. १८ आक्टोबर इ. स. १७६१.

"राजश्री माधवराव विश्वनाथ स्वामी गोसावी यांसीः—

विनंति उपरीः—यंदा सरकारांत ऐवजाची वोढ बहुत. रोजमुऱ्यास ऐवज फार लागेल. त्यास, पुण्यांत टंकसाळ घालावी; पातशाही शिक्का करावा; रुप्याचे रुपये व अधेल्या कराव्याः सोन्याच्या मोहरा कराव्या; हा प्रकार तुह्मांस सांगितलाच आहे. त्यास सरकारचे दागिने रुप्यासोन्याचे किती, याचा जाबता आकारून पाठवून देणें. रुप्याच्या दागिन्यांत देवाचीं उपकरणें, ताटे वाट्या व गुलाबदाण्या तबके वगैरे चांगले दागिनें खेरीज करून, बाकी गोबरे दागिने घागरी, हंडे, पराता वगैरे भांडीं, साखळदंड वगैरे दागिने मोडून त्यांचे रुपये व अधेल्या कराव्या. सोन्याचे दागिन्यांत देवाचीं उपकरणीं वगैरे चांगले दागिनें व ताटे वाट्या खेरीज करून, बाकी दागिने काढून त्यांच्या मोहरा कराव्या. याप्रमाणें जरूर करावें लागते. यास्तव तुह्मांस लिहिलें असे. तरी एकंदर सोनेरुप्याचे दागिने किती होतात याची याद, व एकंदर दागिन्यांपैकीं मोडावयाचे लिहिले आहेत, यांचें वजन किती होतें याची याद लिहून पाठवून देणें; आणि लिहिल्याप्रमाणें टंकसाळ घालून, पातशाही शिक्का करून, रुपये व अधेल्या व मोहरा याप्रमाणें जिन्नस तयार करणें. जाणिजे. छ. १९ रबिलावल मु॥ इसन्ने सीतैन मया व अलफ हे विनंति."



## ४ दादासाहेबांचें राजकारस्थान.

[ मेणवलीदप्तर. ] श्री. ता. १६ एप्रिल इ. स. १७७८.

"राजमान्य राजश्री सदाशिव रघुनाथ यांसः—रघुनाथ बाजीराव प्रधान आशीर्वाद सुरुसन समान सबैन मया व अलफ. विलायतेचा हुकूम आला, इतक्यांत पुण्याकडूनही कित्येक सरदार मुत्सद्दी यांनीं मसलत केली. त्यास मुलुखाच्या सनदा तुह्मांजवळ अमानत असों देणें; नवाबास न देणें; मागाहून लिहूं तसें करणें; ह्मणून दुहिरी पत्रें तुह्मांस सादर केलीं आहेत. हल्लीं बंगाल्याहून जनरालाचें पत्रही हुजूर येऊन पोंहचलें. खांसा स्वारी चैत्र वद्य प्रतिपदेस डेरेदाखल झाली. समागमें मबलग सरंजाम अंग्रेजी वगैरे आहे. त्यास खर्चास ऐवज ज़रूर असावा, तोही अंग्रेज कर्जोदाखल देत आहेत. परंतु त्यांजपासून कर्जाऊ ऐवज घेत नाहीं. नवाबाकडूनच ऐवज आणवून घ्यावा, हेंच नेक

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः-दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] सप्टेंबर १९०९. [अंक २ रा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

## आश्रयदात्यांस सूचना.



चालू सालचे दोन् अंक आपणांस पोंचले आहेत, करितां तिसरा अंक निघण्याचे पूर्वीं चालू सालची वर्गणी ४ चार रुपये पाठवून द्यावी. अलाहिदा सूचनेची वाट पाहूं नये. तिसरा अंक निघण्याचे पूर्वीं वर्गणी न आल्यास सदर अंक व्ही. पी. नें पाठवूं. त्याचा स्वीकार करण्याचीं मेहरबानी करावी.

**तुकाराम जावजी,**

निर्णयसागर छापखान्याचे मालक.

त्यानें मल्हारराव होळकराचें साह्य घेऊन नजीबखानाचा पुरा सूड घेतला. ह्यानें आग्रा येथील काळ्या संगमरवरी दगडाचें बादशाही सिंहासन विजयचिन्ह ह्मणून आपल्या राज्यांत आणिलें. तें अद्यापि दीग येथील गोपाळभवनामध्यें दृष्टीस पडतें. ह्याच्या वंशजाकडे भरतपूर संस्थान अद्यापि चालू आहे.

सुरजमल जाट ह्यानें आपल्या पराक्रमानें जाट लोकांचें मोठें विस्तीर्ण राज्य संस्थापित केलें. त्याची राहण्याची जागा दीग ही होती. तेथें त्यानें राजधानी केली, व लाखों रुपये खर्चून तेथें अप्रतिम राजवाडे बांधिले. हे राजवाडे 'गोपाळ-भवन' वगैरे नांवानें प्रसिद्ध आहेत. हे रूपसागर नांवाच्या तलावाच्या पश्चिमेस असून त्यांचा देखावा फार अप्रतिम दिसतो. त्यांची रचना व त्यांतील नक्षीकाम फारच सुंदर असून, त्यांची योग्यता ताजमहालच्या खालोखाल आहे. मि. फर्ग्युसन ह्यांनी हिंदुस्थानांतील कलाकौशल्यांचा जो इतिहास लिहिला आहे, त्यांत त्यांनीं असे उद्गार काढिले आहेत की, "दीगच्या राजवाड्यांस दुसऱ्या रजपुत संस्थानिकांच्या राजवाड्यांप्रमाणें तटबंदी व प्रचंड कोट वगैरे कांहीं नसल्या-मुळें त्यांचें स्वरूप कदाचित् भव्य नसेल, परंतु कल्पनाशक्तीचा अद्भुत प्रभाव आणि नक्षीकामाचें खरें सौंदर्य ह्याच राजवाड्यांत पहावयास मिळेल." ह्या राजवाड्यांमध्यें कारंजांची अशी कांहीं बहार करून सोडिली आहे कीं, येथें कृत्रिम पर्जन्यवृष्टि होऊन, आपण जणों वर्षाकाळांत मेघलीला पहात आहोंत कीं काय, असा भास होतो.

सुरजमल जाटाची छत्री गोवर्धन येथें कुसुमसरोवरावर आहे. ती त्याचा पुत्र जवाहिरसिंग ह्यानें बांधिली आहे. ह्या छत्रीमध्यें सुरजमलाची राणी हाणसया (अनुसूया) आणि राणी किशोरी ह्यांच्याही मूर्ति आहेत.

सुरजमल जाट ह्याची योग्यता योद्धा व मुत्सद्दी ह्या नात्यानें फार मोठी आहे. त्याच्या संबंधानें 'सीरमुताखरीन' ह्या ग्रंथामध्यें पुढील आशयाचा उल्लेख आढळतो:—"सुरजमल हा जाट लोकांचा पाणीदार नेत्र, आणि चमकणारी प्रकाश-ज्योति होती. त्यानें पुष्कळ लढाया जिंकून जशी कीर्ति मिळविली, तशीच त्यानें सौजन्य व सदाचरण ह्या गुणांच्या योगानें आपल्या प्रजेची प्रीति संपादन केली. राजव्यवहारशास्त्रामध्यें त्याचें ज्ञान फार उच्च प्रतीचें होतें. त्यानें कुंभेर, दीग, भरतपूर, वल्लभगड असे चार बळकट किल्ले बांधिले, व त्यांमध्यें भरपूर युद्धसामुग्री जमवून ठेविली. .... त्यानें आपल्या घोडेस्वारांस एक प्रकारची नवीन तऱ्हेची निशाणबाजी शिकविली होती. तेणेंकरून तो सर्वास अजिंक्य वाटत होता. हिंदु राजांमध्यें त्याच्या योग्यतेचे राजे दुसरे क्वचितच होते".

## २. मलिकअंबर.

महाराष्ट्रामध्यें, मुसलमानी अमदानीमध्यें जे शहाणे, पराक्रमी, राजकार्यकुशल, प्रजाहितेच्छु असे थोर पुरुष होऊन गेले, त्यांमध्यें निजामशाहीमधील सुप्रसिद्ध मुत्सद्दी मलिकअंबर ह्याची गणना आहे. ह्यानें, इ. स १६०० मध्यें मोंगलांनीं अहमदनगरचें राज्य जिंकून घेतल्यानंतर, नवीन बादशाहा निर्माण करून व मोंगलांशीं टक्कर देऊन, सुमारें २५ वर्षेपर्यंत निजामशाहीचें नांव कायम राखिलें, एवढेंच नव्हे, परंतु एका हातांत तलवार व एका हातांत लेखणी घेऊन राज्यकारभार करून दाखविला, आणि पराक्रमी योद्धा व शहाणा मुत्सद्दी अशी एकसमयावच्छेदेंकरून आपली कीर्ति इतिहासांत अजरामर केली. ह्मणून ह्याचें चरित्र फार महत्त्वाचें व विचारार्ह असें समजलें जातें. तें संक्षेपेंकरून येथें सादर करितों.

मलिकअंबर हा जातीचा सिद्दी अथवा हबशी गुलाम होता. हा एका थोर फकिराच्या आशीर्वादानें महत्पदास चढला. हा पहिल्या मूर्तिजा निजामशाहाचा स्वामिनिष्ठ प्रधान चंगीजखान ह्याच्या पदरीं होता. त्याच्या हाताखालीं तो राज्यकारभाराचीं व मुलकी हिशेबाचीं कामें शिकला. अहमदनगरच्या निजामशाही राज्यामध्यें सोळाव्या शतकाच्या अखेरीस अगदीं निर्जीवता उत्पन्न होऊन, तें राज्य मोंगल सैन्यानें इ. स. १६०० मध्यें जिंकून घेतलें. निजामशाहीची गादी संरक्षण करण्याकरितां चांदबिबीनें शेवटचा प्रयत्न केला, आणि तत्प्रीत्यर्थ आपला देह रणभूमीस अर्पण केला. तिच्या पश्चात् निजामशाहीची पुनः प्राणप्रतिष्ठा करून तिला सजीव करणारा कर्तृत्ववान् मुत्सद्दी मलिकअंबर हाच होय. हा चांदबिबीचा विश्वासू सेवक असून, जुन्या निजामशाही घराण्याचा कट्टा अभिमानी व पुरस्कर्ता होता. त्यानें, अहमदनगर मोंगलांनीं जिंकून घेतल्यानंतर, आपला स्वतंत्र पक्ष निर्माण करून, मूर्तिजा निजामशाहा नांवाचा एक बादशाहा सिंहासनारूढ केला, व खडकी येथें नवीन राजधानी करून निजामशाहीचा स्वतंत्रपणें राज्यकारभार चालविला. अहमदनगर येथें मोंगलांचा झेंडा फडकूं लागल्यानंतर अकबर बादशाहानें ख्वाजा बेग मिर्झा सफावी व मिर्झा महमद साली ह्या दोन सरदारांस जिंकलेल्या प्रांताचा कारभार सांगितला. त्यांनीं अहमदनगरच्या लोकांस संतुष्ट करून बादशाही राजसत्ता प्रस्थापित करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्यांत त्यांना चांगलेंसें यश आलें नाहीं. मलिकअंबर ह्यानें आदिलशाही व कुतुबशाही राज्यांच्या सरहद्दींपर्यंत, व अहमदनगरपासून ८ मैल अलीकडे व उत्तरेस चेऊल बंदरापर्यंत, व दक्षिणेस दौलताबादेपर्यंत, सर्व प्रांत आपल्या सत्ते-

खालीं घेतला. मलिकअंबराप्रमाणें मियां राजू दखनी ह्मणून निजामशाहीचा दुसरा एक प्रबळ सरदार होता. त्यानें दौलताबादचा किल्ला आणि गुजराथच्या दक्षिणेकडील निजामशाही प्रांत आपल्या ताब्यामध्यें ठेविला. अर्थात् मलिकअंबर व मियां राजू हे दोघे प्रमुख सरदार निजामशाही प्रांत बळकावून, मूर्तिजा निजामशाहाच्या नांवानें राज्यकारभार चालवूं लागल्यामुळें, मोंगलांच्या सत्तेस फारच प्रतिरोध झाला, आणि कांहीं दिवसपर्यंत अहमदनगर येथें मोंगलांची सत्ता नाममात्र राहिली. ह्याच सुमारास इ. स. १६०५ मध्यें अकबर बादशाहा मृत्यु पावला, व त्याचा पुत्र जहांगीर हा दिल्लीच्या बादशाहीचा अधिपति झाला. त्यानें खानखाना, खानजहान, वगैरे सरदार दक्षिणेंत पाठवून, मलिकअंबर ह्याची सत्ता संपुष्टांत आणण्याचा एकसारखा प्रयत्न केला; परंतु मलिकअंबरच्या शौर्यापुढें व शहाणपणापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. तथापि, मलिकअंबर व मियां राजू ह्यांच्यामध्यें लौकरच प्रतिस्पर्धा उत्पन्न झाल्यामुळें मात्र, मोंगल लोकांस निजामशाही प्रांतावर वारंवार स्वाऱ्या करण्यास चांगली संधि मिळाली. त्यामुळें मलिकअंबर ह्यास त्यांच्याशीं युद्ध करण्यांत पुष्कळ वेळ खर्चावा लागला. इ. स. १६०७ पर्यंत मोंगल सेनापति, मियां राजू आणि मलिकअंबर ह्यांच्या परस्परांच्या चढाओढींत पुष्कळ वेळ गेला. परंतु इ. स. १६०७ नंतर मलिकअंबर ह्यानें मियां राजूचा पूर्ण पराभव करून त्यास कैद केलें, आणि त्याचा सर्व प्रांत जिंकून आपल्या प्रांतास सामील केला. तेणेंकरून निजामशाहींतील दुही मोडून मलिकअंबर ह्यास एकतंत्रानें राज्यकारभार चालविण्यास ठीक पडलें. ह्याच वर्षी मलिकअंबरनें खडकी येथें आपली राजधानी करून एकछत्री राज्यकारभार सुरू केला. इ. स. १६०७ पासून १६२६ पर्यंत मलिकअंबरची कारकीर्द फार महत्त्वाची झाली असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

मलिकअंबर ह्यास मुख्यत्वेंकरून दिल्लीचे मोंगल हे मुख्य शत्रू असून, त्यांनीं निजामशाही प्रांत जिंकून घेण्यासाठीं एकसारखा प्रयत्न व कारस्थानें चालविलीं होतीं. तथापि, मलिकअंबर ह्यानें निजामशाहींतील मराठे सरदार अनुकूल करून घेऊन, आपलें लढाऊ सैन्य नेहमीं तयार ठेविल्यामुळें, मोंगलांची सरशी फारशी झाली नाहीं. मलिकअंबरच्या कारकीर्दींतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे नवीन मराठे सरदारांचा उदय ही होय. मालोजी व शहाजी हे दोन पुरुष मलिकअंबरच्या प्रोत्साहनानें व सहानुभूतीनें महराष्ट्ररंगभूमीवर प्रसिद्धीस आले. मलिकअंबरानें निजामशाहीस जें पुन्हां महत्त्व आणिलें, त्याचा पुष्कळसा यशोभाग ह्या मराठे सरदारांस देण्यास बिलकूल हरकत नाहीं. मलिकअंबर ह्यानें मराठ्यांचें

जें लढाऊ सैन्य तयार केलें होतें व जें मोंगल सैन्याचा पराभव करण्यांत अगदीं तत्पर असे, त्यास 'बरगे-लष्कर' असें नांव मिळालें होतें, आणि त्यांच्या कामगिरीस 'बरगेगिरी' अशी संज्ञा प्राप्त झाली होती. निजामशाही मराठ्यांचें शौर्य पाहून इ. स. १६२१ पासून मोंगल सैन्याचा अधिकारी शहाजहान लोधी ह्यानें त्यांस अनुकूळ करून घेण्याचा प्रयत्न केला, व लखुजी जाधवराव ह्यास २४००० पायदळ व १५००० स्वार ह्यांची मनसब दिली. तेणेंकरून रणशूर मराठे निजामशाहीमधून निघून प्रतिपक्षास सामील होऊं लागले, व मलिकअंबराचा पक्ष कमजोर होऊं लागला. त्या योगानें मोंगल सैन्यास मलिकअंबरची राजधानी जी खडकी तेथें इ. स. १६२४ मध्यें स्वारी करून, पैठणापर्यंत धुमश्चक्री उडविण्यास चांगली संधि मिळाली. मोंगल सैन्यास प्रतिबंध करण्यांत आतां अर्थ नाहीं असें पाहून, मलिकअंबरनें मोंगलांशीं तह केला, व अहमदनगर व त्याच्या सभोंवतालचा ३० मैल प्रदेश आणि ५० लाख रुपये दिलीपतीस देण्याचें मान्य केलें.

इ. स. १६२४ पासून १६२६ पर्यंत दोन वर्षांमध्यें मलिकअंबरनें पुन्हां आदिलशाही सैन्याबरोबर युद्ध करून पुष्कळ प्रांत काबीज केला. त्यानें मोठ्या पराक्रमानें सोलापूर जिंकून घेतलें, आणि पुनः अहमदनगरापर्यंत आपला अंमल बसविला. मलिकअंबरचा शौर्यप्रभाव पाहून, मोंगल सैन्यानें, दिल्लीहून कुमक येईपर्यंत, आपली सर्व हालचाल बंद ठेविली; आणि विजापुरच्या आदिलशाहानें बालाघाटपर्यंतचा प्रांत निमुटपणें मलिकअंबरच्या स्वाधीन केला. मलिकअंबर वार्धक्यानें बराच जर्जर झाला होता व त्याच्या वयास ८० वर्षें होऊन गेलीं होतीं. त्यास आयुष्य व शक्ति हीं आणखी मिळालीं असतीं, तर त्यानें अहमदनगरची निजामशाही पूर्वींप्रमाणें स्वातंत्र्याच्या व वैभवाच्या शिखरास नेऊन पोहोंचविली असती. मलिकअंबर इ. स. १६२६ मध्ये दौलताबाद येथें मृत्यु पावला.

मलिकअंबर हा मोठा शूर व पराक्रमी योद्धा होता, हें त्यानें केलेल्या अनेक लढायांवरून व्यक्त होतें. महत्त्वाकांक्षी मोंगल, स्वार्थपटु आदिलशाही व बरीदशाही सरदार, आणि खुद्द घरचे प्रतिस्पर्धी निजामशाही उमराव, ह्या सर्वांशीं त्यानें टक्कर देऊन निजामशाहीचें पुनरुज्जीवन केलें, ह्यांतच त्याची कर्तृत्वशक्ति चांगली दिसून येते. मलिकअंबर हा जसा रणपटु योद्धा होता, त्याप्रमाणें तो राजकारणपटु मुत्सद्दी होता. महाराष्ट्रामध्यें त्याची खरी योग्यता त्याच्या राज्यकारभाराच्या शहाणपणावरून अधिक मानिली जाते. त्यानें पूर्वीच्या राज्यव्यवस्थेंत फेरबदल करून, आपल्या राज्यामध्यें वसुलांच्या बाबतींत चांगली

सुधारणा केली. अकबर बादशाहाच्या कारकीर्दींत राजा तोडरमल ह्यानें जशी जमीनमहसुलामध्यें सुधारणा केली, त्याप्रमाणें मलिकअंबरनें महाराष्ट्रामध्यें वसुली पद्धतींत सुधारणा केली. त्या योगानें सर्व प्रजा सुखी झाली, व राज्याची चांगली भरभराट झाली. युद्धप्रसंग चालू असलेल्या अस्वस्थतेच्या काळामध्यें जमीनमहसुलासारख्या राज्यव्यवस्थेच्या अंतर्भागामध्यें मलिकअंबरास लक्ष घालितां आलें, हीच मोठी आश्चर्याची गोष्ट समजली पाहिजे.

मलिकअंबरानें वसूलपद्धतीमध्यें जी सुधारणा केली, तिच्यावर स्वतंत्र निबंध लिहितां येईल इतकी ती महत्त्वाची आहे. तोडरमल ह्यानें, गुजराथ व बंगाल वगैरे सुपीक प्रांतांमध्यें जमिनीची पहाणी करून, तिच्या मगदुराप्रमाणें धारा बसविण्याची जी योजना केली, तिचेंच अंशतः अनुकरण करून मलिकअंबरनें प्रथम जमिनीची पहाणी करविली. बागायत व जिरायत असे जमिनीचे दोन भाग ठरवून, त्यांत पुन्हां अव्वल, दुम, सीम, चारसीम अशी प्रतवारी ठरविली. नंतर त्यानें जमिनीच्या उत्पन्नाप्रमाणें $\frac{2}{5}$ हिस्सा धान्यरूपानें सरकारांत वसूल घेण्याचें ठरविलें. त्याचप्रमाणें प्राचीन ग्रामसंस्थेचें पुनरुज्जीवन केलें. पाटील कुळकर्णी ह्यांचीं व इतर ग्रामाधिकाऱ्यांचीं वतनें वंशपरंपरेचीं केलीं. अशा रीतीनें सुधारणा करून त्यानें प्रजेवरील जुलूमजबरदस्ती बंद केली. नंतर १६१४ च्या पुढें, त्यानें धान्यरूपानें सरकारसारा घेण्याची पद्धति कांहीं ठिकाणीं बंद करून, उत्पन्नाच्या मानानें $\frac{1}{3}$ नगद वसूल घेण्याचा प्रघात सुरू केला. मलिकअंबरानें तोडरमलप्रमाणें कायमची धारेबंदी केली नाहीं; परंतु उत्पन्नाच्या मानावर वसुलाचें प्रमाण अवलंबून ठेविलें. तेणेंकरून त्याची पद्धति लोकप्रिय झाली, व लढाईचा खर्च वजा जाऊनही त्याच्या खजिन्याची स्थिति सदोदित समाधानकारक राहिली, आणि प्रजा सधन व सुखी झाली. ही स्थिति कोणत्याही राज्यकर्त्यास भूषणावहच होय.

मलिकअंबराच्या योग्यतेसंबंधानें इंग्रज इतिहासकारांनीं अनुकूल उद्गार काढिले आहेत व त्याच्या वसूलपद्धतीचीही फार फार प्रशंसा केली आहे. मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफ साहेब लिहितातः—"मलिकअंबरानें दौलताबादेजवळ खडकी येथें आपली राजधानी संस्थापित केली, व तेथें कित्येक सुंदर राजवाडे बांधिले. मोंगल सैन्याचा वारंवार पराभव केला व अहमदनगरचा किल्ला व वऱ्हाडांतील कांहीं प्रांत परत जिंकून घेतले. तो नेहमीं युद्धामध्यें गुंतलेला असे, तथापि त्या थोर पुरुषास शांततेच्या कालांतील गोष्टी व वसुली राज्यसुधारणा करण्यास फुरसत मिळाली. 'त्यामुळें त्याचें नांव सुप्रसिद्ध *योद्धा यापेक्षां उत्तम राज्यकर्ता ह्या नात्यानें प्रत्येक गांवीं अधिक पूज्य होऊन*

राहिलें आहे. त्यानें मुख्यत्वेंकरून मक्त्याच्या वसुलाची पद्धति बंद केली व सर्व व्यवस्था ब्राह्मण लोकांच्या हातीं देऊन त्यांच्यावर मुसलमान अंमलदारांची देखरेख ठेविली. गांवकामदाराच्या पद्धतीचा ऱ्हास झाला होता, तिचें त्यानें पुनरुज्जीवन केलें; आणि जमिनीच्या उत्पन्नाच्या प्रमाणावर नेमस्त आकार बसवून, धान्यरूपानें सारा घेण्याची पद्धति सुरू केली. नंतर कांहीं वर्षांचा अनुभव पाहिल्यानंतर, जमिनीच्या प्रतिवार्षिक उत्पन्नावर द्रव्यरूपानें सारा घेण्याची रीत चालू केली. ह्या कारणामुळें त्याच्या ताब्यांतील मुलुखाची भरभराट झाली व लोकवस्ती वाढली; आणि राज्याचा खर्च मोठा होता, तरी उत्पन्नाचें मान नेहमीं भरपूर राहिलें." ह्याप्रमाणें दुसऱ्याही लेखकाचे अभिप्राय आहेत.*

मलिकअंबराच्या योग्यतेबद्दल मुसलमान इतिहासकारांनीही प्रशंसापर उल्लेख केले आहेत. जहांगीरनाम्यामध्यें लिहिलें आहे:—"युद्धकला, सेनापतित्व, व्यवहारज्ञान आणि राज्यशासन ह्यांमध्यें मलिकअंबरच्या तोडीचा दुसरा कोणीही माणूस नाहीं. त्याला दक्षिणी लोकांची लढाईची पद्धति 'कज्झाकी' [predatory warfare] चांगली माहीत होती. तिला मराठी भाषेंत 'बर्गेगिरी'

*पुण्याचे कलेक्टर मि. एच् टी. राबर्टसन ह्यांनी ता १ मे इ स. १८२० रोजी लिहिलेल्या रिपोर्टांत मलिकअंबरासंबंधानें पुढील उद्गार काढिले आहेत:—

"Mullik Umber was as great a warrior as a statesman and successfully opposed the Moguls during the whole of Jehangeer's reign, and prevented them from recapturing the eastern districts which he had recovered on the death of Akbar in 1605 His name is preserved in this part of the Deccan as the benefactor of the people in his time while his wisdom is the theme of the legends of the country He is said to have fixed the rent of land, to have established the Bullootees and to have benefitted the country by other wise regulations In a Mahratta legend which narrates events that occurred about the year 1618 he is stated to have doubled the revenues of Government at the same time he improved the condition of the people His country became so flourishing that we are not surprised to find him described to be the soul by which the princes of the Deccan were kept together to oppose the invasion of the Imperialists in 1616, nor that when he was deserted by his confederates, he stood out alone, and preserved in a great battle near Asseeghei, in which he himself was wounded the independence of the Deccan —*East India House Papers* Vol III Page 409

जनरल ब्रिग्ज ह्यांनीं लिहिलें आहे:—"The justice and wisdom of the Government of Mullik Ambur have become proverbial in the Deccan He appears to have been the most enlightened financier of whom we read in the Indian history."—*Briggs' Ferishta* Vol III. Page 320

अशी संज्ञा आहे. त्यानें दंगेखोर लोकांना दाबामध्यें ठेविलें, आणि शेवटपर्यंत आपला मोठा दर्जा कायम राखून, सन्मानानें आपल्या कारकीर्दीची इतिश्री केली. इतिहासामध्यें एक हबशी गुलाम एवढ्या मोठ्या पदावर चढल्याचें दुसरें उदाहरण नाहीं."

असो. मलिकअंबर ह्याची कारकीर्द विशेष यशस्वी होण्याचें कारण त्याची न्यायबुद्धि, सर्व जातींविषयीं समता, परधर्माविषयीं सहिष्णुता, आणि प्रजेविषयीं प्रेमभाव हेच मुख्य गुण होत. त्यानें हिंदुमुसलमानांविषयीं केव्हांही भेदबुद्धि मनांत आणिली नाहीं. हिंदूंच्या देवस्थानांचें त्यानें रक्षण केलें व त्यांचीं उत्पन्नें चालविलीं. चिंचवडच्या मोरया देवास त्यानें नवीन इनाम करून दिलें. त्याचप्रमाणें त्यानें, ब्राह्मण, मराठे वगैरे कुशाग्रबुद्धीच्या लोकांस उत्तेजन दिलें, आणि त्यांच्या कर्तबगारीप्रमाणें त्यांना राज्यकारभारांत मोठमोठ्या जागा दिल्या. तेणेंकरून मलिकअंबराची कारकीर्द महाराष्ट्रामध्यें फार लोकप्रिय झाली, व त्याचें नांव दक्षिणेंतील उत्तम राज्यकर्त्या मुत्सद्यांमध्यें चिरकाल दाखल झालें. मलिकअंबरच्या कारकीर्दीतील जुने महजर व इतर जुने कागदपत्र अद्यापि उपलब्ध झाले नाहींत. ते प्रसिद्ध झाले तर त्याच्या चरित्रावर अधिक प्रकाश पडेल ह्यांत शंका नाहीं.

मलिकअंबर ह्यास फत्तेखान व चंगीजखान असे दोन मुलगे होते. मलिकअंबरच्या मृत्यूनंतर फत्तेखानाच्या हातीं निजामशाहीचीं सूत्रें कांहीं दिवस होतीं. परंतु त्यानें शहाजी भोंसल्याशीं फाटफूट केल्यामुळें निजामशाही दरबारांत दुफळी झाली व फत्तेखानाची सत्ता लौकरच संपुष्टांत आली. कांहीं दिवस मूर्तिजा निजामशाहाच्या हमीदखाननामक दिवाणानें त्यास दौलताबादच्या किल्ल्यांत कैदेंत टाकिलें. पुढें तेथून त्याची सुटका झाल्यानंतर, त्यानें मूर्तिजा निजामशाहास उलट प्रतिबंधांत टाकिलें; आणि तेथेंच त्यास विषप्रयोग करून स्वर्गाचा मार्ग दाखविला. ज्या बादशाहास मलिकअंबरनें राज्यारूढ केलें व ज्याच्या नांवानें निजामशाही नांवारूपास आणिली, त्याचा त्याच्याच मुलानें दौलताबादेच्या किल्ल्यांत अंत केला. पुढें फत्तेखानानें मूर्तिजा निजामशाहाच्या दहा वर्षांच्या मुलांस हुसेन मूर्तिजा असें नांव देऊन निजामशाहीचा बादशाहा केलें. परंतु दौलताबादेवर लौकरच मोंगल सैन्य येऊन त्यानें त्या बादशाहास कैद केलें, व दौलताबादेचा प्रचंड किल्ला जिंकून घेतला. फत्तेखान मोंगलांस शरण गेला व दोन लक्ष रुपये तैनात घेऊन दिल्लीपतीचा गुलाम झाला. त्यास पुढें वेड लागलें म्हणून त्यास मोंगल सरदारांनीं लाहोर येथें नेऊन ठेविलें. तेथें त्याचा कांहीं वर्षांनीं शेवट झाला. मलिकअंब-

रचा दुसरा मुलगा चंगीजखान हाही बादशाही लष्करास सामील होऊन दिल्लीपतीचा नौकर झाला. त्यास दोन हजार स्वारांची मनसब व अमीर मनसूर-खान अशी पदवी मिळाली. तात्पर्य, मलिकअंबरनें जी निजामशाही पुनः निर्माण केली, ती त्याच्याच मुलांनीं सार्वभौम मोंगल बादशाहाच्या चरणारविंदीं अर्पण केली.

मलिकअंबर इ. स. १६२६ मध्यें मृत्यु पावल्यानंतर निजामशाहीची लवकरच इतिश्री झाली. इ. स. १६२९ मध्यें शहाजहान व आदिलशाहा ह्यांनीं निजाम-शाही प्रांत वांटून घेतला. मलिकअंबरची राजधानी खडकी हिचें रूपांतर झालें. कारण, पुढें औरंगजेबानें तिला 'औरंगाबाद' असें नांव दिलें. तथापि, मलिकअंबरची कीर्ति मात्र इतिहासांत आहे तशीच कायम आहे. तिचें कधीं रूपांतर होणार नाहीं. मलिकअंबरासारखे न्यायी, प्रजापालनदक्ष आणि राज-कारणकुशल मुत्सद्दी कोणत्याही राष्ट्रास ललामभूत होतील ह्यांत शंका नाहीं.



# प्राचीन मराठे सरदार.



## १ राजे महाडीक.

मराठ्यांच्या इतिहासामध्यें, प्राचीन – ह्मणजे मराठ्यांचें राज्य संस्थापित होण्यापूर्वीं उदय पावलेलीं – अशी जीं थोर व प्रतिष्ठित मराठ्यांचीं घराणीं प्रसिद्ध आहेत, त्यांमध्यें १ जाधव, २ निंबाळकर, ३ शिर्के, ४ मोहिते, ५ माने, ६ डफळे, ७ मोरे, ८ घोरपडे, ९ घाटगे हीं प्रमुख असून ह्यांची थोडीशी माहिती प्रसिद्ध झालेली आहे. ह्या घराण्यांप्रमाणेंच राजे महाडीक ह्यांचें घराणें फार जुनें व सन्मान्य आहे.* परंतु त्याचा इतिहास प्रसिद्ध नसल्यामुळें त्याची योग्यता लोकांस असावी तशी माहीत नाहीं. ज्याप्रमाणें निंबाळकर, जाधव, शिर्के व मोहिते ह्यांचा भोंसल्यांच्या घराण्याशीं शरीरसंबंध आहे, त्याप्रमाणेंच – किंबहुना अधिक – महाडिकांचा भोंसल्यांच्या राजघराण्याशीं सन्निकट संबंध आहे. परंतु ह्या घराण्याची माहिती आजपर्यंत अप्रसिद्ध राहिल्यामुळें, ह्या घराण्याची थोरवी, त्यांतील पुरुषांचे शौर्यपराक्रम, त्यांच्या कारकीर्दीचे वृत्तांत, प्रायशः लुप्त झाले आहेत. ह्या घराण्यांतील कागदपत्रही भाऊबंदांच्या तंट्यांमुळें व इतर अनेक कारणांमुळें बहुतेक नष्ट झाले आहेत. तथापि, जे कांहीं थोडेसे उपलब्ध झाले आहेत, त्यांच्या आधारानें ह्या घराण्याचा संक्षिप्त वृत्तांत ह्या लेखांत सादर केला आहे. तो वाचून ह्या घराण्याच्या कागदपत्रांचा अधिक तलास लागला व कोणी जिज्ञासूंनें ते आमच्याकडे पाठवून दिले, तर ह्या घराण्याची सविस्तर हकीकत मागाहून प्रसिद्ध करितां येईल.*

महाडीक ह्यांच्या घराण्याची उत्पत्ति व संस्थापना केव्हां झाली, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. त्यांच्या घराण्याची जी एक वंशावळ उपलब्ध झाली आहे, तिच्यामध्यें ह्या घराण्याची पूर्वीची माहिती पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहेः— "महाराष्ट्र क्षत्रिय ज्ञातींपैकीं वंशावळ. सूर्यवंशांतील राजे महाडीक कसबे तारळें प्रा। कराड यांचा तपशीलः—सूर्यवंशीं कुश राजा जहाला. तेव्हां कछवाय असे उपरांतिक

*प्रस्तुतचा लेख तारळें येथील इनामदार श्री. रुद्राजी राजे महाडीक ह्यांनीं दिलेल्या कागदपत्रांच्या आधारानें तयार केला आहे. रुद्राजी राजे ह्यांनीं आपल्या घराण्याचा इतिहास प्रसिद्ध होण्यासाठीं जी कळकळ दाखविली, ती प्रशंसनीय असून त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे.

म्हणों लागले. त्यांची राहावयाची जागा हिंदुस्थानांत असे. त्या कुलास गोत्र हरित, प्रवर तीन. तो वंश प्रसिद्ध आहे. मूळ पुरुषापासून आजपर्यंत वंशावळीचा तपशील ल्याहावा, परंतु कोणते घराण्यांतील? हिंदुस्थानांत जीं घराणीं या वंशांतील आहेत, तेथें शोध. लागल्यासारिखा ल्याहावयाचा. नंतर कांहींएक दिवसांनीं कारणपरत्वें ते वंशज दक्षणेंत येऊन, आपल्या स्वपराक्रमानें बादषाहींत वागत होते. मग पुढें, कांहीं कारणास्तव कोंकणप्रांतीं गेले. तेथें महाडचें वतन देशमुखी व खेडबंदरची मोकदमी साध्य केली. तेव्हांपासून महाडीक असें उपनांव म्हणों लागले. उपरांतिक आपले पराक्रमानें इनाम व जहागिरी व वतनें मिळवून इकडेस राहिले. तेव्हां इकडील गांवचीं आडनांवें पडलीं. ते वेळेस मुसलमानी बादषायत होती. त्यांनींही पूर्वींच्या सांप्रदायानरूप राजे ह्मणोन पत्रें लिहिलीं होतीं. पुढें महाराज छत्रपति यांचींही त्याजप्रमाणेंच आजपर्यंत येतात. त्यास, महाडचें वतन वगैरे साध्य केल्यावर महाडचे वतनाबद्दल पातशाहा जातिभ्रष्ट करूं लागले. सबब, इकडेस मुधोजी राजे आले. त्याजपासून वंशावळ." ही माहिती श्रीमंत छत्रपति प्रतापसिंह राजे ( इ. स. १८१९–१८३९ ) ह्यांच्या कारकीर्दींत तयार झालेल्या वंशावळींत लिहिलेली आहे. अर्थात् अस्सल कागदपत्र उपलब्ध झाल्यावांचून ह्या घराण्याच्या प्रारंभाचा साधार इतिहास सिद्ध करितां येणार नाहीं. तथापि, वरील माहितीवरून महाडीक हें घराणें प्राचीन असून, तें उत्तर हिंदुस्थानांतून आलेल्या रजपूत क्षत्रियांपैकीं एक आहे, असें दिसून येतें.

महाडीक हें नांव महाड ह्या नांवावरून पडलें, असें महाडिकांच्या वंशवृक्षामध्यें लिहिलेलें आहे. तें सयुक्तिक मानण्यास हरकत नाहीं. महाडीक ह्यांजकडे महाडची देशमुखी व खेडबंदरची मोकदमी होती असें वंशावळीमध्यें नमूद केलें आहे. परंतु त्या संबंधाचीं अस्सल सनदापत्रें अद्यापि उपलब्ध न झाल्यामुळें त्याबद्दलची नक्की माहिती समजत नाहीं. तथापि एवढी गोष्ट निश्चित आहे कीं, महाड वगैरे कोंकणप्रांतामध्यें, सतराव्या शतकाच्या प्रारंभीं, महाडीक ह्यांचा विजापुरच्या बादशाहाच्या सार्वभौमत्वाखालीं बराच अंमल असला पाहिजे. निजामशाही कोंकण व आदिलशाही कोंकण ह्मणून कोंकणप्रांताचे जे दोन विभाग होते, त्यांमध्यें महाडीक हे आदिलशाही कोंकणामध्यें एक प्रमुख सरदार होते, असें मानण्यास हरकत नाहीं.

महाडिकांच्या वंशावळीमध्यें मूळ पुरुषाचें नांव मुधोजी असें दिलें आहे. त्यास कृष्णाजी, कान्होजी, रुद्राजी आणि प्रतापराव असे चार मुलगे होते. ह्यांपैकीं कृष्णाजी हा इ. स. १६१४ मध्यें मृत्यु पावल्याचा खात्रीलायक आधार

सांपडतो. कृष्णाजी राजे मृत्यु पावल्यानंतर बंदर मुस्तफाबाद ह्मणजे दाभोळ येथील हवालदार महमद रजाखान ह्यानें विजापुरच्या बादशाहास विनंति केल्यावरून, कृष्णाजी राजे ह्यांचा मोकासा, सरंजाम व इनाम वगैरे त्यांचे बंधु कान्होजी राजे ह्यांस देण्यांत आला. परंतु, ते आपल्या बंधूच्या शोकांत देशीं असल्यामुळे, बादशाही सनद त्यांचे बंधु रुद्राजी प्रतापराव रायानराव ह्यांस देण्यांत आली. ही सनद फारशी भाषेत असून हिचें साल, हिजरी सन १०२३ ह्मणजे इ. स. १६१४ हें आहे. ह्या सनदेचा सारांश येणेंप्रमाणेः—

"आज्ञापत्र सादर जालें. आंके मोकदम-उल-इमसाल, रुद्राजी प्रतापराव रायानरावः— पादशाहाचे मेहेरबानीनें तुह्मी खुशाल असां. दरींविला आगा महमद रजा हवालदार मुस्तफाबादचे बंदरचे हवालदार यांचे विनंतिपत्रावरून जाहीर जालें कीं, कृष्णाजी राजे मृत्यु पावले, आणि हवालदार मजकूर यांणीं विनंति केली कीं, मोकदम-उल-इमसाल कान्होजी राजे, कृष्णाजी राजे यांचे बंधु, यांसी कृष्णाजी यांचे जाग्यावर कायम व्हावें. याजकरितां सदहू अर्जाप्रमाणें कान्होजी राजे मोकदम-उल-इमसाल यांजला कृष्णाजी राजे यांचे जाग्यावर नेमले असेत. मोकास व इस्तकामत ह्मणजे सरंजामबाब व इनाम कृष्णाजी राजे यांचें, कान्होजी राजे यांजला, मेहेरबान होऊन, सदहू मोकासा व जहागीर व इनाम दिल्हा आहे. परंतु कान्होजी राजे आपले भावाचे सुतकांत आहेत. ह्मणून जरूर आहे कीं, मोकदम-उल-इमसाल [ह्यांनीं] बंदरमजकूरची हद्द व सरहद्द वगैरे वाजवी रीतीनें बंदोबस्त राखून काम करावें; आणि सरहद्दीचे बंदोबस्तांत सुस्ती न करावी. तुमची सर्फराजी होईल. ता. २८ माहे जमादिलावल सन १०२३ हिजरी."

ह्या सनदेवरून महाडीक हें घराणें इ. स. १६१४ पूर्वी उदयास आलें असून, त्यांतील पुरुषाकडे दाभोळ बंदरची मोकदमी होती हें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें विजापुरच्या बादशाहाकडून त्यांस 'राजे' हा किताब असून 'प्रतापराव,' 'रायानराव' अशा पदव्याही मिळाल्या होत्या, असें दिसून येतें.

कान्होजी राजे व रुद्राजी राजे ह्यांच्या कारकीर्दीची माहिती उपलब्ध नाहीं. तथापि, कोंकणप्रांतामध्यें आपल्या सत्तेच्या जोरावर पुंडावे करून विजापुरच्या आदिलशाही अंमलास त्रास देणाऱ्या गुजर, मामुलकर, मोहिते ह्या मराठे सरदारांमध्यें महाडिकांचें नांवही प्रसिद्ध आहे. जावळीच्या चंद्रराव मोऱ्यानें ह्यांना नतिजा पोहोंचविण्याचा बराच प्रयत्न केला. तथापि, हें घराणें आपली सत्ता कायम ठेवून राहिलें होतें. इ. स. १६४८ पासून शिवाजी राजे प्रबल होऊन त्यांनीं महाराष्ट्रराज्य संस्थापन केलें, त्यांस ह्या घराण्यानें चांगली मदत केली. त्यावरून शिवाजीचें ह्या घराण्यावर प्रेम जडलें व त्यानें पुढें त्याशीं शरीरसंबंध केला.

कान्होजी व रुद्राजी ह्यांपैकीं कान्होजी तारळ्यास येऊन राहिले व रुद्राजी निवरीस गेले. कान्होजी राजे ह्यांजकडे विजापुरची सरदारी चालू होती. ते इ. स. १६५० सुमारास मृत्यु पावले. त्यास परसोजी ह्या नांवाचा पुत्र होता. त्यास पुढें विजापुर दरबारांतून सरदारी मिळाली. परंतु तो अंतस्थ रीतीनें शिवाजीस अनुकूळ असून त्यास मदत करितो, असा त्याजवर आरोप आला. ह्मणून विजापुरच्या बादशाहाची त्यावर गैरमर्जी झाली. तेव्हां तो कर्नाटकांत शहाजी राजे ह्यांच्या आश्रयास गेला. तिकडेच तो मृत्यु पावला. त्यास सात पुत्र होते. त्यांपैकीं वडील हरजी हा फार पराक्रमी निघाला. त्यानें कर्नाटकांत अनेक ठिकाणीं आपलें शौर्य दाखवून शहाजी राजे ह्यांची मर्जी प्रसन्न करून सोडिली. ज्या वेळीं इ. स. १६६२ मध्यें शहाजी राजे शिवाजी महाराजांस भेटण्यासाठीं पुणें प्रांतीं आले, त्या वेळीं त्यांनीं हरजी महाडीक ह्यांस बरोबर आणिलें होतें. त्यांजवर शिवाजी महाराज ह्यांचें विशेष प्रेम जडलें व त्यांनीं त्यांस आपली मुलगी अंबिकाबाई ही अर्पण केली. हें लग्न इ. स. १६६८ च्या सुमारास झालें असावें असें दिसतें. शिवाजी महाराजांच्या निंबाळकरांच्या घरीं दिलेली सखूबाई व शिर्के ह्यांच्या घरीं दिलेली राजकुंवरबाई अशा दोन मुलींचीं नांवें नवीन कागदपत्रांच्या आधारानें प्रसिद्ध झालीं आहेत. त्याप्रमाणें अंबिकाबाई हिचें नांव महाडिकांच्या कागदपत्रांवरून उपलब्ध झालें आहे. हरजी राजे महाडीक हे शिवाजी महाराजांचे जांवई होत. हे, कर्नाटकांतील शहाजी राजे ह्यांच्या जहागिरीचे मुख्य व्यवस्थापक व कारभारी, रघुनाथ नारायण हणमंते ह्यांच्या जवळ राहून, तिकडील प्रांताचा बंदोबस्त करीत असत. शिवाजी महाराजांनीं इ. स. १६७७ सालीं कर्नाटकप्रांतावर स्वारी केली, त्या वेळीं त्या स्वारीमध्यें संताजी राजे ह्यांच्याबरोबर हरजी राजे हे होते. ह्यांच्या संबंधानें कागदपत्र प्रसिद्ध होतील, त्या वेळीं ह्यांची अधिक माहिती प्रसिद्ध होईल.

हरजी राजे हे कर्नाटकामध्यें राहून तिकडील राज्यकारभारामध्यें चांगले तरबेज झाले होते. शिवाजी महाराज मृत्यु पावल्यानंतर ते सहकुटुंब महाराष्ट्रांत आले असें दिसतें. छत्रपति संभाजी महाराज सिंहासनारूढ झाले, त्या वेळीं हरजी राजे महाडीक, गणोजी राजे शिर्के व महादाजी निंबाळकर हे त्यांचे तिन्ही मेहुणे हजर होते. संभाजी महाराज ह्यांनीं शिवाजीचे प्रधान मोरोपंत पिंगळे ह्यांस कैद केलें होतें, व त्यांच्या घरावर चौक्या बसविल्या होत्या. त्या वेळीं ह्याच तिन्ही सरदारांनीं, "साहेब सिंहासनारूढ होणार, आणि प्रधान ह्यांचे घरीं चौक्या; हें विहित नाहीं!" असें संभाजी महाराजांस स्पष्टपणें सांगितलें व चौक्या उठविल्या. ह्यावरून हरजी राजे व दुसरे सरदार ह्यांची निस्पृहता व्यक्त होते.

संभाजी महाराज राज्यारूढ झाल्यानंतर त्यांनीं शिवाजी महाराजांच्या वेळच्या जुन्या राज्यव्यवस्थेंत फेरबद्दल केला, व जुन्या स्वामिनिष्ठ व माहितगार सेवक लोकांस कामावरून दूर केलें. त्यामुळें मराठी राज्यामध्यें मोठा अनर्थ व गोंधळ उडाला. ही शोचनीय स्थिति ऐकून, मराठी राज्याचे निस्सीम अभिमानी व शिवाजीचे परम विश्वासू सेवक रघुनाथ नारायण हणमंते हे, इ. स. १६८१ सालीं, संभाजीची भेट घेण्याकरितां कर्नाटकांतून रायगड प्रांतीं आले. संभाजी महाराजांनीं त्यांची बिरवाडी येथें मोठ्या समारंभानें भेट घेतली. ह्या भेटीमध्यें रघुनाथपंतांनीं संभाजी महाराजांच्या दुर्वर्तनाबद्दल स्पष्टपणें निषेध करून, राज्यकारभारासंबंधानें अतिशय मूल्यवान् व हितकर असा उपदेश केला. ह्या मजलसीमध्यें हरजी राजे महाडीक हे हजर होते, असें चिटणीस ह्यांच्या बखरीमध्यें लिहिलें आहे.* परंतु ग्रांडटफ साहेबांनीं आपल्या इतिहासामध्यें "रघुनाथ नारायण हणमंते ह्यांनीं कर्नाटक प्रांताचा सर्व बंदोबस्त आपल्या पश्चात् हरजी राजे महाडीक ह्यांचेकडे सोंपवून ते दक्षिणेंत आले," असा उल्लेख केला आहे.† असो.

रघुनाथ नारायण हणमंते हे संभाजी महाराजांची भेट घेऊन परत चंदी प्रांतीं गेले; परंतु त्यांचा रस्त्यामध्येंच अंत झाला. तेव्हां संभाजी राजे ह्यांनीं हरजी राजे महाडीक हे कर्नाटक प्रांताचे पूर्ण माहितगार, आपले आप्तसंबंधी, व राज्यकारभारांत दक्ष असे जांणून, त्यांची चंदी प्रांताच्या सुभेदारीवर योजना केली, व त्यांच्या हाताखालीं मोरोपंत पिंगळ्यांचे चिरंजीव निळो मोरेश्वर ह्यांस मुतालीक करून पाठविलें; व त्यांचे बरोबर बाळाजी आवजी ह्यांचे चिरंजीव निळो बल्लाळ चिटणीस ह्यांचीही नेमणूक केली. ज्या अर्थीं कर्नाटक प्रांतांतल्या सर्व मराठी राज्याचा बंदोबस्त, रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचे पश्चात् हरजी राजे महाडीक ह्यांच्यावर सोंपविण्यांत आला, त्या अर्थीं हरजी राजे महाडीक ह्यांची योग्यता त्या वेळीं महाराष्ट्रांत किती होती, हें निराळें सांगावयास नकोच. हरजी राजे हे इ. स. १६८१ पासून इ. स. १६९४ पर्यंत चंदी प्रांताचे मुख्य सुभेदार होते, असें साधारणपणें मानण्यास हरकत नाहीं.

हरजी राजे महाडीक ह्यांनीं कर्नाटकचा बंदोबस्त चांगल्या रीतीनें ठेविला व मुसलमानांचा प्रवेश मराठी राज्यामध्यें होऊं दिला नाहीं. त्याचप्रमाणें कर्नाटकांतील पाळेगार व जमीनदार ह्यांना आपल्या ताब्यांत ठेवून त्यांना बिलकूल गडबड करूं दिली नाहीं. तथापि, इ. स. १६८६ मध्यें औरंगजेबानें विजापुरचें राज्य

* मल्हार रामरावकृत संभाजीराजे ह्यांचें चरित्र, पृष्ठ १२.

† Grant Duff's History of the Marathas, Page 137.

खालसा केलें व इ. स. १६८७ मध्यें गोवळकोंड्याचें राज्य हस्तगत केलें. त्यामुळें कर्नाटकांतील पाळेगारांस गडबड करण्यास संधि मिळाली. अशा प्रसंगीं हरजी राजे ह्यांच्यासारखा दूरदर्शी व शहाणा मुत्सद्दी कर्नाटकांत असल्यामुळें हिंदु पाळेगारांस चांगला नतिजा पोहोंचून मराठ्यांच्या प्रांतांचें संरक्षण झालें.

इकडे औरंगजेबानें, गोवळकोंडा व विजापूर हीं राज्यें घेतल्यानंतर, कर्नाटकांत आपला अंमल बसविण्यासाठीं मोंगल सैन्य रवाना केलें. त्या प्रसंगीं संभाजीनें मोरोपंत पिंगळ्यांचे बंधु केसो त्रिमल व संताजी घोरपडे ह्यांची दक्षिणप्रांतीं रवानगी केली. ह्या सैन्यानें हरजी राजे महाडीक ह्यांस सामील होऊन उत्तर कर्नाटकांतील प्रांत जिंकून घ्यावे, शहाजीच्या जहागिरीचा वसूल घ्यावा, आणि तिकडील मोंगल सैन्यास शह द्यावा, म्हणजे महाराष्ट्रांतील मोंगल सैन्याचें लक्ष तिकडे वेधलें जाईल व मराठ्यांस आपली सत्ता संरक्षण करितां येईल, असा मुत्सद्दीपणाचा पेंच होता. त्याप्रमाणें केसोपंत पिंगळे आपल्या निवडक सैन्यासह म्हैसूर प्रांताच्या बाजूनें कर्नाटकांत उतरून चंदीस पोहोंचले. परंतु तेथें त्यांचा व त्यांचा पुतण्या निळोपंत ह्यांचा बेबनाव झाल्यामुळें त्यांनीं हरजी राजे ह्यांच्या विरुद्ध संभाजी महाराजांस कांहीं गोष्टी कळविल्या. त्या वेळीं संभाजी राजे ह्यांनीं, हरजी राजे औरंगजेबास सामील होतील ह्या भीतीनें, चंदीचा किल्ला त्यांजकडून घेण्याबद्दल केसोपंतांस गुप्त हुकूम सोडिला. त्याप्रमाणें केसोपंतांनीं हरजी राजे ह्यांस उघड रीतीनें चंदीच्या किल्ल्याची मागणी केली. परंतु ह्या वेळीं हरजी राजे ह्यांनीं, आपसांतील मत्सर व प्रतिस्पर्धा ह्यांची बाधा राष्ट्रकार्यास होऊं नये म्हणून मोठ्या शहाणपणानें केसोपंतांची मनधरणी केली, व त्यांचें व आपलें सैन्य एकत्र करून कर्नाटकांतील पाळेगारांवर चाल केली. ह्या संयुक्त सैन्यानें पंधरा दिवसांमध्यें अर्काट, कांजीवरम् व पुन्नमाली हे प्रांत जिंकून घेतले व ह्या स्वारीचा चांगला फायदा घेतला. तात्पर्य, हरजीसारखा धोरणी व शहाणा मुत्सद्दी ह्या वेळीं कर्नाटकांत होता म्हणून चंदी प्रांतावरील मराठ्यांची सत्ता कायम राहिली, व तिचा पुढें राजाराम महाराजांस अत्यंत उपयोग झाला.*

* हरजी राजे महाडीक ह्यांच्याबद्दल 'मराठी रियासत'कारांनीं पुढील उद्गार काढिले आहेत, ते अगदीं यथार्थ आहेत:—"हरजी राजे हा मोठा धोरणी दिसतो. त्यानें कर्नाटकचा बंदोबस्त उत्तम केला. कपटभावानें स्वतःवर चालून आलेल्या केशवपंताकडून राष्ट्राची कामगिरी करवून राज्यवृद्धि केली. यांत शिवाजीचे उद्देश त्याच्या डोळ्यांपुढें एकसारखे होते. त्यानें तिकडील प्रदेशांत मोंगलांची डाळ शिजूं दिली नाहीं." पृ. ४२४.

इ. स. १६८९ सालीं छत्रपति संभाजी महाराज ह्यांचा औरंगजेब बादशाहानें वध केला व रायगड जिंकून मराठी राज्य पूर्णपणें रसातळास मिळविण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं महाराष्ट्रराज्याभिमानी चतुर मुत्सद्यांनीं राजाराम महाराजांस कर्नाटकांत चंदीच्या किल्ल्यावर जाण्याची सल्ला दिली, व औरंगजेबाच्या झपाट्यांतून त्यांची सुटका केली. चंदी मुक्कामीं हरजी राजे महाडीक हे मुख्य सुभेदार होतेच. त्यांनीं गुप्त बातमी येतांच, चंदी येथें महाराजांची उत्तम व्यवस्था केली. "महाडीक सर्व सलतनत घेऊन येऊन, महाराजांचें दर्शन घेऊन, सर्वांस मंगलस्नानें करून वस्त्राभरणें देऊन चंदीस घेऊन गेले. पोहोंचले. तेथें राजधानी व सर्व दौलत, इकडील दौलत जमली ऐशीच होती, ते करूं लागले." ह्या चंदीच्या राजकारणांत हरजी राजे महाडीक ह्यांचें अपूर्व साह्य छत्रपति राजाराम महाराज ह्यांस झालें, ह्यांत शंका नाहीं.

राजाराम महाराज व प्रमुख मराठे सरदार चंदीस गेल्यानंतर त्यांनीं तेथें नवीन गादी संस्थापित केली, व महाराष्ट्रराज्यकारभार पूर्ववत् चालू केला. ह्या वेळीं मोंगलांचीं व मराठ्यांचीं झालेलीं युद्धें व परस्परांच्या चढाओढी इतिहासांत प्रसिद्धच आहेत. राजाराम महाराज चंदीस गेल्यानंतर औरंगजेबानें झुल्पिकारखाननामक आपल्या नामांकित सरदारास चंदीचा किल्ला जिंकून घेण्याकरितां कर्नाटकांत पाठविलें. चंदीचा किल्ला फार बिकट व अजिंक्य असल्यामुळें तो त्यांस लवकर साध्य झाला नाहीं. झुल्पिकारखान व त्याचे सरदार ह्यांनीं त्यास इ. स. १६९० पासून इ. स. १६९४ पर्यंत चार वर्षें वेढा दिला. मराठ्यांच्या स्वाभिमान, वीरश्री, स्वार्थत्याग आणि धैर्य इत्यादि अद्वितीय गुणांमुळें मोंगल सैन्य हताश झालें. परंतु चंदीचा किल्ला हस्तगत होईना. तेव्हां औरंगजेब बादशाहानें आपला पुत्र कामबक्ष व आसदखान ह्यांची ह्या कामगिरीवर योजना केली. परंतु मोंगल सैन्यांत भेद होऊन त्यांचाच पराभव झाला. तेव्हां औरंगजेबानें पुनः झुल्पिकारखानाची योजना केली. अशा रीतीनें चंदीच्या किल्ल्यासभोंवतीं मोंगल सैन्याचा वेढा पडून त्यांनीं भगीरथ प्रयत्न केले, तथापि मराठ्यांनीं तो किल्ला मोंगलांस इ. स. १६९४ पर्यंत काबीज करूं दिला नाहीं. ह्या कामीं हरजी राजे ह्यांनीं आपल्या पराक्रमाची शर्थ केली, व त्यांनीं मोंगल सैन्याचे निकराचे हल्ले अनेक वेळां परत फिरविले. परंतु एका चकमकीमध्यें त्यांस तोफेचा गोळा लागून ते मृत्यु पावले. अशा रीतीनें मराठी राज्याची निस्सीम सेवा करण्यांत हरजी राजे ह्यांचा देह अर्पण झाला. परंतु ऐतिहासिक माहितीच्या अभावामुळें ह्या स्वामिनिष्ठ वीराचे शौर्यपराक्रम मात्र अगदींच अप्रसिद्ध राहिले, ही शोचनीय गोष्ट होय!

हरजी राजे मृत्यु पावल्यानंतर राजाराम महाराज गुप्त रीतीनें चंदीच्या किल्ल्यांतून निघून गेले. त्या वेळीं किल्ल्यामध्यें त्यांनीं हरजी राजे ह्यांचा फर्जंद ह्मणजे मुलगा ठेविला होता. ह्या मुलानें राजाराम महाराज गेल्यानंतर किल्ला लढविला, व महाराज कबिल्यासुद्धां गेल्यानंतर लोक हवालदिल झाले, सबब त्यानें खानाशीं तहाचें बोलणें लाविलें. पुढें तह झाला, व अखेर चैत्र शुद्ध १ शके १६१८ रोजीं चंदीचा किल्ला मोंगलांच्या ताब्यांत गेला.

हरजी राजे ह्यांस १ प्रतापजी, २ दुर्गोजी, ३ शंकराजी, ४ जयसिंग, ५ उदितासिंग, ६ सुभानजी व ७ गुणाजी असे सात मुलगे होते. ह्यांपैकीं दुर्गोजी हा चंदीस होता. शंकराजी हा शाहू महाराजांबरोबर औरंगजेब बादशाहाच्या प्रतिबंधांत राहिला, व बाकीचे तंजावराकडे गेले. प्रतापजीचें काय झालें तें समजत नाहीं.

दुर्गोजी व शंकराजी हे बापाप्रमाणें कर्ते निघाले, व त्यांनीं आपल्या पराक्रमानें लौकिक व जहागीर संपादन केली. परंतु ह्यांची शाहू महाराज दक्षिणेंत येईपर्यंतची चांगलीशी माहिती उपलब्ध होत नाहीं.

शंकराजी राजे हे शाहू महाराजांबरोबर दिल्लीस गेले. तेथें त्यांच्यावर औरंगजेब बादशाहाची मर्जी जडली व त्यानें शाहूची बहीण भवानीबाई हिजबरोबर शंकराजी राजे ह्यांचें लग्न लाविलें. हें लग्न दिल्ली येथेंच झालें. शंकराजी राजे हे मोंगलांचे लष्करांत असतांना, त्यांनीं औरंगजेब बादशाहास आपल्या अंगच्या शौर्य, धैर्य व समयसूचकता आदि गुणांनीं प्रसन्न करून सोडिलें. त्यामुळें औरंगजेब बादशाहानें त्यांना आपल्या सैन्यामध्यें एक लहानशी मनसब दिली, व पुढें त्यांस 'चारहजारी' असा किताब देऊन त्यांस ४००० स्वारांची तैनात दिली. एके ठिकाणीं ३००० स्वारांची तैनात दिली असा उल्लेख केलेला आहे. परंतु शंकराजी राजे ह्यांनीं औरंगजेबाच्या दरबारांत आपलें वर्चस्व स्थापन केलें, ह्यांत शंका नाहीं. शंकराजी राजे ह्यांचे जे फारशी कागदपत्र सांपडले आहेत, त्यांवर "शंकराजी इब्न हरजी महारीक बंदा-इ-बादशाहा अलमगीर" असा शिक्का आहे. असो. शंकराजी राजे महाडीक हे शाहू महाराजांचे अगोदर बादशाही लष्करांतून दक्षिणेंत आले. कर्नाटक प्रांतांमध्यें बादशाही सत्तेचें संरक्षण करण्याच्या निमित्तानें त्यांची अगोदर सुटका झाली असावी असें दिसतें. मुधोळ वगैरे प्रांतावर आपलें पूर्ण स्वामित्व स्थापन करावें ह्या उद्देशानें ह्या सन्मान्य मराठे सरदारांस अनुकूल करून घेऊन, औरंगजेबानें त्यांची दक्षिणेस रवानगी केली असावी असा तर्क आहे. कारण, औरंगजेबानें वजनदार व प्रतिष्ठित मराठे सरदार अनुकूल

करून घेऊन, महाराष्ट्रमंडळांत दुही पाडण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता. त्याप्रमाणें शंकराजी राजे हे त्यास बाह्यतः अनुकूल होऊन, शाहू महाराजांच्या सुटकेचा मार्ग सुलभ करण्यासाठीं अगोदर दक्षिणेंत आले असावेत. इकडे येऊन त्यांनीं काय काय राजकारणें केलीं, तीं समजत नाहींत. परंतु शाहू महाराजांच्या सुटकेच्या अगोदर ते दक्षिणेंत आले होते, एवढी गोष्ट निश्चित आहे.

ता. २० फेब्रुवारी इ. स. १७०७ रोजीं औरंगजेब बादशाहा मृत्यु पावल्यानंतर शाहू महाराज ह्यांची बादशाही कैदेंतून मुक्तता झाली, व ते इ. स. १७०८ मध्यें सातारा येथें येऊन राज्यारूढ झाले. सातार्‍यास येऊन शिवछत्रपतींचें सिंहासन प्राप्त करून घेण्यापूर्वी शाहू महाराजांस बरींच संकटें सोसावीं लागलीं व प्रतिपक्षाचे अडथळे दूर करावे लागले, हें इतिहासज्ञांस विदित आहेच. शाहू महाराज घाट चढोन कंडेवळित प्रांतांत आले. त्या वेळीं त्यांनीं शंकराजी राजे महाडीक ह्यांस पाठविलेलें पत्र उपलब्ध झालें आहे. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"राजश्री शंकराजी राजे महाडीक गोसावी यांसः—

ॐ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य प्रति राजश्री शाहुजी राजे छत्रपति उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन करणें विशेषः–पत्र पाठविलें तें प्र॥ होऊन वर्तमान साकल्य कळलें, व कृष्णाजीपंतीं मुखोद्गतें सविस्तर श्रुत केलें. त्यावरून भावार्थ अवगत जाला. महाराजांच्या योगें मोंगलाईत कसाला सोसून भाग्योदयाचा मार्ग लक्षीत होतों, ते मनोरथ ईश्वरें सिद्धीस नेले. परंतु आपला भोग सरला नाहीं जें, आपलें स्मरण होऊन पत्र न आलें; ह्मणून कितेक शब्द ठेऊन लिहिलें. तरी तुह्मां लोकांचें विस्मरण व्हावें ऐसा आमचा हेत नाहीं. या प्रांतें आलियावरी पत्रेंही पाठविलीं होतीं. तीं पावलीं नसतील तरी पावतील. तुमचा व स्वामींचा घरोबा व आप्तविषय कांहीं नवा नाहीं. राजश्री कैलासवासी स्वामी व राजश्री हरजीराजे यांजपासून पूर्वापर चालत आला आहे. तो विशेषेंकडून लिहिणें लागत नाहीं. मनेमन साक्ष आहे. सर्व पदार्थेंकरून तुमच्या ठाईं हेत पूर्ण आहे. तेथें उपरोध लि॥ काय आहे? याउपरी हें पत्र लिहिलें आहे. तरी आपण सर्वप्रकारेंकरून, तिळतुल्य दुसरा अर्थ चित्तांत न आणितां, आपला जो समुदाय असेल तो, व आपणांस कोणी काय पैगाम आले असतील त्यांस बोलावून, समागमें घेऊन आलें पाहिजे. तुह्मीं ज्यास जो निर्वाह करून कौल बोल द्याल, त्याप्रमाणें स्वामी निश्चयपूर्वक त्याचें चालवितील. अंतर होणार नाहीं. येविशीं सरदारांसही पत्र एकंदर पाठविलें आहे. तें दऊन त्या सकळांस समागमें घेऊन आलें पाहिजे. भेटीनंतर

हरजी राजे मृत्यु पावल्यानंतर राजाराम महाराज गुप्त रीतीनें चंदीच्या किल्ल्यांतून निघून गेले. त्या वेळीं किल्ल्यामध्यें त्यांनीं हरजी राजे ह्यांचा फर्जंद ह्मणजे मुलगा ठेविला होता. ह्या मुलानें राजाराम महाराज गेल्यानंतर किल्ला लढविला, व महाराज कबिल्यासुद्धां गेल्यानंतर लोक हवालदिल झाले, सबब त्यानें खानाशीं तहाचें बोलणें लाविलें. पुढें तह झाला, व अखेर चैत्र शुद्ध १ शके १६१८ रोजीं चंदीचा किल्ला मोंगलांच्या ताब्यांत गेला.

हरजी राजे ह्यांस १ प्रतापजी, २ दुर्गोजी, ३ शंकराजी, ४ जयसिंग, ५ उदितसिंग, ६ सुभानजी व ७ गुणाजी असे सात मुलगे होते. ह्यांपैकीं दुर्गोजी हा चंदीस होता. शंकराजी हा शाहू महाराजांबरोबर औरंगजेब बादशाहाच्या प्रतिबंधांत राहिला, व बाकीचे तंजावराकडे गेले. प्रतापजीचें काय झालें तें समजत नाहीं.

दुर्गोजी व शकराजी हे बापाप्रमाणें कर्ते निघाले, व त्यांनीं आपल्या पराक्रमानें लौकिक व जहागीर संपादन केली. परतु ह्यांची शाहू महाराज दक्षिणेंत येईपर्यंतची चांगलीशी माहिती उपलब्ध होत नाहीं.

शंकराजी राजे हे शाहू महाराजांबरोबर दिल्लीस गेले. तेथें त्यांच्यावर औरंगजेब बादशाहाची मर्जी जडली व त्यानें शाहूची बहीण भवानीबाई हिजबरोबर शंकराजी राजे ह्यांचें लग्न लाविलें. हें लग्न दिल्ली येथेंच झालें. शंकराजी राजे हे मोंगलांचे लष्करांत असतांना, त्यांनीं औरंगजेब बादशाहास आपल्या अंगच्या शौर्य, धैर्य व समयसूचकता आदि गुणांनीं प्रसन्न करून सोडिलें. त्यामुळें औरंगजेब बादशाहानें त्यांना आपल्या सैन्यामध्यें एक लहानशी मनसब दिली, व पुढें त्यांस 'चारहजारी' असा किताब देऊन त्यांस ४००० स्वारांची तैनात दिली. एके ठिकाणीं ३००० स्वारांची तैनात दिली असा उल्लेख केलेला आहे. परंतु शंकराजी राजे ह्यांनीं औरंगजेबाच्या दरबारांत आपलें वर्चस्व स्थापन केलें, ह्यांत शंका नाहीं. शंकराजी राजे ह्यांचे जे फारशी कागदपत्र सांपडले आहेत, त्यांवर "शंकराजी इब्न हरजी महारीक बंदा-इ-बादशाहा अलमगीर" असा शिक्का आहे. असो. शंकराजी राजे महाडीक हे शाहू महाराजांचे अगोदर बादशाही लष्करांतून दक्षिणेंत आले. कर्नाटक प्रांतांमध्यें बादशाही सत्तेचें संरक्षण करण्याच्या निमित्तानें त्यांची अगोदर सुटका झाली असावी असें दिसतें. मुधोळ वगैरे प्रांतावर आपलें पूर्ण स्वामित्व स्थापन करावें ह्या उद्देशानें ह्या सन्मान्य मराठे सरदारांस अनुकूल करून घेऊन, औरंगजेबानें त्याची दक्षिणेस रवानगी केली असावी असा तर्क आहे. कारण, औरंगजेबानें वजनदार व प्रतिष्ठित मराठे सरदार अनुकूल

करून घेऊन, महाराष्ट्रमंडळांत दुही पाडण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता. त्याप्रमाणें शंकराजी राजे हे त्यास बाह्यतः अनुकूल होऊन, शाहू महाराजांच्या सुटकेचा मार्ग सुलभ करण्यासाठीं अगोदर दक्षिणेंत आले असावेत. इकडे येऊन त्यांनीं काय काय राजकारणें केलीं, तीं समजत नाहींत. परंतु शाहू महाराजांच्या सुटकेच्या अगोदर ते दक्षिणेंत आले होते, एवढी गोष्ट निश्चित आहे.

ता. २० फेब्रुवारी इ. स. १७०७ रोजीं औरंगजेब बादशाहा मृत्यु पावल्यानंतर शाहू महाराज ह्यांची बादशाही कैदेंतून मुक्तता झाली, व ते इ. स. १७०८ मध्यें सातारा येथें येऊन राज्यारूढ झाले. साताऱ्यास येऊन शिवछत्रपतीचें सिंहासन प्राप्त करून घेण्यापूर्वी शाहू महाराजांस बरींच संकटें सोसावीं लागलीं व प्रतिपक्षाचे अडथळे दूर करावे लागले, हें इतिहासज्ञांस विदित आहेच. शाहू महाराज घाट चढोन कंडेवळित प्रांतांत आले. त्या वेळीं त्यांनीं शंकराजी राजे महाडीक ह्यांस पाठविलेलें पत्र उपलब्ध झालें आहे. हें पत्र येणेंप्रमाणेः—

श्री.

"राजश्री शंकराजी राजे महाडीक गोसावी यांसः--

६९ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य प्रति राजश्री शाहुजी राजे छत्रपति उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन करणें विशेषः—पत्र पाठविलें तें प्र॥ होऊन वर्तमान साकल्य कळलें, व कृष्णाजीपंतीं मुखोद्गतें सविस्तर श्रुत केलें. त्यावरून भावार्थ अवगत जाला. महाराजांच्या योगें मोंगलाईत कसाला सोसून भाग्योदयाचा मार्ग लक्षीत होतों, ते मनोरथ ईश्वरें सिद्धीस नेले. परंतु आपला भोग सरला नाहीं जें, आपलें स्मरण होऊन पत्र न आलें; ह्मणून कितेक शब्द ठेऊन लिहिलें. तरी तुह्मां लोकांचें विस्मरण व्हावें ऐसा आमचा हेत नाहीं. या प्रांतें आलियावरी पत्रेंही पाठविलीं होतीं. तीं पावलीं नसतील तरी पावतील. तुमचा व स्वामींचा घरोबा व आप्तविषय कांहीं नवा नाहीं. राजश्री कैलासवासी स्वामी व राजश्री हरजीराजे यांजपासून पूर्वापर चालत आला आहे. तो विशेषेंकडून लिहिणें लागत नाहीं. मनेमन साक्ष आहे. सर्व पदार्थेंकरून तुमच्या ठाईं हेत पूर्ण आहे. तेथें उपरोध लि॥ काय आहे? याउपरी हें पत्र लिहिलें आहे. तरी आपण सर्वप्रकारेंकरून, तिळतुल्य दुसरा अर्थ चित्तांत न आणितां, आपला जो समुदाय असेल तो, व आपणांस कोणी काय पैगाम आले असतील त्यांस बोलावून, समागमें घेऊन आलें पाहिजे. तुह्मीं ज्यास जो निर्वाह करून कौल बोल द्याल, त्याप्रमाणें स्वामी निश्चयपूर्वक त्याचें चालवितील. अंतर होणार नाहीं. येविशीं सरदारांसही पत्र एकंदर पाठविलें आहे. तें दऊन त्या सकळांस समागमें घेऊन आलें पाहिजे. भेटीनंतर

ज्याचा जो मनोदय असेल तो, तुह्मी सांगाल त्याप्रमाणें बरालयाख (बरा लायख?) सरंजाम करून देविला जाईल? येविशीं आपलें समाधान असों देणें. सांप्रत आह्मी घालेघाट चढोन कडेवळितांत आलों आहों. येथून मजल दरमजल पुढें येऊन. तों तुह्मी पोख्त जमाव घेऊन लौकर दर्शनास येणें. कितेक वर्तमान रा. कृष्णाजीपंत मुखोद्गतें सांगतील. तरीं स्वामींचीं वचनें जाणून लौकर स्वार होऊन येणें. *विलंब सर्वथा न लावणें. येविशीं बहुत काय लिहिणें.* रा। छ २१ माहे रजब."

ह्या पत्रावरून शंकराजी राजे ह्यांची योग्यता व शाहू महाराजांचें त्यांच्या विषयींचें अगत्य हीं दोन्ही व्यक्त होतात. ह्याप्रमाणें शंकराजी राजे आपल्या लोकांसह शाहू महाराजांस मिळाले व त्यांनीं साताराची गादी त्यांस मिळवून देण्याचे कामीं चांगली मदत केली असावी हें उघड आहे. पण अस्सल पत्रांच्या अभावामुळें ह्या सर्व गोष्टींचा चांगलासा खुलासा होत नाहीं.

शाहू महाराज मराठ्यांच्या राजसिंहासनावर आरूढ झाल्यानंतर, त्यांनीं शंकराजी राजे ह्यांच्याकडे, दक्षिण महाराष्ट्र व कर्नाटक ह्या प्रांतांतील पुंडपाळेगारांचें पारिपत्य करून त्या प्रांतावर आपलें स्वामित्व संस्थापित करण्याचें काम सांगितलें. त्याप्रमाणें शंकराजी राजे तिकडील राजकारणें पाहूं लागले, व त्यांचे पश्चात् त्यांची पत्नी भवानीबाई ही तारळें महालाचा बंदोबस्त करूं लागली. शाहू महाराजांनीं इ. स. १७०९ मध्यें तिच्या नांवानें तारळें महालच्या देशमुखीची सनद दिली. ती येणेंप्रमाणें:—

श्री.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारीनाम संवत्सरे आषाढ बहुल पंचमी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांनीं राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रांत कराड यांसी आज्ञा केली ऐसीजे:—

सौभाग्यादिसंपन्न भवानीबाई महाडीक स्वामींच्या दर्शनास आली. यांचें चालवणें स्वामींस अवश्यक. याजकरितां संपूर्ण राज्याचे सरदेशमुखीचें वतन स्वामींचें, त्यामधून स्वामींनीं तर्फ तारळें सुभा प्रांत. मजकूर येथील सरदेशमुखीचें व नाडगौडीचे वतन यांस आंदण दिलें असे. तरी यांसी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें तर्फ मजकूरचें सरदेशमुखीचें व नाडगौडीचें वतन अविच्छिन्न चालवणें. तारीख छ १७ माहे रबिलावल सु॥ तिसा."

ह्याप्रमाणें सनदापत्रें रवाना झाल्यानंतर भवानीबाई तारळ्यास गेली. तेथें तिनें मोंगलाई धामधुमींत तारळें गांवची वाताहत झाली होती, सबब सर्व रयतेस अभय देऊन गांवाची पुन्हां ऊर्जितावस्था केली. तिनें तारळें गांवच्या लोकांकडून इ. स. १७१० सालीं लिहून घेतलेला महजर उपलब्ध झाला आहे. त्यावरून शाहू महाराजांची बहीण भवानीबाई महाडीक ही मोठी राजकारणी व शहाणी होती असें दिसून येतें. हा महजर येणेंप्रमाणेंः—

श्री.

"महजर ब तेरीख छ १५ माहे जमादिलावल आषाढ बहुल द्वितीया मंदवासरे विकृतिनामसंवत्सरे सु॥ इहिदे असर मया अलफ. हजीर मजालसी स्थळ कि॥ तारळें.

राजश्री कृष्णाजी बल्लाळ सरसुभेदार व इतर.

* * * * *

* * * * *

समस्तांच्या विद्यमानें जाहाला महजर ऐसाजेः-सौभाग्यादिसंपन्न मातुश्री भवानीबाई माहाडी किल्ले साताराचे मुकामींहून कि॥ तारळियास येऊन मुकाम केले होते. ह्यानगोजी काटे देशमुख व सिदोजी बिन विठोजी साळवी देशमुख व देशपांडे व मोकदम व कुलकर्णी व शेटे महाजन वगैरे व बलुते देखील लहान थोर मिळोन दर्शनास आलों. दर्शन घेतले. आपली हकीकत अस फितरत कजियामुळें हालाखी जाहालों; कांही अंत राहिला नाही; व विलायतीस आसरा नाहीं. बहुसाहेबीमुळे देश टाकून जावें ऐसें जाहालें आहे. साहेब कृपाळु होऊन विलायतीवरी नजर ठेवून आमचें चालवितील, तरी आह्मी समस्त सुखरूप राहोन देशाची महामुरी होईल, व वतनदार वतनावरी नांदोन ह्मणोन विनति केली. त्यावरून साहेब मेहरबान होऊन समस्तांचा बहुताप्रकारें दिलासा केला. मग समस्तांनीं आपले जागां विचारिलें, आपण निराश्रित, आपली पाठी राखणार व जतन करणार कोण्ही नाहीं. साहेबांचें नांव थोर, व त॥ मजकूरचे सरदेशमुख व कि॥ मजकूरचे मोकदम वतनदार ऐसें जाणोन, समस्तांच्या मतें व आत्मसंतोषें त॥ मजकूरचे नाडगौडीचें वतन करून दिल्हें असे. यास हक्क व इनाम हि॥ आकार दरसदे रुपये ३ तीन व इनाम दर चावरे १ एक बिघा, दर गांवास इरलें १ एक व कोंबडें १ एक येणेंप्रमाणें तुह्मांस मोईन करून दिल्हें असे. येणेंप्रमाणें घेऊन पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें वतन अनुभवून नाडगौडी करणें. यास हरकोणी लहानथोर

दिकत अगर हिला हरकत करील व आमचे वंशींचे अगर हरकोणी हिला हरकत करील, त्यास शत गोहत्यांचें पातक व पूर्वजांचे शफत असे. समस्तांचे मतें व आपले आत्मसंतोषें त॥ मजकूर नाडगौडीचें वतन करून दिल्हें असे. साहेबीं परदेशीं अर्थाअर्थीं संमंध कोणास नाहीं. आपलें वतन करणें. हा महजर लेहून दिल्हे सही."

ह्याप्रमाणें तारळें महालावर भवानीबाईनें आपला अंमल बसविला. शाहू महाराज ह्यांनीं पुनः राजशक ३७ विकृतिनाम संवत्सर भाद्रपद शुद्ध १० रोजीं नवीन सनद देऊन भवानीबाईस नाडगौडकीचें वतन आंदण करून दिलें. शाहू महाराजांचें भवानीबाईवर फार प्रेम असून ह्या राजभगिनीचें वजन त्यांचे दरबारांत बरेंच होतें. असो.

शंकराजी राजे ह्यांजकडे शाहूमहाराजांनीं पंचनदीपासून कर्नाटकपर्यंतच्या मुलूखगिरीचा अधिकार देऊन त्यांना राजशक ३६ ह्मणजे इ. स. १७१० मध्यें त्या प्रांतावर रवाना केलें. त्या वेळीं त्यांनीं कर्नाटकांतील देसाई, पाळेगार, वगैरे लोकांस शंकराजी राजे ह्यांस रुजू होऊन आपलें ऊर्जित करून घेण्याबद्दल आज्ञापत्रें पाठविलीं आहेत. त्यांपैकीं बरींच उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकीं मासल्याकरितां एकदोन खालीं सादर करितों. ह्या पत्रावर शाहू महाराजांचा

वर्धिष्णुर्विक्रमो विष्णो सामूर्तिरिव वामनी ।
शंभुसूनौ असौ मुद्रा शिवराजस्य राजते ॥

ह्याप्रमाणें शिक्का आहे.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधीनाम संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदशी भोमवासर क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांनीं दामण गौडा देसाई पा॥ गुंतल यांसी दिलें अभयपत्र ऐसीजेः—तुह्मांविषयीं राजश्री सर्वोत्तमराव यांनीं हुजूर विनंति केली, त्यावरून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन तुह्मांस हें अभयपत्र सादर केलें असे. तरी राजश्री शंकराजी राजे महाडीक यांस कुल-अखत्यार देऊन कर्नाटकांत ते पाठविले आहेत. तरी तुह्मी पोक्त जमावानिशीं मशारनिल्हेस भेटणें. तुमच्या सरंजामाविषयीं त्यांस आज्ञा केली असे. ते तुमच्या मनोदयावरून सरंजाम करून देतील. अभय असे. जाणिजे. लेखनालंकार."

**श्री.**

"अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री तरेकरे सिताराम नाईक मुक्काम बाश्चापटण गोसावी यांसीः—प्रति राजश्री राजा शाहू छत्रपति उपरी येथील कुशल

जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. यानंतर राजश्री शंकराजी राजे महाडीक यांसी पंचनदीपासून कर्नाटकपर्यंत मुलूखगिरीचा कुलअखत्यार देऊन रवाना केलें आहे. तरी तुह्मी म॥ निलेस रुजू होऊन आपलें ऊर्जित करून घेणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें? ( मोर्तब )."

ह्याचप्रमाणें गोपाळ नाईक मु॥ देवनहळ्ळी, गोविंदराज मटलेवार, गोमनाईक नरसिंह नाईक मु॥ गुपनडपाल, वोमंतनाईक बालातूर, रामणानाईक मु॥ कातेकोटे वसंतराय मु॥ जरीमक, दळवी वलबनाईक गुटीकोटे, राघोराज दामलचेरू, भरमणा नाईक चित्रदुर्गकर, वसंतराय आगली मु॥ हरपनहळ्ळी, देवापा नाईक मु॥ बल्लारी, चिकरायल नेमगौडा मु॥ वलिंगनूर, तिमप्पा नाईक रायदुर्गकर, कृष्णारेडी, दोड्ड सदाशिव नाईक धर्मवार, चिन्ना नाईक कनकगिरीकर, रामणा नाईक मु॥ येरकालर्लें, सदाशिव नाईक सोंधेकर, कोलाकतुर वंदरी मु॥ वडरेपाल, व्यंकटपति चिकरायल मु॥ अनीगुंदी, तिमापा नाईक मु॥ निडगल, इत्यादि अनेक पाळेगारांस सनदा पाठविल्या आहेत. ह्यावरून शंकराजी राजे ह्यांस शाहू महाराजांनीं कर्नाटक प्रांतांत मराठ्यांचें वर्चस्व पुनः स्थापित करण्याची अत्यंत महत्त्वाची कामगिरी दिली होती असें दिसून येतें.

आतां अशा महत्त्वाच्या कामास द्रव्यबळ व मनुष्यबळही चांगलेंच पाहिजे. द्रव्यबळाची योजना कशी केली होती, तें समजत नाहीं. परंतु पराक्रमपटु व कर्तृत्ववान् मराठे सरदारांस त्यांच्या हाताखालीं जाऊन स्वामिसेवा करून दाखवावी ह्मणून आज्ञापत्रें पाठविलीं होतीं. त्यांपैकीं पुढील पत्र मासल्याकरितां येथें सादर करितों:—

श्री.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधीनाम संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदशी भोमवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति यांनीं राजमान्य राजश्री खंडोजी निकम यांस आज्ञा केली ऐसीजेः—तुह्मीं स्वामींच्या पायांसीं एकनिष्ठा धरिली आहे. सेवा करून दाखवावी, आपलें ऊर्जित करून घ्यावें, ऐसी उमेद धरिली आहे, ह्मणोन तुमचा भावार्थ राजश्री गोविंद व्यंकटराव यांनीं विदित केला. ऐशास तुह्मी स्वामींच्या राज्यांतील कदीम सेवक आहां. तुमचे हातें सेवा घेऊन चालवणें स्वामींस अगत्य. त्यास हल्लीं राजश्री शंकराजी राजे महाडीक यांसी यहद पंचगंगा तहद कर्नाटक प्रांतींचे कार्यभागाची यख्तयारी सांगोन पाठविले आहेत. तरी तुह्मीं जमावानिशीं येऊन यांसी सामील होणें. आणि स्वामिसेवा करून दाखवून आपले सेवेचा मजुरा करून घेणें. मशारनिल्हे

तुह्मांविसीं बोलतील, तेणेंप्रमाणें स्वामी तुमची सर्फराजी करून चालवितील. जाणिजे बहुत काय लिहिणें."

ह्याप्रमाणें मानाजी बागूल, उदाजी काटकर, महादजी बाबर वगैरे मराठे सरदारांसही अशींच आज्ञापत्रें पाठविलीं आहेत. ह्यावरून शाहू महाराजांनीं कर्नाटक प्रांतावर आपला अंमल संस्थापित करण्याचा कसा प्रयत्न केला होता हें व्यक्त होतें. शाहू महाराजांच्या इच्छेप्रमाणें शंकराजी महाडीक ह्यांनीं कर्नाटकांत जाऊन काय काय कामगिरी केली, तें समजत नाहीं. नरगुंद, हुक्केरी वगैरे जागा शंकराजी राजे महाडीक ह्यांनीं लढाई करून जिंकून घेतल्या, परंतु ह्या संबंधाची अधिक माहिती मिळत नाहीं. एका प्रसंगीं प्रतिपक्षीयांनीं शंकराजी राजे ह्यांच्यावर चालोन येण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं शाहू महाराजांनीं शंकराजी राजे यांस पुढील जोरदार पत्र पाठविलें आहे. तेंही वाचण्यासारखें आहे. त्यावरून शाहू महाराजांचा बाणेदारपणा व वीरश्री व्यक्त होते.

श्री.

"राजश्री शंकराजी राजे महाडीक गोसावी यांसः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शाहू छत्रपति उपरीः— हमीदखान व हिंदुराव घोरपडे व नारो महादेव एकत्र जाले होते, ते विजापुरास दाखल जाले. त्यांनीं दुष्ट बुद्धि धरून चालोन यावें असें केलें आहे. स्वामीही फौजबंदी करून त्या प्रांतें येत आहेत. घोरपडीयांचा हिसाब आहे ऐसें नाहीं. मारून गर्देस मिळविले जातील. तुह्मीं तेथें जमाव करून सावध राहणें. रांगणेकर वळवळ करितात. त्यांस फावलें! त्यांना नतिजा पावीत जाणें. पुढें स्वामी आज्ञा करितील तैसी वर्तणूक करणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें."

शंकराजी राजे ह्यांच्या संबंधाचे संपूर्ण कागदपत्र उपलब्ध झाल्यावांचून त्यांच्या कारकीर्दीची सविस्तर हकीकत समजण्याचा मार्ग नाहीं. शंकराजी राजे ह्यांनीं कर्नाटकांत कोणकोणतीं राजकारणें केलीं, किंवा कोणकोणते युद्धप्रसंग केले ह्यांची माहिती उपलब्ध नाहीं. शाहू महाराजांचा व शंकराजी राजे ह्यांचा पुढें बेबनाव झाला कीं काय, तेंही समजत नाहीं. शंकराजी राजे हे कोल्हापुरच्या राजास अनुकूल झाले होते कीं काय, तेंही समजत नाहीं. कोल्हापुरच्या शिवछत्रपतींचें पुढील एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून त्यांचें तिकडेही सूत्र असावें असें दिसतें. हें पत्र कोणत्या प्रसंगीं लिहिलें तें समजत नाहीं. परंतु त्यावरून शंकराजी राजे ह्यांच्याबद्दल कोल्हापुरच्यां शिवछत्रपतीसही आदरबुद्धि होती एवढें दिसून येतें.

श्री.

"राजश्री शंकराजी महाडीक गोसावी यांसः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शिवछत्रपति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणें. विशेषः—तुह्मीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन अभिप्राय अवगत जाला. पुढेंही याच प्रकारें आपलें वृत्त लिहित जाऊन संतोष पाववणें. आपला परामर्ष करीजेत नाहीं, उपेक्षाच केली आहे, हें माहाराजांस उचीत नव्हे ह्मणोन लिहिलें. तरी तुमची उपेक्षा स्वामी करितील हें काय घडों पाहातें? परामर्षही करणें अत्यावश्यक आहे. एतद्विषयीं अन्यथा न मानणें. स्वामी तुमच्या परामर्षाविषयीं अंतराई करणार नाहीं. सन्निध असावयाचा हेतु आहे ह्मणोन सांगोन पाठविलें, तरी हे गोष्ट उत्तम व उचीत आहे. ऐशास प्रस्तुत प्रसंग नाहीं. याकरितां पुढें पत्र पाठवून देणें. तदनंतर लिहिणें तें लिहिलें जाईल. जाणिजे. बहुत काय लिहिणें."

शंकराजी राजे ह्यांचा महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध पुरुषांशीं पत्रव्यवहार होता. रामचंद्र नीलकंठ आमात्य व उदाजी चव्हाण ह्यांचीं दोन पत्रें उपलब्ध झालीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—

श्री.

"राजश्री शंकराजी महाडीक गोसावी यांसः

५१ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित रामचंद्र नीळकंठ हुकमतपन्हा आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करणें. विशेषः— बहुतां दिवशीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. कित्येक स्नेहोक्ति लिहिल्या, त्या विदित होऊन बहुतच संतोष वाटला. पुरातन स्नेह चालिला आहे तो वृद्धीतें पावला, हें परस्पर उचितच आहे. पुढें सर्वदा कुशलवृत्त लेहून चित्त संतोषवीत गेलें पाहिजे. नरहरी अंबाजी यासमागमें जबानीं कित्येक वर्तमानें सांगोन पाठविलें, तें त्यांनीं निवेदन केलें. अशास प्रस्तुत ज्या स्थळीं आहां तेथेंच असावें. येथें आल्यानें प्रसंग उत्तम चालोन आला पाहिजे. तुरूत राजश्री स्वामींची स्वारी जाहाली आहे. पुढें येविसींचा प्रसंग कर्तव्य तो करून लेहून पाठऊं. चंद्र ९ जिल्हेज. बहुत काय लिहिणें."

श्री.

राजश्री शंकराजी राजे महाडीक गोसावी यांसीः—

५१ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित उदाजी चव्हाण मो॥ लष्कर दरजागा करवीर जोहर विनंति. येथील कुशल जाणून स्वकीय

लेखन करीत असलें पाहिजे. विशेषः—प्रस्तुत आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तेणेंकडून चित्त असंतोषी आहे. असें न करितां सर्वदा पत्रीं कुशलवृत्त लेखन करून परामर्ष करीत असावें. यानंतर महानगरास गेलों होतों. तेथें पातशाही दिवाण यानें बहुत कांहीं फटकळ अचरण आचरों लागला. त्यास आह्मी.... गेलेनंतर येथील सामादिक अवघे यांनीं विदित केलें कीं, दिवाण कर्म फटकळ करितो. याचें पारिपत्य करावें. त्यावरून त्यास परीघ घालोन बैसला, बहुत जेर केला. पाणी देखील बंद जालें. तेव्हां त्याकडील पैगाम व मध्यस्ती होऊं लागली. त्याचा अव्हेर करून अतिशयच माकूल ( जाला ). एका दोन रोजांत हस्तगत होणार. तों तीर्थरूपास गोळी कपाळीं जेष्ट शु० चतुर्थी इंदुवारीं अस्तमानसमयीं लागली. तत्समईच देहावसान जालें. ईश्वरनें थोर घात केला. अशास ते तों गेलेच. त्यामाधें त्यांचे ठायीं आपण आहेत. जो परामर्ष कराल तो थोडा. विशेष लिहावें तर वडील आहां. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंति."

शंकराजी राजे ह्यांची कारकीर्द कधीं संपली तेंही नक्की समजत नाहीं. राजशक ५२ सालच्या सनदापत्रांमध्यें भवानीबाईस 'सौभाग्यादिसंपन्न' अशीं विशेषणें आहेत, त्यावरून इ. स. १७२६ पर्यंत ते हयात होते, हें सिद्ध आहे. त्यानंतर त्यांचा काल केव्हां झाला हें समजत नाहीं. ते मारले त्या वेळीं भवानीबाई त्यांचे बरोबर सती गेली अशी माहिती मिळते. शंकराजी राजे ह्यांस दुर्गाजी व आंबाजी असे दोन पुत्र होते.

शंकराजी राजे ह्यांचे बंधु दुर्गाजी राजे हेही शाहू महाराजांच्या कारकीर्दींत चांगले प्रसिद्धीस आले होते. हेही कर्ते पुरुष होते, परंतु ह्यांची विशेष माहिती मिळत नाहीं. शंकराजी राजे ह्यांच्या चिरंजीवांचें नांवही दुर्गाजी राजे असेंच आहे. महाडीक ह्यांच्या दप्तरामध्यें दुर्गाजी राजे ह्यांच्या नांवचीं सनदापत्रें व ताकीदपत्रें पुष्कळ आहेत. पण त्यांच्यावर 'चिरंजीव विजयीभव' असा मायना आहे. त्या अर्थीं तीं शंकराजी राजे ह्यांचे चिरंजीव दुर्गाजी राजे ह्यांच्या नांवचीं असावीत असें सकृद्दर्शनीं दिसून येतें. कारण, दुर्गाजी राजे हे भवानीबाईचे चिरंजीव–ह्मणजे छत्रपति शाहू महाराजांचे भाचे होत. त्या अर्थीं त्यांस 'चिरंजीव विजयीभव' हें विशेषण बरोबर लागू पडतें. परंतु शंकराजी राजे ह्यांचे बंधु दुर्गाजी राजे व चिरंजीव दुर्गाजी राजे ह्यांच्या कारकीर्दींचा काल बरोबर सिद्ध करण्यासारखे कागद उपलब्ध न झाल्यामुळें, सांपडलेल्या त्रोटक पत्रांचा बरोबर मेळ जमत नाहीं. तथापि, हीं पत्रें जिज्ञासु वाचकांच्या अवलोकनासाठीं पुढें दिलीं आहेत.

येथें बाईनींही सांगितलें जे, उत्तर अद्याप आलें नाहीं. बारीक शोध पाहतांही अद्याप आलीं नाहींत. तर्केंकडून वाटतें जे, राजश्री पाटीलबावांकडील लग्नपट्टीचा ऐवज न पावला असेल, ह्मणून यांचाही अनमान असेल कीं कसें नकळे. काल बाई बोलत होती कीं, 'तुकबांकडील वराता एक तेरा हजारांची व एक पांच हजारांची व एक दीड हजारांची अशा आल्या आहेत. त्यांसही ऐवज दिला पाहिजे.' पाहतां तेही इकडील ऐवज ओढीतच आहेत. सरकारच्या ऐवजास त्यांच्या उजूर करितात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ९४.** ता. ३० एप्रिल. इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. चैत्र वद्य १४ शके १७०५.

"विज्ञापना:—बातमीचें वर्तमान राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून एक गृहस्थाची जासूदजोडी चंद्र ११ जमादिलावलीं लष्करांतून निघाली, ती चंद्र २२ मिनहूस येथें आली. त्या पत्रीं वर्तमान कीं, पाटीलबावांनीं बावनबुरजी गढी घेऊन, तेथून कूच करून ग्वालेरीस येऊन मोर्चे लाविले. किल्ल्यास पूर्वेकडून मोर्चे लाविले आहेत. तोफांची चादर लावून पन्नास हात सफील पाडून टाकली. वरते किल्ल्यावर पाणी नाहीं. एक बावडी मातबर, पूर्वेस किल्ल्याच्या शहरपन्ह्यांत होती. त्या बावडीचें पाणी वरले लोक पीत होते. तीच सफेल पाडली आहे. त्यामुळें त्या बावडीचें पाणी वरल्या लोकांचें बंद जालें. कोठें कोठें टांक्यास थोडें थोडें आहे, तें गुजरानी करितात. किल्ल्यावर पांच सात सावकार मातबर व राजाची राणी अशीं आहेत. आठा पंधरा दिवसां किल्ला हस्तगत होईल ह्मणून लिहिलें होतें, व पाटीलबावांकडील मुत्सद्दी व कारभारी यांनीं कोणी मामलेदारांपासून अंतस्थ पुष्कळसें घेतलें होतें. तें पर्यायेंकडून मुख्यास कळलें. त्यामुळें मुत्सद्दी व कारभारी यांचे ठायीं अनास्ता. रुपया जितका घेतला होता तितका माघारी घेऊन, इतराजींत आहेत ह्मणून लिहिलें होतें. हें कलमीं वर्तमान, व श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडे पाटीलबावांकडील कारकून गेला आहे. त्या गृहस्थाचें नांव केसो अनंत. पाटीलबावांनीं सांगितल्याअन्वयें कांहीं दादासाहेबांशीं बोलतात. सुरतेजवळ फुलपाड्यावरच दादासाहेब आहेत. कूच करून शिंद्याकडे जाणार. दुसरी बोली परभारें झांशीस जाणार. हें सावकारी वर्तमान. तिसरें वर्तमान कीं, पुण्याहून पाटीलबावांच्या विद्यमानें दादासाहेबांचा तह झाला आहे कीं, झांशी वगैरे बारा लक्षांचा सरंजाम द्यावा. दादासाहेबांनीं दपत्यसहित व अमृतराव व कांहीं त्याजवळ

शागीर्दपेशा आहे त्यासुद्धां झांशीस राहावें. पुण्याहून श्रीमंतांची आज्ञा आली तर शिंदेहोळकरसहित हिंदुस्थानची मोहीमही करावी, नी श्रीमंत बाजीराव साहेबांनीं पुण्यास श्रीमंतांजवळ जावें. बाजीरायांस वधू राजश्री हरिपंततात्यांची कन्या नेमली आहे. श्रीमंतांच्या लग्नाप्रमाणें यांचें लग्न व्हावें. पूर्ववत्प्रमाणें निर्वेध राज्याचा बंदोबस्त व्हावा. असें बाजारी व ब्राह्मणी वर्तमान ऐकिलें. तें सेवेसी श्रुत होय. सत्य मिथ्या देव जाणे. उज्जनीहून एक ब्राह्मण आला. त्यानें आजच घांटावर वर्तमान सांगितलें जें, ग्वालेरीस पाटीलबावांनीं मोर्चे लाविले आहेत. किल्ल्यावर सातशें माणूस व कोणी सावकारही आहेत. परंतु किल्ला जेर आहे. लवकरच हस्तगत होईल. श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडे केसो अनंत कारकून पाटीलबावांनीं पाठविले आहेत. आधीं दादासाहेब पाटीलबावांकडेस येणार. तदोत्तर पाटीलबावांच्या विद्यमानें कोणीकडे योजना होणें ती होईल. पाटीलबावांच्या विद्यमानें इंग्रजांचा सल्ला पक्का जाहला. इंग्रजांनीं आपल्याकडून भडोच संस्थान पाटीलबावांस दिलें. भडोचेस पाटीलबावांकडील ठाणें उज्जनीहून जाणार. याप्रमाणें त्या भटजीनें वर्तमान सांगितलें. पेडगांवींहून पाटीलबावांची ज्येष्ठ स्त्री उज्जनीस गेली. मर्दान्याच्या घांटावर रेवा उतरली. देवजी गौळी समागमें होते. ते बाईस भेटावयास येथें आले होते. येथून बाईनीं आपला कारकून ते बाईस बोलावूं पाठविला होता. परंतु ती अस्पर्श जाहली म्हणून आली नाहीं; परभारां गेली. राजश्री बाजीराव बर्वे यांचीं पत्रें पुण्याहून वे॥ राजश्री गोविंद भटजी खिजसुरे यांच्या विद्यमानें पेशजी येथें आलीं होतीं. तीं त्यास पोंहचाऊन उत्तर घेऊन पाठविलीं होतीं. त्यावर आठ दहा दिवस जाले. बाजीरायांनीं आपला कारकून येथून पुण्यास रवाना केला आहे. त्यावर अलीकडे पुण्याहून दुसरीं पत्रें भटजींच्या विद्यमानें चंद्र ११ मिनहूचीं तेथून डांकेबरोबर रवाना जालीं. तीं चंद्र २० मिनहूस चौ घटका रात्रीं येथें दाखल जालीं. राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ सबनीस यांनीं सेवकास पत्र लिहिलें होतें जे, हा लखोटा बर्व्यांस पावता करून उत्तर घेऊन लवकर डांकेबरोबर पाठवणें. त्याप्रमाणें पत्र लखोटा ते वेळेसच बाजीरायांस पावता केला. त्यांनीं पत्रें वाचून राजश्री गोविंद रघुनाथ गानू यांस दाखविलीं. त्यांचे विद्यमानें बाईस वर्तमान श्रवण केलें. तदोत्तर उत्तरें लिहून लखोटा गोविंद भटजींच्या नांवाचा मजकडे पाठविला. तो लखोटा चंद्र मजकुरीं डांकेवर या पत्रांबरोबरच रवाना चंद्र २६ मिनहूस डांकेवरून चालला. सेवेसीं श्रुत होय. दोन लक्षांचा जाबसाल परवा जाला. बाईनीं उत्तर याप्रमाणें केलें. तो मजकूर केसोपंतांनीं व मीं चंद्र २४ मिनहूस विनंतिपत्रें लिहून कासीदजोडीबरोबर रवाना केलीं आहेत.

आज डांक चालली ह्मणून तेंही वर्तमान सूचनार्थ सेवेसी लिहिलें असे. डांकेच्या बंदोबस्ताविषयीं सरकारचें पत्र बाईस एखादें यावें. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ९५.** ता. १४ मे इ. स. १७८३.

**श्री.** मि. वैशाख शु॥ १३ शके १७०५.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक अहिल्याबाई होळकर कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम स्वामींचे कृपाकटाक्षेंकरून यथास्थित असे. विशेषः-छ १५ रबिलावलचें पत्र सादर जालें, तें छ १ रबिलाखरीं प्रविष्ट होऊन बहुत संतोष जाला. सरकारांत लग्नाच्या साहित्याबद्दल राजश्री तुकोजी होळकर यांजकडील सरंजामावर सर्वांप्रमाणें रुपये दोन लक्ष द्यावयाची नेमणूक केली, तो ऐवज मशारनिल्हेंनीं तुह्मांकडून घ्यावयाविषयीं पत्र दिलें तें पाठविलें आहे. तर येविषयीं राजश्री केसो कृष्ण व विठ्ठल शामराज तुह्मांसी बोलतील. त्याप्रमाणें सदरहू ऐवजाची तरतूद करून पाठविणें ह्मणून आज्ञा. ऐसीयासी स्वामींचे लग्नाच्या साहित्याचा ऐवज देणें हे गोष्ट संतोषाचीच आहे. परंतु चिरंजीव राजश्री तुकबांकडील मागील बाकी येणें, त्या ऐवजीं द्यावयाकरितां लिहिलें. त्यास मागील बाकीचा ऐवज माळवे प्रांतींचे महाल-पैकीं वगैरे कोणता राहिला न राहिला, हें सरकारांतही विदितच आहे. येविषयीं चिरंजीवास पत्र लिहून जोडी रवाना केली, त्याचें उत्तर अद्याप आलें नाहीं. सरकारचे जासूदजोडीस येऊन बहुत दिवस जाले. यास्तव त्यांची रवानगी केली आहे. मागाहून. चिरंजीवाकडून उत्तर आल्यानंतर उभयतां मशारनिल्हेसीं ऐवजाचा जाबसाल बोलण्यांत येईल. मिति वैशाख शुद्ध त्रयोदशी सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ९६.** ता. १८ मे इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. वैशाख वद्य २ शके १७०५.

"श्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीः-

सेवक विठ्ठल शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १६ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—बहुत दिवस जाहले, आपलें पत्र येत नाहीं. त्यास आह्मांस सर्वांशीं आधार आपल्या पायांचा आहे. तेथें श्रीमंतांजवळ आह्मांविषयीं कोण वारंवार विनंति करितो?

आपण गरीबनवाज आहेत. येथील वर्तमानः—श्रीमंतांच्या लग्नोत्साहाची पट्टी दोन लक्ष रुपयांची वरात श्रीमंतांनीं तुकोजीबावांच्या ह्मटल्यावर केली, आणि तुकोजी-बावांनींही बाईस लिहिलें कीं, तिकडे महालचे बाकीचे 'ऐवजीं दोन लक्ष रुपये देणें. त्यास पाहतां, ऐवज त्यांनीं सागच महालपैकीं उचलला आहे. बाईवर निमित्य कीं, बाकीचे ऐवजीं देणें. बाकी नाहींच तेथें त्यांनीं कोणत्या ऐवजीं द्यावा ? पाहतां सुरळीतपणें त्यांजकडून नाहीं. बाईवर दुरारोप मात्र ठेवितात. येथून बाईनीं तुकोजीबावांस पत्र लिहिलें कीं, बाकी कोणती राहिली आहे, तें लिहून पाठवणें; त्यांपैकी ऐवज देऊं. त्यास आज अडीच महिने जाले, उत्तरही पाठवीत नाहींत; कासीदजोडीही अद्याप येत नाहीं. आह्मांकडून बाईनीं श्रीमंतांस लिहिविलें कीं, तुकोजीबावा पत्र पाठवीत नाहींत. श्रीमंतांनीं तेथें त्यांस आज्ञापिलें कीं, 'तुह्मीं बाईवर वरात लिहविली. त्यांनीं तुह्मांस पत्र लिहिलें आहे. त्याचें उत्तर कां तुह्मी बाईस पाठवीत नाहींत?' त्यास तेथें ह्मणतात कीं, बाई-कडेस पत्रें पाठविलीं आहेत. येथें शोध करितां पत्र आलें नाहीं. जोडीही आली नाहीं. असा प्रकार तिकडील आहे. त्यांजकडून सुरळीत नाहीं हें आपणही श्रीमंतांस समजाऊन सांगावें. आह्मींही श्रीमंतांस लिहिलें आहे. आपणही सांगावें. येथें त्यांनीं ऐवज तयार करवून ठेवला आहे. परंतु त्यांचें काय पत्र येतें तें पहावें, व सरकारच्याही दुसऱ्या पत्राची मार्गप्रतीक्षा येथें आहे. सरकारचें पत्र सुरळीतपणें ममतापुरस्कर बाईस यावें की, माळव्यांच्या महालपैकीं पेस्तर सालचे ऐवजीं दोन लक्ष रुपये देणें, व तुकोजीबावांचेंही पत्र बाईस या अन्वयेंच रूबरू घेऊन पाठवावें, ह्मणजे ऐवज येथें घेऊं. पत्रें दोन्हींही माझ्या लखोट्यांत घालून पाठवावीं, ह्मणजे त्या अन्वयें येथें आह्मांस बोलावयास येईल. सेवेसी श्रुत होय. पहिले बाण पाठविले कपुरा व बाळा कासीदाबरोबर, ते पावले असतील. आतांही सात बाण रामा कासीदाबरोबर पाठविले आहेत. बाण फार चांगले आहेत. त्यांस दहीं साखर लावून धुवावें. धोतरजोडे वाटेनें निभावत नाहींत. बऱ्हाण-पुराजवळ व औरंगाबादेजवळ चौकीचा उपद्रव फार देतात. यास्तव जासूद आणीत नाहींत. तेथून बंदोबस्त करून पाठवावा, ह्मणजे एक दोन जोड पाठवीन. हे विनंति."

**लेखांक ९७.** ता. २० मे इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. वैशाख व॥ ४ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ जमादिलावलपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मु॥ महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष:—इकडील वर्तमान व श्रीमंतांच्या लग्नपट्टीचे दोन लक्षांचा जाबसाल बाईशीं जो जाला तो, पेशजीं विनंतिपत्रीं लिहून छ ११ मिनहूस डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रत श्रीमंतांच्या लग्नाचा मजकूर समारंभ फार चांगला जाला. राजश्री बापोजी आनंदराव बाईकडून आहेर घेऊन आले होते, त्यांनींही सांगितला. मींही ऐकिलें वर्तमान निवेदन केलें. वारंवार तोच मजकूर बोलत असतात. बाई बहुत संतोष पावली. बाई बोलली जे, "कैलासवासी श्रीमंत नानासाहेब होते, ते वेळेस कैलासवासी श्रीमंत रावसाहेबांचें लग्न मातबर जालें होतें. परंतु त्यापेक्षां या लग्नाची तरा तरतूद फार चांगली कारभारी यांणीं केली. अशा समारंभाच्या कल्पना ऐकिल्यांत आल्या नाहींत. लग्न जालीयावर नवाब पोलादजंग आले. त्यांचे मेजवानीची तरतूद फिरून त्या रंगाप्रमाणेंच करणें प्राप्त जाली. तेंही कोठें व्यंग न दिसतां त्यांच्या व सरकारच्या स्वरूपाप्रमाणें केली. खर्च फार लागला. लाखोंचेच जाले. उगेंच शब्दपांडित्य नाहीं." असें फार संतोषानें बोलली. त्यावरून लग्नपट्टीच्या दो लक्षांविशीं प्रसंगोपात फिरून विनंति केली जे, "खर्च फार जाला आहे. नवाबांनीं व हैदरनाईक यांणीं साहित्यें केलीं. येथीलही ऐवज समयोचित पोंहचे तर फार उपयोगीं पडेल. श्रीमंत कारभारी यांसीही बहुत संतोष होईल." त्यावर बाईच्या बोलण्याचे भाव दृष्टीस आले जे, "हे दोन लक्ष रुपये देणें आह्मांस अति आवश्यक. निश्चयरूप आह्मीं द्यावेच. कां कीं, हे गोष्ट आह्मांस अलभ्य लाभाची होय. परंतु तेथून कारभारी यांणीं राजश्री तुकोजी होळकर यांचें पत्र घेऊन आह्मांस पाठविलें. त्यांतील कुन्हा त्यांचे समजल्यांत आली नाहीं. कोणती? ज्या पक्षीं संतोषाचें देणें, त्या पक्षीं बाकीच्या ऐवजीं देणें ह्मणून किमपि न लिहिते. तेथेंही हेंच लिहिणें होतें जे, श्रीमंतांचा लग्नोत्साह जाला, हा आपणास अति संतोष होय. त्यास माळव्यांतीळ महालपैकीं पेस्तर सालचे ऐवजपैकीं दोन लक्ष रुपये द्यावे. इकडे देशचे महालीं ऐवज द्यावा, तर येथील खर्चाच्या ओढीमुळें न बनलें. यास्तव वडिलीं तिकडील महालपैकीं दोन लक्ष रुपये पाठऊन द्यावे. ऐसें निखालसपणें लिहिलें तर आह्मांसही हा संतोष. ऐवजाची तरतूद होऊन येती. तस्मात् त्यांच्या चित्तांत निखालसपणें ऐवज न द्यावा, सरकारचा शब्द आह्मांवर लावावा,

या अर्थी बाकीची कुन्हा त्यांनीं लिहिली. हे कारभारी यांच्या चित्तांत व्यंगोक्तता न समजली. आपली छानदारी दाखऊन दुसऱ्यास बदनाम करावें, हे बालखेळ नारोपंतांचे होयेत. हे समजणारासच समजतील. पेशजी श्रीमंत राजश्री नानांसी विष्णु महादेव गजरे व तुकबा व नारो गणेश यांणीं वचनप्रमाण दिल्हें कीं, तुमच्या लक्षांत वर्तणूक करूं. त्यावर त्वरितच राजश्री मोरोबादादांच्या मनमंतरांत त्यांजकडून कशी वर्तणूक घडून आली, ते श्रीमंतांच्या ध्यानांत आहेच. त्यांचे वर्तणुकीचे भाव वारंवार दृष्टोत्पत्तींत येत असतां, हरएकविशीं त्यांच्या गोष्टी सालसीच्या पुर्तेपणें चित्तांत आणून, वारंवार अनेक प्रकारचीं पत्रें आह्मांस येतात, हें आश्चर्य वाटतें." ऐसे बोलण्याचे भाव येथील दिसून आले. दुसरें, बाईच्या चित्तांतील खमीर पाहतां दिसून आला की, तुकोजीबावांस व नारो गणेश यांस सरदारी दिवाणगिरीचीं वस्त्रें आपण दिल्हीं. त्यावरून श्रीमंतही त्यांजवळून चाकरी घेऊं लागले. तें आह्मांसच प्रतिबंधक जालें. त्यांणीं आह्मांवर बाकीच्या ऐवजीं वरात केली. तस्मात् आह्मी जो खर्च करितों तो गैरवाजवी, नी ते खर्च करितात तो वाजवी! ऐशा प्रौढतेनें आह्मांस लिहितात. ह्मणून येथील चित्ताची विक्षेपता. आपण कमाविसदार अथवा इजारदार नाहींत कीं या रीतीचीं त्यांचीं पत्रें मान्य करावीं. वरकड त्यांनीं सरळपणें लिहिल्यास येथूनही पेस्तर सालच्या ऐवजीं ऐवजाची मरबराई होऊन येईलसी दिसती. उगीच बाकीची कुन्हा लिहून सरकारकामास हिसका देणें हें त्यांसही योग्य नाही. येरवीं सरकारकामाविशीं त्यांजकडून स्वच्छता अथवा आपल्या गृहकृत्याविशीं अंतःकरणनिर्मलता असलीया इकडेही कोणे गोष्टीचा पेंच दिसत नाहीं. ऐसे येथील भाषणान्वयें अर्थ ध्यानास आले. श्रीमंत राजश्री दादासाहेब बडोद्यास आले. ह्मणून बाजारी वर्तमान. ग्वालेर अद्याप खालीं जाली नाही. राजश्री पाटीलबावांनीं बावनबुरजी गढी घेऊन दुसरे गढीस लागले आहेत ह्मणून साहुकारी वर्तमान. भडोचचा किल्ला पाटीलबावा इंग्रजाजवळ मागतात, ह्मणून यांतच वर्तमान ऐकिलें. परशरामबावा महापुरुष कोंकणस्थ आहेत. ते काशीस जायास येथें आले आहेत. त्यांचे विद्यमानें नारो गणेश यांचें बोलणें अंतस्थ बाईशीं कांहीं आधिक्य करावें. आपल्यास एकलें बोलावलें तर वचनप्रमाण मातबर. मध्यस्थ या बावांनीच होऊन, त्यांस आंतून बाईच्या पायावर घालावें, असें अनुसंधान बावांनीं लावलें आहे. परंतु बाई ऐकत नाहींत. बाईचें मानस नारोपंत आपल्या कारभारांत किमपि नसावा. तत्रापि, श्रीमंत नानासाहेबांच्या व पाटीलबावांच्या विद्यमानें आपल्या मनोदयानरूप जें घडणें तें घडावें, असें मानस आहे. तुकोजीबावांस दूर करून दुसरा प्रकार करावा असें किमपि

नाहीं. ये गोष्टीचा अंतर्बाह्य पुर्तेपणें बारीक शोध करायाचा तो केला. मुख्य नारो गणेश कारभारांत नसावे. पूर्ववत्प्रमाणें आपले आज्ञेत चालावें. लक्षांपैकीं दोन लक्ष. एक स्वामींचें व एक पाटीलबावांचें. दोन्हीं लक्षें दृढतर पक्कीं राखावीं. कदाचित् पाटीलबावा समयोचित प्राप्तीप्रमाणें कोणीकडेस कल देतील असेंही एकांतीं ह्मणतात. परंतु नाना वचनाचे पक्के आहेत. बोलल्या बोलास त्यांजकडून अंतर होणार नाहीं. असें जाणून, पक्केपणें आपलें लक्ष राखून आहेत. कदाचित् सरकार आले, अगर आणिक कोणी बाईबायको ह्मणून दाबाच्या गोष्टी सांगतील, तर तेंही सहन होणार नाहीं. सुभेदारांपेक्षां अधिक दाब राखून आहेत. जे गोष्ट होणें ते आपला दाब राखूनच व्हावी. इकडील महालच्या ऐवजाविशीं हरघडी पत्रें येतात. ते आपण वाजवीचे रुईनें मान्य करीत नाहीं ह्मणून कांहीं महालास उपद्रव सरकारअनुमतें कोणीं केला, तर इकडे पाटीलबावांचें लक्ष पक्केपणें आहेच. उभयतां मिळून यावें. धंद्यासही कदाचित् पाटीलबावा कच्चेपक्के जाले तर आपल्या हातापायांतही कुवत आहे. भोपाळवाले पठाण टिकाइताशीं बेरोख होऊन आले आहेत. त्यांशीं परवा बोलणें चालणें एकांतीं पक्केपणेंच जालें आहे. त्यांचे कबिले बंदोबस्त ठेवायास इंदुरांत जागा करून देविली. तीन हजार पठाण लगीं लाऊन ठेविले आहेत. परंतु मुख्यत्वें कायावाचामनेंकडून नानासाहेबांचें लक्ष पक्केपणें राखावें. त्यांजकडून उपेक्षाच जाली तर एक दोन वेळां सहन करून, सरकारचा शब्द सरकाराकडे लाऊन, पुढें जें कर्तव्य तें करावें. परंतु केवळ नम्र गोष्ट सांगायाचें ध्यान नाहीं. लग्नपट्टीच्या ऐवजाकरितां फार दिवस जाले ह्मणून जासूद रागें भरून बोलला, तितकें सहन जालें नाहीं. मजला एकांतीं बोलावून सांगितलें जे, "आमचे येथें दरबारांत अधिकउण्या गोष्टी कोणीं बोलाव्या नी आह्मीं ऐकून घ्याव्या, असा पथ नाहीं. तुमच्या अंगांनीं जरी ताठून बोलले, तें देखील आह्मांस सहन होणार नाहीं. मग तुह्मीं कशास बोलावें? असाच श्रीमंत आमचा लाड बाळगीत आले आहेत आणि आह्मांसही त्याशिवाय दुसरें दैवत नाहीं. अतःपर तुह्मी आपल्या जासुदास सांगा, दरबारांत अधिकउणें बोलूं नको. कारकून जाबसाल करितात; आह्मी त्यांशीं बोलतच आहों." जासुदाचें बोलायाचें कारण काय? आह्मी तुमचे शिलेदार नाहीं. शिपाई आहों. पाहतां असें येथील इंगित आहे. तुकोजीबावांचें सरळपणें बाईस पत्र आलें ह्मणजे पेस्तर सालच्या ऐवजीं साऱ्या महालावर वर्गणी होऊन दोन लक्षांची सरबराई होईल. हें पत्र एकांतीं वाचून ठेवावें. फयश जाल्यानें सेवकाची येथें पत राहाणार नाहीं. हे विज्ञप्ति."

**लेखांक ९८.** ता. ८ जून इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ शु॥ ८ शके १७०४.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ रज़बपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमानः—ये प्रांतीं मवासांनीं भंवताला उपद्रव फारच दिला आहे. याकरितां दोन तीनशें फौज तयार करून, राजश्री राघो रणसोड सरपागे यांस समागमें देऊन, माळवे प्रांतीं रामपुऱ्याकडेस पाठविले आहेत. ब्ऱ्हाणपुरीं देवजी गौळी आहेत. त्यांसही बाईंनी लिहिलें जें, "इकडून आह्मीं फौज पाठविली आहे. तिकडून तुह्मीही दोन तीनशें लोकांनिशीं येऊन, दोहींकडून फौजा घालून रामपुरवाला व काटकूटवाला दोही मवासांचें पारिपत्य करणें." त्यास गौळीमजकुरांनी पन्नास स्वार व दोन तीनशें पेंढारी पाठविले. ते पेंढारी यांचा मुलूख लुटूं लागले. पारिपत्य करणें एकीकडेच राहिलें. तें वर्तमान येथें बाईस कळलें. मग राग भरून गौळीमजकुरास पत्र लिहिलें. त्यावर त्यानीं पेंढारी बोलावून घेतले. पुढें फौज पाठवितात कीं नाहीं, न कळे. राजश्री चिमाजी बुळे झाबवाल्या पाळेगारावर गेले होते. त्यांजवर छापा घातला. शें दोनशें माणूस उभयपक्षीं ठार जखमी जाहलीं. परंतु यांनीं जागा सोडली नाहीं. इंदुरीहून थोरली तोफही नेली होती. तोफेनें जेर जाले. झाबें सोडून गेले. बुळेमजकुरांनीं झाबें हस्तगत केलें ह्मणून वर्तमान आहे. राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून खेतसी सावकाराचा कासीद चौदा दिवसांचा आला. त्यानें जबानीं वर्तमान सांगितलें जें, "ग्वालेरीभंवतालें पाटीलबावांनी मोर्चेबंदी केली आहे. किल्याचे पूर्वेस आपण आहेत. किल्याचे शहरपन्हाची दिवाळ पन्नास पाऊणशें हात तोफा लावून ढांसळून दिली आहे. मातबर विहिरीचें पाणी बंद केलें आहे. किल्यावर कोठें कोठें तळीं आहेत, तें पाणी किलेवाले पितात. किल्यावर गोहदवाल्याची राणी आहे, व किलेदार निराळा होता. त्या किलेदाराशीं पाटीलबावांनीं सूत्र लाविलें होतें. त्यांच्या अनुमतें किला हस्तगत व्हावा. तों तें वर्तमान ते राणीस कळलें. तिनें तो किलेदार बोलावून तोफेचे तोंडीं देऊन उडविला. किल्याचा बंदोबस्त मुस्तकीम केला. जागां जागां नाकेबंदीचीं माणसें फेरचौक्या ठेवितात. त्यावर दो चौ दिवसांत पाटीलबावा स्वारी करून किल्याकडेस जात होते. तों किल्यावरील गोलंदाजानें तोफेचा गोळा डागला. त्या

गोळ्यानें जरदा घोडा ठार जाला. एक दोघें माणसेंही ठार जालीं. फिरून स्वारी डेऱ्यास आली. खेरखैरात केली. लोकांनीं नजरा केल्या. पाटिलबाबांखालील घोडा पडला किंवा कोतवाल घोडा पडला हें नकळे." याप्रमाणें वर्तमान कासीदानें जबानीं सांगितलें. इंग्रजांचा सलाहही पाटीलबावांच्या विद्यमानें होणार म्हणून सांगत होता. श्रीमंत राजश्री दादासाहेब अद्याप सुरतेजवळीच आहेत. पाटीलबावांकडील कारकून राजश्री केसो अनंत दादासाहेबांकडेस गेले आहेत. त्यांचीं त्यांचीं बोलणीं होऊन कागदपत्रें पाटीलबावांकडेस आलीं आहेत. येथून उत्तरें जातील तेव्हां काय होणें तें होईल. ह्मणून हेंही सावकारी वर्तमान सेवेमी श्रुत होय. राजश्री बाजीराव बर्वे यांच्या बंदोबस्ताविषयीं सरकारचीं आज्ञापत्रें बाईस व उभयतां सेवकांसही आलीं. तीं पत्रें पाहून बाईचें पत्र बाईस एकांतीं देऊन बोलणें जाहलें. तें पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलेंच आहे. सरकारचे आज्ञेप्रमाणें त्यांचा बंदोबस्त करावा, येविषयीं दोन चार वेळां बाईशीं बोललों व सरकारच्या पत्राचें उत्तरही मागितलें. ते वेळेस बाई बोलली जे, "मी बाजीरायांस एकांतीं बोलावून विचारितें. कदाचित् त्यांनीं ह्मटलें कीं, आह्मीं कोठें काय वावगी वर्तणूक केली, ती आमचे आंगीं लावा, तर त्यांचे आंगीं मुद्दा लावावा लागेल." आह्मीं उत्तर केलें जे, सरकारांत लिहून पाठवूं. तेथें कार्य अडलें असेल तें आज्ञापत्र पाठवितील. पक्केपणें शोध लागल्याशिवाय इतका विस्तार लिहिणार नाहींत. तेथून आज्ञा येईल त्याप्रमाणें उत्तरही करूं. बाई ह्मणाली जें, "आह्मांस तो कांहीं वावगी वर्तणूक आढळत नाहीं. बरें. त्यास विचारून तुह्मांशींही बोलूं, व श्रीमंतांच्या पत्राचें उत्तरही देऊं" असें बोलली. त्यावर दुसरे दिवशीं बर्व्यांस व त्यांचे कारकुनास एकांतीं बोलावून, काय विचारलें असेल तें विचारोत. तदोत्तर तिसरे दिवशीं बाईस विचारिलें. त्यांनीं उत्तर केलें जे, तेथें तो कांहीं अढळत नाहीं. एक पाटीलबावांकडील पत्रें आलीं होतीं, तीं त्यांनीं आह्मांस दाखविलीं होतीं. त्याचीं उत्तरेंही आह्मींच सांगून आपलें रुबरू लिहून पाठविलीं. वावगी वर्तणूक पाहिल्यास आह्मी त्यांचा मुलाजा करणार नाहीं असें बोलली, व सरकारच्या पत्राचें उत्तरही याच अन्वयें लिहिलें आहे. आह्मांस उभयतांसही वाचून दाखविलें. त्याजवर विनंति जाली ह्मणजे मागून कासीदजोडीबरोबर सेवेसी पाठवूं. सरकारच्या लग्नपट्टीच्या दोन लक्षांचा जाबसाल, राजश्री तुकोजी होळकर यांचें पत्र बाईस आलें, त्यांत मजकूर लिहिला आहे कीं, बाईकडील महालांची बाकी त्यांनीं लिहून पाठविली असें ऐकिलें. परंतु

पहिलें बाईचें बोलणें आहे कीं इकडील सारे महालावर तफरीक करून ऐवज वसूल करून देऊं. तेथें सावकारांनीं वगैरे कांहीं. बोभाट त्यांनीं सांगितला, तर तेथें श्रीमंतांनीं ऐकूं नये, असें बोलली होती. त्याप्रमाणेंच पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. त्यास तुकोजीबावांचें पत्र बाईस आल्यावर बाई आह्मां उभयतांशीं बोलली जे, "ज्येष्ठ अखेरीं लक्ष रुपये व आषाढ अखेरीं लक्ष रुपये, एकूण दोन लक्षांचा भरणा दों महिन्यांत करून देऊं" असें बोलली. त्याप्रमाणें पेशजीं विनंतिपत्रीं सेवेसी लिहिलें आहे. त्यास, सांप्रत वर्तमान ऐकिल्यांत आलें आहे जे, इकडे तमाम परगण्यांवर लग्नपट्टीची तफरीक करून कमाविसदारांस पत्रें लिहिलीं आहेत. एक कारकून तयार केला आहे. त्यास महालोमहालीं पाठवून महालकऱ्या कमाविसदारांस दाखवून ऐवज त्यांजकडे लागू करावा. त्यांची निशा पक्केपणें करून घ्यावी. मग येथून गुप्तरूपें दोन लक्षांच्या हुंड्या करून सरकारात पाठवाव्या. जरकरितां कमाविसदारांनी तुकोजीबावांच्या अगर सावकारांच्या पत्राचा उजूर केला, तर त्याप्रमाणेंच सरकारांत लिहून पाठवावें, जे उजूर करितील त्यांजकडून ऐवज तेथें घ्या ह्मणावें, असाही मजकूर ऐकिल्यांत आला आहे. कसा परिणाम लागेल तो पहावा. दुसरें वर्तमान डांकेचें:—कासीदजोड्या ये प्रांतीं यांच्या तालुक्यांत जागां जागां आहेत. त्यास गांवोगांव कासीदजोड्यांस दोघांचें दळण व लाकूडफांटे व रातबिरात. माणूस रहादारीस द्यावें, हा दस्तुर कोठेंही आहे. चालतच आहे. येथेंही हे देवितात. परंतु हा देश मवास, जागां जागां भिल्लांची वस्ती, यामुळें दळाई व लांकडाचे रातबिरातच्या माणसांचे नित्य येथें बोभाट येतात; यांसीं कटकट करीतच आहे. सांप्रत पर्जन्यकाळ आला. कासिदांस पाणीपावसाचे आसरा पाहिजे. यास्तव कासीद येथें आले की, ज्या गांवीं जोडी आहे त्या गांववाल्यांस ताकीद करवून, छपर अगर आसरा कांहीं करून देववा ह्मणून आले. यास्तव बाईकडे जाऊन विनंति केली जे, "हा पर्जन्यकाळ आहे. कासिदांस, गांवगांववाल्यास ताकीद करून, एक एक छपर करून देवावें. इतके दिवस उन्हाळा होता. कशीही गुजराणी केली. आतां आसरा पाहिजे. यास्तव एक एक छपर करून देवावें. आणि दुकानांत राहूं देत नाहींत. कोठें चावडी देऊळ तेथें उतारकऱ्यांचा उपद्रव. निखालस असले ह्मणजे बरें." ह्मणून बोललों. ते रागें भरली. "कोठवर उपद्रव सोसावे? वरसोंवरीस यांची डांक बसली तर आह्मीं कोठवर यांस काय द्यावें? साफ आमच्यानें कांहीं देववत नाहीं. तुह्मी आपल्या धन्यास लिहून पाठवा." मीं उत्तर केलें जे, "हा धाकटा बोभाट धन्यास काय लिहावा? आपण धनीच येथें आहेत. उभयपक्षीं आह्मी चाकर.

इकडील काय सुक्त असुक्त वर्तमान काय येईल, तें आपल्यासच विनंति करावी." त्यास रागें भरून साफ बोलली जे, "आमच्यानें होत नाहीं. कासीद रोजमुरे खातात. त्यांनीं आपलें करून घ्यावें." असें बाईनीं उत्तर केलें. त्यास मीं असें लिहिलें ह्मणून बोभाट लिहिला, असें यांस कळल्यास रागें भरतील. लहान मोठे जाबसालास झटावें लागतें. आधींच तो सेवक यांचे इतराजींत आहे. यास्तव कासिदांनींच बोभाट लिहिला ह्मणून यांस परियायें लिहून डांकेचा बंदोबस्त करावा, ह्मणून युक्तीच्या वाटेनें बाईस आज्ञापत्र यावें. ह्मणजे बंदोबस्त करितील. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति. पाटीलबावांच्या लष्करांतून वाणी आले. त्यांनीं सांगितलें जे, 'ज्यांस उचापती दिल्या त्यांजकडील पैसा येईना. दुसरें महागाई. वैरण नाहीं. रुपया फसला! बैलास वैरण मिळेना. यास्तव खराबा होऊन निघून आलों. लष्करांत पैसा नाहीं. धान्य नाहीं. वैरण नाहीं. असें संकट आहे! ग्वालेर लवकर येण्याचा रंग दिसत नाहीं ह्मणून आलों' ह्मणाले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ९९.** ता. १० जून इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ शु॥ १० शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ रजबपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. श्रीमंतांच्या लग्नाच्या ऐवजाचा मजकूर बाईनीं करार केला आहे की, ज्येष्ठ अखेरीस लक्ष रुपये व आषाढ अखेरीस लक्ष रुपये, एकूण दोन लक्षांचा भरणा याप्रमाणें करून द्यावा, असें बोलण्यांत आलें. त्याप्रमाणें यांनीं इकडील महालांवर तफरीक करून कमाविसदारांकडे पत्रें पाठविलीं आहेत. तरतूद करितात. राजश्री पाटीलबावांच्या लष्करचें वर्तमान खेतसी सावकाराचे येथें पंधरा दिवसांचा कासीद लष्करांतून आला. तो जबानीं सांगत होता जे, "पाटीलबावांनीं ग्वालेरीस चहूंकडून मोर्चे लाविले आहेत. किल्याचे वरील शहरपन्हाची दिवाळ पाऊणशें ऐशी हात तोफांनीं ढांसळून दिली आहे. पाण्याची बावडीही उघडी पडली आहे. दोन कीं तीनशें दरवाजेही घेतले आहेत. वरते दोन दरवाजे मुस्तकीम आहेत. किल्लेदारांशीं कांहीं पाटीलबावांनीं सूत्र लाविलें होतें. किल्ला हस्तगत होण्याची गोष्ट-मात लागली होती. तें वर्तमान, गोहजवाल्याची राणी किल्यावर आहे, तिजला हें

वर्तमान कळलें. ते समयींच किल्लेदारास आणून तोफेचे तोंडीं देऊन उडवून दिला. पक्केपणें किल्ल्याचा बंदोबस्त केला. तिसरे दिवशीं किल्ल्यावरील शिबंदीच्या मिसळी पालट करितात. किल्ल्यावर पाण्याची दुर्मिळता जाहली आहे. पर्जन्य लवकर न पडला तर पाण्यावांचून घाबरतील. दुसरें वर्तमान, पाटीलबावांची स्वारी किल्ल्याकडेस जात होती. त्यास किल्ल्यावर गोलंदाज फिरंगी आहे, त्यानें स्वारीवर गोळा डागला. त्या गोळ्यानें जरदा घोडा ठार जाला. एक दोन मनुष्यही ठार जाले. स्वारी फिरून डेऱ्यास आली. खेरखैरात केली. घोडा कोतवाल होता कीं त्याच घोड्यावर पाटीलबावा बसले होते, इतकें ठाऊक नाहीं" ह्मणाला. याप्रमाणें सावकारी कासिदानें जबानीं वर्तमान सांगितले. खेतसीचे दुकानी शोध केला. त्यांनींही सांगितलें जे, कागदपत्रीं वर्तमान कांहीं नाहीं. कासीद जबानी सांगतो. याप्रमाणें ऐकिलें वर्तमान. राजश्री चिमाजी बुळे झाब्यास लागले होते. बाईनीं इंदुरीहून मातबर तोफ दिली होती. त्या तोफेचें तोंड एक दोन बारांस निघून पडलें, परंतु तोफ बरीच लागू जाली. पाळेगारानें बाहेर निघून यांजवर छापाही घातला. उभयपक्षीं दोन अडीचशें माणूस कामास आलें, परंतु खेत सोडलें नाहीं. त्यास हटवून किल्ल्यांत घातलें. तोफांच्या आवाजानें पाणी किल्ल्यांतील नाबूद जालें व आंतील महालही त्यांचे तोफेच्या गोळ्यानें पडले. खायासही नाहीं. यामुळें झाबेंची गढी सोडून मवास डोंगरांत निघून गेला. गढी हस्तगत केली ह्मणून वर्तमान ऐकिलें. अद्याप कागदींपत्रीं नाहीं. श्रीमंत राजश्री दादासाहेब जेथें आहेत तेथेंच आहेत ह्मणून वर्तमान ऐकितों. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विज्ञापना."

---

**लेखांक १००.** ता. १८ जून इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ व॥ ४ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ रजबपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. अलीकडे सरकारचे जासूदजोडीबरोबर श्रीमंतांचे लग्नपट्टीच्या ऐवजाकरितां सरकारचीं पत्रें केसो भिकाजींस व अहल्याबाईस आलीं जे, तिघां सावकारांस. एक लक्ष अठ्याण्णव हजार एकशें रुपये तेथून हुंड्या करून पुण्यास सावकारांस ऐवज पावता करणें ह्मणून आज्ञापत्रें व सावकाराच्या वराता छ १२ मिनहूस संध्याकाळीं येथें दाखल जालीं. ते दिवशीं शुक्रवारची रात्र. त्यावर दोन तीन दिवस बाईस दाखवायास समय

सांपडला नाहीं. तदोत्तर काल चंद्र १६ रोजीं तृतीय प्रहरीं, केसोपंत व मी उभयतांही सरकारचीं पत्रें व सावकाराच्या वराता घेऊन दरबारास गेलों. दरबार भरला होता. चौ घटकांनीं कांहीं लोक बरखास्त जाले. दिवाण मुत्सद्दी होतेच. ते समयीं सरकारचीं आज्ञापत्रें बाईस दिलीं. राजश्री मुकुंदराव हरी दिवाण यांनीं वाचून दाखविलीं. सावकारांनींही आलाहिदा आपले जासुदाबरोबर पत्रें बाईस पाठविलीं होतीं. तींही दाखविलीं. ऐकून घेतलीं. कांहीं उत्तरें केलीं नाहीं. त्यावर दोन घटका दिवस राहतां दरबार बरखास्त जाला. बाई उठली. ते समयीं केसोपंत बोलले कीं, सरकारचीं पत्रें आमचे जोडीबरोबर आलीं व सावकाराचाही जासूद आला आहे. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, सावकाराच्या जासुदास आमचीं व तुमचीं उत्तरें देऊन रवाना करा. ऐवजाचा मजकूर तुह्मांशीं आह्मी बोललोंच आहों. तुह्मी येथें आहांच. मग जासूद कशास पाहिजे? इतका जाबसाल जाला. ऐवजाविषयीं बाई पहिलें बोलली आहेत कीं, ज्येष्ठ अखेरीस निमे व आषाढ अखेरीस निमे असा दोन लक्षांचा झाडा करून देऊं. त्यास बाईनींही येथून साऱ्या महालांवर तफरीक करून वराता व कारकून पाठविला आहे. ज्येष्ठ अखेरीसही दहा बारा दिवस राहिले आहेत. ऐवजाची तोड जशी पडेल त्याप्रमाणें सेवेसी लिहूं. जालें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

## लेखांक १०१. 

ता. २७ जून इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. ज्येष्ठ व॥ १३ शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रजबपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनें- करून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष:—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावतील. सांप्रत येथें अधिकोत्तर ह्मटलें तर श्रीमंत राजश्री दादासाहेब परिवारासहित पुण्यास जातात. मोनगडापर्यंत आले आहेत. ह्मणून बाजारी वर्तमान ऐकिल्यांत आलें. सावकाऱ्यांत अगर बाईकडे कागदीपत्रीं वर्तमान नाहीं. आणीकही बारीक शोध करीतच आहें. राजश्री पाटीलबाबा ग्वालेरीसच आहेत. चहूंकडून मोर्चे लाविले आहेत. तोफा लावल्या आहेत. किल्लाही जेर आहे. परंतु अद्याप हस्तगत जाल्याचें वर्तमान आलें नाहीं. दुसरें, राजश्री बाजीराव बर्वे यांची स्त्री सौभाग्यवती जानकीबाई चंद्र २२ मिनहूस रेवा दक्षिणतीरीं आली. तेच दिवशीं अस्पर्श

जाली. यास्तव चार पांच दिवस तिकडेच होती. चंद्र २६ रोज भृगुवारीं मुहूर्तें-करून रेवा उतरून अलीकडेस आली. बाजीराव बर्वे जेथें उतरले आहेत तेथें गेली."

पैवस्ती चंद्र १८ साबांन अर्बा समानीन -बराबर डाक.

## लेखांक १०२.

ता. १२ जुलइ इ. स. १७८३. मि. आषाढ शु॥ १३ शके १७०५.

श्रीगजानन.

"सेवेसी केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ साबानपरियंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर व काशीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रत श्रीमतांच्या लग्नाची वस्त्रें व बहुमान सरकारच्या हुजऱ्याबरोबर स्वामीनीं चंद्र १२ रजबीं रवाना केलीं, ते चंद्र ८ साबानीं दो प्रहरां येथें सेवकाजवळ दाखल जालीं. सेवकासही आज्ञापत्रें होती. त्यांत आज्ञा जे, श्रीमंत राजश्री रावसाहेब यांचे लग्नाची वस्त्रें व बहुमान गंगाजलनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांस येणेंप्रमाणें:--

१ माळ मोत्यांची मोती सुमार एकशें अटरा ११८.

४ कापड सणगें:—

१ पातळ जरी पैठणी

१ व चोळी पैठणी

२ व शाल फर्द सफेत

४

५

एकूण चार वस्त्रे व एक माळ मोत्याची पाठविली आहे. पावती करून उत्तर घेऊन पाठवणें ह्मणून आज्ञा. त्यास, पुण्यांत लग्नाचा समारंभ जाला, तो ऐकून श्रवणद्वारें फारच तृप्तता जाली. सांप्रत उत्साहाची वस्त्रें व बहुमान येथें आलीं, तेंही समारंभेंकरूनच पावावीं या अर्थी, राजश्री बाजीराव बर्वे मंडळीसुद्धां बोलाविले. बाईकडून तबक व परात रुप्याची आणवून, त्यांत वस्त्रें घालून व पानसुपारी तबकांत घालून, वाजंत्री कर्णेकरी ताफे बोलाऊन सिद्धता केली. वाड्यांत बाईकडेस सांगून पाठविलें जे, श्रीमंतांकडून वस्त्रें आपल्यास आलीं आहेत. ते घेऊन येतों. त्यांनींही दरबार करून बसली. 'या' ह्मणून सांगून पाठविलें. पांच घटका दिवस शेष राहातां, समारंभेंकरून वाड्यांत गेलों.

बाईनींही समारंभ, गृहस्थमंडळी व वाजंत्री हें पाहून बहुत संतोष पावली. मुत्सद्दी वगैरे दरबार भरलाच होता.. तबकें बाईपुढें ठेविलीं. सरकारचीं पत्रें हुजऱ्यांनीं पुढें ठेविलीं. तदोत्तर 'पातळ व चोळी बाईच्या हातीं दिली, शालजोडी पांघरविली, व मोत्यांची माळही सेवकांनींच बाईच्या गळां घातली. बहुत संतोषानें वस्त्रें बहुमान बाईनीं घेतला. विडे सर्वांस दिले. बाई बोलली जे, "आह्मांस व सर्व जगतास अलभ्य लाभ, सूर्योदय जाला त्या प्रभूच्या प्रकाशेंकडून सर्वां सर्वत्र आह्मांस आनंद जाला. हे दिवस दृष्टीं पडतील असा कोणासही भरंवसा नवता. परंतु कैलासवासी श्रीमंतांच्या पुण्योदयें व जगताच्या भाग्येंकडून जगत्कुटुंबी प्रभु ईश्वरें उत्पन्न केला." पंडित दोन चार समागमें घेऊन गेलों होतों. ते व सर्व सभामंडळींनीं श्रीमंतांचे गुणानुवाद वर्णन केले. पंडितांनीं आशीर्वादपर स्तुति केली. तदोत्तर बाईनीं हुजऱ्यास वर्तमान विचारलें. हुजऱ्यांनीं श्रीमंतांच्या शब्दरत्नाचें व सगुणपणाचें वर्णन व स्वामींच्या कर्तृत्वाचा बयान फार केला. बाईस व सर्व मजलसीस आश्चर्य जालें. तदोत्तर राजकी वर्तमान विचारलें. बिदरूर इंग्रजांनीं घेतलें होतें, तें परतून टिपूनें इंग्रजांचें पारपत्य करून संस्थान हस्तगत केलें. त्यावर इंग्रज मुंबईहून फिरून जमाव करून टिपूवर जात होते. ते मधेंच धोलपांनीं समुद्रांत पारपत्य करून जाहजासुद्धां सरदार धरले. इंग्रज शरण आले. असें बहुत वर्तमान सांगितलें. चार घटकांपर्यंत वर्तमान ऐकत बसली होती. फारच संतोष पावली. तदोत्तर संध्येचा समय होत आला ह्मणून विडे देऊन बिदा केलें. याप्रमाणें श्रीमंतांच्या पुण्यप्रतापेंकरून समारंभ येथें जाला. सेवेसी श्रुत होय. बाईच्या लेकीस व नातांस दोन पोशाग आणीक असते ह्मणजे बरें होतें. धन्याची मर्जी! राजकी वर्तमानः—श्रीमंत राजश्री दादासाहेब कोंडाईबारीच्या घांटावर दहिवलीस आले ह्मणून बाजारी वर्तमान. दादासाहेबांस घेऊन येयास चौघे सरदार पाठविले ह्मणून स्वामींनीं बाईस व सेवकास पत्रें डाकेबरोबर पाठविलीं होतीं. तें पावती करून बाईचें उत्तर घेऊन सेवेसी पाठविले आहेत. हुजऱ्याचीही आठा चौ दिवसां रवानगी करतील, तेव्हां वस्त्रें बहुमान पावल्याचीं उत्तरें घेऊन सेवेसी पाठऊं. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान कोणी गृहस्थाचे येथें विसां दिवसांचीं पत्रें आलीं. त्यांत मजकूर होता जे, "उरंबवीकडून पायवाट किल्यावर जायाची जाली आहे, व किल्याच्या शहरपन्हाच्या मुढोली ढांसळल्या. हल्ला करायाजोगें जालें आहे. किल्लेवालेही गिराणीस आले आहेत. दिल्लीवाला अमदानी नजीबखानाचा चेला तो दिल्लीस आहे. परंतु त्यानें कोणी भातबर माणूस पाटीलबावांकडेस पाठविला आहे, तोही जवळ आला आहे. त्याचेही भेटीस जाणार. पाटीलबावांची

श्री उज्जनीहून गेली, तेही आषाढ शुद्ध ५ पोंहचणार होती. यांची भेट घेतल्यावर त्या भल्या माणसाच्या भेटीस जाणार. किल्ल्यावर हल्ला करायाचीही मसलत आहे. याप्रमाणें वर्तमान होतें. व्यंकटरमण शास्त्री यांस देवाज्ञा जाली. हें वर्तमान पूर्वी डाकेबराबर सेवेसी लिहिलें होतें. त्यास समाधान नव्हतें. तेव्हां बाईनीं दोनशें रुपये औषधउपायास दिल्हे होते. क्रियेसाठी तीनशें रुपये दिल्हे. तेरावे दिवशीं त्यांच्या घरास जाऊन मुलास वस्त्रशेला एक दिल्हा. श्रीमंत राजश्री दादासाहेब पिंपळनेरास आले, ह्मणोन आजच सावकारी वर्तमान आलें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०३. ता. २४ जुलई इ. स. १७८३.

पो चंद्र ३ रमजान अर्बा. **श्रीगजानन.** मि. आषाढ व॥ ११ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २३ साबानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मु॥ महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर दोन तीन विनंतिपत्रें सेवेसी पाठविलीं. पावलीं असतील. सरकारचीं वस्त्रें लग्नांचीं हुजरे घेऊन आले होते, ती आज्ञेप्रमाणें बाईस पावतीं करून वर्तमान पेशजीं लिहिलेंच होतें. मागाहून हुजऱ्यांचीही बाईनीं रवानगी केली. चंद्र १८ मिनहूस हुजरे येथून रवाना केले. इकडे पर्जन्य आर्द्रा पुनर्वसूपासून फार लागला आहे. रेवेस पाणी फार आले आहे. तीन चार दिवस नावा बंद होत्या. आतां चालतात. श्रीमंतांच्या लग्नपट्टीचा ऐवज दोन लक्ष रुपये येणें त्याविषयीं वरात येतांच बाईस दाखविली. तो पर्याय पेशजीं लिहिलाच आहे. तदोत्तर राजश्री तुकोजीबावाचें पत्र आल्यावर, बाईनीं एकांती मी व केसो भिकाजी उभयतांनीं सरकारची पत्रें दाखवून, ऐवज लवकर द्यावा ह्मणून बोललों. त्यास बाईनीं उत्तर केलें जे, निमे ज्येष्ठ अखेरीं, निमे आषाढ अखेरीस देऊं. आह्मीं विनंति केली जें, याप्रमाणेंच आह्मी श्रीमंतांस लिहितों. (लिहा) ह्मणून बोलली. त्यावर मध्येंही एकदोन वेळां बाईशीं खरें केलें जे, आपण आज्ञा केली ज्येष्ठ अखेर व आषाढ अखेर. त्याप्रमाणेंच श्रीमंतांस आह्मीं लिहिलें आहे. (बरें) ह्मणाली. ज्येष्ठ अखेरीस ऐवजाविषयीं हटकलें. ते वेळेस बोलली जें, 'वराता महालोंमहालीं गेल्या आहेत, ऐवज आला ह्मणजे देऊं.' आह्मीं विनंति केली जे, आपण आज्ञा केली होती ज्येष्ठ अखेर व आषाढ अखेर. त्या वेळेस बोलली जें, 'आह्मीं असा करार नाहीं केला.' खरें खोटें करावें, तर थोर मनुष्य. त्यांतही मर्जी

"सलाह जाणून, तुह्मांस हें आज्ञापत्र सादर केलें असे. त्यास, राजश्री बाजीराव गोविंद यांचे विचारें नवाबाशीं बोलणें. आपली मसलत होत असल्यास दहा पंधरा लक्ष रुपये पाठवून देऊं ह्मणून नवाबांनीं हजूर पेशजीं लिहिले आहे. त्याचे स्मरण नवाबास देऊन एवेज घेऊन जरूर पाठवणें. नवाब थोर सरदार आहेत. आपलें लिहिलें कमी पडूं देणार नाहींत. रुपये खामखा देतीलच. तुह्मीं कारस्थानें करून ऐवज घेऊन पाठवणें. न देत असे दिसून आल्यास, सनदाही द्यावयाच्या कबूल करणें. परंतु ऐवज अगोधर निशा पाहून घेणें. उत्तम पक्ष पंधरा लक्ष रुपये, मध्यम पक्ष बारा लक्ष रुपये, कनिष्ठ पक्ष आठ लक्ष रुपये निदानीं, रोख घेऊन मग सनदा देणें. मसलतींत अंग्रजांचे हुकुमाविसीं गुंता राहिला नाहीं. खातरखा हुकूम आला. विलायतेहून टपका बंगालकरांस आला. त्याजवरून ते शुद्धीवर येऊन, त्यांनींच हुकूम सरकारकुमकेविषयीं मुंबईकर जनरल कोशलास पाठविला व पांच पलटणें खुष्कीनें रवाना केलीं. ते काल्पीस येऊन पोहचलीं. मदराजेस ताकीद पाठविली. तेथून पलटणें दर्याचे मार्गे रवाना जालीं. तीं आठां दिवसांत येऊन पोंहचतील, व बंगालकरांनीं हजुर पत्र व पाहिजे ते कुमक देतों, आपले कामास अंतर करीत नाहीं, या मजकुराचे पत्र पाठविलें. त्याची नक्कल पाठविली आहे. ते नवाबास दाखविणें. इंग्रजी जमियत व सरंजाम श्रीकृपेकरून पोक्तच प्राप्त जाहला. पुढें बारभाई व निजामअलीखान मिळून दुप्पट जाले तरी पर्वा धरीत नाहीं. थोडे मेहेनतीनें पारिपत्य करूं. ऐवजाचे काम नवाबाजवळून करून पाठवणें. चार पक्ष लिहिले आहेत. तेथील कारस्थानीचा डौल पाहून, साधतां साधतील ते साधून, पैका नवाबाकडून घेऊन हजूर पाठवणें आणि सनदा मग देणें. जाणिजे." छ १७ रबिलावल आज्ञा प्रमाण."



## ५ शाहू महाराजांची इनामदारांस ताकीद.

सातारा जिल्ह्यांत तारळें ह्मणून एक गांव आहे. हा गांव महाराष्ट्रांतील प्राचीन व प्रतिष्ठित महाडीक ह्या घराण्याकडे इनाम आहे. ह्या महाडीक मंडळीपैकीं शंकराजी राजे महाडीक हे छत्रपति शाहू महाराजांचे मेहुणे होत. शाहू महाराजांची बहीण भवानीबाई त्यांस दिली होती. त्यांनीं आपल्या नात्याच्या जोरावर, तारळ्याच्या रयतेवर वसुलाच्या कामीं अधिक सक्ती केली, व तीस फार हैराण केलें. तेव्हां छत्रपति शाहू महाराज ह्यांच्याकडे सर्व रयत फिर्याद गेली, आणि तिनें महाडीक राजे ह्यांच्या विरुद्ध तक्रार केली. शाहू महाराज ह्यांनीं आपले प्रतिनिधि श्रीनिवास परशुराम ह्यांस आज्ञा करवून, शंकराजी राजे महाडीक ह्यांस एक सणसणीत ताकीदपत्र पाठविलें, व प्रजेवर जुलूम करूं नये ह्मणून सक्त हुकूम केला. हें पत्र वाचलें ह्मणजे मराठीशाहीमध्यें कोणी इनामदारानें

आपल्या प्रजेवर जुलूम केला, तर त्याबद्दल . कशी दाद लागत असे, तें दिसून येतें. प्रतिनिधींच्या पत्रांतील 'ऐसा वतनदारीचा पेशा नर्मदेपासून रामेश्वरपर्यंत नाहीं.' 'रयत चोराची नव्हे.' वगैरे वाक्यें वाचण्यासारखीं आहेत. शाहू महाराजांच्या प्रत्यक्ष मेहुण्यास लिहिलेलें हें पत्र आहे, ही विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

[किरकोळ] श्री.

" राजश्री शंकराजी राजे महाडीक गोसावी यांस":—

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित श्रीनिवास परशुराम प्रतिनिधी आशीर्वाद. येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेषः—तारळे महालचे रयता हुजूर आले. त्यांनीं विनति राजश्री स्वामीसंनिध केली कीं, "जुजवी रयत महालामध्यें राहिलो आहों; त्यास आपल्यास राहवत नाहीं. आपल्यास निरोप देणें. शेतें पेरलीं आहेत ते मळून आणावीं. आजिवरी कोणाचा बोभाट सांगितला नाहीं. ज्या गांवीं चारशें पांचशें दस्त वेत होतों, ते चौथाई दस्तावर आले. महाल खराब पडला. जुजवी धरखाद व वतन ह्मणून राहिलों. कोणे गांवीं चार पांच खादये आहेत. तेही आतां रहावत नाहीं. निरोप देणें. जाऊं." ह्मणऊन विनति केली. त्यावरून गांवचा हिशेब आणविला. मनास आणितां नाडगौडकीस हक्क हुजुरून रुपये ऐन दस्तास तीन व इनाम खेरीजइनाम दर चावरी अव्वल दुमसीम प्रतीचे एक बिघा याप्रमाणें नाडगौडकीस, व सरदेशमुखी दहा रुपये ऐन दस्तास चावरी दोन बिघे याप्रमाणें, तुह्मांस जेव्हां राजपत्रे करून वतन दिल्हें, ते समयीं येणेंप्रमाणें करून हक्क इनाम दिला. त्याचे बार मजमू सुरनिसीकडे आहे. आणि तुह्मी दूरसदे नाडगौडकी साडेबारा, व सरदेशमुखी साडेबारा, याखेरीज ठाणेपट्टी रुपया बिघा व पावलेपट्टी पावला, एकूण सव्वा रुपया बिघा, त्याचा वसूल नक्त हिशेब पहातां जितका दिवाणचा नक्त गल्ला वसूल, त्यास तुमचा नक्तच तितका वसूल इनाम चावरी नाडगौडकी सरदेशमुखी तीन बिघे. त्यास ज्या गांवीं जितुके अव्वल भात शेतें व पाणियाखालील जमिनी तितुक्या मन मानेसे इनाम आपला ह्मणून त्याचा वसूल तुह्मी नेतां. मोईन काय, त्यास घ्यावी काय, (हे ) बाबीं चित्तांत अर्थ आणिला नाहीं; व दिवाणांतून मोजून इनाम घ्यावा तेंही नाहीं. दिवाणचे रयताचे जमीन तुह्मीं घेतल्या आहां. ऐसा वतनदारीचा पेशा नर्मदेपासून रामेश्वरपर्यंत नाहीं. मुऱ्याचे गांव, सवंगाई कोणे रीतीची ? मोईन राजश्री स्वामींनीं करून दिली आहे काय आणि घ्यावें काय ? हा अर्थ किमपि चित्तांत न आणितां, महाल धुळीस मिळविला. ऐशियास हे गोष्ट, तुह्मी वतनदार, तुह्मांस उचित नाहीं. आह्मींही अजीवर चालढकल केली कीं, तुह्मी रयतेचा अर्थ चित्तांत आणाल. परंतु दिवसेंदिवस महाल खराब पडत चालिलेस. रयत चोराची नव्हे. महाल राजश्री स्वामींचा खालसा आहे. आह्मांस महालचा ऐवज भरून द्यावा लागतो. सालोसाल नुकसान तुह्मांमुळें येतें. हें कांहीं राजश्री मजरा देत नाहीं. जमिनी रयेतेचे हातून नाडगौडकी सरदेशमुखी ह्मणून

वसूल नेतां. चावरी तीन बिघाहून ज़ाजती खालशाचा ऐवज तुह्मी नेतां, त्याचा ऐवज तुह्मांकडे येणें, त्याचेही अजीवर रमात केली. याउपरी राजश्री स्वामीनीं तुह्मांस राजपत्रें सादर केलीं आहेत. तेणेंप्रमाणें तुह्मी नाडगौडकी दोन रुपये ऐन दस्तास दरसदे नक्त गल्ला दिवाणशिरस्त्याप्रमाणें व इनाम दोन बिघे ती प्रतीचे प्रमाणें, इनाम सरदेशमुखी दहा रुपये नक्त गल्ला तहप्रमाणें, व चावरी इनाम दोन बिघे प्रमाणें घेणें. जाजती एक रुपया व जमीन घ्याल तरी घ्यावया प्रयोजन नाहीं. राजपत्र अमान्य करून रयत नागवाल, तरी महाल अगदीं खराब पडेल. महालचें दुर्निमित्य तुह्मांवर येईल. महालच पुन्हां वसतो ऐसा अर्थ नाहीं. रयत एक राहणार नाहीं. याउपरी राजश्रींचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणें असली, तरी सातारा कराड नाडगौडकी सरदेशमुखी वतनदार खातात, त्याप्रमाणें तुह्मीं खाणें. चित्तास नये आणि महाल खराबच करणें असलीया, तैसेच रयतेस सांगणें. तदनुरूप राजश्रीस विनंति करणें केली जाईल. बहुत कांय लिहिणे! चंद्र १५ सफर. धनगर महालचाही तह दोन रुपये नाडगौडकी दहा रुपये सरदेशमुखी याबद्दल घेणें. जाजती तगादा न लावणें. बहुत काय लिहिणें. [मोर्तब.]"



## ६ नादिरशाहाची दिल्लीवरील स्वारी.

नादिरशाहानें दिल्लीवर स्वारी केली, त्या वेळीं दिल्लीहून दररोजच्या हकीकतींचीं बातमीपत्रें शाहू राजास व पेशव्यांस येत असत. हीं पत्रें अतिशय महत्त्वाचीं व मनोरंजक असलीं पाहिजेत. ह्या पत्रांपैकीं एक पत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. तें येथें सादर करितों. ह्या पत्रामध्यें छ. २० पासून छ. २७ पर्यंतची आठ दिवसांची हकीकत आहे. अर्थात् ही हकीकत विश्वसनीय असली पाहिजे.

**"नकल वाकाय दरबार नादरशाहा.—मु॥ दिल्ली. माहे जिल्हेज.**

छ. २० रोजः—निजामनमुल्क यास पुत्र जाला. घरच्या मुत्सद्यांनीं घरांतच नजर गुजरानली. नौबत वाजविली नाही. कलम १.

छ. २१ रोज बुधवारः—नादरशाहा चार घटिका दिवस आलियावरी गुलालीबागचा तमाशा पाहायास चालले. ते समयीं सरबिलंदखानास बोलावून शिरपाव दिल्हा, आणि बोलिले कीं, 'तुह्मी गुजराथीची सुभेदारी केली आहे. त्यास जयसिंग वगैरे अमिरांनीं पेशकशी दिल्ही आहे, तेणेंप्रमाणें .देणें. नाहींतर नतिजा पावाल.' कलम १.

निजामनमुलुकांनीं पादशाहास अर्ज केला कीं, 'गनीम मराठे नर्मदा उतरून माळव्यांत फौज आली. तुह्मी ह्मणाल कीं आपणास खबर न केली.' त्यावरी त्यांणीं उत्तर दिल्हें कीं, 'तुमचा लेक त्याचा हरोल आहे.' त्याउपरी निजामांनीं अर्ज केला

कीं, 'त्यांचे कैदेंत आहे. त्यानें पुढें घालून आणिले असेल तर आपणास दखल नाहीं.' मग त्याउपरी त्यांणीं आज्ञा केली कीं, 'मऱ्हाठ्यांसीं सलूख करा.' त्याउपरी त्यांणीं उत्तर दिल्हें कीं, 'पादशाहा गेल्याखेरीज होत नाहीं.' कलम १.

जमाखर्च दखनचे तयार होऊन नजर गुजरानली. जमाखर्च पाहिले, आणि बोलिले कीं, मोघम लिहिलें आहे; समजत नाहीं. तर तपशीलवार लेहून समजावणें. अर्ज पोंहचला कीं, तमाम कागद जळून गेले. आणिक हुकूम जाला कीं, कागद कित्येक असतील ते आणून हिशेब तयार करून समजावणें. कलम १.

अर्जेहुकूम जाला कीं, असफज्या निजामनमुलूख व कमरदीखान वगैरे कोणी पालखींत व हत्तीवर स्वार न होय. घोडेवर स्वार होत जावें. कलम १.

जानीखान फौजदार पा। जालिंधर यास सिरपाव देऊन रवाना केला. कलम १.

केसोराव वगैरे हरकारांपासून पसतीस हजार रुपये नजर घेतली. कलम १.

तपशील.

१४००० केशवराव
८००० भगवतीदास
४००० प्रचितराव व भास्करराव
७००० शंकरराव
२००० आनंदराव कलम १.

मलकत जमानी याची लेक तयार करून माहयारखान (?) वजिरास दिली व चार घडी रोज आलियावरी किल्ल्यांतून स्वार होऊन गुलाबी बागामध्यें गेले. तमाम रोज बागामध्यें राहून चार घडी रात जालियावरी आले. कलम १.

जव्हाहेर सरकारांतील * * * * सरकारांत जप्त झालें होतें. त्यांपैकीं पांच शेर ठेविलें. बाकी जव्हाहेर दिलें. कलम १.

मालियत निजामनमुलकाच्या मुत्सद्दियाची लिहिविली आहे. पुढें काय होईल तें पाहावें. कलम १. पुरवणी चंद्र २२.

अजीमुल्लाखान यास हुकूम केला कीं, निजामनमुलूख याच्या मुत्सद्याची वगैरे मालियत सब लेहून आणवणें. तेव्हां निजामनमुलूकांनीं आपणाकडील काशीमखान व सैद सरीफखान व लुतफुल्लाखान मोसवीखान व पेशकारास समजाविलें कीं, जाऊन लेहून देणें. खानमशारनिल्हेस सांगून पाठविलें कीं, मुत्सद्दी आपलें मानणार नाहींत. पेरसान हाल आहेत. आपल्या घरांत काय निघालें तें त्याजवळ असेल. त्यावरी त्यांनीं आपली हकीकत लेहून दिल्ही. कलम १.

चंद्र २२ रोज.

दोन घटिका दिवस आलियावरी अवघे अमीर व मुत्सद्दी दिवाण आमखासांत हजीर होऊन, मुजरा माहायारखानास वजीर करीत व सारी हकीकत त्यास जाहीर करावी. मग माहायारखानानें पातशाहास जाऊन मुजरा करावा. सर्व हकीकत

जाहीर करावी. आणि तो आलियावरी वरकड मुत्सद्दी यांनीं जाऊन पातशाहास मुजरा करून हकीकत सांगावी. कलम १.

हुकूम जाला कीं, पांच हजार स्वार निजामनमुल्क व दोन हजार स्वार अजीमुल्लाखान यांची निगादास्त करीत. हुकमाप्रमाणें निगादास्त करितात. कलम १.

सरबिलंदखानानें अर्ज केला कीं, मालियत कमरदीखानाची जप्त जाली आहे. परंतु खजाना पुरला आहे, तो बहुत आहे. झाडा घेतला पाहिजे. तेव्हां आजिमुलाखानास हुकूम जाला कीं, 'झाडा घेणें.' मशारनिल्हेनें अर्ज केला, 'आपणास उजूर नाहीं. सरदारी आपण राखितों.' ज्यानें अर्ज केला, त्यालाच हुकूम होय जे, झाडा घे. कलम १.

अर्ज आला जे, जयसिंग सवाई तीस कोस आपलें स्थळ सोडून पुढें आला. बाजीराव मराठाही सत्तर हजार स्वारांनशीं सवाई जयसिंगाच्या मुलुकांत पोंहचला. कलम १.

निजामनमुल्कखास हुकूम जाला कीं, दोनशें जोडी संदूख खजानासाठीं दरकार आहे; तर आपल्या खजानांतून देणें. अर्ज केला कीं, एकशें संदूख मऱ्हामत तयार आहेत. बाकी तुटले फाटले आहेत. तेही हजर आहेत. घेऊन जावे. कलम १.

एक हत्ती व तीन घोडे काशीमखानाचे जप्त केले. कलम १.

हाजी फोलाद कोतवाल यांस शिरपाव देऊन फर्माविलें कीं, शहरची रयत धास्तीमुळें गेली आहे. त्यास कौल देऊन ये तें करणे. कोणास आजार लागो न देणें. कोणी आजार देईल त्यास ताकीद करणें. कलम १.

चंद्र २३ रोज.

मिरजा महमदशा यांनीं सांगून नादिरशाहास पाठविलें कीं, माल अमीरखान बहदार, व महमद इसातखा बहादर व खानदौरा व रोज अफजलखा याचा माल जप्त जाला आहे. तो माफ करावा. त्यानें माफ केला. कलम १.

शहरांत खबर आहे कीं, नादरशाहानें महजर बमौर्तब तयार केलें कीं, आपल्या वतनांतून दिल्लीची पातशाही घ्यायासाठीं खंदारास आलों. खंदार घेतलें. तेथून पातशाहास एलची महमदशाहास पाठविली. त्यानी जबाब न पाठविला. तेथून काबलास आलों......किल्लेदारास धरून कैद केलें. आणि पठाण खोऱ्यांत होते, त्यांसीं युद्ध करून पेशावरास आलों. नासरखान काबुलचा सुभा राहात होता. त्यास धरलें. त्याउपरी लाहुरास आलों. जकीरियाखान लाहुरचा सुभा त्यास धरिलें. तेथून महमदशाहासीं युद्धप्रसंग होऊन, पादशाहास कैद केलें. दिल्लीची पादशाही घेतली. त्यावर येथील रयतेनें हरामजादी केली. तेव्हां ............... लाख सात हजार माणूस मारलें गेलें. त्यास आपण सर्वत्रास सज्या दिल्हा. त्या आपले सर्वत्रास केलें. पुढें पातशाही महमदशाहास देऊन आपल्या मुलकास जावें, आपल्या आज्ञेंत राहावें, इतकें बोलिला. तें महजरांत लेहून, महमदशाहाची वगैरे त्याच्या अमिराची

मोहर करविली. आणि खबर आहे कीं, चंद्र २७ जिल्हेजीं अगर पहिले मोहरमीं कूच करून जाणार आहे. त्यावर काय करील हें कळेना. कलम १.

तयारी नादरशाहाची होती आहे. कुल फौज शालिमार बाग येथें जमा होत आहे. कलम १.

चंद्र २४ रोज.

नवाब निजामनमुल्ख यांणीं आपल्या फौजेपैकीं तीनशें स्वार ठेवावे. बाकी दूर करावे. कलम १.

पातशाहास अर्ज जाला कीं, मऱ्हाठे व जयसिंग सवाई देखील यांनीं एकलास करून तख्ताजवळ येऊन हंगामा करावा. हुकूम जाला कीं, सज्या पावतील. कलम १.

दखनच्या शिरस्त्या हिशेबाच्या कागदाबद्दल काशिमखान यास ताकीद केली कीं, लौकर तयार करून आणून नजर गुजराना. १.

खबर आहे कीं, सरबिलंदखानारा आकबराबादेची सुभेदारी देऊन रवाना करावें. परंतु अद्यापि शिरपाव जाला नाहीं. १.

महमद कामबक्ष याची लेक नादिरशाहाच्या लेकास सोयरीक केली. कलम १.

नादरशाहास अर्ज पोंहचली कीं, टंकसाळ बंद आहे. त्यास फर्माविलें कीं, शिक्का करून नजर गुजरा. हुकूम जाला कीं, शिक्का उत्तम जाला नाहीं. उत्तम करून शिक्का जारी करणें. कलम १.

चंद्र २५ रोज पुरवणीः—

नादरशाहास अर्ज पोंहचली कीं, बारा कोस गीर्दनवाई. शहरा जिरायत रयतेनें पेरली आहे. फौजेची कही जाऊन त्यास कापून आणिते. यामुळें सरकारनुकसान व रयत बेदील होती. तेव्हां दोनशें अस्वार तयार करून ताकिदीस पाठविले कीं, कोणास आजार न देणें. मुल्ख न लुटणें. जे कोणी गेले होते, त्यांचे नाक, कान, हात कापले. कलम १.

चंद्र २५ रोज.

दो घडी दिवस आलियावरी आवघे अमीर जमा होऊन माहायारखान वजीर यास मुजरा आधीं केला. एक प्रहर दोन घडी दिवस आल्यावरी माहार्यारखान पातशाहापासीं जाऊन, दोन प्रहरपर्यंत बसोन, जाबसाल करून आला. हुकूम जाला कीं, अवघे मुत्सद्दी व अमीर आमचा मुजरा करोन, भाई मिरजा महमदशाहा पातशाहा यास मुजरा करीत जाणें. आजी जाऊन मुजरीत. त्यावरी रुकसत होऊन निजामनमुल्ख व कमरुद्दीखान व अजीमुल्लाखान बहादर व सरबिलंदखा व अमीरखा व महमद इसारखा व महमद मोहीखा व शेखं अबदुल्ला व नागरमल व कृपाराम व जुगुलकिसोर व हफीजुदीखान व महमद सैदखान व गाजदीखान वगैरे महमदशाहापासीं जाऊन मुजरा करून अर्ज केला कीं, नादरशाहाचे फर्माविल्यावरून मुजऱ्यास आलों. जाब सांगितलें कीं, बरें केलें. कलम १.

निजामनमुल्काच्या मुत्सद्याची मालियत जप्त केली होती, त्यास त्याची हलाखी फार देखोन माफ केली. कलम १.

सुभानराव वकील त्याजपासून एक लाख पंचवीस हजार रुपये घेतले. आणिक एक लाख रुपये देणें, ऐसें नादरशाहा ह्मणतो. कलम १.

अजीमुल्लाखान व सरबिलंदखान यांनीं शहराची खानेसुमारी करून दर असामीस दहा रुपये पंधरा रुपये लाविले. ऐशामुळें तसदी रयतेस फार जाली. हे खबर नादरशाहास कळली. नादरशाहांनीं फर्माविलें कीं, कोणीं सांगितलें होतें कीं, गरीब गुरिबास तसदी देऊ नयेसें करावें. आह्मी तों फकीर नव्हे. कोणी मातबर असेल तर त्याचा पैका व गहणा असेल, त्यापैकीं एक हिस्सा त्यास देऊन, बाकी तीन हिस्से सरकारदाखल करणें. कलम १.

पुरवणी चंद्र २५ रोजः—

नादरशाहा बोलिले कीं, आपण इलायतेस जाऊ. बलख व बुखारा व कासगर व काबूल व लाहोर व हिंदुस्थान आपले समशेरीच्या कुवतेनें घेतलें. परंतु भाई मिरजा महमदशा यांनीं बहूत आपणास रजावद राखिले. त्यास त्यापासून आपण कांहीं घ्यावें ऐसें नाहीं. हा तख्ताचा खावद आहे. आह्मी महमदशाहास ऐसें लेखतों कीं, मीर तैमूर याचे जागां लेखतों. संपूर्ण मुल्क जो घेतला आहे, तो लेखीं करून सरंजाम करितों. आतां भाई मिरजा महमदशाहा तख्तावरी कायम करून विलायतेस जातो. तयारी कूचाची आहे. कलम १.

महमद मोहीखान यास पाठविलें कीं, बंगाल्याचा खजाना घेऊन येणें. कलम १.

नादरशाहाची तजवीज जाली आहे कीं, लग्नाचा सरंजाम पातशाहाचा लेक कामबक्षाचा करितात. कलम १.

चंद्र २६ रोजः—

निजामनमुल्क व कमरुद्दीखान व सर बिलंदखान यांस हुकूम जाला कीं, जें कांहीं फर्माविलें आहे, ते सिताबीं सरंजाम करणें. चंद्र २९ रोज बृहस्पतिवारपर्यंत तुमचा आहे. शुक्रवार आपला आहे. मग हुकूम जाला कीं, शहरांत धांडोरा पिटणें. एक प्रहर चार घडी दिवस आलियावरी अवघे माणूस जितके शहरांत आहे, तितके बाहेर निघेत. त्यावरून कळतें कीं, खजाना शहरांतून लष्करांत जातो. कलम १.

नादरशाहाची फौज रसदेबद्दल मौजे मेरट अठरा कोस शहरांतून आहे. तेथें जाट व रजपूत व आहेर व रांगडे चाळीस हजार जमा होऊन फौजेसीं युद्ध केलें. तीनशें स्वार मारिले. बाकी फौज पळून दिल्लीस आली. हे खबर नादरशाहास पोंहचली. मग नादरशाहानें पंधरा हजार स्वार त्याजवरी पाठविले. कसबा लुटून ताराज करणें. त्यास मारणें. कलम १.

चंद्र २७ रोजः—

शहरच्या माणसांस धांडोरा पिटून ताकीद जाली होती. त्यास आणून खजानाचीं ओझीं त्यांच्या डोईवर देऊन, सालेमार बाग आहे तेथें घेऊन गेले. खबर आहे कीं, चंद्र २९ जिल्हेजीं अगर पहिले मोहरमीं कूच होईल. परंतु इतबार येत नाहीं. कलम १.

येणेंप्रमाणें कलमें.



## ७ मस्तानीचें पत्र.

मस्तानीच्या नादानं बाजीराव अगदीं बहकून गेले. त्या वेळीं नानासाहेब व चिमाजीआपा ह्यांनीं तिला बाजीरावापासून दूर करून, तिला राजवाड्यामध्यें तिच्या महालामध्यें बंदोबस्तांत ठेवण्याचा प्रयत्न चालविला. रात्रीं तिनें पळून जाऊं नये ह्मणून राजवाड्यासभोंवतीं चौक्या बसविल्या. ह्या प्रसंगीं मस्तानीनें आपला साळसूदपणा दाखविण्यासाठीं पुढील पत्र नानासाहेबांस लिहिलें आहे. तें वाचण्यासारखें आहेः—

श्री.

"सेवेसी विज्ञापनाः—साहेबीं रात्रीस वाडियाभवत्या चवक्या बसावयासी आज्ञा केली आहे, कीं हे पळून जातील, तरी जाऊं न द्यावी. तरी साहेबांस पुसल्यावांचून जाऊं हें होणें नाहीं. ऐशास साहेबांस वसवास[1] असेल कीं रावसाहेब यांसी चोरून नेतील, अथवा रात्रीं दिवसां हर तजविजीने जातील. ऐसे कितेक गोष्टीनें खतरा[2] असेल, तरी आज्ञा होईल तर वाडियांतील दाहा बायका जेथें निजत असतील, त्यांत निजावयासी तेथेंच येत जाईन. यासी साहेब धणी आहेत. जे आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. हे तसलिमात."



## ८ फड.

पेशव्यांच्या फडणिशी कचेरींत, बाजीराव रघुनाथाच्या कारकीर्दीच्या अव्वलीस, १५०० पंधराशें कारकून होते. ह्या कचेरीस फड असें ह्मणत. कामांत हुशारी दाखवून योग्यता मिळविण्याचें ठिकाण हेंच होतें. कारकुनांची वर्गवारी अशीः—(१) निसबत हुजुरदप्तर ३०० तीनशें. (२) निसबत खासगीवाले १००. (३) निसबत तोफखाना १००. (४) निसबत पुणें सुभा १००. (५) निसबत पागा ६००. (६) निसबत हशमनीस ५०, निसबत गाडदी ५०, निसबत शिलेदार २००. एकूण १५००.



---

१ वसवास=भीति, धास्ती. २ खतरा=संशय, अंदेशा.

# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] आक्टोबर १९०९. [अंक ३ रा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



**राजपुत्र फत्तेसिंग भोंसले.**

(अक्कलकोट संस्थानचे मूळपुरुष.)

## ४. शाहू महाराजांचा राजपुत्रः—फत्तेसिंग भोंसले.

मराठ्यांच्या जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांमध्यें 'राजपुत्र' हें संदिग्ध नांव आढळतें. त्याचा अर्थ इंग्रजींतील Prince ह्या शब्दाच्या अर्थाप्रमाणें आहे. 'राजपुत्र' हा किताब मराठी राज्यामध्यें फक्त फत्तेसिंग भोंसले ह्याच पुरुषास होता. तेव्हां शाहू महाराजांच्या कारकीर्दींतील पत्रव्यवहारामध्यें जेथें जेथें 'राजपुत्र' असें नांव येईल, तेथें तें फत्तेसिंग भोंसले ह्यांचें विशेषण समजावें. 'राजपुत्र' हा बहुमानाचा किताब, शाहू महाराजांनीं फत्तेसिंग भोंसले ह्यांस दिला असून, तो एका सनदेंत नमूद केलेला आहे.

फत्तेसिंग भोंसले अक्कलकोटकर ह्यांचें चरित्र फार मनोरंजक व महत्त्वाचें आहे. त्यांच्या भाग्योदयाचा वृत्तांत तर फारच चमत्कारिक आहे. श्रीछत्रपति शाहू महाराज हे इ. स. १७०७ मध्यें मोंगलांच्या कैदेंतून मुक्त होऊन ज्या वेळीं दक्षिणेंत आले, त्या वेळीं त्यांच्या प्रवासामध्यें, पारद परगणे शिवणें (शिवरी जि० औरंगाबाद) येथील सयाजी लोखंडे नामक पाटलानें, सुरळीतपणें, शाहू महाराजांस रुजू न होतां, मोंगलाईतर्फेनें गांव भांडविला. त्याची व शाहू महाराजांची चांगली चकमक उडाली. शाहू महाराजांनीं पारद गांवच्या गढीवर हल्ला करून, गांव मारून फन्ना केला. ह्या झुंजामध्यें लोखंडे पाटील रणांगणीं पडले, व गांवचा सत्यनाश झाला. त्या प्रसंगीं सयाजी पाटलाची स्त्री आपलें लहान अर्भक घेऊन गर्दीमध्यें शाहू महाराजांच्या पालखीजवळ गेली, व आपलें बालक त्यांच्या पायावर घालून, अत्यंत करुणस्वरानें महाराजांस ह्मणाली कीं, "या बालकास वांचवावें. अन्यायी होते ते मारले गेले. हें मूल आपणास वाहिलें आहे." शाहू महाराज अत्यंत दयाळू अंतःकरणाचे असल्यामुळें त्यांना त्याची दया येऊन त्यांनीं त्याचा स्वीकार केला. झुंजामध्यें फत्ते झाली ह्मणून ह्या बालकाचें नांव त्यांनीं फत्तेसिंग ठेविलें, व त्याचा प्रतिपाळ करून त्यास अक्कलकोटची जहागीर दिली; व मराठ्यांच्या उंच कुलांत समाविष्ट करून, त्यास 'राजपुत्र' अशी संज्ञा दिली. शाहू महाराजांच्या सर्व कागदपत्रांमध्यें फत्तेसिंग भोंसले ह्यांस "चिरंजीव" असेंच अपत्यवाचक विशेषण लाविलेलें आहे. हे फत्तेसिंग भोंसले मराठ्यांच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहेत.

शाहू महाराजांनीं फत्तेसिंग भोंसले ह्यांच्या भावास पारद हा गांव इ.स. १७१५चे सुमारास इनाम करून दिला. तेथील पाटील लोखंडे ह्या आडनांवानेंच प्रसिद्ध आहेत. पारद गांवची जी सनद आहे, तिच्यामध्यें 'तुमचे बाप व भाऊ मोंगलाईतर्फेनें लढत असतां मृत्यु पावले. तुमच्यावर कसाला पडला, ह्याकरितां स्वामींनीं

कृपाळु होऊन मौजे मजकूर हा गांव इनाम करून दिला आहे', वगैरे आशयाचा मजकूर आहे. अर्थात् पारदचे पाटील मोंगलाईतर्फेनें लढले हें उघडच आहे.*

फत्तेसिंग भोंसले ह्याची कारकीर्द ( इ. स. १७१२ पासून १७६० )पर्यंत बरीच मोठी झाली. त्यानें बाळाजी विश्वनाथ, बाजीराव व बाळाजी बाजीराव ह्या तिन्ही पेशव्यांच्या कारकीर्दी पाहिल्या, व स्वतंत्रपणें व त्यांच्या बरोबर अनेक मोहिमांमध्यें आपलें शौर्यतेज व्यक्त केलें. कोल्हापूर, कर्नाटक, बुंदेलखंड, भागानगर, त्रिचनापल्ली वगैरे प्रांतांवर त्यानें स्वाऱ्या केल्या व मराठ्यांची सत्ता प्रस्थापित करण्याचे कामीं त्यानें उत्कृष्ट साहाय्य केलें. ह्याचें चरित्र फार महत्त्वाचें आहे. तें प्रसंगानुसार प्रसिद्ध होईल.

फत्तेसिंग भोंसले ह्यांचा पत्रव्यवहार इतिहासदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. ह्यापैकीं शाहू महाराजांनीं त्यास राजशक ७५ मध्यें जी स्वदस्तुर सनद दिली आहे, ती वाचण्यासारखी आहे. ती येणेंप्रमाणें:—

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७५ विभवनाम संवत्सरे फाल्गुन वद्य दशमी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री फत्तेसिंग भोंसले यांसीः—आशीर्वाद. आज्ञा ऐसीजे, तुमचें मानस स्वामींनीं पुत्र करून, दौलत देऊन महत्पदारूढ केलें, तेविसीं अक्षई चालण्याचे खास दस्तुर व मुद्रांकित पत्र असावें, ह्मणोन चिटणीस यांजपासून विनंति केली. त्याजवरून स्वामींनीं चित्तांत आणून ठरावून हें पत्र सादर केलें असे. बितपशीलः—

स्वामींस प्रसंगेंकरून यवनाचे पाशीं जाणें घडलें. तेथें पादशाहांनीं बेजमीस महाल सानक करून दिल्हे. त्यांपैकीं परगणे अक्कलकोट तुमचे बेजमीस पूर्वीपासून देऊन चालत आहे. तो तुह्मांकडे दरोबस्त इनाम वंशपरंपरें दिल्हा असे. कलम १.

तुमचे निसबतीस सरंजामी सरदार पांढरे, बांडगर वगैरे नेमून दिल्हे. त्यांणीं तुमचेपासीं असून तुह्मांबरोबर सेवा करावी. कलम १.

सरंजामास महाल व गांव स्वराज्यांतील व मोंगलाईतील मोकासे वगैरे तुह्मांकडे फौजदारीचे बेजमीस व खर्चास लाविले आहेत. ते नेहमीं तुह्मांकडे

* ग्रांटडफ व सोलापूर ग्याझीटियरचे कर्ते ह्यांनीं ताराबाईच्या वतीनें लोखंडे हे शाहूशीं लढले असा उल्लेख केला आहे, परंतु तो चुकीचा दिसतो.



श्री रामदासस्वामी आणि शिवाजीमहाराज.

फौजेचे बेजमीस व खर्चास चालावे. तुह्मी फौज घेऊन ( ठेवून ? ) त्यांत राज्यसाधनाचे उद्योग करावे. कलम १.

तुह्मांपाशीं दरकदार व कारखानदार सर्व हुजुरून नेमून दिल्हे आहेत. त्यांजपासून काम घ्यावें. ज्यांची त्यांनीं ( चाकरी ) करून असावें. कलम १.

सदर्हूप्रमाणें च्यार कलमें केलीं असेत. जाणीजे. याप्रमाणें स्वामींनीं तुह्मांस कुलांत घेऊन राजपुत्र केलें. "आज प॥ महाल, गांव सरंजाम दिल्हे व सरंजामी सरदार नि॥ दिले. तर परगणे अक्कलकोट इनाम खानें. फौजेचा सरंजाम व व सरंजामी सरदार दिल्हे, त्याप्रमाणें, राज्यपदारूढ होतील ते तुह्मांकडे अकसई चालवितील. तुह्मीं त्याजपाशीं राहून राज्यसाधन सेवा करणें. आशीर्वाद."* ( मोर्तब. )

फत्तेसिंग भोंसले ह्यानें शाहू महाराज मृत्यु पावल्यानंतर उदास होऊन अक्कलकोट येथेंच वास केला. ह्याचा व बाळाजी बाजीरावाचा पुढें बेबनाव झाला होता असें दिसतें. हा इ. स. १७६० मंध्यें मृत्यु पावला.

ॐ ॐ ॐ

## ५. श्रीरामदास व शिवाजी महाराज.

श्रीसमर्थ रामदासस्वामी व शिवाजी महाराज ह्यांची भेट केव्हां झाली, हा अद्यापि वादग्रस्त प्रश्न आहे व त्याबद्दल ऐतिहासिक चर्चा चालू आहे. रा. राजवाडे ह्यांनीं शिवाजी राजांची भेट, शके १५७१ वैशाख शुद्ध ९ रोज गुरुवारीं झाली, असें प्रसिद्ध केलें आहे (म. इ. सा. खं. ४). कोणी ह्मणतात, रामदासस्वामींची व शिवाजीची भेट शके १५८० मध्यें झाली. धुळ्याचे रा. चांदोरकर लिहितात कीं, ती शके १५९४ मध्यें झाली. शेवटच्या गृहस्थांच्या लेखाचा आधार घेऊन, 'छत्रपति शिवाजी महाराज ह्यांचें चरित्र' ह्या पुस्तकाच्या कर्त्यानें, "शिवाजी महाराजांच्या राज्यसंस्थापनाच्या यशाचे अंशभाक् रामदासस्वामी बिलकूल ठरत नाहींत" असा निर्णय केलेला आहे. परंतु खरा इतिहास अगदीं वेगळा आहे. शिवाजी महाराज ह्यांची व स्वामींची भेट **शके १५७१ वैशाख शुद्ध ९ रोजीं झाली.** स्वामींनीं महाराजांस अनुग्रह दिला. महाराजांची स्वामींच्या ठिकाणीं परम भक्ति जडून, त्यांनीं **शके १५७२ विकृतिनाम संवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदेस** ह्मणजे श्रीरामचंद्राचे जन्मनवमीचे उत्सवाचे प्रथम दिवशीं, आपण व आपले नौकर ह्यांनीं उत्सवाचीं कामें वांटून घेतलीं. पुढें तो रिवाज तसाच चालू

---

* शेवटचीं वाक्यें खुद्द शाहू महाराजांच्या हातचीं आहेत.

राहिला. महाराजांस राज्यवैभव प्राप्त झालें,' आणि ते शके १५९६ आनंद-संवत्सरे ज्येष्ठ शुद्ध १३ रोजीं राज्याभिषिक्त झाले.' त्या वेळीं त्यांनीं कानुजाबता करून अष्टप्रधानांकडे जशीं राज्याचीं कामें नेमून दिलीं, त्याप्रमाणें स्वामींच्या श्रीरामचंद्राच्या वार्षिक उत्सवाचीं कामें नेमून दिलीं. तीं मातारच्चें राज्य होतें तोंपर्यंत चालत होतीं.

शके १६०२ मध्यें श्रीरामचंद्राच्या उत्सवाचीं कामें शिवाजी महाराज व त्यांचे अष्टप्रधान ह्यांच्याकडे कशीं नेमलीं गेलीं होतीं, त्याची यादी आह्मांस उपलब्ध झाली आहे. ती पाहिली ह्मणजे श्रीसमर्थ रामदासस्वामी व छत्रपति शिवाजी महाराज आणि त्यांचे अष्टप्रधान ह्यांचा भक्तिसंबंध कशा प्रकारचा होता, तें चांगलें दिसून येतें. शिवाजी महाराजांच्या ह्या अद्वितीय भक्तीचें खरें रहस्य कळण्यास त्यांचें व स्वामींचें खरें अंतरंग समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे, व तत्प्रीत्यर्थ तत्कालीन जुने अस्सल कागदपत्र पाहिले पाहिजेत. एरव्हीं तें समजणें शक्य नाहीं. समर्थ व महाराज ह्या उभयतांचीं अंतःकरणें एकरूप झालेलीं होतीं. तेथें द्विधाभाव बिलकूल नव्हता, हें पूर्ण लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

## यादी.

"१ मोरोपंत पिंगळे पंतप्रधान हे कीर्तनाची समाप्ति जाल्यावर खिरापत वांटावी, आणि .......कारभारी घेऊन वांटावी.

१ रामचंद्रपंत आमात्य यांनीं ब्राह्मणभोजनसमयीं पूजा करावी, उदक सोडावें, सभेचे समयीं बैठक करावी. श्रीचे सेवेचे कामगार, शागिर्दपेशा यांचा अधिकारही त्यांकडे. राजश्रींनीं मोर्चेल श्रीवर धरिलें असतां, उद्धव गोसावी, कल्याण गोसावी नसल्यास, यांहीं दुसरें मोर्चेल डावे बाजूस धरावें.

१ आणाजी दत्तो सचीव पंत यांनीं भोजनसमयीं दक्षणा वांटावी. भोजनानंतर उच्छिष्टें काढून स्थलशुद्धि करावी. आर्तीधूपार्तीसमयीं श्रीकडील चोपदार शाहापूरकर साटे पाटील यांस बोलाऊन स्वारीची व छबिन्याची तयारी करवावी.

१ दत्तोपंत मंत्री यांनीं कीर्तनांत बुक्का लावावा. पाकशाळेची तयारी करावी. कोंडोपंत निसबत मंत्री यांनीं कोठींतून साहित्य आणून पाकशाळेकडे द्यावें. नेहमीं श्रीजवळ राहून दिनचर्येचा वांका होईल तो राजश्रीस ल्याहावे.

१ जनार्दनपंत हणमंते सुमंत पंत यांनीं भोजनोत्तर ब्राह्मणांस विडे द्यावे. कीर्तनाची बैठक सभेची करावी.

१ बाळाजी पंडित न्यायाधीश यांनीं प्रयोजनांत पाण्याचा अधिकार व पाकशाळेचा सडासंमार्जनाचा अधिकार त्यांचेकडे.

१ रघुनाथराव पंडित छंदोगामात्य यांनीं, श्रीचे उत्साहांत शिष्टमंडळी संभावित येतील त्यांचा परामर्ष करावा. दक्षणा, रवानगी, सत्कार करणें तो मठाचे कारभारी यांचे विद्यमानें करावा.

१ हंसाजीराव मोहिते सेनापति यांनीं आर्तीचे छबिन्यांत, सिंहासनाच्या काठ्या व छत्रें चामरें घेणार अधिकारी यांस आणवून, काठी ज्याची त्याजपाशीं देऊन, छबिना जालियावर जतनेस ठेवावी. कीर्तनांत उजवे बाजूस उभें राहून पंखा घेऊन वारा घालावा. डावे बाजूस प्रतापजी गुजर सरनोबत यांनीं पंखा घेऊन वारा घालावा.

१ पोतनीस यांनीं श्रीस, जवाहीर, पोशाख, वगैरे जिन्नस, फळफळावळसुद्धां आणून देत जावे.

१ बाळोबा भाऊ चिटणीस यांनीं, मठाचे कारभारी वगैरे यांस घेऊन संस्थानप्रकरणीं व उत्साहप्रकरणीं जमाखर्चाची व्यवस्था करून, बोभाट पडूं देऊं नये. आज्ञेप्रमाणें काम पाहावें.

१ राजश्रींनीं आपल्याकडे काम नेमून घेतलें:- सडासंमार्जन जातीनिशीं घालणें. सर्व अधिकारी सेवेचे नेमिलेले त्यांची चौकशी पाहून, तोफखान्याचा व फरासखान्याचा वगैरे बंदोबस्त करून, छबिन्याचे मागें सर्वत्रांस घेऊन चालावें. कीर्तनांत गोसावी यांचे मागें उभें असावें. अगर स्वामी सभेंत बैसले असतां मोर्चेल घेऊन उभें राहावें. रथ उत्साहाचे समयीं, श्री रथावर जातेवेळें राजश्रींनीं आपली स्वारी दरोबस्त तयार करून, पालखीच्या मूर्ती बैसवून, पालखीस खांदा शाहापूरकर यांनीं पुढें द्यावा. राजश्रींनीं मागें खांदा द्यावा. रथावर श्रीरघुपति बैसल्यावर, राजश्रींनीं रथापुढें सोन्याची काठी घेऊन उजवे बाजूस चालावें. डावे बाजूस आमात्य यांनीं काठी घेऊन चालावें. उभयतांचे मध्यें शाहापूरकर साटे यांनीं काठी घेऊन चालावें. श्रीरघुपतीची स्वारी माघारी येतां शिराळकर यांनीं पालखींत मूर्ती बैसवाव्या. पुढें पालखीस खांदा राजश्रींनीं द्यावा. मागें शिराळकर यांनीं द्यावा. देवालयांत श्री आल्यावर लळीत करावें. प्रसादसमयीं हिंदुस्थानी पद करुणापर शिवबांनीं केलें आहे, तें ह्मणत असावें."



## ६ मुसलमान झालेल्या हिंदूस पुनः जातींत घेतल्याचें उदाहरण.



फलटणचे निंबाळकर घराण्यापैकीं बजाजीनाईक निंबाळकर ह्यांस विजापुरच्या

साहेब ह्यांनीं त्यांस श्रीशिंगणापूर शंभुमहादेव येथें नेऊन, प्रायश्चित्त देऊन पुनः महाराष्ट्रधर्मांत घेतलें, व शिवाजी महाराजांनीं पुढें त्यांचा मुलगा महादजी ह्यास आपली कन्या सखूबाई अर्पण केली, ही गोष्ट प्रसिद्ध आहेच.* त्याचप्रमाणें जुलमानें व बळजबरीनें मुसलमानांनीं भ्रष्टविलेल्या हिंदूंस पुनः हिंदु ज्ञातींत घेतल्याचीं कांहीं उदाहरणें इतिहासांत आढळून येतात. त्यांपैकीं शाहू महाराजांच्या कारकीर्दींतील एक उदाहरण येथें देतों.

नगर जिल्ह्यामध्यें चांभारगोंदें ह्मणून एक परगणा आहे. त्यापैकीं कसबे जिंती येथील चौगुला पुताजी बिन मुधोजी बांडघर हा, दावलजी सोमवंशी ह्मणून जो मराठ्यांवर प्रसिद्ध सरदार होता, त्याच्या सैन्यामध्यें नौकर होता. दावलजी सोमवंशी ह्यानें इ. स. १७१६ चे सुमारास सुरत प्रांतावर स्वारी केली, त्या वेळीं तो मोंगलांस हस्तगत झाला. मोंगलांनीं त्यांस भ्रष्ट करून वर्ष सवावर्ष आपल्या नौकरीमध्यें ठेविलें. पुढें बाळाजी विश्वनाथ पेशवे हे दिल्लीहून परत आले, त्या वेळीं हा युक्तीनें मोंगलांच्या लष्करांतून पळून येऊन मराठ्यांच्या लष्करांत सामील झाला, व नंतर आपल्या गांवीं गेला. तेथें आल्यानंतर त्यानें सर्व गोतास, आपणास मुसलमानांनीं बळजबरीनें भ्रष्ट केल्याचा वृत्तांत श्रुत केला. तेव्हां जिंती, चांभारगोंदें, हिंगणी, दिवेगव्हाण, शेटफळ, भांबोरे वगैरे ठिकाणच्या मोकद्दमांनीं व समस्त गोतांनीं मिळून शाहू महाराजांकडे अर्ज केला व झालेला वृत्तांत विदित केला. तेव्हां शाहू महाराजांनीं सर्व हकीकत मनास आणून, सर्व ठिकाणच्या मोकद्दमांस व वतनदारांस अशीं आज्ञापत्रें पाठविलीं कीं, "**पुताजी मजकूर याजवर मोंगलानें बलात्कार करून भ्रष्ट केलें. हे कांहीं आपले संतोषें भ्रष्ट जाहला नाहीं. याकरितां यांस गोतामध्यें घ्यावयाची आज्ञा केली आहे. तरी, तुह्मीं समस्त गोत मिळोन, शास्त्रप्रमाणें शुद्ध करून, गोतामध्यें घेणें, आणि पूर्ववत् वर्तन करणें.**" हें आज्ञापत्र छ १४ जिल्काद इसन्ने अशरीन मया व अलफ ह्या तारखेचें असून शाहू महाराजांच्या रोजनिशीमध्यें नमूद आहे.

❀ ❀ ❀

* मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार. पृष्ठ २७.

## ७. शिवाजी महाराजांचे पहिले पेशवे शामराज पंडित रांझेकर.

शिवाजी महाराज छत्रपति यांचे मावळे फौजेंत, मोसे खोऱ्याचे मालजी काऊ प्रभु, व गोजाजी सोन प्रभु, व जानोजी वैज प्रभु, भानजी अनंत प्रभु देशपांडे, व मुठेखोऱ्याचे विसाजी बाळ ( बल्लाल ) प्रभु व सोनाजी बापूजी प्रभु व एकोजी प्रभु व आत्माजी रूपाजी प्रभु वगैरे देशपांडे हे सरदार होते. शिवाजी महाराजांनीं शामराज निळकंठ रांझेकर संमत हिवरें श्रीनागेश यांस पेशवाईचा अधिकार दिला. या कारणानें युद्धाचे कामीं कांहीं दिवस पेशवे यांचे हाताखालीं वरील सरदारांस काम करावें लागे. तेव्हां शामराजपंतानें, वर निर्दिष्ट केलेले देशपांडे यांचा अनेक प्रकारें छळ करून व त्यांस अनेक प्रकारें धाकदडप घालून, बलात्कारानें मोसेखोरकर देशपांडे यांजकडून त्यांचें सात गांवचें गांवकुलकर्ण इ. स. १६५२ शके १५७४ नंदननाम संवत्सरे श्रावण शुद्ध ५ शुक्रवार रोजीं खरेदी घेतलें, आणि तसेंच मुठेखोरेकर देशपांडे यांजकडून त्यांचे वतनांतील सात गांवचीं गांवकुलकर्ण इ. स. १६५३ शके १५७५ विजयनाम संवत्सरे श्रावण शुद्ध १० आदित्यवारीं खरेदी घेतलीं. हे गांव दोन्ही खोऱ्यांचे देशपांडे यांणीं, रांझेकरांकडून पेशवाई गेल्यावर, त्यांजकडून घेतलेला ऐवज त्यांस परत देऊन, सोडवून घेतले. ते हल्लीं देशपांडे यांजकडे चालत आहेत.

मराठ्यांची रियासतकर्ते, भाग २ यांत, शामराज निळकंठ रांझेकर यांनीं इ. स. १६५६-१६५९ पर्यंत पेशवाई केल्याचें लिहितात. परंतु त्यापूर्वीं शामराजपंत पेशवे असल्याविषयीं कांहीं कागदपत्र आहेत, त्यांपैकीं कांहीं कागदांचे उतारे खालीं देतों.

### श्रीशंकर.

"महाराज राजश्री शामराज पंडित पेशवे स्वामींचे सेवेसीः—

सेवक बिसाजी प्रभु व सोनप्रभु व एकोजी प्रभु समस्त देशकुळकर्णी तर्फ मुठेखोरें नमस्कार सुरू सन अर्बा खमसैन आलफ.( आरबी सन १०५४ इ. स. १६५३ ) स्वामींस तर्फ मजकूरचे सात गाऊ कुळकर्ण दिलें. त्याबद्दल द्रव्य बराबर बाघोजी खोपडे होन २५० दिल्हे, ते कसबे मुठाचे मुक्कामीं आम्हांस पावले असेत. सदरहू सात गांवचें गांवकुलकर्ण लेकराचे लेकरीं खाणें. देशमुख व मोकदम यांस आम्ही समजावूं. छ. १५ जिल्हेज हे विनंति."

या पत्रावरून शामराज निळकंठ रांझेकर हे इसवी सन १६५६ चे पूर्वीपासून पेशवे असल्याचें दिसोन येतें.

सदरहू सात गांवचीं गांवकुलकर्णे शामराजपंतांचे नातू शामराज महादेव राझेकर संमत हिवरे नागेशं याजपासून जनाजी राम व महादाजी रघुनाथ व बापूजी सोनाजी देशपांडे तर्फ मुठेखोरे यांनी आर्बा सन ११०८ इ. स. १७०७ सालीं सोडवून घेतलीं. तें रांझेकर यांचे पत्र खालीं लिहिलेप्रमाणें आहेः—

श्री.

"अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री जनाजी देशकुलकर्णी तर्फ मुठेंखोरें गोसावी यांसी—

स्नेहांकित शामराज महादेव रांझेकर हिवरे श्रीनागेश–आशीर्वाद सर्वजित् नाम संवत्सरे आश्विन वद्य ७ रविवासरे सुरूसन समान मया आलफ, ते दिनी तुह्मांस पत्र लेहून दिले ऐसाजेः–पूर्वी आपले आजे राजश्री शामराज निळकंठ राजश्री छत्रपति स्वामी यांची पेशवाई करीत होते. ते समयी आर्बा खमसमध्यें तुमचे वडील विसाजी बल्लाळ देशकुलकर्णी तर्फ मजकूर यांजपासून गावकुलकर्णाचे वृत्तीचे गांव करून घेतले. बितपशीलः–देहे ७ सात. १ मौजे उरवडे, १ मौजे आंबेगांव, १ मौजे आंबोली, १ मौजे भोवली, १ मौजे कोढुर, १ मौजे जातेडे, १ मौजे माळेगांव.

७

एकूण सात देहे गांवकुळकर्णी वृत्ति घेतली होतीः ऐसियास आपण किल्ले सिंहीगडचे (सिहगड) मुक्कामी सन सबा मया (आ. म. ११०७–इ. स. १७०६) मध्यें येऊन तुह्मांसीं प्रसंग केला की, आह्मी आपली वृत्ति चालवावयासी मुतालिक पाठवितों. त्याजवरी तुह्मीं उत्तर दिल्हें की, वृत्ति आपली आहे. बलात्काराचे प्रसंगें तुमचे वडिली घेतली आणि कांहीएक दिवस वृत्ति खादली आहे. त्याउपर आपण तुह्मांस उत्तर दिलें कीं, आपले वडिली तुमचे वडिलांस होन पातशाही २५० अडीचशें देऊन गांवकुलकर्णे विकत घेतली आहेत. तें पत्र तुमचे वडिलांचें आपणाजवळ आहे, व राजश्री छत्रपति स्वामीची पत्रें आहेत. हें वर्तमान तुह्मी व आह्मी भले लोक, वतनदार, पंचाईत यांजवळ निवेदन केले. त्यास पंचाईत भले लोकीं आपले मतें निर्वाह केला ऐसाजे, आपल्या वचनावरून मुद्दल होन पातशाही २५० आडीचशें, एकूण साडेसातशें रुपये जाले; मीं रुजू केले पैकीं रुपये ५०० पांचशें आपणास द्यावे. पुढें आपणासीं व आपले वंशपरंपरा वतनासी संबंध नाहीं, ऐसा निर्वाह करून पांचशें रुपये आपणास देविले, आणि तुमचे

वडिलांचें पत्र व दिवाणचीं पत्रें देविलीं. तीं आणून द्यावीं, आणि पैकियाचा निर्वाह करून घ्यावा. पत्रें न देऊं तर वतनासीं संबंध नाहीं व पैकियासीं अर्थाअर्थीं संबंध नाहीं, ऐसा निर्वाह केला. त्यास, कसबे सुपें ये मुक्कामीं आह्मी येऊन, तुह्मांस मनुष्य पाठविलें कीं, आह्मी पत्रें घेऊन आलों आहों; तर पत्रदर्शनीं पैका घऊन येणें. त्यावरून तुह्मी स्वार होऊन आलेत. तुमची आमची भेटी जाली. पत्रें तुह्मांस दाखविलीं. त्यास, आपले आजे राजश्री शामराजपंत यांचे नांवें तुमचे वडील विसाजी बल्लाळ व सोनप्रभु यांचें पत्र कीं, आपणांस सात गांवांबाबद अडीचशें होन पाठविले, ते पावले. आपण देशमुखाची व गांवगन्ना मोकदमाची समजाविस करून हें पत्र व दिवाणचीं पत्रें दाखविलीं. त्या पत्रांवरून तुह्मीं उत्तर दिलें कीं, आपले वडिलांचे पत्रावरून टक्का कांहीं वडिलांचे पदरीं पडिला नाहीं. पांचशें रुपये आपण कशाचे द्यावे? त्यास आपण तुह्मांस उत्तर दिलें कीं, आपले वडिलीं कांहीं दिल्हियावेगळे वतन घेतलें नाहीं, व सव्वाशें होन हारकी दिवाणांत दिल्ही आहे. तीं पत्रें देखील आणून दिल्हीं. अडीचशें होन खर्च कैसा तरी असो, परंतु तुमचे वडिलांचें पत्र आहे. पंचाइताचे निर्वाहाप्रमाणें तुह्मीं व आह्मीं वर्तावें. ऐसें बोलोन तुमचे वडिलांचीं पत्रें व दिवाणचीं पत्रें तुह्मांस दिल्हीं आणि सदरहू पांचशें रुपये घेतले. बितपशील रुपये

| | |
|---|---|
| ऐन रोख पावलेः— | १६५ रुपये. बरहुकूम खत छ० २९ माहे रजब सन समान. |
| ५० सन सबा छ० १० सफर | |
| २८५ सन समान छ० १९ रजब | |
| ३३५ | १६५ |

एकूण पांचशें रुपये सदरहूप्रमाणें पावले असेत. याउपर तुह्मी आपले वंशपरंपरेनें सदरहू देहाय मजकूरचें वतन व घरवाडा मौजे उरवडें येथील अनुभवीत जाणें. देखील हारकी, व खर्चव्यर्च जाहलेला आपले वडिलीं तुमचे वडिलांपासून पैका देऊन अगर बलात्कारें घेतले, परंतु आपण आत्मसंतोषें सदरहू पांचशें रुपये घेऊन वतन व घरवाडा देखील तुह्मांस दिल्हा असे. याउपर आपणासीं आपले वंशपरंपरा सदरहू साता गांवींचे वतनासीं अर्थाअर्थीं संबंध नाहीं. साता गांवींचे कागदपत्र दिवाणचे व तुमचे वडिलांचे हरएक असतील ते रद्द असेत. आपले वंशींचा होऊन कोणी वतनासी कथला करील, तो गोताचा खोटा व दिवाणचा गुन्हेगार; आपले वंशींचा नव्हे. श्रीनागेशाची आण असे. हा आशीर्वाद."

शामराजपंतास पेशवाई मिळाली असोन त्याजला कुलकर्णाचें वतन महत्त्वाचें वाटलें व तें त्यांणीं घेतलें होतें. यावरून त्या काळीं हें वतन किती महत्त्वाचें होतें, हें सहजीं लक्षांत येतें.

या वतनाबाबद बापूजी सोनाजी प्रभु देशपांडे यांस राजश्री शाहू छत्रपति यांणीं राजशक ३५ इ. स. १७०८ सालीं खालीं लिहिलेंप्रमाणें राजपत्रें करून दिलीं.

श्री.

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे आषाढ बहुल द्वितीया सह तृतीया गुरुवासरे क्षत्रियकुलावंतस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री नारो पंडित सचिव यांसीः—आज्ञा केली ऐसीजेः—बापूजी सोनाजी प्रभु व जनाजी राम प्रभु, देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी तर्फ मुठेंखोरें प्रांत मावळे, या उभयतांतून बापूजी सोनाजी प्रभु यांनीं किल्ले पन्हाळियाचे मुक्कामीं हुजूर स्वामीसन्निध विनंति केली कीं, तर्फ मजकूरचे देशकुलकर्ण व गांवकुलकर्ण पूर्वापार पिढी दर पिढी वतन आपले वंशपरंपरेनें अनुभवीत आहों. त्यास, कैलासवासी तीर्थरूप साहेबांचे कारकीर्दीस शामराज निळकंठ पेशवे होते; त्यांणीं सन आर्बा खमसेन (इ. स. १६५३) मध्यें स्वामित्वाचे बळें, आपले वडील विसाजी बल्लाळ व सोनाजी बापूजी यांजपासून बलात्कारें गांवकुलकर्णें लिहून घेतलीं—बितपशीलः—

१ मौजे उरवडें, १ मौजे आंबवली, १ मौजे आंबेगांव, १ मौजे भवली, १ मौजे माळेगांव, १ मौजे कोढूर, १ मौजे जातेडें. . .

ऐसे सात गांव लेहून घेतले, आणि होन पा। १२५ सवाशें देऊन कुलकर्णाचें विक्रियपत्र लिहून घेतलें. तेणेंप्रमाणें दिवाणांतून राजपत्र करून घेतलें. दिवाणांत होन पा। १२५ सवाशें सेरणी दिली, आणि सदरहू साता गांवींचें कुलकर्ण याचा भोगवटा केला. त्यावरी ते मृत्यु पावले. त्याजपासून अलीकडे आपलें वतन सातागांवींचें कुलकर्ण आपले वडिलांपासून सत्तेचे बळें घेतलें होतें, हें सर्वांस दखल होतें. याकरितां आमचें वतन. आह्मी गांवकुलकर्ण चालवीत आलों. त्यावरी सन सबा मया (इ. स. १७०६) मध्यें सिंहीगडचे (सिंहगडचे) मुक्कामीं, राजश्री रामचंद्रपंत आमात्य असतां, शामराज निळकंठ रांझेकर यांचे नातू शामराज महादेव रांझेकर येऊन, आपणांस मुजाहिम जाहाले कीं, सातागांवींचें गांवकुलकर्ण आपले आजे यांणीं विकत घेतलें आहे. त्याचें विक्रियपत्र तुमचे वडिलांचें बजिन्नस आहे व तेणेंप्रमाणें दिवाणचें राजपत्र आहे. तेणेंप्रमाणें आपण वतन आनभवीन ह्मणोन कथला केला. त्यावरून आमात्यपंतांपाशीं ते व आपण हयाल जाहलों, आणि पूर्वोत्तर आपले विदित केलेवरूनही कागदपत्र आहेत ह्मणोन विदित केलें. त्यावरून देशमुख तर्फ मजकूर बेशमी आर्जोजी राउतराऊ व राघोजी राउतराऊ ढमाले व रुमाजी गंभीर राऊ

मारणे देशमुख तर्फ मजकूर व समस्त हामशाई गोत यांजवरी मनसुफी टाकली. त्यासही पूर्वोत्तर आपलें व त्याचें अवगत होतें. बलात्कारें शामराजपंतांनीं साता गांवींचें कुलकर्ण लिहून घेतलें. वृत्तिमाफिक पैका दिल्हा नसतां सवाशें होन देऊन विक्रियपत्र सत्तेनें घेतलें, आणि पेशवाई होती तोंवरी भोगवटा केला. त्याअलीकडे त्यांचे पुत्रानें अगर नातू तुह्मीं भोगवटा केला नाहीं. ज्याचें वतन ते अनभवीत आहेत. ऐसीयास सांप्रत तुह्मी येऊन वतनास मुजाहिम होतां. तरी साता गांवींचे कुलकर्णाचें वृत्तिमाफिक द्रव्य गोताचें मतें होईल, त्यांत पहिलें दिल्हें तें वजा देऊन, वरकड द्रव्य देणें; आणि गोताचे रजावंदीनें कागदपत्र करून घेऊन वृत्ति खाणें; अगर पैका पूर्वीं बलात्कारें देऊन विक्रियपत्र करून घेतलें आहे, त्या पत्राप्रमाणें देशकुलकर्णी मजकुरापासून द्रव्य तुह्मीं घेणें. दोहींतून जे गोष्टी तुह्मांस मानेल ते मान्य करणें; ह्मणोन गोतमुखें निर्वाह जाला. तेव्हां शामराज महादेऊ बोलिले कीं, “आपण व्यापारी; वृत्तीचा प्रसंग आपणास होत नाहीं; याजकरितां व हे पुरातन वतनदार, आपले वडील पेशवाई करीत असतां वतन घेतलें हें यथार्थ, आणि त्याजमागें आपला भोगवटा नाहीं. पुढेंही आपले वस्तु वर्तनाचा निर्वाह होत नाहीं. याजकरितां आपणांस वृत्ति लागत नाहीं. आपणांपासून त्यांस पैका दिल्हा आहे, त्याचें विक्रियपत्र आहे. तो व दिवाणांत सेरणी दिल्ही आहे तो पैका आपला आपणास देववणें; ह्मणजे पूर्वील खतपत्रें जीं आहेत तीं देतों. पुढें अर्थाअर्थीं संबंध नाहीं ऐसें करितों.” ह्मणोन गोतामध्यें मान्य जाला. आपणास गोतानें पुसिलें कीं, तुह्मी या गोष्टीस रजावंद आहां कीं काय? त्यास आपण वृत्तिवंत ह्मणोन आपलें वतन आपण आनभवीत आहोंत. कागदपत्रांवरून तुह्मीं गोताचे मुखें पैका द्यावा, असें जालेयास आपण पैका द्यावयास रजावंद आहों. त्यास त्याचे वडिलीं कांहीं दिवस वृत्ति अनभवली आहे. त्यामुळें वृत्तीचें उपेद्र (?) त्यास पावलें आहे, ते सदरहू पैक्यामध्यें मजुरा देणें ह्मणोन गोतांस विनंति केली. त्यावरून गोतमुखें निर्वाह केला. विक्रियपत्राप्रमाणें होन पा। १२५ सवाशें व दिवाणांत हारकी राजपत्रावरून जमा होन पा। १२५ सवाशें. एकूण आडीचशें होन आदा दर सद्दे ३०० प्रमाणें रुपये ७५० साडेसातशें जाहले. त्यास कुलकर्णाचा भोगवटा जाहला. त्यामध्यें उपेद्राचा (?) ऐवज यकदमा रुपये २५० आडीचशें वजा करून, बाकी रुपये ५०० पांचशें द्यावे आणि शामराज महादेव यांणीं पूर्वील कागदपत्र आणून द्यावे, असा गोतमुखें निर्वाह जाला. तेणेंप्रमाणें शामराज महादेऊ मान्य होऊन आपणास पत्र लेहून दिल्हें कीं, आपण पत्रें पूर्वील जीं आहेत तीं आणून देतों. त्यास मुदत केली. मुदतीस पत्रें न देऊं तरी पैकियास व वृत्तीस संबंध नाहीं. ऐसें लेहून पत्र आपणांस दिलें. त्यावरी

सन समान मया (इ. स. १७०७) मध्यें पूर्वील पत्रें सुप्याचे मुक्कामीं आणून दिलीं. आपण त्यास रुपये ५०० पांचशें देऊन पांवलियाचें पत्र लेहून घेतलें. त्याप्रमाणें कागदपत्र मनास आणून, राजपत्र करून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणऊन विनंति केली, आणि शामराज निळकंठ रांझेकर यांणीं विक्रियपत्र देशकुलकर्णी मजकुरापासून घेतलें होतें तें, व शामराज महादेव यांणीं गोतमुखें निर्वाह जाहलेयाचें पत्र पांचशें रुपये द्यावें असें दिलें होतें तें, व पैका पावलेयाचें पत्र होतें तें मनास आणून, स्वामींनीं बापूजी सोनाजी व जनाजी राम यांस सदरहू साता गांवींचें गावकुलकर्णाचें वृत्तिपत्र व सुभेदार प्रांत मावळे यांचे नांवें सनद सादर केली असे. व हें पत्र तुह्मांस लिहिलें आणि सदरहू साता गांवींचें गांवकुलकर्ण दुमाले करवून दिवाणांत हारकी रुपयं ५०० पांचशें रास घेतले असे. तरी तुह्मी साता गांवींचें गांवकुलकर्ण देशकुलकर्णीमजकुरास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. या वतनास हक्क व लाजीमा व इनाम जमीन व मिराशीचीं शेतें ठिकाणें जीं पूर्वापार भोगवटा चालत आला असेल तेणेंप्रमाणें चालवणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें तरी सुज्ञ असा."

या राजपत्राप्रमाणें सदरहू गांवचीं गांवकुलकर्णें देशपांडे यांजकडे वशपरंपरा आजपर्यंत निर्वेध चालत आहेत.

येणेंप्रमाणें कागदपत्रांवरून सामराज (शामराज) निळकंठ रांझेकर हे इ. स. १६५२ चे पूर्वीपासून शिवाजी महाराजांचे पेशवे होते असें दिसून येतें.

---

## शाहू महाराजांचें स्वदेशीं आगमन व बापुजी सोनाजी दिघे यांची कामगिरी.

सन १६९१ इसवी सालीं इकडील मुलुखाचे बंदोबस्तास रामचंद्रपंत बहुतकर हुकमतपन्हा यांस नेमून राजारामसाहेब महाराज जिंजीस गेले. ते वेळीं महाराजांचे आज्ञेवरून मावळ प्रांतींचे सरदार बाजी सर्ज्योराव जेधे देशमुख तर्फ रोहिडखोरें व पासलकर देशमुख तर्फ मोसेंखोरें व देशपांडे तर्फ मुठेंखोरें वगैरे जमीनदार आपले जमवानिसीं रामचंद्रपंत हुकमतपन्हा यांचे लष्करांत सामील होऊन मोठमोठे पराक्रम करीत होते. रामचंद्रपंतांचे लष्करांत शंकराजी नारायण गांडेकर हे फार हुशार कारकून होते. त्यांनीं मावळचे सरदार, त्या फौजेनिशीं बरोबर घेऊन, त्यांचे साह्यानें मावळ प्रदेशांतील वगैरे किल्ले, कोटांच्या चोरवाटा व माऱ्यांच्या जागा ह्यांची माहिती मिळविली; आणि या मावळे सरदारांचे साह्यानें मोंगलांचे फौजेचा चक्काचूर उडवून, किल्ले, कोट, मुलूख काबीज केले. हें वर्तमान रामचंद्रपंतांनीं जिंजीस लिहून पाठविल्यावरून, राजाराम महाराज

यांहीं शंकराजी नारायण यांस सचिवपदाचा अधिकार देऊन वस्त्रें पाठविलीं. लष्करांतील सरदारांस सभासद असा किताब देण्यांत येत असे. शंकराजी नारायण सचिव यांचे फौजेंत, मुठेंखोरें महालचे दिघे देशपांडे मंडळींतील चौघे सरदार होते. येविशीं इसवी सन १६९८ सालचें एक पत्र मिळालें आहे. त्याचा उतारा खालीं देतोंः—

श्री.

"मा। अनाम देशकुलकर्णी तर्फ मुठेंखोरें यांसीः—

शंकराजी नारायण सचिव सुरुसन तिस्सा तिसैन अलफ, बद्दल शेरणी हक्का-पैकीं बद्दल देणें वेतनांत कारकून व लोक

| | |
|---|---|
| सेवक राजकडी [?] रुपये ५०. | जनाजी राम सभासद रुपये १२॥. |
| राजश्री महादाजी बाजी सभासद रु. २५. | बापुजी सोनाजी पदांती |
| मोरो धाक प्रभु सभासद रुपये ६।. | पन्हा सहश्री रुपये ६।. |

एकूण रुपये पन्नास देविले असेत. आदा करणें. जाणिजे.छ ५ रबिलाखर परवानगी हुजूर मोर्तब असे."

(बार सुरु सुदबार.)

यावरून पत्रांत लिहिलेले चार इसम दिघे व देशपांडे सरदार होते, व बापुजी सोनाजी हे हजार पायदळाचे सरदार होते, असें स्पष्ट दिसत आहे.

सन १६९१ इसवी सालीं राजाराम महाराज जिंजीस गेले, तेव्हां परसोजी भोंसले यांस सेनासाहेबसुभा असें पद देऊन गोंडवण व वऱ्हाड वगैरे प्रांतांत अंमल बसविण्यास पाठविलें, व त्या प्रांतांत पुढें त्यांणीं अंमल बसविल्यामुळें तो प्रांत त्यांजकडे सोंपविला गेला. पुढें सन १६९९ इसवींत, परसोजी भोंसले हे राजाराम महाराजांचे फौजेंत मिळाले, व महाराजांनीं वऱ्हाडांतील चौथाई व सरदेशमुखीचे वसुलाचें काम त्यांजकडे कायम ठेविलें. ते वेळीं वरील पत्रांतील बापुजी सोनाजी पदांती पन्हासहश्री हे हुशार, बुद्धिवान्, राजकारणपटु, पराक्रमी व मुत्सद्दी असें पाहून, त्यांजला महाराजांकडून परसोजी भोंसले यांणीं आपलेकडे जमेनिसीचे कामावर नेमून घेतलें; आणि बापुजीचें अलौकिक बुद्धिचातुर्य पाहून सर्व काजकारभार त्यांचे विचारें करूं लागले.

सन १७०७ इसवीमध्यें औरंगजेबाचा पुत्र अजिमशाहा याणें शाहू महाराजांस अटकेंतून मुक्त करून स्वराज्यांत पाठविलें. तेव्हां इकडे ताराबाईसाहेब यांणीं बहुतेक सरदारांकडून, आह्मी तुमचा पक्ष सोडणार नाहीं अशा, शपथा घेवविल्या. शाहू महाराज निघून लांबकानी गांवीं आले. तेथें त्यांजला

१ लांबकानी ह्या गांवी कोट होता, व तेथें सुजानसिंग राऊळ हा जहागिरदार होता. (शाहू महाराजांची रोजनिशी पृ. ९४.) लांबकानी हा गांव जिल्हा खानदेश, तालुके धुळें यांत धुळ्यापासोन ७/८ कोसांवर असल्याचें समजतें.

ताराबाईकडील सर्व वृत्त कळलें. तेव्हां शाहू महाराजांस विचार पडला कीं, आपल्या जवळ फौज व ऐवज नाहीं; व आपल्या इकडील कोणाही सरदाराची ओळख व परिचय नाहीं; आणि इकडे युद्धांगिवाय परिणाम लागेलसें दिसत नाहीं. तेव्हा निभाव कसा लागतो, या विवंचनेंत पडले.

शाहू महाराजांची स्वारी लांबकानीस आल्याचें वर्तमान बापुजी सोनाजी दिघे यांस कळतांच, त्यांनीं सेनासाहेबसुभा यांस कळविलें की, आपण शिवाजी महाराजांचे एकनिष्ठ सरदार. हल्लीं शिवाजी महाराजांचे नातू व राज्याचे खरे मालक जे शाहू महाराज ते आले आहेत, तरी त्यांजला भेटावें. त्यांजला इकडील कोणाही सरदाराची ओळख नाहीं. ताराबाईशीं प्रसंग! शाहू महाराजांचे बरोबर फौजही नाही. करितां अशा दुर्घट प्रसंगीं आपणांकडून त्यांजला मास्न मिळाल्यास आपणांस भूषणास्पद होईल व यात साधल्यास आपलाही कांही फायदाच होईल.

ही मसलत भोंसले यांस पसंत पडली, आणि लागलीच परसोजी भोंसले यांनीं आपले तर्फे बापुजी सोनाजी दिघे जमेनिवीस यांसच महाराजांकडेस पाठविलें. बापुजी यांनी लांबकानीचे मुक्कामी जाऊन स्वामीचें दर्शन घेतलें. तेणेंकरून शाहू महाराजांस परमानंद झाला.

परसोजी भोंसले यांचे आज्ञेप्रमाणें सर्व .बोलणी नेमांत आल्यावर, शाहू महाराजांनीं बापुजी दिघे प्रभु यास सागितले की, हें सर्व कार्य. ईश्वरकृपेनें शेवटास गेल्यास तुह्मांसही दोन गांव स्वामी इनाम देतील.

नंतर बापुजी प्रभु परत येऊन परसोजीस साकल्य वर्तमान निवेदन केलें. तें श्रवण करून परसोजीसही संतोष झाला, आणि स्वामीचे आज्ञेप्रमाणें बापुजीस बरोबर घेऊन, फौजेनिशीं परसोजी भोंसले यांणी शाहू महाराजांकडे जाऊन स्वामीचें दर्शन घेतलें. शाहू महाराजांनीही त्याचा योग्य सत्कार केला. परसोजीं-सारखे मातबर सरदार अनुकूल जाहल्यानें शाहू महाराजांस फारच संतोष होऊन सर्व चिंता दूर झाल्या.

परसोजी भोंसले व बापुजी सोनाजी दिघे देशपांडे यांस फौजेसह बरोबर घेऊन शाहू महाराज साताऱ्याकडे चालले असतां, परसोजीनें व बापुजी सोनाजीनें हैबनराव निंबाळकर व नेमाजी शिंदे वगैरे सरदार व मराठे लोक शाहू महाराजांस अनुकूल करून दिले. ते फौजेसह शाहू महाराजांस येऊन मिळाले. अखेर धनाजी जाधव सेनापतिही इसवी सन १७०७ चे मे महिन्यांत शाहू महाराजांस मिळाले. (गोविंद सखाराम सरदेसाई हे आपले हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास भाग २ या पुस्तकाचें पृष्ठ ५७० यांत, हे सरदार परसोजी भोंसले यांचें उदाहरण पाहून

शाहू महाराजांस मिळाले असें ह्मणतात.) याप्रमाणें शाहूचे फौजेचा मोठा जमाव होऊन ताराबाईकडील प्रतिनिधी लढाईत पराभव पावले.

शाहू महाराजांस राज्यप्राप्ति झाल्यावर बापुजी सोनाजी दिघे प्रभु देशपांडे तर्फ मुठेंखोरें यांस, त्यांनीं वचन दिल्याप्रमाणें वंशपरंपरा दोन गांव इनाम देऊन राजशक ३५ इसवी सन १७०८ या सालीं खालीं लिहिल्याप्रमाणें राजपत्र करून दिलेंः—

श्री.

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे आषाढ बहुल पंचमी रविवासरे क्षत्रियकुलावंतस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं मशरूल बापुजी सोनाजी प्रभु, उपनाम दिघे, देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी तर्फ मुठेंखोरें सुभा प्रांत मावळ यांसी दिल्हें इनामपत्र ऐसाजेः- स्वामी परराष्ट्रांतून स्वराज्यांत आले, त्या प्रसंगीं तुह्मी राजश्री परसोजी भोंसले यांची जमेनिशी करीत असतां, त्यांचे तर्फेनें स्वामींचे दर्शनास येऊन लांबकानीचे मुक्कामीं दर्शन घेतलें. स्वामींचे आज्ञेवरून राजश्री परसोजी भोंसले यांस फौजेनिशीं स्वामींचे दर्शनास आणिलें. ते प्रसंगीं तुह्मीं सेवा बहुत एकनिष्ठेनें केली, व पुढेंही निष्ठेनें वर्तणूक करितां. तुमचें ऊर्जित करून वंशपरंपरेनें चालवणें हें स्वामींस आवश्यक. याकरितां व तुह्मीं विनंति केली कीं, आपण स्वामींचे राज्यांतील वतनदार सेवक आहों. जें ऊर्जित करणें तें वतनसंमंधावरी केलीयानें परंपरागत चालेल.. त्यावरून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन नूतन इनाम देहे तर्फ मुठेंखोरें पैकीं २ः—

१ मौजे भोवली. १ मौजे टेमघर.

ऐसे दोन्ही गांव इनाम कुलबाब, कुलकानू खेरीज हक्कदार व इनामदार करून चतुःसीमा भूमी पूर्वमर्यादेप्रमाणें देखील जल, तरू, पाषाण, झाडझाडोरा, निधिनिक्षेपसहित इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हा असे. तरी सदरहु दोही गांवचा इनाम उपभोग तुह्मीं व तुमचे बाप भाऊ जनाजी राम देशकुलकर्णी समेत पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभऊन सुखरूप असणें. स्वामी व स्वामींचे वंशपरंपरेनें तुह्मांस इनाम दोन्ही गांव चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष."

तेरीक १९ रबिलाखर, तिस्सामया. (मर्यादेयं विराजते. बारसुरु सुदबार.)

या राजपत्राप्रमाणें हे दोन्ही गांव हल्लीं देशपांडे यांचे सर्व भाऊपणांकडे वंशपरंपरा इनाम चालत आहेत.

बापुजी सोनाजी हे वऱ्हाडांत नोकरीवर असोन वतनावर त्यांचे भाऊपणांतील महादाजी रघुनाथ दिघे देशपांडे हे होते. वर लिहिलेलीं राजपत्रें बापुजीनें महाराजांकडून घेऊन महादाजी रघुनाथ यांजकडे स्वदस्तुरचे पत्रासोबत पाठविलीं. तें अस्सल पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें आहेः—

श्रीशंकर:

"श्रीयासहस्त्रय चिरंजीव राजश्री महादाजी रघुनाथ यांसी:–

प्रीतिपूर्वक बापुजी सोनाजी प्रभु आशीर्वाद; उपरी येथील वर्तमान राजश्रीनें आमच्या तमाम समदापत्रा देविल्या असेत. आह्मी स्वार होऊन सत्वरच येऊं. कळलें पाहिजे. यानंतर टेमघरच्या इनामाच्या सनदा करून पाठविल्या असेत व मौजे भवली व टेमघर येथील जो वसूल घेतला असेल, तो तिजाईमध्यें मजुरा घेणें (कागद फाटला आहे.) हीं पत्रें पाठविलीं असेत. घेऊन जो वसूल दिवाणांत घेतला असेल तो आपला मजुरा घेणें; व मौजे भवली व टेमघर येथील ताकीदपत्रें महाराज स्वामींचीं घेतलीं असेत. घेणें. पावलीयाचें उत्तर पाठविणें. येविशीं राजेश्री सचिवपंत यांचींही पत्रें घेतलीं असेत.-कीं, जो ऐवज घेतला असेल, तो तिजाईमध्यें मजुरा घेणें. ऐसीं पत्रें घेतलीं असेत. ते तुह्मांकडे पाठविलीं असेत. तूप व डबे तीन पाठविलें तें पावलें. कळलें पाहिजे. तुह्मीं शिरोळास आलां ह्मणोन वर्तमान ऐकितों. तर तुह्मीं व जनाजी ऐसे भेटीस येणें. भेट जाहलीयावर दुसरे रोजीं तुह्मांस निरोप देऊं. आमचीही रवानगी लवकरच होणार आहे. तर सत्वर भेटीस येणें. हे आशीर्वाद. जनाजीस रुपये ७॥ साडे सात देविले असेत. ते त्याचे घरीं पावते करणें. येविशीं तुह्मांस (कागद फाटला आहे.) व त्यास रुपये देविले असत. तर तुह्मीं त्याचे घरीं रुपये (साडे) सात पावते करणें. येविशीं अनमान न करणें हे आशीर्वाद."

या पत्राप्रमाणें महादाजी देशपांडे यांनीं इनाम गांव आपले कबजांत घेतले.*



* परसोजी भोंसले याचे पश्चात् परसोजीचे चिरजीव कान्होजी भोंसले यांस सेनासाहेबसुभा हें पद मिळालें. तेव्हां इसवी सन १७२६-२७ सालीं कान्होजी भोंसले यांनी बापूजी सोनाजी प्रभु यांस सरंजामाचीं पत्रें आणावयास शाहू महाराजांकडेस पाठविलें होते. तेव्हां सरंजामाचीं पत्रें महाराजांनीं बापुजी प्रभु याजबरोबर पाठविली. (पहा:–शाहू महाराजांची रोजनिशी, पत्र नंबर २३ व २६, पृष्ठ ९-१०.)

इसवी सन १७२७-२८ सालीं निजामनमुलुख यांजवर प्रधान व सेनापति, सरलष्कर वरकड फौजा गुजरात कुली एकत्र होऊन आल्या. तरी तुह्मीं त्यास सामील होऊन गनीमास नतिजा देणें. ह्मणोन शाहू महाराजांनी कान्होजी भोंसले व बापुजी सोनाजी प्रभु यांस पत्रें पाठविलीं. (पहा:–शाहू महाराजांची रोजनिशी, पृष्ठ १४ पत्र नंबर ३७.)

इसवी सन १७२८–२९, राजश्री यशवंतराव व बापुजी प्रभु स्वामींसन्निध आले आहेत व कोन्होजी भोंसलें हुजूर दर्शनास येतात. तुह्मीं वऱ्हाड प्रांतीं धामधूम न करणें ह्मणोन बाजीराव पंडित प्रधान यांस शाहू महाराजांचें आज्ञापत्र गेलें. (पहा:–शाहू महाराजांची रोजनिशी, पृष्ठ १५ पत्र नंबर ४१.)

# ऐतिहासिक स्फुट लेख.



## भाग २ रा.



### १. खंडो बल्लाळ चिटणवीस यांची त्रोटक हकीकत.*



" * * * कबजींच्याच कारभारांत बाळाजीबावा यांजवरी राजकारणाविषयीं लिहिण्याचें निमित्त ठेऊन, आवजीबावा वडील पुत्र व बाळाजीबावा यांसीं मारिलें. चिटणिशीच्या लिहिण्याकडे महिमानगडकरी यांचे वडील व अमृतराव मामा यांचे वडील लिहिणार होते असें स्मरतें. त्यांजवळूनच काम घेत होते. आप्पा व आण्णाजी दोघे बंधु. वडील आप्पा, कनिष्ठ आण्णाजी, अठरापंधरा वर्षांच्या वयांत वडिलांस मारिलें तेव्हां असतील. वडिलांची गती जाल्यावर आप्पाजी संभाजी महाराजांजवळच राहिले. अष्टौप्रहर हजर असावें, या चालीनें चालत होते. महाराजांची मर्जी क्रूर. आण्णाजीही परम रागीट. वडिलांस मारिलें; या राजाजवळ आपला परिणाम नाहीं; आर्जव होणार नाहींत; यांचें दर्शन नको, असें ह्मणोनच होते. कांहीं दिवस गेल्यावर आपण येथें राहात नाहीं ह्मणोन कुटुंब घेऊन किंवा सडे, चंदीस कोण गुजर कीं माहाडीक सुबेदार होते, त्यांचा वडिलांचा परम घरोबा, त्यांजकडे गेले. तेव्हां यांची मातुश्री होती कीं नव्हती, वस्ती कोठें होती याचें स्मरण नाहीं. असो.

* खंडो बल्लाळांची योग्यता सर्व महाराष्ट्रीयास अवगतच आहे. त्यांच्या आयुष्यांतील मुख्य मुख्य गोष्टीचा ऊहापोह स्थूलमानानें पूर्वीं झालाच आहे. तथापि, त्यांच्या चरित्रलेखनास अवश्य लागणारी बरीच माहिती उपलब्ध नसल्यामुळें इतिहासभक्तांची जिज्ञासा तृप्त होणार नाही. यास्तव, बोरगावदप्तरात त्यांचे संबंधी मिळालेल्या कागदपत्रांचा निदान सारांश 'इतिहाससंग्रहांत' प्रसिद्ध होणें इष्ट होय. प्रस्तुत हकीकत लेखकानें वृद्धापकाळीं केवळ स्मरणाने लिहून ठेविली आहे व तसे त्यानें नमूदही केलें आहे. ही फार लांबलचक असल्यामुळें हिच्यांतील नीरस व विशेष महत्त्वाची नाहींत अशीं वाक्यें ठिकठिकाणीं गाळलीं आहेत. खंडोबांच्या गृहस्थितीचे व स्वभावाचें स्पष्टीकरण हींत चांगलें केलें आहे. थोर पुरुषांच्या चरित्रांवर त्यांच्या खाजगी वर्तनावरून पुष्कळ प्रकाश पडतो, हें सांगावयास नकोच.

१ औरंगजेबाचे पुत्राशीं राजाराम महाराजांच्या हिताची मसलत केल्याचा आरोप बाळाजींवर ठेवण्यांत आला.

आण्णाजी अशा प्रकारें सोडून गेल्यावरी, आप्पा निराश्रित एकटे देवावर भार घालून, मोठ्या धैर्यानें संभाजी महाराजांजवळ राहिले. ते दिनचर्या कशी लोटली असेल ते सांगतां येत नाहीं. मिळेल तें अन्नवस्त्र संपादून, नित्य स्नानभोजन करून, कमरहस्ता एकादा प्यादा हजर राहतो तसें असावें. काळापुढें जावबेल, परंतु त्या समईं राजापुढें जाणें संकटं. तशांत दिवस घालविले. राजश्रींची मुख्य मुद्रा पत्रावर व्हावी. ते जनान्याकडील देवडीवर होण्याची चाल. कांहीं दिवस क्रमिल्यानंतर शिक्क्याचीं पत्रें आप्पाचे स्वाधीन करावीं. "जा शिक्के करून आण" ह्मणोन सांगावें, असें घडूं लागलें. याचा बाप व भाऊ आपण मारिले. एक भाऊ यासी सोडून गेला. हा आपणास धरून राहिला. एकनिष्ठ. हेंही राजश्रीच्या ध्यानांत येऊन अन्नवस्त्राचा समाचार घेऊं लागले. कांहीं दिवस असेच गेले. राज्यभार चाललाच होता. ते वेळेस अष्टप्रधान यांची व्यवस्था कोण, काय, हें स्मरणांत नाहीं. प्रमुखता कबजीकडेच, असें स्मरतें.... आपल्या प्रकर्णीं राजश्रींनी फिरंग्यांचें प्राबल्य पाहून एकाच मुहूर्तावर गोवें, रेवदंडा, साष्टी, वसई, दमण आदिकरून फिरंग्यांचे[2] ठाण्यांवर फौजा पाठवून हल्ला करून हस्तगत करावयाचा उद्योग केला. कोणत्या ठाण्यांवर कोण सरदार पाठविला, त्याचें स्मरण नाहीं. खांसा आपण गोंव्यावर चालून गेले. स्वारीबरोबर[3] आप्पा पायउतारा कमर बांधून, गळ्यांत पडदळें, तरवार कमरेस, तांब्याचें कलमदान कागद खोंचून पालकीबराबर चालत होते. मार्गीं कोण्ह्या गडचें पत्र आलें, त्याचें उत्तर देणें जरूर. लिहिणार पाहतां जवळ हेच होते. कागद यांचे आंगावर टाकिला. जाब लिहिण्याची आज्ञा केली. खासें कलमदान....

१ संभाजी महाराज धुंदीत असता येसूबाईचीही त्याचे पुढे जाण्याची छाती नसे. मग सामान्य जनांस ते काळाहून भयंकर वाटत असले, तर त्यांत आश्चर्य काय? २ पोर्च्युगीज लोकांचे. ३ "ते समयी गोव्याचे राजकारण आले. ते सिद्ध करून खासाच फौजबंदी, पायलोक करून समुद्रास भरते न आले तों समय नेमला...तैसेच निघोन जातां वाटेस मदनगडचीं पत्रें बातमीची आली. ते समयी लिहिणार कोणी आहे नाही विचारिलें. तों खंडो बल्लाळ यांणीं, महाराज कृपा करीत तो, पायउतारा स्वारीबरोबर असावे ऐसें व्रत केले होतें. तसेंच पायउतारा पाठीमागे जात होते. तो लोकांनी सागितलें कीं, खंडोबा चिटणीस धांवत येत आहेत. ते समयी हांक मारविली. तों धांवून येऊन पावले. त्यांस जाब लिहून देणें सांगितलें. तों बसोन लेहून दिल्हे. स्वारी पुढे गेली. पुन्हां धांवून निशाण करून दिल्हें. तों रक्त ओकले. पाहून आस्ताव्यांतून पाणी देववून, खांसा घोडा जिलबीस होता तो देऊन, बसा ह्मणोन सांगितले. गोंव्यानजीक गेलियावर पालखीतून उतरून घोड्यावर स्वार जाले. आणि निकडीनें आटोपावें ह्मणून पोहोंचले. तों त्या अवसरी भरतें प्राप्त झालें."

असेंही स्मरतें. जाब लिहिण्याचे अवकाशांत पालकी दूर गेली. आप्पांनीं धांवून जाऊन पालकी आटोपली. पालकी उभी करून, पत्रावर मुद्रा करून देण्याचे अवकाशांत, आप्पास घेरी येऊन तोंडांतून रक्ताची गुळणी पडली. पाहून खाशा सुरईतील पाणी नेत्रांस लाविलें. प्यावयास दिल्हें. सावध करून, सावध आहेस कीं, विचारून जिलेबींतील घोडा बसावयास देविला. इतकीयांत स्वारी गोंव्याजवळ गेली. मुहूर्ताचा समय कांहीं चुकला. समुद्राचे पाण्याचा वोहट. अशा समयीं हल्ला नेमिला. जाण्यास विलंब जाला. भरतें येऊं लागलें. तशांतच हल्ला केला. अलीकडील चौक्यावर मारामार जाली. फिरंग्यांचें सामान मजबूत होतें. लढाई पडली. खांसा राजश्री घोड्यावर स्वार होऊन लढाई पहातच आहेत. रण चांगलेंच जालें. ते दिवसीं गोंवें घ्यावयाचेंच. परंतु फिरंग्यांचें दैव समुद्रांनीं रक्षिलें. जिनावरून पाणी जाय, तोंवर मारामार करीत, राजश्रीकडील लोक पाण्यांत शिरले. पुढें उपाय न चाले. हल्ला फिरली. या लढाईत आप्पानी शिपाईगिरी राजश्रीसमक्ष मोठ्या धारकरी यांच्याबराबर–किंबहुना सरस केली. हें[१] पाहून परतोन आल्यावर कृपाळूपणें जवळ बोलावून गळां मिठी घालून, "शाबास, तूं एकनिष्ठ आहेस. तुझा बाप भाऊ आपण मारिले, हें दुःख चित्तांत न आणितां, आपले प्राणाकडे न पाहातां, माझी सेवा केलीस. शाबास!" ह्मणोन खाशा पोषाकापैकीं पोषाक देऊन, माझ्या राज्यांतील चिटणिसीचा रोजगार तुझा वंशपरंपरेनीं तुजला दिला, ह्मणोन बोलून खातरजमा केली. मुक्कामास आल्यानंतर लिहिणार स्वाधीन करून देऊन धंदा चालता केला. वडील मारले गेले, तेव्हां घरदार संपत्ति काय असेल नसेल तें ऐकिल्यांत नाहीं. आप्पांनीं मेहनत करून समुद्रांत बुडालें रत्न काढिलें. या पराक्रमांत भाऊ, चुलते कोणीच जवळ नाहींत. सारे आपआपले जीव जतन करीत फिरत होते. पुढें औरंगजेब पातशाहा दक्षिणेंत येऊन या राज्याची पाठ घेतली. संभाजी महाराज असावध. कबजींनीं हितशत्रुत्व करून राज्य बुडविलें. पातशाहांनीं तमाम किल्ले जागे

१ ते समयीं बहुत संतोष होऊन पोटाशीं धरिले आणि बोलले जे, "तुझे वडील निरपराधें, लुच्याचे सांगण्यावरून विचार न करिता मारिले असतां, आज चाकरीची शर्त केली! तुझी चिटणिशी महाराजानी वंशपरंपरा करून दिल्ही. निसबतीचे धंदे कारखानिशा, जमेनिशा ते बहाल आहेत. कै. रामदासी महाराज तुमचे वडिलांवर प्रीति विश्वास ठेऊन करीत होते तें पाहिले आहे. त्याहून अधिक तुह्मावर प्रीति, विश्वास ठेवून चालवीन."–**मल्हार रामराव.**

२ बाळाजी आवजी मुत्सद्दी होते. परंतु ते वीर नव्हते. खंडोबांनी दोन तीन प्रसंगीं चांगलीच तरवार गाजविली. "त्याजबरोबर (संभाजी महाराजांबरोबर) खंडो बल्लाळ यांणीं घोडा घालून तरवार मारिली. शिपाईगिरी केली." – **मल्हार रामराव.**

घेतले. विशाळगडाजवळ पाचाड(?) ह्मणोन जागा, तेथें फौजा जाऊन संभाजी महाराजांस धरिलें. त्याच संधींत चार मोठे कारभारी ब्राह्मण व आपले वडील आप्पा यांहीं राजाराम साहेब यांसी काढून चंदीस घेऊन [1] गेले. चंदी संस्थान मोठें. तेथें राजधानी जमली. सर्वांनी सुख फार भोगिलें. घरें दारें संसार करून सुखी होते. आप्पाच्या प्रथम स्त्रीस एक कन्या जाली. ती पोतनिविसांचे घरीं दिल्ही....तिचे पुत्र भगवंतराव हे प्रसिद्धच आहेत. ती स्त्री चंदींतच निवर्तली.... आप्पाजी यांसीं, राजा कर्ण ह्मणोन राजाराम यांचा दासीपुत्र, त्याची दिवाणगिरी होती. आप्पा राजश्रीसमागमें होते. जवळपासच राहिले. निराळेच होते. स्त्रीचा काळ जाल्यावर देशींहून नवरी नेण्याचा प्रयत्न आण्णाजी यांसीं सागून राजश्रींनीं करविला[2]. कामी व काकाई ह्या दोघी नवऱ्या नेल्या. कामीचें लग्न राजांनीं करविलें. काकाईचें लग्न मागून घरींच केले. काकाई वयानें व शरीरानेंही मोठीच होती. यांस संतती चंदीतच आमाबाई....आणखी एक कन्या अगोदर जालीसें वाटतें. या प्रकारें संसार जमला. राजश्रीची कृपा संपादोन होते. देशीं संभाजी राजे यासी, पातशाहानी धरून नेलें, ते भीमातीरी मारूनच टाकिले. शाहूराजे रायगडीहून धरून आणिले. साता वर्षांचें वय. रूप सुंदर पाहून कैदेंत ठेविले. राज्य सारें बुडालें. किल्ले जंजिरे[3] जागे खोरे यवनानीं[4] घेतले. दक्षिण सारी हस्तगत करीत, पातशाहांच्या फौजा कर्नाटक प्रांतीं जाऊन पोहोंचल्या. त्या समयीं आपले राज्यांतील फौजेचे सरदार संताजी घोरपडे व धनाजी जाधवराव हेच होते. आणखी धणगर मंडळी फार होती. नांवे स्मरणांत नाहींत. या सरदारांनी चंदीपासोन कराड, वाई, पुणें, जुन्नरपावेतों पेंढारी यांच्या वृत्तीप्रमाणें धांवावे; सांपडेल तें लुटावें, खावें. पातशाहाच्या फौजा जागां जागां फिरत होत्या. त्यांच्या गोट्यावर छापे घालावे. घोडे, उंट, तट्टू, बैल कांहीएक बाडांत सांपडेल तें न्यावें. किंबहुना खाशा पातशाहाच्या फौजांवरही चोरीच्या

---

१ चंदीस जातांना खंडो बल्लाळ आदिकरून मुत्सद्दी मंडळीस फार हाल सोसावे लागले. मंडळीवर गुजरलेल्या एका प्रसंगाविषयी कॅप्टन डफसाहेब लिहितात:—

"Khandoo Ballal and his companions were taken, as had been foreseen, they were examined, confined and beaten to extort confession, but on their firmly persisting in a preconcerted story and denying all knowledge of any fugitive from Maharashtra, they were relesed and finally joined Raja Ram who with the others, had reached Ginjee in saftey."

२ राजाराम महाराज आपल्या सेवकांस फार ममतेनें वागवीत. खंडोबांचे लग्नास शाहू महाराजांनीं पैशाची चांगली मदत केली. ३ पाण्यातील किल्ले. ४ मोंगलानी, तुर्कांनी.

मार्गें धाऊन जाऊन, होगेपणें मराठे जिवंत आहेत असा उपद्रव करून दाखवावा, हें चालतच होतें. चंदी राजधानी बहुत चांगली जाली. आप्पा व आण्णाजी हे जवळ होते....त्या संधींत राजश्रींची कृपा पूर्ण पाहून, आपणांस वतन नाहीं, कोंकण प्रांतीं वतन करून द्यावें, ह्मणोन विनंति केल्यावर, 'राजश्रींनीं दाभोळ प्रांतींची सरदेशमुखी वतन करून दिल्हें. राजपत्रें करून घेतलीं. राजाराम साहेबीं आप्पाच्याच सेवेवर वतन दिल्हें. पत्रांत नांव लिहितां आण्णाजीबावांनीं व चिमणाजीबावा व शामजीबावा असावे ह्मणोन बोलणें घातलें. आप्पा केवळ धर्माची मूर्ति! यांणीं खरें ह्मटलें असतां राजश्रींनीं वोढिलें. आप्पांनीं विनंति केली जें, "खायास कोण आहे? देशीं यवनाक्रांत राज्य जालें आहे. स्वामींच्या पुण्यप्रतापें राज्य हस्तगत जाल्यावरील गोष्टी! ज्याचे दैवीं असेल तो सेवा करील. वतन खाईल. नांवें त्याहावयाची आज्ञा द्यावी." त्यावरून नांवें पत्रांत लिहिलीं. पत्रें करून घेऊन तशींच ठेविलीं होतीं. पुढें पातशाहाच्या फौजा जाऊन चंदीस वेढा घातला. चंदी बारा वर्षें पावेतों झुंजविली. असद्खान[1] ह्मणोन पातशाही दिवाण मोठा राजकारणी. पातशाहा केवळ निरंकुश. त्यास वर्म असावें ह्मणोन मसलत लांबवीतच होते. दक्षिणेंत मराठ्यांचे राज्यांत पातशाहा बहुत खफीफ (?) जाला. मराठ्यांस वांचवावें हेंच दिवाणाचे चित्तापासोन होतें. वकीलद्वारें इकडील मुत्सद्दी यांनीं राजकारण जतन केलेंच होतें. चंदीच्या प्रसंगीं कामावर पडलें....बारा वर्षें समाप्त होण्याचे संधीस दिवाणांनीं सांगोन पाठविलें कीं, 'दिवस फार जाले. याउपरी किल्ला खाली करून द्या. घेणें प्राप्त आहे.' तेव्हां निरुपाय. प्राण वांचवावे. पुढें हरिसत्ता. देवावर भार ठेऊन चंदी द्यावी, निघोन जावें, असा सिद्धांत केला. त्या समयीं गणोजी[2] किंवा दुसरा कोण शिरका पातशाही फौजेंत चाकर होता. चंदीस मोर्चे लागले होते. त्यांत एक मोर्चा शिरक्याचा होता....राजश्री व त्यांच्या स्त्रिया व मुत्सद्दी व त्यांचे कबिले अगत्याअगत्य नांवनिशीवार लेहून यादी ठरविली. त्याप्रमाणें शिरक्याचे मोर्चावरून मार्ग सांगितला[3]. त्या मार्गें निघोन जाण्याचा निश्चय करून निघाले. चंदी सोडिली. आप्पा व कामी सडीं होतीं.

१ असदखानानें मराठ्यांस फार मदत केली. औरंगजेबाच्या फौजेंतील बरेच सरदारांस त्याचा उत्कर्ष सहन होत नसे. मराठेशाही बुडाल्यास आपलें महत्त्व कमी होईल असेंही त्यास वाटे. २ गणोजी व राणोजी शिर्के यांचे मोर्चे किल्ल्याचे नैर्ऋत्येस होते. – **मल्हार रामराव.** ३ असदखानानें सांगितला.

उभयतां राजश्रीसमागमें निघालीं. आण्णाजी मुत्सद्दीयांत नांव नाहीं, हे राहिले. काकाई लेकुरवाळी, गरोदरही होती. तीस आण्णाजीजवळ ठेविली. याप्रमाणेंच सर्वत्र मंडळीची दशा जाली. राजाराम निघोन देशीं आले....चंदीहून शिरक्याचे मोर्च्यावरून राजश्री सफरीवर निघाले. हा शिरक्यांचा मोठा उपकार. तो फेडावा हें राजश्रींचें मानस. तेव्हां शिरक्यांनीं दाभोळचें वतन चिटणिसास दिल्हें, तें आपणांस द्यावें ह्मणोन आड घातला.[1] राजाराम साहेब बहूत थोर. संकोचांत पडले. तेव्हां आप्पांनीं विनंति केली कीं, आमचें वतन महाराजांचे पाय! शिरक्यांचा उपकार ठेऊं नये. तेव्हां दाभोळच्या वतनांचीं पत्रेंच राजश्रींच्या स्वाधीन केलीं. वतन शिरक्यांस दिल्हें. चेऊल प्रांतींचें वतन यांस करून दिल्हें.

राजाराम देशीं येण्याचे संधीसच....संगत नीट लागली नाहीं.[2] असो. आण्णाजी मागें राहिले. त्यांस काकाई सुद्धां कर्नाटकांत....कैदेंत ठेविलें. तेथील किल्लेदार निपुत्रिक होता. त्यांणी या कुटुबाचें संरक्षण केलें. काकाई गरोदर. यांस पुत्र होईल तो आपण घ्यावा, हे किल्लेदाराच्या स्त्रीचें मानस. दैवानें कन्याच जाली. तें मूल किल्लेदारानें घेऊन आण्णाजीस कुटुंबसुद्धां सोडून दिल्हें. हे देशीं आले. राजश्रींचें दर्शन घेतलें. जवळ होते. स्वारी शिकारीच्या उपयोगांत होते....शाहूराजे धरून नेले. ते वीस वर्षांनी माघारे आले. इतक्या वर्षांत....आईसाहेब यांची कारकीर्द असावी. राजाराम व ताराबाई यांच्या राज्यार्ची वर्षसंख्या चवदा पंधरांची भरती असेल. इतक्या अवधीत औरंगजेब पातशाहाचा काल होऊन त्याचा वडील पुत्र समागमें दक्षिणेंत होता....धाकट्यानें पातशाहातीचा बंदोबस्त करण्याचा आक्रम घातला. हें वडील पुत्रास व असदखान दिवाण यांस असहन होऊन, दक्षिणचा बंदोबस्त पुरा करून नाइलाज असें समजून, फौजासुद्धां दिल्लीस जाण्याचा उद्योग करून माघारें चालिले. त्या संधीत ताराबाईची कारकीर्द ....इतक्यांत पाठीमागें किल्ले जागे घ्यावयास आरंभ केला. जागां जागां यवन व रजपूत किल्लेदार ठेविले होते.

---

१ प्रभुरत्नमालेत दाभोळचे वतन शिरक्यास दिल्यावर राजाराम महाराजाची सुटका झाली असे आहे. शिरक्याच्या सनदेवरून या प्रश्नाचा उलगडा होईल. दाभोळचें वतन २५।३० हजाराचें होते, असा उल्लेख मानाजी आग्रे याच्या एका अस्सल पत्रात आढळतो.

२ सगत नीट लागली नाहीं असे लेखकच कबूल करितो. वतनाबद्दलची वगैरे हकीकत पुढील एका लेखात येईल.

ते स्थळें टाकून जाऊं लागले. मातबर जागे बळेंच घेतले. हीं वर्तमानें मागाहून पातशाहाजाद्यास कळूं लागलीं. तेव्हां दिल्लीस जाण्याचा वेध मोठा. माघाऱ्या फौजा कोण्ही न जात. तेव्हां दिवाणांनीं कल्पना काढिली जे, "मराठे त्या प्रांतींचे जमीदार आहेत. यांचा निर्मूळ करण्यास गुंतल्यानें आपलें घर रहात नाहीं. दुसरा कोण्ही सरदारही जात नाहीं. चाळीस पन्नास वर्षें दक्षिणेंत येऊन जालीं. सर्व प्रकारें लोक बुडाले. दुराग्रहास पडून फल नाहीं. शाहू राजा सरकारांत बहुत दिवस कैदेंत आहे. पळून गेला नाहीं. निष्ठा धरून राहिला. पातशाही बंद्यांत दाखल जाला आहे. दक्षिणचा जमीदार. यास सर्फराज करावें. सोडून द्यावें. यांणीं ताराबाईस राणी संज्ञा यवन ह्मणत होते. राणीचें पारपत्य करील. किल्ले घेईल. चाकर ह्मणवील." असें ठराऊन, शाहू राजे यांसी रवाना करते समयीं, पांच चारशें रजपूत व मुसलमान समागमें देऊन माघारें दक्षिणेंत पाठविलें. तेव्हां निरोप घेऊन राजश्री निघाले. खानदेशांत आले, ते समयीं, तोतया रांगडा आहे, शाहू राजा नव्हे, हीं भाषणें चाललींच होतीं. शाहूराजे खानदेशांत आल्यानंतर परसोजी भोंसले....हे मातबर सरदार होते. ह्मांसी राजकारण करून ह्या दोन्ही फौजा अनुकूल करून घेतल्या. चालून जुन्नर प्रांतांत गेले. ते समयीं आण्णाजीस विशाळगडची....होती. खंडेराव दाभाडे हे (ताराऊच्या फौजेंत) प्रमुख होते. आप्पाजींनीं आपलें कुटुंब विशाळगडास[1] पाठवून सडेच जवळ होते. दाभाडे यांची रवानगी जाली. खेड कडूस या लगत्यांत राजश्री येऊन पोहोंचण्यापूर्वीं फौजा रवाना जाल्या. त्या समयीं ताराबाईजवळ परशरामपंत प्रतिनिधी होते. राजश्रींचा पुण्यप्रताप मोठा. आले, येतात, हें वर्तमान पावल्या दिवसापासोन, जे जे राजाराम ताराबाईनें नेमले त्यांजवर छाया पडली. ....केवळ ताराबाईचेच वाढविले परशरामपंत व कान्होजी आंगरे यांच्या प्रतीचे होते, ते मात्र ताराबाईचा पक्ष बळावून होते....वतनी पत्रें खांदेरीस चिमणाजी बावाजवळच ठेविलीं होतीं. शाहूराजे यांची व ताराबाई यांच्या फौजा दाभाडे वगैरे यांची गांठ भीमातीरींच पडली. फौजेसमागमें सरदार दाभाडे यांचीं सर्वांचीं मनें शाहूराजाकडे ओढलींच होतीं. आमच्या समागमें सरकारचे इतवरीद यावे असें दाभाड्यांचे ह्मणण्यावरून आप्पांस ताराबाईनीं आज्ञा केली. यांणीं विनंति केली कीं, "राजा शाहू हे सर्वत्रांस समजले आहेत. याचा परिणाम पाहून आह्मांस जा ह्मणावें." तेव्हां आईसाहेबीं खातरजमा करून, आग्रहानें

१ अलीबागेजवळ आहे.

जावेंच ह्मटल्यावर, तुमच्या फौजांस यश आल्यास चाकर तुमचे; नाहीं तर जे सरदारांची वाट, तेच आमची. हें ध्यानांत असावें ह्मणोन फौजेबराबर गेले. लढाई जाली. फौज मोडली. राजश्रींचा जय जाला. दाभाडे, आप्पा आदिकरून सर्वांनीं राजकारण करून राजश्रींच्या भेटी घेतल्या. आप्पांस चिटणिशीचीं वस्त्रें तेव्हांच दिल्हीं. आण्णाजी विशाळगड सोडून याच संधींत शाहू महाराजांकडे आले. सातारा घेणें, परशरामपंतांस धरणें, या साऱ्या घालमेली होतच चालल्या. सातारीयावर राजश्रींचा राहण्याचा आरंभ....त्या दिवसांत किल्ल्याचा बंदोबस्त चौकी पाहारीयाची खबरदारी आप्पाजीच करीत होते........बाळाजीपंतांस दिल्लीस फौजा पाठवितेसमईं सारी खटपट आप्पांनींच केली. कर्ता ब्राह्मण. पेशवाईस योग्य पाहून मुख्य प्रधान केलें....आप्पासाहेब यांचा संसार वाढला. प्राप्ति नाहीं. तसेच कोठींत होते. आपला वृद्धापकाळ. वतनपत्रें आंगरे यांचे घरीं. तेवढीं सोडवावीं ह्मणोन चित्तांत आणिलें. त्या दिवसांत कान्होजी आंगरे फार करून राजश्रींच्या ठायीं निष्ठा धरून होते. राजकारण आपले हातीं, कांहींएक निमित्तानें राजश्रींची आज्ञा घेऊन, समागमें तेरा वर्षांचें वय असतां रावसाहेबांस घेऊन आप्पा कुलाब्यास गेले. वर्षभर तेथें राहून मोठ्या खुशामतीनें वतनपत्रें राजाराम यांनीं करून दिल्हीं तीं व त्याप्रमाणें आंग्रे यांचीं पत्रें करून घेऊन सातारीयास आले. वतनाचा अम्मल आंगरे यांनीं चालविला नाहीं. नगदी वस्त्र पात्र या द्वारें आंगरे यांनीं काय समाचार घेतला असेल तो असो. आप्पा सातारीयास आल्यानंतर खंडो गोविंद नांवाचा आपला स्वकीय यासी, न्यायाधिशाकडील परगण्याच्या बाबतीची मामलत, दरम्यान होऊन करून दिल्ही. ते बुडाली. दहा हजार रुपये देणें जालें. त्याच दिवसांत आयुष्य सरलें. आप्पाचा काळ जाहाला."

"यशवंत."



१ पुढील बराच मजकूर खाजगी बाबीसंबंधाचा असल्यामुळें तो येथें प्रसिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं. २ यास प्रत्यंतर पुरावा आहे. तो यथावकाश महाराष्ट्रीयांच्या पुढें मांडण्यांत येईल. खंडोबांस कोणच्याही तऱ्हेचें व्यसन नव्हतें. परंतु ते फार उदार असून आश्रितांचे कैवारी होते. यामुळें त्यांची गृहस्थिति चांगलीशी नव्हती. वारंवार सावकारांचे तगादे दाराशीं बसलेले असत. आपली गृहस्थिति सुधारण्याकडे खंडोबांनीं लक्ष पुरविलें नाहीं. किंबहुना या बाबीकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें, ह्मणूनच त्यांस मोठमोठीं राजकारणें साधण्यास अवसर सांपडला.

नाजूक. यास्तव उगेंच राहिलों. त्यावर एक दोन वेळां हटकलें. विनंति केली जें, 'एक निश्चयपूर्वक बोलावें?' त्यास बोलली जें, 'आह्मी निश्चय करीत नाहीं. ऐवज लवकरच येईल. दोनदां करून देऊं.' त्यावर चंद्र २० रोजीं हटकलें. राजश्री केसो भिकाजी व मी उभयतांही बोललों. ते वेळेस बोलली जें; 'बाळाजी फडणिसांकडेस जाऊन ऐवजाची निशा करून घेणें.' राजश्री गोविंद रघुनाथ जवळ होते. त्यांसही बाईनीं सांगितलें जें, 'तुह्मी या उभयतांस मुकुंदरायांकडेस घेऊन जाऊन, बाळाजी व मुकुंदरायांस सांगा कीं, यांच्या ऐवजाची यांची निशा करून देणें. हुंडी करून देणें.' असें सांगितलें. त्यांजकडे गेलों. तेव्हां त्यांनीं सांगितलें जें, ऐवज पदरीं घेतां कीं हुंडी करून द्यावी? आह्मीं उत्तर केलें जें, 'आह्मीं ऐवज पदरीं घ्यावा अशी आह्मांस आज्ञा नाहीं. श्रीमंतांनींच तुह्मांस लिहिलें आहे की, परभारें सावकाराच्या वराता तुह्मांकडेस पाठविल्या आहेत; वरातांप्रमाणें ऐवज ज्यांचा त्यांस येथून हुंड्या करून त्यांस पावता करावा. मुकुंदराव बोलले जें, 'आह्मी एकच हुंडी करून श्रीमंतांकडेस निमे ऐवज आतां पाठवितों. तेथें श्रीमंत सावकारांस वांटणी करून देतील.' तेव्हां केसो भिकाजी बोलले जे, 'सावकारांस ऐवज तोडून दिला आहे. त्यांच्या वराता व माणसें आलीं आहेत. वांटणीप्रमाणें ज्यांचा त्यांस हुंड्या करून पाठवाव्या.' त्यास ते बोलले जें, 'हुंडी एकच करावी. त्यांत तिघांचे नांवें तपशील लिहावा.' त्यास सारा ऐवज देवा ह्मटलें. ते ह्मणाले जें, 'निमे लक्ष रुपये आतां देतों. लाख रुपये श्रावण अखेरीस देऊं.' आह्मी बोललों जें, 'माघांत लग्नसमयीं सरकारांत सावकारापासून ऐवज अगर वस्तभाव घेतल्या, तेव्हांपासून आजपर्यंत व्याज काय जालें?' अद्यूनही श्रावणअखेर ह्मणतात. तेव्हां दोंचे पावणे दोन जाले. यांत सरकारची नुकसानी आहे. जें करणें तें समजून करा. सरकारचा शब्द तुह्मांस लागेल.' ते बोलले जें, 'ऐवजाचें काम आहे. महालांतून ऐवज गोळा होऊन आला पाहिजे. तोंडच्या गोष्टी नाहींत.' असें कित्येक बोलले. 'बरें. असो. निमेच्याच आज हुंड्या द्या, ह्मणजे दहा बारा दिवसांत जाऊन पोंहचतील.' त्यास त्यांनीं उत्तर केलें जें, 'सावकार बोलाविले आहेत. इंदुरींहून हुंडणावळीचा भाव आणविला आहे. तो आला ह्मणजे तोडमोड करावयास चार दिवस लागतील. श्रावण शुद्ध प्रतिपदेस हुंडी तुमच्या हवालां करूं.' असा करार जाला. त्यावर दोन तीन दिवस पावसाची झड लागली होती. आजही केसोपंत व मी बाईकडेस जाऊन बहुत प्रकारें सांगितलें. सावकाराचे व्याजबट्टा मनोतीचेंही समजाऊन सांगितलें. निमे निमेची तरी लवकर हुंडी दिली, तर दहा दिवसां पोंहचेल. तितकीच व्याजमनोतीची सवलत पडेल. सरकारकिफायत होईल. तितकी आपण

करावी. बाई बोलली जें, 'लवकरीच करून देवविते.' असें बोलली आहे. परंतु श्रावण शुद्ध प्रतिपदा खरी. अलीकडेही हटकीतच आहों. हुंडी आली ह्मणजे सावकारांचे माणूस केसोपंतांनीं ठेऊन घेतले आहेत, त्यांजबरोबर हुंडी देऊन रवाना करूं. आजपावतर ऐवजाचा जाबसाल इतका जाला. वरकड राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान अलीकडे कांहीं आलें नाहीं. श्रीमंत राजश्री दादासाहेबांच्या व राजश्री हरिपंततात्या व तुकोजी होळकर वगैरे सरदारांच्या भेटी चांदवडापलीकडे तीन कोसांवर छ १५ मिनहूस जाल्या. दुसरे दिवशीं कुंमारीधरणगांवावर गंगातीरीं मुक्काम आहेत ह्मणून नवां दिवसांचीं पत्रें येथें आलीं. ग्वालेर अद्याप सर जाली नाहीं ह्मणून सावकारी वर्तमान. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १०४.** ता० २८ जुलई इ० स० १७८३.

**श्रीगजानन.** मि. आषाढ व॥ १४ शके १७०५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

आज्ञांकित सेवक विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ साबानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान, श्रीमंतांच्या लग्नपट्टीचा ऐवज होळकराकडून दोन लक्ष रुपये येणें. त्यांपैकी एक लक्ष तीस हजार रुपयांच्या हुंड्या खेतसी पदमसी सावकार यांनीं येथून करून दिल्या. तेथें खेतसी पदमसीचें दुकान आहे. हुंड्या तिघां सावकारांच्या नावें आहेत. बाई ह्मणाली जें, 'एकंदर ऐवज श्रीमंतांकडेस पाठवावा; तेथें सावकारांस वांटून देतील.' असें ह्मणत होती. परंतु सावकारांचे मनुष्य येथें राजश्री केसोपंतांनी ठेऊन घेतले होते. यास्तव सावकाराचे नांवेंच हुंड्या करून काल चंद्र २६ साबानीं संध्याकाळीं बाईनीं आह्मां उभयतांस बोलावून दिल्या. बाकीचा ऐवजही श्रावण अखेरीस देऊं ह्मणाली. अलीकडेसच ऐवज आला, तर अलीकडेसच देऊं, ह्मणाली. सावकारांच्या माणसांबरोबर हुंड्या रवाना केल्या आहेत. सेवेसीं श्रुत होय. राजश्री बाजीराव बर्वे यांस सरकारचीं आज्ञापत्रें व बाईस सरकारचें व आपली पत्रें डांकेबरोबर चंद्र १६स रवाना केलीं. तीं चंद्र २४ मिनहूस येथें पावलीं. दुसरे दिवशीं बाईच्या समक्ष बाजीरायांस बोलावून आणून, बाईनीं सारीं पत्रें श्रवण करून त्यां दिलीं. बर्वे यांची स्त्री माहेरास गेली आहे. त्यास पंधरा दिवस जाले. तेथून निघाली आहे. एक दों रोजांनीं येथें येईल. ती आली ह्मणजे बाजीरायाची रवानगी

येथून लवकरच होईल. मागाहून लिहीन. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमानः- किल्यावरील सुरबावीवरून वाट तोफांनीं केली आहे. हल्ला करून किल्ला घेणार. आमदानीकडील भला माणूस आला होता. त्यास भेटायास पाटीलबावा गेले होते. त्यांचा यांचा करारमदार जाला कीं, आमचे मदतीस तुह्मीं येत जावें. तुमचे मदतीस आह्मी येत जाऊं. याप्रमाणें करारमदार होऊन, त्यास दिल्लीस आमदानीकडे रवाना करून, पाटीलबावा ग्वालेरीस आले. श्रीमंत राजश्री दादासाहेब कोपरगांवास सरकारची हवेली आहे-शुक्रेश्वराजवळ-तेथें रहावयाचा निश्चय जाला, तिकडेस गेले. ह्मणून येथें वर्तमान आलें. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १०५.** ता. १३ आगष्ट इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. श्रावण व॥ १ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १४ रमजानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे विशेषः- येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून चंद्र ६ मिनहूस कासीदजोडीबरोबर रवाना केलीं आहेत. सांप्रत छ ६ मिनहूस त्रितीय प्रहरीं, राजश्री केसोपंत व मी दरबारास गेलों. ब्राह्मणसंतर्पणाचा हजूम होता. त्यास घडीभर बसून केसोपंतांनीं बाईशीं बोलले कीं, सरकारची फर्मास धोतरजोड्यांची आली आहे. त्यास मारू पांच सात बोलावून, त्यांस धोतरजोडे तयार करायास सांगितले आहेत. जोड्यांच्या लांबीरुंदीची आज्ञा सरकारची आली होती, त्याप्रमाणें मारूंस प्रमाण सांगून, प्रस्तुत पांच सात करविले आहेत. धोतरजोड्यांचें मोल पंचवीस रुपयेपासून वरते पसतीस चाळीस-पर्यंत करावयास सांगितले आहेत. त्यास मारूंनीं खर्चास मागितलें. यास्तव दोन चारशें रुपये आह्मांकडेस तसलमातीस द्या, जसा खर्च होईल तसें लिहून ठेऊं. सरकारांत लिहून पाठवूं. ऐवजाची जिकडे आज्ञा येईल तिकडून आपला भरणा करूं, अगर आपल्यकाडेच आज्ञा आली तर तसेंच होईल. बाईनीं उत्तर केलें जें, "धोतरजोडे तुह्मीं कोणत्या मारूस सांगितले आहेत, ते कसे करितात. उतरून येऊं द्या. पाहूं. त्याचें मोल करूं. सरकारांत पसंत पडतील तसे घेतले पाहिजेत. मोल चौकशीनें केलें पाहिजे. येथें घेऊन या. पाहून चौकशी करून रुपया जो लागेल तो देऊं. मजकूर काय? असेंही करितां पांचशें रुपये लागतील. त्यास तसलमात कशास पाहिजे? तत्रापि श्रीमंतांस धोतरजोडे पाठवणें त्याचा

मजकूर तेथें लिहिणें कशास? रुपया आह्मीच देऊन माफजतीनें रवानाही करूं." असें उत्तर केलें. त्यावर त्यांनीं उत्तर केलें जें, "श्रीमंतांनीं आह्मांसच लिहिलें आहे. आह्मी चौकशीनें मोल करून खरेदी करूं. आपल्यासही दाखवूं. परंतु आह्मीं पाठविले पाहिजेत. रुपयांविषयीं तेथून आज्ञा येईल त्याप्रमाणें तुमचा भरणा करूं." त्यास बाई बोलली जें, "तुमच्या चित्तांत आपणच परभारां घेऊन पाठवून द्यावे; आपला मुजरा व्हावा. त्यास फार चांगलें आहे. त्यापक्षीं आह्मांस दाखवितां कशास, आणि रुपयाही कशास आह्मांस मागतां? तुह्मीच आपले खरेदी करून पाठवून द्या. रुपया आह्मी देणार नाहीं." याप्रमाणें उत्तर बाईनीं केलें. बाईची मर्जी कडवी जाली. आपण उठून ब्राह्मणांकडेस गेली. आह्मी आपल्या बिऱ्हाडास आलों. केसोपंतांस मीं सांगितलें जें, "बाईच्या विद्यमानें घेतल्यास चौकशीही करितील. रुपयाहि जो लागेल तो देतील. जो ऐवज खर्च होईल तो आपण श्रीमंतांस लिहून पाठवूं. जसें त्यांचे मर्जीस येईल तसें करितील." मशारनिल्हे बोलले जें, "अशी सरकारची मर्जी असती, तर पहिलेंच त्यांस लिहितें. आपण असें केल्यास रागें भरतील. यास्तव आपले आपणच जोडे करवून, कोठें कर्जवाम करून घेऊन पाठवावे." त्याप्रमाणें तेरा जोडे तयार करविले. मोलही निकशीनें केलें. दोनशें अठ्याहत्तर रुपयांचे तेरा धोतरजोडे व एक शेला सफेत जामेवार, सूत चांगलें, आपले पसंतीस पडेल ह्मणून तेवीस रुपयांचा घेऊन, एकून चवदा ठाणें तीनशें एक रुपयांस खरेदी करून, जासूदजोडीबरोबर चंद्र १३ रोजीं येथून रवाना केलीं. भालेरायाचे स्वारही रवाना केले आहेत. त्यांच्या उंटावर घालून पाठविले आहेत. सेवेसी पावतील. बाकीचेही सात जोडे तयार करविले आहेत. ऐवज कर्जाऊ घेतला. बाईचें मानस होतें जे, धोतरजोड्यांस ऐवज चार पांचशें जो लागेल, तो आपणच द्यावा. श्रीमंतांच्या धोतरजोड्यांचा ऐवज मुजरा घेऊं नये, असें होतें. परंतु आज्ञे-प्रमाणें केलें. खर्च किरकोळ खाद्या व मोमजामा यांस व हुंडणावळ अधिक लागली. कर्ज घेणें लागलें. सारा खर्च तपशीलवार धोतरजोड्यांबरोबर विनंतिपत्रीं लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होईल. परंतु बाईची मर्जी आह्मांसीं कडवी जाली. परंतु सरकारची आज्ञा. सरकारचा पैसा न खर्च होतां कार्य होयाचें होतें? असें जाल्यास स्वामी रागें भरतील कीं काय ह्मणून असें केलें. येथें सूत चांगलें, परंतु रेशीम चांगलें नाहीं. या सुतास पैठणचें रेशीम असावें.

राजश्री पाटीलबावांनीं चंद्र १ मिनहूस लष्करांतून बाईस पत्रें लिहून पाठविलीं. तीं चंद्र १२ रोजीं दोंप्रहरीं येथें पावलीं. त्यांत मजकूर होता जें, आपण शुद्ध

द्वितीयेस प्रातःकाळीं ग्वालेरच्या किल्ल्यावर हल्ला करून किल्ला घेतला. सातशें माणूस वरतें होतें, तें कापून काढलें. दोन तीनशें माणूस यांचेंही जखमी ठार जालें. गोहदवाल्याची बायको वरती होती, ती दारूनें उडून गेली. याप्रमाणें होऊन किल्ला फत्ते जाला. येथील बंदोबस्त होऊन, भंवताल्या चार गढ्या आहेत त्या घेऊन, गोहदही थोडक्या दिवसांतच घेतों. म्हणून लिहिलें होतें. बाईसही बहुत संतोष जाला. संध्याकाळीं तीन तोफा सोडल्या. याप्रमाणें ग्वालेरचें वर्तमानही आलें. राजश्री शिवबा बाजी पारनेरकर काशीयात्रा करून उज्जनीस आले आहेत. येथेंही बाईचे भेटीस येणार. गुजराथचें वर्तमानः— येथें ब्राह्मण देकारास आले, तेही सांगत होते व सावकाऱ्यांतही ऐकलें कीं, गुजराथप्रांतचे सरकारचे महाल जितके आहेत अमदाबादसुद्धां, तितक्यांजवळून राजश्री फत्तेसिंग गायकवाड यांनीं सात लक्ष रुपये घेतले. रयत ताराण जाली. अमदाबाद निमे बेचिराख जाली. मुलकांत हलत कांहीं राहिली नाहीं. सरकारचे फौजेची मार्गप्रतीक्षा करितात. गायकवाडांनीं आपले महाल आबांत ठेविले आहेत. याप्रमाणें तिकडील वर्तमान आलें. हिंदुस्थानचें वर्तमान तर, राजेरजवाडे आपसांत दुंद आहेत. परंतु ग्वालेरच्या दाबानें सर्वांस कळलें जें, दक्षणी फौजा आहेत. पादशाहा दिल्लींत आहेत. परंतु आमदानी वगैरे नजीबखानाचे चेले आहेत, त्यांच्या बसांत आहेत.

येथील वर्तमानः—सांप्रत श्रावणमासचा उत्साह आहे. नित्य अडीच तीन हजार ब्राह्मणभोजन होत आहे. दोन तीनशें ब्राह्मण लिंगाच्या अनुष्ठानास लाविले आहेत. शेंदोनशें ब्राह्मण शिवकवचास लावले आहेत. शेंदीडशें ब्राह्मण शिवनामस्मरणजपास लावले आहेत. शेंपन्नास सूर्यनमस्कारास लावले आहेत. शिवाय पंचवीस सारे ब्राह्मणांस दक्षणा दिली. देशस्त व तेलंग दोन हजारपर्यंत होते. त्यांस तीन रुपयेपासून पांच रुपयेपर्यंत दक्षणा जाली, व रांगडे दोन अडीच हजार आले होते, त्यांस पावलीपासून रुपयापर्यंत दक्षणा दिली. पुढें जाणारे ब्राह्मण गेले. आतां तीन साडेतीन हजार ब्राह्मण आहेत. छत्रांत अडीच तीन हजार जेवतात. चारपांचशें ब्राह्मणांस शिधा नित्य देतात. भोजनदक्षणा रोज दोन तीन पैसे देतात. जन्मअष्टमीस एक एक रुपया देतील. आतां अनुष्ठानाचे ब्राह्मणांची दक्षणा मात्र राहिली आहे. लिंगेंवाल्यांस आठ रुपये, जपवाल्यास पांच, शिवकवचास आठ नऊ, नमस्काऱ्यांस दहा नऊ देतील, अशी पद्धत आहे. प्रत्येक पदार्थ पक्वान्न करितात. थोडेंथोडें करितात, नित्य दक्षणा दोन पैसे. मध्यें एकदां एक एक

रुपया देतील. याशिवाय शिध्याचे दोन तीनशें ब्राह्मण. नित्य शिधा श्रावणमासपर्यंत चालतो. संतर्पणही मासभर होईल. ब्राह्मणांचीं भोजनें जाल्यावर चार घटका दिवस राहतां, बाई स्नान करून घटका दोन घटका दिवस राहतां भोजन करितात. तेथेंही पंगतीस पंचवीस तीस ब्राह्मण असतात. याप्रमाणें सांप्रतचें वर्तमान. श्रीमहांकाळेश्वर उज्जनीस पंचवीस ब्राह्मण श्रावणमासचे अनुष्ठानास व श्रीओंकारेश्वरास पंचवीस ब्राह्मण प्रतिवर्षीं जातात. आतांही गेले आहेत. सेवेसी श्रुत होय. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १०६.** ता. १३ आगष्ट इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. श्रावण व॥ १ शके १७०५.

"श्रियाविराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीः—

सेवक विठ्ठल शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १४ रमजानपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः— बहुत दिवस जाले, आपलें पत्र येऊन वर्तमान कांहीं कळत नाहीं. तर कृपापत्र पाठवीत जावें. इकडील वर्तमान श्रीमंतांस विनंतिपत्रीं लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. नवल विशेष वर्तमानः— राजश्री पाटीलबावांनीं ग्वालेरचा किल्ला श्रावण शुद्ध द्वितीयेस हल्ला करून घेतला. तेथें पत्रें आलीं. बाईनींही ऐकून तीन तोफांचे आवाज केले. वरकडः—सांप्रत येथें श्रावणमासचा उत्साह एक महिनापर्यंत अडीच तीन हजार ब्राह्मणभोजन नित्य होत आहे. आपल्या पत्रांत श्रीमंतांचा लाखोटा घालून पाठविला आहे. हा एकांतीं द्यावा. याचें उत्तरही श्रीमंतांस विनंति करून मागावें. उत्तर देयाची आज्ञा जाली, तर घेऊन पाठवावें. बाईच लक्ष श्रीमंत राजश्री नानासाहेबांच्या पायांशीं फार आहे. त्यास बाईसही एखादें समाधानयुक्त श्रीमंतांचें पत्र यावें. विनंति करावी. मर्जी प्रसन्न होऊन दिलें, तर मजकडे पाठवावें. एकांतीं पावतें करीन. बाईचें मानस कीं, पक्केपणें नानासाहेबांचें अभय असावें. त्यास श्रीमंतांची मर्जी असल्यास कृपा करून पत्र देतील. मर्जी पाहून आपण विनंति करावी. जशी मर्जी असेल तशी आज्ञा करितील. मीं आपला मजकूर पेशजीं सेवेसी लिहिलाच आहे. वारंवार काय लिहावें? आपण म्हणतील कीं, बाई इतकी ममतापुरस्कर तुम्हांशीं बोलतात, तेव्हां कांहीं परामर्ष करीत असतील. त्यास एक कवडी बाईकडून मजला प्राप्त असेल तर आपल्याच पायांची शफथ! कर्ज खात येथें बसलों आहें. बाहेरील खर्च काय काय लिहूं? आज पांच वर्षांत एक गवताची काडी अगर घर छावून दिलें असेल तर शफथ! वरकडांचीं

घरें छावून देतात; खर्चासही देतात; परंतु आमचा न बाईचा ऋणानबंध असा आहे! माझी येथील अवस्था अशी आहे व घरचें वर्तमान चिरंजिवानें सर्व आपल्यास विदित केलेंच आहे. कुटुंब थोर, दुसरी उपजीविका कांहीं नाहीं. ब्राह्मणसंसार, लोकांचें देणें ब्रह्मांड, अशा पेंचांत आहे. येथेंही सात आठशें रुपये देणें. असा प्रकार आहे. माझा कोणी वगवशिला नाहीं कीं, श्रीमंतांस तापत्रय समजावील. दोघे तिघे मुले रोजगारास उमेदवार आहेत. आपणास विदितच आहे. जे सर्वोत्तम आपणास बुद्धि देईल तशी विनंति श्रीमंतांस करावी. उत्तर यावें. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक १०७. ता. २४ आगष्ट इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. श्रावण व॥ १२ शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २५ रमजानपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून काशीदजोडीबरोबर व डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचा मजकूर; येथें तों श्रावणमासचा उत्साह आहे. लग्नपट्टीच्या ऐवजाविषयीं बाईस स्मरण दिलें जें, श्रावणअखेर होत आला, सावकारास ऐवज पावला पाहिजे. याप्रमाणें सूचना केली. तेही तजविजींत आहेत. लवकरच देतील. दुसरें, राजश्री पाटीलबावांकडील वर्तमानः–ग्वालेर फत्ते जाल्याचा मजकूर पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलाच आहे. सांप्रत ऐकिल्यांत आलें जें, किल्याची डागदोजीचा बंदोबस्त करवितात, व किल्यावरील सिशा बारूद व जंगी सरंजाम यांची वगैरे मोजदाद करवितात. गोहजेवर शह देऊन आहेत. किल्याचा बंदोबस्त केल्यावर गोहजेवर जावयाचा इरादा आहे, म्हणून वर्तमान ऐकिलें. राजश्री विसाजी काशी सागरचे कामगिरीस सरकारांतून बिदा केले, ते श्रावण शुद्ध नवमीस येथें आले. बाईची भेट घेतली. श्रावणीकर्म येथें केलें. दुसरे दिवशीं बाईनीं भोजनास वाड्यांत बोलाविलें होतें. द्वितीयेस स्वार होऊन गेले. नवीन वर्तमानः–खानदेशांत नेरपरगंण्याचें मेहरगांव आहे, तेथें हटकर धनगराची मूल चौ वर्षांची, तिजला गर्भसंभव जाला आहे. सहा सात महिन्यांची गरोदर. त्यास त्या मुलीच्या मायबापांनीं विचार केला कीं, त्या मुलीस मारून टाकावें. त्यास, दों प्रहरां रात्रीं तिच्या बापास स्वप्न जालें कीं, दोन महिने मुलीस मारूं नका,. काय होतें तें पहा. याप्रमाणें वर्तमान येथें बाईस

पत्र आलें. राजश्री बाजीराव बर्वे वद्य नवमीच्या मुहूर्तें येथून बिदा होणार होते, त्यास तो मुहूर्त राहिला. अमावास्या जाल्यावर निघणार ह्मणून ऐकिलें आहे. रेवापार जाले ह्मणजे सेवेसीं विनंतिपत्रीं लिहून पाठवूं. श्रीमंतांस धोतरजोडे करून पाठविणें ह्मणून आज्ञा आली होती. आज्ञेप्रमाणें लांब रुंदी व सूत चांगलें, याप्रमाणें कारेगरांस सांगून, तेरा धोतरजोडे तयार जाले. ते व एक शेला ऐशीं चवदा सणगें भालेरायांच्या रावतांबरोबर जासूदजोडीसमागमें देऊन, चंद्र १३ रमजानीं येथून रवाना केले आहेत. सेवेसीं पावले असतील. बाकीचे धोतरजोडेही तयार होतात. राजश्री विसाजी शामराज लांबहाते यांस दोन महिने शरीर स्वस्त नाहीं. औषधीउपाय करीत आहेत. बाईही दोन वेळां त्यांच्या परामर्षास गेली होती. हिंदुस्थानचें वर्तमानः–दिल्लीभंवता शिखांचा उपद्रव फार आहे. मुलकी पैसा नजीबखानाचे चेले घोपटून खातात. पादशाहास पैसा देत नाहींत. राजवाडे यांसही उपद्रव देतात. पादशाहा व राजेरजवाडे सर्व दक्षिणी फौजेची मार्गप्रतीक्षा करितात. याप्रमाणें बाजारी वर्तमान ऐकिलें. सत्य मिथ्या देव जाणे. धोतरजोडे पावल्याचें आज्ञापत्र आल्यावर, बाकी सात धोतरजोडे राहिले ते पाठवून देतों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''

**लेखांक १०८.** ता. १३ सप्तबर इ.स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. भाद्रपद व॥ ३ शके १७०५.

''श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेब स्वामींचे सेवेसीः–विनंति सेवक केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन विज्ञापना तागाईत चंद्र १५ सवालपावेतों साहेबांचें कृपाकटाक्षें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र १२ रमजानचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २८ माहे मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा की, गंगाजलनिर्मल अहल्याबाई होळकर यांस व राजश्री माधवराव गंगाधर यांस सरकारचीं पत्रें पाठविलीं आहेत. यांच्या नकला तुमचे लाखोट्यांत घालून पाठविल्या आहेत. तर दोन्ही लाखोटे तुह्मी देऊन, त्या अन्वयें जाबसाल करून, आमलांत आणीत तें करणें ह्मणोन आज्ञा जाली. आज्ञेप्रमाणें पत्र लाखोट्यासुद्धां अहल्याबाई यांस नेऊन दिलें. पत्र पाहून राजश्री गोविंद रघुनाथ गानू यांनीं वाचून दाखविलें. तदनंतर उत्तर दिलें कीं, हें पत्र लष्करांतून राजश्री हरी बल्लाळ यांनीं पाठविलें. उत्तर लिहून देईन. इतकाच मजकूर ते दिवशीं जाहाला. आह्मीं जाबसाल केला कीं, या पत्रान्वयें उत्तर लिहून घावें. इतकेंच बोलून आलों.

पुढें वर्तमान जालें, तें पुरवणीपत्रांवरून श्रवणगोचर होईल. सरकारचे पत्रीं बाईस आज्ञा कीं, देशींहून कमाविसदार येतील त्यांस अडथळा असूं नये, व साल गुदस्ताचा ऐवज राहिला, तो पाठवून देणें ह्मणोन. त्या लिहिल्याप्रमाणें आज्ञेचें लक्ष धरून, भलती एखादी गोष्ट घडावी हें घडतां दिसत नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

**लेखांक १०९.** ता. १७ सप्टेंबर इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. भाद्रपद ग्रा। ७ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ सवालपर्यंत स्वामीच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून छ १५ मिनहूस पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. लष्करपट्टीच्या ऐवजाविषयीं एक दोन वेळां बाईस हटकलें. त्या तजविजीतच आहों ह्मणून बोलली. सांप्रत आज दोन दिवस जाले, बाईस शैत्यज्वर जाला आहे. त्यामुळें स्नान देखील नाही. औषधउपचार होतात. बाईच्या दुखण्याची तऱ्हा,— सावकाश वाटेनासें जालें ह्मणजे कोणी जवळ फारसें माणूस असून आपण कोणाशी बोलून कोणास बोलूं देऊं नये. बाहेर कोणी माणूस बोललें अगर खोकलें शिंकलें, तें कामास नये. वैद्यांनी औषधे करून द्यावी. ती मर्जीस आलीं तर घ्यावीं; न आलीं तर राहिलीं. अशी तऱ्हा आहे. राजश्री हरिपंत तात्यांनीं श्रीमंतांचीं आज्ञापत्रें देऊन लष्करांतून जोडी पाठविली आहे. त्यांच्या जाबसालाचें बाईनीं उत्तर लिहून खुलें आह्मांकडेस पाठविलें, ते पाहून पत्र आह्मीं माघारी टाकलें. त्यामुळें आह्मांवर रागें आहेत. तो मजकूर तपशीलवार पेशजीं विनंतिपत्रीं लेखन केला आहे. श्रुत होईल. सरकारची आज्ञा जशी येईल त्याप्रमाणें बाईशीं बोलून, आज्ञेप्रमाणें बाईनीं उत्तर दिल्यास घेऊन, जोडी रवाना करूं. नाहींतर जसें उत्तर करितील, तशी विनंति लिहून पत्रें देऊन जोडी रवाना करूं. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान तर पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे तेंच. नवें अद्याप कांहीं आलें नाहीं. राजश्री बाजीराव बर्वे यांचें वर्तमान बाईनीं वस्त्रें दिलीं, पागा व हत्ती दिला, रवानगीचीं वस्त्रें दिलीं. तें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलेंच आहे. आतां शरीरासही त्यांच्या आरोग्य जालें. परवां बुध पंचमीस बाईचा निरोप घेतला. निरोपाचे वेळेस कसकसींतच होती. परंतु निरोप घेतला. काल मुत्सद्दी मंडळीचा निरोप घेतला. आज सप्तमी बुधवारीं

सारा आटाळा पार उतरून, संध्याकाळचा घटका दिवस राहतां, मुहूर्तेकरून रेवापार होऊन, दक्षिणतीरास गेले. दक्षिणतीरीं नवमीचें मातुश्रीचें श्राद्ध करून दशमीस धर्मपुरीच्या बेटास श्रीबिल्वांबरेश्वराच्या दर्शनास जाणार. तेथून खरगोणास जाणार. तेथें कांहीं यांचीं घोडीं वीस पंचवीस आहेत तीं, व बाईनीं पांच घोडीं व एक हत्ती दिला आहे तीं, व हीं मिळून, पागेचा संज करून, कोणी मराठा भला माणूस आहे त्यास तेथें ठेऊन, तेथून दरमजल पुण्यास येणार. दसरा बऱ्हाणपुरीं करूं ह्मणाले. येथून रेवापार जाले. याप्रमाणें बाजीराव बर्वे यांचें वर्तमान. पेशर्जी धोतरजोडे येथून आज्ञेप्रमाणें श्रीमंतांस खरीदी करून पाठविले, व लग्नपट्टीच्या ऐवजापैकीं एक लक्ष तीस हजार रुपये सावकाराकडे हुंड्या येथून पाठविल्या, त्या पावल्या. त्यांचा ऐवज सावकाराचे पदरीं पडला न पडला, हें कांहीं उत्तर आलें नाहीं; व धोतरजोडे पावून पसंत पडले कीं कसें? नवे घेऊन पाठवावे किंवा तितकेच पुरेत, हे कांहीं आज्ञा आली नाहीं. जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करूं. सेवकाला फार दिवस येथें जाले. स्वामींची मर्जी. मुलें मनुष्यें फार श्रमांत आहेत. मुलाची कोठें सोय अमामीची नाहीं. अन्नवस्त्रावांचून हैराण आहे. श्रमपरिहार करणार धनी कृपाळू समर्थ. सेवकाविषयीं विनंति करायास अगर तापत्रय मांगायास कोणी वगवशिला नाहीं. धन्याच्या पायांचा आश्रय. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ११०.** ता. २० सप्टबर इ. स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. भाद्रपद वा॥ ९ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चद्र २२ सवालपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान पेशर्जी विनंतिपत्रीं लिहून चंद्र २० मिनहूस पत्रें डांकेबरोबर रवाना केलीं आहेत. सांप्रतचा मजकूरः—मातुश्री अहल्याबाई यांस शैत्य-उपद्रव होऊन पांच सात दिवस बेताब होती. आतांसा कांहींसा आराम आहे. अद्याप बाहेर तों निघत नाहींत. परंतु वद्य नवमी व्यतिपातीं स्नान केलें. कांहीं दानधर्म केला. खंडेराव होळकराचा पक्ष होता, तो केला. काल दोन घटका दिवस राहतां, मीही परवानगी आणून बाईकडेस गेलों होतों. त्यास श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील वर्तमान विचारलें. "राजश्री हरिपंत तात्या फिरून पुण्यास गेले व तुकोजी होळकर वाफगांवास गेले ह्मणून ऐकतों. तुह्मांकडेस कांहीं पत्रें आलीं कीं काय? दादासाहेबांचा बंदोबस्त कसा

जाला? कांहीं तुह्मांस लिहिलें आलें असेल." मीं उत्तर केलें जें, "आतांशीं तात्या पुण्यास आले आहेत. दादासाहेब कुंभारीधरणगांवाजवळ गंगाउत्तरतीरीं तामसवाडी ह्मणून लहान गांव आहे तेथें आहेत. नवा वाडा राहण्यास करवितात. तात्यांनीं दोन तीन महिन्यांची खर्चाची श्रीमंतांची बेजमी करून, राजश्री विसाजी आप्पाजी आठवले त्यांजवळ ठेऊन, कांहीं फौजही ठेऊन पुण्यास गेले. तेथें श्रीमंतांचे मर्जीनुरूप काय बंदोबस्त कर्तव्य तो करितील. आह्मांकडेही अद्याप कांहीं पत्रें आलीं नाहींत. परंतु असें वर्तमान ऐकलें आहे." बाई बोलली जें, "ईश्वर करो. त्यांची त्यांची घरांत समजूत पडो, नी दुनियेचा कांच तुटो. यांत सर्वांचें बरें आहे. पेशजीं श्रीमंत राजश्री नानासाहेबांनीं आह्मांस दादासाहेबांचें वर्तमान लिहिलें होतें. पुढें जसा तह होईल तसें लिहून पाठवूं, ह्मणून आह्मांस पत्र लिहिलें होतें. तुह्मांसही पत्रें आलीं होतीं." ह्मणून बाई बोलली. मीं उत्तर केलें जें, "आतांशीं तात्या गेले आहेत. श्रीमंतांचीं त्यांचीं भाषणें होतील. पक्केपणें काय निश्चय होईल तो आपल्यास लिहितील". बाई बोलली कीं, "नाना कृपा करितात. तेवढे आमचे तिळीं आहेत. तात्यांची ममता आह्मांकडे नाहीं." मीं उत्तर केलें कीं, "आपल्यास असा भास आहे. परंतु उभयतां शरीरें मात्र दोन आहेत. प्राण एकच आहेत. केवळ्या मसलती गाढ पडल्या, तितक्या निवारण करून राज्यभाराचा बंदोबस्त करितात. त्यांमध्यें सम विषम जाबसाल कित्येक पडत असतील. तेथें कोठें तीव्र, कोठें सौम्य, असे पैं दरपैं जाबसाल करणें प्राप्तच आहेत. त्या अर्थीं ज्याचे जसे कामावर बोलणीं स्थूल सूक्ष्म होतात, तसें आपलाले भावी भावितात. परंतु उभयतांत द्वैताचा लेश नाहीं. आपणही लहानमोठा राज्यभार करितां. सांप्रत आपल्यास सावकाश वाटत नाहीं. परंतु अशांतही कारभार करणें, कंपेश कोणाशीं बोलणें प्राप्त आहे कीं नाहीं?" बाई बोलली कीं, "खरी गोष्ट आहे. जेथें न पोंहच, तेथेंच विस्कळित होतें. शाबास. त्यांचीच छाती! त्यांस उपमा देयास दुसरा नाहीं. दादासाहेबांनीं इतकी घाण केली!" कांहीं दादासाहेबांचे कांहीं सौभाग्यवती आनंदीबाईचे गुणदोष बोलली. सेवकास ह्मणाली जें, "प्रस्तुत तुमचीं कांहीं पत्रें आलीं नाहींत?" अद्याप आलीं नाहींत ह्मणून उत्तर केलें. सरकारचीं पत्रें येतील तेव्हां आपल्यासही येतील, असें उत्तर केलें. संध्याकाळही जाला. वैद्य औषध देयास आंत आला. मग मी व बाईचा नातू व मकाजी गिते तिघेही उठून बाहेर आलों. दुसरें वर्तमान, सरकारचीं पत्रें बाईस व आह्मांस सिरोंजच्या जाबसालाविषयीं वगैरे माळव्याच्या महालच्या गुदस्ताच्या ऐवजाविषयीं, व तुकोजीबावा कमाविसदार पाठवितील, त्यास अडथळा न व्हावा असें बाईस सांगून अमलांत आणवावें ह्मणून

आज्ञापत्रें आलीं. त्यांचीं उत्तरें प्रत्युत्तरें जाहलीं; व बाईनीं उत्तर दिलें. त्यांत लग्नपट्टीच्या ऐवजांत सिरोंजपैकीं पंचवीस हजार तेथें त्यांजवळून घ्यावे, बाकीच्या ऐवजाचा भरणा आह्मी करूं, ह्मणून उत्तर बाईनीं दिलें. तें पत्र आह्मीं माघारा टाकलें. ह्मणून बाईचा आमचे ठायीं राग. हा तपशील पेशजीं विनंति एक दोन पत्रीं लिहिली आहे. सांप्रत आह्मांस नकळत बाकीचा ऐवज हुंड्या करून सावकाराकडे पाठवावा असा निश्चय करून पंचेचाळीस हजारांच्या हुंड्या केल्या. उदईक रवाना करतील. आह्मीही या शोधांतच आहों. आज प्रहर रात्रीं ह्या गोष्टीचा बारीकपणें शोध करितां लागला. त्यास ज्या गृहस्थानें एकांतीं बोलला, त्यास मीं विचारलें कीं, पंचवीस हजार बाकीचे राहिले, त्याचें काय? तो बोलला कीं, "सिरोंजपैकीं पंचवीस हजार रुपये वजा केले. तेथें श्रीमंतांस लिहिलें कीं, सिरोंजपैकीं पंजवीस हजार रुपये तेथें त्यांजवळून घ्यावे." त्यास सेवकाचें व त्या गृहस्थाचें बोलणें बरें एकपदरीं जालें. "एवढा सरंजाम तुह्मांकडे. इतक्या दिवसांचे खैरख्वा सरकारचे चाकर तुह्मी. मोठ्या मोठ्या आडी भिडी घालितां. श्रीमंतही तुमचें तसेंच चालवितात. गादीचे चाकर एकनिष्ठ ह्मणून बराहा बोलतात. असे बहुतां दिवसांचे, इतका सरंजाम खाऊन चाकरी करितां. श्रीमंतांचा उदय होऊन लग्न जालें. केवढा अलभ्य लाभ जाला! त्यांपैकीं तुह्मांकडे दोन लाख रुपयांची वरात आली. लोकांनीं दो दो महिन्यांत फडशे केले. तुह्मी आज आठ महिने श्वेत कृष्ण विचारीतच आहां. त्यांमध्यें "सिरोंजेविषयीं सरकारचें पत्र आलें ह्मणून तुह्मीं पंचवीस हजार कमी केले. यावरून तुमच्या थोरपणाची रीत कळली! श्रीमंत हमेश तुह्मांस लिहित असतात कीं, बाई थोर आहेत. दूरआंदेसी बाईनीं फार देखलें आहे. बाई असें जें हमेश लिहितात, त्या गौरवास तुह्मीं पंचवीसासाठीं मन दाखवूं नये. यांत तुमची तेथें किंमतच होईल. तुह्मांस योग्य आहे कीं, पुरता भरणा दोन लक्षांचा तुह्मीं करावा, आणि आह्मांस तुह्मीं ह्मणावें कीं, तुह्मांस आह्मीं पहिलेंच सांगितलें होतें कीं, हे दोन लक्षांची वर्गणी आह्मी सारे माळव्याच्या महालावर घालितों. श्रीमंतांस तुह्मी लिहा. कोणीं बोभाट आणिला तर ऐकूं नये. असें रागें भरून आह्मांशीं बोलायाचें होतें. अगर भरणा करून तुह्मीं लिहावयाचें होतें. यांत बरें दिसतें. आमचीही लेखणी श्रीमंतांस लिहावयास चालती. असो. तुमच्या ज्ञातारपणास युक्त असेल तें करा." तो गृहस्थ बोलला कीं, "बाईसही हेंच उचित आहे. मीही आज जाऊन एकांतीं बाईस सांगतों." मींही सांगितलें जें, "माझाही निरोप सांगा कीं, सरकारचा दोन लक्षांचा भरणा पुरता करा, आणि सिरोंजवाल्या-

जवळून घोपटून लग्नपट्टीचा ऐवज घ्या. पेशजीं श्रीमंतांस आह्मीं सूचना लिहिली आहे. या ऐवजासाठीं श्रीमंत कांहीं ह्मणणार नाहींत." असें मींही बाईकडे सांगून पाठविलें. स्वामींस कळावें. कदाचित् बाईचा एकमोड स्वभाव आहे. पंचेचाळीसांच्याच हुंड्या पाठविल्या आणि पंचवीस तिकडे घ्या ह्मणून लिहिलें, तर साफ उत्तर पाठवावें कीं, तुह्मी जाणां, ते जाणेत. आमची बाकी पाठवून द्या ह्मणजे आपला ऐवजही येईल. हेही महालाजवळून ऐवज वसूल करून घेतील. जर तेथें ऐवज पटत असला तर धन्यांची मर्जी! येथें यांनीं पंचेचाळीस हजारांच्या हुंड्या तयार करून पाठवितात. आह्मांस इतल्ला न देतां पाठवाव्या, अशी यांची मर्जी आहे. कोणीकडूनही सरकारचें काम व्हावें. ऐकलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. बाजीराव बर्वे वद्य ७ सौम्यवारीं घटका दिवस राहतां, आपल्या बिराडींहून बाहेर निघून बाईकडेस निरोपास गेले. बाईनीं पैठणी शेला व पागोटें व किनखाप ठान १ व चंदेरी जामेवार चार वस्त्रें दिलीं, व चौघां कारकुनांस दोन दोन सणगें दिलीं. त्यांचे स्त्रीस पैठणी लुगडें चोळी दिली. बिदा केली. दो घटका रात्रीं वाड्यांतून निघाले. मुत्सद्दी मंडळी यांचे घरोघर निरोप घेयास चार पांच घटका आणीकही जाल्या. प्रहर रात्रीं रेवापार जाले. साबाजीपंत–त्यांचे कारकून मागें राहिले. पारून येत जात आहेत. कांहीं कागदपत्र व खर्चासही मागतात. त्यास तीन हजार रुपये खर्चास देविले व पागासंबंधीं बहुमान सोन्याचें कडें दिलें ह्मणून ऐकतों. खर्चाच्या ऐवजाचा व कड्याचा पुरतेपणें शोध करून मागाहून लिहीन. बर्वे यांचे मातुश्रीचे नवमीस श्राद्ध जालें. दशमीस बेटास जाणार. एकादशी तेथें करून, द्वादशीस पार येऊन खरगोणास जाणार. तेथून दरमजल दसरा बऱ्हाणपुरीं करून पुण्यास येणार. बाईनीं दहा स्वार समागमें दिले आहेत, व दोन ऊंट, एक राहुटी व चांदणी व कनात ऐशीं दिलीं आहेत. सेवेसी श्रुत होय. राजश्री पाटीलबावांनीं ग्वालेरचा बंदोबस्त केला. गोहजेस जाणार. परंतु गोहजवाल्यानें फारच ग्लानीचे जाबसाल लावले आहेत. गोहज आपल्याकडे ठेऊन, काय जीवन पाहून खंडणी सांगा; तुमचा चाकर होऊन आहें, असें ह्मणतो. पाटीलबावा ह्मणतात कीं, आह्मांस खर्च पडला तो द्या. असे जाबसाल लागले आहेत, ह्मणून येथें वर्तमान आलें. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १११.** ता. २३ सप्टेंबर इ. स. १७८३.

पैवस्ती चंद्र ११ जिलकाद आर्बा. **श्रीगजानन.** स्वि. भाद्रपद व॥ १२ शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी दातार वं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन

साष्टांग नमस्कार विज्ञापना, तागाईत चंद्र २५ सवालपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून जासूदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमानः—पेशजीं सरकारचीं पत्रें लष्करांतून आलीं, तीं येथें बाईस दाखवून, त्या जाबसालांचीं उत्तरें प्रत्योत्तरें जालीं व त्या पत्राचें उत्तर बाईनीं लिहून दिलें, तें पत्र आह्मीं मागारी टाकलें ह्मणून बाई आह्मांवर रागें भरली आहेत. हें वर्तमान व सरकारच्या पत्राच्या नकला व बाईशीं आह्मांशीं जाबसाल जाले ते, सविस्तर एक दोन वेळां सेवेसीं लिहून विनंतिपत्रें डांकेबरोबर व जासूदजोडीबरोबर सेवेसीं पाठविलीं. परंतु अद्याप आज्ञापत्र येत नाहीं. यामुळें चिंता लागली आहे. लग्नपट्टीचा ऐवज एक लक्ष तीस हजारांच्या हुंड्या पेशजीं सावकारांकडेस पाठविल्या, त्यांचेंही उत्तर कांहीं आलें नाहीं. बाकी सत्तर हजार रुपये राहिले. त्याविषयीं दहा पांच वेळां बाईशीं बोललों. दोन तीन वेळां तों ह्मणाली कीं, तजवीज करितों. तदोत्तर लष्करांतून सरकारचीं पत्रें आलीं. त्यांत सुरंजेचा मजकूर लिहिला होता. त्यामुळें बाईचें चित्त विक्षिप्त होऊन, सरकारच्या उत्तरांत लिहिलें कीं, बाकीच्या ऐवजापैकीं पंचवीस हजार रुपये तेथें तुकोजीबावा आहेत, सिरोंज महालही त्यांजकडेच आहे, त्याजपासून तेथेंच घ्यावेत. बाकीचा ऐवज पंचेचाळीस हजार आह्मी पाठवितों. या पत्रावरून बाईचे आमचे निक्षून जाबसाल जाले कीं, हा ऐवज तुह्मांकडे. बाकी राहिला सत्तर हजार तितका भरून पाठवावा. यामुळें विक्षेपता त्यां होऊन, राजश्री विनायक बाजी व वासुदेव चिमणाजी यांनीं बाईस एकांतीं समजाऊन सांगितलें जे, "आपण सिरोंजचा ऐवज कां द्यावा? वारंवार तेथें अनेक प्रकारचे गैरवाके समजावितात, त्याप्रमाणेंच श्रीमंतांचीं पत्रें येतात. तेथें राजश्री हरिपंत तात्या आहेत, त्यांचे विद्यमानचींही पत्रें होयेत. त्यास पंचेचाळीसां हजारांच्या हुंड्या आपण येथून करून पाठवाव्या. पंचवीस हजार सिरोंजपैकीं तेथें कमाविसदारही आहेत व तुकोजीबावाही तेथेंच आहेत, तेथें निशा करून देतील. श्रीमंतांस खसखशीत आपण लिहावें. तेथें दादाजी आहेतच. श्रीमंतांस समजाऊन सांगतील. तिकडील तिकडे ऐवज पटेल, ऐसें आह्मीही दादाजीस तपशीलवार लिहितों. आपलेंही पत्र लिहावें. याप्रमाणें उभयतांनीं बाईस समजाऊन, वकिलाशींही कारण काय आहे? परभारें हुंड्या पाठविल्यास तेथें जाबसाल श्रीमंतांशीं दादाजी करून घेतील." याप्रमाणें समजाऊन, पंचेचाळीस हजारांच्या हुंड्या करून, चंद्र २१ मिनहूस येथून हुंड्या रवाना केल्या. पुर्ता शोध करून सेवेसी विनंति लिहिली

असे. सेवेसी श्रुत होय. येथें बहुत दिवस जाले, धन्याचे पाय पहावे. उभयतांसही फार खंत वाटते. धनी कृपाळू समर्थ. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान ऐकिलें तें पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. अलीकडे नवीन कांहीं आलें नाहीं. राजश्री बाजीराव बर्वे यांस वद्य ७ बुधवारीं सायंकाळच्या दोन घटका दिवस राहतां, येथून निघावयाचे मुहूर्त होते. ते दिवशीं मुहूर्तेंकडून बाईच्या निरोपास गेले. बाईस सावकाश वाटत नव्हतें. तसेंच मुत्सद्दीही आंत बोलाऊन निरोपसमयीं वस्त्रें पैठणी पागोटें व पैठणी शेला व एक किनखाप व एक जामेवार ऐशीं खाशांस वस्त्रें दिलीं, व त्यांचे स्त्रीस पैठणी लुगडें व चोळी दिली, व चौघे कारकुनांस दोन दोन वस्त्रें दिलीं. मशारनिल्हेस पांच हजार रुपये खर्चास दिले. पुढें पागेच्या खर्चीतून उगऊन घेणार. दोन घटका रात्र वाड्यांत निरोपास जाली. तदोत्तर बाहेर येऊन मुत्सद्दी मंडळीच्या घरोघर जाऊन, निरोप घेऊन, त्यांनींही दोन दोन वस्त्रें खाशांस दिलीं. साऱ्यांचा निरोप घेऊन प्रहरा रात्रीं रेवा पार जाले. बाईनीं दहा स्वार व एक कारकून समागमें दिला आहे कीं, श्रीमंतांजवळ बाजीरायांस सोंपून येणें. रेवादक्षिणतीरीं वद्य नवमीस बाजीरायांनीं आपले मातोश्रीचें श्राद्ध करून, दशमीस धर्मपुरीच्या बेटास देवदर्शनास गेले. तेथून येऊन येथून त्रयोदशीस स्वार होऊन खरगोणास जाणार. तेथें पागेचा बंदोबस्त करून दरमजल पुण्यास येणार. दसरा बऱ्हाणपुरीं करून पुढें येणार. तिसरें वर्तमान, श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून दोघे शागीर्द येथें आले होते. त्यास पंधरा दिवस जाले. एक शागीर्द पुढें ग्वालेरीस पाटीलबावांकडे गेला. एक येथें यांची एकांतीं भेट घेऊन, चिटी आणली होती ती देऊन, जाब घेऊन माघारे गेला. येथून दहा रुपये त्यास खर्चास दिले. परस्परें बोलणें काय जालें, हें समजलें नाहीं. बातमीस आला होता हें ऐकिलें. पेशजीं सरकारचे आज्ञेप्रमाणें धोतरजोडे येथून खरेदी करून जासूदजोडीबरोबर पाठविले, त्याचेंही अद्याप उत्तर आलें नाहीं. बाकीचे धोतरजोडे तयार कारेगरांनीं केले आहेत. ते घेऊन पाठवावे किंवा कसें? आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

**लेखांक. ११२.** ता. २३ सप्टेंबर इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. भाद्रपद व॥ १२ शके १७०५.

"श्रियाविराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामींचे सेवेसीः—

सेवक विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ सवालपर्यंत मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—बहुत दिवस

जाले. आपल्याकडून पत्र येऊन वर्तमान कांहीं कळत नाहीं. येथून दोन चार पत्रें डांकेबरोबर व कासीदजोडीबरोबर पाठविलीं, तीं आपल्यास पावलीं किंवा नाहीं? आह्मांस तों येथें रात्रंदिवस आपले पत्राची आपेक्षा. आपणास तों तेथें स्मरण देयास कोण? असो. आमचें दैव. येथील वर्तमान सविस्तर श्रीमंतांस विनंतिपत्रीं लिहिलें आहे. त्यावरून सर्व आपल्यास विदित होईल. येथें बाईची मर्जी एक प्रकारची. यांचे मर्जीनुरूप बोललें तर बरें. समविषम जाबसाल जाल्यास कडवी मर्जी होती. सांप्रत लग्नपट्टीच्या ऐवजामुळें सुरंजेच्या पंचवीस हजारांमुळें बाईशीं आह्मांशीं कडें जाबसाल जाले. कागद आह्मीं परतून टाकले. त्यामुळें बाई आह्मांशीं बेरोख जाली आहेत. आधींच आमचे ठायीं अनास्था आहेच, आतां अधिकच! फारच रुष्ट आहेत. सरकारचीं पत्रें येतात, त्याप्रमाणें जाबसाल केला पाहिजे. येथें तों यांचे मर्जीप्रमाणें जालें तर संतोष. असें जालें आहे. लग्नपट्टीपैकीं सत्तर हजार रुपये सरकारची बाकी, त्यांपैकीं पंचेचाळीस हजारांच्या हुंड्या, आह्मांस न कळत, यांनीं सरकारांत छ २१ मिनहूस रवाना केल्या. आह्मांसही कळलें. पंचवीस हजार सुरंजेवर वर्गणी यांनीं घातली होती. सुरंजेचा [ हिशेब ] तेथें तुकोजीबावांनीं गैरवाका समजाऊन सरकारचीं पत्रें लष्करांतून येथें आलीं कीं, सुरंजेची रस्त व हिशेब तुह्मी घेऊं नये. अशीं पत्रें आलीं. लग्नपट्टीचा त्यांत कांहीं मजकूरही नवता. परंतु त्याजवरून रागें भरून, सरकारांत पत्र बाईनीं लिहिलें आहे कीं, पंचेचाळीस हजारांच्या हुंड्या वरकड महालपैकीं घ्याव्या आणि पंचवीस हजारांची सुरंजेबाबत तेथें तुकोजीबावांजवळून घ्यावे. असें पत्र व हुंड्या गेल्या. तेथें धनी आहेत. काय त्यांचे मर्जीस येईल तें करोत. परंतु ह्या हुंड्या घेऊं नयेत, अगर पंचवीसां हजारांची वरात यांजवरच परतून करावी. सिरोंज जाणे, तुह्मी जाणा! ह्मणून येथें विनायक बाजी व वासुदेव चिमणाजी येथें आहेत, प्रस्तुत बाईजवळ बोलले जे, नाहक पंचवीस हजार देऊं नयेत. तेथें राजश्री यशवंतराव गंगाधर, दादाजी आहेत, त्यांस आह्मी पत्र लिहितों. तेथें श्रीमंतांशीं ते जाबसाल करून घेतील. वकिलांचा मजकूर काय, असें ह्मणून हुंड्या व पत्रें पाठविलीं आहेत. दादाजी गंगाधराशीं श्रीमंतांनीं कर्डा जाबसाल केला नी हुंड्या माघारी टाकल्या, ह्मणजे यांची येथें प्रतिष्ठा कळेल! आह्मांस हरएक जाबसालास तेथें दादाजी गंगाधर यांचें बळ दाखवून फारच बाईजवळ श्लाघ्यता मिरवितात. कोणताही सरकारचा जाबसाल आह्मी करूं लागलों, ह्मणजे मध्यें हे ह्मणतात कीं, 'हें न ऐके तर काय तेथें दाजीस लिहूं? ते श्रीमंतांशीं बोलून घेतील.' असें जाबसालाचें मातेरें करितात. श्रीमंतांस समजावावें. उत्तर पाठवावें हे विनंति."

[ मेणवलीदप्तर ] ९ वारन हेस्टिंग्जसाहेबांचा खलिता.

[ नक्कल खलिता श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांस मिस्तर इष्टीन यांनीं लिहिला. ]

"सांप्रत सरकारचे कारभारी यांनीं पत्रांत मजकूर नानाप्रकारचे मुंबईचे गव्हरनराचे व कौन्सिल याचे लिहून पाठविले, तें पाऊन सविस्तर वर्तमान अवगत जालें. आह्मी त्यासही उत्तरें लिहिलीं. परंतु आपलें पत्र त्याहीचे पत्रासमागमें न आलें, तथापि आह्मीं इष्टत्वाचे रीतीस्तव आपणास लिहिलें असे कीं, प्रस्तुत कितीक वर्तमानें हिंदोस्थानांत जालीं, तें परस्परें आह्मांस पावलीं; व किंचित् त्यांपैकीं मुंबईकर साहेबाचे लिहिल्यावरून कळालीं. जोंपावेतों यदर्थाचें अवग्र तपशीलवार वर्तमान पावत नाहीं, तोंपावेतों मुंबईचे साहेबांनीं बरें अथवा वाईट केलें, याची तजवीज काय करावी ? सांप्रतचीं वर्तमानें ऐकिलीं, तेणेंकरून अति आश्चर्य जालें कीं, मुंबईचे लष्करचे सरदारानीं येथील हुकमावांचून कौलकरार करावा. बलके त्यांहीस येथीलच आज्ञा प्रमाण असावी, व या गोष्टीस आपणही यथास्थित जाणतात. तथापि, त्या सरदारांनीं जो कांहीं कौलकरार केला, तो कुंपनीचे हकामध्यें अतिशय हानिकर व इंग्रजांचे जातीचे प्रतिष्ठेच्या लघुतेचा केला. अद्यापपावेतों त्याची नक्कल आह्मांपासीं पावली नाहीं. जें कांहीं जालें असेल तें असो. आह्मांस योग्य हेच कीं, एक क्षण विलंब न करितां आपणास लिहावें कीं, त्यांनीं जो कांहीं कौलकरार केला असेल, तो लटका व आह्मांस प्रमाण नाहीं. हें आपणास लिहावयाचें प्रयोजनही नाहीं. आपण जाणतच आहेत. कारण कीं, जे समयीं कर्नल गाडरसाहेबास पाठविलें, तेच समयीं आपणांस लिहिलें होतें. असो, जें जालें तें जालें. पुढेंही आह्मी कोणे एके प्रकारें आपला व मुंबईकरांचा हर्षामर्ष प्रगट जाला, व कर्नल अपटन साहेबांनीं जो कौलकरार केला, तो न घडल्यामुळें अधिकोत्तर जे श्रम केले ते निरर्थक जाले. यास्तव सांप्रतही आमची इच्छा बहुत आहे कीं, त्याच रीतीचा सलूक फिरून दृढ व्हावा. हें अवग्र वैमनस्य दोहींकडील नाशास पावावें, या अर्थाचे सिद्धीस्तव आह्मी व कौन्सिल या सरकारचे यांहीं कर्नल गाडरसाहेब यांस अधिकार संपूर्ण दिधला कीं, आपणाकडील सवाल जाब करून, कुंपनीचे नांवें कुंपनीचे तर्फे करून, मतलब कौलकरारचे जे कर्नेल अपटन साहेबांनीं केले होते, ते फिरून नवे करावे. परंतु एके शर्तेनें कीं अंग्रेजाचे फौजेचे सरदारापासून तुह्मीं मतलब आपला आमचे हुकमाखेरीज व त्याचे निरुपायास्तव करून घेतला. त्याचें प्रमाण मुंबईचे गव्हरनरास होणार नाहीं. तो तुह्मी आपले जवळ ठेवितां तो टाकून द्यावा, व करार करावा कीं तुमचे सरकारचे कोणेही एका बंदरांत फरासिसास, कीं आमचे जातीचा तो शत्रु आहे, जागा न द्यावी, व त्याची फौज आपले तालुक्यांतून जाऊं न द्यावी, व त्यासीं इष्टत्व सवदागिरीविषयीं अथवा आणीक कोणेविषयीं न करावें. या शर्तेप्रमाणें आह्मी इष्टत्व सदैव कुंपनीचे व अंग्रेजाचे जातीचें करून देतों. जर आपण हा अर्थ मान्य न करितील तर आह्मी निरुपाय होऊन. यास्तव जें कांहीं घडोन

येईल. मग आह्मांवर शब्द न ठेवावा. कारण कीं सलूख व लढाई तुमचेच विचारावर आहे. आणीक मजकूर कर्नेल गाडरसाहेबापासून कळतील. त्याजवरच तेथील कारभाराचा अखत्यार दिधला आहे. यास्तव लिहिलें असे कीं, कर्नेलमजकुरास वकील मुतलक व आमचे ठिकाणीं जाणून, त्याचें केल्यास आमचें व कुंपनीचें केलें जाणावें."



[मिणवलीदप्तर]

## १० ताराबाईचें पत्र.

श्री.

"राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे:-तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें, तें प्रविष्ट जाहालें. उत्तरेकडे पठाणांनीं दंगा केला. अंतरवेद वगैरे अंमल उठविला. तमाम साहुकारा लुटोन पैका बेमबलग. नेला. मथुरा वृंदावन इत्यादि तमाम शहरें मारून कत्तल केली. पुढें नर्मदा ऐलतीरीं दक्षण प्रांतें यावें, इकडील तमाम किल्ले कोट हस्तगत करून आपला बंदोबस्त करावा, वगैरे कित्येक मनसुब्याची गुर्मी धरून मजल दरमजल येत असे. समागमें दिल्लीपतीही आहेत. याचा उपमर्द करावा, उठला अमल पुन्हां बसवावा, घेतलीं ठाणीं घालावीं, या उद्देशें राजश्री अंताजी माणकेश्वर व राजश्री नारोशंकर व राजश्री समशेरबहादर अगोदर रवाना जालेच होते. हल्लींही चिरंजीव राजश्री रघुनाथपंत यांची फौजेसुद्धां रवानगी केली. नर्मदा तीरीं पावेतों जाऊन पोहोंचले. हे त्याचें पारिपत्य करितीलच. ऐसेंही करितां त्यांनीं लईच गुर्मी केली, तरी आह्मांसही जावें लागेल, ह्मणोन कित्येक तपशिलें लिहिलें. ऐशियास तुह्मीं केलें तें उत्तमच आहे. कांहीं संकट पडणार नाहीं. परस्परांच त्याचें पारपत्य होईल. तुह्मांस हुजूर दर्शनास यावयाची आज्ञा करून राजश्री सदाशिव हरी पाठविले आहेत. हे सांगतील त्याप्रमाणें पत्र पावतेक्षणीं स्वार होऊन येणें. एक घडीचा विलंब न लावणें. जाणिजे. बहुत लिहिणें तरी मुज्ञ असा."



## ११ श्रीमंत सवाई माधवराव यांचे कारकीर्दींतील एक राजकीय कैदी.

श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचे अमदानींत राजकीय कैद्यांस फार सक्तपणाची शिक्षा देण्याची वहिवाट असे. सुप्रसिद्ध योद्धे सखाराम हरी यांचे कैदेची त्रोटक माहिती 'इतिहाससंग्रहां'त आलीच आहे. तथापि, एकाद्या राजकीय कैद्यासंबंधानें सविस्तर हकीकत प्रसिद्ध होणें ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचें आहे. यास्तव मासल्याकरितां एक उदाहरण देतों. भास्कर नारायण नांवाच्या एका गृहस्थांवर श्री. दादासाहेब व सखाराम हरी यांचे पक्षास सामील होऊन फितूर केल्याचा आरोप होता. हा आरोप नीटसा शाबीत झाला नव्हता. तरी भास्कर

नारायणांचे पायांत जड शृंखला अडकऊन त्यांस महिमतगडावर पंधरा सोळा वर्षें अटकेंत ठेविलें होतें; व त्यांची सर्व मालमत्ता जप्त करण्यांत आली होती. पुढें गंगाधर गोविंद भानू यांच्या मध्यस्थीनें त्यांची सुटका झाली. तरी त्यांस दोन हजारांचा हजीर जामीन पटऊन, दोन हजार रुपये आंग्र्याकडे देण्याचा करार करून द्यावा लागला! शेवटीं ते रुपये सरकारांत जमा होण्यांत अफरातफर व्हावयाची ती झालीच!! भास्कर नारायणाचे संबंधाचीं बरींच पत्रें पेशव्यांचे मुतालिक चिटणवीस रामाजी मल्हार यांचे दप्तरांत सांपडलीं. त्यांपैकीं कांहीं खालीं दिलीं आहेत. "यशवंत.",

## लेखांक १.

[ किरकोळ ] नाशिक.

### श्री.

"अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री गंगाधर गोविंद गोसावी यांस: सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ इसने तिस्सैन मया व अलफ रामचंद्र नारायण यांणीं हुजूर विदित केलें कीं आह्मी श्रीमंत कैलासवासी दादासाहेब यांजकडे गेलों होतों. सबब तालुके विजयदुर्ग येथील गांवगन्ना आमचे इनामतीची ठिकाणें रामचंद्र विठ्ठल यांचे नांव जप्तीचे विसीं लागोन जप्ती केली, ते ठिकाणें बी॥:—

२ ता राजापूर.
 १ मौजे जुवें.
 १ मौजे धोपेश्वर.
 २
२ ता सौदल.
 १ मौजे कोंढ.
 १ मौजे सेंडे.
 २
४ येकूण चार ठिकाणें जप्त करावयाविसीं." [ अपूर्ण. ]

## लेखांक २.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक लक्ष्मणराव आबाजी देशपांडे व कुलकर्णी ता मोसे खोरे दंडवत विज्ञापना ऐसी जे:— भास्कर नारायण यांस सखाराम हरीसंमंधे किल्ले महिमतगड तालुके रत्नागिरी येथें सरकारांतून अटकेस ठेविले आहेत. त्यास मोकळे करावयाचें करून, व रामचंद्र नारायण त्यांचे बंधु मोकळे आहेत तें, ऐसे उभयतांस फैल जामीन घ्यावयाविसीं आज्ञा जाहली. त्यावरून आपण त्यांस जामीन जालों असों. उभयतां-

पासून फंदफितूर बदफैली जाल्यास त्यांचे नि॥चा जाब आपण करून देऊं व त्यांचे सरकारांत प्रयोजन लागेल ते समई उभयतां हजीर करून देऊं."

## लेखांक ३.

"राजश्री लक्ष्मणराव अवजी स्वामी गोसावी यांसीः—

सेवक अनंदराव सखाराम कृतानेक दंडवत प्रो विनंति उपरीः—ती॥ राजश्री रामचंद्र नारायण व भास्करराव नारायण यांस श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांणीं फितूर पडदा न करितां हजीर राहातील ह्मणोन हजीर जामीन मागितले. त्याजवरून जामीन कतबा तुह्मीं दिल्हा. त्याजवरून मारनिले उभयतां व ती॥ राजश्री लाडो नारायण याणीं तुह्मांस इमानपत्र लेहून दिल्हें, त्या प्रो वर्तणूक करितील. कदाचित् अंतर पडल्यास आह्मीं त्यांणीं पत्र लेहून दिल्या प्रों निभाऊन देवऊं. यांसी अंतर होणार नाहीं. शके १७१४ परिधावी नामसंवत्सरे सु॥ इसने तिस्सैन मया व अलफ रा॥ छ. २२ रमजान. बहुत काय लिहिणें हे विनंति हस्ताक्षरें रामराव सखाराम."

## लेखांक ४. (नक्कल)

"राजश्री रामचंद्र नारायण व भास्कर नारायण गोसावी यांसीः—

सु॥ सलास तिसैन मया व अलफ. तुह्मांकडे नजरेचा ऐवज सरकारांत द्यावयाचा करार केला आहे. तो व॥ देणें. सुभा आरमार विजयदुर्ग नि॥ गंगाधर गोविंद यांजकडे बेगमीबद्दल रुपये २००० दोन हजार देविले असेत. तरी पावते करून पावलियाचें कबज घेणें छ १२ सफर."

## लेखांक ५. (नालिक.)

### श्री.

"अपत्यें गंगाधरानें चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ छ २५ साबान सु॥ जंजिरे विजयदुर्ग वर्तमान यथास्थित असे. विशेषः— रा॥ भास्कर नारायण हे सखाराम हरी संमंधें किल्ले महिमतगड येथें बंदीं आहेत व त्यांचीं इनामतीचीं ठिकाणें जप्त आहेत. त्यास हालीं सरकारांत नजर रुपये दोन हजार घेऊन मशारनिलेची इनामत ठिकाणाची मोकळीक करावयाचा करार होऊन, मखलासीची याद गुदस्तां जाहाली, त्याअन्वयें ऐवजाचा भरणा सरकारांत व्हावा. ऐशास मशारनिले कुटुंबवत्छल, गरीब, निराश्रित, ऐवज न मिळे. तेव्हां त्यांचे बंधु लक्ष्मण नारायण येथें येऊन वर्तमान सांगितलें. आज चाळीस माणूस कुटुंबास आहे. उपजीविका कांहीं नाहीं. यास्तव यांजवर कृपा करून सदर्हू दोन हजार रुपये तालुके विजयदुर्ग किंवा आरमारचे बेगमीस ऐवज लाऊन दिल्यानें सोईसोईनें तालुके मजकुरीं वसूल देतील. दोन हजारांचा भरणा करून घेतों. बंदीस बहुत दिवस आहेत. यांची मुक्तता होऊन ठिकाणें इनाम सुद्धां मोकळीक करावयाची आज्ञा जाहाली पाहिजे. (अ)गदीं उत्पन्न नाहीं. याजकरितां विनंति लिहिली आहे. आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति."

## लेखांक ६. (नक्कल)

**श्री.**

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री परशराम रामचंद्र गो यांसीः—

पो माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिलें पाहिजे. विशेषः– भास्कर नारायण हे तीर्थस्वरूप कैलासवासी दादासाहेबांबरोबर होते. सबब किले महिमतगड येथें बिडी घालून अटकेस ठेविले आहेत. त्यास हुजूर आणविले असत. तरी पायांतील बेडी तोडून सरकारची जासूदजोडी पाठविली आहे, याजबरोबर हुजूर पाठविणें जाणिजे. छ १२ सवाल सुा सलास तिसैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति."

## लेखांक ७. (नक्कल.)

"यादी राजश्री आनंदराव धुलप यांस पत्र जे, राजश्री लक्ष्मण मुरार व प्रल्हादराव नीलकंठ यांचीं इनामतीचीं ठिकाणें ताा राजापूर माहालीं दोन व सौदल माहालीं दोन ऐकून च्यार ठिकाणें आहेत. त्यास मशारनिलेचे चुलत बंधु रामचंद्र नारायण व भास्कर नारायण हे उभयतां श्रीमंत कैलासवासी दादासाहेबांबराबर होते. सबब भास्कर नारायण यांस सरकारांतून किल्ले महिमतगड येथें सोळा वर्षे अटकेस ठेऊन सदर्हू इनामतीचीं ठिकाणेंही त्याच वेळेस जफ्त ठेविलीं होतीं. त्याजवर सन सलास तिसैनांत सरकारांत विनंति करून, भास्कर नारायण यांस अटकेंतून मोकळे करावयास व इनामतीचीं ठिकाणें जफ्तीम होतीं, तीं मोकळीं करावयाबद्दल सरकारांत नक्त रुपये २००० दोन हजार ध्यावयाचा ठराव करून, भास्कर नारायण अटकेस होते त्यांची व सदर्हु ठिकाणाची मोकळीक करून घेतली; परंतु रुपये द्यावयास ताकत नाहीं. यास्तव नजरेचा ऐवज करार केला. त्याचा भरणा आरमार तालुके विजयदुर्ग येथील बेगमीस देविला, तिकडे करावा. सबब गंगाधर गोविंद भानु यांनीं मामलेदार यांस सदर्हू ठिकाणें गाहाण लेहून दिल्हीं. त्यांणीं दोन हजार रुपये नजरेचे आरमाराकडे भरावे या प्रों करार जाला. ठिकाणाची वहिवाट एक दोन वर्षें भानूंनीं करून वसूल घेतला. नंतर परशराम केशव मराठे यांजकडे सदर्हू ठिकाणें भानू यांनीं ठेऊन आमचें गाहाणपत्र त्यांचे हवालीं केलें. त्याप्रों त्यांनीं ठिकाणाची वहिवाट सात आठ वर्षे करून वसूल घेत गेले. आपणाकडे आरमार सुभा. यावर आपण चौकसी पाहातां, आरमाराकडे हिसेबी सदर्हू दोन हजार रुपये आरमारचे जमेस नाहीं! तेव्हां आपण मराठे यांजकडील वहिवाट बंद करून ठिकाणाचा वसूल आरमाराकडे घेत गेले ह्मणोन समजलें. त्यास आरमाराकडे वसूल कोणत्या सालापासून घेतात, ऐवज सालोसाल मिळोन किती जमा जाला, व दोन हजार नजरेपैकीं बाकी काय राहते तें, व गंगाधर गोविंद व परशराम केशव यांजकडे वसूल किती सालें गेला हें तपसीलवार लेहून पाठवावें. ह्मणजे काय बाकी नजरेपैकीं राहाते त्याचा निर्गमाचा विचार ठरेल."



# १२ महादजी शिंदे ह्यांच्या उत्तरहिंदुस्थानांतील कमाईचें एक टिपण.

[मेणवलीदप्तर] श्री.

याद पाटील यांणी हिंदुस्थानांतून घेतले.

बतपशील:—

| ७ | नगद जिन्नस व जवाहीर. | तोफा. |
|---|---|---|
| राणा गोहदकर याची जप्ती ... ... | ३२,००,००० | ० |
| मामलत मिर्झा शफीखां ... ... ... | ३३,००,००० | ० |
| जप्ती अफरासियाबखां ... ... ... | ८०,००,००० | ५७० |
| शुजाआदिलखा व बर्जाद अफरासियाबखानाचे सासरे व जहांगीरखां त्याचा भाऊ ... | ४,००,००० | ० |
| राजे नारायणदास अफरासियाबखानाचा दिवाण ... ... ... ... ... | ३,००,००० | ० |
| महमद बेगखां हमदानी याची जप्ती ... | ६,००,००० | ८० |
| रणजितसिग जाट याची मामलत ... ... | १२,००,००० | ५ |
| मामलत राजे जयनगरकर दोन वेळ ... | ८५,००,००० | ० |
| मामलत पिटाला (पतियाला ?) ... ... | ६,००,००० | ० |
| मामलत दतिया व भदावर वगैरे ... ... | ८,००,००० | ० |
| मामलत रामरतन मोदी पातशाही व लालजीमल ... ... ... ... | ३,००,००० | ० |
| मामलत रावराजे प्रतापसिग माचाडीवाले ... | ४,००,००० | ० |
| गुलाम कादरखां याची जप्ती दरोबस्त पातशाही व सामान व माल नगद व जिन्नस व जवाहीर वगैरे नेले ते पाटील-बावाकडे आले . ... ... ... | २०,००,००० | ८० |
| पाटणच्या लढाईत इस्माल बेगखां व राठोड याणी शिकस्त खाल्ली... ... ... ... | ० | ८० |
| | २,९६,००,००० | ८१५. |



# १३ रास्त्यांची तैनात.

[मेणवलीदप्तर] श्री.

"यादी जातीची तैनात रास्ते यांची ब॥ जाबता पेशजीची तैनातः—

| | आज रुपये | नक्त रुपये | कापड आंख | व रुपये. |
|---|---|---|---|---|
| मल्हारराव भिकाजी | २१२०० | २०००० | ३००० | १२०० |
| आनंदराव | १०४०० | १०००० | १००० | ४०० |
| लक्ष्मणराव | १०४०० | १०००० | १००० | ४०० |
| गणेश कृष्ण चिरमुरे | ३९०० | ३५०० | १००० | ४०० |
| | ४५९०० | ४३५०० | ६००० | २४०० |

यासी मल्हारराव भिकाजी दिवंगत झाले सबब सन तिसा सीतैनांत करारः—

२१२०० आनंदराव भिकाजी
१०४०० कदीम
१०८०० जाजती

२१२००

२०८०० लक्ष्मणराव भिकाजी
१०४०० कदीम
१०४०० जाजती

२०८००

३९०० गणेश कृष्ण कदीम

४५९००

तपशील

४१९५०॥≡॥ सरंजामास गांव लाऊन दिले त्याची बेरीज ब॥ जाबता.

३९४९।-॥ कित्ता आयाचा आजमास लिहून आलें लावणी संचणी करून जाजती आकार करावा. याप्रमाणें तैनात जाबत्यास करार आहे, सबब आजमासें भरतीस धरिले. रुपये.

३५००० बागलकोट पो नेमणूक आहे ती तिकडे खर्च पडते त्या प्रों रुपये.

२०००० गंगाधरराव भिकाजी

५००० कदीम

१५००० जाजती

२००००

१०००० रामचंद्रराव भिकाजी

५००० कदीम

५००० जाजती

१००००

५००० व्यंकटराव गंगाधर

३५०००

८०९००

५२०० जीवनराव भिकाजी यांचे नांवें सदाशिव नाईक रास्ते मृत्यु पावले त्यांची तैनात मशारनिल्हेचे नांवें

५०.० नक्त

२०० कापड आख ५०० एकूण

५२००

तपशील

१००० बागलकोट पो नेमणूक

२००० मौजे तासगांव ता सातारा हा गांव तैनातेंत.

२००० इतलाख साताऱ्याकडे नेमणूक एकूण.

२०० कापड नेमणूक एकूण

५२००

८६१००

या खेरीज इनाम गांव व जमिनी व आसाम्या व दस्तकें अलाहिदा असेत

हत्ती निसबतीस पांच आहेत त्यांचे खर्चाची नेमणूक बागलकोटपैकीं ५०००

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] नोव्हेंबर १९०९. [अंक ४ था.

## विषयानुक्रम.

| विषय. | पृष्ठांक. |
| --- | --- |
| १ जुन्या ऐतिहासिक गोष्टी. ... ... ... ... ... | २१–२८ |
| २ ऐतिहासिक स्फुट लेख. ... ... ... ... ... | ९–२४ |
| ३ महेश्वरदरबारची बातमीपत्रें. ... ... ... ... | २२५–२४० |
| ४ ऐतिहासिक टिपणें. ... ... ... ... ... ... | २१–२८ |

चित्रें—१ शेख सादी २ शहाजी राजे अक्कलकोटकर



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# ९. शेख सादी.

हा फारसी भाषेंतील लोकोत्तर कवि. हा शिराज येथील राहणारा असून ह्याचें पूर्ण नांव शेख मसलुद्दीन सादी-अल-शिराजी. हा शिराज येथें इ. स. ११८४ मध्यें जन्मला, आणि इ. स. १३१३ मध्यें मेला. हा १२० वर्षें (चांद्र) जगला, असा उल्लेख आढळतो. तो आपल्या तरुणपणीं हिंदुलोकांच्या व क्रुसेडर्स ह्यांच्या विरुद्ध लढला. एके वेळीं तो लढाईंत कैद होऊन ट्रिपोली येथील किल्ल्यांत बंदींत पडला, व तेथें त्यास तटदुरुस्तीचें काम करावें लागलें. तेथें एका गृहस्थानें त्याची बुद्धिमत्ता पाहून त्याची सुटका केली, आणि त्यास आपली मुलगी देऊन आपला जांवई केलें. परंतु ही बाई अति वाईट स्वभावाची निघाली. त्यामुळें हा कवि असें ह्मणत असे कीं, 'माझ्या पायांतली एक पारतंत्र्याची शृंखला निघाली; परंतु तिच्या जागीं ही अति त्रासदायक दुसरी शृंखला पडली!' सादी हा प्रवासाचा मोठा शोकी होता. त्यानें चौदा वेळां मक्केची यात्रा केली. तो परमपूज्य सुफी साधू अबदुल कादिर जिलानी ह्याचा शिष्य होता. ह्यानें 'गुलिस्तान' व 'बुस्तान' असे दोन उत्कृष्ट ग्रंथ लिहिले आहेत. ह्यांशिवाय लहान लहान कवनें व स्फुट पद्यें बहुत रचिलीं आहेत.

सादीच्या ग्रंथांची योग्यता फार मोठी समजली जाते. ह्या ग्रंथांचीं भाषांतरें इंग्रजी भाषेंत व इतर अनेक भाषेंत मोठमोठ्या विद्वानांनीं केलीं आहेत. हा मोठा ज्ञाता पुरुष असून ह्याचीं वचनें फार बोधपर व दृष्टांतांनीं भरलेलीं आहेत. ह्याचा 'गुलिस्तान' हा ग्रंथ तर उपदेशाचें व व्यवहारज्ञानाचें केवळ भांडार आहे. हा ग्रंथ शिवाजी महाराजांनीं अवलोकन केला होता, ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे. ह्या ग्रंथाचें एक उत्कृष्ट भाषांतर सातारचे छत्रपति प्रतापसिंह महाराज ह्यांनीं आपल्या स्वतःकरितां तयार करविलें होतें. त्यांत राजेलोकांच्या चालीं-विषयीं ह्मणून जो भाग आहे, तो त्यांना फार आवडत असे. तो त्यांच्या अगदीं मुखोद्गत होता असें सांगतात. ह्यांतील बोधवचनें फारच सुरस आहेत. सादीचें चरित्र व सादीचे ग्रंथ फार मूल्यवान् आहेत; व त्यांचें मराठी वाचकांनीं अध्ययन करावें, अशी त्यांची योग्यता आहे.

## १०. आपाजीरावाचें चोख उत्तर.

बेदनूरच्या राजाचा प्रांत हैदरानें जिंकून घेतला, व तो फार शिरजोर झाला. ही गोष्ट थोरले माधवराव पेशवे ह्यांस दुःसह्य झाली. बेदनूरच्या राजाशीं मराठ्यांनीं अंतस्थ तह केला होता. तेव्हां मराठ्यांना, हैदरास नतिजा देण्याकरितां, त्यावर स्वारी करणें भाग पडलें. ही गोष्ट इ. स. १७६७ मध्यें घडली. थोरले माधवराव पेशवे रायदुर्गापर्यंत चालून गेले, व त्यांनीं हैदराचा मेहुणा व सिरे प्रांताचा सुभेदार मीरअली रेजाखान ह्यांस जिंकून, गुरुमकोंडा महाल परत घेतला. थोरल्या माधवरावांचें सामर्थ्य व वीरश्री पाहून, हैदरअलीनें त्यांच्याशीं तह करण्याचा विचार योजिला. त्यानें तहाचीं बोलणीं सुरू केलीं. हैदराकडून आपाजीराव ह्या नांवाचा वकील मध्यस्थीस आला. श्रीमंतांनीं त्याचा भर दरबारामध्यें आदरसत्कार केला; व त्यास हैदरानें काय काय अधिकार दिला आहे तें पाहून, त्यास दारमदाराचीं बोलणीं पटवर्धनांचे बरोबर करावींत, असा हुकूम केला. पहिल्याच दरबारामध्यें एकदम तहाची वाटाघाट करणें दरबारी रीतीच्या विरुद्ध होतें. तथापि, हा वकील मोठा व शहाणा बावदूक होता. त्यानें आपल्या वक्तृत्वास एकदम सुरवात करून, लढाईनें किती अनर्थ होतात, शांतता राखल्यानें किती लोककल्याण होतें, वगैरे मुद्यांचें विवेचन श्रीमंतांपुढेंच सुरू केलें; आणि त्यानें एकदम मुख्य मुद्याकडे वळून, बेदनूर येथें हैदर व पेशवे ह्यांचा तह झाला असतां व सर्व वादाचीं कारणें निकालांत आलीं असतां, पुनः ही स्वारी झाली, ही अगदीं अन्यायाची गोष्ट झाली, असे उद्गार काढिले. हें ऐकून पटवर्धनांनीं सांगितलें कीं, "बेदनूरचा तह बेदनूरच्या राजाबरोबर केला होता. परंतु तह झाल्या दिवसापासून तो राजा प्रतिबंधांत आहे, व हैदरानें त्याचा सर्व प्रांत बळकाविला आहे. ह्याकरितां त्या राजास बंधमुक्त करणें व त्याची सत्ता त्यास परत देणें हें आह्मांस आवश्यक आहे. कां कीं, हैदरावर आह्मी बळजबरीनें स्वारी करून आलों ह्मणून जी त्याची तक्रार आहे तिचा विचार करण्यास, पूर्वींचे उभय पक्षांचे संबंध प्रथम कायम केले पाहिजेत."

हें भाषण ऐकून दरबारी मंडळीस क्षणभर संतोष झाला, व हैदराच्या वकिलास पटवर्धनांनीं निरुत्तर केलें, असें वाटलें. परंतु आपाजीरावही मोठा धूर्त व चतुर मुत्सद्दी होता. त्यानें थोडी लीनता दाखवून, नम्र स्वरानें असें उत्तर केलें कीं, "महाराज, बेदनूरचा राजा सर्व प्रांताचा खरा राजा असून तो

हैदराच्या ताब्यांत आहे, ही गोष्ट खरी आहे. परंतु ती परिस्थिति बदलून सांप्रत जो फेरबदल झाला आहे, त्यांत आह्मीं नवीन असें कांहीं केलेलें नाहीं. आह्मी त्या कामीं श्रीमंत पेशवेसरकार ह्यांचेंच अनुकरण मोठ्या आदरबुद्धीनें केलेलें आहे. आपल्या सारखे मोठे लोक जीं नीतितत्वें व्यवहारांत अनुसरतात, त्यांचेंच प्रशंसनीय अनुकरण करण्यास आह्मी सदा तत्पर असतों." हें खोंचदार उत्तर ऐकून माधवरावसाहेबांनीं खालीं मान घातली; व त्यांना तें मर्मस्थानीं लागलें. त्यांतील भावार्थ असा होता कीं, सातारच्या राजास पेशव्यांनीं प्रतिबंधांत टाकून जशी मराठी राज्याची सर्व सत्ता बळकाविली, तसें हैदरानें त्यांचेंच अनुकरण करून बेदनूरच्या राजास प्रतिबंधांत ठेविलें. हें जशास तसें उत्तर मिळतांच तहाचें काम तेव्हांच आटोपलें, व पेशव्यांनीं ३५ लक्ष रुपये खंडणी घेऊन पुण्याकडे मोहरा वळविला.



## ११. सुलतान महमूद बहामिनी.

सुलतान महमूद बहामिनी हा गुलबर्गा येथील बहामिनी घराण्याचा पांचवा बादशाहा होय. हा मोठा उदार, शाहणा आणि रसिक बादशाहा होता. ह्याची कारकीर्द इ. स. १३७८ पासून इ. स. १३९६ पर्यंत झाली. ह्यानें सुमारें १९ वर्षें मोठ्या शहाणपणानें राज्यकारभार चालविला, व आपल्या कारकीर्दीमध्यें लढाया व रक्तपात होऊं दिले नाहींत. हा मोठा विद्याव्यासंगी असून, विद्वान् पंडितांचा व कवींचा चहाता होता. ह्यानें आपल्या कारकीर्दीमध्यें विद्याप्रसारार्थ चांगला प्रयत्न करून, गुलबर्गा, बेदर, खंदार, इलिचपूर, दौलताबाद, चौल व दाभोळ वगैरे ठिकाणीं शाळा संस्थापित केल्या. ह्याच्या औदार्य, दयालुत्व, रसिकता, प्रजावात्सल्य व राजकारणचातुर्य वगैरे सद्गुणांच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. हा बादशाहा आपलें स्वतःचें कर्तव्य चांगलें जाणत असे, व सदोदित असें ह्मणत असे कीं, "परमेश्वरानें जी राजसंपत्ति दिली आहे, तिचे राजेलोक हे फक्त रक्षक होत. तिचा गैरविनियोग करणें ह्मणजे परमेश्वराचा विश्वासघात करणें होय." अशा बादशाहाची कीर्ति इतिहासांत अजरामर व्हावी हें साहजिकच आहे. ह्याची एक आख्यायिका येथें नमूद करितों.

सुलतान महमूद ह्याच्या रसिकतेची व विद्याव्यासंगाची कीर्ति दिगंतरावर गेली, व मोठमोठे नामांकित मुसलमान कवि व पंडित त्याच्या आश्रयासाठीं त्याच्या

दरबारीं गुलबर्ग्यास आले. त्याच्या ह्या विद्यांप्रियतेमुळें त्याचें नांव 'मुसलमानी आरिस्टाटल' अशा अर्थानें प्रसिद्ध झालें. अशा प्रकारें सुलतान महमूद बादशाहाची कीर्ति इराणांत पोंचली, व तेथील त्या वेळचा नामांकित कवि हाफीज हा हिंदुस्थानांत येण्यास निघाला. तो इराणचे आखातापर्यंत जेमतेम आला. तों समुद्रांत तुफान झालें. त्याला समुद्रांतील तुफानांचा फारच कंटाळा असल्यामुळें, त्यानें रत्नाकराचें भयानक स्वरूप पहातांच, आपल्या मनांतील गुलबर्ग्यास जाण्याचा विचार रहित केला, आणि बादशाहा सुलतान महमूद ह्यास एक कविता लिहून पाठविली. ही कविता फारसी भाषेंत असून तिचें इंग्रजी भाषांतर पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

"For the wealth of the world I will not exchange
The wind of my garden which softly blows;
My friends may rebuke me, but I will not range;
I will stop here at home with the *bulbul* and rose;

Enticing no doubt, is your beautiful crown,
With costliest gems in a fair golden bed;
But through perils and risks that ominous frown,
I might win it, perhaps, but then have no head.

When I thought of your pearls, it seemed then to me
To risk a short voyage would not be too bold;
But now I am sure, one wave of the sea
Can *not* be repaid by treasures of gold.

What care I for pearls or for gems rich and rare
When friendship and love at home both are mine?
All the gilding of art can never compare
With the pleasure derived from generous wine!

Let Hafiz retire from the cares of the world,
Contented with only few pieces of gold;
In the lap of repose here, let him lie curled,
Far removed from the sea and its dangers untold!"

ह्या कवितेचा तात्पर्यार्थ इतकाच आहे कीं, "हे बादशाहा, तुझ्या संपत्तीला मोहून मी समुद्रपर्यटण करून तुझ्या राजधानींत येण्याचा विचार केला होता; परंतु मला आतां जगाची सर्व संपत्ति तुच्छ वाटते. माझ्या उद्यानांतला गार वारा घेत व बुलबुल पक्ष्यांचा मंजुळ स्वर ऐकत, आणि गुलाबपुष्पाची शोभा पाहात, मी येथेंच राहतों. तुझ्या मुकुटाचीं रत्नें अतिशय सुंदर व देदीप्यमान असतील, व त्यांना भुलून, मी अनेक संकटांतून व अडचणींतून तुजकडे येईन; परंतु कदाचित् तोंपर्यंत माझें मस्तकच ठिकाणीं राहणार नाहीं! तुझ्या मूल्यवान् मौक्तिकांचा विचार मनांत येऊन मला असें वाटलें कीं, तुझ्या राजधानीपर्यंतचा प्रवास थोड्याशा

धीटपणानें सहज पार पडेल. परंतु मला आतां असें वाटतें कीं, समुद्राची एक लाट आली ह्मणजे जो अनर्थ करील, तो तुझ्या सर्व संपत्तीनें देखील भरून येणार नाहीं. माझ्या स्वदेशांत माझे स्नेहसंबंधी व प्रेमीजन पुष्कळ आहेत. त्या अर्थी मला तुझ्या दुर्मिळ व अमूल्य मोत्यांची व रत्नांची मुळींच पर्वा करण्याची जरूर नाहीं. ह्मणून, ह्या हाफिजास जगांतल्या काळज्या सोडून येथेंच शांततेंत व स्वस्थ चित्तानें राहूं दे. त्यांत त्याला फार आनंद आहे."

ही कविता बादशाहा सुलतान महमूद ह्याच्या हातांत पडली. त्यानें ती वाचून पाहतांच त्या कवीची निस्पृहता पाहून त्यास फार संतोष झाला, आणि त्यानें एक हजार मोहरा किंमतीच्या हिंदुस्थानांतील कलाकौशल्याच्या जिनसा त्यास नजर पाठविल्या.

वरील हाफीज कवीची कविता वाचून, तुकारामबोवांनीं श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराजांस पाठविलेल्या अभंगांचें स्मरण सहज होतें. ह्या अभंगाची व आफीजच्या कवितेची तुलना करण्याचा हा प्रसंग नाहीं.



## १२. श्रीमंत प्रतापसिंह महाराज ह्यांच्या संग्रहांतल्या दोन आख्यायिका.



सातारचे श्रीमंत प्रतापसिंह महाराज ( कारकीर्द इ. स. १८१९–१८३९ ) हे फार रसिक व शहाणे राजे असून ह्यांना विद्येची गोडी विशेष होती. ह्यांच्या दरबारामध्यें जे जे विद्वान्, चतुर किंवा गुणी लोक येत, त्यांच्या भाषणांत कांहीं आख्यायिका, सुभाषितें, बोधवचनें, चमत्कारिक कोट्या, दृष्टांत, किंवा कविता आढळून आल्या, तर ते त्यांचा संग्रह स्वतःच्या रोजनिशीमध्यें करीत असत. ह्यांपैकीं कांहीं संग्रह आमच्या पाहण्यांत आला होता. ह्या संग्रहावरून ह्या राजपुरुषाच्या रसिकतेची कल्पना चांगली करितां येते. ह्या संग्रहापैकीं पुढील दोन आख्यायिका येथें सादर करितोंः—

१

"श्रीमन्महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांस कांहीं पेशजी दाखल्याच्या कागदांचें प्रयोजन होतें. यास्तव, सरकारआज्ञेनें, चिटणीस शोध करीत असेत. ते कागद सांपडल्यावरून मर्जी चिटणिसांवर संतोष होऊन त्यांचें हुशारीचें वर्णन चाललें असतां, आण्णा गोसावी निगडीकर ह्यांणीं विनंति केली कीं, "चिटणिसांनीं

या कामांत मोठे श्रम केले. मीं पांचचार वेळ पाहिलें, तों अक्षई रुमाल सुटलेलाच होता." हें ऐकून आज्ञा झाली कीं, "त्यांचा रुमाल सुटलेला व तुमचा बांधलेला असावा. ह्मणजे पृथ्वींत शोभा आहे."

२

"शिकंदरजाह यांचे कनिष्ठ पुत्र मीर पातशाहा व कन्या तहनवुंनिसा हे उभयतां ऐनेमहालांत खेळत असतां, पुत्रानें कन्येस ह्मणजे आपल्या बहिणीस विचारिलें कीं, "त्या आरशांत, तो चांगला मुलगा उभा आहे, त्याजवळ ती वाईट रूपाची मुलगी कोण आहे?" ही आपल्या रूपाची निंदा ऐकून तिनें तीर्थरूपाजवळ जाऊन विनंति केली. त्यांणीं उभयतां मुलांस पुनः ऐनेमहालांत नेऊन आपलालीं रूपें पुनः आरशांत पाहण्यास सांगितलें; आणि ह्मणाले, "मुला, पुतें पहा, तुझें स्वरूप किती चांगलें आहे? याजकरितां तूं परनिंदा व दुर्भाषण करूं नको. जगामध्यें असें चांगलें वर्तन कर, कीं अशा तुझ्या उत्तम तोंडास वाईटपणाचा डाग न लागे." नंतर मुलीकडे वळून ह्मणाले, "मुली, तुझें स्वरूप जर वाईट असेल, तर तूं अशी वर्तणूक कर कीं, ज्या योगें तुझ्या वाईट रूपाचा लोप होऊन त्यावर सद्गुणाचें दिव्य तेज पडेल, व जगांत तुझी कीर्ति होईल." हें ऐकून उभयतां मुलें वडिलांस मुजरे करून निघून गेलीं."

ह्या दोन्ही गोष्टींवरून इतिहासप्रसिद्ध थोर पुरुषांच्या आख्यायिका देखील किती बोधपर असत, व त्यांचा संग्रह करण्याची जुन्या लोकांत कशी प्रवृत्ति होती, तें दिसून येतें.



## १३. पेशवाईतली आतषबाजी.

सवाई माधवरावांच्या कारकीर्दीमध्यें तऱ्हेतऱ्हेचें दारूकाम होत असे. त्यांचीं त्या वेळचीं मराठी नांवेंही वाचण्यासारखीं आहेत. त्यांपैकीं कांहीं येणेंप्रमाणें:—

१ **तावदानी रोषनाई**:—ह्मणजे कांचेच्या कमानी करून व त्यांस आरशे लावून जें दारूकाम होत असे, त्यास तावदानी रोषनाई असें ह्मणत.

२ **आकाशमंडळ तारांगण**:—ह्मणजे दारूकामाचीं उंच झाडें तयार करून, त्यांतून आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें नाना रंगांचे तारे उडवीत, त्यास आकाशमंडळ तारांगण असें ह्मणत.

३ **चादरी दारूकाम**:—ह्मणजे तप्तसुवर्णाप्रमाणें लाल व पिंवळ्या रंगांच्या फुलांचीं जीं झाडें तयार करीत, त्यास चादरी दारूकाम असें ह्मणत.

**४ नारळी झाडें**:—ह्मणजे उंच झाडें तयार करून त्यांतून तोफांप्रमाणें व बंदुकांप्रमाणें आवाज निघत व सर्पाकार तोटे फिरत, व फुलें दृष्टीस पडत. त्यांस नारळी झाडें ह्मणत.

**५ प्रभाचमकः**—जसा प्रातःकाळीं सूर्योदय होतो व त्या वेळीं प्रभा चमकते, त्याप्रमाणें देखावा दृष्टीस पडण्याकरितां जें दारूकाम करीत, त्यास प्रभाचमक असें नांव असे.

**६ कैचीचीं झाडें**:—ह्यांतून हवईचे लोट उठत असत.

**७ बादलगर्जः**—ह्मणजे मेघगर्जनेप्रमाणें ज्या दारूकामाचा आवाज होत असे, त्यास बादलगर्ज असें ह्मणत असत.

ह्याशिवाय, बाण, पाणकोंबडी, हातनळे, कोठ्याचे नळे, फुलबाज्या, महताफा, वगैरे दारूकामाचे अनेक प्रकार होते. मराठी भाषेंतील हीं जुनीं नांवें आतां विसरलीं जात आहेत!



## १४. रामशास्त्री प्रभुणे.

हे पेशवाईतील सुप्रसिद्ध न्यायाधीश. ह्यांच्या निस्पृहतेच्या व शहाणपणाच्या गोष्टी पुष्कळ प्रसिद्ध आहेत. हे माहुलीचे राहणारे. हे बाळाजी बाजीराव ह्यांचे कारकीर्दीस प्रसिद्धीस आले, व त्यांनीं त्यांची इ. स. १७५१ सालीं शास्त्रीमंडळीमध्यें नेमणूक केली. त्या सालीं रामशास्त्री ह्यांस रोजमुरा दीडमाही ४० रुपये मिळूं लागला व श्रावणमासची दक्षणा ५०० व कापड ५५१ रुपये इतकें मिळूं लागलें. पुढें दोन वर्षांनीं त्यांस श्रीमंतांनीं घोडा बक्षीस दिला व त्याबद्दल १५ रुपये दरमहा जास्त वाढविला. पुढें थोरले माधवरावसाहेब गादीवर आल्यानंतर त्यांनीं त्यांस न्यायाधीशाचें काम सांगितलें व पालखी दिली. त्यामुळें त्यांस पालखीची नेमणूक सालाची एक हजार रुपये अधिक मिळूं लागली. थोरल्या माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत ह्यांची प्रतिष्ठा फार वाढली. पुढें माधवरावसाहेब मृत्यु पावले व नारायणराव गादीवर येऊन त्यांचाही लवकरच खून झाला. त्या वेळीं ह्या स्पष्टवक्त्या बाणेदार पुरुषानें राघोबादादांस, 'नारायणरावांच्या खुनाबद्दल देहांत प्रायश्चित्त घेतलें पाहिजे,' असा रोकडा जबाब देऊन पुणें सोडिलें, व वाईजवळ पांडववाडी ह्मणून गांव आहे, तेथें वास केला. पुढें सवाई माधवरावांचा जन्म झाल्यानंतर नाना फडणविसांनीं ह्या थोर पुरुषास पुण्यास आणिलें. इ. स. १७७७ सालीं रामशास्त्री पुण्यांत आले असावेत असें दिसतें. ह्याच वर्षी त्यांची

बायको मृत्यु पावली. इ. स. १७८० मध्यें नाना फडणविसांनीं त्यांना २००० रुपये जातीस तनखा व १००० पालखीखर्च नेमून दिला. शिवाय, त्यांस १००० रुपये श्रावणमासची दक्षणा व दसऱ्याचा पोषाख मिळत असे. तेव्हांपासून ते पुण्यांत होते; व पुणें दरबारचें न्यायाधीशाचें काम पहात असत. हे ता. २५ आक्टोबर इ. स. १७८९ रोजीं मृत्यु पावले. त्यांच्या उत्तरकार्यास पुणेंदरबारानें २००० रुपये दिले. ह्यांच्या मागें ह्यांचे चिरंजीव गोपाळशास्त्री ह्मणून होते. त्यांचें नांव फारसें प्रसिद्धीस आलें नाहीं. त्यांना पेशवाईतून ३२०० रुपये मिळत असत.*

रामशास्त्री प्रभुणे ह्यांच्या योग्यतेचे पुरुष महाराष्ट्रांत फारच थोडे निपजले असतील. त्यांच्या सारखीं सत्यप्रिय, निस्पृह व बाणेदार नररत्नें आणखी कांहीं निपजलीं असतीं, तर दुसऱ्या बाजीरावांच्या कारकीर्दींत जी नीतिभ्रष्टता झाली, ती खचित झाली नसती.* रामशास्त्री ह्यांचे निवाडे व न्यायाच्या गोष्टी सवडी-नुसार प्रसिद्ध होतील.



---

* क्याप्टन क्रून्स यांनीं गोपाळशास्त्री ह्यांचे बद्दल जी माहिती दिली आहे, त्यांत रामशा-स्त्र्यांच्या तैनातीचे जे आंकडे दिले आहेत, ते अगदीं बरोबर आहेत. ते लिहितातः—

"Gopal Shastree, is son of Ram Shastree, the judge, or Nyayadhish, of Poona, whose name is cherished throughout the Deccan, as the most learned among Shastrees, and the most incorruptible among judges. He never received fees, or gifts of any kind, and the only allowanaces he had, were 2,000 rupees salary; 1,000 rupees Palankeen allowance; 1,000 he received at the Dakshana; and 200 rupees for clothes. His son is scarcely known, has had 3,200 rupees of the above continued to him."

* मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रांटडफ साहेब ह्यांचेंही असेंच मत आहे. त्यांनीं मराठ्यांच्या न्यायखात्याची माहिती जमा करितांना एका लेखामध्यें पुढील उल्लेख केला आहे, तो वाचण्यासारखा आहेः—

"The first person who held this situation at the head of the Nyayadhish was Ram Shastree. He was, I believe, appointed by the first Mahadeo Rao, whose character as an upright judge stands higher than that of any other Peishwa. But even after the death of his patron, Ram Shastree continued to uphold the duties of this situation with becoming dignity and high honour; his memory is revered throughout the country, and many of the good acts of Nana Fudanaveese are believed to have originated in the weight and respectability of Ram Shastree's opinions. Such a public character under a corrupt government is beyond all praise, and a succession of such examples, even if they had stood alone in their generation, would have prevented the general debasement of morals, which Bajee Rao and his court effected so rapidly in Poona."

## २. महाबळेश्वरची जुनी माहिती.

"यादी तकरीद क्षेत्र महाबळेश्वर येथील वतनदारी मुळचा वतनदार बाबजी कोळी. त्यानें श्रीमहाबळाची व श्रीकृष्णेची पूजा करावी. त्यानें आपले मारफतीनें जंगम श्रीमहाबळाची पूजा करावयासी आपला ठेवणाईत ठेविला. ते समयीं शिरके राजे होते. तेच कारकीर्दीस सिंगणापुराहून सिंगणराजा श्रीक्षेत्रीं आला. त्यानें श्रीकृष्णेस स्नान केलें. श्रीमहाबळेश्वराचें दर्शन घेतलें. त्यानंतर श्रीचे चाकरीस पुजारी वतनदार कोण ह्मणोन चौकशी केली. तेव्हां बाबजी कोळी यानें हात जोडून विनंति केली, "महाराज, मी हजीर आहें." ते समयीं सिंगण राजे यांनीं देऊळ श्रीमहाबळेश्वराचें बांधिलें; स्थापना केली; तांब्याचे मुखवटे केले; देवास पोषाकवस्त्रें दिलीं; अलंकारभूषणें दिलीं; व श्रीकृष्णेचें तीर्थ बांधिलें. येणेंप्रमाणें नवबंदीस्त करून बाबजी कोळी ह्याचे स्वाधीन करून सिंगणराजे सिंगणापुरास गेले. जातेसमयीं डोह श्रीकृष्णेचा नजीक नांदगणें तेथें स्नान केलें. त्या दिवसापासून 'सिंगणडोह' ऐसें डोहाचें नांव पडलें. त्यानंतर शिरकाण तुरकांनीं बुडवून तुरकाण जालें. मोंगलाई अम्मल जाला. ते कारकीर्दींत चंदीहून चंद्रोजी मोरे या देशास आले. पादशाही मनसबदार होते. मुऱ्हे मावळे येथें कोळवण बळावलें होतें. तेव्हां श्रीक्षेत्रीं चंद्रराव आले; देवदर्शन घेतलें. जागा क्षेत्राची उत्तम पाहिली. श्रीजवळ सेवाचाकरीस कोण आहे ह्मणोन चौकशी केली. ते समयीं चंद्रराव मोरे यांजवळ बाबजी कोळी यानें हात जोडून विनंति केली कीं, "महाराज, श्रीचे सेवेसी मी आहें." तेव्हां चंद्रराव यांनीं बाबजी कोळी याचे विद्यमानें श्रीस नवस केला कीं, "देवा, कोळवण मोडून हें राज्य आह्मांस दिलेंस, तर तुझा मुखवटा रुप्याचा वजन ८॥· आदमणाचा करीन; आणि तुझें संस्थान वाढवीन. आह्मांस यश द्यावें." मग, देव चंद्ररावास प्रसन्न जाला. कोळवण चंद्रराव ह्यांनीं बुडविलें. श्रीनें यश दिलें. मग, चंद्रराव यांचें राज्य जालें. पुढें चंद्रराव मोरे श्रीचे दर्शनास आले. नवस फेडिला. आदमण रुप्याचा मुखवटा करून श्रीस वाहिला, व पांच पोषाक दिले, व बाबजी कोळी यासी बक्षिस पागोटें शेला व शेरा रुप्याचें कडें व चवकडा व करगोटा रुप्याचा येणेंप्रमाणें बक्षिस दिले, आणि बोलिले कीं, हा माझा साहावा लेक. याप्रमाणें इमानप्रमाण केलें. चंद्रोजीरावाचे पोटीं पुत्र पांचजण होते. वडील दवलतराव व हणमंतराव व गोविंदराव व बाळाजीराव व यशवंतराव ऐसे पांचजण. ते पुढें उमेदवार जाले. तेव्हां चंद्रोजीरांव यांनीं पांचजण लेक पांच जागीं ठेविले.

जोरांत हणमंतराव ठेविले. जांबलीस गोविंदराव ठेविले. जावलींत बाळाजीराव व बहुलींत यशवंतराव ठेविले, व शिवथरांत दवलतराव ठेविले. याप्रमाणें जागा कठीण बिकट पाहून ठेविले. याप्रमाणें चंद्रोजीराजे यांनीं वांटणी करून जागीं जागीं ठेविले. ते समयीं हणमंतराव यांनीं श्रीस मळा करावयासी इनाम बोरगांवांत आपले गाईचे ओढ्याजवळ जागा जमीन दिली व शेरी एक दिली, व आवकाळीचा माळ व भोशाचा माळ शिवेसी दोहों गांवचे. त्याचें नांव 'गुरेघर' नांव ठेवून, गांव देवास इनाम दिला. येणेंप्रमाणें हणमंतराव यांनीं इनाम श्रीस दिलें, व बाळाजीराव यांनीं हिरवडीचा एक कोन देवास देऊन, त्याचें नांव शिरवळी ठेवून तो गांव श्रीस इनाम दिला, व यशवंतराव यांनीं हळदुल्याचा तुकडा व करंज्याचा एक तुकडा व केवणाळें याचा एक तुकडा व टिकणचा एक तुकडा ऐसे चहूं गांवचे चार तुकडे तोडून, त्याचें नांव 'देवळें' ठेवून, तो गांव श्रीस इनाम दिला. याप्रमाणें श्रीस इनाम देऊन राज्य केलें. बाळाजी चंद्रराव जावलीस होते. त्यांचे देव्हारीं श्रीभवानीशंकराचा मुखवटा होता. त्याचे पुजेस सदावर्ते ब्राह्मण होते. ते समयीं शिवरात्रीचे उत्सवास शुकासनांत भवानीशंकराचा मुखवटा बसवून निसणीचे वाटेनें श्रीक्षेत्रीं आणावें, असा बेत बाळाजीराव यांनीं केला होता. निसणीचें नांव 'उपारटा दरवाजा' ते समयीं नांव ठेविलें. तेथें श्रीगणेशाची स्थापना केली आहे, व हणमंताचीही स्थापना केली होती. परंतु गुसवत् मारुति आहे, ती शीव श्रीक्षेत्राची आहे. पेशजी कोळवण पुंड होते. ते कारकीर्दींत कोंकण प्रांतीं 'मिरा' डोंगर आहे, तेथील कोळी या प्रांतीं आला. त्यानें आपलेबरोबर मिऱ्या डोंगरावरून एक गुरव आणिला. तेव्हां बाबजी कोळी यासी तो कोळी ह्मणाला कीं, "हा गुरव गरीब आहे. दादा, यास तूं जवळ असूं दे." तेव्हां त्यास बाबजी कोळी यानें ठेविला. गुरव व जंगम देवाची पूजा करून कांहीं दिवस होते. पुढें गुरव याचे पोटीं कपटभाव आला. तेव्हां जंगमास पिटून लाविला. कांहीं दिवस जंगम परागंदा होऊन तिकडून येऊन गुरव याचा मारा केला. गुरव याची बायको पोटीसी होती. ती कोळी यानें लपविली. मग जंगम देशांतरीं गेला. त्याचा ठिकाणा नाहीं. गुरवीण गरोदर होती, तिचे बरोबर गिरजी महार देऊन, बाबजी कोळी यानें जोरास हणमंतराव यांजकडे रवाना केली. तिचे पोटीं पुत्र जाला. त्याचें नांव 'काळ्ड' ठेविलें. तो थोर जाल्यावर मागतीं देवाजवळ बाबजी कोळी यानें आणून ठेविला. तो पूजा करूं लागला. चंद्रराव मोरे यांनीं बहुत दिवस राज्य केलें. त्यानंतर पुढें श्रीमंत शिवाजी महाराज यांची प्राबल्यता

जाली. तमाम मुलूख, ठाणीं, किल्ले, कोट घेतले. चंद्रराव जोरावर, व बिकट जागे हातीं चढेनात. यास्तव त्यास भेटावयासी या, म्हणोन शिवाजीराजे यांनीं चंद्रराव यांजकडे हेजीब पाठविले. हेजीब शिवथरास दवलतराव मोरे यांजकडे आले. करार केला ऐसा कीं, शिवाजी महाराज यांनींच शिवथरास यावें. भेट येथेंच होईल. मेजवानी करूं. मग शिवाजी महाराज यांसी दवलतराव यांनीं भुयाराहून आणिले. बैठक केली होती. मेजवानी जाली. जाऊं लागले. तेव्हां दवलतराव बोलिले कीं, "आलेत आपले पायीं, जाल कोणाचे पायीं?" तेव्हां शिताबी करून निघोन गेले. ते रायगडास येऊन तेथून मेजवानीकरितां दवलतराव यांस बोलावून रायगडास नेले. त्यांचे पुढें पादशाई सनदा टाकिल्या; आणि दवलतराव यांसीं कैद करून डोळे काढिले. मग, वरकड दवलतराव यांचे भाऊ यांसी बोलावणें केलें. तेव्हां ते चौघे भाऊ यांनीं विचार केला कीं, प्रसंग कठीण आहे; ठीक नाहीं. तेव्हां आपली चीजवस्त श्रीक्षेत्रीं आणिली. श्रीचे जामदारखान्यांत ठेविली, व मुखवटा भवानीशंकराचा होता तो बाळाजीराव यांनीं श्रीचे देवळीं देवाजवळ ठेविला. ते समयीं सदावर्ते क्षेत्रीं आले. त्या दिवसापासून सदावर्ते यांची पैवस्ती. त्यास, आठेगांवचे कुलकर्ण व जोशीक सदावर्ते यांसी वतन करून चंद्रराव मोरे यांनीं दिलें. चीजवस्त जामदारखान्यांत श्रीची ठेविली, व श्रीपुढें शिक्केकटार, शिक्का, मोर्तब, व रुमाल देवापुढें ठेविला. जामदारखान्यास किल्लीकुलूप करून किल्ली बाबजी कोळी याचा लेक कानोजी कोळी याचे हातीं दिली. जतन कर म्हणून सांगितलें. बिरवडकर याचे गुजारतीनें चीजवस्त ठेवून किल्ली कानोजी याजवळ दिली. ते समयीं कानोजी बोलिला कीं, "मंहाराज, मजला रोजमुरा काय देतां?" तेव्हां चंद्रराव यांनीं रोजमुरा रुपये ६० साठ केले व खंडीभर दाणे केले. त्यास ऐवज जोरची कृष्णेची आडी व भाताचा तळ हणमंतराव गोविंदराव यांनीं याप्रमाणें दिले, व बाळाजीराव यांनीं जावलीचे आडी दिली; आणि कानोजी कोळी यास बोलिले कीं आम्हांस चंदीस कांहीं जिन्नस पाठवावे लागतात. याजकरितां गुरव दोघेजण देणें. तेव्हां कानोजी कोळी यानें दोघे गुरव दिले. त्याजबरोबर जिन्नस चंदीस रवाना केला. हें वर्तमान शिवाजी महाराजांस कळलें. त्यांनीं चित्तांत आणिलें कीं, चंद्रराव कांहीं पैगम करितात. मग शिवाजी महाराज यांनीं शिताबी करून चंद्रराव धरून नेले. चंद्राई बुडविली. पारिपत्य केलें. मग शिवाजी महाराज भोरप्या डोंगरास आले. तेथें किल्ला बांधला. किल्ल्याचें नांव प्रतापगड ठेविलें. बंदोबस्त करून श्रीक्षेत्रास आले. श्रीकृष्णास्नान केलें. देवदर्शन केलें. कड्यावर श्रीकृष्णेचें

देऊळ बांधिलें. देवास इनाम गांव मौजे कातडें तर्फ महाड हीं गांवें दिलीं. त्यानंतर उपरांतिक आबदुल्लाखान प्रतापगडास आला. त्याचा मोड शिवाजी महाराज यांनीं केला. त्याचे डेऱ्याचे कळस पितळेचे. त्यास मुलामा सोन्याचा होता. ते तीन कळस श्रीदेवास शिवाजी महाराज यांनीं ते समयीं दिले आहेत. त्यानंतर पुढें दिल्लीहून श्रीमंत शाहू महाराज दक्षिणेस आले. साताऱ्यास येऊन मग श्रीक्षेत्रीं आले. श्रीकृष्णास्नान केलें. श्रीचें दर्शन घेतलें. ते समयीं श्रीजवळ वतनदार कोण कोण आहेत, त्यांची चौकशी केली. ते समयीं कानोजी कोळी याचा लेक सूर्याजी कोळी हात जोडून महाराजांपुढें उभा राहिला. त्यास चंद्रराव यांचे कारकीर्दीस जामदारखान्यास ऐवज होता, तो कोठें आहे, याची चौकशी केली. त्यानें सर्व वृत्तांत सांगितला. मग सूर्याजीस शाहू महाराज बोलिले कीं, "श्रीचे जामदारखान्यास ऐवज आहे, हा जतन करणें. जे समयीं सरकारांत चौकशी करूं ते समयीं हजीर करणें. प्रस्तुत श्रीचे जामदारखान्यास आहे, असाच असों देणें." ऐसें ह्मणोन त्याचे हवालीं किल्लीकुलूप केलें, आणि राजे गेले. त्याजवर गुरवांनीं सूर्याजी कोळी यास मारिला. ही बातमी विठ्ठल गोपाळ सुभेदार पारकर यांसी कळल्यावर, मग गुरव विठ्ठल गोपाळ यांनीं पारास नेले. तेव्हां महाराजांची आज्ञा जाली कीं, गुरव याजवळ खंड देऊं नये आणि मारूं नये. खोड्यांत घालून कुजवून मारावें. मग दादंभट पारास गुरवाकडे गेले. तेव्हां विठ्ठल गोपाळ बोलले कीं, गुरव यांजकडे जाण्यास कोणासही सरकारची आज्ञा नाहीं. मग दादाजी फार आर्जव करून गुरवांकडे गेले. तेव्हां गुरव रडूं लागले. तेव्हां गुरवांनीं गंगेजवळचे गणेशाची पूजा देऊं केली, व नवरात्राच्या माळा पांच पांच घरच्या देऊं केल्या. तेव्हां १४०० चवदासें रुपये लांच देऊन गुरव सोडून नेले. पुढें चिंतामण दीक्षित–दादा दीक्षितांचे वडील बंधू–रांगण्यास महाराजांकडे गेले. बरोबर गुरव जाईनात. मग भागानगरचा गुरव खंदार (थंदार ?) आडनांव, तो व बुरुड भागानगरकर या दोघांची........बरोबर आली. तेव्हां खंदार गुरव यांसी गुरवांनीं दहा दिवसांची पूजा श्रीची वतनदारी तुजला देऊं, परंतु तूं चिंतामण दीक्षित यांजबरोबर रांगण्यास तूं जाणें, ह्मणोन चिंतामण दीक्षितांबरोबर दिले. ते गेले. तेथें जाऊन पंत श्रीपतराव यांसी विनंति करून, श्रीगणेशाचे कागदपत्र सरकारचे करून चिंतामण दीक्षितांनीं घेतले. तेच समयीं महाराजांनीं बोरगांवची वाडी होती ती देवास इनाम करून दिली........"*

* * *

* ही महाबळेश्वरची जुनी माहिती रा. रा. शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी यांच्या संग्रहांतून मिळाली आहे. या उपर्युक्त माहितीचें इंग्रजी भाषांतर शेट पुरुषोत्तमदास यांनीं प्रसिद्ध केलें आहे.

# ३. बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांच्या स्त्रीचें नीतिधैर्य.

बाळाजी विश्वनाथ हे मोठे मुत्सद्दी, शूर आणि कर्तृत्वशाली पुरुष होते. त्यांनीं श्रीवर्धनाहून देशांत येऊन, आपल्या अंगच्या लोकोत्तर गुणांच्या योगानें मराठी राज्याची पेशवाई मिळविली. ह्यांची स्त्री राधाबाई. ही डुबेरकर अंताजी मल्हार बर्वे यांची मुलगी. ही आपल्या पतीप्रमाणेंच मोठी शहाणी व राजकारण-चतुर होती. हिच्या पोटीं बाजीराव व चिमाजी आप्पा ह्यांच्या सारखीं नररत्नें निर्माण झालीं. त्यावरून ह्या बाईची थोरवी निराळ्या शब्दांनीं वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. ती खरी भाग्यशालिनी वीरपत्नी व वीरमाता होती. ही बाई बाळाजी विश्वनाथाच्या पश्चात् सुमारें ३३।३४ वर्षें जिवंत होती. बाजीराव, चिमाजी आप्पा आणि बाळाजी बाजीराव ह्यांची ह्या बाईविषयीं फार आदरबुद्धि असून, ते तिच्या सल्लामसलतीनें वागत असत. बाजीराव व चिमाजी आप्पा ह्यांना ह्या बाईनें वारंवार उपदेश केलेलीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत. ह्या बाईचें नीतिधैर्यही मोठें प्रशंसनीय होतें. त्याचा मासला पुढें दिला आहे. ही बाई ता. २० मार्च इ. स. १७५३ रोजीं मृत्यु पावली. त्या वेळीं पेशव्यांनीं तिच्या उत्तर-कार्यास ८२६७ रुपये खर्च केला.

गोविंद हरी नामक पटवर्धनांपैकीं एक सुप्रसिद्ध सरदार पुणें येथें पेशव्यांच्या राजधानीमध्यें आपल्या सैन्यानिशीं येऊन राहिले होते व एक मोठें राजकारण चालू होतें. अशा प्रसंगीं त्यांच्या घरीं एक बटीक, महारीण जातीची निघाली. त्या वेळीं ब्राह्मणांच्या घरीं बटकी बाळगण्याचा प्रघात होता. अर्थात् ब्राह्मणांच्या घरीं महारीण जातीची बटीक राहिल्यामुळें नीचसंसर्ग घडला व जिकडे तिकडे मोठा गोंधळ उडाला. पुण्यांतील ब्राह्मणांनीं गोविंद हरी व त्यांच्याशीं संसर्ग झालेले सर्व ब्राह्मण ह्यांच्यावर बहिष्कार टाकिला; आणि सर्वत्र एकच दंगा माजविला. त्या वेळीं बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे हे शाहू महाराजांस भेटण्यासाठीं सातान्यास गेले होते. अर्थात् ही वेळ तर राजकारणाची व ब्राह्मणांनीं पुण्यास ग्रामण्य चालविण्याचा घाट घातलेला; आणि पेशवे तर तेथें नाहींत. त्या वेळीं ही शहाणी बाई पुढें झाली; व तिनें ब्राह्मणांस स्वतःच्या अधिकारानें दोन सुविचाराच्या गोष्टी सांगून, त्यांच्याकडून गोविंद हरी व इतर संसर्गी लोक ह्यांस प्रायश्चित्त देवविलें, आणि थोडक्यांत तंटा मिटविला. ह्या संबंधाची हकीकत तिनें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांस एका पत्रांत लिहिली आहे. हें पत्र उपलब्ध

झालें आहे. हें किती महत्त्वाचें आहे, हें निराळें सांगणें नकोच. हें येणेंप्रमाणें:—

छ १ रजब. श्री.

"चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यांसः—

प्रति राधाबाई आशीर्वाद उपरी येथील कुशल ता। आषाढ वद्य अमावास्या इंदुवार जाणोन स्वकीय लिहीत गेलें पाहिजे. विशेषः—राजश्री गोविंद हरी यांचे घरीं बटीक महारीण निघाली. त्याचें वृत्त काल राजश्री अंतोबांनीं तुह्मांस लेहून पाठविलें आहे. त्यावरून सविस्तर कळलेंच असेल. त्यांचे घरीं मुलामाणसांचा उपोषणानें आट जाला. त्यांणीं ब्राह्मणांस व पंडितांस बोलावूं पाठविल्यास जमा न होत. याकरितां आह्मी व राजश्री अंताजीपंत, राजश्री जिवाजीपंतांचे घरीं जाऊन, जितके ब्राह्मण थोर थोर पंडित व वैदिक जमा करून, बाळंभट यांस प्रायश्चित्त द्यावयाचा निश्चय केला. त्यामध्यें कित्येक ब्राह्मणांनीं अट केली कीं, प्रायश्चित्त द्यावयाची आज्ञा प्रभूची पाहिजे. त्यास आह्मी सर्व पंडितांस व ब्राह्मणांस आज्ञा केली कीं, तुह्मीं प्रायश्चित्त देणें. आह्मीं आज्ञा केली, तेच आज्ञा प्रभूची आहे. दुसरा अर्थ चित्तांत न आणणें. त्यावरून आजच प्रायश्चित्त दिलें. तेथील विचार पंडितराव यांस कळलियाउपरी, उपद्याप करून राजश्रीचे[1] कानावर घालून फंद फैलाव होईल. याकरितां अगोदर जो बंदोबस्त करणें तो केला पाहिजे. यासाठीं ताबडतोब हें पत्र लिहिलें आहे. तर राजश्रीचें कानावर घालणें. पंडितराव यांजकडील बंदोबस्त करणें तो तुह्मी करालच. सूचना लिहिली आहे. वरकड ब्राह्मणांची याद व प्रायश्चित्ताचा सिद्धांत आलाहिदा पत्रीं लिहिला आहे, त्यावरून कळेल. राजश्रीचे कानांवर घालावयाचा विचार तुमचे चित्तांत आला तर घालणें. राजश्रीचे व पंडितराव यांचे कानावर घातल्यानें अधिक चिकटेसें असिलें तर न घालणें. बहुत काय लिहिणें हा आशीर्वाद."

ह्या पत्रावरून पेशवाईतील एका अबलेचें नीतिधैर्य केवढें होतें, त्याची चांगली कल्पना करितां येईल; व सुमारें दीड शतकापूर्वी मराठ्यांची सामाजिक स्थिति कशी होती तें दिसून येईल.



१ राजश्री=शाहू महाराज.

## ४. परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांच्या लष्करांतील ग्रामण्य.

गोविंद हरी पटवर्धन ह्यांच्या उदाहरणाप्रमाणें, परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांच्या लष्करांतही एक अशाच प्रकारचें उदाहरण घडून आल्याचा दाखला सांपडतो. त्यांच्या लष्करामध्यें एक ब्राह्मण, चांभाराच्या बाईशीं अनुरक्त झाला, व ती बातमी चोहींकडे पसरली. त्यामुळें परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांस तुंगभद्रेच्या तीरीं कुरली गांवीं जाऊन प्रायश्चित्त घ्यावें लागलें, व तुलादान करावें लागलें. त्याची सविस्तर हकीकत त्यांच्या हाताखालील एका युरोपियन अधिकाऱ्यानें लिहून ठेविली आहे. ती फार मनोरंजक असल्यामुळें जशीच्या तशीच पुढें देतों:—

"An event of a curious nature happened a little before this time.—Purseram Bhow, who is a benevolent hospitable man, keeps always at his board a number of Brahmins, fifty perhaps or more. One of the young men fed by his bounty, looking on the charms of chummar's wife, forgot he was a Brahmin, and feeling himself no more than man, supplied the cobler's place beside his handsome spouse. This step, although in itself no more than morally imprudent, the parties had not sufficient caution to conceal, and it was first whispered about camp by the ready tongue of scandal: at length it became so notoriously known, that it could no longer be passed over. What a dilemma!—Happier, ten thonsand times, would it have been, had he put arsenic into their victuals, for then such only as had eaten of it would have felt the bad effects; whereas now, so quickly a contamination of this kind spreads, not only the whole mess, but all with whom the members had held intercourse were defiled; so that half the Brahminees and Brahmins in camp were unclean. Very fortunately the Toombudra was not far off, but it was doubted whether even that river was sufficiently sacred to cleanse them from their impurities. The Bhow, however, to be on the sure side, not only used the water, but weighed himself at Koorly, a sacred village at the confluence of the Toom and Budra, against gold and silver, which amounting to eight or ten thousand rupees, he distributed among the Brahmins. By these prudent measures the Bhow, it was thought, was not much the worse (in pocket excepted) from this untoward accident.

Although to the Brahmins this was a most distressing circumstance, the wags among the Musselmans, and the inferior castes of Hindoos, did not fail to make it a diverting incident, and very uncharitably seemed to enjoy the embarassing predicament of their superiors.

We were once informed (but do not, although we have no reason to doubt it, give the information as authentic.) that the Bhow, but for this unpleasant accident, would not have moved his army farther westward than the confines of the Chittledroog province, or to Changerry; but being himself, and so many of his sanctified brethern, in a state of abomination, he

knew that neither Hurry Pant, nor any of the Brahmins with the grand army, would hold conference with him or them, until made clean; and was necessitated therefore to proceed to the Toombudra, as the nearest river capable of affording them the necessary purification. Being arrived at the river, and so near Hooly Honor, a fort in the enemy's hands, he found no time would be lost, if our detachment were employed in reducing it, while he made preparations for the important ceremonies of washing and weighing. Encouraged by the fall of this fort, he was induced, there being still a short time before the plan of co-operation with General Abercromby's army could commence, to attempt the reduction of Simoga, and its preparatory steps as already detailed.

"His brilliant successes, and the broken state of the enemy's forces in that quarter," says Major Dirom, "induced him to think of another enterprize, that promised still greater advantage to himself, which he had the imprudence to undertake at the risk of the general success of the war; and, instead of proceeding to join the Bombay army, according to the plan agreed upon, he marched in a contrary direction towards Bednore."

Now if it really was the case, that Bhow's movement to the westward, toward the Bednore country, was caused by his uncleanliness, we shall have seen a fine country overrun and ruined, forts stormed, armies defeated, enterprize undertaken, in which were involved the eventual successes of the war, consequently the British interests in the East, and all—("what great effects arise from little things!")—because—a Brahmin kissed a cobler's wife!" —*Moor's Narrative Page 166-168.*

❧ ❧ ❧

## ५ राघोबा दादा पेशव्यांचा शेवटचा करार.

राघोबा दादा पेशवे ह्यांनीं, नाना फडणविसांस जें शेवटचें करारपत्र लिहून दिलें आहे, तें उपलब्ध झालें आहे. ह्या पत्रामध्यें कपटभाव सर्व सोडून देऊन सरळपणानें चालण्याबद्दलचा ठराव आहे. हें पत्र येणेंप्रमाणें.

हरः विजयते. ता. १९ जुलई इ. स. १७८३.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन यांसः—

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें. विशेषः— आज ता॥ मागील कितेक गोष्टींविसीं आमचे चित्तांत विरुद्ध होतें; परंतु आजपासून निखालसता जाहाली. तुह्मांविसीं मनांत आजपर्यंत आशंका होत्या. त्या सोडिल्या. पुढें तुह्मीं आह्मांसी सरलतेनें चालावें. कपट धरूं नये. आह्मीही तुह्मांवर निःकपटेंकरून कृपा करूं. येविसीं श्रीसांबाची शपथ असे. जाणीजे. छ १८ साबान सु॥ आर्बा समानीन मया अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति."

❧ ❧ ❧

## ६. कोंकण व नागलोक.

१

नागानन्दनामक श्रीहर्षकृतित्वानें प्रसिद्ध असलेल्या नाटकांत खालील उल्लेख आहे. हिमालयाकडे राज्य करणाऱ्या जीमूतकेतुनामक विद्याधराचा पुत्र जीमूतवाहन हा मलयपर्वतांतील गोकर्णक्षेत्राजवळ *शंखपालकुलोत्पन्न शंखचूडनामक नागाचे प्राण वांचविण्याकरितां सिद्ध झाला. गोकर्णक्षेत्र व मलयपर्वत पातालांत किंवा पातालाशेजारीं पश्चिमसमुद्राजवळ होते. पातालांत नागलोक रहात.

तदापाते च पातालं त्रासनिर्जीवराजिलं ।
कृत्स्नमेकपदे नष्टं नागलोकममन्यत ॥

(कथासरित्सागर, तरंग बावीस)

रसातलांतहि नागलोक रहात.

विसृष्टस्तेन च ययौ शंखचूडो रसातलं ।

(कथासरित्सागर, तरंग बावीस)

सारांश, गोकर्ण व मलयपर्वत, पातालांत किंवा रसातलांत अथवा पातालाशेजारीं किंवा रसातलाशेजारीं होता, अशी समजूत नागानंदनाटकरचनाकालीं व कथासरित्सागररचनाकालीं होती. श्रीहर्ष शकसंवताच्या सहाव्या शतकांत (शक ५३०) हयात होता. पातालांत किंवा रसातलांत पुरातनकालीं नागलोक रहात असत, अशीहि समजूत त्या कालीं होती.

२

नागानंदाच्या पांचव्या अंकांत नायकाच्या तोंडीं खालील भाषण घातलेलें रा. भानपांच्या आवृत्तींत टीपेंत दिलेलें आहेः—

नायकः—फणिपते शंखचूड किमेवमाविग्नोसि किमु । स्थानमिदमागमनस्य ।
स्वशरीरेण शरीरं तार्क्ष्यात्परिरक्षितं त्वदीयमिदम् ।
नेतुं युक्तं भवता पातालतलादपि तलं तत् ॥ १९ ॥

अर्थः—शंखचूडा! असा घाबरलास कां? येथें ह्या जागीं परत कां यावयाचें? गरुडापासून तुला मीं राखलें. तर, आतां त्वां पातालतलांतून तलांत निघून जावें, हेंच इष्ट आहे.

* नागानंद, अंक चौथा, पृष्ठ ६४, भानप.

ह्या भाषणावरून असें दिसतें कीं, पातालाजवळच तल ह्मणून एक प्रांत पुरातनकालीं होता, असें श्रीहर्षाला माहीत होतें. ह्मणजे, मलयपर्वत, गोकर्ण, पाताल व तल इतके भूभाग एकमेकांच्या सन्निध होते.

३

नागलोकाचा राजा वासुकि ह्याची राजधानी भोगवती होती, हें कांहीं अक्षरशः सिद्ध करावयाला नको. पुराणांतून व भारतांतून तत्संबंधी अनेक उल्लेख आहेत. येथें इतकेंच पहावयाचें आहे कीं, ही भोगवती नगरी कोठें होती, कोणत्या दिशेस होती, व कोणत्या देशांत होती. उद्योगपर्वाच्या एकशेंनवव्या अध्यायांत तक्षक व ऐरावत या नागांनीं रक्षिलेली आणि वासुकि नागानें पाळिलेली भोगवती नगरी ब्रह्मावर्त्ताच्या दूर दक्षिणेस असलेली वर्णिलेली आहे. ह्या भोगवतीनगरीच्या दिशेनेंच रावणाचें राज्य असलेलें सांगितलें आहे. ह्मणजे भोगवती, पाताल, तल, गोकर्ण, व मलय हे भूप्रदेश पश्चिमसमुद्रालगत दक्षिण दिशेला होते, हें उघड आहे.

अत्र (दक्षिणदिशि) भोगवती नाम पुरी वासुकिपालिता
तक्षकेण च नागेन तथैवैरावतेन च ॥ १९|२० ॥

( उद्योगपर्व १०९ अध्याय )

४

विष्णुपुराणाच्या द्वितीयांशाच्या तिसऱ्या अध्यायांत खालील श्लोक आहेतः—

भारतस्यास्य वर्षस्य नव भेदान्निशामय ।
इंद्रद्वीपः कशेरूमांस्ताम्रपर्णो गभस्तिमान् ॥ ६ ॥
नागद्वीपस्तथा सौम्यो गांधर्वस्त्वथ वारुणः ।
अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः ॥ ७ ॥

ह्मणजे, नागद्वीप व वारुणद्वीप हे भारतवर्षाच्या नऊ विभागांपैकीं दोन होते. पैकीं नागद्वीप अथवा नागलोक ब्रह्मावर्त्ताच्या दूर दक्षिणेस होता, हें वर दाखविलेंच आहे. वारुणद्वीप कोठें होतें, तें आतां पहावयाचें आहे.

५

उद्योगपर्वाच्या एकशेंदहाव्या अध्यायांत वरुणाचें वारुणद्वीप (ब्रह्मावर्त्ताच्या) पश्चिमदिशेस होतें, असें वर्णन आहे.

इयं (पश्चिमा) दिग्दयिता राज्ञो वरुणस्य तु गोपतेः ॥ १ ॥
यादसामत्र राज्येन सलिलस्य च गुप्तये ।
कश्यपो भगवान्देवो वरुणं स्माभ्यषेचयत् ॥ ३ ॥

६

उद्योगपर्वाच्या अठ्याणवाव्या अध्यायांत नारदानें मातलीला वारुण्यनगरींतून व वारुण्यद्वीपांतून नागलोकांत नेल्याचा वृत्तान्त आहे.

**वरुणेनाभ्यनुज्ञातौ नागलोकं विचेरतुः ॥ ८ ॥**

ह्मणजे, वारुण्यद्वीपालाच लागून नागद्वीप अथवा नागलोक होता. वारुण्यद्वीपाला व नागलोकाला प्रवासास निघण्यापूर्वी मातली

**कन्यां शिरस्युपाघ्राय प्रविवेश महीतलं ॥ २१ ॥**

(उद्योगपर्व, ९७ अध्याय.)

**अहं ते सर्वमाख्यास्ये दर्शयन्वसुधातलं ॥ ५ ॥**

(उद्योगपर्व, ९८ अध्याय.)

ह्याचें तात्पर्य एवढेंच कीं, वारुण्य व नाग हे दोन्ही लोक, महीतल अथवा वसुधातलनामक भारतवर्षाच्या भागांत पुरातनकालीं मोडत असत. वरुणलोक नागलोकाच्या उत्तरेस लागून असे, आणि नागलोक वरुणलोकाच्या दक्षिणेस लागून असे. दोन्ही देशांना पश्चिमसमुद्राची मर्यादा असे.

**अत्र राक्षसजात्यश्च दैत्यजात्यश्च मातले ।**
**दिव्यप्रहरणाश्चासन्पूर्वदैवतनिर्मिताः ॥ १७ ॥**
**अशास्यानपि शास्त्येष रक्षोबंधुषु राजसु ॥ २१ ॥**

(उद्योगपर्व, ९८ अध्याय)

ह्मणजे, वर्तमानकालीन सिंधकाठेवाडपासून गोकर्णमलयगिरीपर्यंतचा पश्चिमसमुद्राकडील जो मुलूख, त्याला महीतल अशी महाभारतरचनाकालापूर्वी फार पुरातनकालीं संज्ञा असे. मातलिवरान्वेषणपर्व पुरातनेतिहास ह्मणून उद्योगपर्वांत भारतकारांनीं आणिलेलें आहे. भारतरचनाकालीं पश्चिमसमुद्राकडील प्रदेशाला अपरान्त, अपरान्तक अशी संज्ञा असे.

**सोपरान्तेषु तीर्थानि पुण्यान्यायतनानि च ।**
**सर्वाण्येवानुपूर्व्येण जगामामितविक्रमः ॥ १ ॥**

(आदिपर्व, २१८ अध्याय.)

७

मातलि, महीपृष्ठावरून ह्मणजे अरावली व विंध्य पर्वताच्या वरघाटावरून महीतलांत उतरल्यावर, प्रथम तो वरुण देशांत गेला (उद्योगपर्व, ९८ अध्याय). नंतर नागलोकांतील पाताल प्रांतांतील पातालनगरीस आला (उद्योगपर्व, ९९

अध्याय ). तेथून दैत्यांच्या हिरण्यपुरास पोहोंचला ( उद्योगपर्व, १०० अध्याय ). पुढें सुपर्ण लोकास थडकला ( उद्योगपर्व, १०१ अध्याय ). तेथेंहि मनाजोगता जांवई न मिळाल्यामुळें, त्यानें रसातलांत प्रवेश केला ( उद्योगपर्व, १०२ अध्याय ). ह्या रसातलाविषयीं पुराणगाथा ह्मणून भारतांत ( उद्योगपर्व, १०२ अध्याय ) खालील अनुष्टुभ् दिला आहे.

न नागलोके न स्वर्गे न विमाने त्रिविष्टपे ।
परिवासः सुखस्तादृक् रसातलतले यथा ॥ १५ ॥

रसातलाची राजधानी जी भोगवती नगरी तेथील चिकुरनामक नागाचा सुमुखनामक नाग मातलीला पसंत पडला. तात्पर्य, भोगवती नगरी रसातलाची राजधानी. रसातल महीतलाचा एक भाग. महीतल ह्मणजे पर्वतांच्या वरील जो पृष्ठभाग त्याच्याहून खोल असा पश्चिमसमुद्राच्या कांठचा प्रदेश. ह्याच प्रदेशाला किंवा प्रदेशाच्या कांही भागाला पुढें अपरान्तक असें नाव पडलें. तें टॉलेमीला 'आरिआके' या प्राकृत अपभ्रष्ट नांवानें माहीत होतें. अपरान्त ह्मणजे अपरसमुद्राच्या कांठचा अन्त ह्मणजे प्रांत. अन्तः प्रांतान्तिकेषु च. अपरसमुद्र ह्मणजे पश्चिमसमुद्र. पूर्वसमुद्राच्या उलट अपरसमुद्र. अपरसमुद्राच्या कांठी पुष्कळ प्रांत असत. सबब, अपरान्तेषु असा अनेकवचनी प्रयोग बाहुल्यानें आढळतो.

८

रसातलांत नागांचीं नाना कुळें असत. पैकी कांहीं प्रमुख कुलांचा निर्देश उद्योगपर्वाच्या एकशेतिसऱ्या १०३ अध्यायांत येणेप्रमाणें केला आहेः—

वासुकिस्तक्षकश्चैव कर्कोटकधनंजयौ ।
कालियो नहुषश्चैव कंबलाश्वतरावुभौ ॥ ९ ॥
बाह्यकुंडो मणिर्नागस्तथैवापूरणः खगः ।
वामनश्चैलपत्रश्च कुकुरः कुकुणस्तथा ॥ १० ॥
आर्यको नंदकश्चैव तथा कलशपोतकौ ।
कैलासकः पिंजरको नागश्चैरावतस्तथा ॥ ११ ॥
सुमनोमुखो दधिमुखः शंखो नंदोपनन्दकौ ।
आप्तः कोटरकश्चैव शिखी निष्ठूरिकस्तथा ॥ १२ ॥
तित्तिरिर्हस्तिभद्रश्च कुमुदो माल्यपिंडकः
द्वौ पद्मौ पुंडरीकश्च पुष्पो मुद्गरपर्णकः ॥ १३ ॥

करवीरः पीठरकः संवृत्तो वृत्त एव च ।
पिंडारो बिल्वपत्रश्च मूषिकादः शिरीषकः ॥ १४ ॥
दिलीपः शंखशीर्षश्च ज्योतिष्कोऽथापराजितः ।
कौरव्यो धृतराष्ट्रश्च कुहुरः कृशकस्तथा ॥ १५ ॥
विरजा धारणश्चैव सुबाहुर्मुखरो जयः ।
बधिरान्धौ विशुंडिश्च विरसः सुरसस्तथा ॥ १६ ॥
एते चान्ये च बहवः कश्यपस्यात्मजाः स्मृताः ।

ह्या सर्वांचा वंश एक ( उद्योगपर्व, १०३ अध्याय, श्लोक ८ ). पैकीं एका कुलाचें नांव विचार करण्यासारखें आहे. उपरिक्षिप्त श्लोकांतील दशमांकक श्लोकांत कुकुण ह्मणून एका नागकुलाचें नांव आलें आहे. संस्कृतांत कुंकण, कौंकण व मराठींत कोकण, कोँकण ह्मणून जो शब्द आहे, तो ह्या कुकुणनामक नागकुलाच्या नांवावरून प्रचलित झालेला दिसतो. भाग्तांत पुराणेतिहासकथा सांगतांना ह्या कुकुणनामक नागकुलाचा उल्लेख झाला आहे. पांडवांच्या नंतर ह्या कुकुणकुलानें अशी कांहीं तरी जबरदस्त व चिरस्मरणीय कामगिरी केलेली असावी कीं, अपरान्त ह्मणून ज्याला पुढें नामाभिधान मिळालें, त्यालाच कुकुणदेश, कोकण, कोँकण, हेंहि नांव लोकांत रूढ झालें. तें इतकें कीं, आतां महीतल, पाताल, रसातल, अपरान्त, हीं नांवें अजीबात लुप्त होऊन, कोँकण हें एकच नांव पृथ्वीतलावर गाजत आहे. ह्या नांवाचा उल्लेख आज सुमारें पंधराशें वर्षें संस्कृत काव्यांतून, पुराणांतून, शिलालेखांतून व ताम्रपटांतून येत असलेला आढळतो. कित्येक मुसलमान प्रवाशांनींहि कोँकणठाणें ह्या समासांत ह्या नांवाचा उल्लेख केलेला आहे.

९

येर्णप्रमाणें ज्याला पुरातनकालीं महीतल ह्मणत, त्या प्रदेशांत नागलोक होता. ह्या नागलोकाचे पश्चिमसमुद्राकडील जे भाग, त्यांना तल, अतल, पाताल, रसातल, वगैरे तलान्तक नांवें पुरातनकालीं होतीं. कांहीं काल ह्या पश्चिमसमुद्राकडील प्रांताला अपरान्त ही संज्ञा असे. पुढें त्याच प्रदेशाला कोंकण ह्या नांवानें लोक ओळखूं लागले. कोंकण हें नांव त्या प्रदेशांत रहाणाऱ्या नागांच्या एका पराक्रमी कुळाच्या नांवावरून पडलें आहे. त्या कुळानें पराक्रम काय केला व केव्हां केला, हें माहीत नाहीं: परंतु अनुमेय आहे. इंद्राचा सारथि जो मातलि त्याचा शरीरसंबंध नागांशीं होत असे.

१०

कश्यपाला विनता व कद्रू ह्यांच्यापासून गरुड व नाग झाले, अशी भारतांत आस्तीकपर्वांत कथा आहे. तेव्हां गरुड व नाग हे बंधु. गरुड ऊर्फ सुपर्ण यांची जात कोण, तें उद्योगपर्वाच्या एकशेंएकाव्या अध्यायांत सांगितलें आहेः—

**कर्मणा क्षत्रियाश्चैते ( सुपर्णा ) निर्घृणा भोगिभोजिनः ॥**
**ज्ञातिसंक्षयकर्तृत्वाद् ब्राह्मण्यं न लभंति वै ॥ ६ ॥**

यद्यपि सुपर्णाची मूलोत्पत्ति मातृपितृद्वारा ब्राह्मणद्वारा होती, तत्रापि क्रूरकर्मे पडल्यामुळें, त्यांची गणना क्षत्रियांत होत असे. प्रायः नागांचीहि क्षत्रियजातच समजली जाई. नागांच्या पातालांत गोव्रत नामें ब्रह्मर्षि रहात असत. त्यांचे-च वंशज प्रस्तुतचे गोवर्धनब्राह्मण तर नसतील? हे गोवर्धनब्राह्मण पाल, नागोठणें, नागांव, तळें, वगैरे प्रदेशांत अद्यापहि आढळतात. जरत्कारु ब्राह्मणानें वासुकिनागाची बहीण वरिल्याचें आस्तीकपर्वांत लिहिलें आहे. ब्राह्मण नागांचें अन्न घेत. हरिवंशांत नागपुरस्थ एका नागाच्या येथें पाहुणा गेलेल्या ब्राह्मणाची कथा पहावी.

११

कोँकणांतील व देशांतील कांहीं मराठे लोकांचीं आडनांवें चिंतनीय आहेत. आठव्या कलमांत उद्योगपर्वांत जी याद दिली आहे, तींतून संस्कृत नांवें महाराष्ट्रीं-तून मराठींत कशीं उतरली आहेत, तें पहाण्यासारखें आहे.

| | संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|---|
| (१) | वासुकि | वासुइ | वासे, भासे |
| (२) | तक्षक | तखअ | तखे, तिखे |
| (३) | कर्कोटक | कक्कोडअ | कोकटे, गोकटे |
| (४) | कालीय | कालीअ | काळिये, काळ्ये, काळे |
| (५) | वामन | बामण | बामणे |
| (६) | कुकुर | | कोकरे |
| (७) | कुकुण | | कोंकणे |
| (८) | नंदक | णंदअ | नंदे, णंदे |
| (९) | कलश | कलस | कळशे |
| (१०) | पोतक | पोतअ | पोते |

| | | |
|---|---|---|
| (११) पिंजरक | पंजरअ | पिंजरे |
| (१२) नाग | नाग | नाग |
| (१३) शंख | संख | संक |
| (१४) कोटरक | कोट्टरअ | कुटरे |
| (१५) निष्टूरिक | निट्टूरिअ | निचुरे |
| (१६) तित्तिरि | | तितरे |
| (१७) मुद्गर | मोग्गर | मोगरे |
| (१८) करवीरक | करवीअअ | करवे |
| (१९) पीठरक | | पिठरे |
| (२०) दिलीप | | दुळीप, धुळप |
| (२१) शिरीषक | शिरीखअ | शिर्खे, शिर्के |
| (२२) शंखपाल (नागानंदनाटक) | | संकपाल |
| (२३) विरजा | | बिरजे |

ह्मणजे ह्या आडनांवांचे कोंकणांतील कित्येक मराठे नागवंशी आहेत, असें विधान करण्याकडे प्रवृत्ति होते.

१२

राजतरंगिणींत काश्मीरांत पुरातनकालीं नागांचें राज्य होतें, असे विस्तृत उल्लेख आहेत. भारतांतील आस्तीकपर्व येथूनतेथून सर्व नागासंबंधीच आहे. खांडवप्रस्थाच्या व यमुनेच्या दक्षिणेस असलेल्या खांडववनांत नाग असल्याचें लिहिलें आहे. हरिवंशांत नागपुराम नागांची वस्ती असल्याचा निर्देश केलेला आहे. तेव्हां, पुरातनकालीं, पांडवांच्या वेळेस व पांडवांच्या नंतर भारतवर्षाच्या बऱ्याच भागांत नागांची वस्ती होती, ह्यांत संशय नाहीं. सर्पसत्राच्या वर्णनावरून असें विधान करतां येतें कीं, मानवांचें व नागांचें कांहीं काळ घोरंदर युद्ध झालें. अर्जुनाचें उलूपीशीं लग्न लागलें, त्या अर्थी कित्येक नाग मानवांचे मित्र होते, असेंहि ह्मणण्यास अवकाश सांपडतो. तात्पर्य, कोंकणाखेरीज भारतवर्षाच्या इतरहि भागांत नागांची वस्ती होती. परंतु, त्यांचा मूळ रहाण्याचा प्रदेश नागलोक ऊर्फ महीतल ऊर्फ अपरान्त ऊर्फ कोंकण होतें, व तेथून ते चोहोंकडे पसरत चालले असतां, मानवांची व त्यांची गांठ पडली.

१३

गुप्तांच्या लेखांत नागांचा उल्लेख येतो. येलबुर्ग्याचे सिंद नागवंशी होते. सेंद्रक व अलूप हेहि नागवंशी असावे.

१४

मराठ्यांच्या शहाण्णवकुळींत प्रस्तुतकाळीं शिंदे, नागवे, वणवे, तळेकर, फणिवर, विराळे इत्यादि आडनांवें धारण करणारे मराठे शेषवंशी ऊर्फ नागवंशी गणलेले आढळतात.

नागपति= नागवइ =नागवी= नागवे
पर्णपति= वण्णवइ =वणवी= वणवे
तलकर= = = तळेकर (तल प्रांतांत रहाणारे).
फणिवर= = = फणिवर

अशा परंपरेनें मराठींतहि नांवें आलेलीं आहेत. कोंकणांतील व वरघांटावरील कित्येक मराठ्यांचीं आडनांवें शेषवंशी असल्याचा उलगडा अकराव्या कलमांत केलेलाच आहे. तेव्हां, मराठ्यांच्या कित्येक मराठ्यांच्या अंगांत पुरातन क्षत्रिय जे नाग, त्यांचे शुद्ध रक्त खेळत आहे, हे इतिहासपरंपरेनें सिद्ध आहे.

वि. का. राजवाडे.



**लेखांक ११३.** ता. ८ आक्टोबर इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. आश्विन शु॥ १३ शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा. चंद्र ११ जिल्कादपर्यंत स्वांमींच्या कृपावलोकनें-करून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असो. विशेषः—स्वामींनीं कृपा करून चंद्र २१ सवालचीं आज्ञापत्रें डाकेबरोबर रवाना केलीं, तीं चंद्र १ जिल्कादीं तृतीय प्रहरीं येथें पावलीं. लग्नपट्टीच्या दो लक्षांपैकी एक लक्ष तीस हजारांच्या हुंड्या करून पेशजीं सावकाराकडेस पाठविल्या, व मागाहून बाईनीं आम्हांस न कळत पंचेचाळीस हजारांच्या हुंड्या पाठविल्या, त्याही पावल्या असतील. बाकी पंचवीस हजार रुपये राहिले, ते त्याचा मजकूर बाईनीं सिरोंजचा मजकूर सरकारांत लिहिला आहे. त्यावरून तेथेंच रुपये त्यांजवळून श्रीमंत घेतील, ह्मणून येथें रुपये देत नाहींत. यावर सरकारची आज्ञा जशी येईल ऐवजाविषयीं, तशी वर्तणूक करूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

**लेखांक ११४.** ता. २१ आक्टोबर इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. आश्विन व॥ ११ शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ जिल्कादपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनें-करून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबराबर व कासिदांबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रत अधिकोत्तर पैकी, आनंदीबाई निंबाळकरीण—राजश्री पाटीलबावांची बहीण—त्यांस भेटावयास गेली. ती याच मार्गें आली. येथें चंद्र १६ रोज इंदुवारीं सहा घटका दिवस, प्रथम प्रहरीं, रेवा दक्षिणतीरास आली. पुढें रात्रीं बाईस सूचना आलीच होती. यांनींही दोन तीन नावा पार पाठविल्या होत्या. त्यांजवर आटाळा उतरून तृतीय प्रहरीं आनंदीबाई उतरून उत्तरतीरास आली. अहल्याबाईनींही बाहेर एक डेरा व दोन तीन राहोट्या व चांदणी व कनाता देऊन आंबराईत महेश्वराच्या पश्चिमेस स्थळ करून ठेविलें होतें; व सरंजामही दाणा, घांस, लकडी व दोनशां मनुष्यांचा शिधा ऐसा तेथें पाठविलाच होता. ते दिवशीं उभयतां बायांच्या भेटी व्हाव्या, परंतु ते दिवशीं एकवीस घटकांनंतर व्यतिपात होता, तो दुसरें दिवशीं एकवीस घटकांपर्यंत होता. यास्तव, दुसरे दिवशीं एकवीस घटकांनंतर भेटी व्हाव्या असा निश्चय ठरला. सोमवारीं पन्नास मनुष्यांचा स्वयंपाक कांहीं पक्वान्नें

व दोन तीन प्रकारचे भात व शाकभाजा वगैरे करून, मनुष्यांजवळ भांडींच देऊन, समागमें कारकून देऊन आनंदीबाईकडे रात्रीं पोंहचविलें. त्याजबरोबर सरंजाम हत्ती दोन व स्वार दोनशें, पायदळ शंभर याप्रमाणें होता. दुसरे दिवशीं प्रहर दिवस राहतां, येथून बाईनीं आपली नात सौभाग्यवती रमाबाई व नातसून सौभाग्यवती बाळाबाई, उभयतांबरोबर स्वार प्यादे व ताशेमरफे गाडदी देऊन, त्या बाईस बोलावूं पाठविलें. तीही तयारच होती. ती बाईही आपल्या सरंजामांनिशीं आली. पुढें बाईस बातमी आली कीं, शेंदीडशें स्वार व शेंदीडशें मनुष्यानिशीं येतात. वाड्यांत दाटी होईल ह्मणून बाईनीं पुढें सांगून पाठविलें. त्यावरून राऊत वगैरे दरवाज्याजवळ ठेऊन, थोडक्या सरंजामानिशीं गडावर वाड्यांत आली. तोंवर आह्मीही बाईजवळच होतों. •ती वाड्यांत आल्यावर मुत्सद्दीमंडळी व शागीर्दपेशास दूर केलें; व मुत्सद्यांस सांगितलें जें, तुह्मी पलीकडे थोरल्या सदरेंत जाऊन बसा. बाईनीं आपल्याकडीलही शेंदीडशें खासे खासे मराठे मातबर सदरेंत बोलाविले होते. बाईचे भाऊ महादजी पाटील व जांवई यशवंतराव फणशे व घोंडिबा नातू हे सारे इकडे बसले होते. तिकडे बाईकडे हरकूबाई व सौभाग्यवती मुक्ताबाई व लांबहाते वगैरे मराठ्यांच्या बायका चाळीस पन्नास होत्या. आनंदीबाई आली, तेव्हां पुढें मुक्ताबाई व दोघी चौघी बायका पुढें जाऊन भेटून, हातीं धरून आणिली. जवळ आल्यावर आधीं हरकूबाई भेटली. तदोत्तर बाई भेटली. बिछान्यावर हीं सर्व बसलीं. बाई आपल्या पांढऱ्या घोंगड्याच्या आसनगादीवर बसली. आगतस्वागत भाषणें जालीं. आनंदीबाई नणंद व अहल्याबाई भावजय असें यांचें नातें. त्या अन्वयें हर्ष-विनोदांचीं भाषणें जालीं. इकडे आनंदीबाईबरोबर भले लोक व कारकून मंडळी आली. त्यांच्या व या सदरच्या लोकांच्या भेटी जाल्या. तदोत्तर हे नवे लोक बाईच्या मुजऱ्यास गेले. महादजी पाटील व फणशे व विनायक बाजी हेही गेले. संध्याकाळपर्यंत बसली होती. आनंदीबाईनीं अहल्याबाईस वस्त्रें आणिलीं होतीं. ते दिवशीं तों बाईनीं घेतलीं नाहींत. दुसरे दिवशीं जेवावयास राहविली. ते दिवशीं संध्याकाळीं निरोप घेऊन बिराडास गेली. दुसरे दिवशीं वाड्यांत हजार मनुष्यांचा स्वयंपाक करविला. त्यांजकडील पांचशें माणूस व यांजकडील चारशें माणूस, कांहीं बायका, अशीं तृतीय प्रहरीं भोजनें जालीं. आनंदीबाई या स्वयंपाकांत जेवली, व अहल्याबाई नित्यकृत ब्राह्मणांच्या स्वयंपाकांत जेवली. त्यावर चार घटकांपर्यंत उभयतां बायांचा एकांत जाला. चार घटका दिवस राहतां

बंगल्यांत येऊन बसली. त्यांजकडील व आपल्याकडील लोक बोलाविले. आधीं आनंदीबाईनीं बाईस व हरकूबाईस व मुक्ताबाईस वस्त्रें दिलीं. बाईस पैठणी पातळ पदराचें शुभ्र व चोळी दिली. तसेंच हरकूबाईसही दिलें. मुक्ताबाईस पैठणी लुगडें, चोळी दिली; व बाईचा भाऊ व जांवई व नातू यांस शेलेपागोटीं दिलीं. त्यावर आनंदीबाईस वस्त्रें अहल्याबाईनीं दिली. शुभ्र सोवळें पदराचें दोन अडीचशें रुपयांचें किंमतीचें व चोळी व पांढरी शालजोडी असें आनंदीबाईस दिलें, व त्यांची मावस बहिणीस पैठणी लुगडेंचोळी, व आनंदीबाईच्या लेकीच्या लेकी दोघी लहानाल्या त्यांस बुराणपुरी पोशाख दिले. कारकूनमंडळी सात आठ असामींस व पंचवीस भले लोकांस शेलेपागोटीं दिलीं. बहुमानें सर्व लोकांशीं बोलली, व अंतःकरणपूर्वक आनंदीबाईशीं बोलून बिदा केली. दुसरे दिवशीं त्यांचें कूच जालें. परंतु आनंदीबाई सडी राजश्री विसाजी शामराज यांचे येथें व देवजी लांबहाते व गंगाभारती गोसावी इतक्यांच्या, हरकूबाईच्या घरांस गेली. इतक्यांनींही वस्त्रें देऊन बिदा केली. बोलवा आहे कीं, आनंदीबाईस नवाबांनीं तीन लक्षांची जहागीर देऊन पाटीलबावांकडे कांहीं अंतस्थ राजकारणास पाठविली आहे. आनंदीबाईचें बोलणें कीं, पाटीलबावांची भेट घेऊन काशीस जावें. परंतु अंतस्थ राजकारण नवाबाकडून पाटीलबावांकडे घेऊन जातात. हें सांगणारांनीं तथ्य सांगितलें आहे. वेगळी पुरवणी सेवेसीं लिहिली आहे. त्यावरून श्रुत होईल हे विज्ञापना."

---

**लेखांक ११५.** ता. २३ नोव्हेंबर इ. स. १७८३.
**श्रीगजानन.** मि. कार्तिक व॥ १४ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. सरकारचें आज्ञापत्र चंद्र २७ जिलकादचें सेवका हुजूर येण्याविषयीं आलें. आज्ञे-प्रमाणें येतों. परंतु येथें सहाशें रुपये लोकांचें देणें. त्यांची निकड. कर्ज दिल्याशिवाय सावकार कसें येऊं देतील? पेशजींही देण्याविषयीं विनंति लिहिली आहे. येथें तों कांहीं इलाज नाहीं. धनी कृपाळू समर्थ. दहा अकरा महिने जाले, वरात आली होती. ती सावकारास देऊन बाकी दीडशें रुपये सावकाराचे राहिले, व आज अकरा महिने खर्च जाला. गवत देखील विकत! या दरबारचा आसरा असा आहे! असो, आपलें दैव! कृपा करून येथील देण्यापासून मुक्त करणार स्वामी कृपाळू समर्थ. लमपट्टीचे पंचवीस हजार बाकी राहिले आहेत. त्यांपैकीं एकूणवीसांची वरात सरकारी बाईवर आली आहे कीं, केसो सि-

काजीस देणें. त्यांपैकीं सरकारच्या धोतरजोड्यांचे देण्याविषयीं पांचशें रुपये आह्मीं तसलमातीस मागितले. त्यास बाई बोलली कीं "पंचवीस हजार रुपये सुरंजचे घेणें. तें त्यांनीं सुरंजेचा ऐवज त्यांनीं तुकोजीबावांनीं तिकडे नेला. आतां पंचवीस हजार आह्मीं कोठले द्यावे? सरकारांत व तुकोजीबावांस आह्मींही लिहिलें, परंतु ऐवजाविषयीं कांहींच त्यांनीं उत्तर पाठविलें नाहीं. ऐवज तों महालचा ते घेऊन जातात. पुढें तुह्मी लमपट्टीपैकीं पंचवीस हजार आह्मांस मागाल. त्यास आह्मी दोन चार वेळां तुह्मांस सांगितलें आहे. तुह्मी आपल्या धन्यास लिहून पाठवा. सुरंजेचा ऐवज लमपट्टीपैकीं पंचवीस हजार ते आह्मांकडे देत नाहींत. पंचवीस हजारपैकी श्रीमंतांनीं आह्मांवर एखादी वरात केली, तर आह्मी देणार नाहीं. धोतरजोडेसाठीं पांचशें रुपये मागतां, तेवढे यात्रा करून आल्यावर देऊं. पुढें देणार नाहीं." असें बाईनीं साफ सांगितलें. मेवेसी श्रुत होय. सेवकाचा येथून देण्याचा निकाल होय असें करणार स्वामी कृपाळू समर्थ. तेथें कोणी माझेविषयीं विनंति करील, अगर माझें गरिबाचें तापत्रय सांगेल असें कोण आहे? व ऋणानें दारिद्र्यानें फार श्रमलों! मायबाप धनी कृपाळू समर्थ. कोणी माझी विनंति करायास नाहीं. स्वामी सर्वज्ञ हे विज्ञप्ति. धोतरजोडे चार पाठविले आहेत. हे सेवेसीं डांकेबरोबर पावतील. डांकेबरोबर रवाना केले आहेत. श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ११६. ता. ८ दिसेंबर इ. स. १७८३.

पै॥ छ २१ मोहरम सन अर्बा समानीन. **श्रीगजानन.** मि. मार्गशीर्ष शु. १५ शके १८०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १३ मोहरमपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम उज्जन येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—सरकारचें आज्ञापत्र हुजूर येण्याविषयीं आलें. ते समयीं बाई श्रीओंकारेश्वराच्या यात्रेस निघाली. यात्रा करून येतां एक महिना लागला. रामपूरवाले मवासानें लबाडी केली, यास्तव त्याच्या पारपत्यास फौज पाठवावी ह्मणून मर्दान्यास आली. तेथून राजश्री मुकुंदराव हरी दिवाण व राजश्री कृष्णाजी तानदेव या उभयतांबरोबर फौज देऊन रामपुऱ्यावर रवाना केली, आणि तेथें आठ दहा दिवस बाईनीं मुक्काम नेमले. मीं निरोप मागितला. त्यास बोलली कीं, महेश्वरास गेल्यावर निरोप देऊं. त्यास, तेथें उगेच राहावें, तोंवर उज्जनीहून श्रीमहांकालेश्वराचें दर्शन करून यावें; साडेपांच

वर्षें इकडे आहें परंतु येथें कधीं आलों नाहीं; यास्तव बाईचा व राजश्री केसोपंताचा निरोप घेऊन येथें आलों. देवदर्शन जालें. त्रिरात्र येथें जाली. उद्ईक छ १४ मिनहूस स्वार होऊन महेश्वरास जातों. तेथून बाईचा निरोप घेऊन लवकरीच सेवेसीं येतों. सेवकास खर्चास पेशजीं वरात पाठविली होती, त्यास वरीस जालें. आतांही एक दोन वेळां विनंति लिहिली होती, परंतु कांहीं खर्चास आलें नाहीं. महेश्वरीं लोकांचें देणें सहा सातशें रुपये आहे. कसा निकाल पडेल न कळे. मजला गरिबाला धन्याचे पायावितरिक्त त्राता कोण आहे ? स्वामी मायबाप कृपाळू समर्थ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक ११७.** ता. २७ दिसेंबर इ. स. १७८३.

पै॥ छ ११ सफर. **श्रीगजानन.** मि. पौष शु॥ ४ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २ सफरपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावतील. सांप्रतचा मजकूर रामपुऱ्याच्या मवासावर मातुश्री बाईनीं मर्दान्याच्या तळावरून राजश्री मुकुंदराव हरी यांजबरोबर फौज देऊन रवाना केले होते. त्यास पेशजीं दोन तीन वेळां मवासाशीं व यांच्या लोकांशीं झटपट जाली. तें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. सांप्रतचे वर्तमानाचीं पत्रें लष्करांतून छ २६ मोहरमीं तृतीय प्रहरीं येथें बाईस आलीं. त्यांत मजकूर लिहिला होता जे, बुराणपुरप्रांतीं पेंढारी होते. त्यांस आणावयास मकाजी गिते पाठविले होते. ते दोन अडीच हजार पेंढारी घेऊन छ २३ मोहरमीं मुकुंदरायांजवळ गेले. छ २४ रोजीं मवासाची खबर आणून ठीक पाडलें कीं, अमक्या दऱ्यांत आहेत. त्यास पेंढारी व त्रिंबक बाबुराव, इंदूरचे कमाविसदार, यांचे जमीयत ती हजारांचा सुमार, दोन कोस दऱ्यापलीकडून पाठविले. इकडून हुजरात व शिलेदार मिळून दोन हजार लोक पाठविले. मवासही शेंदीडशें भले. घोडेवाले बाहेर ठेऊन हुजरातच्या लोकांशीं व मवासांशीं बरीच लढाई जाली. यांच्या लोकांनीं मवास शिकस्त केले. तिकडून पेंढारीही दऱ्यांत उतरले, त्यांनीं लुटले. कांहीं लोक घोडीं घेऊन पेंढारी यांनीं सोडले. त्यांत मुख्य दोघे होते. ते वडील भाऊ होता तो झाडींत निघोन गेला. धाकटा त्याचा भाऊ, त्याचें नांव कोद्रू कुंवर, त्यानें रेवेंत उडी टाकून

पोहून जात होता, तो ओळखला. यांनीं करवलास सांगून गोळ्या मारूं लागले. तेव्हां तो फिरला, कीं मजला मारूं नका, मी येतों. परंतु न आला. तो यांणीं धरला आहे. एक भाऊ पळून गेला. त्याच्या शोधासही लोक लाविले आहेत. पाऊणशें घोडीं पेंढाऱ्याकडेस गेलीं आहेत, व पंचवीस तीस घोडीं यांच्या लोकांकडेस आलीं आहेत. दोन हजार गुरें पेंढारी यांनीं लुटलीं. याप्रमाणें छ २४ रोजीं लढाई जाली. छ २५ रोजीं स्थिरवारीं तृतीय प्रहरीं येथें बाईकडे पत्रें आलीं. पत्रें पाहून बहुत संतोष जाला. कासिदांस दहा रुपये इनाम दिल्हा. फिरोन मकाजी गिता येथें आला होता, त्यास पाठविले जे, पळून गला आहे त्याचा शोध करा. मुकुंदरायास व राघो रणसोड पागे यांस बाईनीं पत्रें लिहिलीं आहेत कीं, पेंढारी यांकडे घोडीं रामपुरवाल्याकडील गेलीं आहेत, ते चांगलीं आहेत. त्यांची किंमत जास्त करूं नये. हलकी किंमत करून ठेवा. मग किंमतीप्रमाणें निमे रुपये त्यांस देऊन घोडीं पेंढाऱ्यांजवळून घेऊं. याप्रमाणें पत्रें गेलीं आहेत. हें रामपुऱ्याकडील वर्तमान. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान कागदोपत्रीं तों नाहीं. येणार जाणार कासिदी खबर कीं, गोहदवाल्याचे वकील आले आहेत. कांहीं दारमदार करावा, गोहद आपल्याकडेस ठेवावी, असें त्यांचें बोलणें आहे. पाटीलबावा ऐकत नाहींत. परंतु कारभारी व सरदार लोक यांच्या चित्तींत कीं, कसाही चार दिवस दारमदार करून या शहांतून निघावें. सबब कीं, महागाई फार. चार शेर अन्न सुकळास मिळत नाहीं. सहा सात शेर भूस घोड्यांस रुपयाचें, तेंही संकटेंकरून मिळतें. या शिकस्तीस्तव लोकही नित्य बावांशीं हेंच बोलतात की, प्रस्तुत येथून निघावें. दुसरें वर्तमान, एक कारकून त्यांच्या लष्करांतून आला. तो देशीं आपल्या घरास गेला. त्यानें सांगितलें कीं, पाटीलबावांनीं उरूस केला होता. गुरूची पूजा केली. ते रात्रीस स्वप्न जालें कीं, 'येथील दारमदार करून निघून जा. आपल्या दर्शनास येण्यास फार दिवस जाले. दोन तीन वायदे केले ते गेले. आतां लवकर येणें.' पाटीलबावांनीं चैत्रमासीं दर्शनास जायाचा वायदा केला आहे. गोहदेचा दारमदार करून लवकरीच उज्जनीस येणार, व इंग्रज पांच पलटणें कानपूर काल्पीपलीकडे यमुनेच्या घाटावर आले आहेत. पापड (पाफम) इंग्रज पाटीलबावांपासून कलकत्त्यास गेला होता, तो पांच पलटणें घेऊन आला आहे. तो पाटीलबावांकडेस येणार, म्हणून कारकुनी वर्तमान. राजश्री नारो शिवदेव उज्जनीस आले. देशास जायास उज्जनीहूनही निघून एका दों दिवसां येथें येणार. बाईची भेट घेऊन पुढें देशीं यणार. याप्रमाणें ऐकिलें वर्तमान. श्रीमंत दादासाहेबाचें वर्तमान

कैलासवासी जाल्याचें छ २७ मोहरम सोमवारीं येथें आलें. बाईकडेसच पत्रें आलीं. त्यांनीं तों सांगितलें नाहीं. परंतु शोध करतां वर्तमान कळलें. मग उभयतांहीं पुराणसमयीं जाऊन विचारिलें. बाईनींही सांगितलें जे, आमचे तों कांहीं पत्र आलें नाहीं, परंतु साहुकारी वर्तमान आलें. घडीभर स्तव केला. नेत्रास पाणी आलें. आह्मांस विचारलें जे, "नौबत तों येथें नाहीं. परंतु घड्याळें दोन दिवस वर्ज करावें कीं काय?" उचित आहे ह्मणून उत्तर केलें. परंतु बारीक शोध करतां साहुकाऱ्याचें वर्तमान नाहीं. यांचेंच पत्र वाफगांवींहून आलें. याप्रमाणें देखलें ऐकिलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकास आज्ञापत्र येऊन दोन महिने जाले, परंतु येथील साहुकाराच्या देण्यामुळें उलगडा पडत नाहीं. धन्यावितरिक्त येथें सेवकास कोण त्राता आहे? वरीस जाले. वरात आली होती. अलीकडे कांहीं खर्चास आलें नाहीं. देण्यामुळें येथें गुंतून पडलों आहें. सेवकाविशीं तेथें स्मरणपूर्वक कोण अर्ज करितो? तीन चार विनंतिपत्रीं लिहिलें आहे. परंतु अलीकडे कांहीं आज्ञापत्र येत नाहीं. स्वामींनीं उपेक्षा केली तर येथें माझें कोणी नाहीं. फार दिवस जाले, धन्याच्या चरणदर्शनाची फार खंत वाटती. स्वामी कृपाळू समर्थ. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ११८.* ता. २९ मार्च इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. फाल्गुन व॥१२ शके १७०४.

"सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ रविलाखरपर्यंत स्वामीच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान पेशजी विनंतिपत्रीं लिहून डांकेबरोबर व काशीदजोडीबराबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसीं पावलीं असतील. सांप्रतचें वृत्त सरकारचीं आज्ञापत्रें सेवकास व बाईस लग्नाच्या ऐवजाकरितां आलीं होतीं. त्यास बाईनीं राजश्री तुकोजी होळकरांस पत्रें लिहिलीं आहेत. तेथून उत्तर आल्यावर काय बोलणें तें बोलूं, असें बोलली आहेत. त्याअन्वयें पेशजीं सेवेसीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. बरकड महाली जाबसाल राजश्री पाटीलबावांस बाईनीं पत्रें लिहिलीं आहेत. तेथून जाबसाल आल्यावर काय उत्तर करणें तें करितील. लग्नाच्या ऐवजाकरितां वेगळे वाटेनें बाईशीं

---

* लेखांक ११८।११९।१२०।१२१ हे चार लेखांक इ. स. १७८३ सालचे आहेत. हे या वर्षाचीं पत्रें छापून निघाल्यानंतर सांपडले, ह्मणून ते ह्याच साकाच्या पत्रांमध्यें नमूद केले आहेत.

राजश्री केसो भिकाजी व मी निक्षून बोललों. समजाऊन सांगितलें. त्यास, बाईनीं उत्तर केलें जे, तेथून तुकोजीबावांनीं कोणत्या ऐवजावर लिहिलें आहे, ते काय म्हणून उत्तर लिहितात, तें पाहून मग काय बोलणें ते बोलूं, असें बोलली. ऐवजीं काम तितकें संदिग्ध बोलतात. बहुत प्रकारें समजाऊन सांगितलेंही आहे. पेश-आंदेशीची समजही आहे. परंतु देण्याची गोष्ट कोणीं सांगितली, तेथें गौण आबसाल करितात. असें येथील ध्यान आहे. वरकड राजकी वगैरे वर्तमान चंद्र ११ रोज शुद्ध द्वादशी शनिवारीं दिवसां तृतीय प्रहरानंतर भूमिकंप जाला. एक क्षणांत समाप्तही जाला. येथील ब्राह्मणांनी वरतारा केला कीं, केवळ हा भूमिकंप नव्हे, विंध्याद्रिकंप होय. आतां या व पुढील वर्षीं दोन ग्रहणें खग्रास आलीं आहेत व संमत १८४० चें साल आहे. या वर्षांत राज्यक्रांति व महर्गता फार होईल. एकेचाळीसाच्या वर्षापासून राज्याचा बंदोबस्त व सुभिक्षता होईल. राजकीय उपद्रव चहूंकडून फार होईल, असें येथें ब्राह्मणांनीं सागितलें आहे. भोपाळवाले पठाण येथे आले आहेत म्हणून पेशजी विनंति लिहिली होती. त्यास, त्यांच्या येण्याचा सबब, सांप्रत भोपाळच्या किल्ल्यांत टिकाईत अधिकारी जो आहे, तो घरचा बंदा होय. भाऊबंदाच्या द्वेषेंकडून बायकांनीं त्यास बसविलें आहे. तो बंदोबस्त करून आहे. येथें आले होते ते अस्सल पहिले किल्लेदाराचे भाऊबंद आहेत. त्यास त्यांनीं परांगदा केलें आहे. यास्तव येथें यऊन त्याचें बोलणें यांसीं कीं, तुम्हीं सर्व प्रकारें आमचे साहित्य करणें. आम्हांस संस्थानीं बसवून टिक्का द्या, म्हणजे आम्ही तुम्हांस काही नजर देऊं. त्यास, बाईनीं राजश्री विसाजी शामराज व कृष्णाजी तानदेव व लहान मोठे त्यांनीं आपले मुत्सद्दी बसवून, दोन तीन दिवस ये गोष्टीचें खलबत केलें. सारांश ठरविला जे, यांचें साहित्य आपण केलें आणि प्रस्तुत जो टिकाईत आहे त्याचे स्वाधीन महाल, मुलूख व पैका देणें घेणें आहे. त्यानें तिकडील पाटीलबावांकडे संधान लावून त्यास आपले सहाय केलें, तर प्रस्तुत पाटीलबावाशीं आपल्याशीं बिटेल. असें करूं नये. साप्रत हें वर्तमान पाटीलबावांस लिहून पाठवावें. त्यांचे आपले संमतें एक जालें, म्हणजे याजकडे सरकारची व आपली उभयतांची नजर काय ठरवणें तें ठरवून, उभयतांच्या संमतें याचे साहित्य उत्तम प्रकारें करावें. याप्रमाणें ठरवून पठाणास बाईचे रुबरू बोलावून विसाजी शामराज यांनीं सांगितलें. त्यांनींही मान्य केलें. ते दिवशीं पठाणास मेजवानी केली. पांच सात जणांस वस्त्रें देऊन चंद्र १३ रोजीं संध्याकाळीं बिदा केलें. त्यांनीं कबिलेबाबत ठेवावयास जागा मागितली. मागाहून विचारून लिहून पाठऊं,

तेथें ठेवा, ह्मणून सांगितलें. बिदा केलें. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. दुसरें वर्तमान झाबे प्रांतीं राजश्री चिमाजी बुळे आले आहेत. परंतु झाबेवाले मवास ऐकेना. यास्तव बुळे मजकुरांनीं आपले कारभारी येथें बाईकडे पाठविले कीं, दोन तीन तोफा मातबर पाठवावें, ह्मणजे मवासाचें पारिपत्य होईल. बाईनीं उत्तर केलें जे, बैल आणून इंदुरची थोरली तोफ घेऊन जाणें. त्यास बैल मिळेनात. वरकड साहित्य कांहीं त्यांस मिळेना. मग त्यांचे कारभारी येथें आले होते. त्यांनीं बुळ्यास लिहून पाठविलें जें, "तुह्मी येथें आल्याखेरीज कोणतेंही साहित्य होत नाहीं. आपल्यास हेही धनी, तेही धनी. आपण दुहींत पडूं नये." असें लिहिल्यावर चंद्र १३ रोजीं चिमाजी बुळे येथें आले. तृतीय प्रहरीं वाड्यांत दोघां खिजमतगारांनिशीं येऊन, बाईच्या पायावर डोई ठेऊन, हात जोडून फार नम्रतेनें विनंति केली. बाईनींही आधीं उपरोधिक बोलणें फार बोलली. बुळ्यानें फारच नम्रतेनें उत्तरें केलीं. दोन दिवस ठेऊन घेऊन, एक लहान तोफ येथून सरंजाम बैल व दारूगोळासुद्धां दिली, व इंदुराम पत्रें व कारकून देऊन, थोरली तोफ चाळीस शेरांच्या गोळ्याची, चारशे बैल व ते तोफेचा सरंजाम दारूगोळा सर्व देऊन, चंद्र १६ रोजीं वस्त्रें देऊन बुळ्यास बिदा केलें. इंदुरास गेले. तेथून तोफ घेऊन झाब्याकडे जातील. दहा वीस हजार रुपये खर्चास कर्जाऊ मागत होते. परंतु बाईनीं कांहीं दिलें नाहीं. चंद्र १७ रोजीं पाटीलबावांच्या लष्करांतून तेलंग ब्राह्मण सोळा दिवसांनीं आला. त्यानें वर्तमान सांगितलें जे, पाटीलबावांजवळ इंग्रजांकडील वकील आहे. त्याजवळ दोन पलटणें आहेत. हैदरनाईक मयत जाल्याचें वर्तमान ऐकून, गोहदवाल्याचें व इंग्रजाचे वकिलाचें सूत्र होतेंच; गोहदवाल्याचा पक्ष धरून इंग्रजानें पाटीलबावांशीं बिघडला, कांहीं हर्षामर्ष जाला, ह्मणून ब्राह्मण सांगत होता. परंतु असें जालें असतें तर येथें बाईकडे अगर विसाजी शामराजाकडे कांहीं पत्रें येतीं. बाईसही विचारलें. तेथेंही शोध केला. परंतु या वर्तमानाचीं पत्रें कोठें आलीं नाहींत. सत्य मिथ्या देव जाणे. हे विनंति."

---

**लेखांक ११९.** ता. १४ एप्रिल इ. स. १७८३.

**श्रीगजानन.** मि. चैत्र शुद्ध १२ शके १७०५.

"सेवेसीं विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ जमादिलावलपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम म. द. ३०

महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. श्रीमंतांच्या लग्नपट्टीचा ऐवज दोन लक्ष होळकरांकडे घ्यावा ह्मणून सरकारचीं व तुकोजीबावांचीं पत्रें बाईस आलीं, व सेवकास व राजश्री केसो भिकाजी यांसही आज्ञापत्रें आलीं कीं, बाईशीं बोलून ऐवजाची निकड करून ऐवज पाठवून देणें. त्यास बाईनीं आक्षेप घेतला कीं, "तुकोजीबावांनीं लिहिलें आहे कीं, बाकीपैकीं ऐवज देणें. ते बाकी त्यांची आह्मांकडे कोणत्या ऐवजीं राहिली आहे तें लिहून पाठवा; ह्मणून आह्मीं त्यांस लिहिलें आहे. त्याचें उत्तर आलीयावर काय तुह्मांसीं बोलणें तें बोलूं." ह्मणून सांगितलें. तो तपशील पेशजीं विनंतिपत्रीं पुष्कळ लिहिला आहे. सांप्रत छ १९ रबिलाखरचें सरकारचें आज्ञापत्र सेवकास आलें. तें डाकेबरोबर छ ४ जमादिलावलीं दों प्रहरां येथें पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "दो लक्षांविशीं बाई दिक्कत घेतील असें वाटत नवतें. असो. तुह्मीं एक दोन वेळां बोलून, वरातेप्रमाणें ऐवजाची तरतूद होऊन ऐवज लवकर रवाना होय असें करणें. माळव्यांतील महालकरी यांपासून ऐवज घेऊन लवकर रवाना करावा. श्रीमंतांचे लग्नाचे ऐवजास दिकती घालणें चांगले नाहीं." ह्मणून आज्ञा. त्यास केसो भिकाजी यांसही पत्र दाखविलें. ते समयींच वाड्यांत जाऊन बाईस पत्र वाचून दाखवावें, तों श्रीरामनौमीच्या उत्साहाची गडबड. समय सांपडला नाहीं. दुसरे दिवशीं दों प्रहरांनंतर पत्र घेऊन उभयतांही गेलों. बाईस पत्र वाचून दाखविलें. त्यांनीं उत्तर केलें जे, राजश्री तुकोजी होळकरांस पत्र लिहिलें आहे. ते बाकीचा ऐवज कोणता लिहून पाठवितील त्याप्रमाणें तुह्मांसीं बोलूं. त्याचें पत्र आल्याशिवाय आह्मांस आतांच बोलतां येत नाहीं. इतकाच जाबसाल जाला. तदनतर सरकारची जासूदजोडी आली आहे, त्यांनीं फार निकड केली. यास्तव छ ७ मिनहूस दरबारसमयीं आह्मीं उभयतां जाऊन बाईसी केसोपंतांनीं विनंति केली जे, "लग्नपट्टीच्या ऐवजास फार दिवस जाले. जासूद निकड करितात." त्यास बाईनीं उत्तर केलें जे, "तुकोजीबावांचें पत्र आल्याशिवाय आह्मांस कांहीं बोलतां येत नाहीं." त्यावर केसोपंतांनीं आपल्या जाबसालाचीं उत्तरें मागितलीं. देवितों असें बोलली. तदनंतर मीं विनंति केली जे, "तुकोजीबावांस पत्र गेल्यास दीड महिना जाला. आठा दहा दिवसांनीं तेथील उत्तर आणऊं ह्मटलें, तर आपल्याजवळ सुतरस्वार आहेत. चलाख जासूद कासीद आहेत. हें ऐवजीं काम निकडीचें. त्यास दीड महिना जाला. अद्याप उत्तर येत नाहीं ह्मटलें तर कसें?" बाई बोलली जे, "घेणारही

तेथेंच आहेत. ज्यांनीं बाकी लिंहून दिल्ही, तेही तेथेंच आहेत. त्यांनीं तेथेंच चौकशीनें विचारून पत्र त्यांचें घेतलें असतें, तर आह्मी आक्षेप कशास घेतों? आह्मांस त्यांनीं मोघम लिहिलें कीं, बाकीच्या ऐवजीं दोन लाख देणें. ते कोणती बाकी? आह्मीं आपले घरांत पाहिलें पाहिजे कीं नको?'' मीं उत्तर केलें जे, "जासूद निकड करितो, त्यास उत्तर देऊन बिदा करावें. मागाहून तेथील बाफ-गांवचा जाबसाल आल्यावर काय आज्ञा कराल, तसें श्रीमंतांस लिहून पाठऊं." बाई बोलली जे, "त्यांचें उत्तर आलें नाहीं, तोंच आह्मीं उत्तर काय द्यावें? त्यांचा जाब आलीयावर काय बोलणें तें बोलूं." असें कांहीं रागें, कांहीं लोभें, बोलली. ते दिवशीं इतकाच जाबसाल जाला. तदोत्तर द्वादशी सोमवारीं वाड्यांतील पुराण जालीयावर बातमी राखून मीच बाईकडेस गेलों. एकांतींच बसली होती. गोविंद रघुनाथ गानू जवळ होते. मीं विनंति केली जे, "सरकारांत ऐवजाची निकड आहे. काल दुसरें पत्र आलें. जासूदही निकड करितो. तत्रापि, या लग्नपट्टीच्या ऐवजास आपणही इतकी दिकत करूं नये. वरकड दिकतीचीं कामें पुष्कळ आहेत. तदनंतर आह्मी येथें कांहींच निकड ऐवजाची करीत नाहीं, असें जासुदास वाटतें. तेथें धन्यांच्याही चित्तांत असेंच येईल. येथें अधिकोत्तर बोलावें तर आपण रागें भरतात. तिकडे धनी समर्थ. इकडे आपण सरदार. मध्यें आह्मी लहान चाकर इतराजीखालीं येऊं. त्यास, या दों लक्षांविशीं आपली मर्जी काय, हें निक्षून आज्ञा करावी. त्याप्रमाणें धन्यास आह्मी लिहूं. मग जासूद-जोडीचेंही येथें काय काम आहे?" इतकें ऐकून बाई बोलली जे, "श्रीमंतांच्या लग्नाचा ऐवज आह्मांस देणें. परंतु तुकोजीबावांनीं बाकीचा मजकूर लिहिला, त्यास तेच धनी, आह्मी बाकी देणार! त्यास ते कोणती बाकी लिहितात तें पाहिलें पाहिजे एक. दुसरें, काल तुह्मांस श्रीमंतांनीं लिहिलें आहे कीं, माळव्यांतील महा-लकऱ्यांजवळून ऐवज घेऊन लवकर रवाना करावा. त्यास, फार चांगलें आहे. आह्मींही तें पत्र पाहून, रात्रौ लहानमोठे बसून, माळव्यांतील महालांवर वर्गणीची योजना करून ठेवली आहे. महालांवर वर्गणी घालणें तेव्हां सारेच महालांवर वर्गणी पडेल. ऐवज साऱ्या महालांजवळून हिस्सेप्रमाणें घेतला पाहिजे. तेव्हां तेथें श्रीमंतांजवळ तुकोजीबावा बोभाट सांगतील जे, हे साहुकारांस कर्जात महाल दिले आहेत, त्यांजवर बाईनीं पट्टी घातली आहे. असा बोभाट करतील. पुन्हां श्रीमंत आह्मांस ताकीद लिहितील. तर तें आह्मांस अनुकूल पडणार नाहीं. लग्न-पट्टीचा ऐवज साऱ्याच महालांजवळून घेतला पाहिजे. यास्तव श्रीमंतांनीं सावका-

राची अगर कोणाची रदबदली ऐकूं नये. असें जालें ह्मणजे आतां आह्मी साऱ्या महालांवर पेस्तरसालच्या ऐवजापैकीं वर्गणी घालून. ऐवज वसूल करून पेस्तरसालीं देऊं. या गोष्टीची पक्केपणें श्रीमंतांची आज्ञा आणवा. आह्मांस मान्य आहे. बोलल्याप्रमाणें तर्तूद करितों. तुह्मी ह्मणाल कीं, साहुकारांचे महाल एकीकडे टाका, नी खासगी महालांत तर्तूद करून द्या. तर तसें होणार नाहीं. वांटणी करणें तर इकडील साऱ्याच महालांवर होईल. नाहीं तर देशींही महाल आहेत. माळव्यांतील महालांपैकींच घेणें, तर या तर्तुदीनें करून देऊं. मधें कोणाची रदबदली श्रीमंतांनीं ऐकूं नये. असें मान्य होत असलें. तर लवकर श्रीमंतांची आज्ञा आणवा. आह्मीं सांगितल्याप्रमाणें वर्गणी करून ऐवजाची तोड पाडितों. केवळ तुकोजीबावा व नारो गणेश व चौघे साहुकार व चौघे मातबर मुत्सद्दी यांनीं भारलेले. ते सांगतील तेंच खरें. आह्मी सांगतों हें मिथ्या! आजचे कालीं असेंच त्यांचें भासवणें आहे. तर देशीही महाल आहेत. प्रस्तुत खर्चही काय आहे? चाकरी पडेल तेव्हां खर्च लागेल. त्या गोष्टी प्रस्तुत दूर आहेत." याप्रमाणें बाई बोलली. मजला सांगितलें जे, "आज अशीं पत्रें पाठवा नी माळव्याच्या महालची रदबदली साहुकार वगैरे कोणाची रदबदली ऐकून, तुह्मी साऱ्या महालांवर वर्गणी घालून ऐवज वसूल करून पाठवणें, अशी आज्ञा आली ह्मणजे आह्मी तेंच कार्य करितों. लवकर उत्तर आणवा." ह्मणून बाईनीं सांगितलें. येविसींची काय आज्ञा ते लवकर करणार धनी समर्थ. पुण्याहून आज्ञापत्रें डाकेबरोबर येतात, ते येथें पंधरा दिवसांनीं येतात. येथील विनंतिपत्रें डाकेबरोबर रवाना करितों, की लवकर पावावीं. तेथें कधीं पावतात हें कांहीं न कळे. उत्तर लवकर आणवा ह्मणून बाईनीं सांगितलें आहे. स्वामींची मर्जी. सेवकास खर्चास वरातपरगणे कसरावदावर पांचशें रुपयांची छ २८ रविलावलची पाठविली, ते छ ४ मिनहूस पावली. राजश्री गबाजी सदाशिव यांजला नेऊन दिल्ही. तेही बोलले जे, आह्मांस शिरसा वंद्य आहे. परंतु पेस्तरसालचे रसदेचे ऐवजीं आज्ञापिली आहे. तुह्मांस तों लवकर दिली पाहिजे. त्यास तर्तूद करून पंधरा विसां रोजांनीं ऐवज देऊं ह्मणून बोलले. निश्चयें देतों ह्मणून सांगितलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

## लेखांक १२०. ता. २७ एप्रिल इ. स. १७८३.

श्रीगजानन. मि. चैत्र बा॥ ११ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २४ जमादिलावलपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ ९ जमादिलावलचें आज्ञापत्र डाकेबरोबर आलें, तें छ २१ मिनहूस दो घटकां रात्रीस पावलें. पत्राअन्वयें बाईशीं राजश्री केसो भिकाजी व मी बोललों कीं, हा लग्नाचा ऐवज वरातीप्रमाणें लवकर पाठविल्यानें श्रीमंतांस बहुतच संतोष होईल. त्यास बाईनीं एकच उत्तर केलें जे, वाफगांवचें पत्र आलें ह्मणजे काय तुह्मांसीं बोलणे तें बोलूं. केसोपंतांनीं उत्तर केलें जे, वाफगांवींहून पत्र आपणास आलें ह्मणून आह्मांस बातमी आहे. बाईनीं उत्तर केले जे, वाफगांवींहून पत्र निघालें असलें तर दो चौ दिवसां येईल. तुमचें डाकेबरोबर पत्र लवकर आलें. हें कामीदाबरोबर एका दो दिवसां मागून येईल. पत्र आलें ह्मणजे तुह्मांस दाखऊं. तदोत्तर काय तजवीज होणें ते होईल. याप्रमाणें उत्तर जालें. सेवेसी श्रुत होय. वरकड नवलविशेष कांहीं नाहीं. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक १२१. ता. १५ मे इ. स. १७८३.

पैवस्ती चंद्र २० जमादिलाखर. श्रीगजानन. मि. वैशाख शुद्ध १४ शके १७०५.

"सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १३ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–स्वामींनीं आज्ञापत्र छ २२ जमादिलावलचें डाकेबरोबर पाठविलें, तें छ ७ जमादिलाखरीं तृतीय प्रहरीं येथें पावलें. मातुश्री-बाईस पत्र वाचून दाखविलें. पत्रान्वयें विनंतिही केली. त्यांनीं उत्तर केलें जे, "सरकारचे वरातीबरोबर राजश्री तुकाजी होळकर यांनींही आह्मांस पत्र लिहिलें. कीं, इकडील महालचे बाकींपैकीं दोन लक्ष रुपये देणें. त्यास, आह्मी येथून त्यांस उत्तर लिहिलें कीं, बाकी कोणती तें लिहून पाठवा. मुजरद कासीदजोडी-बरोबर पत्र पाठविलें, त्याचें उत्तर अद्याप त्यानीं पाठविलें नाहीं. श्रीमंतांनीं दो पत्रीं तुह्मांस लिहिलें कीं, तुकोजीबावांचें पत्र बाईस गेलेंच आहे. त्यास, तुमच्या लिहिल्यावरून श्रीमंतांनीं त्यांस अगर त्यांचा कारभारी यांस हटकलेंच असेल. तेव्हां त्यांनीं सांगितलेंच असेल कीं, आमचें उत्तर बाईस गेलें ह्मणून श्रीमंतांनीं दोन वेळां तुह्मांस लिहिलें. येथें तों अद्याप त्यांचें पत्र आलें नाहीं. कासीद-

जोडीही परतून अद्याप आली नाहीं. आमच्या सांगितल्याचा तुह्मांस विश्वास नसेल, तर मुत्सद्यांस शपथपूर्वक विचारा.'' इतकें उत्तर केलें. तदोत्तर वेगळे वाटेनेंही पत्राचा शोध केला. परंतु अद्याप तुकोजीबावांचें पत्र या जाबसालाचें आलें नाहीं. पेशजींही दोन तीन वेळां या ऐवजाविषयीं बाईनीं उत्तरें प्रत्युत्तरें केलीं. ते तीन वेळांही तपशीलवार विनंतिपत्रीं सेवकानें छ ११ व छ १७ जमादिलावलीं व मध्यें एक वेळ अशीं वरचेवर सेवेसीं लिहिलीं आहेत. त्यावर बेविसावे मिनहूचें आज्ञापत्र हें आलें. परंतु त्या अन्वयाचा उल्लेख कांहींच आज्ञापत्रीं नाहीं. त्यावरून यांस समजलें कीं, त्यांनीं तेथें कसाही जाबसाल केला, तो चौघांच्या साहित्येंकडून श्रीमंतांस खराच भासतो. येथून उदंड खरें लिहिलें तें अपथ्यकारक होतें. का कीं, तसे साहित्यकार येथें कोणी नाहींत. त्या अर्थी कोणताही जाबसाल प्रमाण अथवा अप्रमाण निदर्शनास यावा. तुकोजीबावांनीं बाईच्या पत्राचें उत्तर पाठविलें ह्मणतात. हाच पुरतेपणें शोध करावा. येथे तों पत्र आलें नाहीं हें खरें. आह्मींही फार बारीकपणें शोध केले. परंतु पत्रही आलें नाहीं; ते कासीदजोडीही अद्याप आली नाहीं. असें असतां, मिथ्या तों सत्यत्वेंकरून धन्याचे रुबरू बोलतात, हें अपूर्व वाटतें. यविषयींचा शब्द सेवकाकडेही आहे कीं, इतके दिवस येथें राहून, इतकाही शोध एका पत्राचा न लागे, तेव्हां व्यर्थ. किंवा लोभामुळें ते जसें सांगतात तसें हे लिहितात, असेंही धन्यांस भासेल. परंतु असें घडणार नाहीं. पेशजीं वरातेबरोबर तुकोजीबावाचेंही पत्र आलें होतें. सांप्रत बाईच्या पत्राचें उत्तर, अडीच महिने जाले, आलें नाहीं. तस्मात् प्रांजलपणें मनःपूर्वक हे दोन लक्ष रुपये सरकारांत द्यावे असें मानस नाहीं. ह्मणून त्यास बाकीचा पै लाविला. सुरळीतपणें द्यावी असें असतें, तर बाईच्या पत्राचें उत्तर सरकारांत दाखवून पाठवितें, अगर सरकारांतच पत्रें देते. डाकेबरोबर उत्तर लवकर येतें. इतक्या दिवसांत ऐवज सरकारदाखल जाला असता. या अर्थी तेथीलच हिसका दिसतो. येथील मर्जी पाहातां लग्नोत्सवाच्या ऐवजास दिक्कत करावी असें कदापि नाहीं. परंतु त्यांच्या दिक्कतीच्या लिहिण्यामुळें येथें मनस्ताप जाला. ह्मणून त्यांच्या उत्तराचा आग्रह. केसोपंतासीं व सेवकासींही बोलणें हेंच कीं, तुकोजीबावांस पत्र लिहिलें आहे, त्याचें उत्तर आलियावर काय बोलणें तें बोलूं. असा थांग लागूं देत नाहींत. परंतु बारीक शोध पाहातां मातुश्रींनीं ऐवज तयार करून ठेविला आहे. येवढे गोष्टीचा शब्द लावून घेतील असें होणार नाहीं. पेशवांदेशी फार आहे. कोणतेंही कर्म करणें तें समंजसपणें करितात. अशी वर्तणूक येथील आहे. या ऐवजास दो गोष्टींची दिक्कत. एक तों तुकोजी........

श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं येथें रेवेस घाट बांधला आहे. त्या घाटावर बाईनीं एक देवालय बांधून श्रीपरशरामजींची मूर्तिस्थापना अक्षद् तृतियेस केली. पाटीलबावांकडील व श्रीमंत दादासाहेबांकडील वर्तमान येणार आहे. आलें ह्मणजे मागाहून लिहून सेवेसी पाठवीन. हे विज्ञप्ति."

---

## इ. स. १७८४.

(ह्या सालाचीं अवघीं ३ पत्रेंच उपलब्ध झालीं आहेत. इ.स. १७८४च्या मार्चमध्यें विठ्ठल शामराज महेश्वरच्या कामगिरीवरून दूर झाला, व केसो भिकाजी तें काम पाहूं लागला. इ. स. १७८४ पासून इ. १७९४ पर्यंत सुमारें १०।११ वर्षांचीं केसो भिकाजीचीं बातमीपत्रें बहुतेक शाबूद सांपडलीं आहेत. तीं वेगळ्या भागांत प्रसिद्ध होतील).

**लेखांक १२२.** जानेवारी इ. स. १७८४.

**श्रीगजानन.** पौष शके १७०५.

"सेवेसी केसो भिकाजी व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ सफरपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून कासीदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान आलाहिदा विनंतिपत्रावरून विदित होईल. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान, गोहदवाल्याचा वकील आला होता. त्यानें बहुत प्रकारें ग्लान सांगितली. पाटीलबावा पसतीस लक्ष रुपये मागत होते. त्यास वकिलानें रदबदली फार केली. त्यावर पंधरा लक्षांवर ठराव जाला. पंधरा लक्ष रुपये घेऊन गोहद त्याजकडेस ठेवावी; पन्नास सहस्रांची जागीर त्यास द्यावी; आणि गोहदवाल्यानें पाटीलबावांजवळ चाकरी करावी; याप्रमाणें मसलत ठरली. महागाईही फार. यास्तव सर्वांच्या मतें असें ठरलें. माघ अखेरीस उज्जनीस येणार. याप्रमाणें वर्तमान साहुकाऱ्यांत ऐकिलें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

---

**लेखांक १२३.** ता. १५ फेब्रुवारी इ. स. १७८४.

**श्रीगजानन.** मि. माघ व॥ ९ शके १७०५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:– आज्ञांकित सेवक विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २३ रविलावलपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे.

विशेषः– येथील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सेवेसी पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमान, राजश्री केसो भिकाजी दातार यांनीं सेवेसीं विनंतिपत्र लिहिलें आहे, त्यावरून विदित होईल. वर्तमान खचित आहे. राजकीय वर्तमान तर राजश्री चिमाजी बुळे झांबे प्रांतीं आले आहेत. दोन तीन हजार फौज व पेंढारी दोन तीन हजार व बरचाले (?) दोन हजार अशा जमावानिशीं संस्थानिकांशीं जरबा देऊन अम्मल जारी करावा. त्यास, तेथील राजानें भिल्ल दहा पांच हजार जमा करून बुळ्यावर छापा घातला. परंतु बुळ्यांनीं दम धरून तळ सोडला नाहीं. तदोत्तर बाईकडेही दोघे भले माणूस पाठवून तोफ एक मागविली. बाईनींही इंदुरींहून एक तोफ देवविली. संस्थानिकांची उपमाता आहे, ती बुळ्याचे अनुमतांत आहे. तिनें भिल्ल सारे फोडून आपल्याकडेस आणिले. तोफही नेली आहे. झांबेवाल्याचें पारिपत्य करितील. याप्रमाणें दरबारीं वर्तमान ऐकिलें. बाई श्रीओंकारेश्वरास जाणार होती, ती राहिली. सबब कीं, चिमाजी बुळे इकडे आले आहेत. चांभारीकडे काशी रंगनाथ दो चौशां स्वारांनिशीं आहेत. न जाणों, काय गडबड यास्तव राहिली. वे॥ सदाशिव भटजी उपाध्ये यांजबरोबर ध्वजोत्साहाचीं वस्त्रें पाठवून पौर्णिमेस ध्वजोत्साह जाला. कांहीं वस्त्रें राहिलीं होतीं, तेथेंच ब्राह्मणांस वांटलीं. संकल्पित जालीं म्हणून. रा. पाटीलबावा जेथें आहेत तेथेंच आहेत. अलीकडे कांहीं वर्तमान आलें नाहीं. आतां पत्रें गेलीं आहेत. काय वर्तमान येईल तें पहावें. वरकड अधिकोत्तर प्रस्तुत कांहीं नाहीं. देखिलें ऐकलें वर्तमान सेवेसी श्रुत होय. सेवकाची खर्चाची फार विपत्य आहे. धनी कृपाळू समर्थ हे विज्ञप्ति.”

---

पै॥ छ १४ रविलाखर सन अर्बा समानीन.

## लेखांक १२४.

**श्रीगजानन.**

ता. २८ फेब्रुवारी इ. स. १७८४. मि. फाल्गुन शुद्ध ८ शके १७०५.

“सेवेसी विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ६ रविलाखरपरीयंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून डाकेबरोबर पत्रें रवाना केलींच आहेत. सेवकाचें वर्तमान हुजूर येण्याविशीं आज्ञापत्र येऊन चार महिने जाले. येथें लोकांचें देणें त्याविशीं वारंवार विनंति लिहीत गेलों. परंतु खर्चास कांहीं न आलें. येथील प्रासीचा विषय. दर पत्रीं स्वामींस लिहीतच गेलों. ‘धन्याच्या पायासीं अन्यथा वर्तणूक केली नाहीं. धनी

## १४. श्रीरंगपट्टणचा व बंगलोरचा नक्षा.

हें पत्र हरिपंत फडके ह्यांचें असावें. ह्या पत्रावरून इंग्रजांनीं तयार करून दिलेल्या नक्षामध्यें व समक्ष पाहिल्यामध्यें अंतर दिसून आल्यावरून, नवा नक्षा त्यांनीं तयार करविण्याचा प्रयत्न केल्याचें दिसतें. किल्ल्यांची व लढाईच्या जागांची समक्ष माहिती घेऊन, नक्षे तयार करण्याचा मराठ्यांचा प्रयत्न, त्यांच्या अल्प संस्कृतीचा दर्शक आहे.

[मेणवलीदप्तर] श्री.

" सेवेसी विज्ञापना:-श्रीरंगपट्टणचे व बेंगरूळचे नक्षाविषयीं आज्ञा आली होती. त्यास बेंगरूळचा नक्षा इंग्रजांनीं करून दिला, तोच पाठविला आहे. पट्टणचा नक्षा माहितगारापासून करविला. त्याजवर पट्टणास आलों. प्रत्यक्षास व नक्षास अंतर पडलें, याजकरितां पाठविला नाहीं. येथें नवा तयार करविला आहे. जाला ह्मणजे पाठवितों. रवाना चंद्र ७ रजब हे विज्ञापना. "



## १५. इ. स. १७८८ सालची पर्वतीची दक्षणा.

[मेणवलीदप्तर.] श्री.

" यादी दक्षणा श्रावणमास रमण्यांत सुमा तीसा समानीन मैया व अलफ. प्रारंभ छ १३ जिल्कीद एकवीस घटका दिवसास तागाईत छ १४ मिनहू.

| | ब्राह्मण असामी. | रुपये. | शेरा. |
|---|---|---|---|
| दरवाजा पहिला | १४५०० | ४५३३२ | ३७= |
| दरवाजा दुसरा | ४५३० | २२५६६ | ४॥।≡।॥ |
| दरवाजा तिसरा | ८०३७ | ३२९६० | ४७-॥ |
| दरवाजा चौथा | ११६३४ | ४१७५९ | ३॥-। |
| | ३८७०१ | १४२६१७ | |

शेरा सरासरी ३॥=।॥
साल गुदस्त समान समानीन ब्राह्मण असामी ३९२००.
एकूण रुपये १४३३२९.
शेरा सरासरी ३॥=॥
साल मजकुरीं कमी ब्राह्मण असामी ४९९, रुपये ७१०.



## १६. कोल्हापुरच्या संभाजीराजाची समाप्ति.

कोल्हापूरचे संभाजी राजे इ. स. १७६० च्या दिसेंबर महिन्यांत वारले असें दिसतें. पुढील पत्र चंद्र १० जिलकाद ह्मणजे ता. १९ दिसेंबर इ. स. १७६० सालचें आहे. अर्थात् त्यापूर्वीं संभाजीराजे मृत्यु पावले हें उघड आहे.

[सातारादप्तर.] श्री.

"सेवेसी विज्ञापना:—येथील वर्तमान तागाईत चंद्र १० जमादिलावलपर्यंत यथास्थित असे विशेष. संभाजी राजे समाप्त जाहल्याचें वर्तमान येथें आल्यावर श्रीमंतीं विसाजी नारायण व सदाशिवराव अवधूत यांस जिजाबाईकडे रवाना केलें. त्यांजबरोबर माहादजी भोंसले मुंर्गीकर याचा धाकटा भाऊ उमाजी त्यास बरोबर द्यावा; आणि तेथें जाऊन हा राजा करावा; कारभार जिजाबाईनें करावा; पनाळा रांगणा याप्रमाणें किल्ले द्यावे; वरकड बंदोबस्त जो करणें तो सर्वत्रांनी करावा; आणि ताराबाईप्रमाणें खर्च नेमून द्यावा, त्याप्रमाणें खावून स्वस्थ राहावें; याप्रमाणें कबूल केल्यास उत्तम. नाहींतर जप्ती करावी. ज्या किल्ल्यावर जिजाबाई असेल त्याभोंवता वेढा घालून बसावें; याप्रमाणें जाहलें. वर्तमान लिहिलें असे. मागाहून होईल तें लिहून पाठवूं. सेवेसी कळावें, हे विज्ञापना."



## १७. मराठ्यांचें ह्मैसुराकडील राजकारण.

ह्मैसूर संस्थान हस्तगत करण्याचा हैदरअलीनें ज्या वेळीं प्रयत्न केला, त्या वेळीं ह्मैसूरचा दिवाण नंजराज ह्यांनेंही मराठ्यांकडे राजकारणाचें सूत्र बांधून, त्यांच्या मदतीनें हैदराचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. मराठ्यांनींही आपला चौथ सरदेशमुखीचा हक्क ह्मैसूरकराकडून कबूल करवून, नंजराजास मदत करण्याचा मनसबा योजिला होता. ह्या प्रसंगाचें पुढील महत्त्वाचें पत्र उपलब्ध झालें आहे. हें पत्र अर्थात् इ. स. १७६१ च्या पूर्वीचें ह्मणजे बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांच्या कारकीर्दीतील आहे. पाणिपतचा दुर्धर प्रसंग मराठ्यांवर आला नसता, तर मराठ्यांनीं ह्मैसूरचें संस्थान हैदराच्या हातीं खचित जाऊं दिलें नसतें, असें मराठ्यांच्या कर्नाटकांतील राजकारणावरून दिसून येतें.

[खेलेदप्तर.] श्री.

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः—

"सेवेसी विज्ञापना. नंजराज सर्वाधिकारी संस्थान श्रीरंगपट्टण यांजकडील वकील पेशजीपासून येथेंच आहेत. मैसुरास हैदरनाईकांनीं मोर्चे देऊन उतरले आहेत.

त्यावरून नंजराजांनीं, आपणास सरकाराकडून फौज पाठवून कुमक करून हैदरनाईकाचें पारिपत्य करून आपली स्थापना केलिया, चौथ सरदेशमुखीचें अंमल बसवून देणेंचा करारनामा लेहून पाठविला. सदरहू असल करारनामा येथें ठेवून घेऊन नकल सेवेसी पाठविलेच होते. त्यावरून श्रुत जाहले असेल. अलीकडे मोर्चे समीप जातात. तेणें-मुळें किल्लेंत निकडी होऊन, वरचेवर नंजराजांकडील पत्रे येतात कीं, जलद कुमक करून मुदई (?) चें पारपत्य करणें. मोर्चे उठवणें. याउपर आलस्य जाहलिया निभाव नाहीं. निदानास आपणास जैसें कळेल त्याप्रमाणें पाहून घेतों. दोनींत एक साफ लेहून पाठविणें. येणेंप्रमाणें बहुत निकडीचीं पत्रें येतात. परंतु आजिपावेतों येथील भरंवसापासून दुसरेकडे कुमकेविशीं नंजराजाचें पैगाम नाहीं. येथील कुमकेस जावें, तरी च्यारी हजार फौजेशिवाय बणत नाहीं. त्यावरून टाकोटाक राजश्री भगवंतराव त्रिंबक व महिपतराव कवडे यांजकडे वरचेवर लेहून पाठविलें आहे. त्यांचे मार्ग रक्षितों. कवडियाचें जमाव आलिया, घोरपडेकडील जमाव दोनतीन हजार फौज सामील करून घेऊन, येथील बंदोबस्ती करणें ते करून, टाकोटाक छेडी (सडी ?) फौजेनिशीं जाऊन मोर्चे उठवावें. नंजराजकडील तोफखाना जमाव बाहेर पडत असे. त्यांसही सामील करून घेतलिया, हैदरनाईकाचा इलाज चालणार नाहीं. किल्लेंत घालून निकड करावें. तूर्त येणेंप्रमाणें केलिया इतकीयांत पेशजीं हुजूर लिहिलेप्रमाणें छेडी फौज येऊन दाखल जाहलियां, मुलूक तमाम नंजराजाचे अमलेंत येत असे. एक किल्ला हैदरनाईकाकडे राहले. तेथेंही फितुराकडून नंजराजाचें इलाज चालेल; करारनामेंप्रमाणें सरकारचें कार्यभाग घडून येईल; ऐसा मनसबा आहे. परंतु महिपतराव कवडे अद्याप आले नाहींत. सरकारचे फौजाशिवाय घोरपडे जमाव घेऊन जातां येत नाहीं. त्याचें वर्तमान सेवेसी श्रुतच आहे. सारांश, राजश्री महिपतराव कवडे यांची फौज तूर्त येतां दिसत नाहीं. ते येते तर तूर्त हैदरनाईक याचे मोर्चे उठविले जाते; नंजराज मोकळे होते. त्यास हुजुरून फौजही येती. उपरांत पट्टणचें पारपत्य होतें. सदरहू मनसबा उचित होता. परंतु कवडे अद्याप आले नाहीं. ऐसा समय पुढें येणार नाहीं. येविसीं जलदी करणार धणी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''



## १८ राघोबादादांनीं गोपिकाबाईस लिहिलेलीं पत्रें.

गोपिकाबाई ही बाळाजी बाजीराव पेशव्यांची बायको. ही बाई इतिहासप्रसिद्ध आहे. ही मोठी राजकारणी होती. बाळाजी बाजीराव मृत्यु पावल्यानंतर थोरले माधवराव यांस गादी मिळाली. त्या वेळीं त्यांचें अल्पवय असल्यामुळें सर्व राज्यकारभार कांहीं दिवस राघोबादादा या बाईच्या अनुमतानें पहात होते. या

बाईविषयीं त्यांची प्रथम आदरबुद्धि होती व ते तिच्या सल्ल्यानें राजकारणें चालवीत होते. त्यांनीं ह्या बाईस लिहिलेलीं पत्रें फार महत्त्वाचीं आहेत. त्यांपैकीं कांहीं पत्रें मासल्यासाठीं पुढें दिलीं आहेत. हीं पत्रें इ. स. १७६२।६३ सालचीं ह्मणजे 'मोंगल पुण्यावर चाल करून' येण्याच्या पूर्वींचीं आहेत. हीं किती मनोरंजक आहेत हें निराळें सांगावयास नकोच. ह्या पत्रांवरून गोपिकाबाई किती शहाणी व राजकारणचतुर बाई होती हें व्यक्त होतें.

## लेखांक १.

[लेलेदप्तर.] श्री.

" तीर्थरूप मातुश्री वहिनी वडिलांचे सेवेसीः–

अपत्ये रघुनाथाचे सा० नमस्कार विनंति उपरीः– वडिलीं पत्र पाठविलें तें पावोन परम समाधान जाहालें. खुलाशाने लिहिलें हा पक्ष उत्तम. मनांत जे गोष्ट बरी वाईट यत जाईल, ते लिहीत जावी. मला आढळेल तें मी लिहीत जाईन. तेणेंकरून चित्त-प्रशस्तता होईल. यांत वाईट नाहीं. वडिलीं कां लिहिलें ह्मणोन मला वाईट वाटत नाहीं. आपण वडील आहेत. तीर्थरूप नानासाहेब, भाऊसाहेब यांचे जागां आपण आहेत. व वडिलांस मनसुबाही कळतो. केवळ वरकडी बायकांप्रमाणें नव्हत. प्रपंच परमार्थ दोन्ही वडिलांस कळतात, तेथें काय विस्तर ल्याहावें ? तथापि, वडिलांस माहितगिरी असावी ह्मणोन येथील कारभाराचा मजकूर आलाहिदा पुरवणींत लिहिला आहे. वाचून दोनदां पाहावा; आणि पुढील तर्तूद कारभारी समजावयाची करावी. सारांश, मला चिरंजीव शाहाणें करावें, त्यांणी दौलत करावी यास्तवच सांप्रत करीत आहों. वरकड आमचा नांवलौकिक पूर्वीं जाहला आहे. आतां फारसी आस्था नाहीं. वडिलांचे आज्ञे-प्रमाणेंच करावें हेंच मानस आहे. रवाना–रनिवार प्रातःकाळ. बहुत काय लिहिणें हे विनंति."

## लेखांक २.

श्रीशंकर.

"तीर्थस्वरूप मातुश्री बाई वडिलांचे सेवेसीः–

अपत्ये रघुनाथाचे साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ १९ रमजान चैत्र वद्य ७ सप्तमी सोमवार मुक्काम नजीक परांडें येथें वडिलांचे कृपेंकरून सुखरूप असों. विशेषः– बहुत दिवस वडिलांकडून पत्र येत नाहीं, येणेंकरून अपूर्व वाटतें. चिरंजीव माधवराव, नारायणराव यांजवर वडिलांची कृपा आहे, तैसी आह्मांवर नाहीं ऐसें दिसतें. पूर्वीं तरी वडील हमेष कृपा करीत आली. अलीकडे पत्र येत नाहीं. याजवरून विलक्षण वाटतें. आह्मींही बहुत दिवस वाट पाहिली; परंतु सविस्तर पत्र न आलें. यास्तव कृपा करून सर्वदां पत्रद्वारां तोषवीत गेलें पाहिजे. हिकडील वर्तमान

तरः–जानोजी भोंसले मोंगलासी मिळाले, व आह्मांकडीलही चाकर निमकहराम मिळाले. वीस पंचवीस हजार फौज आह्मांकडील मिळाली. येणेंकरून मोंगलानें फारशी शोखी करून आह्मांवर निकर्षच आरंभिला. परंतु ईश्वर सानुकूल आहे. या बेइमानांच्यानें कांहीं होणें नाहीं. दोन महिन्याने पुर्ते पारपत्य होईल. वडिलीं सर्वदा कृपा करून आशीर्वाद देत जावें. तेणेंकरून सर्व शत्रु पादाक्रांत होतील. आह्मांकडील फौज देशांत कांहींच नाहीं. मोंगलाच्याने आमचे पाठीलाग करवत नाहीं. तोफा टाकून आल्यास आह्मी मारून टाकितों. हें समजून बहुत खिदत खादली आहे. सांप्रत कांहीं फौज, पुणें, जुन्नर, सातारा, नासिक या प्रांतें पाठवून जपत्या करणार. यास्तव वडिलीं सावध असावें. आजकाल किल्ल्यावर असावें. नाहीं तर दगा जाहल्यास सर्व दौलतेस अपाय आहे. हवेल्याचे सुखासाठीं खालीं न राहावें. च्यार दिवस तसदी पडली तरी कबूल करावी. आइते वेळेस फौज अचानक आली, तरी पुण्यापासून सिंहीगडास पोहचणेचें संकट पडेल. मग आह्मीं लिहिलें तें आठवेल. परंतु आठवूनही फल नाहीं. यास्तव बहुत सावध असावें निदानीं, पार्वतीबाई, रमाबाई व सगुणाबाई वगैरे बाईका व चिरंजीव नारायणराव ऐसे तरी सिंहीगडीवर पाठवावें. आपण आइतेवेळेस गेली तरी कामास येईल. मी लिहितों यास्तव वडिलीं रागास न यावें. मी लेंकरूं आहें. हा काळ संकटाचा, यामध्ये बहुत सावध असावें. ग्रहण व षडग्रही आली आहे. आणीकही या वर्षांत दोन च्यार योग क्रूरच आहेत. यास्तव पुण्याचे भरंशावर' राहूं नये. दगा जाहाला तरी फजितीस जोडी नाहीं. गोपाळ गोविंद वगैरे कोणी मोंगलांचे लष्करांतून लिहितील, त्याजवर जाऊं नये. ते लबाड जाहेत. आज तागाईत दवलतेंत पेच पाडले. आतां मोंगलाचीही दवलत बुडवितील. तिकडे सारे निमकहराम, बेमान, मिळाले आहेत. ईश्वर त्यांचें सत्वरच पारपत्य करील. दोन दिवस त्यांणीं आपली बाजी शेर केली, परंतु परिणाम त्यांचा लागत नाहीं. त्यामध्ये ईश्वरइच्छा प्रमाण. आह्मांस सुचतें तें लिहितों. आपण वडील आहेत. विचारास येईल तें करावें. बहुत काय लिहिणें हे विनंति."

## लेखांक ३.

### श्रीशंकर.

"तीर्थस्वरूप मातुश्री वहिनी वडिलांचे सेवेसीः–

अपत्ये रघुनाथाचे चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति. उपरी वडिलांचीं दोन पत्रें आलीं, त्यांचीं उत्तरें तपशीलवार लिहिलीं आहेत, व आणीकही कलमवार मजकूर लिहिले आहेत. वाचून पाहावें.

"फौज थोडी असतां पुढें गेलां. मोंगलांशीं अंतर कितीक उरलें, फौज किती जमा जाहली, मोंगलाजवळ फौज किती, हें तपशीलवार लिहिणें" ह्मणोन आज्ञा. ऐशीयास आह्मांजवळ फौज थोडी हें खरेंच, तथापि निंबाळकराचे पारपत्यापुरती फौज जाणून,

निंबाळकरास दबावून, लक्ष रुपये व पांचशें राऊत चाकरीस आह्मांबराबर द्यावे, ऐसा करार करून घेतलें.

"पारपत्य पुरतें करावयाचें होतें, परंतु समयानुसार केलें. दत्ताजी शिंदे यांनीं मर्दुमी केली, परंतु कार्य न जाहालें," ह्या दृष्टांतेंकरून आज्ञा लिहिली. तरी सर्व भार ईश्वरावर आहे. आह्मी यत्नास चुकत नाहीं. केवळ शिपाइगिरीच करीत नाहीं. हिकमतीनेंच लढाई करूं. आह्मी तीर्थरूप नानासाहेब, भाऊसाहेब यांचे शागीर्द आहों. लागभाग पाहूनच जें करणें तें करितों. उतावळी करीत नाहीं. असें करितां होणें जाणें ईश्वराचे हातीं. जसें बनेल तसे करितों. कलम १.

"चिरंजीव माधवराव आमचे मर्जीप्रमाणें वर्ततात. मर्यादेविसीं वगैरे शिकवीत जावें." ह्मणोन पूर्वी कृष्णाजीपंतांबरोबर सांगून पाठविलें होतें. ऐसीयास ते तीर्थरूपाचे पुत्र आहेत. त्यांस शिकवावें लागत नाहीं. तथापि, जें सांगावयाचें तें सांगत जाऊं. परंतु सांप्रत सांगावयाचें प्रयोजन लागत नाहीं. सांप्रत मोंगल येथून साठ कोसांवर आहे. पंधरा दिवशीं गाठ पडेलसें वाटतें पुढें फौजा जमा जाहल्यावरी निकडीचीं झुंजें दोनचार होतीलसे आहे. आमचा सर्व मदार चिरंजीवावर आहे. ह्या वेळेस यांची नवी उमेद. हरएक कामांत उतावळी करूं लागतील, त्या वेळेस आह्मी सांगूं तें ऐकावें लागेल. तेविसी वडिलानी वारंवार ल्याहावें. आता सर्व मदार चिरंजीवावर आहे. सूचनार्थ लिहिलें आहे. वरकड कारभार आमचे आज्ञेप्रमाणें करीतच आहेत. तेविसीं कांहीं पेंच नाहीं. कलम १.

भोंसले व गाईकवाड व मल्हारबा येणार आहेत. भोंसले तरी लौकरच येणार आहेत. मातबर फौज जमा होई तोपर्यंत सफेजंगीची लढाई करीत नाहीं. बाबुजीनाईक व आणीक पथक मातबर आहेत. त्यांजकडून गनिमी तऱ्हेनें झुजवून, दोन महिन्यांत मोंगलही दमेल व आमची फौजही फार जमा होईल पौषमासीं अथवा माघमासीं थोरली लढाई होईल ऐसें योजिलें आहे. कर्ता ईश्वर आहे. कलम १.

"किल्ले जाऊं लागले, यास्तव किल्ल्याचे अधिप आहेत, त्यांस आपल्या आपल्या स्थलास पाठवावे" ह्मणोन लिहिलें, तर येणेंप्रमाणें करितों. किरकोळ चार किल्ले गेले ह्मणोन येविसीं वडिलांनीं संकट मनांत आणूं नये. गडबडीमुळें चार किल्ले गेले तरी कांहीं चिंता नाहीं. उभयतां तीर्थरूप मातबर होते. त्यांचा दबाव तुटला. याजमुळें हाली माजी जाहाली. लोकांचे मतें दवलत सावरणार नाहीं. ह्मणोन लबाड्या चौकडे शत्रूंनीं केल्या. परंतु अशा गडबडीवर जाऊं नये. एक मोंगलाचें पारपत्य जाहलें, ह्मणजे चार आभाळें उठलीं आहेत हीं विरतील. याचा मजकूर किमपि मनांत न आणावा. आह्मीही जागां जागां बंदोबस्ती करवितों. रक्षिणार ईश्वर आहे. कलम १.

तीन कलमें प्रपंचाचेच मजकुराचीं लिहिलीं आहेत. परंतु तथ्य मजकूर तरी होणें जाणें ईश्वराधीन आहे. आमचे आधीन काय आहे ? आजपर्यंत ईश्वरें अब्रू रक्षिली.

पुढेंही रक्षिणार तोच आहे. सारांश, दोन किल्ले गेले अथवा दोन आले, येविसीं सुख-दुःख कशास मानावें ? वडील[1] सर्वज्ञ आहेत, व धैर्यही वडिलांस आहे. मीं फार ल्याहावेंसें नाहीं. सारांश, प्रपंच असत्य आहे. जे होणें तें होईल. येविसीं दुःख अथवा सुख मानूं नये. सर्वदा संतोषरूप असावें. आह्मी जितका प्रयत्न होईल तितका करीत आहों. फळदाता ईश्वर आहे. कलम १.

औरंगाबादेवर आह्मी गेलों, याचे बदला तो पुण्यावर फौज पाठवील, अथवा आपणच येईल ऐसें भासतें. ईश्वरी सत्तेने, आह्मी पुण्यापावेतों येऊं देतों ऐसा अर्थ नाहीं. परंतु अगोदर सावध असावें, ह्मणजे कांहीं चिंता नाहीं. हाही प्रकार बराच दिसतो. येविसीं मागाहून सत्वरच विचार करून लेहून पाठवूं. दोन महिने फौज फार जमा होईल. तोंपर्यंत मातबर लढाई होणार नाहीं. फौज पार जमा जाहल्यावरी एकदोन लढाया मातबर करून फैसला करितों. करणार सर्व वडिलांचें पुण्य आहे. सर्वदा मनापासून कृपादृष्टीनें इकडे पाहिल्यास आमचा जयच आहे. वरकड कांहीं काळजी वडिलांनीं न करावी. संतोषरूप असावें. कलम १.

एकूण कलमें साहा लिहिलीं आहेत. यथाज्ञाने मनसुबा करितों. त्यांतही वडिलांस सुचत जाईल तें लिहीत जावें. येथेंही मनसुब्यानुसार करणें तें करूं. चिरंजीव रमाबाईस वडिलांनीं आपले जवळ ठेवावें. मिरजेस पाठवूं नये. वरचेवरी पत्रें सविस्तर लिहीत जावीं. बहुत काय लिहिणें ? रवाना आश्विन वद्य चतुर्दशी, हे विनंति."

## लेखांक ४.

## श्रीशंकर.

"तीर्थरूप मातुश्री वहिनी वडिलाचे सेवेसीः—

अपत्यें रघुनाथाचे साष्टांग नमस्कार विनंति उपरी वडिलीं कृपा करून पत्र पाठविलें, तें पावलें. यवनासीं सख्य करावयाविसीं लिहिलें, तरी हे गोष्टी कदापि व्हायाची नाहीं. दबून सलूख केला तरी तो वरसास बोकांडीं बसेल. यास्तव लबाडी फिरोन न करी असें शासन केलें पाहिजे. वडिलीं दम न सोडावा. पुणेंयाची आशा सोडावी. डोंगरावरच राहावें. नाचण्या वऱ्याची भाकर खावूं, परंतु मोंगलास दमास आणूं. जर मोकळें सोडिलें, तरी वरसास सवकेल. वडिलांस सर्व कळतें. वडिलीं तिळभर चिंता न करावी. घराची मात्र आशा सोडावी. जर घराची आशा बाळगाल, तरी दौलत दोहो तिही वरसांत अगदीं बुडेलसें दिसतें. याउपरी वडिलांची इच्छा प्रमाण. आह्मांस कांहीं दवलत नलगे. या मुलासाठीं इतकें करितों. मला दवलत असली तरी नलगे. गेली तरी नलगे. सुखी आहें. परंतु मोंगलास एकदा पोकळ लागेल तरी सवकेल. यास्तव बहुत देखून[2] (?) मग करणें तें करूं. ईश्वरी दयेनें चिरंजीवाची फत्तेच होईलसें आहे. मला जितकें शहाणपण आहे तितकें खर्च करितों. मेहनत, शिपायगिरी, तजविजेनें जें होईल

१ थोरले माधवराव पेशवे ह्यांच्यासाठीं. २ 'हुंदाडून' असाही पाठ होऊं शकेल.

तें करितों. केवळ बुडती शिपायगिरी करीत नाहीं. मनसुब्यानेंच मोंगलास आणितों. करणार ईश्वर आहे. प्रयत्नास चुकत नाहीं. वडिलीं दम न सोडावा हे विनंति"



## १९. फिरंग्याचें औषध.

हिंदुस्थानांत पाश्चिमात्य लोकांनीं पाऊल ठेवल्यापासून आपल्या वैद्यशास्त्र-प्राविण्यानें एतद्देशीय लोकांचें चित्त आकर्षण करून घेण्याचा चांगला प्रयत्न केला हें इतिहासावरून दिसून येतें. जहांगीर बादशाहास सर टॉमस रो, औरंगजेब बादशाहास मनुची वगैरे पाश्चात्य भिषग्वर्यांनीं आपल्या वैद्यविद्येनें सुप्रसन्न करून सोडिलें होतें, हें प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें पेशव्यांच्या कारकीर्दींतही पाश्चात्य भिषग्वर्य हळूहळू पुढें येऊं लागले होते. थोरल्या बाजीरावांच्या कारकीर्दींत डा० सँडी ह्यांचें नांव ऐकूं येतें. सवाई माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत डा० फिंडले व डा० क्रूसो हे पुण्यांतले नामांकित भिषग्वर्य होते; व पेशव्यांच्या राजवाड्यांत व अनेक मराठे सरदारांस ते औषधें देत असत, असें सर चार्लस मालेट ह्यांच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीमध्येंही फिरंगी वैद्यांचा राजवाड्यांत प्रवेश होता, असें दिसतें. त्यांचें कारकीर्दींतील फिरंगी वैद्याचें नांव अद्यापि समजलें नाहीं. परंतु थोरले माधवराव पेशवे फिरंग्यांचें औषध पोटांत घेत असत, हें त्यांच्या एक स्वदस्तुरच्या पत्रावरून दिसून येतें. हे पत्र त्यांनीं आपल्या मातुश्री गोपिकाबाई ह्यांस लिहिलेलें आहे. हें येणेंप्रमाणें:—

[लिलेदस्तर.] श्री.

"तीर्थरूप मातुश्रीबाई वडिलांचे सेवेसी.

अपत्ये माधवरायानें चरणावरी मस्तक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ता. छ २८ जमादिलाखर मुकाम मंगरूल नजीक अजंटे येथें वडिलांचे आशीर्वादें-करून सुखरूप असों. विशेषः—वडिलीं पत्र हंसाजी खिजमतगाराबरोबर पाठविलें, तें पावलें. तेथें आज्ञा कीं, शरीरसंरक्षण विशेष करावें. बाबा वैद्यास व सखारामपंतास समीप सत्वर आणवणें ह्मणून आज्ञा. त्यास सखारामपंत तर मागेंच येऊन तीर्थरूपा-कडे गेले. बाबा वैद्यही टोक्यास ७ ते आहेत. सत्वरच तेही येऊन पोहोंचतील. मोही त्यांस यावयास पत्रे रवाना केलीं आहेत. सत्वरच येतील. वडिलीं पत्रीं आणखी आज्ञा केली कीं, माझें पत्र दुसऱ्यास न करूं देणें ह्मणून आज्ञा. त्यास जशी मर्जी तसेंच करीन. वरकड मजकूर तर सत्वरच तीर्थरूपाची भेट होईल. त्या नंतर सेवेसी लिहीन. प्रस्तुत माझी शरीरप्रकृत बरीच आहे. उरांत दुखत होतें तें प्रस्तुत बरें जालें आहे. परंतु ती जागा बलट व्हावयास्तव अवषध लावीत असतों, व **पोटांतही फिरंग्याचें वोषध घेत असतों.** वडिलांस कळावें, हे विज्ञापना...."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] दिसेंबर १९०९. [अंक ५ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ? रु. स [illegible] ? रु. सह ६ आणे.




अलीबहादूर.

( समशेर बहादराचा पुत्र व बांद्याचा नवाब. )

# ३. आबाजी विश्वनाथ प्रभु दिघे देशपांडे-मुठेखोरेकर.

मराठी साम्राज्याची संस्थापना करणारे श्रीशिवाजी महाराज छत्रपति यांचे लष्करांत मावळे लोकांचाच मोठा भरणा होता, हें इतिहासप्रसिद्ध आहे. हे मावळे सरदार महापराक्रमी व राजनिष्ठ योद्धे होते, यांत शंका नाहीं. ह्या मावळे सरदारांत, जिवाची पर्वा न बाळगिता पराक्रम करणारीं जीं अनेक प्रभुरत्नें निर्माण झालीं, त्यांत मुठेखोऱ्यांतील आबाजी विश्वनाथ प्रभु देशपांडे हे एक होत.

आबाजी विश्वनाथ यांचे वडिलांचें नांव विसाजी बाळ प्रभु, व मातुश्रीचें नांव गिरिजाबाई व स्त्रीचें नांव तुळजाबाई असें होतें. आबाजी यांस आम्राजी असेंही ह्मणत असत. यांस सखोजी या नांवाचे एक बंधु होते. ह्यांचे वडील विसाजी बाळ प्रभु ह्यांनीं, शिवाजी महाराजांस मावळ प्रदेश व त्यांतील किल्ले घेण्याचे कामीं, चांगली मदत केली. त्यांनीं महाराजांस किल्ल्याच्या चोरवाटा दाखवून, आपले भाऊपण्याची मंडळी व शिवाय एक हजार लोक जमवून दिले; व मुसलमानांकडील तोरणा (प्रचंडगड) वगैरे मावळ प्रांतांतील किल्ले व मुलूख घेण्यास पुष्कळच साह्य केलें. त्यामुळें महाराज त्यांजवर फार प्रेम करूं लागले.

आबाजी ऊर्फ आम्राजी विश्वनाथ यांचा जन्म इ. स. १६३१ सालीं झाला. हे शरीरानें उंच, सुदृढ, बुद्धिमान्, कामकाजांत अतिशय दक्ष, चपळ व साहसी होते. ह्यांचें सदा हास्यमुख व मधुर भाषण असून, सर्वांसीं मिळून मिसळून वागणें हा गुण त्यांचे अंगीं मुख्य होता. त्यामुळें त्यांचे हाताखालील लोक नेहमीं संतुष्ट असून, त्यांच्यावर त्यांचें चांगलें वजन असे. दांडपट्टा, निशाण मारणें, वगैरे त्या वेळच्या युद्धकलेंत ते प्रवीण असून, त्यांचे अंगीं धाडस, मुत्सद्दीपणा, वगैरे गुण वसत असल्याचें पाहून, शिवाजी महाराजांनीं त्यांची नेमणूक इ. स. १६४९ मध्यें सभासदांत करून दिली, व त्यांस लहानशी सरदारी देऊन आपले नौकरीस ठेविलें. त्या योगें ते हमेष मावळे लोकांचे जमावानिसीं शिवाजी महाराजांसन्निध राहूं लागले. पुढें लवकरच, अनेक किल्ले व मुलूख काबीज करण्याचे कामांत त्यांचें पराक्रमचातुर्य व्यक्त झालें. तेणेंकरून शिवाजी महाराजांचा त्यांजवर अतिशय लोभ जडला. मोसेखोरेकर बाजी पासलकर देशमुख आणि आबाजी विश्वनाथ हे बहुशा एका जुटीनें असत.

इ. स. १६५३ सालीं शिवाजी महाराजांनीं जावली संस्थान घेण्याची मसलत करून राघो बल्लाळ व संभाजी कावजी या दोघांस जावलीचा राजा चंद्रराव मोरे यांजकडे पाठविलें. त्यांणीं तेथील सर्व टेहळणी करून, शिवाजी महाराजांस कळविलें कीं, मोरे यांस आम्ही जिंकितों, परंतु आमचे रक्षणास आपण जरूर यावें. त्यावरून शिवाजी महाराज मावळी फौज घेऊन जावलीनजीक गेले. हें वर्तमान राघो बल्लाळ यांस कळतांच, त्यांणीं चंद्रराव मोरे व त्यांचा भाऊ सूर्यराव यांस एकांतांत बोलाविलें. नंतर राघो बल्लाळ व संभाजी कावजी यांणीं त्यांचे छातींत खंजीर मारून दोघांसही ठार केलें, आणि आपण पळून शिवाजीचे लष्करांत येऊन दाखल झाले. तेव्हां शिवाजीचे मावळे लोकांनीं जावलीवर एकदम हल्ला सुरू केला. त्या वेळीं मावळे लोकांबरोबर चंद्ररावाचा पुत्र व दिवाण हिंमतराव हे अति निकरानें लढूं लागले. त्यांणीं मावळे लोकांचा बराच नाश केला. हिंमतरावाचे शूरत्वामुळें मावळ्यांचे फौजेचा टिकाव लागेना. उलट शिवाजीचेच फौजेचा मोड होतो असा रंग दिसूं लागून, खुद्द शिवाजी महाराज युद्धास सिद्ध झाले. इतक्यांत आबाजी विश्वनाथ प्रभु यांनीं विनंति केली कीं, 'सेवक जवळ असतां, त्यास मागें ठेवून स्वामींनीं पुढें होणें योग्य नाहीं. क्षणभर दम धरावा.' असें सांगून शिवाजीस थांबवून, आपण पुढें होऊन मावळे लोकांस बोलले, 'मित्रहो, आपण या धारातीर्थीं पडल्यास स्वर्ग जिंकूं, परंतु शत्रूस पाठ दाखविण्यांत परलोकसाधन नसून, आपले शूरत्वास आणि कुलास कलंक लागेल, याचा विचार करा.' असें उत्तेजनपर भाषण ऐकून आणि आबाजी आपले साह्यास आलेले पाहून, फौजेस मोठें स्फुरण चढलें, व सर्व लोक फारच आवेशानें लढूं लागले. आबाजी हातांत ढालतलवार वगैरे शस्त्रें घेऊन हिंमतरावाचे अंगावर तुटून पडले. चार घटका हिंमतरावांशीं आबाजी प्रभूंनीं मोठें निकराचें तुंबळ युद्ध केलें. या झटापटींत आबाजी प्रभूस कपाळावर आणि उजवे मांडीस तलवारीचे वार लागून जखमा झाल्या. शेवटीं, हिंमतरावांनीं मोठ्या जोरानें आबाजी प्रभूवर तलवारीचा वार केला. तो आबाजीनें ढालेवर घेतला, आणि उलट हिंमतरावावर असा जोरानें वार केला, कीं त्यासरसें हिंमतरावाचें शीर धडापासून तुटून खालीं पडलें. हें मोरे यांचे लोकांनीं पाहतांच, ते निराश होऊन पळून गेले; आणि जावली संस्थान शिवाजी महाराजांचे हस्तगत झालें. परंतु वासोटा किल्ला मोरे यांजकडे राहिला. तो इ. सन १६५५ सालीं शिवाजीनें घेतला. ते वेळींही आबाजी विश्वनाथ प्रभु यांणीं पुष्कळ श्रम, साहस व पराक्रम केले.

इ. स. १६५५ सालीं शिवाजीनें रोहिडा किल्ला* घेण्याचा विचार केला.

* हा किल्ला हल्लीं भोर संस्थानांत भोरनजीक रोहीडखोऱ्यांत असोन यास हल्लीं विचित्रगड म्हणतात.

तेव्हां आबाजी विश्वनाथ प्रभु यांणीं फकिराचा वेष घेऊन, किल्ल्यावर जाऊन किल्ल्याची सर्व टेहळणी केली; आणि किल्ल्यावर किती लोक आहेत, बंदोबस्त कसा आहे, दारूगोळा किती आहे, वगैरे सर्व माहिती शिवाजीस कळविली. नंतर एके दिवशीं शिवाजीनें मावळी फौज बरोबर घेऊन, रात्रीं किल्ल्याजवळ जाऊन, किल्ल्यांतील लोक बेसावध असतां, रात्रींच किल्ल्याचे तटास शिडी लाविली. त्या शिडीवर प्रथम शिवाजी महाराज चढले. त्यांचे मागें आबाजी प्रभु व त्यांचे मागें मावळची फौज याप्रमाणें सर्व लोक चढून किल्ल्यांत उतरले. या लोकांचा गलबला ऐकतांच, किल्ल्याचा अधिकारी, हरणस मावळचा बंडाळ उपनांवाचा देशमुख, व जावलीचा बाजी प्रभु देशपांडे हे, जागे होऊन पाहतात तों शिवाजीचें लष्कर किल्ल्यांत आलें आहे. तेव्हां त्यांणीं शस्त्रें घेऊन व किल्ल्यांतील लोकांस उठवून युद्धास सिद्ध केलें, व ते सर्व शत्रूंशीं मोठे शौर्यानें लढूं लागले. बंडाळ देशमुख आपले लोकांस उत्तेजन देऊन, आपण मोठ्या वीरश्रीनें शिवाजीचे फौजेवर चालून आला. त्या हातघाईंत आपले व परके लोक ओळखतां यावे, म्हणून आबाजीनें, तेथें गवताची मोठी गंज होती ती व गडकऱ्यांचीं राहण्याचीं कांहीं छपरें हीं पेटवून मोठा प्रकाश केला. मावळे लोक हताश झाले होते. त्यांजला आबाजी विश्वनाथ प्रभु यांणीं उत्तेजन देऊन, आपण जिवाची पर्वा न बाळगितां त्या गर्दींत शिरून, बंडाळ देशमुखाचे लोकांचा परांभव करीत चालले. बंडाळचे बरेच लोक आबाजीचे हातून मृत्युमुखीं पडलेले पाहतांच, बंडाळ हा आबाजीवर एकदम चालून गेला. बंडाळ देशमुख हा सामान्य पुरुष नसोन मोठा पराक्रमी व रणझुंजार योद्धा होता. बंडाळ आणि आबाजी प्रभु हे दोघेही मोठे वीरश्रीनें एक प्रहरपर्यंत लढत होते. या झटापटींत आबाजीस चार ठिकाणीं लहानमोठ्या जखमा झाल्या. अखेर आबाजींचा वार बंडाळ यांस मर्मस्थानीं लागल्यामुळें बंडाळ देशमुख मूर्च्छा येऊन जमिनीवर पडला. त्यामुळें त्याचे लोक युद्ध टाकून दशदिशा पळत सुटले. परंतु जावलीचा बाजी प्रभु मोठे शौर्यानें लढूं लागला. त्यास आबाजीनें सांगितलें कीं, 'आपण शूर पराक्रमी आहांत, हें मी जाणतों. हें युद्ध आहे. यांत परमेश्वर यश अपयश कोणास देईल, याचें अनुमान करतां येत नाहीं. आपण स्वज्ञाती, आप्तविषय असले-कारणानें तुम्हांबरोबर दोन हात करणें मला योग्य वाटत नाहीं. तुमचा जोडीदार पडला; लोक पळताहेत; आतां तुम्ही व्यर्थ श्रम करून उपयोग होईलसें दिसत नाहीं. आपले केसास किंवा अंगास यत्किंचित्‌ही धक्का न लागतां, मर्जी असल्यास, तुमचे योग्यतेनुरूप शिवाजी महाराजांकडून तुम्हांस सरदारी देववीन.'

हें भाषण ऐकून बाजी प्रभूनें युद्ध बंद केलें, व किल्ला शिवाजी महाराजांचे हातीं दिला.

नंतर आबाजी प्रभूंनीं बाजी प्रभु यांस शिवाजी महाराजांस भेटविलें, आणि त्यांचे शौर्याची तारीफ करून विनंति केली कीं, असे शूर पराक्रमी पुरुष स्वामींचे पदरीं असल्यास फार उपयोग होईल. शिवाजीनेंही बाजी प्रभूंचें शौर्य प्रत्यक्ष पाहिलेंच होतें. तेव्हां शिवाजीनें बाजी प्रभूंस पोषाख वगैरे देऊन, सन्मान करून, सभासदांत असामी घालून, सरदारी देऊन, आपले नौकरीस ठेविलें. तसेंच बंगाळचे फौजेंतील जे लोक शिवाजीचे नौकरींत राहण्यास कबूल झाले, त्यांस नौकरीस ठेविलें. जे कबूल नव्हते, त्यांस घरीं जाण्यास परवानगी दिली.

यानंतर शिवाजी महाराजांनीं पुष्कळ मुलूख व किल्ले काबीज केले. ते वेळींही आबाजी विश्वनाथ प्रभु यांणीं पुष्कळ श्रमसाहस व पराक्रम केले; व शिवाजीनेंही त्यांजला पुष्कळ बक्षिसें आणि पोषाख देऊन मोठे योग्यतेस चढविलें.

इ. स. १६८० सालीं शिवाजी महाराज कैलासवासी झाले, आणि संभाजी महाराज सिंहासनारूढ झाले. त्यांणीं मोठमोठे सरदार व मुत्सद्दी लोकांची दुर्दशा केली. जमीनदार, देशमुख, देशपांडे व पाटील वगैरे वतनदारांचीं वतनें अमानत करून, त्यांजला हक्काच्या नेमणुका करून दिल्या. त्यामुळें मावळ प्रदेशचे सर्व लोक हवालदील झाले. सरदार लोकांवर केव्हां काय प्रसंग गुदरेल याचा नियम राहिला नाहीं. यामुळें ते रात्रंदिवस चिंताग्रस्त झाले. औरंगजेबाचे मनांत सर्व हिंदुस्थानांत एक महंमदी धर्म आणि एकछत्री राज्य करावें, असा हेतु फार होता. त्यामुळें मराठी राज्य बुडविण्यास ही उत्तम संधि आहे असें पाहून, त्यानें महाराष्ट्र प्रांतावर मोर्चा फिरविला. मोंगली फौजेनें मोठी धुमाकूळ मांडली. कांहीं मोंगली फौज मावळ प्रदेशांत येऊन गांवें लुटूं व जाळूं लागली. यामुळें बराच मावळ प्रदेश ओसाड झाला.

अशा प्रसंगीं आबाजी विश्वनाथ प्रभु व त्यांचे भाऊबंद यांणीं रयतेस दिलभरंवसा दिला, आणि परमहालांतून लोक आणून, त्यांस कांहीं जमीन वगैरे देऊन आपले मुलखाची वसाहत करविली; व आपले लष्करांत लोकांची थोडीसी भरती केली. मोंगल सैन्यांतील लोकांच्या टोळ्या इकडे येत. त्यांवर छापे घालावे, किंवा एखादे वेळीं त्यांच्याशीं युद्ध करून हांकून लावावे, असा त्यांनीं क्रम चालविला. परंतु फौजेचा पगार महाराजांकडून मिळणें मुष्कील होतें. यास्तव तोही पदरचा देऊन त्यांनीं प्रांताचें रक्षण केलें.

इ. स. १६८९ सालीं औरंगजेबानें संभाजी महाराजांचा वाईट रीतीनें अंत केला. हें वर्तमान समजतांच आबाजीचे तळव्याची आग मस्तकास गेली. सर्व मावळ प्रदेशचे लोक क्रोधाविष्ट झाले, आणि मोंगलांचें पारिपत्य करण्याविषयीं त्यांजला पराकाष्ठेचें स्फुरण चढलें.

याच सालीं राजाराम महाराज तक्तारूढ झाले. त्यांहीं खंडो बल्लाळ चिटणीस व प्रऱ्हाद निराजी यांचे मसलतीनें, निळकंठ मोरेश्वर यांस मुख्य प्रधान व रामचंद्रपंत बहुतकर यांस हुकमतपन्हा हें पद दिलें; आणि महादाजी नाईक व खंडेराव गोमाजी पानसंबळ (जिजाऊ साहेबांचे विश्वासूक) यांस सेनापति नेमिलें. मावळ प्रांतांतील सर्व महालचे जमीनदार देशमुख व देशपांडे यांस बोलावून, त्यांजला दिलभरंवसा देऊन, त्यांजकडे शिवछत्रपतीचे वेळेस सरदाऱ्या होत्या, त्या पूर्वींप्रमाणें मुकरर केल्या; आणि सर्वांनीं आपआपले महालची वसाहत करून, प्रत्येकानें मिळतील तितके लोक मिळवून मोठाले जमाव करावे, व जिकडे ज्या सरदारास मदत लागेल तिकडे मदत करून मोंगलांचें निर्मूलन करावें ह्मणोन आज्ञा केली. जमीनदार वगैरे लोकांचीं वतनें संभाजीनें पूर्वीं जप्त केलीं होतीं, तीं त्यांनीं खुलीं करून, पूर्वींप्रमाणें ज्यांचीं त्यांजकडे चालवावीं, असे कामगार लोकांस हुकूम पाठविले.

संभाजी महाराजांचा अंत झाल्यानंतर मोंगल लोक प्रबळ झाले, आणि ते सर्व मुलखांत अतिशय उपद्रव करूं लागले. सन १६९० सालीं त्यांनीं रायगड, मिरज, पन्हाळा, वगैरे किल्ले घेतले. चहूंकडे मोंगलांची फौज पसरली. मावळ प्रदेशांतही मोंगली लोकांच्या टोळ्या शिरल्या.

मुठेखोरें व मोसेखोरें महालांत मोंगली लष्कराच्या वरचेवर टोळ्या येऊन ते मुलूख लुटूं व जाळूं लागले; व अनेक प्रकारें उपद्रव देऊं लागले. तेव्हां आबाजी विश्वनाथ यांणीं आपला भाऊपणा जमवून, भराभर फौजेचा जमाव तयार केला, आणि शिवाजी महाराजांचा लोभ व राजाराम साहेबांची आज्ञा, तसेंच स्वराज्याचा अभिमान हीं चित्तांत आणून, जिवाची पर्वा न बाळगितां, मोंगल लोकांवर छापे घालावे, रसदा लुटाव्या, त्यांचे रस्ते आडवावे, त्यांच्याशीं युद्ध करून त्यांचे लोक मारून हांकून लावावे, असा क्रम चालविला. पूर्वीं संभाजीचे व मोंगलांचे त्रासामुळें जो मुलूख वैराण झाला होता, त्याची मोठे प्रयासानें

---

१ इ. स. १६८२।८३ साली संभाजीनें जमिनीवर धारा फार जडीप वाढविला; व मक्त्यानें मामलती दिल्या. तेव्हा रयतेनें त्रासून गाव टाकिले. (ग्रांट डफ साहेबांची मराठ्यांची बखर—पृष्ठ १४७।१४८).

वसाहत नुकतीच होत चालली होती. तों पुन्हां या मुसलमानांच्या दंग्यामुळें पूर्ववत् स्थिति होऊन, मुलूख बेचिराख होण्याचा समय आला. अशा वेळीं लोकांस उत्तेजन येण्यासाठीं, ज्या गांवास पाटील वगैरे वतनदार नव्हते, तेथें परमहालांतून लोक आणून, त्यांस पाटिलक्या वगैरे वतनें व मिराशी जमिनी व आपले लष्करांत नौकऱ्या दिल्या. याप्रमाणें प्रयत्न करून फौजेचा जमाव वाढेल तितका वाढविला.

इ. स. १६९० सालीं खंडेराव गोमाजी पानसंबळ सेनापति यांनीं मदतीस बोलाविलेवरून, आबाजी प्रभु हे आपले भाऊपण्यासहित फौजेनिसीं जाऊन सेनापतीचे लष्करांत सामील झाले; व त्यांनीं मोंगली फौजेवर छापे घालून व त्यांच्या रसदा व दाणावैरण लुटून फार नाश केला. या वेळीं त्यांनीं पुष्कळ मोंगली फौज ठार केली. आणि मोंगलांनीं घेतलेला बराच मुलूख व किल्ले काबीज केले. छापे घालण्याचे कामांत आबाजी प्रभु हे फारच दक्ष व तरबेज असत. आपले लष्करावर मोंगलाचे छापे येऊं नयेत, कदाचित् आले तर त्यांचें तत्काळ निवारण व्हावें, ह्मणोन रात्रंदिवस आबाजी विश्वनाथ हे फारच सावधगिरी व दक्षता ठेवीत असत.

आबाजी विश्वनाथ प्रभूचे पराक्रम व साहस पाहून, सेनापति पानसंबळ फार संतोष पावले, व त्यांजवर फार प्रेम करूं लागले. पूर्वी संभाजी महाराजांनीं जमीनदार, देशमुख व देशपांडे यांचीं व पाटील वगैरे लोकांचीं वतनें अमानत केलीं होतीं, तीं पानसंबळ यांनीं मोकळीं करून, तीं ज्यांचीं त्यांस परत दिलीं. या समयीं ह्मणजे इ. स. १६९० मध्यें त्यांनीं आबाजी प्रभु यांस पुढें लिहिल्याप्रमाणें सनद करून दिली:—

श्री.

"मशरुल अनाम राजश्री हवालदार व कारकून, हाल व इस्तकबल, तर्फ मुठेखोरें गोसावी यांसीः- खंडेराव पानसंबळ सुरू सन इहिदे तिसैन आलफः—आजी तीस वर्षें आपल्या राज्यांत मोंगलाची धामधूम होत आहे, यामुळें मुलूख हैरान जाला. सालगुदस्त किल्ले रायगड मोगलास कबज जाला. यामुळें मुलखामध्यें मोंगलाई अम्मल चालिला. हल्लीं श्रीकृपेनें आपले राज्याचा मामला थाटत चालिला. ऐसीयासी देशमुख व देशकुलकर्णी व मोकदम, चौगुले, बाजे वतनदार येहीं येऊन अर्ज केला जे, आपण वतनदार, राजश्री साहेबांच्या पायास एकनिष्ठ आहों. राजश्री कैलासवासी स्वामींचे वेळेस आपलीं वतनें अमानत करून, हक्काच्या मोईनी करून देत होते. सांप्रत गनिमाचे धामधुमेकरितां व दुष्काळाकरितां रयेत गेली, मेली. जुजबी राहिली, त्यांस खाण्यास व वापरण्यास नाहीं. ये जातीचा रयतीचा विचार

जाला आहे. रयतीचे बहुत वजा दिलासा करून, कीर्दमाहामुरी करवून, साहेबाचे किल्ले कोटास मदत करावी लागते. तरी, साहेबीं आह्मां वतनदारांवरी कृपाळू होऊन आमचीं वतनें, इनामती व इसापती, हक्क लाजिमे जे आहेत, ते आमचे आमच्या दुमाला केलीं पाहिजेत, ह्मणोन अर्ज केला. त्यावरून हकीकत मनास आणून पाहतां, वतनदारांचीं वतनें दुमाला केल्याविरहित पोटतिडकी लागोन मंहामूर होत नाहीं, व मुलखांची जफ्तरफ्त होत नाहीं, ऐसें कळों आलें. त्यावरून देशमुख व देश-कुलकर्णी, मुतालीक, हेजीब, मोकदम, गांवकुलकर्णी व चौगुले व बाजे मिरासदार यांचीं वतनें व इनामती व इसापती व शेरीया हक्क लाजिमा यांचे यांच्या दुमाला केलीं असेत. तरी तुह्मीं सदहूं लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. तालीक लिहून घेऊन अस्सल फिरावून देणें. छ १२ मोहरम परवानगी हुजूर."

ही सनद दिल्यानंतर पानसंबळ यांणीं पुन्हां खालीं लिहिलेप्रमाणें दुसरी सनद दिली:—

श्री.

"मशरूल अनाम हवालदार व कारकून हाल व इस्तकबल तर्फ मुठेखोरें यांसीः- खंडेराऊ पानसंबळ सुरुसन इहिद्दे तिसैन अलफ. मशरूल रुमाजी गंभीरराऊ व साबाजीराऊ मारणे देशमुख व आंब्राजी विसाजी प्रभु देशपांडीये तर्फ मजकूर यांचीं शेतें व कामथ (?) व सेरीया व इनाम गांवगन्ना आहेत. तें यांचीं यांच्या दुमाला केलें असेत. तरी तुह्मी जें गांवगन्ना असतील तें मनास आणोन, सालाबाद चालिलें असेल त्याप्रमाणें चालवीत जाणें. हल्लीं शेरिया, ठिकाणें येणेंप्रमाणें बीतपसील:—

मौजे खरवड्यापैकीं, बहुलीपैकीं, उरवड्यापैकीं, पिरंगूटपैकीं, वेगऱ्यापैकीं, मांडवखडकखंडीया.

सदरहूप्रमाणें यांची यांचे दुमाला केलीं असेती. तरी यांचे वाटे नवजाणें. याखेरीज यांचे आणखी गांवगन्ना असतील, तीं मनास आणून सालाबाजप्रमाणें चालवणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. तालीक लेहून घेऊन अस्सल फिराऊन देणें. जाणिजे छ० २४ मोहरम परवानगी हुजुर सुरुसुदबार."

ज्या वेळीं राजाराम महाराज जिंजीकडे गेले, त्या वेळीं त्यांणीं इकडील मुलुखाचे व फौजेचे बंदोबस्ताचें काम, रामचंद्र आबाजी बहुतकर हुकमतपन्हा यांस व आणखी कांहीं विश्वासूक मंडळीस सांगितलें. तेव्हां आबाजी विश्वनाथ हे आपले लोकांनिशीं रामचंद्रपंत यांचे लष्करांत सामील झाले.

रामचंद्रपंतांचे लष्करांत मौजे मांगदरी तालुके राजगड* येथील राहणारे शंकराजी नारायण गांडेकर† हे अतिशय हुशार, शूर, युद्धकलेंत प्रवीण, मुत्सद्दी,

*हा गाव हल्ली भोर संस्थानांत आहे.

† हे हल्लीं भोर संस्थानचे जे अधिपति आहेत, त्यांचे पूर्वज. यांजलाच मूळ सचीव हें पद राजाराम साहेबांनीं दिलें.

धाडसी असे कारकुनीचे कामावर होते. त्यांचे बरोबर रामचंद्रपंतांनीं, मावळच्या जमाव व आबाजी विश्वनाथ दिघे यांस देऊन, मावळ प्रदेश काबीज करण्यासाठीं पाठविलें. त्यांजला आबाजीनें मावळच्या व किल्याच्या चोरवाटा इत्थंभूत दाखविल्या. शंकराजी नारायण ह्यांनीं मावळांत राहून, आबाजी विश्वनाथ यांचे मसलतीनें व साह्यानें, मावळची निवडक फौज बरोबर घेऊन, मोंगलाच्या फौजा माराव्या व त्यांस अनेक प्रकारें उपद्रव करावा, असा क्रम सुरू केला. मोंगल लोक डोंगरावर चढण्याउतरण्याच्या कामांत अगदींच अनभ्यासी हें जाणून, शंकराजी नारायण यांनीं थोड्या फौजेनिशीं युद्धास जावें व आपणच डोंगराचे आश्रयास पळावें. इकडे शंकराजी आपले हातीं सहज लागतो असें समजून मोंगली फौज त्यांजला धरण्याकरितां त्यांचे पाठीस लागून डोंगरांत येई. तों आबाजीनें मोठे फौजेनिशीं एकदम त्यांजवर हल्ला करावा व मोंगली फौजेची वाताहत करावी, आणि त्यांणीं घेतलेला मुलूख व किल्ले काबीज करावे. अशा रीतीनें त्यांनीं मराठी राज्याचें रक्षण केलें.

इ. स. १६९१ सालीं आबाजी विश्वनाथ व शंकराजी नारायण हे मावळचे फौजेसहित, किल्यावरील लोक बेसावध पाहून, रात्रौ गुप्त रीतीनें *राजगड किल्यावर बिकट वाटेनें चढून गेले, आणि एकाएकीं किल्यांतील मोंगल लोकांवर छापा घातला. त्यांत बरेच मोंगल लोक मारले गेले. थोडे उरले ते पळून गेले. अशा रीतीनें तो किल्ला व त्याखालील मुलूख शंकराजी नारायण यांचे हस्तगत झाला. या वेळचें आबाजीचें चातुर्य व पराक्रम पाहून शंकराजीपंत फार संतोष पावले.

शंकराजी नारायण यांणीं मावळ प्रदेशची पुष्कळ फौज जमविली, आणि तोरणा† किल्ला घेण्याकरितां सर्व किल्यासभोंवतीं फौजेचा वेढा दिला. जागजागीं मोर्चे बांधले. किल्यावर जाणारी मोंगलाची रसद व दाणा, किल्यावर जाऊं न देतां मध्येंच हस्तगत व्हावा, असा बंदोबस्त केला. किल्यावर दारूगोळा व धान्यसामुग्री अगदीं अल्प असलेकारणानें तो संचय संपला. बाहेरून मदत येण्याची आशा बिलकूल राहिली नाहीं. तेव्हां किल्यांतील मोंगल लोकांनीं, किल्यांत कोंडून उपाशीं मरण्यापेक्षां किल्याबाहेर एकदम पडून निकराचा

* राजगड हा डोंगरी किल्ला गुंजणमावळांत आहे. तो हल्लीं भोर संस्थानचे ताब्यांत आहे.

† यासच प्रचंडगड ह्मणतात. हा डोंगरी किल्ला कानदखोऱ्यांतील वेलेगांवानजीक एका उंच डोंगरावर असोन हल्ली भोर संस्थानांत आहे.

हल्ला करावा; त्यांत जय किंवा अपजय काय येईल तें येवो; असा विचार करून दरवाजा उघडला; आणि सर्व मोंगल लोक एकदम बाहेर मेटावर ( माचीवर ) येऊन, तेथून ते मावळे लोकांशीं युद्ध करूं लागले. मोंगल लोक डोंगराचे टेकडीचे माथ्यावरून मावळी फौजेवर एकसारखा बंदुकीचे गोळ्यांचा वर्षाव करूं लागले. मावळी फौज डोंगराखालीं टेकडीचे पायथ्याशीं असल्यामुळें त्यांजवर मोंगलांचा जबर मारा होऊन फार नाश झाला. आतां लवकरच शंकराजीपंताचे फौजेचा मोड होईल असें दिसतांच, आबाजी विश्वनाथ प्रभु यांनीं मावळी फौजेस सांगितलें की, 'तुह्मी क्षणभर धीर धरून, थोडथोडे मागें हटत जा, ह्मणजे मोंगल लोक टेकडीचे खालीं येऊं लागतील. तोंपर्यंत मी त्यांचे पाठीमागें जाऊन पोंचतों. नंतर आपण त्यांजवर पाठीमागून व पुढून असा दोहींकडून निकरानें जोराचा मारा चालू करूं, ह्मणजे आपलें सहज कार्य होईल.' असें सांगून आबाजी प्रभु हे कांहीं फौज बरोबर घेऊन एका ओहळांत शिरले. इकडे मावळे लोक मागें हटत चालले असें पाहतांच, हे पळून जाण्याचे बेतांत आहेत असें समजून, त्यांजवर मारा चालू ठेवण्याकरितां मोंगली फौज टेकडीचा माथा सोडून, टेकडी उतरून खालीं येऊं लागली. इतक्यांत आबाजी एका दरींतून मोठ्या दुर्घट चोरवाटेनें टेकडीवर जाऊन पोंहचले. आबाजीस पाहतांच खालून मावळ्यांनीं मोंगली फौजेवर अतिशय भयंकर मारा चालविला. त्यायोगें मोंगली फौज बहुतेक हताश होऊन, तोबा तोबा करीत रणविन्मुख झाली, व सैरावैरा पळून गेली. ह्याप्रमाणें तोरणा किल्ला शंकराजी नारायण यांचे हस्तगत झाला. शंकराजी नारायण ह्यांनीं आबाजी प्रभूचें शौर्यपराक्रम व शहाणपण पाहून, तोरणा किल्ला हस्तगत होतांच तो त्यांचेच स्वाधीन केला, व त्यांस नामजाद (मामलेदार) करून तेथें ठेविलें.

मावळ प्रांतांतील लोकांवर शिवाजी महाराजांचें प्रेम विशेष होतें. तसेंच त्या लोकांचीही महाराजांवर पूर्ण भक्ति होती. त्याचप्रमाणें त्यांची राजाराम महाराज यांवरही होती. या वेळीं राजाराम महाराज चंदीस होते.सबब महाराजांचें दर्शन घ्यावें व इकडील हकीकत कळवावी या हेतूनें, बरीच मावळी मंडळी इकडून चंदीस गेली. त्याप्रमाणें रोहीडखोऱ्याचे सर्जेराव जेधे देशमुख हे चंदीस राजारामसाहेब यांचे दर्शनास गेले. तेव्हां त्यांणीं महाराजांस विदित केलें की, मुठेखोऱ्याचे वतनदार व रयत स्वामींचे पायास एकनिष्ठ आहेत. यास्तव त्यांचीं वतनें पूर्वी निजामशाही व आदिलशाही कारकीर्दींत चालत होतीं, त्याप्रमाणें चालविण्याविषयीं स्वामींनीं आज्ञा केली पाहिजे. त्यावरून महाराजांनीं पुढें लिहिलेप्रमाणें अभयपत्र पाठविलें:—

श्री.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १८ प्रजापतिनाम संवत्सरे श्रावण बहुल चतुर्दशी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपति यांणीं, देशमुख व देशकुलकर्णी व गांवकुलकर्णा व. मोकदम व चौगुले व शेठे व महाजन व बाजे वतनदार तर्फ मुठेखोरें यांसी दिल्हें अभयपत्र ऐसीजेः-मशरूल सर्जेराव जेधे देशमुख तर्फ रोहीड-खोरें हे स्वामिसंनिध चंदीचे मुक्कामीं येऊन विदित केलें कीं, तर्फ मजकूरचे वतनदार लोक रयत देखील स्वामींचे पायासीं एकनिष्ठ आहेत. तरी स्वामींनीं कृपाळू होऊन, वतनदारांस वतनें, पहिले निजामशाही व आदिलशाही यांचे वेळेस चालत होतीं, तेणेंप्रमाणें चालवावयाची आज्ञा करून, अभयपत्र देविलें पाहिजे ह्मणोन. तरी तुह्मी स्वामींचे पायांसीं एकनिष्ठ आहां. यावरून स्वामी तुह्मांवरी संतोषी आहेत. त्या प्रांतींच्या राज्याच्या कार्यभागास स्वामींनीं राजश्री रामचंद्रपंत आमात्य व राजश्री शंकराजीपंत सचीव ठेविले आहेत. तरी त्यांजवरी मुक्त्यार आहे. तेंहीं तुमचें वर्तमान मनास आणून, वतनाचा निर्वाह करून, सनदा दिधल्या असतील, त्या स्वामींच्याच सनदा आहेत, त्याप्रमाणें स्वामी चालवितील. आपलें समाधान असों देणें. मावळ प्रांत राजश्री शंकराजी पंतसचीव यांचे दिमतीचे मुलुखांत आहे. याकरितां तुह्मीं त्यांचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करीत जाणें, आणि स्वामिकार्य करून आपला मजुरा करून घेणें. पुढें स्वामी त्या प्रांतीं येतील, तेव्हां तुमचें ऊर्जित करितील. अभय असे जाणिजे. निर्देश समक्ष."

हें अभयपत्र सर्जेराव यांजबरोबर आलें. तें पाहतांच मुठेखोरें महालचे जमीनदार वगैरे मंडळीस अतिशय आनंद झाला, व त्यांनीं मोठ्या शौर्यानें मोंगली फौजेचा पराभव करून भराभर किल्ले व मुलूख काबीज केले.

शंकराजीपंत सचीव यांनीं मावळची फौज बरोबर घेऊन मोंगलाकडील राजगड, तोरणा, रोहिडा, वगैरे किल्ले व बराच मुलूख घेतला. हें वर्तमान औरंगजेब बादशाहांस कळतांच, त्यांणीं हे किल्ले व मुलूख परत घेण्याकरितां, शाबादीखान नामें सरदारास फौज देऊन पाठविलें. शाबादीखानानें इ. स. १६९४ सालीं प्रचंडगडास (तोरणा किल्ल्यास) चहूं बाजूंनीं वेढा दिला. तेव्हां आबाजी विश्वनाथ प्रभु नामजाद यांणीं आपले लोकांचा चांगला बंदोबस्त व तयारी केली. सभोंतालचे बरेच गांव ओसाड असलेमुळें किल्ल्यावर धान्यादिक सामुग्री अगदीं अल्प होती. तथापि त्यांनीं न डगमगतां, शाबादीखानाचे लष्करावर किल्ल्यावरून अचुक तोफेचे गोळे टाकून व रात्रीं छापे घालून, शाबादीखानाचे लष्कराचा फार नाश केला.

तोरणा किल्ल्याचे उंच व सरळ काळेभोर कडे तुटलेले असोन, त्या कड्यांवर तट व जागजागीं माऱ्याचे ठिकाणीं बुरूज बांधलेले आहेत. त्यावरून तोफेचे

गोळे सोडले असतां बरेच लांबपर्यंत मारा पोंचतो. यामुळें शाबादीखानाचे फौजेचा बहुत नाश झाला. किल्ल्याचा दरवाजाही उत्तराभिमुख कड्याचे माथ्यावर आहे, व तेथें चढून जाण्यास कड्यास पायऱ्या केलेल्या आहेत.

शाबादीखान यानें किल्ल्यावर धान्यादिकांचा पुरवठा न होईल असा सक्त बंदोबस्त केला. तथापि किल्ल्यांत जें धान्य होतें, तें बेताबातानें आबाजीनें आपल्या सैनिकांस देऊन, चार महिनेपावेतों शाबादीखानास दाद दिली नाहीं.

शाबादीखानानें आबाजीस निरोप पाठविला कीं, 'तुम्हीं किल्ला आमचे स्वाधीन केला, तर मी बादशाहांकडून तुम्हांस इनामगांव व मोठी सरदारी देववीन.' त्यावर आबाजीनें परत निरोप पाठविला कीं, 'मी असा निमकहराम नाहीं. आमचे धन्यापाशीं मजला इनाम गांव व जहागीर वगैरे देण्यास कांहीं कमी नाहीं. मी हयात आहें तोंपर्यंत किल्ला तुमचे हातीं देणार नाहीं.'

किल्ला लढून हातीं येणें दुर्घट व फितूरही होत नाहीं असें पाहून शाबादीखानानें वेढ्याचा अधिकच बंदोबस्त केला. यामुळें बाहेरून धान्य येण्याची बिलकूल आशा राहिली नाहीं. इकडे पंतसचीव व इतर सरदार अनेक ठिकाणीं मोंगलांशीं युद्ध करण्यांत गुंतले होते. त्यामुळें बाहेरूनही कोणाची मदत येईल असें दिसेना. किल्ल्यांतील धान्य तर संपत आलें. एखादे बाजूनें किल्ल्यावर धान्य आणण्याची सोय जुळवावी म्हणोन आबाजीनें शाबादीखानाचे फौजेत कांही फितूर करण्याचाही प्रयत्न केला. परंतु कोठेंच जम जमेना. शेवटीं, आबाजीनें विचार केला कीं, आतां किल्ल्यांत कोंडून घेऊन निभाव लागत नाहीं. याकरितां बाहेर पडून एकदम हल्ला करावा. मग त्यांत परमेश्वर काय यश देईल तें देवो.

शाबादीखानाची फौज अफाट होती, तथापि किल्ल्यांतील लोक बिलकूल डगमगले नाहींत. आबाजीनें लोकांस प्रोत्साहन देऊन किल्ल्याचा दरवाजा उघडिला आणि बाहेर येऊन एकदम मोंगल फौजेवर हल्ला सुरू केला. आबाजीचे लोक जिवाची पर्वा न बाळगितां मोठे निकरानें लढले, व आबाजी विश्वनाथ अग्निगोलाप्रमाणें एकसारखा मोठ्या शौर्यानें मोंगली फौजेशीं लढूं लागला. शाबादीखानाची फौज पुष्कळ होती, परंतु ती बहुतेक किल्ल्याचे सभोंवतीं वेढ्याचे कामांत गुंतली असलेमुळें डोंगरापलीकडे अडचणीच्या जागीं अडकली होती, आणि थोडीच युद्धाचे ठिकाणीं हजर होती. आबाजीचे जरब मारापुढें मोंगली फौजेस टिकाव धरवेना. कितीएक वेळां मोंगलांचे लोक मागें हटले, व आतां मोंगलांचा पराभव होतो असें वाटूं लागलें. हें शाबादीखानानें पाहतांच, तो स्वतःच आबाजीचे समोर युद्धास सिद्ध

झाला. आबाजीनें सुमारें एक प्रहरपर्यंत मोठ्या कौशल्यानें त्याच्याशीं भयंकर युद्ध केलें. या झटापटींत शाबादीखानाचे डोक्यावर व दंडावर व डावे मांडीस जखमा झाल्या. येणेंप्रमाणें दोघांनींही मोठ्या निकराचें युद्ध केलें. अखेर शाबादीखानाचे हातून आबाजी प्रभूचे छातींत वार लागला, आणि हा शूर वीर धारातीर्थी पतन पावला. तेणेंकरून तोरणा किल्ला शाबादीखानाचे हस्तगत झाला. हें वर्तमान इ. स. १६९४ सालीं घडलें.

हें वर्तमान शंकराजी नारायण सचीव यांस समजतांच, आबाजीचे मृत्यूबद्दल त्यांस अतिशय दुःख व खेद झाला. ह्या रणझुंजार व स्वामिनिष्ठ प्रभुवीराचे पराक्रम पाहून कोणाही वीरपुरुषास कौतुक वाटेल, ह्यांत शंका नाहीं. शंकराजी नारायण ह्यांनीं आबाजी प्रभूच्या मर्दुमकीबद्दल तारीफ करून, त्याच्या अप्रतिम स्वामिभक्तीचें चांगलें चीज केलें. त्यांणीं आबाजीचे पुत्र, जनाजी (जानोजी) आबाजी प्रभु, यांचें सभासदांत (सरदारांत) नांव दाखल केलें, आणि मौजे जातेडें तर्फ मुठेखोरें हा गांव वंशपरंपरा इनाम करून देऊन शिवाय एक हजार होनांचा सरंजाम बक्षीस दिला. हें इनामपत्र खालीं लिहिलेप्रमाणें आहेः—

## श्रीशंकर.

"राजश्री माणको मल्हार हवालदार तर्फ मुठेखोरें गोसावी यांसीः—

७ सेवक शेषो गोविंद मजूमदार सुभा प्रांत मावळे तालुके लोहगड नमस्कार सुरू सन खमस तिसैन आलफ. राजश्री सचीवपंत यांची सनद छ ७ जमादिलावल पैवस्ती छ ७ साबान. तेथें आज्ञा कीं बद्दल देणे इमानती जानो आबाजी प्रभु, मशारनिल्हेचा बाप आबाजी विश्वनाथ किल्ले प्रचंडगड गनीमापासून हस्तगत केला, तेथें नामजाद ठेविले होते. किल्ले मजकुरीं शाबादीखान मोंगल याणे जाऊन वेढा घातला होता. तेथें युद्धप्रसंगामध्यें स्वामिकार्यावरी पडिले. त्यांचे कुटुंबाचें चालवावें हें अगत्य ह्मणून मौजे जातेडें तर्फ मजकूर हा गांव कुलबाब कुलकानू इनामती दिली असे. तरी मशारनिल्हे जानो आबाजी यांचे दुमाले करून, इनाम वंशपरंपरेनें चालवणें. दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें. सनदेची तालीक लेहोन घेऊन अस्सल सनद फिरावून देणें. इनाम खेरीज हक्कदार करून दुमाले करणें ह्मणोन आज्ञा. आज्ञेप्रमाणें तुह्मांला सुभाची सनद सादर केली असे. तरी मौजे मजकूर सालमजकुरापासून यांचे दुमाला करणें. राजभाग गल्ला, व नक्तबाब साल दरसाल आकार होईल तो कुलबाब कुलकानू दुमाला करीत जाणें. खेरीज हक्कदार दुमाले करीत जाणें. सुभाचे सनदेची

तालीक लेहोन घेऊन महालीं विल्हे लावणें. अस्सल सनद फिरावून देणें. ताजे सनदेचा उजूर साल दरसाल न करणें. छ. ७ साबान."

पैवस्ती छ. ५ रमजान.

जनाजी आबाजी प्रभु यांस सदरचे इनाम गांवाशिवाय एक हजार होनांची सरंजामी नेमणूक पंतसचीव यांहीं करून दिल्याचें वर सांगितलेंच आहे. सदरहू नेमणूक इ. स. १६९४ सालीं करून सनद करून दिली. परंतु इ. स. १६९५ सालीं कोरीगड मोंगलाचे हस्तगत झाला, त्या दंग्यांत सदरहू सनद गहाळ झाली. तेव्हां पंतसचीव यांहीं खालीं लिहिलेप्रमाणें पुन्हां सनद करून दिली:—

श्री.

"वर्कु सनद मशरुल जनाजी आबाजी सभासद प्रयोजन लेखक सबनिसी दिम्मत खासखेली हासम पावलोक सुरु सन सीत तिसैन अलफः—मशारनिल्हेचे बाप आबाजी विश्वनाथ हे किल्ले प्रसन्नगडीं (?) नामजाद होते. किल्ले मजकूर सालगुदस्तां गनीमानें घेतला. ते समयीं मशारनिल्हे युद्धप्रसंगामध्यें स्वामिकार्यावरी पडिले. यांचे चालवणे अगत्य ह्मणवून जनाजी आबाजी याची असामी सभासदांत घालून सबनिसीचे कार्यभागास दिले. मशारनिलेचें वय लहान, याजबद्दल मुतालीक देऊन पेशजी हुजुरून सनद करून दिली. किल्ले कोरीगड सालमजकुरीं गनिमानें हस्तगत केला. ते समईं सनद वर्कु (?) गेली. याजबद्दल हाल्लीं राजश्री पतसचीव यांनीं पेठ......गडचे मुक्कामीं नजरगुजार करून, पेशजीं सरंजामी केली. त्याप्रमाणें करार करून सनद वर्कु केला. असामी २ एकूण तैनात सालिना देखील चाकर होनपान

१०००

तपशील

| | |
|---|---|
| खासा जनाजी आबाजी याची असामी सभासदात घालून सबनिसीच्या लिहिणीयाच्या कामास दिलें वेतन सालिना देखील चाकर होनपान ७०० | मशारनिल्हेचें वय लहान याजबद्दल मुतालीक दिल्हा असामी १. एकूण सालिना देखील चाकर होन पान ३०० |

एकूण तैनाती सालिना देखील चाकर होनपान एक हजार रास केले असत. इस्तकबिल पेशजीं हुजुरून जाली आहे त्या दिवसापासून सुभा वसूल पडला, त्याप्रमाणें वजा करून, उरलें तें माहे दरमाहे पावत जाईल..........पेशजीं घेतला आहे तो दूर करून हाल्लीं नरसो भिकाजी सभासद सेवक मजमू हुजूर घेतले असेत. (मोर्तब) तारीख ११ जमादिलावल."

आबाजी विश्वनाथ प्रभु दिघे देशपांडे तर्फ मुठेखोरें यांणीं याशिवाय आणखी पुष्कळ ठिकाणीं पराक्रम केले आहेत. परंतु त्यासंबंधीं खुलासेवार माहिती अद्याप मिळाली नाहीं. आबाजीचे पराक्रम व इमानीपणा पाहून शिवाजी महाराज छत्रपति व शंकराजी नारायण पंतसचीव हे त्यांजवर फारच लोभ करीत होते. इतकेंच नव्हे तर, त्यांचे मरणानंतर त्यांचे पुत्र जनाजी आबाजी यांचें वय लहान असोन, पंतसचीव यांणीं आबाजीचे ठिकाणीं जनाजीची सरदारांत नेमणूक केली, व एक गांव वंशपरंपरा इनाम देऊन आणखी एक हजार होन सरंजामही करून दिला; यावरून त्यांची योग्यता किती होती हें सहज कळून येतें.*

---

* आबाजी विश्वनाथ प्रभु ह्या शूर पुरुषाची माहिती, 'इतिहाससंग्रहा'चे आश्रयदाते व निस्सीम भक्त रा. रा. रामचंद्र नारायण देशपांडे ह्यांनीं जुन्या बखरी व कागदपत्र ह्यांच्या आधारें तयार करून आमच्याकडे पाठविली, त्याबद्दल त्यांचे आभार प्रदर्शित करणें अवश्य आहे. परंतु कळविण्यास अत्यंत दुःख वाटतें कीं, सदरहू गृहस्थ नुकतेच कैलासवासी झाले आहेत. वरील माहिती अगदीं अप्रसिद्ध असून फार महत्त्वाची आहे. राजारामाच्या कारकीर्दीमध्यें मराठे योद्धयांनीं महाराष्ट्रराज्य रक्षणासाठीं जे पराक्रम केले आहेत, ते खरोखर प्रशंसनीय आहेत. त्यांची माहिती जसजशी उपलब्ध होईल, तसतसा त्या वेळचा मनोरंजक व वीररसपरिप्लुत इतिहास प्रसिद्ध होईल. मराठ्यांच्या इतिहासामध्यें आबाजी विश्वनाथाचें नांव प्रसिद्ध नाहीं, किंवा त्याचा प्रतिस्पर्धी शाबादीखान ह्याचाही उल्लेख नाहीं. ग्रांटडफ साहेबांनीं एके ठिकाणीं तोरण्याबद्दल पुढील उल्लेख केला आहे:—"Torna was escaladed in the night, and carried, sword in hand, by Uman Oolla Khan, the only officer who particularly distinguished himself in these sieges." हा उल्लेख आबाजी विश्वनाथ व शाबादीखान ह्यांच्या युद्धास अनुलक्षून आहे कीं काय, नकळे! राजारामाच्या कारकीर्दीचा इतिहास अद्यापि फार अप्रसिद्ध आहे हें प्रांजळपणें कबूल केलें पाहिजे. ह्यासाठीं वर दिलेल्या माहितींत जरी कांहीं अल्प दोष असले, तरी ती फार महत्त्वाची व संग्राह्य आहे ह्यांत शंका नाहीं. शिवाजी, संभाजी व राजाराम ह्यांच्या कारकीर्दीतील कागदपत्र कोणींही आमच्याकडे पाठविले, तरी त्यांस अवश्य स्थळ मिळेल. इ. सं. कर्ते.

# ऐतिहासिक किरकोळ प्रकरणें.



## प्रकरण १ लें.



## १. अलीबहादुराचा पत्रव्यवहार.



### लेखांक १.

ता. ७ एप्रिल इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसी—

५ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः—आपण चंद्र ७ जमादिलाखरचें पत्र पाठविलें, तें चंद्र २३ जमादिलाखरीं पावलें. त्यांत लिहिलें कीं, महेश्वरला पोहोंचल्यावर लिहून पाठवावें; येथून उत्तर जाईल त्याप्रमाणें करावें. त्यास दरमजल जात होतों, परंतु खजिना औरंगाबादेचा येणार होता. याजकरितां बऱ्हाणपुरावर मुकाम केले होते. खजिना येऊन पोहोंचला. आज शहरांतून कूच केलें. दरमजल पांच सहा दिवसांत महेश्वरास जाऊन पोहोंचतों, आणि तेथून लिहून पाठवितों. आपलें पत्र येईल त्या अन्वयें वर्तणूक करूं. राजश्री पाटिलबावांकडून रामजी पाटील जाधव देशास आले, ते येथें आले होते. त्यांनीं सांगितलें कीं, सहा महिने निघालां आहां, अद्याप पोहोंचला नाहीं! असें कित्येक प्रकारें सांगितलें. त्यास आह्मीं उत्तर केलें कीं, येथून पुढें दरमजल जाऊन पोहोंचतों; दुसरा विचार कांहीं नाहीं. त्यांनीं विचारलें कीं, उभयतांची मर्जी कशी आहे? त्यास उत्तर केलें, मर्जी बहुत चांगली आहे. पाटिलबावांसीं दुसरा विचार कोणाचा नाहीं. ह्मणून आह्मांस मदतीस पाठविलें आहे. कळावें. पातशाहाचें व त्याचे चिरंजिवाचें व अनुपगीर गोसावी याचें अशीं तीन पत्रें आलीं आहेत. अनुपगिराचे पत्रांत लिहिलें कीं, तुह्मीं येऊन लवकर पोहोंचावें. त्याजवरून आह्मीं अर्जी लिहिली आहे कीं, लवकर येऊन पोहोंचतों. राजश्री तुकोजीबावा यांचेंही पत्र आलें आहे कीं, आह्मी महेश्वरास जातों; आपण येऊन लवकर पोहोंचावें. आपली आमची भेट

व्हावी. याप्रमाणें पुण्यांत श्रीमंतांपासून संकेत ठरला आहे. यास्तव लिहिलें आहे. तरी आपण लवकर यावें. त्याचें उत्तर आह्मीं पाठविलें कीं, बहुत उत्तम आहे; सत्वर येऊन पोहोंचतों. संकेताप्रमाणें भेट होईल. त्यास, पुढें कर्तव्य व तेथून कूच करून पुढें जावयाचें वगैरे बेत असतील तितके, लिहिलें आलें ह्मणजे करण्यांत येतील. दिवाण आजपावेतों निश्चय ठरून आले नाहींत, व पथकें कित्येक राहिलीं आहेत. ते येऊन पोहोंचलीं नाहींत, व खर्चाचा बंदोबस्त केला पाहिजे. चंद्र २९ जमादिलाखर बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक २.

श्री. ता. १६ एप्रिल इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

छ सकळ गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः—आह्मी आज महेश्वरास येऊन पोहोंचलों. पुढें कर्तव्य त्याचा विचार लिहावा. त्याप्रमाणें करूं. राजश्री तुकोजी होळकर यांचें थालनेरचें मुकामीहून पत्र आलें होतें. त्यांत मजल दरमजल महेश्वरास येतों ह्मणून लिहिलें. त्यास पांच सहा दिवस जाले, आतां लौकरच येतील. स्वारीचे नेमणुकेपैकीं पथकें मागें राहिलीं आहेत. त्यास चिटणीस व पारसनीस यांस ताकीद देऊन लौकर येत असें जालें पाहिजे. माहे रजबचे बेगमीचा ऐवज औरंगाबादेहून जनार्दन गोपाळ यांजकडून देवविला, त्याप्रमाणें आला. यापुढील बेगमी जाहली पाहिजे. सर्व प्रकारें सांभाळणार आपण आहेत. खर्चीविषयीं ओढ पडल्यास लष्करांत गवगवा होईल. चंद्र ९ रजब. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ३.

पै० चंद्र २४ रजब समानसमानीन चैत्र. श्री. ता. २४ एप्रिल इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे.

विशेषः— आह्मी चंद्र ९ रजबीं महेश्वरास येऊन पोहोंचलों. अहिल्याबाई होळकर यांचे भेटीस चंद्र १३ रजबीं गेलों. बाईनीं आपले नातू नाथाजी फणसे यांस सामोरें पाठविलें होतें. उत्तम प्रकारें भेटी जाल्या. राजश्री तुकोजी-बावाही त्याच दिवशीं महेश्वरास दाखल जाले. दुसरे दिवशीं त्यांच्या व बाईच्या भेटी जाल्या. त्यापासून ते बाईच्या वाड्यांत राहिले आहेत. मशारनिल्हे यांच्या व आपल्या भेटीचा मुहूर्त उदैक चंद्र १८ रजबीं आहे. भेटी जाल्यावर लिहून पाठवूं. दिवाण कोण ठरले, हें कळलें नाहीं. त्यास त्यांचीही नेमणूक करून पाठवून द्यावें. राजश्री आपाजीपंतांसही लौकर रवाना करावें. रजब अखेर बेगमीचा ऐवज आला. यापुढील बेगमीची तर्तूद लौकर जाली पाहिजे. येविसीं दोन पत्रें पेशजीं लिहिलीं आहेत, व आमच्या बराबर तोफा नाहींत. तोफ असिल्यानें इभ्रत असते. याजकरिता लिहिलें आहे. मर्जीस येईल तसें करावें. आह्मी त्याखेरीज नाहीं. राजश्री महादजी शिंदे यांचें चंद्र ४ रजबचे पत्र आलें कीं, राणेखान भाईस पुढें चमेलीपार रवाना केलें होतें. त्यांनीं इस्मालबेग याचे मोर्चे आगऱ्यास होते, त्याजवर जाऊन, लढाई करून, मोर्चे उधळून, त्याजकडील हत्ती साहा व घोडीं तीनशें व उंटे वगैरे लुटून उमरावगीर गोसावी यांसी पाडाव आणिलें, व आह्मांस लौकर येण्याविसीं लिहिलें आहे. राजश्री यशवतराव नाईक निंबाळकर यांचे सणाचे आठवड्याविसीं श्रीमंतांचें पत्र आलें, तें चंद्र १६ रजबीं पावलें. राजश्री तुकोजीबावा होळकर यांसीं बोलण्याचें प्रकरण कसें घालावें हें लिहिलें पाहिजे. रवाना चंद्र १७ रजब. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ४.

पै॥ चंद्र २८ रजब समान समानीन चैत्रमास. श्री. ता. २७ एप्रिल इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसः—

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः— अलीकडे आपणाकडून पत्र येत नाहीं, तरी ऐसें नसावें. इकडील वर्तमान तरी, आज मेजमानी गंगाजलनिर्मळ अहिल्याबाईनीं केली. तेथें राजश्री तुकोजीबावाही होते. त्यांचें बोलणें निघालें कीं, तुह्मांस सरकारांतून पत्र आलें कीं नाहीं? तेव्हां उत्तर आह्मीं केलें कीं, येईल. मग त्यांचें बोलणें निघालें कीं,

दोन चार दिवसांत एक दिवस चांगला पाहून, येथें बाईच्या घरीं यावें. मग बोलणें बोलूं. बोलणें जाहल्यावर आपण पुढें व्हावें. मागाहून आह्मी निघों. ऐसें बोलणें पडलें आहे. आपणाकडोन पत्र याविषयीं कांहीं येऊन पोहोंचलें नाहीं. लवकर पत्र आले पाहिजे. महेश्वरास पोहोंचल्यास तेथें आह्मी लिहून पाठवूं. तोंपरियंत मुक्काम करावें. याकरितां येथें मुक्काम केले आहेत. वाट पत्राची पाहात आहों. रवाना चंद्र २० रजब. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ५.

श्री. ता. २१ मे इ. स. १७८८.

राजश्री नाना गोसावी यांसी—

६९ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर, रामराम विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष:—चंद्र २६ रजबचें, व चंद्र १ शाबानचे, व चंद्र ४ शाबानचें, अशीं तीन पत्रें डाकेबरोबर आलीं; तीं चंद्र १४ शाबानीं दोनप्रहरीं दिवसास महेश्वरचे मुकामीं पावलीं. इकडील वर्तमान सांडणीस्वाराबरोबर लिहून पाठविलें. त्यांतील अन्वय कीं, राजश्री तुकोजीबावा होळकर यांचें ह्मणणें कीं, आपण पुढें व्हावें. बापू होळकर बरोबर देतों, इदूरपर्यंत चालावें. किंबहुना उज्जनीपावेतों जावें. अमावास्या जाल्यावर दोहों चऊं रोजीं निघोन आह्मी येतों. तेथें राजश्री महादजी शिंदे यांजकडून जाबस्वाल सुरळीतपणें चालावयाचे आले, तरी तिकडे जाऊं. नाहीं तरी आह्मी जैपूर अथवा मारवाडचे रोखें होऊं. त्यांचे हाताखालीं चालावयासी त्यांचे लष्करांत येणार नाहीं. यांचें पत्र पूर्वी गेलें होतें. त्याचें उत्तर ठीक जाबस्वालाचें कांहीं येत नाहीं. त्यांनीं लिहिलें होतें कीं, तुह्मी निघून येतां ह्मणून लिहिलें तें कळलें; बरें आहे. परंतु जाबस्वाल एकही नाहीं. त्यास, हे तर तिकडेस जावयास मागें पुढें पाहतात. आपले पत्रांत तरी लवकर जाऊन पोहोंचावें, दिवसगत घालवूं नये. त्यास, आह्मी येथून एक दोन दिवसांत कूच करून, बापू होळकरांस बरोबर घेऊन निघतों. कदाचित् त्यांचा अनमान असला तरी आह्मी निघतों. त्याचे बापूबरोबर फौज ते नेमितात. परंतु फौजच नाहीं. फौज दीड, दोन हजारपावेतों आहे. लोक सरंजामी त्यांचे वगैरे हल्लीं ठेविले, हे कांहीं आले नाहींत. याप्रमाणें हकीकत (आहे). त्यांचें ह्मणणें



सुलतान महमद आदिलशाहा.

( विजापुरचा बादशाहा. कारकीर्द इ. स. १६२६–१६५६. )

येथून पुढें वाढाल, तेथें आमची वाट पहावी. आह्मी येऊन पोहोंचतों. त्यास या पत्राचें उत्तर, पत्र पावतांच पाठविलें पाहिजे. कारण, त्यांची वाट पहावी किंवा तसेंच जाऊन पाटिलबावांस सामील व्हावें, हें लिहिलें पाहिजे. येथून लहान मजली करीत पुढें होतों. खर्चीविषयीं पुरवठा वडिलीं रांखिला, तो खासा राखिला पाहिजे. लोक नवे जुने नव्हेत, कीं चार दिवस ओढल्यास चिंता नाहीं. इतक्यास्तव चार महिन्यांची बेगमी करवावी. शाबानचे महिन्याची बेगमी पोहोंचली नाहीं. आणि आपण लिहिलें कीं, अखेर सालपावेतों बेगमी केली. त्यास ह्या महिन्याची बेगमी करविली पाहिजे. गांवगन्नाजवळ आह्मीं मागें अंतस्त घेतले होते, ते राजश्री भिकाजीपंतांजवळ दिले आहेत. काडीभर तफावत ठेऊन दिलें नाहीं. कच्ची पावती लिहून दिल्हे आहेत. त्यास स्वारीसंबंधें खर्च कांहीं थोडाबहुत वाढला आहे. त्याचीच ती बेगमी न होय. महिनमहालांत वजा न करवावा. महिना।त वजा केल्यास, आह्मी पेंचाखालीं येऊं. यावर जैशी मर्जी! मर्जीखेरीज नाहीं, व पत्राचें उत्तर लवकर रवाना जालें पाहिजे. त्यासारखें पुढें पल्यास पोहोंचलें पाहिजे. चंद्र १४ शाबान, दिवस बुधवार, चार घटिका दिवस. बाकी बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विनंति."

## लेखांक ६.

पै॥ छ ७ जिल्काद तिसा समानीन. श्री. ता. २५ जुलई १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून, स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेषः—काल आह्मी चमेल उतरून उत्तर तीरास सीतामोहो येथें आलों. वरकड इकडील वर्तमानः— महेश्वराहून कूच करूं लागलों, ते समयीं होळकर यांनीं बहुत प्रकारें बोलले कीं, तुह्मी आह्मी बरोबर जाऊं. आह्मांस जाणें जरूर. खर्चाची ओढ आहे. याचे तरतुदीकरितां आठ चार रोज लागतील तर लागोत. इतक्या तरतूद करून दर मजल जाऊं. तुह्मीं पुढें न जावें. ह्मणून बोलणें पडलें. तों राजश्री पाटिलबावांकडून रा. आंबोजी इंगळे आले. त्यांजबरोबर आह्मांस पत्र आलें कीं, इंगळे पाठविले आहेत. ते सांगतील त्या अन्वयें येण्याचें करावें, ह्मणून आलें. इंगळे यांचें बोलणें कीं, तुह्मीं व होळकर बरोबर जावें. उभयतां बरोबर असल्यास दाब मोठा पडून मसलत समेटानें येईल,

ऐसें बोलणें पडलें. त्याजवरून आह्मीं त्यांजवळ सांगितलें कीं, ही मसलत चांगलीच, परंतु त्यांचें येणें लवकर होत नाहीं; त्यापक्षीं आह्मीच पुढें जातों. असें बोललों. तेव्हां इंगळे बोलले कीं, होळकर यांस आह्मी निकड करितों; येत नसेल तर मग जावें. असें बोलणें होत आहे, तों इस्मालबेग बुडविल्याचें व गुलाम कादर पकडल्याचें पत्र आलें. तेव्हां होळकर व इंगळे बोलिले कीं, तुह्मी आह्मी मेवाडाहून जैपूरचे सुमारें नीटच जाऊं. तुह्मी भेलशाकडून जावयाचा मनसुबा केला आहे, त्यास साठ सत्तर कोसांचा फेर पडतो; व नद्या बहुत, व चिखलही त्या मार्गें बहुत. याकरितां पर्जन्यकाळीं वाट चालतां कठीण. हा मार्ग जवळ. लौकर जाऊन पोहोंचून एखादें काम करूं.

तिकडून पाटिलबावांस बोलावून व ते आह्मी एक होऊन, जयपुरची मोहीम उरकून घेऊं, असें ठरलें. तेव्हा ही मसलत बरी असें वाटलें. याजकरितां होळकर आह्मी एक होऊन, दर मजल मेवाड प्रांतांतून जात आहों. पंधरा वीस दिवसांत जैपूरचे सरहद्दीवर पोहोंचतों. याप्रमाणे पाटिलबावांसही पत्र लिहिलें आहे. अद्यापि मागील फौजा राजश्री रंगराव व पुरंदरे वगैरे कोणी आले नाहींत. भरणा तो ठाऊकच आहे. शत्रूची सरद जवळ राहिली. चार लोक जवळ असले पाहिजेत. याजकरिता लौकर येऊन पोहोंचत तें करावें. खर्चाची बेगमी वैशाख अखेर करून वरात औरंगाबादेवर दिली. त्यापैकीं पंचवीस हजार रुपये मात्र सावकारचे पदरीं पडले. बाकीचे अद्यापि पटले नाहींत. ते सावकाराचे पदरीं पडत तें करावें. ज्येष्ठ जाऊन आषाढ अखेर जाला. अडीच महिने बेगमी नाहीं. पाल पडतलाविसीं लोकांनीं गवगवा केला, तो कोठवरी ल्याहावा? ऐवजामुळें गळाठा फार जाला आहे. वीस हजारांची वरात परगणे अरुणावर दिली, ती तिकडे पाठविली. परंतु तोही ऐवज अद्यापपर्यंत आला नाहीं, व येथें मातबर सावकारही नाहीं. याजकरितां ऐवजाची ओढ न पडे, तें जालें पाहिजे. मागील राहिला ऐवज येऊन, आगाऊ दोन महिन्यांची बेगमी राही असे केलें, तर स्थित राहील. दूरदेशींचा प्रकार, लगत शिंदे व होळकर यांचे माहाल, यामुळें व मसलतही उरकोन चार रुपये तूर्त येतात असेही नाहीं. यास्तव सध्या पैक्याची वोढ जाल्यास लोकांस कांहींच धीर पुरवणार नाहीं. त्यांत शेन्याचे लोक. हे सर्व अर्थ आपले ध्यानांतच आहेत. त्या पक्षीं विशेष पर्याय लिहावे असें काय आहे? वैद्य कोणी लष्करांत नाहीं. याजकरितां चांगला वैद्य रसायणाचा संग्रही असा पाठऊन द्यावा. चंद्र २१ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ७.

श्री. ता. २८ जुलई इ. स. १७८८.

"सेवेसी विनंति सेवक बाळाजी* जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत चंद्र २४ सवालपर्यंत स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—श्रीमंत यजमानाकडील पत्रें श्रीमंतांच्या व स्वामींच्या नांवें आलीं, तीं बजिन्नस पाठविलीं आहेत. त्यांजवरून तिकडील वर्तमान सविस्तर विदित होईल. इकडून अलीबहादूर यांची रवानगी फौजसुद्धां कुमकेस जाली. त्यांचा मुक्काम महेश्वरीं दोन महिने होता. तोंपर्यंत परगणे धरगांव व परगणे बसवई दोनी माहालची खराबी केली. सांप्रत कूच करून जाऊन धारेस मुक्काम केला आहे. तेथून आमझेरे परगणा बेचिराख केला. तें तपशीलवार वर्तमान श्रीमंत यजमानांनीं लिहिलें आहे. कमाविसदाराकडील बोभाटाचीं पत्रें आलीं तीं पाठविलीं, ह्मणोन यजमानांनीं लिहिलें. परंतु पत्रें लाखोट्यांत घालतां राहिलींसें दिसतें. वरकड पत्रें माझ्या लाखोट्यांत होतीं, तीं सेवेसीं पाठविलीं आहेत. अलीबहादूर यांजकडून माहालास उपद्रव लावण्याविसींचा बंदोबस्त सहवर्तमान पत्राचे उत्तराची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ८.

पै० छ १४ जिल्हेज सन तिस्सा. श्री. ता. २३ आगस्ट इ. स. १७८८.

"अपत्यें अलीबहादूर चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना तागाईत चंद्र २० जिल्कादपावेतों साहेबांचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र २५ सवालचें आज्ञापत्र सादर जाहालें. तेथें आज्ञा कीं, चैत्रमासापासून माहादजी शिंदे यांजकडे जाण्याविषयीं लिहीत गेलों, परंतु समयास पावलों नाहीं. शिंदे यांनीं इस्मालबेग शिकस्त केला. गुलाम कादर पळोन गेला. शिंदे चमेल उतरून मथुरेस गेले. तुह्मी उज्जनीस दाखल जाहालां. पुढें ग्वालेरीचे मार्गें जात होतां, तों इतक्यांत पाराजीपंत येऊन, बोलणें होऊन, मेवाडांतून जावें हें ठराविलें. परंतु मेवाडांतून जातां, तेव्हां जैपूर व जोधपूरकर राजे आपलाले ठिकाणीं स्वस्थ आहेत. त्यांचे मुलकांत गेल्यावर त्यांस उपद्रव होईल. तेव्हां ते व गुलाम कादर एक होतील. मसलत भारी पडेल. यास्तव, आधीं शिंदे यांजकडील

---

* बाळाजी जनार्दन—हा एक कारकून होता.

मसलत समेटून, मग जें करणें तें एकविचारें करावें. तुकोजी होळकर यांस कांहीं दिवस लागत असल्यास, तुह्मीं निरोप घेऊन जावें. त्यास, आज्ञेप्रमाणें सत्वर शिंदे यांजकडे जाऊन पोंहचतों. इस्मालबेग व गुलामकादर यांणीं वीस हजार जमीयत करून, दिल्लींत जाऊन, शहरचा व पातशाहाचा बंदोबस्त केला. मसलत मागती उभी राहिली. हें वर्तमान मेवाडांत आल्यावर कळलें. सबब शिंदे यांजकडे दरमजल जाऊन दाखल होतों. जोधपूरकरांकडील वकील होळकरांकडे आले. त्यांचेच विद्यमानें आह्मांस भेटले. बोलणें होळकरांसीं लागलें, तेव्हां ते ममतेनेंच बोलले. सारांश, त्यांणीं इस्मालबेग व गुलामकादर यांची कुमक करूं नये, असें बोलण्यांत आणिलें. याजमुळें येथें सात आठ मुक्काम जाहाले. आतां याचे व जयपुरकराचे मुलकांत कोणेविसीं उपद्रव न लागतां, लवकर शिंदे यांजकडे जाऊन पोहोंचतों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ९. ता. २९ नोव्हेंबर इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः—राजश्री गणपतराव बिन विठोजी पलांडे बारगीर पागा दि॥ सिदोजी पलांडे यांचा व तुकोजी हैबतराव पलांडे यांचा भाऊपणाचा कज्जा आहे. त्यास पेशजीं गणपतराव पलांडे यांणीं राजश्री आपाजी बाबाजी याचे विद्यमानें सरकारांत विनंति केली. तेव्हां राजश्री द्वारकोजी निंबाळकर यांजकडे पंचाईत नेमून दिली. ते समयीं गणपतराव मा॥रनिल्हेकडे जाऊन कतबे करीनें व जामीन देऊन रुजू जाहले. हैबतराव पलांडे पंचाईतीस उभे न राहतां, खासा सरकारांतून प्यादे तीन चार वेळ याजकडे पाठविले कीं, पंचाइतीस जाऊन फडशा करणे. परंतु हैबतराव पंचाईतीस न गेले. धटाई करून इनाम गांवचा, तैनातेचे गांवचा व पाटीलकीचे उत्पन्नाचा ऐवज आपणच घेतात. येविषयीं फिरोन गणपतराव यांणीं आपाजी बाबाजी यांचे विद्यमानें सरकारांत विनंति केली. ते समयीं इनामगांव आहेत, त्यापैकींचे तिसरे तक्षिमेचा ऐवज यांस द्यावा, व तैनातीचे गांवांपैकीं नेमणुकीचे रुपये ५०० पांचशें यांस द्यावे, व पाटीलकीचे गांवचें उत्पन्न जप्त करावें, ह्मणोन रवानगी जाली. परंतु यांचे तीर्थरूप विठोजी पलांडे मृत्य पावले. नतर हिंदुस्थानचे चाकरीची नेमणूक होऊन इकडे आले, यामुळें तसेंच राहिलें.

त्यास तेथें यांचें मुलांमाणसांचें चाललें पाहिजे. यास्तव इनाम गांवचा हिस्सा व तैनातीचे गांवची नेमणुकीचे रुपये यांचे घरीं पावते व्हावे, व पाटीलकीची जप्ती करावी ह्मणोन गणपतराव यांचें बोलणें. त्यास हे देशीं येत तोंपावेतों जप्त वगैरे कलमें:–

मौजे मुखई तो पाबल प्रांत जुन्नर येथील पाटीलकीची तिसरी तक्षीम गणपतराव यांची आहे. त्यास, जुन्नर प्रांतीं चाल आहे, त्याप्रमाणें मानपान यांजकडे आजपावेतों चालत आले. अलीकडे हैबतराव यांनीं जबरदस्तीनें मारहाण करून मानपान वगैरे घेतात. यास्तव तूर्त पाटीलकीची जप्ती जाली पाहिजे. पुढें हे देशीं आल्यानंतर पंचाईतमतें फडशा होऊन, ज्यास देवितील ते घेतील. कलम १.

तैनात गांव मौजे चिंचोली तो पाबल प्रांत जुन्नर येथील नेमणूक रु. ५०० पांचशें पेशजीं विठोजी पलांडे यांचे नांवें होती. त्याप्रमाणें गणपतराव यांचे नांवें करार जाली आहे. तो ऐवज यांस हैबतराव देत नाहींत. त्यास ताकीद होऊन, म॥ निल्हे येथें चाकरीवर आहेत. याकरितां यांचे कुटुंबास तेथें अन्नवस्त्रास सदरहू पांचशें रुपये ५०० यांचे घरीं पावते जाले पाहिजेत. कलम १.

इनामगांव मौजे मुखई तालुके पाबल व मौजे बुरसुंग तालुके जडेसुरोसी व मौजे आडलगांव तालुके चांभारगोंदें या तीन गांवचे ऐवजापैकीं निमे हिस्सा शिदोजी पलांडे यांचा वजा होऊन, बाकी निमे हिसा राहिला. त्याची तिसरी तक्षीम गणपतराव यांची यांचे घरचे बेगमीस पावती होय तें जालें पाहिजे. कलम १.

एकूण तीन कलमें सदरहू लिहिल्याप्रमाणें जाहलीं पाहिजेत.

बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति. ''

---

## लेखांक १०.

श्री. ता० ३० नोव्हेंबर इ. स. १७८८.

''राजश्री नाना गोसावी यांसीः–

७ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलिबहादूर रामराम विनंति उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः—राजश्री पाटिलबावांनीं मथुरेहून गुलामकादराचें पारिपत्यास रवाना केलें आहे. त्यास, बलमगडानजीक येऊन पोहोंचलों. पुढें फरिदाबादेजवळ यमुना उतरून जलद जात असों. गुलामकादराची व पाटीलबावांकडील फौजेची अद्यापि लढाई चाललीच आहे, व इस्मालबेग व नजबकुली यांच्या

भेटी जाल्या. राजे प्रतापसिंग व राजे विजयसिंग यांजकडून वकील आले होते. सल्याचा पैगाम घेऊन त्यांस आह्मीं उत्तर केलें. याकरितां श्रीमंत पेशवा साहेबांनीं इकडेस पाठविलें आहे कीं, दोन्ही राजे यांचें व आपलें सरदारांचें खलीष पडलें, ते निखालसता व्हावी. याकरितां आलों. त्यास तुमचा आमचा स्नेह असतां अजमेर घेतली, ती माघारी द्यावी. कां कीं सरदारांशीं खलिष आहला, परंतु पेशवा साहेबांचा इरादा दोस्तीचा आहे. याकरितां जागा द्यावी; व खंडणी सरकारजाबत्याची ती द्यावी; व रा. पाटिलबावांनीं खंडणी ठराविली ती द्यावी, व पाटिलबावांचे लढाईत वस्तभाव गेली,– त्यांत लढाईत गेली ती असो–परंतु फितुरामुळें जें सामान गेलें असेल तें द्यावें. तेव्हां त्यांनीं उत्तर केलें कीं, अजमेर आह्मांसच द्यावी; व पाटीलबावांनीं खंडणी ठराविली ते त्यांचे सरदारांनीं वसूल करून घेतली. बाकी राहिली असेल ती देऊं. वस्तभाव आली, ती तुमचेच घरीं माघारी आली. ईस्मालबेग सुटला तेव्हां व कांहीं नजीबकुलीकडे आहे. आह्मांकडे असेल तें देऊं. असें उत्तर केलें. आह्मीं त्यास सांगितलें कीं बरें, पैका जो सरदारांकडेस पोहोंचला असेल तो मजुरा देऊं, व वस्तभाव बाकी तुह्मांकडे राहिली असेल ती द्यावी; परंतु जागा आमची आह्मांस द्यावी. तुमचा इरादा सरकारांत दुरुस्त असला, तर नवे मुलूख सोडवूं व तुह्मांस देऊं व आह्मी घेऊं; चिंता नाहीं. व कितीक तऱ्हेनें रहस्याचे जाबसाल करून वाटें लाविले आहेत. परंतु बहुत करून स्नेह आपले मारफतीनें होईल. घरोब्याची रीत बहुत तऱ्हेनें दाखविली आहे. व त्यांचे मनांत सल्ला करावा असें दिसतें. पुढें काय होईल हें पाहावें. रा. पाटिलबावांनीं मसुदा करून पाठविला होता कीं, याप्रमाणें पत्र पाठवावें. तें पत्र लिहून आपणास पाठविलेंच आहे. वरकड होईल वर्तमान तें लिहिलें जाईल. चंद्र १ रबिलावल. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ११.

श्री. ता. १० दिसेंबर इ. स. १७८८.

"सेवसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ४र॥वल मुकाम श्रीमथुरा वर्तमान यथास्थित असे. विशेषः—श्रीमंत राजश्री अलीबहादूर-बाबाची रवानगी दिल्लीचे मार्गें फरिदाजवळ यमुना उतरून पार, शत्रूचें पारिपत्यास श्रीमंत राजश्री पाटिलबावांनीं केली. मेरटांत गुलामकादर यास

## ७. विजापुरचा बादशाहा सुलतान महंमद आदिलशाहा ह्यानें केलेले नियम.*

१. [1]पादशाहांनीं इनसाफ करणें, हींच आपलीं अलंकारभूषणें आहेत असें समजून, सर्व हिम्मत न्याय करण्याचे कामीं खर्च करावी. असें सांगितलें आहे कीं, "संपूर्ण आयुष्यांत एक घटका न्याय करणें हें, पादशाहास शंभर वर्षे वैराग्य धारण करून ईश्वरसेवा करण्यापेक्षां अधिक पुण्यकारक आहे." पादशाहांनीं खुद्द जातीनें मुलकाची महामुरी व रयतेची आबादानी ठेवून, न्याय करण्याचे कामीं अंतर पडूं देऊं नये. कारण, मुलकाची आबादानी हें, राज्याच्या बंदोबस्ताचें व खजिन्याच्या आबादानीचें कारण आहे. पादशाहाची शक्ति आहे तोंपर्यंत फौज जमा करणेविषयीं यत्न करावा. शिपाई चाकरीस ठेवणें तो लढाऊ, शूर व नामांकित जातींतील असावा.

वजीर करणें तो अक्कलवान्, विचारी, मसलतगार व निमकहलाल ह्मणजे इमानी व स्वामिसेवेविषयीं सर्वकाल विचार करणारा असा, परीक्षा करून करावा; व प्रसंगीं त्याची सल्लामसलत घेत जावी.

शिपाई लोकांची वरचेवर खबर घ्यावी. त्यास जरूर लागणाऱ्या सामान-सरंजामाचा बंदोबस्त ठेवावा. शिपाई लोकांची तयारी फार चांगली राखावी. ह्मटलें आहे कीं, "शिपायी लोकांस आपल्या जिवाप्रमाणें संभाळावें. ह्यांतच कल्याण आहे. कारण, बादशाहीचा अधिकार लष्करच्या बळावरच चालतो."

२. राजधानीचा, मुलकाचा व किल्ल्याचा बंदोबस्त व लष्करची तयारी झाल्यावर मग शत्रूचें पारिपत्य करण्याची हिंमत धरावी.

३. प्रथम, जे जमेदार[2] लोक लष्करचें बळ बांधून पादशाहाशीं बदलून राहिलेले असतात, त्यांचा मुळापासून फडशा करावा. कोणी जमेदार सरकारांत रुजू होऊन पुढेंही इमानानें वागेल असें वाटल्यास, त्यास जमेदारीचें काम सांगून आज्ञेंत ठेवावें.

---

* हे नियम कै० श्री० विठ्ठलराव बाबासाहेब देशमुख मौजे चिकुर्डे ता. वाळवें, जिल्हा सातारा यांच्या संग्रहीं असलेल्या विजापुरच्या बादशाहाच्या बखरींतून घेतले आहेत.

१ हा बादशाहा इ. स. १६२३ पासून १६५३ पर्यंत होता. हा, इब्राहिम आदिलशाहा —ज्यास लोक मोठा साधु समजत व जो नरसोबाच्या वाडीचे प्रसिद्ध श्रीपादस्वामी यांचा शिष्य झाला होता—त्याचा मुलगा होय. २ देशमुख देशपांडे ह्यांस जमेदार ह्मणत.

४. सरकाराशीं बदलणारे बेमान लोकांचा बंदोबस्त झाल्यानंतर, आपले मुलखाचे आसपास जो शत्रु किंवा बंडवाला असेल, त्याजवर चालून जावें. माजुरी शत्रूंचा नाश करून, वरचेवर नवा मुलूख हस्तगत करून घ्यावा, हें बादशाहाचें कर्तव्यकर्म आहे.

५. जो मुलूख हस्तगत होईल, त्या मुलखांतील शिपाई व सरदार लोक कशा चालीचे आहेत हें ओळखावें, व त्यांस आपलेसें करून घेऊन ज्याची जशी योग्यता तसें त्यास ठेवावें. त्यास पगार किंवा जहागीर देणें ती, त्याच्या मूळ ठिकाणापासून राज्यांतील दुसरे ठिकाणीं दूर देत जावी. त्या मुलखांतील सरदार वगैरे श्रेष्ठ लोकांस परागंदा होऊं देऊं नये, व बेकार व बेरोजगारी राखूं नये. ते परागंदा होणें व बेकार व बेरोजगारी होणें हेंच राज्यांत फंदफितूर होण्याचें कारण आहे.

६. रयतेस पूर्ण सुखी ठेऊन बहुत कृपेनें व दयाळूपणानें तिचें पालन करावें.

७. आपल्या मुलखांतील एकंदर कारखान्यांत मुसलमान जातीचे मामलेदार वगैरे अंमलदार व हिंदुजातीचे कारकून ठेवावे. हिंदु लोकांस हुकमी काम देऊं नये. कारण कीं, पृथ्वीची व धर्माची खराबी यांतच आहे.

८. मुलखाचे वारिसदारांपैकीं कोणासही त्या मुलखांत ठेवूं नये. दुसरे ठिकाणीं ठेवून त्यांचा चांगला समाचार घेत जावा. त्यांस कधीं चिंता प्राप्त होऊं देऊं नये. त्यांची बरदास्त अशी ठेवावी कीं, त्यांस आपली पूर्वस्थिति कशी होती व पूर्वी आपला मुलूख किती होता, ह्याची आठवणही होऊं नये. अशा प्रकारें त्यांचें पालन करावें.

९. हाबशी, तुर्की व हिंदु ह्या जातींचे लोक चाकरीस ठेवावे. त्यांची अक्कल, योग्यता व सहनशीलता हीं ओळखून, त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांस हुजूर-कामें सांगावीं.

१०. असत्यवादी, बेमान, बदचालीचे, कुटिल, गर्विष्ठ, फंदफितूर करणारे ह्यांस सरकारी कामांत घेऊं नये, व सरकारवाड्यांत येऊं देऊं नये. हे कोणत्याही भरंवशाच्या कामास उपयोगी नाहींत.

११. द्रव्यवान् मनुष्याजवळचें द्रव्य "मी सरकारास आणून देतों" असा पत्कर जो मनुष्य घेईल, त्या मनुष्याचा धिक्कार करून, त्यास दरबारांतून हांकून द्यावा, ह्मणजे फंदफितूर वगैरे संकट नाहींसें होईल; व प्रजापालन व न्यायीपणा ह्याविषयीं आपली कीर्ति होईल.

१२. चुगलखोर मनुष्याच्या बोलण्यावर भरंवसा ठेवूं नये व त्याजवर क्रोधही करूं नये. कधीं त्याचे सांगण्यांत खरेपणाही असतो.

१३. वादी प्रतिवादीची वाजवी चौकशी करून, वादी खोटा ठरल्यास त्याचे प्रतिवादीस दिलभरोसा देऊन, वादीस दरबारांत शिक्षा देऊन, बेअबरू करून हाकून द्यावा. त्यास अशी शिक्षा झाली पाहिजे कीं, पुन्हां अशा प्रकारच्या कामांत न सांपडेल.

१४. पुरातन नेकचालीचे योग्य सेवकजन असतील, त्यांस किल्ल्यांत व कोटांत कामावर नेमावें. किल्ल्यांत व कोटांत मुख्य कामगार तीन असावे. १ किल्लेदार, २ हशमाकडील कामगार, व ३ गुप्तबातमी लिहिणारा. ह्या तिघांहून अधिक कामगार नेमूं नये. कांहीं दिवसांनंतर ह्या कामगारांच्या बदल्या करीत जाव्या. ज्या किल्ल्याच्या व कोटाच्या ताब्यांत मुलूख पुष्कळ असेल, तेथें तो मुलूख किल्ल्याच्या ताब्यांत न ठेवतां, त्या मुलखावर निराळा मामलेदार नेमून, त्या मुलखाच्या कामाविशींची वहिवाट त्या मामलेदाराच्या तर्फेनें ठेवावी.

१५. काजी, खतीब वगैरे शास्त्रार्थ जाणणारे, शहरच्या मानानें नेमून, कुरानशरीफांतील शास्त्रार्थाप्रमाणें पवित्र धर्माचाराचे ध्वज उभे करावे, व न्यायाचें काम कुरानशरीफांतील शास्त्रार्थाप्रमाणें चालवावें.

१६. ज्या ठाण्याच्या व किल्ल्याच्या ताब्यांत पुष्कळ मुलूख असेल, त्या ठाण्यास व किल्ल्यास निराळा सुभा मुकरर करावा; व लहान परगणे व गांव व खेडीं वगैरे त्या सुभ्याच्या ताब्यांत असतील, तीं खासखेल वगैरे सरदारांस जहागिरींत द्यावीं; व जे थोर नामांकित गांव असतील, ते किल्ल्याच्या ताब्यांत पाहिजे असल्यास ते अलाहिदा ठेवून, बाकी लहान गांव व खेडीं, जहागिरदारास व इनामदारास द्यावीं.

१७. जहागिरदाराशिवाय जो प्रांताचा वसूल येईल, तो ऐनसरकारी वसूल समजावा. तो हुजूर येईपर्यंत महालाकडे जमा असावा.

१८. मोठ्या सुभ्याचे ठिकाणीं टंकसाळ असावी. त्या टंकसाळींत होणारा खुर्दा व रुपये गोलदारपणांत व वजनांत, राजधानींतील खुर्दा व रुपये यांसारखे असावे. वजनांत एक गुंजेइतकीही तफावत नसावी.

१९. वजनें व मापें राजधानींतील ह्मणजे विजापुरांतील वजनांप्रमाणें व मापांप्रमाणें असावीं. निरनिराळ्या प्रांतीं निरनिराळ्या वजनमापांची वहिवाट ठेवूं नये.

२०. दर शुक्रवारीं काजी व शास्त्रार्थ सांगणारे सर्व मुसलमान लोकांनीं जुम्मामशिदींत हजर होऊन शुक्रवारची निमाझ व खुतबा पढावा. सदरीं लिहिल्याप्रमाणें जो मुसलमान हजर न होईल, त्यास काजींनीं धर्मशास्त्रांतील वचनाप्रमाणें ताकीद द्यावी.

२१. मुसलमानांस व मुसलमानांचे कायद्यांस अशा प्रकारें मजबूद ठेवावें,

कोणताही अधर्मी पुरुष ह्मणजे हिंदु प्रबळ असला, तत्रापि त्यास एखाद्या गरीब मुसलमानाची बरोबरी करण्याचें सामर्थ्य राहूं नये. असा मुसलमानी धर्म प्रबळ ठेवावा.

२२. जर कदाचित् एखादे मुसलमानानें गैरसमजुतीनें हिंदूंचा नाश करण्याचा प्रयत्न केला, तर त्या मुसलमानास युक्तीनें ताकीद द्यावी कीं, या वेळेस असें करूं नको, पुढें पाहून घेतां येईल; तूर्त समय टाळ. असा त्यास उपदेश करावा. परंतु, हिंदूंचें रक्षण करण्याविषयीं हिंदूंचा पक्ष धरून मुसलमानांस उपद्रव करूं नये व त्यांस दुःख देऊं नये. दिवाळी व दसरा वगैरे हिंदूंचे सण येतात, तेव्हां ते लोक ते सण उघडपणें करितात. त्यांस सणाचे समारंभ उघडपणें करूं देऊं नयेत. गुप्तपणें करूं लागल्यास मनाई करूं नये.

रमजानशरीफचे महिन्यांत बाजारांत व रस्त्यावर कोणी कांहीं भक्षण करण्याचे पदार्थ फळफळावळ वगैरे विकावयास मांडील, त्यास दंड करण्याकरितां व चौकशी करण्याकरितां मुसलमान धर्मशास्त्री नेमावा. ह्या शास्त्र्यास 'मोहतसिब' असें ह्मणतात. त्यानें लोकांच्या घरांत काय चाललें आहे ह्याची चौकशी करूं नये. उघडपणें कोणी खाण्याचे पदार्थ विकील व खाईल, त्यास मात्र मनाई करावी.

२३. जुम्मामशिदींत व ईश्वराचे पैगंबराचे आसारमहालांत व पादषाहाचे व अवलियाचे रमण्यांत व दुसऱ्या कितीएक मशिदींत चालू असलेल्या अन्नछत्रांकडे ज्या प्राचीन नेमणुकी चालत आल्या असतील, त्या चालू ठेवाव्या. त्या अन्नछत्रांत मुसलमान जातीचे साधू व फकीर यांकरितां, अन्न व पाणी यांची नेहमीं सिद्धता ठेवावी. अन्नछत्राचे कामांत काटकसरीचा हात नसावा. अन्नास कुत्र्याचें व मांजराचें तोंड लागूं देऊं नये. अन्नछत्रांतील एक दाणाही बेजबी ( व्यर्थ ) खर्च होऊं नये.

२४. आसारशरीफचे महालांत लेन लिहिण्याची विद्याशाळा असावी. तींत पैगंबराचे ग्रंथाचा व इतर विद्यांचा अभ्यास चालावा. आसारमहालाच्या विद्याशाळेंत, विद्या शिकणारे मुलांची खाण्यापिण्याचीही व्यवस्था ठेवावी.

२५. जुम्मा मशिदींत मुलांस उजळणी शिकविण्याचे शाळेवर दोन शिक्षक, व आरबी कुराणशरीफची विद्या वगैरे शिकविण्याचे शाळेवर दोन वस्ताद, व फारशी विद्या शिकविण्याचे शाळेवर एक वस्ताद नेमून, मुलांकडून विद्याभ्यास करवावा. विद्यार्थ्यांपैकीं जो कोणी नादार असेल, त्यास अन्नोदकाची सोय करून द्यावी, व त्यास अन्नोदक वेळच्या वेळीं मिळतें किंवा नाहीं, ह्याविषयीं खबरदारी घेत जावी. विद्यार्थ्यांचा विद्याभ्यास व त्यांस अन्नोदक देणें हीं कामें बंद पडूं देऊं नयेत.'

२६. विजापूर येथील मशिदीकडे पुरातन सनदेबरहुकूम इनाम जमीन व रोजमुरा वगैरे दुमाला करून देऊन चालवावें. शिवाय कोठें कोणींही मशीद बांधू नये. कारण, परलोकीं सुख व्हावें व पुण्यप्राप्ति व्हावी म्हणून मशीद बांधतात. त्या मशिदीची उस्तवारी न ठेवल्यानें मशीद बांधण्याच्या पुण्यापेक्षां पाप अधिक लागतें. पुण्यप्राप्तीवरच जर नजर आहे, तर कोणत्याही माणसानें, धर्मशाळा, पूल, हौद वगैरे कामें करावीं.

२७. ज्यास एखादे स्थळीं मशिदीची नवी इमारत करणें असेल, त्यानें बादशाहास खबर देऊन मशीद बांधावी, व सरकारांतून त्या इमारतीचे उस्तवारीकरितां नेमणूक मिळवावी. अशा प्रकारच्या मशिदीची खबरदारी व बंदोबस्त शहरपन्हाकडील अमलदारांनीं चांगला ठेवावा.

२८. रमजान-मुबारकचे महिन्यांत सर्व मशिदींत अंथरण्याचे बोरे, पाण्याच्या घागरी, चुन्याचीं सारवणें व तशीच, मशिदींत जमाव असेल त्याप्रमाणें, रोजमुऱ्याची नेमणूक ह्यांची व्यवस्था करावी. थोर थोर मशिदींत व दर्ग्यांत, "हाफिज" म्हणजे ज्यास कुरानशरीफची किताब मुखपाठ असते तो, व "सामआ" म्हणजे हाफीज हा कुरानशरीफची आवृत्ति करावयास लागतो, तेव्हां त्याच्या चूकभुलीवर नजर ठेवण्याकरितां ऐकत बसतो तो, ह्यांची नेमणूक करावी; व त्यांची बरदास्त ठेवावी. रमजान-शरीफचे महिन्यांत रात्रीं निमाज पढतात त्या निमाजेस "तरावीद" म्हणतात. ती निमाज "हाफिज" व "सामआ" यांजकडून पढवावी.

२९. रमजान-शरीफचे महिन्यांत रात्रीं निमाज पढतात, त्या वेळीं पैगंबराचे सुनी धर्माचे झेंडे उभे करावे. काजी, मुफती म्हणजे कुरानशरीफचा अर्थ सांगणारे, पादशाह, व कुरानशरीफचे शास्त्रार्थाप्रमाणें हुकूम करणारे ह्यांच्या आज्ञेप्रमाणे वर्तणूक करावी. रांडबाजी, थट्टामस्करी, तमाशे वगैरे दुष्ट कर्में करण्याची मनाई करावी. आणि, दारू, अफू, भांग वगैरे अपवित्र अमली पदार्थ सेवन करण्याची मनाई करावी. सदरील दुष्ट कर्में करणारास व अपवित्र पदार्थ सेवन करणारास अशी शिक्षा करावी कीं, पुन्हां तसें वर्तन कोणी न करील.

३०. सर्व मनुष्यांची योग्यता जाणावी, व कुरान, निमाज व रोजे यांचे शास्त्रार्थ जसे असतील ते प्रसिद्ध करावे. पुण्यास पातकाचा संबंध लावूं नये.

३१. थोर थोर मृत पुरुषाचे उरूस, व पिराचे कबरेवर वस्त्रास झालर लावून घालतात ते गलेफ, यांजकडे नक्त खर्च वगैरे दस्तुराप्रमाणें पूर्वापर वहिवाट असेल ती चालू ठेवावी. उरुसाचा समारंभ बहुत यत्नेंकरून करावा.

३२. तक्यांत बसणारे फकिरासही रोजमुरे, नेमणूक व इनाम वगैरे देऊन त्या फकिरांची मदत करावी, व वाटसरूंच्या सरबराईचा बंदोबस्त ठेवावा.

३३. एकंदर मशिदींत व रोज्यांत, जरूरच पडेल तेथें, पानसत्राची ह्मणजे तृषितास पाणी मिळण्याची सोय करावी, व शौचकूप बांधवावे. अन्नसत्र व पानसत्र ठेवून विद्याशाळाही स्थापाव्या.

३४. जुम्मा मशिदींतील अन्नसत्रांत अन्नार्थी मुसलमान लोकांस शिजलेलें अन्न द्यावें, व अन्नार्थी हिंदु लोक येतील, त्यांस एक वेळ पुरे इतकें पीठ देत जावें, व वाटसरू हिंदु लोकांस पहिले दिवशीं दर माणसास पांच चिपटीं पीठ व एक चिपटें दाळ व चार टाक तूप व तीन पैसे रोख मसाल्याकरितां याप्रमाणें द्यावें. यांत कदापि अंतर पडूं देऊं नये.

३५. आपले हद्दींतील मार्गांनीं जाणारे मुशाफरांस त्रास न होई, असा त्या मार्गांचा बंदोबस्त करावा. चोरांचा शोध लावून त्यांस जबर शिक्षा द्याव्या.

३६. चोरट्यांनीं केल्या लुटीपैकीं जो माल हातीं लागेल, त्यापैकीं जो ऐवज खजिन्यांत जमा होईल त्या ऐवजापैकीं, "जकात" ह्मणजे दर शेंकडा अडीच रुपये, व "खुमस" ह्मणजे दर शेंकडा पांच रुपये काढून ठेवावे. "जकातीचा" ऐवज धर्मादायाकडे व "खुमस" पैगंबराच्या नांवानें परोपकाराकडे खर्च करावा. खेरीज जो ऐवज राहील, तो जुम्मा मशिदींत किंवा आसारमहालांत निराळा ठेवून, कुरानशरीफचे हुकुमाप्रमाणें त्याचा खर्च करावा, व या कामास अलाहिदा कारखान्याची नेमणूक करावी.

३७. गोरगरीबांस रिकामें न जाऊं देतां कुरानषरीफचे आज्ञेप्रमाणें अन्नोदक सरकारांतून पोंचवीत जाणें. ईश्वरास भजणारे लोकांस जहागीर, इनाम किंवा रोजमुरा करून द्यावा. किंवा खैरात करून नित्याचे भोजनखर्चाविषयीं मदत करीत जावी. कुरानशरीफचे अर्थास बाध येईल असें करीत जाऊं नये.

३८. किल्यावरील मुख्य कामगार संभावित, कायदा जाणणारे, विचारी, व विश्वासू असावे. अशा कामगारांची बदली करूं नये. ह्या कामगारांखेरीज दोन काजी व दोन मुफती ह्मणजे कुरानाचा अर्थ सांगणारे, व दोन षयखाचे षयख ह्मणजे धर्मशास्त्री, तसेंच दोन सदरुःसदर ह्मणजे ज्यांचा हुकूम घेऊन मग कामगारांनीं जें करणें तें करावें—असे मुख्य कारभारी, शिवाय एक अमीन, एक कोतवाल, व एक सरदार कायम असावे. ह्यांच्या नेमणुकी व पगार त्यांच्या योग्यतेप्रमाणें असावे. एकंदर गांव व मोकासा महालाकडे दुमाला करावे. किल्याकडील कामगारीचे हाताखालीं ५०० स्वार असावे. त्यांनीं किल्याचे दरवाज्याचा बंदोबस्त राखून, प्रांतांतील धांवणें धुपणें आल्यास बंदोबस्त ठेवावा.

३९. पांच हजार शिबंदी व लढाऊ फत्क (पथक?) ह्यांपैकीं दोन हिस्से बरकंदाज ह्मणजे बंदुक मारणारे, व एक हिस्सा विटा मारणारे असावे. शिवाय, जरूर कामाचे जे जुने लोक असतील, त्यांस पूर्वीप्रमाणें कायम ठेवावें.

४०. तोफा डागणारे ह्मणजे गोलंदाज व बाण मारणारे बाणदार हे लोक निवडक तितके जमा करावे.

४१. स्वारांपैकीं व शिबंदीपैकीं चांगले लोक असतील, त्यांची नेमणूक शहरच्या बंदोबस्ताकडेस करावी.

४२. शहरच्या प्रत्येक दरवाज्यांत खरी बातमी देणारे व खरें लिहिणारे लोक नेमावे. कित्येक स्वारांची नेमणूक तेथें असावी. शहरचे कोटावर व कोटाखालीं, शहरांत व शहराबाहेर; जागोजाग, स्वार व शिबंदी ठेवावी. अशा रीतीनें कीं प्रसंगोपात्त आंतील मनुष्य बाहेर व बाहेरील मनुष्य आंत येऊं शकणार नाहीं. ( ह्यापुढील १२ कलमें मूळ प्रतींत गहाळ झालीं आहेत. तरी अनुक्रम सरळच ठेवला आहे. )

* * * * *

४३. बाजारचे दुरस्तां दुकानांपैकीं एकादें दुकान रिकामें व खराब राहिल्यास, बाजाराचे बंदोबस्तावरील कामगाराचा पगार काटून घेतला जाईल, व बाजारी लोकांपासून ह्याबद्दल गुन्हेगारी घेतली जाईल.

४४. कुराणशरीफचे हुकमावरून व ईश्वराचे आज्ञेवरून, एकंदर सुखवस्तु लोकांपासून, व मूर्तिपूजा करणाऱ्या ह्मणजे हिंदु लोकांपासून, व नाचतमाशे व मद्यपान करणाऱ्या लोकांपासून खंड घेणें ठरलें आहे. त्याप्रमाणें मुसलमानाचे सरहद्दींतील मुख्य कामगारांस व मामलेदारांस, हिंदु लोकांपासून खालीं लिहिलेल्या तपशिलाप्रमाणें खंड घेण्याविषयीं आज्ञापत्रें लिहावीं.

४५. जो हिंदु व्यापार व कसब न करितां, एक वर्ष किंवा एक वर्षावर कांहीं दिवस प्रपंचनिर्वाह करील असा असेल, त्यापासून दरमहा एक तोळा पावणे-पांच गुंजा रुपें घेत जावें.

---

१ लोखंडी चौकोनी विटेच्या आकाराचें हत्यार असतें. त्यास एक बाजूस धरावयास जागा असून तीन बाजूंस धार असते. ही वीट फेंकून मारिली असतां अचानक मस्तकच उडून जातें.

एक भाल्यासारखें हत्यार असतें, त्यासही वीट ह्मणतात. एका काठीस लांब तरवारी-सारखें फळ बसविलेलें असतें. ह्या दोहों प्रकारांच्या विटा मारणारे लोकांस 'विटेकरी' किंवा इटेकरी ह्मणतात.

४६. जो हिंदु सरासरी द्रव्यवान् आहे, परंतु व्यापार केल्याशिवाय प्रपंचनिर्वाह करूं शकत नाहीं, त्यापासून वर सांगितल्याचे निमें रुपें घ्यावें.

४७. ज्या हिंदूपाशीं कांहीं धर्मसंचय नाहीं व जो कांहीं तरी व्यापार अगर कसब करून निर्वाह करितो, त्याच्या कुटुंबाचा व अन्नवस्त्राचा खर्च भागून कांहीं शिल्लक राहण्यासारखी असून खंड घेतां येईल असें असल्यास, त्यापासून एक तोळा पावणे पांच गुंजांच्या चतुर्थांश रुपें घ्यावें.

४८. जीं मनुष्यें १५ वर्षांच्या आंत आहेत, जे विकत घेतलेले गुलाम असतील, वाट चालत असतील, जे आंधळे, सहा महिने किंवा वर्ष किंवा ह्याहून अधिक दिवस जे दुखणाईत असतील, व आजाराचे योगें अगदीं पडून राहिलेले, खंडाचा ऐवज भरण्यापूर्वी मेलेले, अर्धांगवायू झालेले फार ह्यातारे, बैरागी, खंडाचा ऐवज भरण्यापूर्वीं मुसलमान झालेले, अशा प्रकारचे हिंदु लोक, व चुकीनें कुरानाच्या वाक्यास दोष देणारे मुसलमान, ह्यांपासून कधींही खंड घेऊं नये.

४९. जो हिंदु द्रव्यवान् आहे, त्यापासून द्रव्यवानाचे कायद्याप्रमाणें, व जो हमेश दरिद्री असेल त्या हिंदूपासून दरिद्री लोकांचे कायद्याप्रमाणें खंड घ्यावा.

५०. जो हिंदु सहा महिने द्रव्येंकरून सुखी असतो व सहा महिने दरिद्री असतो, त्यापासून, मध्यम प्रकारें खंड घ्यावा.

५१. ब्राह्मण, भटमंडळी व जंगम लोक सर्वांशीं देवघेवीचा व्यापार करितात, सबब ते खंड घेण्यास पात्र आहेत. ह्या लोकांपासून खंड घेतलाच पाहिजे.

५२. जे हिंदु लोक कांहींच कसब किंवा धंदा करित नाहींत आणि द्रव्य बाळगून असतात, त्यांपासून द्रव्यहरणाविषयीं जशी युक्ति चालेल तसी चालवून, घेतां येईल तितका खंड त्यांपासून घ्यावा.

५३. खंड देणारांनीं खुद्द जातीनें येऊन खंडाचा ऐवज आपले हातानें द्यावा. आपले मुखत्याराचे हातें पाठवूं नये. खंड वसूल करणारा कामगार बसलेला असावा. खंड देणारानें उभें राहून ऐवज द्यावा.

५४. खंडाचा ऐवज वसूल होईल तो, बैतन मालाचे खजिन्यांत दाखल करून, त्याचा खर्च, कुरानशरीफचे ग्रंथांत शास्त्रार्थ लिहिला आहे त्याप्रमाणें करावा.

५५. अमीर व वजीर ह्यांस जहागीर द्यावी असें वाटल्यास, जो गांव जहागीर द्यावयाचा, त्याचा तीन सालांचा वसूल पाहून, अधिक वसुलाचें साल कायम करावें. आणि दरसदे पंधरा हजारांचे हिशेबाप्रमाणें जहागीर द्यावी. ह्मणजे दररोज शंभर रुपये देण्यास योग्य जो असेल त्यास पंधरा हजारांची जहागीर द्यावी. जहागिरीच्या गांवावर एखादें संकट किंवा आफत आल्यास, सूट तूट घालून

वसूल घेणें तो वजीर लोकांनीं पाहून घ्यावा. लहान वजिरास व थोर वजिरास एकसारखीच जहागीर द्यावी.

आधीं वजिरास जहागीर द्यावी व मग चाकरी करणाऱ्याकडून घोडे आणवावे. त्या हरएक वजिराचे घोड्यावर सरकारी निशाणीचा डाग देऊं नये. त्यानंतर अमीन लोकांचे शिपायांची हजिरी घ्यावी, व मोजदाद करावी; व जर वजीर हुजूर हजर असल्यास, त्या वजिरास बोलावणें करावें, व त्याजकडून हजिरी व मोजदाद करावी. हजिरीपटावर वजिराचा शिक्का करवून, जमातदार, शिलेदार व पागा यांचे गणतीसुद्धां तो हजिरीपट घ्यावा, आणि पूर्वींच्या प्रमाणें, जमातदार वगैरे यांणीं हजिरी घ्यावी. दोन्ही वेळच्या हजिरींत तफावत दिसल्यास त्याचें कारण विचारावें. त्या वेळीं पुरातन नामांकित बहुत कामें केलेले असे लोकांकडून चूक झाल्यास, चौकशीच्या कामांत जरा चालढकल करावी. जरब देण्यासारखें कारण असल्यास जरब द्यावी.

५६. वजिराची फौज आपले सरहद्दींत परगांवीं असेल, त्या फौजेची हजिरी त्या ठिकाणींच घेऊन तो हजिरीपट आणवावा. नंतर ती फौज आणवून हुजूर हजिरी घ्यावी. त्यांत कांहीं तफावत दृष्टीस आल्यास, त्या विषयींचें कारण विचारून घ्यावें. वजिराचे घोड्यावर पादशाही निशाणीच्या डागाचें कारण नाहीं.

५७. डाग दिलेला घोडा पुन्हां चाकरीवर रुजू जाहल्यास, डागाच्या निशाणीच्या धन्यांनीं आपले निशाणीचा डाग नवीन त्याच डागावर द्यावा.

५८. सरकारी निशाणीचे डागाचा घोडा दुसरे सरकारांत गेल्यास, त्या सरकारानें घोड्यावर आपले निशाणीचा डाग देऊं नये. म्हणून शिपाई लोकांचे धन्यांनीं असें वागावें कीं, शिपाई व घोडे चाकरीस ठेवतेवेळीं अशी खातरी करून घ्यावी कीं, शिपाई व घोडा बडतर्फ करण्याचें कारण पडणार नाहीं. शिपाई लोक चाकरीवर राहून जितके कदीम व पुरातन होतील तितके उत्तम. पुरातन व विश्वासूक चाकर आप्तासारखा आहे.

५९. पादशाही सरकारांत हरएक विद्येचे व गुणाचे चार चार पूर्ण जाणते वस्ताद नेमून, त्यांचे योग्यतेनुरूप, रोजमुरे व तैनाती करून द्याव्या. पादशाहींत जितके जितके विद्वान् लोक जमतील व प्रसिद्धीस पावतील, तितके पादशाही शोभेस कारण होतील.

६०. हे विद्वान् सरकारांत हुजूर जमवून ठेवावे. त्यांपासून नियमित चाकरी घ्यावी. कित्येक संभावित व विद्वान् लोकांस चाकरीची माफीही असावी.

६१. सर्व थोर थोर मनुष्यांची हजिरी लिहिणारे सबनीस असावे. कोण काय कारणानें गैरहजर आहे, तें लिहून ठेवावें. हमेष गैरहजर राहणारांच्या खाडे-दिवसांचा आकार त्यांचे पगारांतून वजा करून घ्यावा.

६२. सरकारांत हुजूर राहणाऱ्या गुणी जनांची नेमणूक वेगळी तुटक केलेली असावी; एकंदर बेहड्यांत ठेऊं नये. परंतु गांवच्या जमाबंदीचा पगार हरएक गांवच्या हकिमाच्या मार्फतीनें समजून घेऊन, हिशेब आणवीत जावा.

६३. बादशाहांनीं कोणत्याही कामकारभारांत अफरातफर होऊं देऊं नये. दिवसाच्या वेळाचे तीन विभाग करावे. प्रातःकाळापासून तीन तासपर्यंत विद्वान्, गुणवान् व कवी यांसहवर्तमान राहून, अनेक प्रकारची माहिती करून घ्यावी. चवथे तासापासून साहावे तासापर्यंत, उघड दरबारांत बसून, थोर, कारभारी, संभावित, व शिपायी लोक ह्यांचा मुजरा घ्यावा. त्या वेळीं सर्वांस येण्यास मोकळीक असावी. गैरराबता नसावा.

६४. सातवे तासापासून नववे तासापर्यंत एकांतांतील कामें असतील तीं करावीं.

६५. नववे तासापासून एक प्रहर रात्रपर्यंतही एकांतीं बसून, राज्यकारभारा-संबंधीं कामें करावीं. (अवशीचें पांच घटकारात्रीनंतर निमाज पढताती). ईषाम पढल्यानंतर हर पाहिजे तें काम करण्यास पादशाहा मुखत्यार आहे. ह्या कायद्याप्रमाणें वेळ घालवावी. शिरस्ता सोडून एक घटकाही वागूं नये.

इदीचे दिवसांत व शबरांतील ह्मणजे साबान महिन्याची तेरावे तारिखेची रात्र ह्या दिवसांत बाजारांत दुकानोदुकानीं व दरबारांत आरास करावी.

६६. नऊरोजचें इदींत नऊ दिवसपर्यंत, बहुत झटून, उत्तम आरास करून बहुत शोभा आणावी. तशी सालगिरीदेच्या समारंभांतही बहुत आरास करावी. इदीचे व सालगिरीचे दिवशीं अमीर, कारभारी, कामगार, वकील, शहरचे लहान थोर बाजारी लोक व हरकोणी मुजरा करावयास येतील, त्यांस मोकळीक असावी.

चाकरलोक किंवा ज्यांस दरमहा नेमणुकी पावतात असे शहाजादे— ज्यांस वजिफा असें ह्मणतात ते— ह्यांनीं आपापल्या योग्यतेप्रमाणें पादशाहास नजरा कराव्या. ती नजर नक्त किंवा जडजवाहिराची अगर कांहीं जिनसाची असावी.

६७. नऊरोजचे इदीचे नऊ दिवसांत, महालच्या ह्मणजे राणीलोकांच्या ह्यांच्या येण्यालायक जी बाग असेल, तेथें आरास करून इंद्रभुवनासारखी शोभा आणावी. पडदे बांधून लावण्यवती स्त्रियांस बसण्यास आवाशीची जागा करावी.

---

१ सालगिरा ह्मणजे जन्मदिवस, वाढदिवस.

हुजूरचे बाजारांत आरास मुद्दाम करवावी. तशीच शहरांतील व शहराच्या बाहेरील बागांमध्यें आरास करून शोभा आणावी. इदीचे नऊ दिवस समाप्त जाल्यावर एक दिवस बादशाहांनींही मोठ्या समारंभानें बागेंत सफर करावी.

नऊरोजचे इदींत राज्यांतील गुणी जनांनीं बादशाहासमीप येऊन, आपले गुण व कुशलता दाखवावी.

६८. नऊरोजचे इदीचे दिवसांत अमीर, वजीर, महालाकडील दप्तरदार, व कित्येक कारखान्यांकडील चाकर, तसेंच हुजरे व शागीर्दपेशे ह्यांस योग्यतेनुरूप पोषाक द्यावे; आणि अमीर व वजीर ह्यांच्या स्त्रियांसही पोषाक द्यावे.

६९. आपला बाप ज्या महिन्यांत वारला, त्या महिन्यांत तो महिना सरेपर्यंत, व हजरत सुलतान अवलियाचे अकरा दिवस व मोहरम शरीफचे (ताबुताचे) दहा दिवस, ह्या दिवसांत आसारमहालांत, अनेक प्रकारचीं उत्तम पक्वान्नें करून, मेजवानीसारखा थाट करावा. आणि "व ह ल का व जी मे रे त ह ली ल" ह्मणोन निमाजीचे प्रकार आहेत, त्या प्रकारच्या निमाजी पढवाव्या, आणि खेर खैरात ह्मणजे दानधर्म करावा.

आसारमहालांत सदरीं लिहिल्याप्रमाणें भोजनाचा थाट करून, मुसलमान जातीचे फकीर, विद्याभ्यास करणारीं मुलें, मुल्ले वगैरे विद्वान् लोक, काजी, मषायक ह्मणजे धर्मशास्त्री, गुणिजन, कारभारी मंडळ, व कामगार लोक ह्यांस एकेक दिवस भोजनास आमंत्रण करावें, व त्यांस संतुष्ट करावें.

७०. वर लिहिलेल्या सभारंभांत, गुरुवारीं व अकरावे आणि बारावे दिवशीं, नित्याहून अधिक भोजनाचा समारंभ करून, खुद्द बादशाहांनीं तेथें भोजनाकरितां जाऊन, पंगतीस बसून तेथील अन्न घेऊन भोजन करावें.

७१. आसारमहालांत कुरानषरीफचे शास्त्रार्थानें वर्ज्य केलेलीं कोणतींही कामें करूं नयेत. नऊ रोजचे आराशींत खुद्द मुखत्यार आहेत. हरएक चांदणे रात्रीस राबता खुला असावा, ह्मणजे सर्वांस येण्याजाण्यास मोकळीक असावी. त्या वेळीं हुजूर राहणारे थोर लोक व सरदार व काजी व विद्वान् लोक व हरएक कारखान्याकडील कामदार व शागीर्दपेशे वगैरे चाकर लोक, या सर्वांनीं चांदणे रात्रीं हजर राहून, आपले अधिकारानुरूप पादशाहास मुजरा करावा. सर्वांचा मुजरा घेण्याकरितां तीन तास रात्रपर्यंत बसावें, व प्रत्येक महिन्याच्या पहिले तारिखेस प्रातःकाळापासून सहा तासपर्यंत, दादमहालांत—ज्या अदालतीच्या इमारतीस दादमहाल नांव ठेविलें आहे व जेथें सर्वांच्या फिर्यादी ऐकण्यांत येतात तेथें— बसून अमीर व वजीर यांचे मुजरे घ्यावे.

७२. दरबारची जागा पूर्ण विस्तीर्ण असावी. तेथें पूर्वेस तोंड करून बसावें. दरबारच्या भिंतीबराबर उत्तम डौलदार व विस्तीर्ण व दरबारास शोभावयाजोग्या मशिदी बांधाव्या. मशिदीचे तिन्ही बाजूस सर्व जमातींनीं बसावें. या जागीं थोर थोर सोपे वगैरे इमारती बांधाव्या. त्या इमारतींस जमाअतखाना असें ह्मणतात. ते बहुत मेहनतीनें बांधून, दुमजला माड्या बांधाव्या. मशिदीचे ढेलजेवरही दुमजला बांधून फारच शोभिवंत करावें.

७३. मशिदीचे मैदानापुढें थोर हौद बांधावा. तो पाण्यानें सर्वकाळ डबडबीत भरलेला असावा. मशिदींतील निमाज पढणारांचे जे कांहीं कायदे आहेत, ते जाणणारे निमाज पढणार एकेक मशिदींत एकेक असावे. मशिदींतील अन्नसत्रांतील अन्न निर्मळ ठेवावें. तान्हेल्या मुसलमानास पाजण्याकरितां पाण्याचे रांजण भरून ठेवतात, त्या ठिकाणास पानसत्र ह्मणतात. अशीं पानसत्रें मशिदींत असावीं. सर्वांनीं बसावयाजोगी जी जागा केली असेल, तींत ह्मणजे जमातखान्यांत, हरएक विद्येचे पाठ देणारे विद्वान् लोक जमवावे.

७४. दरबारच्या भिंतीशीं सरासरी जमातखान्याचे बरोबरीचे जे लोक बसतात, त्यांस बसावयाकरितां व दरबारचे पाहऱ्याचे शिपायांस बसावयाकरितां, शोभिवंत जागा बांधून, दरबारचे मैदानाच्या बाजूनें मोठीं मोठीं दुकानें लांब, रुंद, दुमजला चुनेगच्ची दगडी बांधावीं. तीं नेहमीं स्वच्छ असावीं.

७५. उत्तम कारागीर, हरहुन्नर जाणणारे, धनाढ्य सौदागीर, "तबाख" ह्मणजे शिजलेलें अन्न विकणारे, बागवान वगैरे फळफळावळ विकणारे, व हुशार हलवाई लोक ह्यांस सदरीं वर लिहिलेल्या बाजारांतील दुकानांत जागा द्यावी. बाजारांत मालमत्तेची वृद्धि होऊन बाजाराची आबादी होण्याविषयीं फार यत्न करावा. हरएक माल व हरएक जिन्नस ह्या बाजारांत विकण्यास आणावा. दुसरीकडे विकूं नये.

७६. दरबारचे मैदानचे जाग्यांत चोहोंकडील दुकानांपासून सारख्या अंतरावर मोठा हौद बांधावा. तो सर्व काळ पाण्यानें भरलेला ठेवावा. ह्मणजे पाण्याचा सर्वांस उपयोग होईल. त्या हौदाचे सभोंवतीं व दुकानांचे समोर दाट छाया पडण्यासारखीं झाडें लावावीं. परंतु तीं झाडें फैलावून दुकानांच्या शोभेस उपद्रव होऊं देऊं नये. कोतवाल व बाजारी लोक यांणीं दरबारचे पुढील मैदानांत शोध ठेऊन कचरा पडूं देऊं नये. जागा कोठेंही उंच नीच असूं नये, व धुरळा पडूं देऊं नये. पाणी शिंपून उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवावी. ती अशी कीं, त्या काळचे लोकांनीं त्या जागेच्या शोभेचा दृष्टांत घेत असावा. सोप्यावर व दादमहालाचे

दरबारचे जमातखान्यावर बहुत शोभा व आरास करावी. माडीस थोर थोर खिडक्या असाव्या. पादशाहाची बसावयाची जागा अशा प्रकारची करावी कीं, तेथून दरबारापुढील मैदान बादशाहाचे दृष्टीस पडेल. दरबारचे दरवाज्यावर तास ठेवावा. अनेक प्रकारच्या रंगांचें काम दरबारचे सोप्यांत करावें, व पुष्कळ विस्तारानें भिंतीवर अक्षरांची दाटी न करितां, सोनेरी शाईनें कुराणांतील वाक्यें इमारतीच्या तारखेसुद्धां लिहावीं. गुजरीचा चौक दरबारचे बाजूसच करावा.

७७. बोहऱ्याच्या जातीचे दुकानदार असतील, त्यांस शहापूर खेरीज करून, या बाजाराशिवाय कोणतेच दुसरे ठिकाणीं दुकान घालूं देऊं नये. बोहऱ्यांच्या पाठीमागें सौदागर लोकांचीं दुकानें असावीं.

७८. बाजारांतील व इतर ठिकाणचे दुकानदारांवर जुलूमजबरदस्ती करूं नये. त्यांस अभय असावें.

हबशी, तुरकी, हिंदु व खोजे या चार जातींच्या चाकर लोकांवर चार हवालदार एकसारखे हुशार व कामकाज केलेले नेमावे. ते चांगले अक्कलवान् व चार प्रतींचे चाकर लोकांचा जाबता लिहिणारे असावे.

दरएक जातीच्या मुलांस फारशी लिहावयास वाचावयास शिकविणारे पंतोजी नेमावे. तसेंच, तिरंदाजी करणार, बंदुक मारणार, भाले मारणार व कुस्त्यांचे डावपेंच जाणणार, असे वस्ताद त्या हवालदारांच्या ताब्यांत द्यावे. सदरहू गुण व विद्या शिकविण्याकडे जो सामानसरंजाम लागेल, तो सदरहू लोकांनीं सरकारांतून घेऊन, मुसलमानाचे कुरानशरीफचे शास्त्रार्थाचे हुकूम व अर्कान पढवावें; व हरएक विद्येचा अभ्यास करवावा. कित्येकांस एखाद्या कारखान्याकडे नेमून एकाच विद्येंत अभ्यास करवावा. . विद्याभ्यास करणारीं मुलें जमविण्याकरितां कामगार नेमावे, व तीं मुलें हरएक विद्येंत जितकीं तयार होतील तितकीं चांगलीं.

७९. विद्याभ्यास करणारीं मुलें लहान वयाचीं आहेत तोंपर्यंत त्यांस अन्नवस्त्र वगैरे जें लागेल, तें सरकारांतून द्यावें; व त्यांचे विद्याभ्यासाप्रमाणें कांहीं नेमणूक करून द्यावी.

८०. सदरहू मुलें थोर होतील, तेव्हां त्यांचीं लग्नें करून देऊन, बसावयास घोडा व रोजमुऱ्याची नेमणूक करून द्यावी; आणि हुजूर चाकरीवर कोठेंतरी कारखान्यांत, किंवा किल्लेकोटांत, अगर महालोमहालीं, त्यांची योग्यता पाहून नेमणुका कराव्या.

८१. सदरहू चाकर लोकांनीं आपलीं कामें इमानानें व हुशारीनें करावीं. जे चाकर लोक आपलीं कामें बेमानपणें व गाफिलपणें करतील, त्यांस चाकरीवरून

बर्तर्फ करून, कुरानशरीफचे ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें त्यांचें पारिपत्य करावें. अशा मनुष्यास परहद्दींतही जाऊं देऊं नये. कारण, दूर मुलुखीं जाऊन फंदफितूर व बखेडे करील.

८२. हुजूरचें चाकर लोकांनीं, सरकारस्वारीचे समयीं, आपापले हवालदारासमागमें ओळी बांधून, सामान सरंजामानिशीं पादशाहाचे स्वारीमार्गे उभें राहावें; व ज्या सेवकास ज्या हत्यारांचा अभ्यास असेल, त्या हत्याराचे गुण त्याणें दाखवावे. ह्मणजे बंदुखबारदारानें बंदुखीचे बार काढावे व सरकारच्या पागा डाव्या व उजव्या बाजूस चालाव्या.

पागेकडील घोड्यांची लीद व घोड्यांनीं खाऊन उरलेला कडबा व गवत यांचा गळाठा राहिला तो विकावा. ह्याचा जमाखर्च ठेवणारे दोन कारकून नेमावे. दर घोड्यास एकेक मोतद्दार नेमावा व कारखान्याकडील सर्व सामानसरंजामाची तयारी ठेवावी.

पागेंतील एकंदर घोड्यांस सरकारी निशाणीचे डाग असावे. हरएक घोड्याचा रतीब ठरवून ठेवावा. घोडा माजुरी व दांडगा असल्यास पागेंत ठेऊं नये.

पागेंत व पीलखान्यांत व उष्टरखान्यांत हमेशा चोरी होते. त्याविषयीं खबरदारी ठेवावी. ह्मातारे व निखालस कामांतून गेलेले घोडे कदापि पागेंत ठेऊं नयेत. चाबुकस्वार व घोड्यांचीं औषधें जाणणारे वैद्य ह्मांनीं पागेंत पाहणी फार हुशारीनें ठेवावी. घोड्याची लीद व वैरणीचा गळाठा विकण्याच्या कामावर मुख्य कामगार मोंगल व पठाण जातीचे असावे. स्वार लोक असावे ते बंदुकीचें निशाण लावणारे व तिरंदाजी करणारे व भाल्याचा मारा जाणणारे अशा प्रकारें हरएक विद्येंत तयार केलेले शागीर्द ( शिष्य ) बारनिशीचे कामांत दाखल करावे. मनुष्यांनीं हुजूर, बारीबारीनें चाकरीवर हजर असावें, व संपूर्ण बारगीरस्वारांवर एक हवालदार नेमावा. त्याचप्रमाणें तिरंदाज बरकंदाज व भालेकरी यांजवरही एकेक हवालदार नेमावा. खोडील व माजुरी घोडा असेल तो पागेंत ठेऊं नये.*



* ही माहिती आमचे मित्र रा. रा. कृष्णाजी विष्णु आचार्य यांचे परिश्रमानें मिळाली ह्याबद्दल त्यांचे फार उपकार आहेत. विजापुरच्या मुसलमानी बादशाहीमध्यें पूर्वी राजव्यवहाराचे नियम लिहून ठेवण्याचा प्रघात कसा होता, त्याची ह्यावरून चांगली कल्पना करितां येईल. ह्यांतील कित्येक नियम फार महत्त्वाचे आहेत.

## ८. नाशिक जिल्ह्यांत सांपडलेलीं नवीन नाणीं.*

आपल्या हिंदुस्थान देशांत भूमिगत नाणीं बहुत आहेत. अत्यंत महत्त्वाची गोष्ट ही कीं, तीं उपलब्ध होतांच कित्येक संशययुक्त व वादग्रस्त मुद्द्यांवर तत्काळ विलक्षण प्रकाश पडतो. नाशिक जिल्ह्यांतील सिन्नर तालुक्यांत जोगलटेंभी नांवाचें एक खेडें आहे. तेथें सांपडलेल्या प्राचीन नाण्यांचा संग्रह पाहून प्रत्येक इतिहाससंशोधकाचें अंतःकरण आनंदानें उचंबळून गेल्याशिवाय रहाणार नाहीं. त्यांचें महत्त्व लक्षांत येण्यास थोडी ऐतिहासिक माहिती नमूद करितों.

इ. स. पूर्वी सुमारें ३१० व्या वर्षी, गोदावरीचे आसमंतांतील मुलुखावर आंध्र राजांनीं आपली सत्ता संस्थापित केली. ३०० वलयांकित नगरांवर त्यांचा अंमल चाले व त्यांची दीड लक्ष सेना नेहमीं युद्धास सज्ज असे. कालांतरानें चंद्रगुप्ताचे प्रबल सत्तेपुढें त्यांस हात टेंकावे लागले. तथापि, लवकरच खुद्द नाशिकाचा समावेश त्यांचे राज्यांत होऊं लागला. शातवाहन अथवा शालिवाहन ते हेच. या कुलांतील बहुतेक राजे आपले नांवापुढें शातकर्णी अथवा सातकर्णी हें पद लावीत. परंतु आपल्या मातुश्रीचें नांवही जोडण्याची वहिवाट त्यांनीं पाडिल्यामुळें विवक्षित राजा ओळखण्यास फारशी अडचण पडत नाहीं.

या कुळांतील दुसरा विलिवायकुर राज्य करीत असतां, नहपानानें त्यांचा बराच मुलूख बळकाविला. हा महाराजा नहपान, शक जातींपैकीं क्षहरांत वंशांत उत्पन्न झाला होता. यानें बरींच वर्षे राज्य केलेंसें दिसतें. जोगलटेंभीस चार प्रकारचीं नाणीं सांपडलीं. पहिल्या प्रकारच्या नाण्यावर नहपानाची प्रतिमा आहे. याचा चेहेरा व पोषाख शकास साजेल असाच आहे. हा धष्टपुष्ट आहे. तरी पुणें जिल्ह्यांतील त्रैकूटक राजाशीं याची तुलना करितां, यास अशक्तच म्हटलें पाहिजे! तारुण्यांतील व उतारवयांतील असे प्रतिमेचे दोन भाग करितां येतील. वर निर्दिष्ट केलेल्या नाण्यांपैकीं बरींच इ. स १२० च्या सुमारास पाडिलीं असावींत. परंतु सर्वच समकालीन नाहींत, हें सांगणें अवश्य आहे. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारच्या नाण्यांवर मूळ नांव नहपानाचें असून, त्यांवर गौतमीपुत्र शातकर्णी म्हणजे दुसरा विलिवायकुर यानें आपलें नांव घातलें आहे. कांहींवर

* ही माहिती नासिकचे कलेक्टर व 'इतिहाससंग्रहा'चे आश्रयदाते परलोकवासी मि० ज्याकसन ह्यांनीं 'यशवंत' ह्यांचे मार्फत आमच्याकडे गेल्या डिसेंबर महिन्यांत पाठविली होती. त्यांचा हा शेवटचा संस्मरणीय लेख म्हणून ह्या अंकांत प्रसिद्ध केला आहे.

अशी व इतरांवर अशी आकृति आहे. हीं गौतमीपुत्र गादीवर येतांच पाडिलीं हें उघड आहे. चवथ्या प्रकारच्या नाण्यांवर फक्त शातकर्णीचेंच नांव आहे. आपण वर्णसंकर होऊं दिला नाहीं व शास्त्रोक्त कर फक्त वसूल केले, ह्मणून यानें आपली स्तुति एका ताम्रपटांत केली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत सर्वत्र शालिवाहन शक चालू आहे. तेव्हां येथील लोकांस वरील नाणीं पहावयास मिळाल्यावर "लब्धं खलु नेत्रनिर्वाणं" असें वाटल्यास नवल काय ?

"यशवंत."



## ९. शाहू महाराजांच्या वेळचे अष्टप्रधानांचे पगार.

एका जुन्या यादीमध्यें शाहू महाराजांच्या वेळच्या मुख्य कामदारांच्या तैनाती दिल्या आहेत. त्या शाहू महाराजांच्या दसरीं बार असून ह्या सर्व अधिकाऱ्यांना 'सरकारकून' अशी संज्ञा त्या यादीमध्यें दिलेली आहे. ही यादी येणेंप्रमाणेः—

श्री.

"यादी सरकारकून यांसी तैनात दसरीं बारः—

| | |
|---|---|
| १ राजश्री बाळाजी पंडित प्रधान | १३०००. |
| १ राजश्री पंत आमात्य | १२०००. |
| १ राजश्री चिमणाजी पंडित सचीव | १००००. |
| १ राजश्री नारो राम मंत्री | १००००. |
| १ राजश्री आनंदराव डबीर सुमंत | १००००. |
| १ राजश्री सखो विठ्ठल न्यायाधीश | १००००. |
| १ राजश्री राघो मुद्गल पंडितराव | ( यांस सरंजाम गांव आहेत ). |
| १ राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति वेतन | ९०००. |
| १ राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधी | १५०००. |
| १ राजश्री पंत राजाज्ञा. | १००००." |



## २०. डेव्हिड स्कॉटचें नानांस पत्र.

[शेणवलीदप्तर.] श्री.

(नक्कल)

( बिलंदसाहेब श्रीमंत नानांस डेवीड इसकाटचें पत्र. )

"बहुमानयुक्त कृपापत्र पाठविलें, तें एकविसावे चालते महिन्याचे तारखेस पावलें. त्याच बरोबर रणसोड शेणवी यांचेंही पत्र पावलें. त्यावरून हाल्लीं दस्तक जनराल गारडराचें, मशारनिल्हे रणसोड शेणवी यांसी जात आहे. यानंतर, जनांत व पृथ्वींत बोलतात कीं, आपण थोर, व लौकिकाची तारीफ अतिशय करितात. त्यास जनराल गारडर फारच समाधान होऊन बहुत आपणास च्याहातात. यास्तव मजला पुर्ता भरंबसा आहे कीं, इंग्रेज व मराठे अविलंबे एकरंग दोस्तीनें चालतील. जितुके जलदीनें रणसोड, जनरालाचे तळास येऊन पोहोंचतील, तितुकेच त्वरेनें, योजिलें शुभकार्य घडोन येईल. आपली कृपा व ममता मजठायीं पाहून फार समाधान आहे. तर हरएकविसीं आज्ञा जाहाल्यास अंतर पडणार नाहीं. ईश्वरानें आपली दौलत विशेष चढती करावी व आयुष्यानें राखावें."

एकनिष्ठ चाकर डेविड इसकाट.

बुलंद साहेब बाळाजी जनार्दन.



## २१. इ. स. १७५८ मधील हबसाणच्या प्रजेची स्थिति.

इ. स. १७५८ मध्यें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांच्या आज्ञेवरून जंजिऱ्याच्या हबशावर रामाजी महादेव ह्यांनीं स्वारी केली. त्या वेळीं जंजिऱ्याचा सिद्दी इब्राहिमखान ह्यानें मराठ्यांच्या प्रजेवर कसा जुलूम केला, त्याचें एक जुनें टिपण सांपडलें आहे. त्यावरून पूर्वींच्या राजकीय परिस्थितीची चांगली कल्पना करितां येते, ह्मणून तें येथें दिलें आहे.[1]

[यशवंत.]

श्री.

"हकीकद कर्दे ऐसीजे:—शके सोळाशें पंचावनावे शकीं रा. बाजीराव जंजिरेयासी वेढा घालून, सल्ला उत्तम प्रकारें निम्मेनिम्मे सत्ता परस्परें करून गेल्यानंतर, शके १६८० बहुधान्य संवत्सरीं वैशाखमासीं वद्य पंचमीस, राजश्री पंतप्रधान बाळाजी बाजीराव

१ हें टिपण तळें येथें रा. रा. द्वारकानाथराव देशमुख ह्यांच्या दप्तरांत सांपडलें. तें जीर्ण असून अपूर्ण आहे. २ इ. स. १७५८ मे महिना.

नानासाहेबीं, सारे कोंकणचे मामलेदारांस रामाजी महादेव मुख्य करून देऊन, जंजिरे-मजकुरास वेढा घालायास हुकूम केला. ते सारे मामलेदार मिळोन वेढ्यास बसले. आपलेकडून मामलेदारांहीं जंजिरेमजकूरचा दाणापाणी बंद केलें. परंतु सिद्दी इब्राहीमखानसाहेबीं हरहुन्नरेंकरून, रात्रीचे आपले लोक, चोरगस्तीनें मुलुखांत घालोन, सारे रहतीस उपद्रव भारी केला. वेढेकरी यत्न मात्र करीत असेत. परंतु खानसाहेबाचे लोक न सांपडतां मुलकांत तर उपद्रव भारी असें झालें. अधिकच हबसी बळावत चालला. मग सारे महालोमहालचे जमीदारांस व खोत पाटील रयतीस, खुद्द खावंदानें आपले शिक्यानिशीं दोन पत्रें पाठविलीं कीं, 'दुसाला हिशोबाचे रुपये महाल पाहून लिहून पाठविले, त्यास आमचे *महालीं मामलें तळें मजकुरीं तीन हजार रुपये पाठऊन द्या.' ह्मणोन दोन 'कागद जंजिऱ्यांतून पाठविले. त्यास कोण्ही जमीदारांहीं मिळोन, खोत पाटील आणोन खावंदाचे रुपयांची वाट करावी, ती केली नाहीं. त्यांवरून रागें भरून आपले लोकांस हुकूम केला कीं, रयतेस ताकिद करा कीं, मुलूख ओस घाला. त्यावर लोकांहीं खावंदाचे ताकिदीप्रमाणें मुलूख ओस घालावा. तों गांव कोण्हा मामलेदाराचे दाहा, कोण्हा कारकुनाचे पांच, याप्रमाणें गांवचा तपशील मुलूख रयेतीनें टाकावा, तों मामलेदार टाकूं न देत. मग एकाचे आश्रानें एक राहिले. मग खानसाहेबीं आंतून आंतून मराठे खोत व पाटील ...... यांजपासोन कांहीं रुपये घेतले. असेंही करोन एकसाल गुदरलें. मग दुसरे सालीं खावंद खानसाहेबीं हुकूम केला कीं, रुपये घेत नाहीं. रयत तुह्मी उठोन जा. तों हंगाम ऐन आवंजा लावायाचा. आतां काय करावें? अशी रयेत चिंताक्रांत जाली. आवंजा खोळंबल्यानें मातबर मातबर होते, ते आपले बळजोरीनें आवंजा आपले आपले गांवचा करूं लागले. गरीब गुरीब रयेतेचा आवंजा करायास उपाय नाहीं. अशांतही कोण्ही भीतभीत आविंज केली. तों खानसाहेब फारच रागास येऊन, मुलकांत दाणादाण करून, रयेत हातीं धरून, पडते पावसीं घरांतून बाहेर घालूं लागले. कांहीं रयेत पावसांत रानांत गेली; कांहीं रयेत राहूं लागली. सारी रयेत जायाबद्दल प्रथम खोडजी पोटल्या मौजे प्रगणे हवेली याचीं माणसें बारा धरून नेलीं. मग गांवचे गांव भाजायास लागले. मग रा. वैज पाटील साणप सरखोत यांचें घर भाजून, त्यास धरून बांधून मारिलें; बांधलें. मग सरखोतानें हबशांचे लोकांस अर्ज केला कीं, अशा पावसांत घरें भाजतां, आणि जा ह्मणून ह्मणतां! तर कांहीं आमचे जीवामाफीक आह्मांजवळून घेऊन, दोन महिने असूं द्या. त्यास ते बोलिले कीं, आमचे खावंदाचीं तुह्मांस दोन पत्रें आलीं. त्याची तुह्मीं जमेदारांहीं पायमलती केलीत. तर तुह्मीं जमेदारांस सांगा, आमची भेट घ्या. मग तुमचे जमेदार व आह्मी जो मनसबा करूं तो साहेबांस सांगून, मग जो हुकूम साहेब करितील त्याजप्रमाणें तुमची वाट करूं. अशी बोली सरखोताजवळ जाल्यानंतर सरखोतानें राजश्री रामाजी टमके खोत मौजे माळाठे

* इ. स. १७३६ त बाजीराव पेशव्यास दिलेल्या ५॥ महालांपैकीं तळें हा एक होता.

यास बराबर घेऊन, तळें कसब्यांत येऊन, देशमुख व कुलकर्णी यांस जाली हकीकत सांगितली; आणि बोलिला कीं, आज तुह्मी जमेदारसे असले, तर रयतेची काकळूत करून, कांहींतरी रयतेचा बचाव होईसा करा. मग दादजी सावजी देसाई व खंडो मल्हार देसाई व मुरारजी कुळकर्णी यांहीं जाब सांगितला कीं, आमच्यानें कांहीं होत नाहीं. भें (भय) वाटतें ! मग सरखोत बोलिला कीं, "गडे हो, तुह्मी बऱ्याचे सोबती. बरेपणांत जमेदारी मिरवतां. जो रयेतेचें बरें करील तो आमचा जमीदार. तो आमचा देशमुख व आमचा कुलकर्णी. हे समयी रयेतेच्या जिवावर. हे समयीं तुमच्यानें होत असतां तुह्मी भितां. मग बरें जाल्यावर जमेदारी मिरवाल. असो." असें बोलून मग आह्मांस त्यांनीं एकांतीं करून सांगितलें कीं, तुह्मी काय जाब सांगतां? जर तुह्मी आपले भायबंदांप्रमाणें जाब सांगितला, तर रयेत मरते. तुह्मांवेगळ हबशी याचे लोक आमचे हातून रयतेचें बरे करीत नाहीं (त). मग आह्मी आपले मनाचा विचार करून जमेदारीचे नात्याचा कारभार हाच कीं, रयेतेच्या अडचणीस उभे राहून रयेतेचें बरें करावें; तर पुढें बरेपणांत जमेदारी हक पडते. असा निश्चय करून, आह्मीही भावबंदांहीं दादजी सावजी व खंडो मल्हार देसाई व मुरारजी कुळकर्णी यांस याजप्रमाणें मनसबा समजाविला. मग ते ज्याप्रमाणें सरखोताजवळ बोलिले, त्याचप्रमाणें आह्मांजवळ बोलिले. मग आह्मी, त्यांस बोलिलों कीं, गडेहो तुह्मी बोलतां, पण हें बोलणें जमेदारीचें नव्हे. जमेदारानें खावंदास भिऊं नये. खावंद ह्मणजे मायबाप असे उपाय मात्र त्यास केला. परंतु ते मनावर न धरीत. मग आह्मीं देवाचे पायावर भार घालोन, निघोन जाऊन, हबशाचे लोकांची भेट घेतली. ते समयीं खानसाहेबाचे लोकांहीं धरोन, दबवून मारून टाकावें असें केलें. ते समयीं सरखोताने व रामजी टमक्यानें पुसलें कीं, तुमचे हुकुमावर आह्मी कोण्ही जमेदार येत नव्हते, परंतु एवढ्यास मथवून आणिला. आमचें बरे करावें ह्मणून. आणि तुह्मी त्यांस कां मारितां? मग ते ह्मणाले कीं, अरे देशमुख, तूं जमेदार होऊन आज दोन सालें आमचे कागद येतात, त्याजप्रमाणें आमची विल्हे कां केलीस नाहीं? पायमलती केलीस. सबब तुला मारतों, आणि सारा मुलूख भाजून जातों. मग मी बोलिलों कीं, साहेब, आह्मी राहतों पेशव्यांचे तालुक्यांत, आणि त्यांचा वेढा बसला असतां तुमचे कागदाप्रमाणें तुमची विल्हे करावी, तर ते आमची डोकीं मारून मुलें माणसें सरकारांत घालतील. असें त्याचें भें (भय) धरून, तुमची विल्हे करावी ती न केली. आणि साहेबांची त्यांचे चोरीनें भेट घ्यावी, तो सारे भायबंदाशीं विचार करूं; तो कोण्ही भायबंद मनावर न धरीत. हें खरे कीं लटकेसे सरखोतास व टमक्यास पुसावें. मग त्यांहीं सरखोतास व रामाजीस विचारलें कीं, ह्याचे भायबंद काय बोलतात आणि ह्या काय बोलतो? मग सर—" (अपूर्ण)

ॐ ॐ ॐ

## २२. सती जाण्याची चाल बंद करण्याबद्दल हेन्री राबर्टसन ह्यांचें पुण्याच्या शास्त्रीमंडळीस पत्र.

इ. स. १८१८ मध्यें पुणें येथें इंग्रजी अंमल झाल्यानंतर, पहिले कलेक्टर हेन्री डंडास राबर्टसन साहेब हे झाले. हे फार थोर मनाचे होते. ह्यांनीं लोकांशीं फार गोडीगुलाबीनें वागून, इंग्रजी राज्याबद्दल लोकांच्या मनांत आदरबुद्धि उत्पन्न केली. ह्या काळीं सती जाण्याचा प्रघात होता, व पुण्यास राधाबाई ह्या नांवाची बाई, ता. ११ सप्टंबर इ. स. १८१९ रोजीं सती गेली. तिचा भयंकर प्रकार पाहून, ही चाल बंद करण्याबद्दल राबर्टसन साहेब ह्यांनीं पुण्याच्या शास्त्रीमंडळीची एक सभा भरविली, व त्यांना ही चाल बंद करण्याबद्दल विनंति केली. ती पुढील पत्रांत नमूद आहे. हें पत्र बरेंच मनोरंजक आहे, सबब येथें दिलें आहे.

[किरकोळ.] श्री.

"वेदशास्त्रसंपन्न समस्त शास्त्री यांचे मजलसींतः—

क्याप्टन हेनरी डंडास राबर्टसन साहेब बाहादूर म्याजिस्ट्रेट सुभा पुणें यांचें बोलणें कीं, जी सती भाद्रपद वद्य ८ शनिवारीं गेली, त्या सतीचे हाल झाले. ते हाल या मजलसींत जितके आहेत त्यांनीं पाहिले असते, तरी त्यांचे मनांत येतें कीं, असें पुन्हां कोणासही होऊं नये. येविषयीं आह्मांस मदत करते. त्यास हल्लीं आमचे दिलांत येतें कीं, सती जावयाचा दस्तुर फार खराब; आणि तुमचे शास्त्रांत असें लिहिलें नाहीं कीं, सती मुकरर जावी, असेंही नाहीं. गेल्यास कांहीं चिंता नाहीं, इतकेंच मात्र आहे. ऐसीयास हीं गोष्ट अशी पुन्हां होऊं नये. यास्तव शास्त्रांत जी रीत लिहिली आहे, त्या रीतीनें जावें. हल्लीं शास्त्राची उलट रीत करून जातात. त्यास आह्मी गैररीतीनें जाऊं देणार नाहीं. याजकरितां येविशीं आह्मी सरकारांत लिहून बदोबस्त करूं. यांत तुह्मांस वाईट लागूं नये. तुमचे मनांत येईल कीं, सरकार मना करूं लागल्यास निरुपाय. त्यास येविशीं सरकार बंदोबस्त करूं लागल्यास, सरकारास कांहीं अवघड नाहीं. परंतु सरकार असें मनांत आणितें कीं, ज्या जातीचा जो धर्म आहे, तो मना करण्याचें कारण नाहीं. परंतु सती जाते, तिचे असे हाल होतात, हें कांहीं चांगलें नाहीं. हल्लीं या मजलसींत वृद्ध आहेत. त्यांच्याही दिलांत आलें असेल कीं, ऐसा दुर्लौकिक होतो, त्यापेक्षां बंद जाहल्यास बहुत चांगलें, ऐसें आलें असेल. ऐसीयास या गोष्टीचा बंदोबस्त सरकारांतून जाहल्यास आह्मांस कांहीं वाईट लागणार नाहीं. ऐसी सल्ला तुह्मीं सगळ्यांनीं दिल्यास तुमची अब्रू सारे हिंदुस्थानांत बहुत होईल, आणि ब्राह्मणधर्म वरकड सारे गोष्टींत दयाधर्म आहे, आणि सती जाण्याविषयींच मात्र बहुत सक्ति आहे, ऐसें इतर जातीचे लोक यांचे दिलांत येतें. आणि तुमचे शास्त्रांत असें लिहिलें नाहीं कीं, सती गेली नाहीं

तरी तिची बेअब्रू आहे, व बेदस्तुर होतो असेंही नाहीं; व हल्लीं लोकांतही सती गेली नाहीं तरी तिची अब्रू गेली असें कोणी बोलत नाहीं. असें असतां हल्लीं बायको सती जाते, याची सबब तीन प्रकारची आहेः-एक, त्या बायकोचा भ्रतार मृत्यु पावतो, ते वेळेस त्या स्त्रीस अत्यंत दुःख होऊन तिचा दिल बहुत कठीण होऊन ती जाते. व दुसरी सबब कीं, घरामध्यें स्त्रीचा भ्रतार नित्य ह्मणत असतो कीं, माझी मातुश्री सती गेली, तिची बहुत अब्रू आणि लौकिक फार चांगला जाला, असें ह्मणत असतो. तेणेंकरून त्या स्त्रीच्या मनांत येतें कीं, कदाचित् मी अशीच गेलें, तरी माझाही असाच लौकिक व अब्रू फार होईल. असें चित्तांत येऊन ती सती जाते. तिसरी सबब कीं, आपला पति मृत्यु पावला, आतां आपल्यास कांहीं आधार नाहीं, सती जावें तरी धैर्य नाहीं. परंतु चिंता नाहीं. मांडव अथवा कोप करून वरती लांकडें बहुत घालतात. तो मांडव तोडल्यानंतर जीव कांहीं राहावयाचा नाहीं, व कदाचित् मन फिरल्यास बाहेर निघूं सकत नाहीं. मग कांहीं तरी होवो. ऐशा तीन सबबेनें बायका आपला दिल सक्त करून जातात. ऐसीयास सती जातेवेळेस तिजला मांडव करून, त्याजवर फार लांकडें मोठीं मोठीं घालून, तो मांडव तिचे अंगावर एकदां तोडून पाडावा, असें तुमचे कोणतेही शास्त्रांत निघणार नाहीं. शास्त्रांत इतकेंच कीं, तृणाची पर्णकुटिका करून त्यांत प्रवेश करावा असें असेल. आणि कदाचित् त्यांतून बाहेर निघाली असतां, त्यास थोडें प्रायश्चित्त देऊन पुन्हां शुद्ध करून जातींत घ्यावी असेंही शास्त्रांत आहे. हल्लीं राधाबाई सती गेली, तिनें आपले पतीचे लोभानें त्याजबरोबर सती जावें ह्मणून निश्चयेंकरून सती गेली. ते वेळेस आंत जाऊन आपले हातानें अग्नि लावून घेतला. तेव्हां अग्निज्वाला आंगास लागूं लागल्या. ती आंच सोसवेना. सबब बाहेर निघाली. ते वेळेस तिनें पुन्हां हिम्मत बांधून पुन्हां त्या अग्नीजवळ आली; परंतु आंत जाण्याची हिम्मत जाहली नाहीं. असें समजून, त्या बाईचे दीर जवळ होते, त्यांनीं तिला जबरदस्तीनें पुन्हां आंत टाकिली. त्यास तुमचे शास्त्रांत असें कांहीं लिहिलें नाहीं कीं, सती बाहेर निघाली तरी पुन्हां जबरदस्तीनें टाकावी. असें नसतां हें केलें. हें शास्त्राच्या उलट होतें. याजकरितां आमच्या दिलांत असें मुकरर येतें कीं, हा दस्तुर बहुत खराब आहे. तेव्हां अशी गोष्ट पुन्हां होऊं नये, व आह्मांस मंजूरही आहे कीं, अशी खराब चाल पुन्हां होऊं देऊं नये. यास्तव पुन्हां आह्मी असें होऊं देणार नाहीं. राधाबाईस तिचे दिरानें अग्नींत लोटल्यावर पुन्हांही निघाली. ते वेळेस तिचे हाल असे झाले कीं, तिचे अंगाची कातडी जळून, मांसाचे गोळे बाहेर निघून, पायांतूनही रक्त चाललें. हें तुमचे पाहिल्यांत आलें असतें, तरी तुमचेही दिलांत येतें कीं, ब्राह्मणाचा दयाधर्म आहे, त्याच्या हा फार उलट प्रकार होतो. असें समजून तेच वेळेस तुह्मीं सर्वत्रांनीं ह्मटलें असतें कीं, हें झालें असें कदापि होऊं नये. आतां हल्लीं जे मजलसींत बसले आहेत, त्यांनीं तिचे हाल पाहून व ऐकून दिलांत आणीत असतील कीं, जर करितां आपली बायको, तिची माया आपल्यावर जरी बहुत आहे, तत्रापि मुलां लेंकरांची आई ती, असे हाल करून घेऊन सती जावयाची हिम्मत

तिला होईल, असें एक क्षणभर देखील कोणाचे दिलांत येणार नाहीं. राधाबाईस जळते वेळेस तिजला हिम्मत झाली, तशी हिम्मत या पाठीमागें कोणासही जाहली नसेल व पुढेंही कोणास होणार नाहीं. कारण कीं, अर्धी जळाली असतां पुन्हां अग्नीजवळ कांपत कांपत आली. यास हल्लीं या मजलसींत कोण शक्स आहे कीं, इतकी हिम्मत करूं शकेल? सारांश, हाच कीं, शास्त्रामध्यें सती मुकरर जावी असें निघणार नाहीं, व सती जाऊन माघारी पुन्हां निघाली असतां, तिजला जबरदस्तीनें आंत टाकून द्यावी अगर तोडून टाकावी असें नाहीं. तुम्ही म्हणाल कीं, शास्त्र नाहीं परंतु आचार बहुत दिवसीं आहे, कीं पुन्हां माघारी निघूं देऊं नये त्यास हा आचार बहुत खराब आहे. कारण कीं, तुमचे शास्त्रांत दुसरे आचार किती सांगितले आहेत? ते आचार हल्लीं सोडून देऊन, मनस्वी अनाचार करितात, त्यांस कोणी पाहात नाहीं, व त्यांचा बंदोबस्त करावा याविषयींची फिकीर कोणीही करीत नाहीं. सतीविशीं शास्त्रार्थ असतां त्याप्रमाणें वहिवाट करीत नाहीं. दुसरें, सती गेल्यानें स्वर्गप्राप्ति आहे, असें शास्त्रांत लिहिलें आहे असें तुम्ही म्हणाल, तरी निश्चयेंकरून जी जाते आणि इमान शाबूद राखते ती स्वर्गास जाते. परंतु अशी कोणी नाही कीं, अग्नीचा स्पर्श अंगास जाहलियावर, तेंच इमान शाबूद राहातें असे नाहीं. तेव्हां अग्निस्पर्शसमयीं बुद्धीस भ्रंश होऊन, नंतर इहलोकही नाहीं व परलोकही नाहीं, असें होतें. ऐशीयास कोणतेही माणसाचे दिलांत नाहीं की, आपले खुशीनें अग्नींत ठरून जळून घ्यावें, असे कदापि कोणते काळीं घडणार नाहीं. कोणतेही दयावंत माणसास जळण्याचें दुःख खुद्दास अनुभव आल्याशिवाय विचार करूं शकत नाहीं. ऐसीयास तुमचे दिलांत या गोष्टीचा विचार काय आला असेल? आह्मांवर मेहरबानी करून, तुह्मीं सर्वांनीं मिळून असा बंदोबस्त करावा कीं, अशी गोष्ट पुन्हां आमचे दृष्टीस पडूं नये. त्या बायकोस पुन्हां ज्यानें टाकिली, त्यास दया आहे असें कोणी बोलणार नाहीं, व शास्त्रांतही टाकावी असें नाहीं. त्यास ज्या शकसानें हें काम केलें, त्यास मुकरर सजा व्हावी, व आह्मांस मंजूर आहे कीं त्यास सजा द्यावी. शास्त्रकर्ते मोठे मोठे होऊन गेले, त्यांस बहुत दया होती. त्यांनीं सर्व गोष्टींचा विचार करून, त्यांत असा बंदोबस्त केला असेल कीं, सतीच्या मनांत बाहेर निघावयाचें जाहल्यास तिला बाहेर निघण्याविषयीं फुरसत असावी. कारण कीं, जिचें इमान शाबूद राहात नाहीं, तिनें बाहेर निघावें हें चांगलें. असें जाणून तृणाच्या पर्णकुटिकेचा कायदा त्यांनीं केला. परंतु तुह्मी आतां शास्त्राची आज्ञा उलट करून, आपले मगरुरीनें दया सोडून देऊन, त्या सतीस मारतां. त्यास तुमचे शास्त्रांत असेंही आहे कीं, सती एक वेळ बाहेर निघाली असतां, तिला जो वांचवील त्यास बहुत पुण्य आहे. हें शास्त्रार्थ तुह्मांस माहित आहे काय? आह्मांस ठाऊक नाहीं व आह्मांस मंजूर नाहीं कीं, आह्मीं तुह्मांस समजवावें. परंतु आह्मांस मुनासब आहे कीं, हा खराब दस्तूर मना केल्यानें तुमचे शास्त्राचें उलट होत नाहीं. तेव्हां आह्मी ही गोष्ट होऊं देणार नाहीं. पण तुह्मी दयावंत आहां, आणि सार्‍यांचे दिलांतही आहे कीं, हा दस्तुर बहुत

खराब आहे, हा मोडावा. परंतु तुह्मांस या गोष्टीची शरम आहे. याजकरितां तुह्मी आमची अर्जी ऐकून घेऊन, हा दस्तुर खराब आहे, हा मोडल्यास आह्मांस वाईट लागणार नाहीं, अशी खातरी करावी. ह्मणजे येविषयींचे बंदोबस्ताविषयीं सरकारांत लिहून पाठवूं. अशी खातरी तुह्मीं केलीयास तुमची अब्रू, दया व धर्माविषयीं फार होईल. परंतु सती कोणतेही तऱ्हेने न जावी याविषयींची खातरी करणेंही तुमचे मर्जीची गोष्ट आहे. आतां इतकें तुह्मीं समजावें कीं, आजपासून जी सती जाणार, तिनें शास्त्रांचा जो कायदा तृणाची पर्णकुटिका करून जावें असे आहे, त्याप्रमाणें जावें. तें न होतां शास्त्राच्या उलट होऊं लागल्यास आह्मी होऊं देणार नाहीं. कदाचित् शास्त्रमार्गाप्रमाणें एकादी सती गेली आणि पुन्हां अग्नीतून बाहेर निघाली, तर तिला जो कोणी जबरदस्ती करून आंत टाकील किंवा तोडून टाकील, त्या शकसास आह्मी खुनी असा जाणून, त्याचे पारिपत्य मुनासब आहे त्याप्रमाणें केलें जाईल."



## २३. महादजी शिंद्यांचा मृत्यु व उत्तर हिंदुस्थानचा बंदोबस्त.

महादजी शिंदे पुणें येथें ता. १२ फेब्रुवारी इ.स. १७९४ रोजीं मृत्यु पावले. त्या वेळीं नाना फडणविसांनीं उत्तर हिंदुस्थानांतील सर्व मराठे सरदारांस निरनिराळीं पत्रें लिहून सर्व प्रांतांचा बंदोबस्त ठेवावा ह्मणून सूचना केली. त्या वेळीं दिल्लीचे वकील देवराव हिंगणे हे महेश्वरीं होते, त्यांच्याकडेही कांहीं पत्रें पाठविलीं, होळकरांमही पत्रें लिहिलीं, व त्यांच्याकडून शिंद्यांच्या प्रमुख सरदारांसही पत्रें लिहविलीं. ह्या प्रसंगीं शिंद्यांचे सुप्रसिद्ध शूर सरदार जिवबादादा बक्षी ह्यांनीं रा. देवराव हिंगणे ह्यांस लिहिलेलें पत्र उपलब्ध झालें आहे. त्या पत्रावरून महादजी शिंदे ह्यांच्या मृत्यूनंतर उत्तर हिंदुस्थानची काय स्थिति होती हें लक्षांत येईल.

[ मेणवलीदप्तर. ]

श्री.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री देवरावजी स्वामींचे सेवेसीः—

सेवक जिवाजी बल्लाळ सां नमस्कार विनंति उपरी येथील क्षेम ता छ १ माहे साबान मुक्काम नजीक परवतसर यथास्थित जाणोन स्वकुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः—आपण पत्र छ १ रोजींचें पाठविलें, तें पावलें. लिहिला अर्थ सर्व कळों आला. 'राजश्री पाटीलबावांस ज्वराची वेथा दहा दिवस होऊन माघ शुा १२ बुधवारीं

प्रातःकाळीं वायूची भावना जाली. श्रीमंत व मुत्सद्दी डेऱ्यास गेले. उपाय बहुत केले. कांहीं उपाय लागू न होतां, प्रहर रात्रीस देवआज्ञा जाली. ईश्वरें मोठा अनर्थ केला. श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामींची व श्रीमंत नाना व हरिपंततात्यांचीं पत्रें तेच दिवशीं डांकेंत रवाना जालीं. आमचे नांवें व श्रीमंत तुकोजीबावा होळकर यांचे नांवें आलीं. त्याच्या नकला आपल्याकडे पाठविल्या आहेत, व सुभेदारांचें पत्र पाठविलें आहे. हिंमत धरोन प्रसंग राखावा.' ह्मणोन तपशिलेंकरोन लिहिलें. त्यास येथेंही पुण्याहून श्रीमंत राजश्री दौलतराव बाबा यांचीं पत्रें छ २३ तारखेस आलीं. त्यांत लिहिलें जे, महाराज कैलासवासी जाले. तें ऐकून दुःखार्णवीं पडलों. तें कोठवर ल्याहावें! महाराजांसारिखा धणी प्रतापी गेले, आणि आह्मी सेवक लोक मागें राहिलों! पूर्वजन्माचा दोष पदरीं, याजकरितां भोगणें सुटत नाहीं. परंतु महाराज कैलासवासी एकटे गेले; आह्मी चार सेवक लोक व सलतनत सर्व ठेवून गेले. त्यांचे मागें अवसान सोडलें तर पुरुषधर्मास ठीक नाहीं: आणि लोकही ह्मणतील कीं, मागें कांहींच दम धरला नाहीं. याजकरितां चित्ताचे ठायीं विवेक करून, सर्व लोकांची व कंपूची खातरजमा करून राहिलों. कच्चें पाऊल न टाकावें यास्तव जयपूर मारवाड यांचे मध्यें मुकाम करून आहों. त्यास हे वर्तमान आल्यापूर्वीं मारवाड्यासीं मामला केला. मागील बाकी व हल्लीं खंडणी याचा ठराव करून, आमचीं लिहिलीं पुसलीं त्यांस करून दिल्हीं. व त्यांचीं लिहिलीं पुसलीं करून घेतलीं. आह्मीं त्यांच्या डेऱ्यास जाऊन वस्त्रें हत्ती घोडे बहुमान घेतला. आपल्या डेऱ्यास आले. वस्त्रें हत्ती बहुमान त्यांस दिल्हा. तूर्त येथोन कूच माघारें करावें, तर हिंदुस्थानची हवा ठीक नाहीं. याजकरितां आठचार दिवस मुकाम करून, तूर्त ऐवज घ्यावा तो घेऊन, पुढें सेखावटीचे रोखें कूच करूं. पाणिपताकडेस राजश्री बहिरो कोन्हेर व बापाजी मल्हार व देवजी गवळी सिखाच्या तोंडावर सारणपूर व पाणिपताचे तोंडावर फौज पलटणसुद्धां मजबूत आहेत. राजश्री खंडेराव हरी रेवाडीकडे मेवात येथें, तेही कायम आहेत. राजश्री गोपाळराव भाऊ दतियाकडील गढीस लागले आहेत. त्याचाही जाबसाल जालाच असेल. तेथील जाबसाल उरकल्यावर मथुरा आगऱ्याच्या मैदानांत येतील. डभई साहेब अंतरवेदींत आहे. आगरेचा बंदोबस्त पागनिसाकडील आहे. दिल्लीचा बंदोबस्त शाहाजीकडे आहे. तेथेंही पलटणें आहेत. तूर्त खंडेराव आपाकडील फौज दिल्लींत पाठविली आहे. राजश्री अंबोजी इंगळे मेवाडांत आहेत. याप्रमाणें बंदोबस्त इकडील आहे. ऐसें करितां कोणी डोकें उचललें तर पारपत्य होईल. आपण श्रीमंत पंतप्रधान स्वामी यांच्या पत्राच्या व श्रीमंत नाना फडणवीस व हरिपंततात्या यांच्या पत्राच्या नकला पाठविल्या, त्या पावल्या. श्रीमंत सुभेदार यांचें (पत्र) पाठविलें, तेंही पावलें. त्यांच्या पत्राचें उत्तर पाठविलें आहे. इकडील कोणेविसीं चिंता न करावी. वर्तमान वरचेवर लिहून पाठवीत जावें. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विनंति."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः-दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.]     जानेआरी १९१०.     [अंक ६ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# १५. जहानगीर बादशाहाचें आत्मचरित्र.

जहानगीर हा पुण्यश्लोक चक्रवर्ती अकबर बादशाहाचा पुत्र. ह्यानें इ. स. १६०५ पासून इ स. १६२७ पर्यंत दिल्ली येथें राज्य केलें. ह्यानें आपलें आत्मचरित्र लिहून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामध्यें त्यानें आपल्या बारा वर्षांची हकीकत लिहिली आहे. पुढें त्याची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें व त्याजवर मानसिक शांतताभंग करणारे दुःखाचे प्रसंग आल्यामुळें, त्यानें पुढील कारकीर्दीची हकीकत लिहिण्याचें सोडून दिलें. तथापि, त्याच्या कारकीर्दीचा पुढील इतिहास मुतामदखान ह्यानें लिहिला आहे. त्याचें नांव 'इकबलनामा' असें आहे. त्याखेरीज महमद हादी ह्यानें जहानगीराच्या कारकीर्दीची बरीच माहिती लिहिली आहे, व कामगार हुसेनी ह्यानें 'मासीर-इ-जहानगिरी' ह्या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. ह्यामध्यें जहानगीर बादशाहाच्या जन्मापासून राज्यारोहणापर्यंतची हकीकत आहे. ह्या सर्व ग्रंथांच्या योगानें जहानगीर बादशाहाचें संपूर्ण चरित्र अवगत होण्यासारखें आहे. ह्या सर्व ग्रंथांमध्यें जहानगीर बादशाहाच्या आत्मचरित्राची योग्यता फारच अधिक आहे.

पौर्वात्य देशामध्यें राजे लोकांनीं आत्मचरित्रें लिहिण्याचा प्रघात पुष्कळ दिवसांपासून चालत आला आहे. तैमूरलंग, बाबर, जहानगीर, गुलाबदान बेगम आणि हैदर ह्यांचीं आत्मचरित्रें प्रसिद्ध आहेत. अकबर बादशाहानें स्वतः आपला इतिहास लिहिला नाहीं, तथापि 'ऐनअकबरी' नामक एक सर्वोत्कृष्ट ग्रंथ अबुल फजल ह्या पंडिताकडून त्यानें लिहविला आहे. ह्या सर्व ग्रंथांवरून, मुसलमानी बादशाहांचें चरित्रलेखन ह्या विषयाकडे लक्ष होतें, असें दिसून येतें. जहानगीरचें आत्मचरित्र 'तुझुक-इ-जहानगिरी' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्या ग्रंथाच्या फारशी भाषेंतील उत्कृष्ट प्रती, लंडन येथें 'इंडिया आफीस' मध्यें व 'ब्रिटिश मुझियम' मध्यें आहेत. त्यांचीं भाषांतरें विद्वान् आंग्ल पंडितांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. त्यावरून असें दिसून येतें कीं, जहानगीर हा बाबर किंवा अकबर ह्यांच्यासारखा बुद्धिवान् किंवा लोकोत्तर पुरुष होता असें नाहीं. उलट त्याच्या अंगीं पुष्कळ दोष होते. परंतु, त्यानें जें आत्मचरित्र लिहिलें आहे, त्यांत त्यानें आपल्या कारकीर्दीचें खरें चित्र रेखाटल्यामुळें तें फार मूल्यवान झालें आहे. त्यांत विशेषेंकरून त्यानें आपल्या बापासंबंधानें जो वृत्तांत लिहिला आहे, तो फारच महत्त्वाचा आहेत. जहानगीर बादशाहाचें स्वतःचें चरित्र अगदीं सत्य व यथातथ्य

वर्णिलें असल्यामुळें त्यासही एक प्रकारचें मोहकत्व आलें आहे. जहानगीर बादशाहाची तुलना कांहीं अंशीं इंग्लंडचा सहावा जेम्स किंवा एम्परर क्लाडियस ह्यांच्याशीं करितां येईल. सहाव्या जेम्सचें चित्र 'Fortunes of Nigel' किंवा क्लाडियसचें चित्र 'Suetonius and Tacitus' ह्यामध्यें जसें मूर्तिमंत दिसून येतें, त्याप्रमाणें जहानगीर बादशाहाचें चित्र त्याच्या आत्मचरित्रामध्यें दिसून येतें. जहानगीर बादशाहा हा सद्गुण आणि दुर्गुण ह्यांचें मिश्रण होता. त्याच्या निर्दयपणाच्या गोष्टी व त्यानें कित्येक मनुष्यांचे केलेले छल जसे त्याच्या चरित्रावरून व्यक्त होतात, तसें त्यानें कित्येक प्रसंगीं विलक्षण भूतदयाही दाखविल्याचें दिसून येतें. राजवाड्यांतले हत्ती थंडीच्या दिवसांत गार पाण्यानें धूत असत व त्यामुळें ते कांपत असत, तें पाहून त्यास दया येई. ह्मणून त्यानें, हत्तीकरितां पाणी तापवून त्यांना ऊन पाण्यानें धुवावें, असा हुकूम सोडल्याचें उदाहरण त्याच्या आत्मचरित्रांत नमूद आहे. तो स्वतः मद्यपी होता, परंतु मद्य हें अनर्थकारक व शरीरारोग्य नष्ट करणारें आहे, सबब तें आपल्या प्रजेनें घेऊं नये ह्मणून त्यानें निर्बंधही केला होता. तो सृष्टिसौंदर्याचा चांगला भोक्ता होता. चंपक, बकुल वगैरे पुष्पें त्यास फारच आवडत असत; व आम्रफलांचा तो फार शोकी होता. त्याच्या अंगीं न्यायप्रियता हा सर्वांत उत्तम गुण होता. हॅलमनामक प्रख्यात इतिहासकारानें, मुसलमान बादशाहांच्या अंगीं दुसऱ्यांच्या अपराधांबद्दल योग्य न्याय करून त्यांस कडक शासन करण्याचा एक विलक्षण गुण होता, असा एक उल्लेख केला आहे, तो अगदीं सत्य आहे. हा गुण जहानगीर ह्याच्या अंगीं चांगलाच दिसून येतो. जहानगीर ह्याच्या न्यायप्रियतेबद्दल इतिहासांत विशेष ख्याति आहे. एकंदरींत जहानगीर ह्याचें आत्मचरित्र फार महत्त्वाचें असून सतराव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थानाची कशी स्थिति होती, तिचें चित्र त्यावरून चांगलें नजरेस येतें.

जहानगीर बादशाहानें आपल्या राज्यामध्यें अकबर बादशाहाप्रमाणें 'दस्तुरुल अमल' ह्मणून बारा नियम केले होते. त्यांचा सारांश येणेंप्रमाणें:—

१. प्रत्येक प्रांतांतले जहागीरदार नद्यांच्या उतारावर दस्तुरी घेत असत, ती बंद करणें.

२. लोकवस्तीच्या गांवापासून रस्ते दूर असल्यामुळें जागोजाग चोऱ्या व रस्तेलूट होत असे. ह्याकरितां जागोजाग जहागीरदार लोकांनीं सराया, मशिदी व विहिरी बांधून प्रवासी लोकांच्या सोई करणें. जे रस्ते बादशाही मुलखांत असतील, तेथें त्यावरील कामदारांनीं सराया वगैरे बांधणें.

३. व्यापारी लोकांच्या मालाचे गठ्ठे मालकाच्या परवानगीवांचून व त्यास कळविल्यावांचून मध्येंच रस्त्यावर उघडून पाहूं नयेत.

४. माझ्या राज्यामध्यें कोणीही मुसलमान किंवा दुसरा परधर्मी मनुष्य मेला, तर त्याची मिळकत व मालमत्ता त्याच्या वारसास मिळाली पाहिजे. त्यास कोणींही हरकत करूं नये. अशा मालमत्तेस कोणी वारस मिळाला नाहीं, तर तिची देखरेख करण्याकरितां निराळे कामदार व संरक्षक नेमून, तिच्या उत्पन्नाचा विनियोग मशिदी बांधणें, सरायांची दुरुस्ती करणें, पडलेले पूल नीट करणें, आणि विहिरी व तळीं बांधणें, अशा लोकोपयोगी कामांकडे करीत जावा.

५. मी माझ्या वयाच्या १८ व्या वर्षापासून आजपर्यंत ह्मणजे माझ्या वयाच्या ३८ व्या वर्षापर्यंत मद्याचें सेवन करीत आहें, तथापि माझ्या प्रजेपैकीं कोणीही इसमानें मादक पदार्थापासून किंवा तांदुळाच्या अर्कापासून मद्य तयार करूं नये व विकूं नये असा माझा सक्त हुकूम आहे. [जहानगीर बादशाहास मद्यपानाची संवय प्रथम फार लागली होती, परंतु पुढें तो अतिशय मितपान करूं लागला.]

६. दुसऱ्याचें घर कोणीं घेऊं नये.

७. कोणत्याही मनुष्याचें नाक व कान कापण्यास मीं सक्त प्रतिबंध केला आहे, व स्वतः परमेश्वराजवळ अशी शपथ वाहिली आहे कीं, मी कोणासही अशी शिक्षा करणार नाहीं.

८. सरकारी जमिनीवरील कामदारांस व जहागीरदारांस मीं असा हुकूम दिला आहे कीं, त्यांनीं रयतेच्या जमिनी बळजबरीनें कधींही घेऊं नयेत, व स्वतः त्यांची लागवड करूं नये.

९. परगण्यावरील मुख्य कामगार किंवा जहागीरदार ह्यानें सरकारी परवानगी-वांचून त्या प्रांतांतील लोकांबरोबर लग्नसंबंध करूं नये.

१०. मोठमोठ्या शहरांत दवाखाने स्थापावेत व रोग्यांच्या शुश्रूषेकरितां वैद्यांची नेमणूक करावी. त्यास जितका खर्च पडेल तितका सरकारी खजिन्यांतून करावा.

११. माझ्या परम पूज्य वडिलांच्या कायद्याप्रमाणें मींही असा नियम केला आहे कीं, प्रतिवर्षी १८ रबिलावल ह्या माझ्या जन्मदिवसापासून माझ्या वयाचीं वर्षे असतील तितके दिवस, माझ्या राज्यामध्यें कोणीही (उदरपोषणार्थ) प्राणिवध करूं नये. त्याचप्रमाणें प्रत्येक आठवड्यांत गुरुवार व शनिवार ह्या दोन दिवशीं प्राणिहत्या करूं नये.

१२. माझ्या वडिलांच्या वेळच्या नौकरांस जे अधिकार व जहागिरी दिल्या आहेत, त्या त्यांजकडे तशाच चालू राहाव्या. पुढें त्यांचे दरजे व पगार वाढविले जावेत.

अकबरलांच्या वेळच्या जनानखान्यांतील पडदानशीन स्त्रियांच्या नेमणुका शेंकडा २० पासून १०० पर्यंत त्यांच्या त्यांच्या स्थितीप्रमाणें व नात्याप्रमाणें वाढविल्या जाव्या. धर्मार्थ व देवस्थानाप्रीत्यर्थ दिलेल्या जमिनी ज्याच्या त्याजकडे कायम राहाव्या. मिरान सदर जहान ह्मणून जो सय्यदांपैकीं अस्सल सय्यद व अकबर बादशाहाच्या वेळचा मुख्य दानाध्यक्ष आहे, त्यानें प्रत्येक दिवशीं सत्पात्र व खरे गरजू लोक बादशाहासमोर हजर करावेत व त्यांस बादशाहानें स्वतः धर्म करावा. सर्व किल्ल्यांत व तुरुंगांत जे गुन्हेगार पुष्कळ वर्षे कैदेंत ठेविले गेले आहेत, त्यांची सुटका करावी.

ह्या बारा नियमांवरून जहानगीर बादशाहाची योग्यता व्यक्त होते. हा बादशाहा इ. स. १६२८ मध्यें मृत्यु पावला. ह्या बादशाहाचें आत्मचरित्र वाचनीय व मनोरंजक असून, त्याच्या कित्येक आख्यायिका फार बोधपर आहेत.



## १६. ज्योतिपंत महाभागवत.

हे जातीचे अथर्ववेदी देशस्थ ब्राह्मण, खटाव प्रांतांतील बुध मलवडी कर्यातीचे देशपांडे. हे विद्यासंपन्न असून राज्यकारभारांत कुशल पुरुष होते. हे वाढत वाढत झांशी संस्थानचे दिवाण झाले होते. तो काळ ह्मटला ह्मणजे सवाई माधवरावांच्या कारकीर्दीची अखेर व दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीचा आरंभ हा होय. कोणे एके वेळीं, एका अपराधी ब्राह्मणाच्या न्यायाच्या कामांत ह्यांची मसलत मालकांनीं मानली नाहीं, सबब हे आपल्या अधिकाराचा राजीनामा देऊन घरीं परत आले. ह्यांची मूळचीच वृत्ति मोठी धार्मिक व परमार्थी होती. ह्यांनीं मिळविलेली संपत्ति लाखों रुपयांची होती. ती त्यांनीं तीर्थयात्रा करण्यांत व पांडुरंगाचीं देवालयें बांधण्यांत खर्च केली. ह्यांनीं काशीपासून रामेश्वरापर्यंत एक हजार पांडुरंगाचीं देवालयें बांधिलीं, अशी आख्यायिका आहे.

हे काशीस यात्रेनिमित्त गेले असतां, गंगातीरीं घाटावर श्रीवेदव्यास प्रत्यक्ष ब्राह्मणाच्या रूपानें येऊन, त्यांनीं श्रीमद्भागवताचा ग्रंथ ह्यांस दिला, अशी आख्यायिका आहे. तो ग्रंथ हल्लीं त्यांच्या मठांत साताऱ्यानजीक कृष्णातीरीं चिंचणेर येथें आहे.

भागवतांतील पुष्कळ प्रकरणांवर ह्यांचे अभंग आहेत. भागवतावर ह्यांची मराठी गद्यरूप टीका आहे. " प्रवृत्तिनिवृत्तिऐक्यतारत्नावली " नांवाचा ह्यांचा एक लहानसा गद्यात्मक ग्रंथ आह्मांस मिळाला आहे. त्यावरून त्यांच्या गद्यग्रंथाची

भाषासरणी कळून येते. ह्या ग्रंथावरून त्या काळीं गद्यांत ग्रंथ लिहिण्याचा परिपाठ पडत चालला होता, असें दिसतें.

अथर्ववेदी महाराष्ट्र ब्राह्मणांचीं घरें सातारा जिल्ह्यांत व कांहीं नगर जिल्ह्यांत आहेत. हीं सर्व मिळून २००।२५० चा सुमार आहे. त्यामुळें अथर्ववेदी वैदिक ब्राह्मण मिळणें दुरापास्त होत चाललें आहे. सांप्रत हे लोक ऋग्वेद मंत्रांनीं आपलीं नित्य नैमित्तिक कर्में करितात. अथर्ववेदाचे पाठक कमी होत जाऊन पुस्तकरूपानेंच तो अस्तित्वांत राहील कीं काय अशी भीति वाटत आहे. ज्योतिपंत महाभागवत यांच्या पित्याचें नाव गोपाळराव देशपांडे असें होतें. ह्यांनीं, विटें येथें गणपतीचें एक स्थान आहे, तेथें कांहीं वर्षें तपश्चर्या केली होती. ह्या गांवीं ज्योतिपंतांची कविता पुष्कळ लोकांच्या तोंडीं आहे.



## १७. संताजी घोरपड्याचा खून व खुषखबरखान पदवी.



संताजी घोरपडे व धनाजी जाधव ह्या दोन शूर महाराष्ट्र वीरांनीं, आपल्या पराक्रमाच्या जोरावर, राजारामाच्या कारकीर्दींत महाराष्ट्रराजसत्तेचें कसें संरक्षण केलें, हें निराळें सांगावयास नको. संताजी व धनाजी ह्यांचीं चरित्रें फार वीररसप्रचुर व हृदयंगम आहेत. संताजी व धनाजी ह्यांनीं औरंगजेब बादशाहास व त्याच्या सैन्यास अतिशय त्रास दिल्यामुळें तो ह्या दोन महाराष्ट्रवीरांना अगदीं पाण्यांत पहात असे. त्यानें त्यांचा उच्छेद करण्याकरितां बरेच दिवस जिवापाड परिश्रम केले; परंतु त्यास यश येईना. शेवटीं त्यास, ह्या दोघां सरदारांमध्यें कांहीं गैरसमज उत्पन्न झाल्याचें कळलें. तेव्हां त्यास अत्यंत हर्ष झाला, आणि त्यानें त्या संधीचा फायदा घेऊन, ह्या मराठे वीरांचा निःपात करण्याचा यत्न चालविला. संताजी घोरपडे हा जसा शूर होता तसा फार तामसी होता. कोणी सरदारानें यत्किंचित् कांहीं चूक केली, किंवा आज्ञाभंग केला, कीं तो त्यास एकदम जबर शिक्षा देत असे. त्यामुळें व दुसऱ्या कांहीं कारणांनीं त्याच्या सैन्यांत दुफळी झाली, व त्याचे सरदार त्याच्या विरुद्ध झाले. हणमंतराव-नामक एका सरदारानें धनाजी जाधवाच्या सैन्याची मदत घेऊन उघडपणें संताजीवर हल्ला केला, व त्याच्या सैन्याचा बराच नाश केला. ही संधि साधून औरंगजेबानें गाजीउद्दीनखान फिरोजजंग ह्यास संताजीचा पाठलाग करण्याची

कामगिरी सांगितली. त्या वेळीं नागोजी माने ह्मणून ह्मसवडकर मान्यांपैकीं एक मराठा सरदार बादशाही सैन्यास अनुकूल होता. त्याच्या भावास कांहीं वर्षांपूर्वी संताजीनें हत्तीच्या पायाशीं दिलें होतें. ही गोष्ट मनांत वागवून, नागोजीनें, आपल्या बायकोच्या सल्ल्यानें, संताजी घोरपड्याचा पाठलाग केला. त्यानें संताजी श्रमून व थकून एका ओढ्यामध्यें स्नान करीत असतां त्यास गांठिलें, आणि आकस्मिक रीतीनें त्यावर तरवारीचा घाव करून त्यास यमसदनीं पाठविलें. नंतर त्यानें, ही विजयवार्ता संताजीचा प्रतिस्पर्धी जो धनाजी जाधव त्यास कळविण्याकरितां, संताजीचें शीर कापून, तें तोबऱ्यांत घालून आपल्या घोड्याला बांधिलें, आणि तो तिकडे चालला. परंतु रस्त्यांत तें शीर खालीं पडलें व फिरोजजंगाच्या बिनीचा सरदार लुतुफउल्लाखान ह्याच्या एका शिपायास सांपडलें. त्यानें तें आपल्या मालकाजवळ नेलें. त्यानें तें मोठ्या उत्सुकतेनें औरंगजेब बादशाहाकडे पाठविलें. औरंगजेब बादशाहास संताजीचा शिरच्छेद झाला हें पाहून अत्यंत हर्ष झाला. त्यानें आनंदप्रदर्शनार्थ नौबती व डंके वाजविले, व सर्व सैन्यांतून त्याचें प्रदर्शन केलें. ज्या इसमानें ही आनंदाची खबर आणिली, त्यास त्यानें 'खुषखबरखान' असा किताब दिला. ही गोष्ट इ. स. १६९८ मध्यें घडली.



## १८. म्हैसूरचा दिवाण पूर्णय्या.

हा नामांकित ब्राह्मण मुत्सद्दी १९ व्या शतकाच्या प्रारंभीं म्हैसूर येथें होऊन गेला. इ. स. १७९९ मध्यें ब्रिटिश सैन्यानें श्रीरंगपट्टणावर चाल करून टिपूचें राज्य जिंकून घेतलें, त्या वेळीं थोर अंतःकरणाचे शहाणे ब्रिटिश मुत्सद्दी जनरल वेलस्ली ह्यांनीं, म्हैसूरच्या प्राचीन हिंदु राजवंशांतील कृष्णराजनामक एका अल्प बालकास गादीवर बसवून, म्हैसूरचें राज्य त्याचे स्वाधीन केलें. ह्या वेळीं म्हैसूर येथें राज्यक्रांति होऊन फार अस्वस्थता झाली होती व राज्यकारभाराची पुनः घडी बसविणें हें फार अवघड काम होतें. ही सर्व स्थिति ध्यानांत आणून, जनरल वेलस्ली ह्यांनीं, पूर्णय्यानामक एका वैष्णव ब्राह्मणास म्हैसूरची दिवाणगिरी देऊन, सर्व राज्यकारभार त्याचे हातीं सोंपविला. हा दिवाण आपल्या राजकारणचातुर्यानें म्हैसूर येथें फार प्रसिद्धीस आला. ह्यानें आपल्या ११ वर्षांच्या कारकीर्दीमध्यें म्हैसूरच्या राज्याची उत्कृष्ट सुधारणा केली. त्यानें, केवळ आपल्या बुद्धिचातुर्यानें व दूरदर्शित्वानें, जमीनमहसुलाची सुधारणा केली; ग्रामपंचायती नेमून हिंदुधर्म-

शास्त्राप्रमाणें शास्त्री व मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें काजी ह्यांनीं गांवच्या तंटेबखेड्यांचे निकाल करावेत अशी योजना केली; टिपूच्या वेळच्या लष्करी लोकांस कामांवर घेऊन त्यांच्याकडून राज्यरक्षणाचें काम करविलें; इत्यादि अनेक शहाणपणाच्या गोष्टी करून राज्यकारभार सुयंत्रित रीतीनें चालविला, आणि म्हैसूर संस्थानची चांगली अभिवृद्धि केली. त्यानें आपल्या कारकीर्दीमध्यें ७७ लक्ष रुपयांचीं सार्वजनिक कामें करून प्रजेस सुख दिलें; आणि म्हैसूर संस्थानच्या खजिन्याची स्थिति सुधारून २॥ कोटी रुपये शिल्लक ठेविले. अर्थात् अशा शहाण्या मुत्सद्याची कीर्ति म्हैसूरच्या इतिहासांत अजरामर व्हावी ह्यांत नवल तें काय? जनरल वेलस्ली ह्यांनीं व दुसऱ्या इतिहासकारांनीं पूर्णय्याची फार स्तुति केली आहे. त्यावरून पूर्णय्यासारखे बुद्धिवान् एतद्देशीय मुत्सद्दी हिंदुस्थानांत निपजले असून त्यांच्या अंगीं ब्रिटिश मुत्सद्यांकडूनही वाहवा करून घेण्यासारखे लोकोत्तर गुण होते, हें सिद्ध झालें आहे.* पूर्णय्या इ. स. १८१५ मध्यें मृत्यु पावला. त्याचा वंश म्हैसूर येथें अद्यापि आहे. त्याचे नातू सर कृष्णमूर्ति हे सुप्रसिद्ध गृहस्थ असून त्यांनीं थोडे वर्षांपूर्वीं म्हैसूरची दिवाणगिरी केली आहे. त्यांनीं दिलेलें पूर्णय्याचें चित्र सोबत प्रसिद्ध केलें आहे.



* दिवाण पूर्णय्या ह्यांच्या उत्कृष्ट राज्यकारभाराबद्दल कर्नल विल्क्स, जनरल वेलस्ली व मार्किस आफ् वेलस्लीप्रभृति मुत्सद्यांनीं स्तुतिपर उद्गार काढले आहेत व ते इंग्रजी ग्रंथांतरीं प्रसिद्ध आहेत. तथापि, म्हैसूर प्रकरणासंबंधानें गव्हरनर जनरल मार्किस आफ् वेलस्ली ह्यांनीं इ. स. १८०४ सालीं एक लेख लिहिला आहे. त्यांत त्यांनीं पूर्णय्याबद्दल जो उल्लेख केला आहे, तो येथें नमूद करण्यासारखा आहे:—

"I discharge a satisfactory part of my duty in availing myself of this occasion to record the high sense, which I entertain of the merits and services of the Dewan Poorneah. To extraordinary abilities, eminent public zeal, integrity, judgment, and energy of that distinguished minister, must be ascribed in a considerable degree, the success of measures, which I originally adopted for the settlement of Mysore, and the happy and prosperous condition of that flourishing country. The merits and services of the Dewan have been peculiarly conspicuous in the promptitude and wisdom manifested by him in the application of the resources of Mysore, to the exigences of the public service during the late war with the considerable Mahratta chieftains: and I deem it an act of justice to acknowledge that the expectations which I found in selecting Poorneah for the important office of minister of Mysore, have been greatly exceeded by the benifits which have resulted from his excellent administration."

## १९. जनरल वेलस्ली ह्यांचें पटवर्धनं सरदारांस उत्कृष्ट साह्य.

इ. स. १८०३ मध्यें इंग्रजांनीं दुसरे बाजीराव ह्यांस पेशवाईच्या गादीवर बसविल्यानंतर, बापूजी गणेश गोखले ह्यांनीं, जनरल वेलस्ली ह्यांच्याजवळ, पुण्याच्या दरबारच्या उद्देशाप्रमाणें आपल्या सैन्याच्या खर्चाबद्दल पटवर्धन सरदारांचा प्रांत तोडून देण्याबद्दल कांहीं बोलणें लाविलें. त्या वेळीं पुण्याचे रेसिडेंट ले० कर्नल क्लोज होते. ह्यांस जनरल वेलस्ली ह्यांनीं गोखल्यांच्या भाषणाचा सर्व सारांश कळविला; आणि पटवर्धन सरदारांबद्दल आपलें किती उत्कृष्ट मत आहे तें कळविलें.* ह्या वेळीं त्यांनीं पटवर्धन सरदारांचा नाश करून त्यांचा प्रांत घेणें अगदीं गैरशिस्त आहे असें आपलें मत दिलें; एवढेंच नव्हे तर, ब्रिटिश सरकारानें ह्या कामीं बाजीराव पेशव्यास मदत करूं नये असें रेसिडेंटास स्पष्ट लिहिलें. तेणेंकरून पटवर्धनसरदारांस वेलस्ली साहेबांबद्दल फार आदरबुद्धि उत्पन्न झाली. बाजीरावाच्या तडाक्यांतून पटवर्धन सरदारांचें खरें संरक्षण जनरल वेलस्ली ह्यांनींच केलें, असें ह्मटलें तरी चालेल. त्यामुळें पटवर्धनसरदारांची जनरल वेलस्लीबद्दल फार कृतज्ञबुद्धि असे.



* ता. २३ फेब्रुवारी इ. स. १८०४ च्या कर्नल वेलस्ली ह्यांच्या पत्रांतील पुढील उतारा वाचण्यासारखा आहे:—

"The family of Pursheram Bhow are the most ancient friends that the British Government have in the Mahratta Empire. Pursheram Bhow had under his command a body of British troops during the former war against Tippoo. His sons and relations, the present chiefs of that family, served in the same army, and there gained a knowledge and respect for the valour and discipline of a British army, which was the first cause of their joining me in the campaign of 1800 against Dhoondia Waugh. The friendship then established, and the friendly terms on which I was with those chiefs to the beginning of last year, enabled me to bring them forward to Poona to re-establish the Peishwa on his musnud, although, with or without reason, these chiefs did not wish well to His Highness' cause. This service ougt never to be forgotten by the Peishwa, and probably never will be forgotten by the British Government. . . . . . . . The Patwardhan family, connected as I have above mentioned, as they are with the British Government, are certainly the most respectable of all the Peishwa's subjects properly so called. They are the support of the system of order which exists on the company's frontier, and on the frontier of Mysore; and they are a check to the nest of freebooters kept by the Rajah of Kolapoor, and to the numerous polygars who inhabit the countries watered by the Kistna, Malpoorba, and Gutpurba."

बावांकडील फौजेनें घेरा देऊन जेर केला आहे. त्याचे लष्करांत सहा सात शेरांची धारण जाली आहे व लोकही नित्य उठोन येतात. त्यांजकडील पलटणाचींही बोलणीं राजश्री राणेखान भाईकडे लागलीं आहेत. लौकरच उठोन यावीं, असें आहे. बावाची रवानगी हेंच जाणून लौकर केली, कीं यांचे हातून त्याचें पारिपत्य करावें. ह्मणजे सरकारनक्षा वाढून याचा दाब राजेरजवाडे वगैरे यांजवर चहूंकडे पडेल, असें बावाचे मतें आहे. माझे शरीरीं ज्वराचा उपद्रव जाला होता. याजकरितां श्रीमंत राजश्री पाटिलबावांजवळ श्रीक्षेत्रीं राजश्री अयोध्याप्रसाद वैद्य याचें औषध घ्यावयाकरितां राहिलों आहें. चांगलें आरोग्य जाल्यावर लष्करांत जाऊं. इस्माळबेग यास नजबकुलीखान याचे पारपत्यास रवाना केलें होतें. त्यास यांनीं एक दोन लढाईत त्यास कायल केला. यामुळें त्यानें सल्याचा पैगाम केला. तेव्हां इस्मालबेग यांनीं येथें बावांस पत्रें पाठऊन, येथील आज्ञा जाल्यावर त्याची भेट घेतली. उभयतांचें मत येथल्याखेरीज नाहीं. राजश्री तुकोजीबावा मेवाड प्रांतींच आहेत. सूर्त इकडे येऊन बावांस सामील व्हावे, हा रंग कांहीं दिसत नाहीं. पाटिलबावांकडे त्याचें लष्करांतून अकबार आली. त्यांतील मजकूर बावांनीं आह्मांपाशीं सांगितला कीं, जयपुरकर व जोतपुरकर यांचा पहिलेपासून एक विचारच आहे. हल्लीं उदेपुरकर त्यांचे लक्षाखेरीज होते. त्यास होळकरांनीं तिघांचें लक्ष एक करून द्यावें; जयपुरकर व जोतपुरकर उभयतां व आपण त्याचे राज्यांतील बखेडा मोडूं; तिन्ही सं॥ एक विचारें चालावीं; याप्रमाणें बेत ठरला आहे. दुसरा मजकूर कोटेवाले पहिलेपासून सरकारलक्षानेंच चालत आहेत व गतवर्षींही सरकारउपयोगीं पडले आहेत. असें असोन होळकरांनीं त्यांचे मुलकांत, त्रिवर्ग राजांची व आपली फौज पाठऊन, त्यांचें पारिपत्य करावें हा मनसुबा केला आहे, असें ऐकतों. हाही चांगलाच आहे. त्यांनीं येथें येऊन, ते व आह्मीं व राजश्री अलीबहादूर यांनीं एक विचारें चालून, सरकारचाकरी करावी, याच बेतानें त्यांचीही रवानगी सरकारांतून जाली आहे. परंतु आमचे दिसण्यांत असें आलें कीं, त्यांनीं तें लक्ष कांहींच न ठेवितां, हा विचार आरंभिला आहे. असो. पहिल्यापासून सरकारच्या फौजा व ते आह्मी येत गेलों. परंतु रांगडे वगैरे यांची आंतचे आंत फूट पाडून सरकारचाकरी होत गेली. हल्लीं त्यांनीं, कांहीं निराळे होते त्यांसही एकत्र मिळणींत मिळवावे, हा विचार केला आहे. हा उत्तमच आहे. यापूर्वी रांगड्याची आंतचे आंत फूट व्हावी असेंही अनुसंधान होतें. परंतु हे तिकडे आल्यापासून हा विचार

रांगड्याचा राहिला नाहीं. असो. सारांश, 'अलीबहादूरबाबा व त्यांनीं येऊन बंदोबस्त करावा, आपली वांटणीही घ्यावी, व सं॥ सोडविलीं आहेत यांचा बंदोबस्त राखावा, येविसीं आह्मी आजपर्यंत वारंवार लिहीत गेलों, व अलीबहादूरबाबा आले त्याचींही पत्रें पाठविलीं; परंतु त्यांचें येणें घडावें असें कांहीं दिसत नाहीं. यास्तव त्यांस सरकारांतून पत्रें येऊन लवकर इकडे येत तें करावें. त्यांचे चित्तांत असेल कीं, पाटिलबावांनीं आह्मी एकत्र राहिल्यानें यांचें आमचें बनणार नाहीं, असें असल्यास या गोष्टीची चिंता नाहीं. कोणे प्रकारें सरकारकाम व्हावें हेंच आमचें मानस आहे. त्यांनीं येऊन बंदोबस्त करावा. कां कीं इकडील खिलस बहुत करून तुटले. पातशाई सं॥ साताऱ्याचे अन्वयें जालें आहे. इकडील बंदोबस्त अलीबहादूरबाबाचा करून दिल्हाच आहे. त्यास, त्यांनींही येऊन, आपली वांटणी घेऊन, सरकारकामाचा पुस्तपन्हा राखावा, यामुळें वारंवार लिहीत गेलों. परंतु त्यांचे चित्तांत हें कांहींच येत नाहीं. त्यास, कारकून पाठवून अगर हर कसेंही करून त्यांचें येणें व्हावें ह्मणजे सर्व यथास्थित आहे. आह्मांस इकडे बहुत दिवस जाले, लोकांचा गवगवा फारच आहे. यामुळें तूर्त उज्जनीस जाऊं. आमचा तो इरादा हाच आहे कीं, श्रीमंतांचे प्रतापेंकरून मुलूख आहे त्यांचा त्यांनीं आपले स्वाधीन करून घ्यावा. आमचा तो कोणे गोष्टीचा आग्रह नाहीं. परंतु सरकारनक्ष 'राहे अशी गोष्ट असेल ती करावी, इतकें मात्र आमचें ह्मणणें आहे. याप्रमाणें बावांनीं सांगितलें. इंग्रजांनीं मुंबईत जमाव केला आहे. त्याजमुळें पुण्यांत फौजेची व तोफखान्याची तयारी केली आहे. तो कोणीकडे नाहीं याचा विश्वास पुरत नाहीं. याजमुळें येथें आपली जागा खबरदारी आहे. ह्मणून राजेश्री सदाशिवपंत दाजी यांस पत्र स्वामींचें आलें. त्यांत लिहिलें होतें तें बावांनीं आह्मांस दाखविलें, आणि सांगितलें कीं, लखनौहून इंग्रजाकडील मातबर माणूस येथें येत आहे, एका दोहों दिवसांत दाखल होईल. त्याचें बोलणें तुमचे समक्षच करूं. त्यांत सर्व दृष्टीस पडेल. सरकारांत बदमामली करावी असा तों त्यांचा रोख दिसत नाहीं. येथें आल्यावर सर्व समजण्यांत येईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र ११ रविलाखर **लेखांक १२.** ता० ८ दिसेंबर इ. स. १७८८.
सन तिसा समानीन पौष मास. **श्री.**

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना यथील क्षेम तागाईत छ० ९ रविलावल वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील

वर्तमान तरी, श्रीमंत राजश्री अलीबहादूर बाबा यमुनापार गाजुदीनगर येथपर्यंत गेल्याचें पत्र आलें होतें. तेथून मेरट पंधरा कोस राहिलें होतें. त्यास काल सोमवारीं जाऊन तेथें पोहोंचावयाचा बेत होता. त्याप्रमाणें पोहोंचलेच असतील. कालरात्रौ श्रीमंत राजश्री पाटिलबावांचे येथें अकबार मेरटेहून आली. त्यांत मजकूर कीं, आपले फौजेनें चहूंकडून वेढा देऊन त्यास जेर केला आहे. आंत धारण चहूं शेरांपर्यंत आली आहे. आंतील रयत व शिपाई लोक पळून येतात. ते वर्तमान सांगतात कीं, त्यानें पळून गोसगडास जाण्याचा विचार केला आहे. आपल्याकडील फौजेस लटकाच रोंख दुसरे अंगें दाखवावयाकरितां, बाहेर शहरचे लगत डेरा दिल्हा आहे. परंतु फौजेचे जकंडबंदीमुळें निघोन जाण्याचें होत नाहीं. चौगीर्द बंदोबस्त चांगलाच राखिला आहे. याप्रमाणें लिहिलें त्याचे व आपलेही लष्करांतून हेंच आलें. सरकारच्या फौजा पोहोंचल्यावर लवकरच शत्रूचें पारिपत्य होईल. पाटिलबावांनीं हाच बेत करून, लौकर येथून बाबाची रवानगी केली कीं, याचे हातून हें यश यावें. ह्मणजे याचा लौकिक चहूंकडे होऊन दाब पडेल. राजश्री होळकरांकडील मजकूर काल बावांनीं फिरोन आह्मांपासीं बोलण्यांत आणिला कीं, देशींहून इकडे येण्यास ते निघाले, त्यापासून आह्मीं सुरळीतपणाचीं पत्रें पाठविलीं; व राजश्री आंबोजी इंगळे यासही महेश्वरचे मुक्कामीं पाठविलें कीं, तुह्मी व अलीबहादूर या प्रांतीं लौकर येऊन, त्रिवर्ग फौजा एकत्र होऊन शत्रूचें पारपत्य करूं. त्यास तेही श्रीमंतांचे प्रतापेंकरून आमचे हातून गोष्ट घडल्यानंतरही लिहीत गेलों कीं, इकडील बखेडा मोडण्यांत आला, परंतु तुह्मीं इकडे येऊन बंदोबस्त करावा व आपली वांटणीही घ्यावी. कोणे गोष्टीचा खिलाफ आमचे तर्फेनें नाहीं. त्यांणीं मुद्याच्या गोष्टी इंगळे यांजपासीं बोलिले, त्याप्रमाणें मान्य करून निखालसपणें त्यांस पत्रें आजपर्यंत लिहीत गेलों. परंतु आह्मी लिहितों हे कांहींच गोष्ट त्यांचे चित्तास येत नाहीं. आतां लिहिण्याची पराकाष्ठा राहिली नाहीं, व पुण्यासही याप्रमाणेंच लिहिवीत गेलों कीं, त्यांनीं लौकर येऊन इकडील बंदोबस्त राखावा. आमचे लोकांस बहुत दिवस जाले, अतःपर राहाणें लोकांमुळें इकडे होत नाहीं. आमचे लिहिण्याचे अन्वय सारेच एकीकडे राहून, त्यांनीं दुसराच मनसुबा उभा केला कीं, उदेपूरचें संस्थान जयपूर जोधपूरवाले या उभयतांचे मिळणीखेरीज होतें. त्यांत कारण कोण कीं, राणाजी लहान, पटाइतांनीं जागचे जागा मुलूख बळकाविला, व चितोड वगैरे कांहीं खालशापैकीं जागा होत्या, त्या भीमसिंग कारभारी याणें दाबिल्या, व गोडवाड

मारवाड्यांनीं आधींच घेतलें आहे. मुलूख कांहींच राहिला नाहीं. संस्थान मोकळीस आलें. यास्तव राणाजीपाशीं जालमसिंग झालेकोटेकर यास आपले ममतेंत घेऊन, त्याजकडील जमीयत राणाजीजवळ ठेऊन, संस्थानची जागा कोणाचे खटल्यांत न पडूं देतां राखिली. सांप्रत होळकर तिकडे मेवाडांत आल्यानंतर आपला बंदोबस्त करून द्यावा, याप्रमाणें जालमसिंग याचेच मार्फतीनें राणाजींनीं बोलणें लाविलें कीं, तीन लक्ष रुपये आह्मी तुह्मांस देतों. आमच्या घरचा बंदोबस्त करून द्यावा. त्यावरून होळकरांनीं कबूल करारमदार करून बंदोबस्तास लागले. याजवर भीमसिंग याचें बोलणें जयपूरकर व जोधपूरकर यांचें विद्यमानें पडलें कीं, राणाजीचा कारभार आमचे स्वाधीन करावा. जालमसिंग याचे लोक उदेपुरांत आहेत, त्यांस काढून द्यावें, आणि संस्थान आपले हवाले करावें. त्याजवरून होळकरांनीं पहिला बेत सोडून, मारवाड्याचें व जयपुरकराचें अनुलक्षामुळें भीमसिंग याचे स्वाधीन संस्थान करावें आणि राणाजीस त्याचे स्वाधीन करावें असा निश्चय ठराऊन, कोटेकराचे वकिलास साफच सांगितलें कीं, उदेपुरांत तुह्मांकडील लोक आहेत ते झाडून काढावे, आणि भीमसिंग याचे हवाले संस्थान करावें. याप्रमाणें न केल्यास आह्मीं उभयतां राजे मिळोन तुह्मांसीं पाहून घेऊं. तेव्हां कोटेवाल्यास ही गोष्ट प्राप्त जाली कीं, आजपर्यंत दक्षिणचे फौजेचे बळावर त्यांचें अनुलक्ष धरून हें संस्थान राखिलें; असें असतां त्यांणींच हा प्रकार [केला]. जें सरकारलक्षीं नव्हतें त्यांचेच मिळणींत मिळून संस्थान त्याचे हवालीं करावें. याप्रमाणें होळकर बोलतात. तेंही फारच चांगलें आहे. इतके दिवस सरकारलक्षानें आह्मी व राणाजी चालिले. त्याचें फळ हेंच प्राप्त जालें कीं, राणाजीसीं जे कारभारी द्वेषी होते, व शत्रु मारवाडी, त्यांचे स्वाधीन त्यांस करणार; व आमचे स्वाधीन संस्थानचा बंदोबस्त होता तो त्यांजकडूनही दोघांस दोन गोष्टी प्राप्त जाल्या. परंतु करणारांनींही पुढें आपला विचार पाहावयाचा होता. कोटेवाले हरकसें करून आपला बचाव करून राहतील, अथवा दबाव पडल्यानें त्यांतच मिळतील. परंतु तिन्ही संस्थानें एक जाल्यावर गोष्ट भारीच पडेल. असो. या गोष्टी मसलतीचे विचारें सर्व ध्यानांत येतील. व बाबाचें ह्मणणें कीं, सरकारलक्षानें जे आजपर्यंत चालत आले, त्यांजवर होळकरांनीं हा विचार आचरण करावा, ही गोष्ट उत्तम नाहीं. कां कीं, आजपर्यंत रांगड्याचीं पारपत्यें आंतचे आंत फूट पाडूनच होत गेलीं. आतां होळकरांनीं तिन्ही संस्थानें एक करून द्यावीं व कोटेवाले त्यांचे मिळणींत मेळवावे हें केलें

आहे. यांत आपलाही परिणाम त्यांनीं काय पाहिला असेल तो न कळे. रांगड्याचाही इरादा आंतून हाच आहे कीं, दोन्ही संस्थानें आपले मिळणींत आल्यावर दक्षणीयांसीं जाब द्यावा. परंतु हें होळकरांचे चित्तांत कांहींच येत नाहीं. आणि मारवाडी सांगतात त्याप्रमाणेंच करीत जातात. रांगड्याकडे पहिले मुद्दे आपले आहेत, तेही शाबूत करून घेतले नाहींत. आणि यांत नफा कोणता पाहिला असेल तो पाहोत. आमचें लक्ष हेंच आहे कीं, ज्यांत सरकारकाम घडोन येई, ती गोष्ट सर्वांनीं मिळून आचरण करावी. आपसांत फूट दुसरेयास समजूं न द्यावी. याकरितां आह्मी वारंवार त्यांस लिहीत गेलों कीं, तुह्मीं इकडे यावें. वांटणीचा मुद्दा त्यांचा त्यांतही नवीन होणार नाहीं. वडिलापासून रीत चालत आली त्याप्रमाणेंच होईल. तुह्मीं यावें. इकडील बंदोबस्त आजपर्यंत आह्मीं राखिला; आतां तुह्मीं राखावा. परंतु हें त्यांचे ध्यानांतच नाहीं. त्यापक्षीं लिहूनही इतःपर फळ नाहीं. आमचे लोक इकडे आह्मांस राहूं देत नाहींत. याकरितां आह्मीं आपल्यास पत्र लिहिलें आहे कीं, इकडील सर्व खिलाफ श्रीमंतांचे प्रतापेंकरून मोडण्यांत येऊन, दिल्लीचें संस्थान सातार्‍याप्रमाणें जालें आहे. याचा बंदोबस्त करावा. अलीबहादूर इकडे आले आहेत. यांचेच अंगावर आज आह्मी टाकून उठूनच जातों, असेंही नव्हतें. परंतु लोकांस बहुत दिवस जाले, व पैशाची वोढ, यामुळें आह्मी लोकांचे स्वाधीन. लोक आह्मांस राहूं देत नाहींत. होळकरांनीं इकडे यावें. यांनीं व अलीबहादूर यांनीं इकडील बंदोबस्त करावा. आह्मांस लोक राहूं देणार नाहींत. तेव्हां माळव्यांत जाऊन लोकांचा उलगडा पाडूं. सारांश, होळकर इकडे आल्यानें फूट न दिसतां, हिंदुस्थानी दबून इकडील बंदोबस्त राहील, व रांगडेही सहजच दबले जाऊन सर्व राजकारणांस ठीक पडेल, याप्रमाणें बावांनीं सांगितलें. तें सेवेसीं विनंति लिहिली आहे. या पत्राचीं व त्यांनीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांचीं उत्तरें लौकर आलीं पाहिजेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३.

पै॥ छ ९ रविलाखर सन तिस्सा समानीन पौष मास. श्री. ता. १० दिसेंबर इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे.

विशेषः—अलीकडे बहुत दिवस आपलें पत्र येत नाहीं. त्यास सदैव पत्र पाठवून परामृष करीत असावें. राजश्री पाटिलबावांनीं मथुरेहून गुलामकादराचे पारिपत्यास रवाना केलें, त्यास मेरठास येऊन पोहोंचलों. दोन तीन हजार स्वार व पायदळ प्यादे पलटणें दाहा बारा हजार, एकूण रोहिले पंधरा हजार व तोफ शेसवाशें सुद्धां गुलामकादर मेरठचे गढींत आहे. बाहेर चौगीर्द आपली व राणेखानभाई व रायाजी पाटील यांची फौज घेरून गोसगडचा मार्ग धरून आहे. त्याजला निघोन जावयास वाव नाहीं. गढींत धारण साहा शेरांची जाली आहे. रस्त झाडून बंद केली. एक दाणा आंत जाऊं देत नाहीं. त्यास श्रीमंतांचे प्रतापें पारपत्यही लौकरच होईल. आह्मांस खर्चाची बहुत ओढ आहे. इतके दिवस कर्ज काढिलें, त्याच्या एक दोन हुंड्या करून आपलेकडे पाठविल्या. त्यांचाही ऐवज अद्याप सावकारास पावला नाहीं. याजमुळें आतां सावकारही कर्ज देत नाहीं. तारांबळ फार जाली आहे. त्यास दरमाहाचे दरमाहा खर्चाचा पुरावा जाला पाहिजे. चंद्र ११ रा॥ वल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक १४.

पैवस्ती चंद्र ७ रविलाखर तिसा समानीन बराबर डांक. **श्री.** ता० १६ दिसेंबर इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः—मेरठेस येऊन दाखल जालों. येथें मुखत्यार राजश्री राणेखानभाई आहेत, त्यांची भेट जाहाली. मुक्काम करून राहिलों. त्यांणीं एक वाट बंद करून राहिले होते. त्यास आह्मी तलाव्यास गेलों. तों एक वाट गोसगडची मोकळी आहे असें पाहून, मग आह्मी कूच करून, त्या वाटेवर येऊन राहिलों. एक वाटेवर ते आहेत. अशा दोन्ही वाटा बंद केल्या, तेव्हां रस्त अगदीं बंद जाली. दिवसरात्र त्यांची व आमची फौज चौकीस असती. पांचा साहा रोजांचे आंत धारण साडेतीन शेरांची जाहाली आहे. बहुत घाबरला आहे. आंत जमियत दहा बारा हजार रोहिला आहे. मैदानांत असता तरी लुटून घेतला असता. परंतु शहर चांगलें आहे. याकरितां हल्ला करावी तर लोक मारले जातील असें आहे. काल चंद्र १६ रविलावलीं गुलाम कादर जातीनेंच राजश्री रायाजी

पाटील यांजकडे आला होता. तो बाणाचे खाच्याच्या मोरच्यापासून उभा राहिला. तेथें देवजी गौळी जाऊन भेटले, आणि त्यास पुढें बोलाविलें कीं, रायाजी पाटिलाजवळ चलावें. तेथें भेट घ्यावी. तो ह्मणाला कीं, रायाजी पाटील पुढें एकटे आले तर भेटेन, नाहींतर माघारा जाईन. असें बोलंण्यांत संध्याकाळ जाहाला. तो आंत माघारा गेला. साऱ्यांची भेट जाहाली नाहीं. आज फिरून येणार ह्मणोन वर्तमान आहे. कची हकीकत समजण्यांत येत नाहीं. त्यांचीं त्यांचीं काय खलबतें होतात, यांचे वकील तेथें जातात व त्यांचे येथें येतात, मजकूर गुप्त आहेत. सारांश, द्रव्याचें कार्य आहे. कळ साऱ्यांसच लागली आहे. याकरितां सरकारांत समजावयास मानस दुसऱ्याचें होत नाहीं. जरबेनें विचारावें तर ज्याची जमीयत अधिक तो जबरदस्त. राजश्री तुकोजीबावांजवळ होतों, तेव्हांही हीच अवस्था जाहाली. आंतूनच खंडण्या करीत. सरकारांत एक पैसा देखील दिल्हा नाहीं. ऐसें मजकूर आहे. मुख्य ज्याची फौज फार, तो जबरदस्त. मागाहून होईल हकीकत ते लिहून पाठविण्यांत येईल. खर्चाची मदत तेथून राखतील तर होईल. राजश्री पाटिलबावांजवळ पैक्याविसीं बहुत निकड केली. परंतु देऊं दिलाऊं करितात. ऐवज हातास आमचे येणें ही गोष्ट तूर्त दिसत नाहीं, व आपलें पत्र बहुत दिवस आलें नाहीं, याकरितां मनास धीर नाहीं. रवाना चंद्र १७ जमादिलावल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक १५.

पै॥ छ १० र॥ लाखर सन तिसा पौषमास. श्री. ता. १७ दिसेंबर इ. स. १७८८.

"राजश्री नाना गोसावी यांसीः-

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः-- गुलामकादर चंद्र १८ रबिलावलीं बुधवारीं सायंकाळीं आवसीं दोन चारशें स्वारांनसीं पळोन गेला.................................लाविलें होतें. परंतु आपल्या फौजा छबिन्यास मजबूतच राहात होत्या. परंतु आह्मी राणेखान भाईजवळून तुटून गोसगडाचे मार्गावर राहिलों होतों. तेव्हां बहुतच हुशारीनें पाहात होतों. परंतु आपले पुर्ण्येकरून आमचे तोंडावरून गेला नाहीं. आणि निघता तरी असा जाऊं न पावता. परंतु आह्मांजवळून तीन कोशांवरून रायाजी पाटलांचे मोरच्यांतून

निघोन गेला. तेव्हां आह्मी त्यांकडेस सांगून पाठविलें कीं शत्रू निघोन चालला, याप्रमाणें बातमी आहे. आह्मीं व आपण लगट करावी. तेव्हां त्यांनीं सांगून पाठविलें कीं, त्याचे निघाल्याची बातमी पक्की नाहीं; आपण पाठलाग आतांच करूं नये. पक्की बातमी कळल्यावर करूं. असे मानगडींत बारा घटका रात्र गेली. तोंपर्यंत आह्मीं वाट पाहिली कीं ते पाठलाग करतील, ह्मणजे आह्मी बरोबर दौड करूं. परंतु त्यांनीं पाठलाग केला नाहीं. आह्मींच जावें तर तो कोणत्या वाटेनें गेला, आह्मीं कोणत्या मार्गानें जावें, असें समजोन आह्मी गेलों नाहीं. गोसगडाकडे राजश्री येशवंतराव नाईक व भवानजी लोखंडे यांस रवाना केलें कीं, वाटेंत कदाचित् सांपडला तर धरावा. याप्रमाणें आपले फौजेचें वर्तमान आहे. त्यांची फौज मागील तीन घटका रात्र राहतां त्यांणीं धोंडोबा पागनीस बाळोबा पागनिसाचे भाऊस, याजबरोबर दोन हजार देऊन, रवाना केला आहे, व शाहाजादे व गुलामकादराकडील बिलासराव वगैरे एक दोन जमातदार सांपडले आहेत, व पायदळ रोहिला अगदीं लुटला. मण्यारसिंग पलटणवाला बमयजमीयत येथेंच राहिला आहे. तो आतां येऊन भेटणार, व तोफा अगदीं त्याच्या भागावर राहिल्या. असबाब बहुतकरून लुटला गेला. एक वाड्यांत कांहीं रोहिले लढतात. तेथें कांहीं असला तर सांपडेल. पुढें त्याचे पाठलाग करण्याचा मजकूर, तर आह्मी त्यास सांगत आहों कीं पाठलाग करावा. परंतु ज्याजवळ फौज ज्याजती, तो जबरदस्त. त्याचें सांगणें सबळ. आह्मीं या आठ दिवसांत तीन चार वेळां सांगितलें कीं, रोहिला जेर जाला आहे, हल्ला करावी, लुटून घ्यावा. ह्मणजे सांपडेल कीं मारला जाईल. नाहींतर एखादे वेळेस रात्रींचा निघोन जाईल. परंतु त्यांचे विचारास न आलें. पुढें जें कर्तव्य तें त्यांचेच विचारें आह्मांस केलें पाहिजे. मागाहून होईल वर्तमान तें लिहून पाठवीत असों. त्यांचे सरदाराची निष्ठा याचे ठायीं आहे. हें परभारां आपणास समजलेंच असेल. नाहींतर या फौजेंतून आणि त्यांणीं निघोन जावें, हें आश्चर्यच होतें. ज्या मार्गानें गेला, त्यांनीं कोणीं कोणास खबर केली नाहीं. जातो असें आह्मीं साऱ्यांस सांगून ठेविलें होतें कीं, तुमचे तोंडानें निघाल्यास आह्मांस सूचना करा. आह्मी येऊन पोंहचतों. आमचे तोंडानें निघाल्यास आह्मी तुह्मांस सूचना करूं. असें असतां गेला. यांतच सर्व अर्थ आहे. मागाहून होईल वर्तमान तें लिहून पाठविलें जाईल. चंद्र १९ रबिलावल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.''

---

## लेखांक १६.

श्री. ता० १९ दिसेंबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य कृष्णराव हरी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २० रबिलावल मुक्काम मेरट प्रांत अंतरवेद येथें स्वामींचे कृपेंकरोन सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— पेशजीं चमेलीचे मुक्कामचें पत्र पाठविलें, तें सेवेसीं प्रविष्ट जालें असेल. उपरांत चमेली उतरोन उदेपुरानजीक राजश्री अलीबहादर व होळकर यांजपासीं दाखल जालों. यावर होळकर तेथेंच राहोन, अलीबहादर यांणीं कूच करून बुंदीकोट व जयनगरचे रानांतून कुंभेरी भरतपुरास आलों. येथें रणजीतसिंग जाट याच्या भेटी होऊन, नंतर दरकूच श्रीमथुरेच्या मुक्कामीं राजश्री पाटिलबावा यांजपासीं येऊन पोहोंचलों. पाटिलबावांनीं अलीबहादर यांचा गौरव करून, गुलाम कादर याच्या पारपत्यास रवाना केलें. ते दिल्लीपासीं यमुना उतरोन मेरठीस आलों. गुलामकादर ठाणें बळकाऊन होता. आसपास पाटिलबावांची फौज होती. मागून अलीबहादर व आह्मी येऊन पोहोंचलों. पंधरा दिवस गोळागोळी होत होती. त्यावर ठाणें सोडोन निघोन जावें असा त्यांणीं विचार करून, चंद्र अठरावे रबिलावलीं फौजसुद्धां निघोनें चालला. तेव्हां आपल्याकडील फौजांनीं पाठलाग करून त्याचे फौजेचा पराभव केला. खांसा पळोन गेला. त्याचे मार्गें फौजा धावल्या, परंतु ठिकाण लागलें नाहीं. मग अवघे मुक्कामास आलों. दोनप्रहरा रात्रीस बातमी आली कीं, दहाबारा कोसांवर दबोन राहिला आहे. हें वर्तमान समजल्यावर अलीबहादर यांणीं आमचे पथकास तेच समयीं चाकरी सांगितली. त्यावरून तयार होऊन, ज्या गांवीं होता त्या गांवीं जाऊन, त्या गांवास वेढा देऊन, चोरबातमी लावून, लोक गांवांत घालून धरून आणिला. लष्करांत आणून अलीबहादर यांचे स्वाधीन केला. आपले पथकांत तीन हत्ती खुले हावद्याचे व पांच सात घोडीं लहानमोठीं व एक ऊंट आला. स्वामींचे पुण्यप्रतापें शत्रूचें पारपत्य यथास्थित जालें. येविसीं सविस्तर वृत्त राजश्री अलीबहादर यांणीं लिहिलें असेल त्यावरून श्रुत होईल. आह्मी स्वामींचे आज्ञेअन्वयें सरकारचाकरीवर लक्ष ठेऊन स्वस्थ आहों. सर्वप्रकारें सांभाळ करणार स्वामी समर्थ. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७.

पैवस्ती चंद्र ९ जमादिलावल | श्री. | ता० १६ जानेवारी इ. स. १७८९.
तिसा समानीन बराबर डांक.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः— मेरटेस गुलाम कादर धरला, तेव्हां आह्मी राजश्री पाटिलबावांकडे लेहून पाठविलें कीं, गुलाम कादराची मोहीम उरकण्यांत आली. पुढें मसलत कोणती? जोधपूर जयपूरची मसलत केल्यास बरी आहे. अथवा आणीक कोणती मोहीम असल्यास ती योजावी. तेव्हां त्यांचें उत्तर पत्रावर पत्रें पाय दरपाय येऊं लागलीं कीं, गुलामाची आई पळाली आहे, तिणें पातशाही असबाब बराबर नेली आहे; तिजला धरवावी. आह्मीं एक दोन वेळां उत्तरें लिहिलीं कीं, ही मसलत हलकी असोन, पुढें जड जाईल. कां कीं ती शिखांत गेली, आणि त्यांची पाठलाग करावी तर पैका लाभणें कठीणच आहे, व मसलत लांबेल. शिखांचा भरणा फार आहे असें लिहिलें. परंतु त्यांचीं पत्रें एकाच अन्वयें येत गेलीं कीं, हस्तगत करावी. त्याजवरून मजल दरमजल गोसगडास आलों. तों इतक्यांत पत्रें आलीं कीं, आपण तेथेंच असावें, आणि साहरनपूर व कुंजपुरा या दोन्ही तोंडांवर आपली व आमची फौज पाठवावी. त्यास साहरनपुराकडे आपली फौज व त्यांजकडील रायाजी पाटील आठचार दिवस अगोदर रवाना केलेच आहेत. दुसऱ्या तोंडावर फौजा पाठवाव्या, तर फौज आहे ही आपले ध्यानांतच आहे. आणि त्यांचीं तरी पत्रें येत गेलीं कीं, आपण तेथेंच मुक्काम करून, पुढें फौज पाठवून, त्याचे आईस धरून आणावें. तिजबराबर मालियत आहे. तेव्हां फौज पाठवावी तरी आह्मी सडे राहतों. न पाठवावी, तर गुलामाची आई, मालीयत जाती. याकरितां गोसगडाहून कूच करून कुंजपुऱ्याजवळ आलों. तों आणखी पत्रें आलीं कीं, आपले कारभारी व फौज व आह्मांकडील फौज तेथें ठेऊन, आपण सडे दोन तीनशें स्वारांनसीं येथें मथुरेस यावें. आपलें आमचें येथें बोलणें होऊन मुलूख आपला आटोपावा. व आणखी आह्मीं गुलामकादर धरला, तेव्हांपासून पत्रें पाटिलबावांस लिहिलीं कीं आपण किल्ले रामगड व आगरें देणार, त्याच्या व मुलखाच्या सनदा द्याव्या. त्याचें उत्तर आतां आलें कीं आपण यावें, रुबरूच सांगूं आणि सनदा देऊं. येविसींचें उत्तर आह्मीं लिहिलें कीं; आह्मी येथें मोहीमसीर आलों. मागें उलटोन सडे

यावें तर फौजेंत आंदेशा पडेल. कां कीं, शिखाची फौज चाळीस हजारपावेतों तीस चाळीस कोसांवर राहिली आहे. त्यांत आपली फौज उपाशी. रोजमुरा देखील मिळत नाहीं. गवगवा आहे. जिवबादादाकडे दररोज धरणें आहेतच. त्यास पहिलेंच आपलें पत्र आलें असतें, तर निघोन आलों असतों. हल्लीं गुलामाचे आईचा बंदोबस्त करून लौकर येतों. तोंपावतों सनदा किल्ल्यांच्या वगैरे माहालच्या भिकाजीपंत पाळंदे तेथें मथुरेस राहिले आहेत, त्यांच्या स्वाधीन कराव्या. आम्हीही येऊन पोहोंचतों. असें लेहून पाठविलें आहे. पुढें काय जाब येईल तसें करूं. वरकड इकडील वर्तमान तर शिखाची जमीयत गुलामाचे आईकरितां होत चालली, व शाहा आबदाली अटक उतरला. मुलतानांत पुढें त्याचे सरदार फौजसुद्धां आले आहेत. त्यास, आमची जमीयत खासगी थोडी व पाटिलबावांची फौज तीस पस्तीस हजार आहे. ती महिन्या दोन महिन्यां उपास काढोन उठोन जाती. पलटणें आहेत त्यांचा इतबार समजलाच आहे. आणि मुलूख फार, फौज थोडकी व पैक्याचा बंदोबस्त असावा. लोक आपलेही नालबंदी मागतात. रोजमुरा तर वरचेवर आजपावेतों कर्ज काढोन वांटला. पुढें मिळेल तर वांटूं. परंतु खर्चाची वोढ बहुत आली. तें लिहितां पुरवत नाहीं. सरकारचीं पथकें अझून आलीं नाहीं. यास्तव मेरटेस आलों, तेव्हां हजार स्वार ठेविले आहेत. गुलामाचे लढाईमुळें त्यांची तलब चढत चालली आहे, व पाटिलबावांनीं तोफा पांच दिल्या, त्याकरितां गारदी तीन चारशें ठेविले आहेत. अलीकडे मेरटच्या तोफांपैकीं साहा आणखी आणिल्या आहेत. एकूण अकरा तोफा व एक गरनाल व हत्ती अकरा गुलाम कादराचे लुटीचे आले आहेत. ऐसा खर्च वाढत चालला. उत्पन्न तर कांहींच नाहीं. ऐसें वर्तमान आहे. राजश्री सदाशिवपंत असवलकर चंद्र रबिलाखरीं गोसगडचे मुक्कामीं आले. रंगराव व खंडेराव वोढेकर यांचीं पथकें अद्यापि आलीं नाहींत. रंगरायाचे तीन च्यारशें स्वार मात्र आले आहेत. भवानजी लोखंडे यांचे गोटांत राऊत सातआठशें लहानथोर मिळोन सारे असतील. सदर फौजेचा भरणा आहे तो आपले ध्यानांतच आहे. राजश्री आपाजीपंत दामले यांस, पूर्वी आपणास पत्र लिहिलें आहे त्याप्रमाणें, त्यांस गांवयोजना करून अगत्य देविला पाहिजे. आम्हीं करार केला आहे त्यास निभाव करणार आपणच आहेत. रवाना चंद्र १९ रबिलाखर बहुत काय काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.”

---

# लेखांक १८.

श्री.        ता० १९ जानेवारी इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः—राजश्री आपाजी बाबाजी यांचा महायात्रेस जावयाचा बहुत मनोदय आहे. श्रीकाशी येथोन चारपांच मजला जवळच आहे. त्यास यांचे घरींही मुलेंमाणसेंही अल्पवयस्कर आहेत. यास्तव यांचे कुटुंबाची रवानगी लष्करांत करविली पाहिजे. येथें आल्यावर महिन्या दीडमहिन्यांत यात्राही करून येतील. याकरितां यांचे कुटुंबास इकडे येण्यास अगत्यरूप परवानगी व्हावी. रवाना चंद्र २२ रबिलाखर बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

# लेखांक १९.

श्री.        ता० २३ जानेवारी इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

७ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो अलीबहादूर रामराम विनंति उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः— राजश्री पाटिलबावांचीं दोन चार पत्रें, सडे फौज ठेऊन मथुरेस येण्याविसीं आलीं. त्यावरून राजश्री सदाशिवपंत यांजबरोबर सारी फौज व सरदार व जरीपटका व साहेबनौबत ठेऊन, आह्मी सडे पाटिलबावांकडे जात असों. मथुरेस आलों ते समयीं पाटिलबावा जें बोलणें बोलले, तें सर्व मथुरेहून लिहिलेंच आहे. त्याजवर मेरठहून गोसगडास आलों. तेव्हां मागाहून पाटिलबावांचीं पत्रें येत गेलीं कीं, आगरे व रामगड वगैरे माहालच्या सनदा घेऊन आपले स्वाधीन करून घ्यावे. त्यास आपलेकडून पत्राचें उत्तर आलें नाहीं, ह्मणून टाळाटाळ करीत गेलों. परंतु पत्रें पैं दरपैं येत गेलींच, व राजश्री भिकाजीपंताजवळ बोलत होते कीं, किल्ले स्वाधीन करून घेत नाहींत, याउपर आह्मांकडे शब्द नाहीं. त्यावरून आह्मीं लिहिलें कीं, किल्यांच्या सनदा पाठवून द्याव्या व महाल कोणते ते लिहून पाठवावे. तेव्हां किल्यांच्या सनदा द्यावयास सांगितलें व आह्मांस लिहिलें कीं, शिखाचे पारिपत्यास आपली व आह्मांकडील फौज ठेऊन सडे जलद यावें. त्यावरून सडे निघालों. त्यास येथें फौजेंत नालबंदीचा बोभाट फार आहे, व येवढा मुलूख सांभाळावयास

फौजही फार लागेल; व पैक्याची आमदानी या सालांत व्हावयाची नाहीं, व पाटिलबावांचा इरादा आमच्या गळां मुलूख घालून निघून देशास जावें. कदाचित् ते गेले, तर आमचा गळबटा फौजेमुळें व पैक्यामुळें होईल. याकरितां आपणास वारंवार लिहिलें आहे. पत्राचें उत्तर सत्वर यावें. दिवसगत लागों न द्यावी. आह्मी मथुरेस दहा बारा रोजांत पोहोंचतों. तर याविषयींचा बंदोबस्त राखिला पाहिजे. रवाना छ २६ रबिलाखर बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक २०.

पैवस्ती चंद्र २९ जमादिलावल **श्री.** ता. ७ फेब्रुवारी इ. स. १७८९.
तिसा समानीन बराबर डांक.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः— आह्मी कुंजपुन्याहून राजश्री पाटिलबावांकडे यावयास निघालों, तों वाटेंत आपलीं पत्रें आलीं. त्यांत छ २२ रबिलावलचें पत्र छ २६ रबिलाखरीं व दुसरीं दोन पत्रें छ ९ व छ ११ रबिलाखरचीं आलीं, तीं छ ७ जमादिलावलीं पावलीं, व तिसरें छ १० रबिलाखरचें छ ९ जमादिलावलीं आलें. ऐसीं पत्रें पोहोंचलीं. यांतील अन्वय इकडे न राहण्याचा, व पाटिलबावांचीं पत्रें आपणांस आलीं त्याचें उत्तर आपण त्यांस लिहिलें तो, वगैरे सर्व मजकूर लिहिला, तो कळला. ऐसीयास आपले लिहिल्याप्रमाणेंच करावयाचें. त्यास, आगरे व रामगड दोन्ही आपले स्वाधीन करून घ्यावे, ह्मणोन वारंवार पाटिलबावांचें बोलणें राजश्री भिकाजीपंत पाळंदे यांजवळ होत होतें. ते आह्मांस लिहित होते. आह्मी आपलें उत्तर आलें नाहीं ह्मणून टाळाटाळ करीत गेलों. तेव्हां पाटिलबावांनीं निकडीचें बोलणें बोलले कीं, तुह्मांस वारंवार सांगत गेलों, ऐकत नाहीं. असें बोलोन साक्षी ठेविले ह्मणून पत्र पाळंदे यांचें आलें. त्यावरून त्यांस लिहिलें कीं किल्ल्याच्या सनदा व मुलकाची याद, कोण परगणे तें लेहून पाठवावी. त्याजवरून किल्ल्याच्या सनदा मात्र पाठविल्या, परंतु मुलखाची यादी आली नाहीं. त्यास आपले लिहिल्याअन्वयेंच जाबसाल करितों, आणि किल्ल्याचे सनदांचे हरएक तऱ्हेनें उलटें घेतों, व आपले पत्राचे अन्वयें इकडील आपले गळां लाऊन घेत नाहीं. कदाचित् त्यांणीं बळच केलें, तर आह्मी साफ सांगूं

कीं, आह्मांस सनद श्रीमंतांची आणावी, कीं मामलत तुह्मी संभाळा, तर आह्मी संभाळूं. जर नच ऐकत, आह्मांवर टाकून जाऊंच लागले, तर आह्मीही यांचे बरोबरच येतों. ते तर आमचे गळां टाकून जाणार हा निश्चय. त्याअर्थी त्यांचे बराबरच येणें घडेल. पुढील कुंजपुऱ्याकडील वर्तमान तर राजश्री राणेखान भाई व जिवाजी बल्लाळ बक्षी यांजकडे शिखांचे वकील आले आहेत. ह्मणतात कीं आह्मी भेटतों. परंतु यांचें ह्मणणें आहे कीं, गुलाम कादराची आई हवालीं करावी. त्यास ते तूर्त मागेंपुढें घेतात. पुढें होईल तसें लेहून पाठवीत असों. दों चौं रोजांनीं मथुरेस दाखल होतों. खर्चाविसीं पेशजीं आह्मी मथुरेस आलों तेव्हांपासून पाटिलबावांजवळ मागावयास प्रारंभ केला आहे. तेथें असतां रुबरू बोलत गेलों, व इकडे आलों तेव्हांपासून पत्रेंही आजपर्यंत सात आठ लिहिलीं, व गंगाजी आव्हाड यासही ताकीद केली होती कीं, कांहीं खर्चास मागून घेऊन आह्मांकडे पाठवून देणें. तोही वरचेवर बोलत गेला. परंतु तेथेंच वोढ, तेव्हां काय पाठवितात हें समजलेंच आहे. मुख्य येथील खर्चाची बेगमी महिन्याचे महिना जाली पाहिजे, व नालबंदीकरितां लोकांचें मागणें फार आहे. त्यास आपलें पत्र येईल त्या अन्वयें करूं. राजश्री यशवंतराव नाईक निंबाळकर यांनीं बलात्कार करून लाख रुपयांची वरात घेतली आहे. परंतु आपण रद्दच करावी. आह्मींही त्यांस सांगितलें आहे कीं वरात तेथें रद्द होईल. त्यांणींही समजोनच घेतली आहे, कीं तूर्त चार महिने लोकांस सांगावयास येईल कीं, आह्मांस वरात दिल्ही आहे. पुढें जैसें आपले विचारास येईल तसें वरातेचें उत्तर द्यावें. वरकड वर्तमान होईल तें मागाहून लिहीत असों. आह्मीं हें लिहिलें ह्मणोन नाईकांकडील कोणी असतील त्यांस समजों देऊं नये. मुलूख माहाल किल्ले हे आह्मांस न पाहिजेत ह्मणोन सांगत होतोंच. तों हल्लीं आपलें पत्रही आलें. त्यास आतां निक्षून बोलूं कीं, आह्मांस फक्त आपली कुमकेकरितां पाठविलें आहे. किल्ले मुलुखास आज्ञा मागवा; मग घेऊं. बिनआज्ञा आमच्यानें कैसें घेवतें ? याप्रमाणें उत्तरें प्रांजल करितों. मागाहून होईल जाबसाल वरच्यावर लिहीत असों. रवाना चंद्र ११ जमादिलावल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक २१.

श्री. ता० १६ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"सेवेसीं आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना ता. छ २० जमादिलावलपावेतों मुक्काम श्रीमथुरा स्वामिकृपेंकरून क्षेम असे.

विशेषः—राजश्री पाटिलबावांचीं पत्रें कुंजपुऱ्यास होतों तेथें आलीं कीं, सडे येणें; फौज तेथें ठेवणें; ह्मणून पयदरपय येत गेलीं. त्यावरून फौज वगैरे झाडून राजश्री सदाशिवपंत दिवाण यांजवळ ठेऊन, सडे निघोन मथुरेस आलों. भेटी जाल्या. बोलण्यांतील भावगर्भ श्रीमंत राजश्री अलीबहादूरबाबांनीं लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. आज्ञेप्रमाणें वर्तणूक होईल. वरकड पेशजीं राजश्री यशवंतराव नाईक निंबाळकर यांनीं लाख रुपयांविषयीं सेवकापासून पत्र सेवेसीं लिहून घेतलें. त्यावरून भिडेस्तव स्वामी सेवकावर कृपा करितात ह्मणून, त्यांनीं मीड घालून घेतलें ह्मणून सेवेसीं लिहिलें आहे. मर्जी असेल तसें होईल, परंतु सेवकावर राग न व्हावा. त्यांची वोढ तों खरी. वखवख फारच जाली आहे. सेवकाचे लिहिल्यावर कोणतेंही न व्हावें. जी मर्जी स्वामींची तसें व्हावें. सेवकानें पत्रें सेवेसीं बहुत लिहिलीं, उत्तर येत नाहीं. त्यावरून चित्त उदास आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२.

**श्री.** ता. २१ फेब्रुआरी इ. स. १७८९.

"पुरवणी राजश्री नाना गोसावी यांसीः—

विनंति उपरीः— राजश्री पाटिलबावांचे मनापासून आहे कीं, आह्मीं हा मुलूख आटोपावा, आणि दहा हजार स्वार व चार हजार पायदळ घ्यावें. त्यास आमचें ह्मणणें तर आह्मी घेत नाहीं. यावरून बहुत नाखुष आहेत. त्यास आह्मांस आपली मर्जी मुख्य, परंतु पाटिलबावांचा व आपला स्नेह. तेव्हां ते आपणासंगें बहुत श्रमी होतात. याकरितां आपणास सुचवावें ह्मणून वारंवार लिहिलें आहे. नाहींतर आह्मांस मुख्य आपला हुकूम. परंतु पाटिलबावांनीं फौज व फौजेचे पैक्याचा बंदोबस्त करून दिल्यास, बहुतकरून चिंता नाहीं, आटोपला जाईल, असें वाटतें. कां कीं एक दोन शैल्य आहेत, त्यांचा देखील बंदोबस्त करून मग हवालीं करूं ह्मणतात. त्या पक्षीं मुलूख सरकारांत येतो, आणि फौजेचा बंदोबस्त त्यांजकडेस, असें पक्कें ठरलें तर बाध दिसत नाहीं. त्यास ते मुलूख देऊन बहुत संतोषी होतात, आणि मुलूख त्यांजकडेच असल्यास आपल्या संगें श्रमी होतात. ह्मणतात कीं, नानांसीं माझा इतका स्नेह, आणि मीं सरकारांत चोरी किंवा हरामखोरी केली नाहीं, कीं मला धन्याचे पाय नजरें न पडावे. सरकारआज्ञेवरून खर्चाखालीं जेरबार

जालों; व आणखीही उमेद बाळगीत आहे कीं, सरकारांत चाकरी जिवंत जीव आहे तों करावी. असें किस्येक तऱ्हेचे बोलणीं बोलतात. त्याचा तपशील कोठवर ल्याहावा ? सारांश, त्यांचें मानस कांहीं येथें राहावयाचें दिसत नाहीं. आह्मी न राहिलों, तर आणखी कोण्हाचे हवालीं मुलूख करून देशास जावें हा बेत बहुत दिसतो. आह्मांस ह्मणत होते कीं, तुमचे वडिलांपासून तुमचा आमचा इरादा दोस्तीचा, आणि तुह्मी माझी गोष्ट ऐकत नाहीं. याकरितां आह्मी गोड बोलून चार दिवस घालवितों. आपलें उत्तर येई तों, बहुत खुशामत करून मर्जी जिथवर राखिली जाईल, तिथवर राखितों. शेवटीं त्यांचा आग्रह फारच जाला आणि आजच गळा घालितात, तेव्हां उत्तर तोडून सांगूं. कां कीं आह्मांस सरकारची आज्ञा शिरीं वंद्य. मग यांचे स्नेहास घेऊन काय करावयाचें आहे ? पाटिलबावांचे दरबारची मंडळी जी आहे, ती आह्मांस बहुत हांसते कीं, हे देखणे बरे आहेत. परंतु एखादें कार्य डोईवर घ्यावयास सामर्थ्य नाहीं ! आह्मांस तों आपलीं पत्रें आलीं आहेत,—त्यांचा अन्वय कोणाजवळ सांगतां येत नाहीं.—जे कारभार न सांभाळावा. त्यास आह्मी आपल्यावरच घेत असतों कीं, आह्मी नवे, आह्मांस या मुलकाची वाकीफगारी नाहीं, आमच्यानें हे कारभार होणें अवघड. पाटिलबावांनीं येथें असावें आणि आह्मी मुलें, याकरितां तरबियेत राखावी. वर्ष दोन वर्ष वहिवाटा जालीयावर मग चिंता नाहीं. आह्मी संभाळून. यावरून बहुत हांसतात कीं, आमचे सरदार पांच सात हजाराने हा मुलूख आह्मी देशीं गेल्यावर राखीत असतात, आणि तुह्मांजवळ इतका सरंजाम होत्साता असे शब्द कसे बोलतां ? इकडील पर्याय नजरेस पडले तितके लिहिले आहेत. त्यांस सांगणें तें निश्चय करून एका महिन्यानें सांगूं, असें आह्मीं बोलणें लाविलें आहे. त्यांजकडून तर निकड आहे. ती लिहितां कोठवर लिहावी, कीं सर्व बंदोबस्त संभाळावा एक, किंवा 'नाहीं' ह्मणून सांगावें एक. मग आह्मांस सुचेल तैसा बंदोबस्त करून घेऊं. याप्रमाणें आपाजीराव दाभोळकर निरोप घेऊन आले होते. तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, आह्मी तेथेंच पाटिलबावांकडे रुबरू येऊन सांगतों. आज उद्यां तेथें जाणार. बहुत कवायती करून महिनाभर मोघम राहात, असें करून पाहतों. नाहींतर 'नाहीं' ह्मणून साफच सांगतों. छ २५ जमादिलावल बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

# १०. अकबरी दस्तुरुल-अलम

अथवा

# अकबर बादशाहाची राजनीति.*

## [ लेखकाची प्रस्तावना. ]

श्रीमन्महाराज राजश्री व्यंकोजी राजे छत्रपति राजधानी संस्थान शाहूनगर नजीक किल्ले सातारा यांहीं, मी नरसिंगराव विठ्ठल ऊर्फ बाबा पारसनीस, या मज सेवकास समक्ष आज्ञा केली कीं, पूर्वीं राज्यकर्ते बहुतेक पादशाह जाले, त्यांपैकीं दिल्ली येथील षहानषाह अकबर पादषाह व दारुलजफर विजापूर येथील सुलतान महंमद आदिलषाह पादषाह यांणीं, पारसी भाषेंत 'दस्तुरुल अलम' ह्मणोन राजधानीचे वागणुकीविषयीं, आपआपले कारकीर्दींत, आपले बुद्धीनें कायद्याचीं कलमें ठरविलीं आहेत. त्यांचा तरजुमा महाराष्ट्रभाषेंत सर्वांस समजुतींत यावयाजोगा करून ते दोन भाग, कैलासवासी प्रतापसिंह महाराज यांहीं महाराष्ट्र भाषेंत आपले अकलेनें कलमें योजून त्याप्रमाणें राजधानींत वर्तणूक ठेविली. कैलासवासी शिवाजी महाराज राज्यकर्ते महान् बुद्धिमान् व पराक्रमी जाले. त्यापूर्वींचे झालेले राजांत या प्रतापसिंह प्रभुछत्रपतीसारखा कोणी बुद्धिवान् जाल्याची कीर्ति ऐकिली नाहीं; व पुढेंही या उपमेचा होणार नाहीं. जसें 'नारायणसमो देवो न भूतो न भविष्यति' श्रीनारायणासारखा देव सर्व देवांत कोणी जाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं. याप्रमाणें हा राजा अकलेविषयीं अद्वितीय, महातेजस्वी, व रूपवान्, व गुणज्ञांत शिरोरत्न व राजकुलांत मुकुटमणी अनुपमेय जाला. ज्याचें नाम घेतलें असतां यशकीर्तीचा लाभ, याचे गुण वर्णितां ह्याच ग्रंथ होऊन अपार गुणांच्या कारणानें अपुरा राहील. असो. त्या प्रतापसिंह महाराज यांहीं केलेल्या कायद्याचा, असे तिनीही भाग निरनिराळे दर्शवून, तिन्ही भागांचा एकच ग्रंथ लिहून, या स्वामिसेवेंत हजर केल्यास तुह्मांस बक्षिस मिळोन, तुमचें नांव या सरकारांत हमेश राहील, अशी आज्ञा केल्यावरून लिहिलें जात आहे.

---

* हें प्रकरण सातारचे सुप्रसिद्ध फारशी पंडित रा. रा. नरसिंहराव विठ्ठल ऊर्फ बाबा पारसनीस ह्यांनीं, सातारचे शेवटचे छत्रपति श्री. आपासाहेब महाराज ह्यांचे दत्तक पुत्र श्री. व्यंकोजी राजे ( ह्यांस लॉर्ड डलहौसी साहेबांनीं नामंजूर करून सातारचें राज्य इ. स. १८४९ मध्यें खालसा केलें ) ह्याचेकरिता फारशी ग्रंथावरून तयार केलें आहे. सुमारें ५० वर्षांपूर्वीं फारशी भाषेंतील ग्रंथांचीं मराठी भाषांतरें कशीं झालीं आहेत, व त्यांतील उपदेशपर प्रकरणें मराठींत आणण्याचा कसा प्रयत्न झाला आहे, त्याची कल्पना ह्या ग्रंथावरून चांगली येते.

## भाग १.

## षहानषाह अकबर पादशाहा राजधानी संस्थान दिल्ली यांणीं हुजूर राजधानीचीं कामें चालविणारे मुत्सद्दी लोक व मुलकाचा बंदोबस्त ठेवणारे अंमलदार यांनीं वर्तणूक करण्याकरितां दस्तुरुल-अमल ह्मणोन कायद्याचीं कलमें ठरविलीं, तीं लिहिलीं जात आहेत:—

राजधानीचे कारखान्याचा बंदोबस्त ठेवणार व पादषाही दरबारांतील कामदार मंडळी, षाहाजादे ह्मणजे पादषाहाचे पुत्र, व मित्रतेचें आहे लक्षण ज्यांत अशी सरदारमंडळी, व अतिश्रेष्ठ योग्यतेचे अमीर लोक ह्मणजे मानकरी वगैरे सर्व पदाधिकारी व अंमलदार व कोतवाल यांणीं दस्तुरुल-अमलाचे कायद्याप्रमाणें वर्तणूक करून, सर्व शहरें व हरएक कर्यात व कसबे व लहानलहान गांवें वगैरेंचा बंदोबस्त ठेवण्याकरितां, सर्व कामांची समजूत होण्यास्तव, हा दस्तुरुल-अमल ह्मणजे वर्तणुकीचा कायदा व हें ईश्वरी मर्यादेचें आज्ञापत्र राजाधिराजपणाचें, कृपेच्या झऱ्यांतून व पादषाही श्रेष्ठतेच्या खाणींतून उत्पन्न जालें आहे. ह्मणजे षहानषाह अकबर पादषाह यांणीं राजनीतीचीं स्वतां आपले बुद्धीनें कलमें ठराविलीं आहेत. त्यांतील कलमांचीं आज्ञा मान्य करून हुकुमाप्रमाणें वहिवाट ठेवावी. तीं कलमें बतपसील:—

१. प्रथम मुख्य तात्पर्य रीतीनें हें कलम आहे कीं, हरएक वागणुकीमध्यें मूळभाग दोन, ते **दिन** व **दुनया**. दिन ह्मणजे परमार्थ व दुनया ह्मणजे प्रपंच. तेव्हां प्रपंच व परमार्थसंबंधीं सर्व कामांत ईश्वरी मनोगतावर धोरण ठेवून वागावें. तें असें कीं, यवन लोकांस **कुराणषरीफ**चे ग्रंथांत ईश्वरांनीं ज्या आज्ञा **फर्ज** ह्मणजे विधियुक्त, **मकरुह** ह्मणजे निषेधार्थी योजिल्या आहेत, त्याप्रमाणें यवनानें आचार ठेवावा. **फर्ज** असतील त्याप्रमाणें कर्म करावें. **मकरुह** ह्मणजे वर्ज्य असेल त्या कर्माचाराचा त्याग करावा. येणेंकरून यवनांनीं ईश्वराचे मनोगतानुरूप आचार ठेविला असें होतें. हिंदु लोकांनीं, वेदांत विधि व निषेध असे दोन भाग दर्शविले आहेत, त्यांपैकीं विधि ह्मणजे जीं कर्में वेदांनीं वर्णाश्रमपरत्वें विहित योजिलीं आहेत, त्याप्रमाणें आचार ठेवणें; व निषेध ह्मणजे जीं कर्में वर्ज्य केलीं आहेत तीं आचरूं नयेत. याप्रमाणें विधिनिषेधाचें सर्वदा लक्षांत आणून, प्रपंच व परमार्थ केल्यास, ईश्वरी मनोगतावर धोरण ठेवून वागलेंसें होतें. तात्पर्य, ईश्वरी मनोगतास किंचितही विरुद्ध न येई असें, बहुत सावधगिरीनें, वागावें.

२. ईश्वराचे द्वारीं अति नम्रता धारण करून, आपल्यास व परक्यास मंजूर न ठेवितां, आपले व दुसऱ्याचे भिडेवर नजर न ठेवितां, आपल्या कामास प्रारंभ करावा. यांतील भाव हा आहे कीं, हरएक कामांत ईश्वराची भीति ठेवून वागावें. भिडेनें कोणतेंच काम करूं नये.

३. एकांतवासावर अति प्रीति असों नये. कारण, सर्वदां एकांतीं वास करणें ही चाल अरण्यवासी फकीर लोकांची आहे. यांतील भाव हा आहे कीं, राज्यकर्ते पुरुषांनीं सर्व काळ एकांतीं राहिल्यास, लोकांची दाद फिर्याद ऐकून घेणें बंद होईल, व तेणेंकरून बेदाद होऊन, मुलकाची व एकंदर कामाची खराबी होईल; यास्तव एकांतीं प्रीति नसावी. लोकांचीं फिर्यादीचीं कामें बंद न होत अशा बेतानें एकांतवास असावा. तात्पर्य, एकांतींचे कामास प्रथम एक वेळच नेमावा. ह्मणजे त्या वेळेस तीं कामें समजुतींत येतील. तो समय सोडून जरूरीचें कारणच लागेल, तर लौकिकांतून उठून एकांतींचा मजकूर एकीकडे ऐकून घेत जावा. [अकबर पादषाह यांची चाल हमेषा अशी होती कीं, दिवसां राजधानीसंबंधीं सर्व कामें आटोपून, रात्रीं महालांत एकांत स्थळीं निद्रेस पादषाहची स्वारी गेल्यावर, त्या समयीं आंत जाण्याचा कोणाचाच राबता नाहीं अशा समयांत देखील, लोकांची दाद लागावी याजकरितां, खासे निजावयाचे पलंगावर एक घंटा बांधून, त्या घंटेची दोरी सदर अदालतकचेरीचे खांबास बांधली होती.* ज्यांस ज्या समयीं जरूरीचें कारण पडेल, त्यांणीं त्या घंटेची दोरी हालविली ह्मणजे घंटा पादषाहाचे महालांत हालून वाजत असे. घंटा वाजतांच पादषाहा धावून येऊन, वाजविणारास काय जरूर आहे असें विचारून, त्याची चिंता तत्काल परिहार करीत होते. याप्रमाणें फिर्यादी बेदाद तिलमात्र न होय अशा बेतानें एकांतवास करीत जावा.]

४. निरंतर सर्व मंडळीचे समुदायांतही बसण्याचा स्वभाव नसावा. कारण, हा मार्ग केवळ हमेषा बाजारांत बसणारे लोकांचा आहे. तात्पर्य, राहणींत व वागणुकींत उभय रीतीचे ह्मणजे एकांत व लोकांत यांचे मध्यमार्गीं असावें. यांतील भाव हा आहे कीं, अति एकांत किंवा अति लोकांत नसावा. सर्वदा जनवासांतच राज्यकर्ते पुरुषांनीं राहिल्यास, कितेक नाजूक कामाचे मजकूर असे असतात कीं, ते एकांतींच ऐकून घेतले पाहिजेत. हे बंद न होत अशा बेतानें लोकांत वास ठेवावा. दोन्ही समसमान ठेवणेंची बुद्धि कधींही सोडूं नये.

५. ईश्वरानें ज्यास श्रेष्ठता दिली आहे, त्या पुरुषास ह्मणजे साधुसंतांस अतिश्रेष्ठ जाणोन, त्यांवर अति प्रीति असावी. यांतील कारण हें आहे कीं, ईश्वराची

कृपा साधुसंतांवर आहे. तेव्हां जो भगवद्भक्तांवर लोभ ठेवितो त्यावर ईश्वर कृपा करितो, व ईश्वरी कृपेंत सर्व कल्याण आहे. यास्तव हें कलम योजिलें आहे.

६. प्रातःकाळीं व सायंकाळीं व मध्यरात्रीं अशा तीन संधींत कदापि निद्रा न घेतां जागृत असण्याचा अभ्यास करावा. [आपले हिंदु शास्त्रांतही असें आहे कीं, अस्तोदयीं कदापि निजूं नये. कर्मरीतीनें या दोनी वेळा कर्माचाराच्या आहेत. सबब, या वेळेस निद्रा वर्ज्य असावी, व मध्यरात्रीं एकांतीं भगवत्स्मरण करावें. मध्यरात्रीपासून उत्तर दिवसाचा प्रारंभच आहे. सबब, या संधींतही जागृति असावी. सारांश, अस्तोदयीं निजूं नये. अस्तोदय केवळ कर्मारंभा-करितांच आहे असें नाहीं. नित्य सूर्याचे अस्तोदयाचें कारण असें आहे कीं,

आयुर्हरति वै पुंसामुद्यन्नस्तं च यन्नसौ ।

मनुष्याची आयुष्यगणना करण्याकरितां अस्तोदय योजून, या योगें सूर्य नित्य मनुष्याचें आयुष्य हरण करीत आहे. याजकरितां या घातसंधींत निजूं नये. श्रीनारदांनीं धर्मराजास नीति सांगितली, त्यांतही अरुणोदयीं निद्रापन्न असूं नये ह्मणजे अरुणोदयीं निजूं नये, ह्मणोन वर्णिलें आहे. अशाच या संधीच्या वेळा यवन लोकात नमाज पठणाच्या आहेत. सबब पादशाहांनीं सदर्हू तिनी वेळेस जागृतीचा अभ्यास करावा असें लिहिलें आहे.]

७. ही सर्व रयत ईश्वराची आहे. ज्या समयीं या सर्वांचे कामाचा वेळ नसून निखालस सर्व कामें संपवून फुरसतीचा समय असेल, अशा वेळेस विद्याभ्यासाचें ग्रंथावलोकन करीत जावें. ते ग्रंथ असे असे असतील ते पहावे, कीं पवित्रपणा व निष्पापपणा यांत ज्यांणीं स्वामित्व धारण केलें आहे, अशा सिद्ध-पुरुषांनीं जे केलेले ग्रंथ. जसेंः—**इम्ले आखलाक** ह्मणोन अति उत्तम अध्यात्मविद्येचा ग्रंथ आहे तो, व **खुलासतुल् जमी आउल्लूम** ह्मणोन सर्व विद्यासंग्रहाचा ग्रंथ. जसे **आखलाक नासरी** ह्मणोन ग्रंथ आहे तो. हा ग्रंथ नासरुद्दीन हकीम, अतिउत्तम, विद्वान् लोकांत श्रेष्ठ व सर्व कायद्यांतील वाकीफगार, यांची सर्व विद्येंत गती होती. यांणीं व **इह्यायुल्लूम** ह्मणोन अहंमद गजली महासंभावित व सर्व विद्वानांत अग्रणी यांचाही सर्व विद्येंत अभ्यास होता—त्यांणीं केलेला ग्रंथ. या ग्रंथीं चार **रुक्न इबादतीचे** ह्मणजे तपश्चर्येचे व प्रापंचिक व्यवहाराचे आहेत. तो ग्रंथ व **मुन्नीयात** ह्मणोन ग्रंथ आहे, यांत मुक्त कसें व्हावें हें सर्व जीवन्मुक्ततेचें वर्णन आहे; व **महलकात** ह्मणोन ग्रंथ आहे; यांत सर्व मारणविद्येचें वर्णन आहे, व **इह्या** ह्मणोन ग्रंथ आहे, यांत संजीवन करणें व वांचविणें याचें वर्णन आहे तो

ग्रंथ, व किमयायसआदत ह्मणोन ग्रंथ आहे, तो पारसी भाषेचे इबारतींत आहे, व मसनवी ह्मणोन ग्रंथ आहे तो जलालुद्दीन यांणीं केलेला. त्या ग्रंथाच्या बैता तीस हजार आहेत, व नसर पांच हजार आहेत. असे ग्रंथ आहेत ते अवलोकन करीत जावें; व मौलवी रूम यांणीं केलेली मसनवी हाही ग्रंथ अति उत्तम, सबब पाहत जावा. असे असे ग्रंथ अवलोकन करून विद्याभ्यास करीत जावा. ह्मणजे प्रपंच व परमार्थ यांचें पूर्ण ज्ञान प्राप्त होऊन, प्रश्न करण्यांत ठकबाज व कपटी लोक यांचें कांहीं चालणार नाहीं.

सर्वांचीं कामें उत्तमपणानें सिद्धीस नेण्यांत ईश्वराची अति उत्तम सेवा आहे. याजकरितां मित्रता व वैरभाव व आपला व परकीपणा यांवर नजर न ठेवितां, अति संतोषानें सर्वांचीं कामें सिद्धीस नेत जावीं.

फकीर लोक व गोरगरीब व याचक व केवळ एकांतवासी विरक्त साधु, कीं ज्यांणीं जमाखर्चाचें द्वारच बंद केलें आहे, ह्मणजे कांहीं द्रव्य मिळवून जमा करावें तर नांवें खर्चीं लिहावें. जमाच नसल्यावर खर्च कशाचा? सबब, ज्या साधूंनीं जमाखर्च बंद केला आहे,[१]- असे असे जे साधू, कीं जे याचनार्थी जिव्हेंतून कदापि शब्द काढीतच नाहींत व यदर्थी मुख उघडीतच नाहींत, अशा साधुजनास तर आपले शक्त्यनुसार साह्य देऊन समाचार घेत जावा. आणि या प्रकारचे एकांतवासी व केवळ ईश्वरास जाणणार अशा साधूंचे संगतीचा लाभ घेऊन, ह्मणजे त्यांपाशीं जात जाऊन, त्यांचा आशीर्वाद प्राप्त होण्याची प्रार्थना करीत जावी.

मनुष्याचे हरएक अपराध व अन्याय व दुराचरण यांस न्यायाचे ताजव्यानें वजन करून, हरएक अपराधाचे मान निरनिराळे ओळखून ठेवावे, व अकलेचे ताजव्यानें हरएकांचे अपराध वजन करून त्या अनुमानानें शिक्षा योजीत जाव्या. आणि सूक्ष्म विचार जाणणारे चित्तानें समजत जावें कीं, या सर्व अपराधसमुदायांत कोणता अपराध झांकावयाजोगा व कोणता सोडून द्यावयाजोगा व कोणता विचारावयाजोगा व कोणता मुक्लास आणावयाजोगा व कोणता पारपत्य करावयाजोगा आहे, हें आधीं पुरतें ओळखावें. कारण, कित्येक लहान लहान अपराध असून त्यांस मोठीच शिक्षा दिली पाहिजे, असे आहेत, व कित्येक अपराध मोठे असोन त्यांविसीं डोळेझांकच केली पाहिजे असे आहेत.

आज्ञाभंग करणारे, दांडगे, अमर्याद पुरुषास, आधीं मवाळकीनें व कठोरपणानें

---

१ यास अन्य प्रमाण, "भरवोनी हात कासया धुवावे। चालतिया गोवे मारणासीं ॥" हात भरवावा तर धुवावा लागेल. भरविला नाहीं तर धुण्याचें काय प्रयोजन? (भाषांतरकर्ता.)

ह्मणजे गोडीनें व रागानें, जरब देऊन व मृदुपणानें अधिकारानुरूप बोध करून, चांगले चालीनें चालण्याचा मार्ग सुचवावा. सदर्हूप्रमाणें बोध केला तथापि मानीतच नाहीं व बोध करून कांहीं उपयोग नाहीं असें साफ समजुतींत आलें, ह्मणजे नंतर त्यास बांधणें किंवा मारणें किंवा कापणें अथवा ठार मारणें, हे अपराधाचे अधिकार पाहून त्या त्या अधिकाराप्रमाणें शिक्षा देत जाव्या. आणि जीवें मारण्याचे शिक्षेंत जलदी करून दांडगावा करूं नये. वरकड शिक्षेचा पर्याय निराळा, व ठार मारण्याचा पर्याय निराळा आहे. जिवें मारण्याविषयींचे ठरावांत जलदी करूं नये. हे विषयीं बहुत विचार करून पुरी चौकशी करावी. (पारसी बैतेचा अर्थ)—"सजीवास ठार मारून निर्जीव करण्याचें काम सुलभ आहे, परंतु ज्याचा गळा कापिला, त्याचे शरीरास पुन्हां मस्तक जोडून जिवंत करितां येत नाहीं." सबब, कामदारांनीं असें करावें कीं, ज्या मनुष्यास ठार मारावें असें नजरेस येईल, त्या खुनी कैद्यास, आपले हातीं कामाची बाजी आहे तों हुजूर सरकारांत पाठवावा, किंवा त्यांस कैद करून ह्मणजे कैदेंतच बंदोबस्तानें ठेवून, त्याबद्दलचे कच्चे हकीकतीचे कागद सरकारांत लिहून पाठवावे. त्या गुन्हेगारास कैदेंत बंदोबस्तानें ठेवण्यांत विघ्न उत्पन्न होईल, किंवा त्या खुनीस हुजूर रवाना करण्यांत फंदफितुरास कारण होईल, ह्मणून हुजूरून त्याविसींचा हुकूम येई तोंपर्यंत त्यास कैदेंत सावधगिरीनें ठेवावें. त्याचे कोणी आप्तसंबंधी हरएक प्रकारें जमाव जमवून, अनेक मसलतीनें त्या कैदीस कैदेंतून दगलबाजीनें सोडवून नेतील, कदापि ठेवणार नाहींत, अगर त्यास रवाना करावा तर त्याचे कोणी सामीलदार जमानतीनिसीं येऊन त्यास वाटेंतूनच सरकारी स्वारशिबंदीबरोबर मारामारी करून सोडवून नेतील, . त्यांत कांहींएक संशय नाहीं, असें पुरें समजुतींत आल्यास, तेच वेळेस त्यास फांसी देणें अथवा त्याचा शिरच्छेद करणें असेल त्या रीतीनें ठार मारून, हुजूर सदर कारणासहित विदित करावें. व जे जे दुष्ट पादषाह निर्दय आहेत, ते ज्या कैदीस ठार मारावयाचा त्यास हत्तीचे पायाखालीं तुडवून ठार मारितात, किंवा त्याचे सर्व अंगाची साल काढून जिवें मारितात, तसें या दोन प्रकारच्या शिक्षेनें मात्र कदापि ठार मारूं नये. या दोन शिक्षा निखालस वर्ज्य असाव्या. हरएकास शिक्षा देणें ती त्या मनुष्याचे अधिकारानुरूप देत जावी. ह्मणजे मनुष्याची योग्यता पाहून तसें पारिपत्य करीत जावें. यांतील भाव हा आहे कीं, मोठे योग्यतेचे मनुष्याकडून अपराध झाल्यास अधिकारपरत्वें ज्ञातिरूप शिक्षा देत जावी. कारण कीं, कुलीन व श्रेष्ठ पुरुषास यजमानानें क्रोधदृष्टीनें पाहणें हेंच त्याजला

जिवें मारण्यासारखें पारिपत्य आहे; आणि नीचास लाथा मारणें हेंच योग्य आहे. कारण, नीच मनुष्यास लाथेनें मारलें तरी त्यास त्याची लाज वाटत नाहीं.

ज्याचे अकलेवर व धार्मिकपणावर विश्वास असेल–ह्मणजे जो अकलवान् व थोर चालीचा मनुष्य आहे असा ज्याविषयीं विश्वास असेल त्याजला सोडून द्यावें. ह्मणजे अकलवानाकडून एखादे वेळेस कदाचित् एखादें अमार्गरीतीचें कर्म घडलेलें नजरेस येईल, तर त्याजला कांहींएक सजा न देतां सोडून देत जावें; आणि त्याजकडून जें अयोग्य कर्म प्रत्यक्ष आपले दृष्टीनें पाहिलें असेल, त्या प्रकरणीं त्यास नेक चालीचा बोध करणें तो एकांतीं करावा. ह्मणजे त्यास समजून सांगणें तें एकीकडे सांगावें. कोणाचे समजुतींत तो मजकूर येऊं देऊं नये. कदाचित् सांगणारानें चुकीनें सांगितलें असेल, तर त्या खोटे बोलणारासही शिक्षा देऊं नये. कारण कीं, शिक्षा देणें हीच सांगण्याची भिंत आहे. यांतील भाव हा कीं, थोराचे हातून एखादें दुष्कर्म अगर अमार्ग वागणूक जाली ह्मणोन एखाद्यानें उगेंच चुकून लबाडीनें सांगितलें असेल व त्या लबाड बोलणारास शिक्षा दिली तर, सर्व लोक आपणाआपणांत विचार करितात कीं, आज अमुक गृहस्थाचें पारिपत्य होण्याचें काय प्रयोजन होतें, हा शोध करितात; आणि ती गोष्ट सर्वांत प्रसिद्ध होते. आणि अमुक थोर मनुष्याकडून अमुक कर्म घडल्याची चाहडी केल्याबद्दल याचें पारपत्य झालें असें जाहीर होतें. तेणेकरून त्या थोर मनुष्याचे अब्रूस कमीपणा येतो. सबब, एखाद्यानें थोराची चहाडी केली, तरी त्या चहाडखोराचें देखील पारिपत्य करूं नये. इतकें थोराचे अब्रूस जपत जावें.

ज्यावर ईश्वराची कृपा असेल त्यावर अति प्रीति ठेवावी. कारण कीं, सत्य भाषण करण्यास मनुष्य फार असमर्थ आहे. यांतील भाव असा कीं, सत्य वागणुकीचा आचार व सत्य भाषण करण्यास सर्व मनुष्यांचें सामर्थ्य नाहीं. साधु मात्र सत्य चालीनें चालून सत्य भाषण करितात. त्यांवरच ईश्वराची कृपा असते. सबब, अशा सत्यवादी पुरुषावर बहुत प्रीति असावी. नीच जातीचे व दुष्ट आहेत, ते काय बोलावें व काय न बोलावें याचा विचार करीतच नाहींत. अविचारानें मनास येईल तसें भाषण करितात. या योगें ते संकटांतही पडतात, व उत्तम जातीचे पुरुष आहेत, ते बहुत विचारवान् असतात, ते दूरवर विचार करितात कीं, न जाणों, माझे बोलण्यांत एकाद्या शब्दानें ऐकणाराचें अंतःकरण दुखवेल व मी संकटांत पडेन. असा विचार मनांत आणून भाषण करितात. *उत्तम विचारवान् आहे, तो दुसऱ्याचा उपयोग,* दुसऱ्याचें कल्याण होण्याकरितां आपले मुखांत जिव्हा बाळगितो–ह्मणजे ज्या बोलण्यांत दुसऱ्याचा उपयोग होईल तेंच भाषण करितो. असे पुरुषास तांबडे

गंधकाची उपमा आहे. यांतील भाव हा आहे कीं, तांबडा गंधक कोठें मिळतच नाहीं. मिळाल्यास त्यास फार किंमत पडते, आणि त्या गंधकानें किमयागार आहेत ते धातूंचें सुवर्ण किरितात. तो गंधक जसा दुर्मिळ व दुर्लभ आहे, तसे विचारवान् सत्यवादी श्रेष्ठ पुरुष दुर्मिळ आहेत.

खुषामददोस्त असूं नये. ह्मणजे आत्मस्तवावर प्रीति नसावी. कारण, बहुत कामें खुषामती पुरुषाचे--ह्मणजे आपलें कार्य साधण्याकरितां उगीच लटकी तारीफ करून त्यास खुष करून आपलें काम करून घेतात असे--आपले कामाकरितां तारीफ करणारांचे शब्दांवर प्रीति ठेवूं नये. तथापि, अशा खुषामती पुरुषांचा त्रासही करूं नये. कारण, सेवक लोकांस यजमानाची तारीफ करून त्यांचें मनोरंजन करण्याची संवय असते.

फिर्यादी लोकांस जें विचारणें असेल तें, आपणच खुद्द जातीनें विचारण्याची बहुत यत्नेंकरून चाल ठेवावी. यास प्रमाणः—

* * * * * *

"फिर्यादी लोकांची फिर्याद ऐकून घेऊन त्याची दाद घेण्याचें काम मालकानें दिवाणावर टाकूं नये, कीं दिवाणाचे हातून त्याची दाद लागावी."

फिर्यादी लोक जसजसे आले असतील, त्या क्रमानें त्यांची नांवनिसी कागदावर लिहून--ह्मणजे जो आधीं आला असेल, त्याचें आधीं व पाठीमागून आला असेल त्याचें नंतर, अशा अनुक्रमानें नांवें लिहून, त्या नांवनिसीप्रमाणें फिर्यादी लोकांस बोलवीत जावें. अशी तजवीज ठेविली असतां, जो आधीं आला असेल त्यास आपल्यास कधीं बोलवितील, अशी मार्गप्रतीक्षा करीत बसावें लागणार नाहीं. व सरकारी शिपाई वगैरे नौकर लोक यांणीं फिर्यादी लोकांस मागें हटविणें व बंदी करण्याचे श्रम पडणार नाहींत; व अमुक शिपायानें मजला फिर्याद करण्यास पुढें जाऊं दिलें नाहीं, यामुळें माझें काम ढिलाईवर पडलें असें दुर्निमित्य येणार नाहीं.

जो कोणी एखाद्याचे वाईटपणाचा मजकूर समजावील, त्या चहाडखोराचे पारपत्याविषयीं जलदी करूं नये. त्याणें जें वर्तमान सांगितलें असेल, त्या प्रकरणीं फार बारकाईनें शोध काढावा. कारण कीं, लबाड बोलणार मनुष्य फार आहेत व सत्य बोलणारे कमी आहेत. सबब, जो मजकूर कळला, तो खरा आहे किंवा लबाड आहे अशी पक्की बातमी घेऊन, लबाड बोलला असें खास नजरेस आल्यास, मग त्या चहाडखोरास पुनः अशी कोणाची लबाड चहाडी न करी, अशा बेतापुरती त्यास शिक्षा द्यावी. ह्मणजे त्याचें फार पारिपत्य करूं नये. कारण, बातमी सांगणाराचें पारिपत्यच करीत गेल्यास पुनः कोणी कोणतीच बातमी सांगणार नाहीं.

क्रोधाचे समयीं अकलेचा शिरस्ता सोडूं नये. म्हणजे रागाचे भरांत अकलेस विरुद्ध येई असें कर्म करूं नये, व जें काम करणें असेल तें सावकाशपणें म्हणजे थंडेपणानें, उतावेळ न होतां, व बहुत सहनशीलतेनें काम करीत जावें. व आपले ओळखीचे स्नेही त्यांपैकीं व आपले सेवकलोकांपैकीं—कीं जे अक्कलवान् व श्रेष्ठ असतील अशा प्रकारचे—कित्येक थोर लोकांस मुखत्यार करून ठेवावेत. म्हणजे ते शोकाचे व चिंतेचे व क्रोधाचे समयीं, आपले बुद्धिमान्पणानें, यजमानास मलतेंच न बोलूं देतां, खरी गोष्ट असेल ती समजून सांगण्यास अंतर करणार नाहींत. ह्मणजे यजमानाचे क्रोधसमयीं भिडेनें मर्जीसारखें न बोलतां, वास्तविक असेल तें सांगण्यांत अंतर करणार नाहींत.

शपथ वाहून बोलण्याचा स्वभाव नसावा. कारण, शपथ करणें हें आपण लबाड बोलणार असें प्रसिद्ध करून, आपल्यास असत्यपणाचें दूषण लावून घेण्याचें कर्म आहे. यांतील तात्पर्य हें आहे कीं, जो आपला खरेपणा दर्शविणेकरितां शपथ वाहतो, तोच आधीं आपण लबाड बोलणार आहों, असा आपले बुद्धींत निश्चय करून, नंतर विचार करितो कीं, शपथ वाहिल्याशिवाय आपल्यास खरेपणा येणार नाहीं. अशा हेतूनें आपण खरें असें दर्शविणेंकरितां शपथ वाहतो. सबब हें लक्षण कदापि नसावें. शपथ वाहण्यांत दोन गोष्टी सिद्ध होतात. एक तर आपण लबाड, व दुसरें हें कीं, शपथ वाहून ज्याशीं बोलावयाचें तो कुतर्की, असें सिद्ध होतें.

दुर्भाषण ह्मणजे शिवी देण्याचा स्वभाव नसावा. कारण शिवी देणें ही गैरशिस्त चाल आहे. येविषयीं पूर्वी सायब ह्मणून एक मोठा विद्वान् कवी झाला, तो असें वर्णितो कीं:—

दहने खीष बदुष्नाम मियाला साडुब।
कीं जरे कल्ब बहर कसके दिहीबाज देहद॥

सदरहू कवी आपले मनास बोध करितो कीं, "अरे सायब, तूं आपलें मुख शिवीनें भरवूं नकोस. म्हणजे कदापि शिवी देण्याचा दुर्गुण अंगीं वागवूं नकोस. कारण, शिवी देणें हें खोटे रुपयाप्रमाणें आहे. जसा खोटा रुपया कोणास दिला असतां तोच रुपया तो फिरून आपले हातांत देतो, तसें आपण ज्यास शिवी द्यावी, तो तीच शिवी आपणास फिरून देतो." शिवी देण्यांत दोन प्रकारचें नुकसान आहे. एक आपण दुर्भाषण करणार असें जाहीर करणें, व दुसरें हें कीं, ज्यास शिवी द्यावी तो फिरून देईल तेव्हां आपली अब्रू गमावणें. असें दोन प्रकारचें नुकसान आहे. सबब कदापि शिवी देत जाऊं नये. शिवी न देण्याविषयीं इतका निर्बंध

ठेवावा. दुसऱ्यांनींही आपणास शिवी दिल्ही, तथापि आपण देऊं नये. दिल्यास यांतही दोन प्रकारचा कमीपणा आहे. यास दृष्टांतः—दुसऱ्यानें आपले अंगावर चिखल टाकिला, तो अवलोकन करून आपण त्याचे अंगावर फिरून टाकावा, तर त्यानें ज्या ठिकाणीं आपले अंगावर चिखल टाकिला, त्या ठिकाणीं आपलें अंग भरलें हें एक नुकसान, व त्याचे अंगावर फिरून आपण टाकल्यास आपले हात भरतात हें दुसरें नुकसान. तसें त्यानें शिवी दिली त्यांत आपली अब्रू गेली व त्यास देण्यांत आपले मुखास दुर्भाषणाचा दोष लागतो. यास्तव आपण तर शिवी देऊंच नये. परंतु दुसऱ्यांनीं दिली तथापि आपण देऊं नये.

शेतें लावणीनें चांगले आकारास चढतात. अशीं शेतें खत वगैरे घालून सोज्वळ ठेवणेंविषयीं व रयतेची आबादानी होण्यांत व रयतेस तगाई देण्यांत आधीं बहुत यत्न करावा. येणेंकरून साल दरसाल शहरें व गांव व कसबे व दर्याती यांची वृद्धी होत जाईल. आणि असा सुलभपणा ठेवावा कीं, एकंदर जमीन जिराईतास योग्य होईल. असें झाल्यानंतर त्या जमिनीचा भर आकार घेणेंविषयीं यत्न करावा.

या दस्तुरूल–अमलाची ह्मणजे या कायद्याचे कलमाची एक एक प्रत हरएक कामगारांनीं आपणापाशीं ठेऊन त्याप्रमाणें बहुत यत्न करून वागत जावें; व हरएक रयत लोकांनींही एक एक निरनिराळी प्रत घेऊन, ठरावांतील करारास कदापि बदलून वागूं नये.

गांवांतील कोणाचेही घरीं, गांववाल्यास विचारिल्याशिवाय शिपाई वगैरेंनीं उतरूं नये. येविसीं बहुत यत्नेंकरून बंदोबस्त ठेवावा. सर्व कामांत आपलेच अकलेवर विश्वास ठेवूं नये. आणि आपलेहून जे अक्कलवान् अधिक आहेत, त्यांचा विचार घेत जावा. समयास अक्कलवान् नसेल, तर कोणतेही मूर्खास देखील मसलत विचारण्यास अनमान करूं नये. एखादे वेळेस असें होतें कीं, मसलत विचारण्यानें मूर्खाचे हातूनही सत्यमार्गाचा रस्ता सांपडतो. कारण, असेंच वडिलांनींही ह्मटलें आहे. यास फारशी बैतः—

गाहबाषद जे पीरे दानिषमंद ।<br>बरनियायद दुरस्त तद्बीरे ॥

"एखादे वेळेस असेंही होत असतें कीं, अक्कलवान् वडील मनुष्यास देखील उत्तम विचार सुचत नाहीं. शाहाण्याचे हातूनही काम बिघडतें."

गाहबाषद के कोदके नादां ।<br>बगलत् बर हदफ अनद् तीरे ॥

"एखादे समयीं असें होतें, कीं अज्ञान बालकाचे हातून नेमका निशाणावरच तीर लागतो. लहान मूल चुकून निशाण मारितें असेंही होतें." सबब, दुसऱ्याचा विचार घ्यावा. परंतु बहुत मंडळीसींही मसलतीची विचारणा करूं नये. कारण, कार्यभाव जाणणारी उत्तम अक्कल प्राप्त होणें हें ईश्वरी देणें आहे. ती बहुत ग्रंथ पढल्यानें प्राप्त होते असें नाहीं, व वयास बहुत वर्षें होऊन म्हातारपण आल्यानें येते असेंही नाहीं. यास अन्य ग्रंथप्रमाण—

बुजुरगी बअकलस्त न बसाल ।
बतवंगरी बदिलस्त न बमाल ॥

"थोरपणा व वडीलपणा अकलेवर आहे, वर्षांवर नाहीं, व श्रीमंतपणा मनावर आहे. द्रव्यावर नाहीं." यांतील भाव हा आहे कीं, जितके वयानें वृद्ध पुरुष, तितके थोर असेंच असतें, तर अक्कलवानांस कोणीच न विचारितें. सबब, ज्याची अक्कल अधिक तो थोर, व तोच वडील जाणावा; व ज्याचें मन उदार तो श्रीमंत म्हणावा. धनवान् असून औदार्य नाहीं, तर तो दरिद्रीच ओळखावा. तेव्हां मनुष्यजन्मास येऊन अक्कल प्राप्त होणें हें ईश्वरी कृपादान आहे. सर्वांसच अक्कल आहे असें नाहीं. आणि सर्वांसीं मसलत केली, तर, न जाणों, कित्येक मूर्ख जमतील आणि काम बिघडून टाकितील, आणि तुजला मग त्या कामांत भय प्राप्त होईल. अक्कलवान् लोक दुर्लभ आहेत. ते दूषण ठेवितील. सबब जी मसलत करावयाची ती बहुत विचारानें करीत जावी.

सेवकांचे हातून जें काम व्हावयाजोगें असेल तें पुत्रास सांगूं नये, व जें काम पुत्राचे हातून व्हावयाजोगें असेल त्या कामास आपणच सिद्ध होऊं नये. कारण, दुसऱ्याचे हातून काम बिघडल्यास त्यापासून आपणास दंड घेतां येतो, किंवा त्याचें पारिपत्य करितां येतें. पण आपण मालकांनींच स्वतः काम केलें आणि तें बिघडलें, तर आपलें पारिपत्य आपणच किंवा आपले सेवकांनीं करण्यास सामर्थ्य नसतें. सबब, हरएक कामाची तजवीज दुसऱ्याचे हातून ठेवावी.

माझे अपराध क्षमा करा असें कोणी काकुलती येतील, त्यांचे अपराधांची डोळेझांक करून, क्षमा करीत जाणेंचें लक्षण असावें. कारण, मनुष्याचे हातून चुकी किंवा अपराध घडतच नाहीं, असें कोणीच मनुष्य नाहीं. यास अन्य ग्रंथप्रमाणः—

बपोष गर बखताये रसी व तामामजन् ।
के हीच नफ्स् बषर खाली अज खता नबुवद् ॥

"एखाद्याचा अपराध दृष्टीस आल्यास तो आपण झांकावा. आणि त्याचें

धर्म काढूं नये. कारण, कोणतेंच मनुष्य अपराधाशिवाय नाहीं. परंतु सारे वेळ क्षमाशीलपणाच धारण करून, अपराध क्षमाच करीत गेल्यास, माणसें जरब उडून दांडगेपणानें वागूं लागतील, व फार त्रास केल्यानें जवळ कोणीच राहणार नाहींत; कंटाळून निघून जातील. कित्येक मनुष्यें अशीं आहेत कीं, त्यांजकडून अपराध घडला कीं, दर अपराधास शिक्षा करावी लागते. असे कित्येक निर्लज्ज आहेत, व हजार अपराध घडले तथापि क्षमाच करावी लागते अशीं कित्येक माणसें आहेत. राजधानीचे कामांत शिक्षा व पारिपत्य करण्याचा विचार फारच नाजूक आहे. यास्तव बहुत विचारानें व सबूरीनें पारिपत्यास अनुसरत असावें.

रहादारीचे बंदोबस्तावर जो कामगार नेमावयाचा तो, ज्यास ईश्वराची भीति आहे असा पाहून, व आळस टाकून बहुत झटून काम करणारा पाहून, त्याजला नेमावें. आणि त्याची वाईट अगर चांगली चाल कशी आहे, ती त्याचे हाताखालील मनुष्यांस विचारीत जावें. आणि निरंतर सर्वांचा समाचार घेत जावा. कारण, पातशाह शब्दाचा अर्थ रक्षण करणार असा आहे. हें मालकांनीं पुरें ध्यानांत ठेऊन वागत जावें.

सर्व लोक ईश्वराची सर्व रयत आहे. सबब कोणचेही धर्मास अडथळा करूं नये. कारण, अक्कलवान् पुरुष आहे, तो ही पृथ्वी प्रत्यक्ष नाशवंत असून, या पृथ्वींतील प्रापंचिक कामांत देखील आपलें नुकसान होऊं देत नाहीं. तो अक्कलवान् पुरुष हा परमार्थ प्रत्यक्ष अविनाश आहे, या परमार्थांत जाणून समजून कसें नुकसान करून घेईल? यांतील भाव हा आहे कीं, जो प्रपंचांत आपल्यास पातक घडूं देत नाहीं, तो परमार्थविषयांत दोषाचरण कसें करील? जो कोणी अन्य जातीचा मनुष्य, आपले ज्ञातिधर्माप्रमाणें, सत्यपणानें धर्माचरण करीत आहे, आणि त्याचे धर्मास आपण अवरोध केल्यास, त्या धर्मद्वेष्टेपणाचें पातक आपणास लागेल. आणि आपण ज्या धर्मास अवरोध करितों, तो धर्म त्याचा नसून तो विरुद्ध आचार करितो असा असेल, तर तोच स्वतः दोषी आहे. मग आपण त्यास बोध करणेचें कारण नाहीं. तो आपले अधर्माचरणानेंच दुर्गतीस जाईल, व अकर्माची शिक्षा पावेल. तो स्वतःसिद्ध मूर्ख होय. आपण त्यावर दयाच करीत जावी. त्याचे धर्मास मनाई अथवा त्याचा त्रास करणेचें कारण नाहीं. सुलक्षणी व हितेच्छु पुरुष हरएक जातीवर लोभच करितो. कोणाचाही कंटाळा करीत नाहीं.

अति आहार व निद्रा या दोन गोष्टी वर्ज असाव्या. तथापि जितका आहार ठेविलाच पाहिजे व जितकी निद्रा घेतलीच पाहिजे, तितके वर्जही करूं नये. यांतील भाव हा आहे कीं, आहार व निद्रा परिमित असावी. येणेंकरून पशूचे अधिका-

रापासून मानवी अधिकारास मनुष्य खास पावेल. यांतील भाव हा आहे कीं; पशूंचा आहार सर्वकाळ चालतो. किती व कोठपर्यंत खावें व निद्रा किती घ्यावी यांस कांहीं नेमच नाहीं. निद्रा व आहार अति ठेवणें ही पशूंची चाल आहे. हा अभ्यास मनुष्यानें चालविल्यास, मनुष्य असून त्यास पशुत्व येतें, व ही चाल न ठेविल्यास पशुत्व जाऊन मनुष्यास मनुष्यत्व येतें. सबब, आहार व निद्रा परिमित असावी.

आपले अंगीं शक्ति आहे तोंपर्यंत आळसानें दिवसाचीं कामें रात्रीवर टाकूं नयेत. यांतील भाव हा कीं कोणतेंही काम वेळचे वेळेस करावें.

तुफानखोर मनुष्याचे संगतीस लागूं नये. त्यापासून दूर रहावें.

अंतःकरणास कपटाची केवळ बंदीशाळाच करून ठेऊं नये. ह्मणजे अंतःकरण निष्कपट ठेवावें. मनांत कदापि कपट येऊं देऊं नये. यद्यपि मानवी अधिकारामुळें एखादे वेळेस मनांत कपटभाव आल्यास तो जलद काढून टाकावा. कारण, प्रतिश्वासास ईश्वर प्रत्येक सत्यकर्माचा कर्ता आहे. ईश्वरानें हें कपट वगैरे दुर्भाव बाह्यात्कारी वागणुकीकरितां ह्मणजे प्रापंचिक व्यवहाराकरितां युक्ति काढिली आहे. यांतील भाव हा आहे कीं, कपटादिक दुर्भाव हें उत्तम लक्षण असतें, तर हीं लक्षणें परमार्थांत योजिलीं असतीं.

हास्य व विनोद या दोन गोष्टींचा स्वभाव अति कमी ठेवावा. कारण, अनेक विघ्नें या दोहोंपासूनच निर्माण होतात.

बातमीवर नेमिलेले जासुदांकडून निरंतर वर्तमान ऐकून घेऊन सावध रहात जावें. आणि एका जासुदाचे बोलण्यावरच विश्वास ठेऊं नये. कारण, सत्य भाषण व निर्लोभता हीं दोन लक्षणें फार दुर्मिळ आहेत. यास्तव, प्रत्येक कामांत कित्येक जासूद लोक बातमीकरितां नेमावेत. तेही अशा बेतानें कीं, त्या जासुदासही एकाच कामावर दुसराही जासूद नेमिला आहे असें परस्परें वर्तमान समजूं नये. आणि हरएक जासुदाकडून बातमीचे कागद व वर्तमानपत्रें निरनिराळीं लिहवीत जावीं. आणि त्या लिहिण्याचे मेळावरून बातमीचा भाव समजत जावा, व कोणीं विचारिलें असतां, मजला अमुक बातमीकरितां अमक्यांनीं ठेविलें आहे, असा जो प्रसिद्धपणें सांगतो, त्या जासुदास बरतर्फ करावा; आणि त्याचें पुन्हां मुखावलोकन न होय अशी तजवीज ठेवावी.

नीच जातीचे व लावालावी करणार ह्मणजे बदचालीचे लोक, अशा प्रकारचे मनुष्यांस आपले जवळ ठेवूं नये. यद्यपि, अशा प्रकारचे मंडळीचा समुदाय दुसरे बदचालीचे मनुष्याविषयीं चांगला आहे, परंतु आपण कधींही आपली चाल सोडूं

नये. ह्मणजे अशा मनुष्यास थारा देऊं नये. आणि बदचालीचीं माणसें कोण कोण आहेत, हें आपले मनांत ठेवून, त्याविषयींचा आंदेशा निरंतर वागवीत असावा. कारण कीं, न जाणों, अशीं माणसें आहेत तीं बाह्यात्कारीं चांगलेपणाचा भाव दाखवून उत्तम लोकांचा घात करितील.

आपले जवळ वागणारीं मनुष्यें व चाकरीवरील माणसांपासून बहुत सावध राहावें. कारण, हे लोक निरंतर संनिध राहण्याचे योगानें घात न करीत असें राहावें.

मर्जीसारखें भाषण करणारे कपटी पुरुष— जे असे कीं बाह्यात्कारीं मित्रतेचा भाव दाखवून शत्रुत्वाचें कर्म करितात, व सर्व फंदफितूर अशीं कामें या गोष्टी-पासूनच निर्माण होतात,—व थोरास अनेक कामाचे चिंतनामुळें फुरसत कमी व या बदचालीचे मनुष्यांचा समुदाय फार, याजकरितां अशा मनुष्यांपासून फार सावध राहावें. गांवोंगांव व तर्फेतर्फेस सर्वांची हकीकत समजून घेण्याकरितां धण्यांनीं खुद्द जातीनें फिरत जावें. अर्जदाराचे मनांत असतें कीं, आपला मजकूर पुष्कळ यथासांग लिहावा ह्मणजे फिर्याद चांगली लागू होईल. असें जाणोन ते अर्जीत बहुत तपशीलवार मजकूर लिहितात. तेणेंकरून समजुतीस अवकाश लागून, कामाचाही निकाल न होतां एकाचीच अर्जी ऐकून घेण्यांत बहुत कामाचा वेळ मोडतो. सबब, अर्जदारानें अर्जायोग्य असेल तितकाच हशीलाचा मजकूर, थोडक्यांत समजुतींत येई असा, अति विस्ताराचा अति अल्प करून अर्ज देत जावा, व अशी अर्जी असेल तीच घेत जावी. अक्कल वाढण्याविषयीं व विद्याभ्यासार्थ अति यत्न करून, अभ्यास निरालस्यपणें, खंड न पडतां, करीत जावा. तो असा कीं, ज्या विद्येचा जो गुरु अध्ययन सांगण्यास येतो, त्या गुरूची वेळ व्यर्थ जाऊन, आतां केव्हां पढतील असें त्यास उगेच मार्गप्रतीक्षा करीत बसावें न लागे. अशा तजविजीनें अभ्यास करीत जावा.

पुरातन खानदानींतील मनुष्यांचें बहुत प्रीतीनें पालन करीत जावें. शिपाई लोकांचे व घोड्यांचे सामानसरंजाम कसे आहेत, ते वरचेवर पाहात जाऊन दुरुस्त ठेवण्यास कदापि गाफीलगिरी करीत जाऊं नये. जमेहून खर्च कमी करीत जावा. कारण, हरएक प्रकर्णीं अनेक प्रसंगांच्या मसलती या कलमाचे पोटींच आहेत. असें सांगितलें आहे कीं, "ज्याचा जमेहून अधिक खर्च आहे, तो अति मूर्ख आहे, व जमेहून खर्च कमी करितो तोच अक्कलवान्, व जो जमेबरोबर खर्च ठेवितो—ह्मणजे जितकी जमा तितकाच खर्च करितो, तो अक्कलवानही नव्हे व मूर्खही नव्हे." ये विषयीं 'अन्य ग्रंथांत असें वर्णिलें आहे कीं, जो दोन हिस्से

जमा शिलक राखून, एक हिश्शांत खर्चाची व्यवस्था ठेवितो, तो उत्तम अक्कलवान्; व जो एक हिस्सा जमा शिलक ठेऊन दोन हिस्से खर्च ठेवितो, तो मध्यम; व जो जमेबरोबर खर्च ठेऊन शिलक राखीत नाहीं, तो अतिमूर्ख असें वर्णून, जो जमेहून अधिक खर्च करणार, त्याची गणना मनुष्यांत धरलीच नाहीं. जितकी जमा येईल, तितकी सर्व खर्चही करूं नये. येविषयीं प्रमाण पारसी बोस्तानचे ग्रंथांतीलः—

अगर हरचे याबी तो वर कफनिही ।
कफत वक्ते हाजत बमानद तिही ॥

याचा अर्थः—"जितकी प्राप्ति होईल तितके लोकांचे हातावर ठेवशील, तर तुजला मागण्याचें कारण दुसऱ्यापाशीं पडेल, तेव्हां तुझा हात रिकामाच राहील." यांतील भाव हा आहे कीं, जितकी जमा तितका खर्च करीत गेल्यास, आपल्यास नड पडेल ते समयीं कोणीच कांहीं देणार नाहीं. जमेची प्राप्ति कशी व खर्चाची व्यवस्था कशी ठेवावी, येविषयीं पारसी प्रमाणः—

चो दखलत नीस्त खर्च आहिस्त तरकुन् ।
के मिगोयंद् मल्लाहाँ सरोदे ॥

याचा अर्थः—"जमा जर थोडी, तर त्याहून खर्च फार जपून कर. कारण, नावाडी सांगतात कीं, यांतील भाव हा आहे कीं, जमेहून खर्च कमी करणें तो नावाड्यासारिखा करावा." नावाडी असा बोध करितात कीः—

अगरबारां बकोहस्तां नबारद ।
बसाले दज्ल गारदद् खुष्क रोदे ॥

याचा अर्थः—"पर्वतावर एक वर्ष पर्जन्य न पडेल, तर दजल म्हणोन फारच मोठी नदी आहे— तिचें पात्र इतकें रुंद आहे कीं, पलीकडील मनुष्य दृष्टीस येत नाहीं —एवढी नदी आहे, तत्रापि आटून जाईल. नावाडी पावसाळ्यांत चार महिने नावा वाहणें वगैरे उतारावर जमा मिळवितात, आणि त्या चार महिन्यांचे जमेवर आठ महिने निर्वाह करितात. तशाच मुंग्या उष्ण काळांत चार महिने धान्य जमवून त्या संचयावर पर्जन्यकाळांतील चार महिने व शीत काळांतील चार महिने असा आठ महिने निर्वाह करितात. अशी जमाखर्चाची व्यवस्था ठेवावी."

सेवक लोकांनीं स्वस्थ आपले घरींच अगर हरएक ठिकाणींच बसून राहूं नये. सर्वदा यजमानाचें सेवेंत तत्पर असावें. बोलावणें येईल तेव्हां जाऊं असी

बोलावण्याची मार्गप्रतीक्षा करीत कदापि बसत जाऊं नये. आणि ज्या कामाविसीं जो करार केला असेल, त्या वेळेस तें काम करण्यास चुकूं नये.

सत्यभाषणाचा अभ्यास असावा. यजमानांनीं राजधानीचे कारभारी व कामदार यांसीं फार संगती ठेवून, विचारणा ठेवीत असावी.

तीरंदाजी व बंदूक मारण्याचा अभ्यास स्वतः असावा, व शिपायाकडूनही ठेवीत जावा.

शिकार करीत जावी, परंतु येविषयींचा छंद थोडा ठेवीत जावा. कारण, अल्प लाभार्थ, न जाणों, मोठा घात न व्हावा. यास अन्य ग्रंथांत असें वर्णिलें आहे कीं, 'गोर'—या शब्दाचे तीन अर्थ होतात. त्यांत पहिला अर्थ, पादशाहाचें नांव; व दुसरा अर्थ सांबर; तिसरा अर्थ थडें; असे तीन अर्थ होतात. यावरून असें वर्णिलें आहे कीं, पूर्वीं बहराम गोर ह्मणोन पादशाहा होता. तो मोठ्या राजधानीचा अधिपति असोन, त्यास शिकारीचा फार छंद लागला, आणि तो नित्य सांबराची शिकार करीत असे. एके दिवशीं असें जालें कीं, सांबरांनींच त्या पादशाहास ठार मारिला. नंतर त्याचें प्रेत जमिनींत पुरून त्यावर थडें बांधिलें. तेव्हां कवींनीं असें वर्णिलें कीं, एका गोरास दोघां गोरांनीं मारिला. ह्यांतील भाव हा कीं, एक बहराम गोर ह्मणोन पादषाहा होता, त्याजला गोर ह्मणजे सांबर यानें मारिलें; व त्याचें प्रेत गोर ह्मणजे थडें त्या थड्यानें गिळलें! असो. तात्पर्य, शिकारींत अन्य जनावरांचे प्राण जातात हें पातक, व त्या जनावरांनीं राजास मारिलें ह्मणजे एकाचे घातांत लक्षावधि जीवांचा घात होतो. सबब, थोरांनीं शिकारीचा छंद थोडा ठेवावा.

अंतःकरणास चैन न पडे व करमेनासें जालें, तर एखादे वेळेस शिपाईगिरीचाही अभ्यास करीत जावा.

गल्ला खरेदी करणें तो एकदाच हंगामशीर स्वस्ताईसमयींच करून ठेवीत जावा. चौघडा वाजणें तो असा कीं, अरुणोदयीं ह्मणजे मोठे प्रातःकाळीं, व सायंकाळीं, व मध्यरात्रीं, वाजत असावा. कारण, उत्तर दिवसाचा प्रारंभ मध्यरात्रीपासूनच आहे. सूर्य ज्या समयीं दुसरे राशीस जातो, ते समयीं चौघडा सुरू असावा, व तोफा व बंदुकीचे बार होत जावे. ह्मणजे सूर्य दुसरे राशीस जाला असें सर्वांस समजून, ते समयीं ईश्वराचा स्तव करतील. कारण, ज्या दिवशीं सूर्य दुसरे राशीस जातो, ते दिवशीं मुसलमान लोकांची ईद असते.

# २४. मुलखांतील दंगे व मुलूख वसाहत करण्याचे बाबतींत देशमुख देशपांडे यांची मदत.

तर्फ मुठेखोरें महालची वसाहत देशमुखदेशपांडे करीत असतां असें होत असे कीं, वसाहत करावी व लागलीच दंग्यांमुळें व लुटालुटीमुळें पुन्हां नाहींसी व्हावी, फिरून वसाहत करावी, असें वारंवार होत असे. त्यामुळें जमेदार लोक (देशमुखदेशपांडे) फार त्रासून जात व त्यांस अतिशय मेहनत व खर्च पडत असे, हें खालील पत्रावरून स्पष्ट दिसून येईल. पूर्वी या खोऱ्यावर जंजिरेकर हबशी मोंगल व छत्रपति सातारकर या तिघांचे अम्मल असतव तिघेही जमेदार लोकांपासून खंडणी वगैरे वसूल करीत. त्यामुळें देशमुख देशपांडे फार जिकिरीस आले होते. तथापि ते धीर धरून नेटानें वसाहतीचें वगैरे काम करून वतन संभाळून असत. इ. स. १७१२ चे सुमारास वसाहतीचें काम चालत असतां, जंजिऱ्याचे सिद्दी याकुत यांणीं या खोऱ्यावर स्वारी करून मुलूख लुटला. तेव्हां रयत व देशपांडे परागंदा जाले. त्यांस फिरून येण्याबद्दल आर्जवाचीं पत्रें सरकारांतून रवाना झालीं; तीं वाचण्यासारखीं आहेत. त्यावरून त्या वेळीं देशमुख देशपांडे यांस किती मान व महत्त्व असे तें दिसून येतं:–

[देशपांडेदप्तर.] [ह्यु]

"इजतमाह साबाजी गंभीरराव देशमुख व महादाजी रघुनाथ देशपांडे (उरवडेकर) व समस्त मोकदमानी तर्फ मुठेखोरें ........... सुा सलास आशर मया व आ-लफ. बखर पाठविली मालूम जाली. मुलकाची हकीकतसुद्धां तपसील मालूम जाली. जनाजीराम देशपांडा (कोंढूरकर) परागंदा जाला आहे, तो मुलकांत आलियाबगर मुलकाची वसाहत होत नाहीं ह्मणोन तपसील लिहिलें, मालूम जालें. तर जनाजीराम देशपांडा यास कौल सादर केला आहे. तर त्यास आणावून रयतीस दिलासा देऊन कीर्दमामुरी करणें. ताा छ १९ माहे सफर. (मोर्तबसुद.)"

श्री.

"७ मा। अनाम देशमुख व देशकुळकर्णी (देशपांडे) तर्फ मुठेखोरें यांसी नारो शंकर सचीव सुहुरसन समान अशरैन मया अलफ. तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें, तें प्रविष्ट होऊन लिहिलें वर्तमान विदित जालें. तर्फ मजकुरावरी रोखे होऊन मसाले होतात आणि कुळें धरून नेलीं, हे धास्तीमुळें व धामधुमेकरितां कुळ रयती दिलगीर होऊन घाटाखाले जात आहे; त्यास अभयपत्र पाठविलें ह्मणजे रयती हलीं

लागेल ती आणून वसाहती करूं, ह्मणून तपशील लिहिलें. त्यावरून अभयपत्र महालास सादर केलें असे. तरी तुह्मीं रयतीचा दिलासा करून महालची कीर्द अबादानी होय ते गोष्टी करणें. तुमचे मुद्दे माफीक चालविलें जाईल. जाणिजे छ ६ रजब पा हुजूर. (मोर्तब.)"

श्री.

"अभयपत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजेश्री नारोपंडित सचीव ताहा मोकदमानी व रयानी देहाय तर्फ मुठेखोरें सुहुरसन समान अशरैन-मय्या अल्लफ दिल्हें अभयपत्र ऐसाजेः- तुमचे विषयीं राजेश्री नरहरी आबाजी मजम-दार व देशमुख व देशकुळकर्णी तर्फ मजकूर यांणीं हुजूर विनंतीपत्रें लिहून किल्ले सिंहगडच्या मुक्कामास पाठविलें कीं, सांप्रत धामधुमेचा प्रसंग जाला आहे, गांवगन्नाची रयती तजावजा होऊन डोंगरोडोंगरीं लागली आहे. त्यामध्यें तर्फ मजकुरावरी हुजूरचे रोखें होऊन पाटील व कुणबी किल्ले मजकूरच्या मुक्कामास नेले व आणखी वरचेवरी मसाले होतात. या धास्तीनें कुल गांवगन्नाची रयती घाटाखाले जात आहे. त्यास येविसीं हुजूरून अभयपत्र सादर केलें पाहिजे. ह्मणजे रयतीचा दिलासा करून महालची वसाहती करूं ह्मणून पत्र लिहून पाठविलें, त्यावरून मनास आणून पेस्तरसा-लचे लावणीवरी नजर देऊन हें अभयपत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी तुह्मीं कोणे बाबें शकआंदेशा न धरितां, बेशक होऊन देहायमजकुरीं कीर्दमामुरी करून सुखरूप राहणें. तुह्मांस कोणेविषयीं जाजती जलेल होणार नाहीं. अगर हुजुरून रोखे जास्ती होणार नाहींत. ऐसें खरें समजून परागंदा न होतां कीर्द करणें. अभय असे. जाणिजे. छ ६ रजब परवानगी हुजूर. (मोर्तब.)"

श्री.

"राजमान्य राजश्री नरहरी आबाजी मजमदार तर्फ मोसेखोरे व मुठेखोरें यांसी नारो शंकर सचीव सुा समान अशरैन मय्या अल्लफ. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान विदित जालें. तुह्मीं लिहिलेप्रमाणें अभयपत्रें पाठविलीं आहेत, तरी तुह्मी व दुमहालींचे देशमुख मिळून रयतीचा दिलासा राखोन, गेली रयत आणून संचणी करणें. छ ६ रजब पा हुजूर (मोर्तब)."

श्री.

"अभयपत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजेश्री नारोपंडित सचीव ताहामोकदमानी देहाय तर्फ मुठेखोरें सुा सम्मान अशरैन मय्या अल्लफ, दिल्हे अभयपत्र ऐसाजेः-तांब्राची धामधूम जाली व किरकोळ गांवांस उपसर्ग लागला, या-मुळें रयत परागंदा होऊन गेली आहे ह्मणून पूर्वी विदित जालें. त्यावरून देहाय मज-

कुरास अभयपत्र सादर केलें आहे. तरी कोणेविषयीं शक आंदेशा न धरितां, बेशक होऊन सुखरूप राहणें आणि कीर्दमामुरी करणें. तांब्र या प्रांतें आला होता, तोही नामोहरम होऊन गेला. त्याचाही कसाला पडणार नाहीं, व हुजूरूनही जास्ती जळेल होणार नाहीं. तरी तुह्मीं कोणेविषयीं वसवसा न धरितां, गांवावरी येऊन कीर्दमामुरी करणें. अभय असे. छ १६ रज्जब पा हुजूर (मोर्तब)."

[हीं पत्रें देशमुख देशपांडे यांस पावतांच रामाजी व भिवराव व साबाजी गंभीरराव मारणे देशमुख व जनाजीराम व महादाजी रघुनाथ देशपांडे तर्फ मुठेखोरें यांणीं रयत लोकांचा तपास करून, महालोमहालीं व कोंकणांत व सुपेपरगणा व वाईप्रांत वगैरे ठिकाणी रयत गेली होती त्या ठिकाणीं, जाऊन ते व आणखी लोक जमवून, मुठेखोऱ्यातील गांवांची वसाहत मोठे प्रयत्नानें केली.

त्या वेळीं हल्लींप्रमाणें कुळवार जमाबंदी आकार वसूल न घेतां, प्रत्येक गांवास मलिकंबरी दरानें जी जमाबंदी असेल, तो सर्व कमाल आकार देशमुख देशपांडे यांजपासून भरून घेत असत. त्यामुळें ऐवजाची भरती करण्यास फारच जड जात असे. कारण, वसाहत होणेस फार अडचणी येत. त्यामुळें गांवगन्नाचे जमिनीची लागण हे चांगली होत नसे. असे आणीबाणीचे प्रसंगास धीरानें तोंड देऊन देशमुख देशपांडे आपलीं वतनें संभाळून राहिले, ही लक्षांत येण्यासारखी गोष्ट आहे.]



## २५. तोतया सदाशिवराव भाऊ याचे दंग्यांत मुलखाची दैना व मुठेखोरें महालचे देशपांडे यांचें त्या वेळचें कर्तृत्व.

तोतया सदाशिवराव कन्होजा यास रत्नागिरीचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें होतें. तेथील सुभेदार रामचंद्र नाईक परांजपे यांनीं त्यास कैदेंतून मुक्त करून त्यास वीस हजार फौज मिळवून दिली. त्यामुळें तो कन्होजा ब्राह्मण मुलखास अतिशय उपद्रव देऊं लागला. त्यानें कोंकणांतील सुमारें २० किल्ले घेतले, व शके १६९८ (इ. स. १७७६ सालीं) घाटावर येऊन सिंहगड किल्ला घेऊन, मावळप्रदेशांत मोठा दंगा केला. रयत लोकांचीं घरें व शेतें लुटून, घरें जाळलीं. त्या योगें तर्फ मुठेखोरें[1] महालचे रयत लोकांस राहाण्यास जागा व खाण्यास धान्य बिलकुल राहिलें नाहीं, व जनावरांस वैरणही राहिली नाहीं. त्यामुळें लोक त्रासून खोऱ्यांतील वस्ती-

१ पुण्याचे पश्चिमेस पुण्यापासून ६ कोसांवर मुठेखोरें आहे.

उठवून गांव ओसाड (बेचिराक) करून देशांतरास निघून गेले. हें पाहून त्या वेळचे जमेदार पदमाजी गंभीरराव देशमुख व मोरो व खंडेराव महादेव देशपांडे (उरवडेकर) तर्फे मुठेखोरें यांणीं मुलूख ओसाड पडल्याची हकीकत श्री. पंतसचीव यांस कळवून, लावणी करण्यास कौल मागितला. त्यावरून श्री. पंतसचीव यांणीं पत्र दिलें तें येणेंप्रमाणेः—

[देशपांडेदप्तर.] श्री.

"७ माा अनाम देशमुख व देशपांडे तर्फ मुठेखोरें यांस सदाशिव चिमणाजी सचीव सुाा सबा सबैनमया व अलफः—तुह्मीं अर्जदास्त पाठविली ती पावली. महाल वैरान जाहला आहे, दिवस थोडके उरले, वसाहत जाली पाहिजे ह्मणोन लिहिलें. त्यास तुमचे विषयीं राजश्री बाबूराव दत्तो व राजश्री लक्ष्मण नानाजी यांणींही सविस्तर निवेदन केलें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी बेवसवेसा महालीं येऊन वसाहत करणें. लावणी संचणी करणें. मशारनिल्हे तर्फ मजकूरचा तह करून देतील. त्या प्रमाणें चालविलें जाईल. जास्ती जलेल होणार नाहीं. जाणीजे. छ ३ माहे मोहरम मोर्तब असे."

हें पत्र आल्यावरून वर लिहिलेले देशमुख देशपांडे सुभेदाराकडे जाऊन तहबंदीची यादी दिली, ती खालीं लिहिली आहेः—

श्री.

"यादी मुलूख लुटला गेला त्याचा तह येणेंप्रमाणें कलमें. सुाा सबासबैन मया व आलफ तर्फ मुठेखोरें. कलमें तपसीलः—

साल मजकुरी मुलूख अगदीं लुटला. घरें कोपटें सुद्धां शेतेंभातें रयतेचे गेले. हल्लीं वसाहत रयत आणून करावी लागते. याजकरितां पेस्तरसालापासून रयतेस दुसाला दिवेलावणीचा कौल देऊन दिवाणसारा माफ करावा. कलम १.

महाल सादीलवारी खर्चास ऐनखंडणींत सुभेदार प्रांत मावळे पांचची तक्षीम ऐन ऐवजांत देत होते, परंतु हल्लीं सदरहू चालत नाहीं. आणि माहाल सादिलवारी निराळी रयतेवर बसते. त्यास कृपाळू होऊन, महाल सादिलवारी खर्च ऐनऐवजीं पूर्वीप्रमाणें तह करून देववावा. कलम १.

सनवाहा बाकी मागील मामलेदाराचे कारकीर्दीची गांवगन्ना ओढत आहे. त्यास ते समयींची रयत गेली. हल्लीं तर दंग्यामुळें रयत नादार पडली. याजकरितां कृपाळू होऊन सालोसालची बाकी ओढत आहे ते माफ करावी. कलम १.

मुलखांत कारखाने व सरकारचीं कुरणें आहेत व धणगराचा खराबा गांवगन्नां आहे. त्याचा पैका खंडणींत मजुरा द्यावा. कलम १.

---

१ बिनदिक्कत.

चवलावण सुभेदार प्रांत मावळे यांणीं नवीन कानू बसविली, ते हल्लीं सरकारांत जमा धरून वसूल होतो. येणेंकरून रयतीस भारी पडते. याकरितां सदरहू कानू चवलावणीची दूर करावी. कलम १.

हल्लीं मुलखाची उगवणी मोरोपंती पेशवे यांचे तहाप्रमाणें होते. हल्लीं शिरस्ता रयतेस भारी पडतो. मोरोपंतांनीं तह केला ते समयींची रयत गेली, ते अद्यापि आली नाहीं. हल्लीं १०।२० वर्षे मोरोपंताचे तहाप्रमाणें उगवणी होते. येणेंकरून रयत खराब जाली. मोरोपंतीचे तहास रयत कबूल नाहीं. याजकरितां दुसाला कौल रयतेचा भरल्यावरी मलिकंबरी तहाप्रमाणें उगवणीचा कौल देवावा ह्मणजे रयत आबाद राहील. कलम १.

नजर खासगी गांवावर एकसाला सरकारांत मागितली. ऐसें असतां हल्लीं सालोसाल नजरेची कानू गांवगन्नास बसविलो, ते दूर करावी. कलम १.

मुलकांतील आंबे फणस झाडून महालचे हकीम राखून अगदीं घेऊन जातात. बागवानास देतात. ज्याचें झाड त्यास कांहीं देत नाहीं. ऐसा शिरस्ता पूर्वीपासून महालीं चालत नाहीं. सरकारांत पाठविणें तें चांगलें झाड असेल त्याच्या दहा पांच डाल्या पाठवीत होतों. हल्लीं अगदींच नेतात. याजकरितां आंबे फणस नेतात, ते मना करावे. पूर्वीप्रमाणें चालवावे. कलम १.

कुणब्यास कुणबाव्याकरितां बैल घ्यावे लागतात, व दिवाणसारा द्यावयास अवकाश नाहीं तेव्हा विकावे लागतात. याजकरितां कुणबी बैल घेईल तेव्हां विकल्याची जकात घेतात ते जकात न घ्यावी, ऐसा तह करून देववावा. कलम १.

मुलूख अगदीं शेतें भातें लुटला गेला. चवाटीयाचे गांवीं तर कांहीं राहिलें नाहीं. मावळ खेडीं कडकसरीचीं, त्यांत थोडेबहुत शेतें राहिलीं, ते सावजांनीं व गुरढे यांचे गुरांनीं खराब केला. त्याहीमध्यें दिवाणसारा अजमास ठराव होईल तो ऐवज द्यावयास रयतेस मिळत नाहीं. तो ऐवज तहकूब ठेवावा. पेस्तरसालीं वसूल घ्यावा. कलम १.

येणेंप्रमाणें मखलासी करून कौल देवावा, आण रयतीस तगाई गल्ला व पैका देऊन बसाहत करवावी. आण गल्ला व पैका रयतीस तगाई देतील, तो ऐवज पेस्तरसालीं उसना घ्यावा."

ही यादी घेऊन स्वतः मोरो महादेव देशपांडे सुभेदाराकडे गेले. त्यांणीं तह कबूल करून रयतेस खालीं लिहिलेप्रमाणें अभयपत्र दिलें:—

श्री.

"आजखारी राजश्री बाबूराव दत्तो व राजश्री लक्ष्मण नानाजी ताहामोकदमानी देहाय तर्फ मुठेखोरें सु॥ सबा सबैन मया व अलफ, तर्फ मजकूर गांवगन्ना रयत किल्ले सिंहगडच्या दंग्यामुळें परागंदा जहाली, ह्मणून रयतेचा दिलासा करून लावणी करावयाबद्दल राजश्री मोरो महादेव पाठविले. यांजपासीं जमीदारांनीं तुमचे लावणीचे

चालवणीविषयीं यादी लिहून दिली आहे. ते सरकारांत विदित करून, सरकारआज्ञाप्रमाणें तुमचें चालविलें जाईल. तुह्मीं तर्फमजकुरीं बेवसवसा येऊन कीर्दमहामुरी करणें. कोणे गोष्टीचा आजार लागणार नाहीं. छ २६ माहे मोहरम. तुह्मीं कोणे गोष्टीचा वसवसा न धरणें. यादी सरकारांत जमीदाराची दाखवून त्याप्रमाणें विनंति करून तुमचें चालविलें जाईल. छ मजकूर मोर्तब असे."

ह्या पत्राप्रमाणें देशमुख तर्फ मुठेखोरें व मोरो व खंडेराव महादेव देशपांडे तर्फ मुठेखोरें[1] यांणीं बहुत श्रम करून गावोगांवीहून रयत आणून, त्यांस खाण्यास धान्य व बैल वगैरे घेण्यास ऐवज देऊन, गांवोगावची वसाहत करून मुठेखोरें महालचा मलीकंबरी दस्त सरकारांत भरून देऊं लागले.



## २६. भिक्षा मागण्याबद्दल सनद

पूर्वी वतन मिळविण्यासाठीं लोक जिवापाड खटपट करीत असत. वतन ह्मणजे एक अपूर्व चीज आहे, असा त्यांचा समज होता. अर्थात् देशमुख देशपांडे यांपासून गांवच्या तराळापर्यंत लहानमोठीं वतनें मिळविण्याची लोकांची प्रवृत्ति दिसून येते. ती देशरिवाजाप्रमाणें यथायोग्यच आहे. परंतु भीक मागण्याचें वतन मिळविण्यासाठीं खटपट करून सनद मिळविल्याचेंही उदाहरण जेव्हां दृष्टीस पडतें, तेव्हां लोकांच्या वतनदार ह्मणवून घेण्याच्या अभिरुचीचें कौतुक करावें कीं काय तें समजत नाहीं. पुढील भीक मागण्याची सनद, भोरच्या पंतसचिवांनीं दिलेली आहेः—

श्री.

"छ मा। अनाम देशमुख व देशपांडे महालानिहाय महाल बितपशीलः-

| | | |
|---|---|---|
| तर्फ रोहिडखोरें १ | तर्फ खेडेबारें १ | तर्फ गुंजण मावळ १ |
| तर्फ मोसेखोरें १ | तर्फ कानदखोरें १ | तर्फ कर्यात मावळ १ |
| तर्फ वेळवंडखोरें १ | तर्फ मुठेखोरें १ | तर्फ हिरडस मावळ १ |
| तर्फ शिरवळ १ | — | — |

१ मुठेखोरें गांव १९ आहेत त्यांची नांवें.—१ मोजे उरवडें. २ पिरंगुट. ३ आंबवली. ४ आंबेगांव. ५ मुठें. ६ बहुली. ७ कोळूर. ८ जातेडें. ९ माळेगांव. १० वाजलें. ११ बातोंडें. १२ भोडें. १३ टेमघर. १४ वेगें. १५ लवाडें. १६ वेडें. १७ खरवडें. १८ आंदगांव. १९ कोळवडें.

प्रगणे मावळ यांसः—

सदाशिव चिमणाजी सचीव सुा खमस आर्बैन मयातैन व अलफ. बाबाखान वा फत्तेखान व खानजी वा चांदखान दरवेशी ता कसबे हरणसमावळ तर्फे वेळवंडखोरें यांणीं हुजूर भोर येथील मुकामीं येऊन अर्ज केला जेः—आपले वाडवडील ता प्रांत मजकूर महालोमहालीं आपण जनावरें फिरवून महालोमहालांत दोन पैसे भिकणें मागत आलों. त्यास स्वामींनीं कृपा करून, कृपाळू होऊन महालोमहालचे जमेदारांस आज्ञापत्र सादर झालें पाहिजे. सेवेसीं कैलासवासी नारोपंडित यांनीं सनद दिल्ही आहे ती पाहून सनद द्यावी ह्मणून. यावरून पहिली मनास आणून हें आज्ञापत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी बाबाखान वा फत्तेखान व खानजी वा चांदखान यांचा दाखला पेशजीपासून चालत आला आहे, त्याजप्रमाणें त्यांजकडे भिकणें देणें. दुसरे दरवेशी कोणी येऊन यांसी खटला (कथला?) करील आणि भिकणें मागेल, त्यास न देणें. यांचे यांजकडे भिकणें देत जाणें. जाणीजे. छ २२ रविलाखर. (मोर्तब.)"



## २७. सिद्धाचें भविष्य.



नाना फडणविसांचे कारकीर्दींत प्रयाग क्षेत्रीं कोणी सिद्ध पुरुष आला होता. त्यानें मराठी राज्यासंबंधानें कांहीं भविष्य सांगितलें होतें. त्या संबंधानें पुढील पत्राची नक्कल नानांचे दप्तरांत उपलब्ध झाली आहे. ती वाचून पाहिली असतां त्या वेळींही लोकांचा भविष्यवाद्यांवर बराच भरंवसा होता असें दिसून येतें.

श्री.

"सिद्धाचें बोलणेंः—शके १७१८ चे माघ मासांत श्रीप्रयाग क्षेत्रीं हरबाजी नाईक दि॥ कृष्णाजी नाईक वाकडे हे मकरस्नानास गेले होते, सिद्धही प्रयागास गेले होते. तेथें बोलिले कीं, 'दक्षिणचे राज्यांत दुसरी नवीन मोहोर होईल. यास मुदत महिने ७२॥.' याप्रमाणें बोलिले होते. हें बोलणें नाईक याणीं ऐकिलें. नंतर काशीस आल्यावर आह्मांपाशीं वर्तमान सांगितलें. पुढें ईश्वरी इच्छेनें अशीच गोष्ट झाली. नंतर सिद्धापाशीं प्रत्यक्ष आहे असें ध्यानास आलें. ह्मणोन नाईक यांणीं सिद्धाची सेवा करण्यास लागले. आमचाही हेतु त्यांच्यापाशीं आहे. पुढें आपली स्वारी मेणवलीस गेल्यानंतर श्रीमंत आपासाहेब ह्यांच्या नांवें मोहर जाली. पूर्वी सिद्धाचें बोलणें, श्रीमंत बाजीराव साहेबांचें राज्य होईल, असें होतें, त्यास अंतर दिसोन आलें. आपली स्वारी मेणवलीहून कोंकणांत गेली, त्या समयांत नाना प्रकारचीं वर्तमानें आलीं. बहुत भयाच्याही गोष्टी ऐकिल्या तेव्हां युक्तीचे वाटेनें आह्मींही खेद त्यांसीं केला आहे. परंतु कांहीं गोष्टी पुसणें व त्यांचें उत्तर होणें हें हरबाजी नाईक यांजकडून होत असे. कोंकणांतील खबरा

ऐकोन, संकट जाणोन, पुन्हां विचारावयाचा विचार करून गोष्ट काढली. ते समयीं मी येथें नव्हतों. नारोपंत जोग यांणीं हरबाजी नाईक यांसीं बोलणें केलें 'कीं, यजमानस्वामी राज्यावर आले पाहिजे या अर्थें सिद्धापासीं प्रार्थना करावी.' नंतर नाईक यांणीं प्रार्थना केली. त्यांणीं उत्तर दिल्हें कीं, 'यांत तुह्मांस लाभ काय ? माझे पाठीस कां लागतां ? मी तर फकीर आहें. तुमचें कांहीं कार्य होत असल्यास पक्कें करावें. करारास टळतील ?' असें बोलिले. हें वर्तमान नारोपंतांपासीं सांगितलें. म॥निल्हे यांणीं विचारिलें कीं, 'तुमचें कार्य काय आहे ?' नाईकांनीं उत्तर केलें कीं, 'अलीबहादूर याजकडेस कृष्णाजी नाईक यांचा ऐवज फसला आहे. तो आह्मांस मुद्दलामुद्दल श्रीमंतांनीं द्यावा.' त्यास नारोपंत बोलिले कीं, 'श्रीमंतांसी ही गोष्ट कठीण नाहीं. सिद्धांनीं करार मुदतीचा करून द्यावा. ह्मणजे कार्यान्वयें तुमची गोष्ट श्रीमंतांस लिहून पाठवून तुमचें कार्य करून देऊं.' नंतर सिद्धांनीं आशीर्वाद दिल्हा कीं, 'आषाढ मासापासून नव महिन्यांत श्रीमंत बाजीराव साहेबाचें राज्य आणि स्वामींची दिवाणगिरी होईल. हेंच नव महिन्यांनंतर कार्य जाहल्यास श्रीमंतांनीं कांहीं देऊं नये,' असा करार. त्यास नव महिन्यांचे आंतच कार्य होऊन आपली स्वारी पुण्यास आली. नंतर कराराप्रमाणें नाईकांनीं म॥ निल्हेपाशीं बोलिले कीं, आमचें कार्य करण्याचा विचार करावा. हल्लीं नारोपंत बोलितात कीं, आह्मी लिहून पाठवूं, असें बोलितात. त्यास हें वर्तमान स्वामींस विदित जालें न जालें हें कांहीं कळत नाहीं. मजपाशींही अनंत दीक्षित पेंडसे यांचे समक्ष बोलत होते कीं, काकांनीं लिहून पाठवावें. त्यावरून दीक्षितांपासीं बोलिले कीं, आपण तेथें जातां, तर श्रीमंतांपासीं ही गोष्ट बोलावी. पुढें दीक्षितांचें जाणें जाहालें नाहीं. या कार्यास दिवसगत बहुत जाहाली. यामुळें सिद्धांनीं फिरोन गोष्ट काढली कीं, 'कार्य तों जाहलें, तुमचे कार्याचें काय जाहलें ?' असें पुसतात. त्यावरून हें वर्तमान सेवेसीं श्रुत जाहलें पाहिजे, ह्मणोन लिहिलें. त्याउपरी दुसरा अनुभव श्रावणमासीं यात्रानिमित्य सिद्ध व नाईक श्रीकर्दमेश्वरीं दर्शनास जात होते. त्या समयांत पृथ्वीपति यांचे वजीराचे चिरंजीव श्रीमंत आहेत. ते सिद्धाचे दृष्टीस वाटेनें पडिले. तेव्हां नाईक यांस बोलिले कीं, 'तुह्मी रात्रंदिवस श्रमी असतां. तर यापासीं जाऊन बोला कीं, तुह्मांस पूर्वेचें संस्थान प्राप्त जाल्यास मला काय द्याल, तें लिहून द्या. त्यांणीं लिहून दिल्यास चोवीस महिन्यांनीं कार्य होईल. असा करार तुह्मी लिहून द्या. ईश्वर कार्य करील.' परंतु नाईक यांच्यानें हिंमत जाहली नाहीं. परंतु हल्लीं तशी गोष्ट होण्याविषयीं लखनऊ प्रांतीं संग्रामाचा प्रसंग दिसतो आहे. होईल तो सहजच कळों येईल. पुढें जें आलें तें समजण्यांत आलेंच असेल."

ॐ ॐ ॐ

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] फेब्रुआरी १९१०. [अंक ७ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



## आश्रयदात्यांस सूचना.

इतिहाससंग्रहाचा मार्च इ. स. १९१० चा ८ वा अंक, लौकरच प्रसिद्ध होईल; व एप्रिल आणि मे १९१० चे, अनुक्रमें ९ व १० अंक, मे महिन्याचे अखेरीस प्रसिद्ध करण्यांत येतील. कांहीं कारणांमुळें वरील अंकास थोडा विलंब लागला आहे. त्याबद्दल इतिहाससंग्रहाचे सर्व आश्रयदाते व वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

प्रकाशक.



बाजी प्रभु देशपांडे.

# ४. बाजी महादेव प्रभु देशपांडे.

मराठ्यांच्या रियासतीमध्यें अठराव्या शतकामध्यें जे अनेक शूर प्रभु वीर उदयास आले, त्यांत बाजी महादेव प्रभु देशपांडे यांची गणना आहे. यांचें संक्षिप्त चरित्र येथें सादर करितों.

बाजी प्रभु हे महादाजी रघुनाथ देशपांडे तर्फ मुठेखोरें यांचे चिरंजीव होत. यांचा जन्म चैत्र शुद्ध ९ शके १६५१ रोजीं उरवडें गांवीं झाला. यांच्या मातुश्रीचें नांव यशोदाबाई. यांस मोरोबा ऊर्फ बंधूजी आणि खंडेराव ऊर्फ तात्यासाहेब असे दोन बंधू होते. यांचें शिक्षण त्या काळच्या पद्धतीप्रमाणें उरवडें गांवींच झालें. त्यांचे स्वदस्तुरचीं जीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत, त्यांवरून त्यांचें हस्ताक्षर वळणदार व सुरेख होतें असें दिसतें. यांना बाळपणीं घोड्यावर बसण्याचा अतिशय नाद असून, ते त्या कलेमध्यें, व दांडपट्टा, निशाण मारणें वगैरे त्या वेळच्या युद्धविद्येमध्यें चांगले प्रवीण झाले होते. तात्पर्य, कारकून व शिपाई यांस लागणारे दोन्ही गुण त्यांच्या अंगीं होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

बाजी प्रभु यांनीं आपल्या वयाच्या २० व्या वर्षी, ह्मणजे इ. स. १७४९ च्या सुमारास, बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या हुजूर लष्करांत, प्रथम लहानशी नौकरी पतकरिली. बाळाजी बाजीराव यांनीं बाजी प्रभूंचा तरतरीत व पाणीदार स्वभाव पाहून त्यांस प्रथम दहा स्वारांच्या शिलेदारीची असामी दिली. बाळाजी बाजीराव यांच्या कारकीर्दीचा हा समय ह्मणजे योद्ध्यांच्या शौर्यगुणांचें प्रदर्शन होण्याचा ऐन प्रसंग होता. या वेळीं लढाईचे प्रसंग अनेक उद्भवले असल्यामुळें सर्व शिलेदारांस वारंवार युद्धास जाणें भाग पडे, व त्यांस आपल्या युद्धकलेची पराकाष्ठा करून दाखवावी लागे. जो योद्धा रणभूमीवर शत्रूचें पारिपत्य करून विजयश्री घेऊन परत येई, त्यास श्रीमंत पेशवे सरकाराकडून बहुमान, पोषाख व बढती मिळत असे. याप्रमाणें बाजी प्रभु यांस प्रतिनिधीवरील स्वारीमध्यें प्रथम आपल्या शौर्याची परीक्षा द्यावी लागली. जगजीवनराव प्रतिनिधी व त्यांचे कारभारी यमाजी शिवदेव मुतालिक यांनीं पेशव्यांच्या विरुद्ध राजकारणें चालविल्यामुळें त्यांस पेशव्यांनीं कैद केलें होतें. परंतु त्यांस पेशव्यांनीं इ. स. १७४९ मध्यें बंधमुक्त केलें. तथापि त्यांनीं, पंढरपुरनजीक सांगोला ह्मणून किल्ला आहे, तेथें सैन्य जमवून बंड उभारिलें. तें बंड मोडण्यासाठीं बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं सदाशिवराव भाऊ यांच्या हाताखालीं फौज देऊन त्यांची तिकडे रवानगी केली. त्यांत

त्यांनीं बाजी प्रभु ह्यांस त्यांचे बरोबर पाठविलें. ह्या स्वारीमध्यें सदाशिवराव भाऊ व त्यांच्या हाताखालील तरुण व नवशिके शिलेदार बाजी प्रभु ह्यांनीं चांगला पराक्रम करून प्रतिनिधींचा पराभव केला. ह्या सांगोल्याच्या लढाईमध्यें बाजी प्रभु ह्यांस कांहीं जखमाही झाल्या, परंतु त्यांनीं शौर्याचें काम चांगलें बजाविलें, ह्मणून भाऊसाहेब ह्यांनीं त्यांस २५ स्वारांची शिलेदारी दिली. ही हकीकत इ. स. १७५० मध्यें घडली. येथून बाजी प्रभूंच्या लष्करी नौकरीस प्रारंभ झाला.

इ. स. १७५२ मध्यें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं औरंगाबादेवर मोहीम केली. सलाबतजंग ह्यानें फ्रेंच लोकांचें साह्य घेऊन मराठ्यांच्या फौजेस उपद्रव देऊन त्यांची वाताहत करण्याचा प्रयत्न चालविला. त्यानें मराठ्यांचा मुलूख जाळून लुटून पुण्याकडे स्वारी करण्याचा आव घातला. मराठ्यांचें सैन ४०००० हजार होतें, तथापि सलाबतजंगाच्या फौजेस नतीजा देण्याचें काम कठिण होतें. परंतु मराठ्यांच्या फौजेंतील कित्येक वीर मोठ्या धाडसानें मोंगली फौजेवर तुटून पडले, व त्यांनीं सलाबतजंगास जेरीस आणून त्यास तह करणें भाग पाडिलें. ह्या मोहिमीमध्यें मराठ्यांच्या नवीन होतकरू शिलेदारमंडळींत कोन्हेर त्रिंबक एकबोटे व बाजी प्रभु देशपांडे हे बरेच प्रसिद्धीस आले.

इ. स. १७५३ मध्यें बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं कर्नाटकावर स्वारी केली. ह्या स्वारीमध्यें बाळाजी बाजीराव ह्यांनीं बाजी प्रभु ह्यांस बरोबर घेतलें होतें. त्यांनीं होळीहोनूर येथील वेढ्यामध्यें फार चांगला पराक्रम केला. होळीहोनूर येथील किल्ला चांगला बळकट असून त्यांत शत्रूनें आश्रय केला होता. मराठ्यांनीं तीन दिवस तोफांची मोर्चेबंदी करून त्यावर एकसारखा हल्ला केला, तथापि तो हस्तगत झाला नाहीं. तेव्हां कोन्हेर त्रिंबक एकबोटे, बाजी प्रभु, कृष्णाजी पलांडे, रामजी पवार, वडपतराव, बाबाजी पडवळ आदिकरून अकरा इसमांनीं किल्ल्याचे तटास शिड्या लावून किल्ला हस्तगत करण्याचा प्रयत्न केला. त्यांजवर किल्ल्यांतील लोकांनीं गोळ्यांचा भडिमार चालविला, तथापि ह्या शूर पुरुषांनीं मोठ्या निकरानें लढून किल्ला हस्तगत केला. ह्या युद्धामध्यें कृष्णाजी पलांडे गोळी लागून पतन पावला, व बाजी प्रभूस चार पांच जखमा लागल्या. तथापि, ह्या अकरा लोकांचें विलक्षण शौर्य व अचाट साहस पाहून, बाळाजी बाजीराव पेशवे अतिशय संतुष्ट झाले, व त्यांनीं त्यांस बहुमूल्य पोषाख व मोठमोठीं बक्षिसें दिलीं. ह्याच वेळीं कृष्णाजी पलांडे ह्याच्या पुत्रास मुरवई गांवची पाटीलकी दिली. ह्याप्रमाणें बाजी प्रभु ह्याच्या शौर्याचा लौकिक दिवसेंदिवस वाढत चालला.

इ. स. १७५३ पासून इ. स. १७५८ पर्यंत ज्या घडामोडी झाल्या, त्यांत बाजी प्रभु ह्यांनीं काय काय पराक्रम केले, त्यांची माहिती मिळत नाहीं. तथापि इ. स. १७५८ मध्यें रघुनाथराव दादासाहेब ह्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत जी स्वारी केली व शेख दाऊद सुभेदार ह्यास अटकपार घालवून दिलें, त्या मोहिमीमध्यें बाजी प्रभूचें नांव आढळून येतें. ह्यानंतर इ. स. १७६३ पर्यंतची बाजी प्रभूंच्या हालचालींची माहिती उपलब्ध नाहीं. इ. स. १७६३ मध्यें थोरले माधवराव पेशवे ह्यांनीं निजामावर स्वारी केली, त्यांत बाजी प्रभु ह्यांनीं चांगलें शौर्य गाजविल्याचा मात्र उल्लेख आढळतो.

इ. स. १७६३ सालीं माधवराव बल्लाळ पेशवे व रघुनाथ बाजीराव यांणीं भागानगर (हैदराबाद) चे मोंगलावर स्वारी केली. परंतु मोंगल तिकडे पेशव्यांशीं न लढतां, पुण्यावर चालून आला. पेशव्यांचे लष्करांत बाजी प्रभु हे होतेच. पुण्याहून नारो आप्पाजी मुतालीक यांचें पत्र, पुण्याकडे मोंगल आला, पुण्याचे लोक पळाले, वगैरे मजकुराचें आलें. तेव्हां पेशवे परत फिरोन आषाढ वद्य पक्षीं घाटावर आले. तों मोंगल गंगेपलीकडे गेला. मोंगलाचा दिवाण विठ्ठल सुंदर गंगेचे अलीकडे होता. त्याजवर पेशव्यांनीं, फौजेनिशीं अकरा कोस, पर्जन्यकाळचा पाऊस पडत असतां, चालून येऊन हल्ला केला. इतक्यांत नबाबाचे दारूखान्यास आग लागून तो उडाला. त्या संधीस निळकंठ महादेव ह्यांचे फौजेनें लढाईस प्रथम सुरुवात केली. माधवरावसाहेब घोड्यावर होते. रघुनाथराव दादासाहेब यांजवर, विठ्ठल सुंदर व विनायकदास व इस्मायलखान पठाण यांणीं पांच हजार फौजेनिसीं हल्ला करून, दादासाहेबांच्या फौजेचा मोड केला. दादासाहेब हौद्यासहित पठाणाचे हातीं सांपडले. त्या गर्दींत मोंगली फौजेंतील एका शिपायाचे बंदुकीचा बार सुटून, विठ्ठल सुंदर दिवाण अंबारींत होता, त्यास गोळी लागून तो ठार झाला. विठ्ठल सुंदराचे फौजेंत सात सरदारांच्या सात अंबाऱ्या होत्या. त्या घेण्यास श्रीमंतांनीं महादजी शितोळे यांचे बरोबर बाजी प्रभु व माधवराव नरसिंह प्रभु वगैरे लोक फौज देऊन पाठविले. तेथें मोठें निकराचें घनघोर युद्ध चाललें असतां, विनायकदास मध्येंच शितोळ्यांच्या फौजेची फळी फोडण्याचे हेतूनें, कांहीं फौज घेऊन युद्धामध्यें शिरला. त्याजवर बाजी प्रभूनें मोठ्या जोरानें हल्ला केला. दोघांचें बरेच वेळ युद्ध चाललें. त्यांत नबाबही गंगेपलीकडून तोफांचा मारा करीत होता. तरी बिलकूल न डगमगतां बाजी प्रभूनें मोंगलांची पुष्कळ फौज मारली, व शेवटीं विनायकदासासही ठार केलें. तेव्हां त्याचे लोक युद्ध टाकून पळून गेले. या लढाईत

बाजी प्रभूस दहा जखमा व माधवराव नरसिंह यांस वीस जखमा झाल्या. या लढाईत मोंगलाकडील २२ उमराव अंबाऱ्यांसहित पाडाव झाले. येणेंप्रमाणें मोंगलाचा पराभव होऊन पेशव्यांचा जय झाला. या लढाईत पेशव्यांचे तीस हजार लोक धारातीर्थी पतन पावले व तीन कोसपर्यंत प्रेतें पडलीं होतीं, असें ह्मणतात. परंतु अखेर जयप्राप्ति झाल्यामुळें पेशव्यांस फार आनंद होऊन, त्यांनीं माधवराव नरसिंह व बाजी महादेव प्रभु देशपांडे वगैरे ज्या ज्या लोकांनी पराक्रम केले, त्यांना पोषाख व अलंकार वगैरे बक्षीस देऊन मोठा सत्कार केला, व महादजी शितोळे यांस रामबाण हत्ती आणि सातारा जिल्ह्यांतील मांजरी गांव इनाम दिला, व २०० स्वारांची सरदारी दिली. ह्याच वेळीं बाजी महादेव देशपांडे यांस १२५ स्वारांचे जुमलेदार केलें.

इ. स. १७७१ सालीं रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण बिनीवाले यांजबरोबर पेशव्यांनी फौज देऊन त्यांस हिंदुस्थानांत स्वारीस पाठविलें. त्यांजबरोबर बाजी प्रभूंसही पाठविलें. त्याबद्दल नालबंदीचा (अगाऊ पगाराचा) जो ऐवज बाजी प्रभूंस मिळाला, त्यापैकी २००० रुपयांच्या वराता बाजी प्रभूनें परखर्चास आपले बंधु मोरो महादेव यांजकडे पाठविल्या. ह्या त्यास सन १७७३ सालीं माघमासीं पावल्या असून, मोरोबांनी त्या आपले खाजगी जमाखर्चाचे यादीस जमा केल्याचा दाखला सांपडतो. या स्वारीत बाजी प्रभूनें काय पराक्रम केला, त्याविषयीं साद्यंत माहिती अद्यापि मिळाली नाही.

इ. स. १७७५ सालीं नागपूरचे मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांजवर औरंगाबादेचे मोंगलांनीं स्वारी केली. तेव्हां भोंसल्यांनी पेशव्यांकडे मदत मागितल्यावरून पेशव्यांनीं बाबूराव हरी गुप्ते आंबेगांवकर व बाजी महादेव देशपांडे उरवडेकर व बळवंतराव जनार्दन पन्हाळकर वगैरे सरदार फौजेनिशीं पाठविले. ते मुधोजी भोंसले यांचे फौजेंत एदलाबाद येथें सामील झाले. तेथें त्यांनीं मोंगलांशीं युद्ध करून मोंगली फौजेचा फार नाश केला. त्यांच्या रसदा व दाणावैरण लुटली. मोंगलाचा पराभव केला. तेव्हां मोगल जेरीस येऊन, त्यानें मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांच्याशीं तह केला व तो औरंगाबादेस परत गेला. नंतर भोंसले नागपुरास गेले. ह्या स्वारींतील कांहीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत.

पुण्यास नारायणरावसाहेब पेशवे ह्यांचा वध होऊन पुढें बारभाई झाली. सवाई माधवरावसाहेब अज्ञान असतां गादीनशीन झाले व रघुनाथ बाजीराव ऊर्फ दादासाहेब हे पळून गुजराथेंत गेले. त्यांचे मागें हरिपंत फडके फौजेसहित संग्राम करण्यास गेले. सर्व सत्ता कारभाऱ्यांचे हातीं आली. परंतु कारभाऱ्यांचाही एक

विचार झाला नाहीं. एकमेकांत अंतस्थ वैमनस्य असल्यामुळें केव्हां कोणावर काय प्रसंग गुजरेल याचा नेम नव्हता. अशा प्रकारचा पेशव्यांचे दरबारांत बखेडा माजला. तेव्हां आतां पेशवाईत नौकरी करणें चांगलें नाहीं, असें बाजी प्रभु यांनीं मनांत आणून, त्यांनीं बडोद्याचे गोविंदराव गायकवाड ह्यांचे लष्करांत नौकरी करण्याचा विचार योजिला. गोविंदराव गायकवाड यांचा व त्यांचा चांगला परिचय होता. सबब त्यांनीं बडोद्यास बापुजी शंकर ऊर्फ तात्यासाहेब ह्यांचे बरोबर गोविंदराव गायकवाड यांस निरोप पाठवून आपला हेतु कळविला. बापुजी शंकर हे आषाढ अखेरीस बडोद्यास पोहोंचले, व त्यांनीं गोविंदराव यांस बाजी प्रभूचा मनोदय कळविला. गायकवाड यांस निरोप पोंचतांच, लागलीच त्यांनीं, बाजी महादेव देशपांडे यांस, 'पर्जन्यकाळ संपतांच तुह्मीं येण्याचें करावें. सरंजाम पाहून त्यासारखा बंदोबस्त केला जाईल' ह्मणोन इ. स. १७७५ सालीं छ १ जमादिलाखर (श्रावण शुद्ध ३)चें पत्र पाठविलें. त्याप्रमाणें बाजी प्रभु हे इ. स. १७७५ सालचे आश्विन मासीं आपले सरंजामासहित बडोद्यास गोविंदराव गायकवाड यांच्याकडे जाऊन पोहोंचले.

दमाजी गायकवाड इ. स. १७६८ सालीं कैलासवासी झाल्यावर, गोविंदराव गायकवाड यांस गादी मिळवून देण्याचे कामीं, बाजी प्रभु ह्यांनीं पूर्वी अतिशय श्रम व अनेक कारस्थानें निरिच्छ बुद्धीनें व स्नेहभावानें केलीं होतीं. ते कृतउपकार स्मरून व बाजी प्रभूसारखे शूर मुत्सद्दी व पराक्रमी पुरुष आपलें पदरीं अवश्य असावे असें मनांत आणून, गोविंदराव गायकवाड ह्यांनीं त्यांचे योग्यतेनुरूप त्यांस आपले फौजेंत सरदारी दिली, आणि खालीं लिहिलेप्रमाणें बारमाही नेमणूक करून दिलीः—

| | |
|---|---|
| ३५०० | जातीस नेमणूक |
| ५५०० | एकांडे असामी १० |
| ५०० | जाबत्याबद्दल |
| ६०० | पालखीबद्दल |
| ६०० | शागीर्दपेशा |
| १२० | ढाल्या |
| ३०० | मालदार |
| ११९२० | |

पैकीं वजा मोहोरबद्दा दर सदे रुपये १५॥ प्रमाणें रुपये १७२३॥-॥ वजा जातां, बाकी रुपये ९३९६।=॥ नेमणूक करून दिले. येणेंप्रमाणें बाजी प्रभूंस गोविंदराव गायकवाड ह्यांच्या राज्यांत नेमणूक मिळाली व ते गायकवाडी नौकर झाले.

इ. स. १७९३ सालीं मानाजी गायकवाड मृत्यु पावले व गोविंदराव पुण्यास गेले. ही संधि पाहून गोविंदरावाचा पुत्र कान्होजी यानें गादी बळकावली. तेव्हां गोविंदरावांनीं बाजी महादेव वगैरे सरदार बरोबर घेऊन, बडोदें शहरास वेढा देऊन कान्होजीस धरून कैद केलें. परंतु कान्होजी स्त्रीवेष धारण करुन कैदेंतून पळाला व त्यास कडीचा मल्हारराव येऊन मिळाला. ह्या दोघांनीं साठ हजार फौज जमविली. त्या फौजेवर गोविंदरावाचे लोकांनीं तीन वेळ हल्ले केले. परंतु तिन्ही वेळां त्यांस मागें हटावें लागलें. तेव्हां बाजी देशपांडे यांनीं सेनापतीस कळविलें की, एवढ्या मोठ्या फौजेशीं युद्ध करून आपले लोकांचा खराबा करण्यापेक्षां कान्होजी व मल्हारराव ह्यांचे मध्यें फूट पाडून इष्टकार्य साधणें अधिक फायदेशीर आहे. त्याप्रमाणें त्यांनीं कांहीं युक्ति योजून, मल्हारराव व कान्होजी यांचे मध्यें भेद उत्पन्न केला. तेणेंकरून दोघांचा मोठा तंटा होऊन कान्होजी सातपुड्याकडे पळाला, व आपला निभाव लागत नाहीं हें पाहून मल्हाररावास गोविंदरावांशीं तह करणें भाग पडलें. ह्या तहामध्यें जीं कलमें मल्हाररावानें मान्य केलीं, त्यांत त्यानें कडी प्रांत आपल्याकडे ठेवून, गोविंदरावास दरसाल साडेपांच लक्ष रुपये व एक लक्ष पंधरा हजार रुपये पेषकशीबद्दल देत जावें, व बडोद्यास-येऊन त्यांस मुजरा करीत जावा, असें ठरलें. अशा रीतीनें बाजी प्रभूंनीं आपली मुत्सद्दीगिरी चालवून मोठ्या युक्तीनें लढाईचा प्रसंग टाळिला. त्या योगानें गोविंदराव गायकवाडांस त्यांचेविषयीं अधिक आदरबुद्धि उत्पन्न झाली. अशा रीतीनें गायकवाडी राज्यामध्येंही आपलें शहाणपण व बुद्धिचातुर्य व्यक्त करून, बाजी प्रभु ह्यांनीं बडोदें येथें चांगला लौकिक मिळविला. ह्यानंतर ते लवकरच ह्मणजे इ. स. १७९९ च्या सुमारास मृत्यु पावले.

बाजी महादेव प्रभु ह्यांचे संबंधानें जी माहिती उपलब्ध झाली आहे, तिच्यावरून अनेक मोहिमांमध्यें व स्वाऱ्यांमध्यें त्यांनी शिलेदारी पेशानें चांगली कामगिरी केल्याचें दिसून येतें. हिंदुस्थान व कर्नाटक येथील स्वाऱ्यांमध्यें ते पेशव्यांच्या फौजेबरोबर जातीनिशीं हजर असून, त्यांनीं त्या त्या स्वाऱ्यांमध्यें चांगले पराक्रम केले असावेत, ह्यांत शंका नाहीं. ह्या संबंधाचीं अस्सल पत्रें पुष्कळ गहाळ झालीं आहेत. तथापि कित्येक जमाखर्चाचे कागद अद्यापि अस्तित्वांत आहेत. असो. बाजी प्रभूसारख्या शिलेदारांचीं चरित्रेंही मराठ्यांच्या इतिहासाची पूर्तता करण्यास अवश्य आहेत.



## २०. काशी क्षेत्रांतील कर्मनाशीचा पूल.

श्रीकाशी क्षेत्राबद्दल प्रत्येक हिंदूच्या मनांत आदरबुद्धि वसत असून, तेथें कांहीं पुण्यकर्म करावें ह्मणजे आपणास मोक्षप्राप्ति होईल, असा भक्तिभाव पेशवाईमध्यें फार होता. नाना फडणविसांच्या मनांतही त्याप्रमाणें काशी येथें कांहीं पुण्यकृत्य करावें असें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं कर्मनाशी नदीवर पूल बांधण्याची कल्पना आपले मनांत आणिली. त्याप्रमाणें त्यांनीं काशी येथील आपले कारकून भास्करपंत कुंटे ह्यांना पुलाचें काम सुरू करण्याबद्दल लिहिलें. त्यांनीं पुलाचा पाया खणण्यास सुरुवात केली. परंतु नदीमध्यें वाळूचा भराव व पाण्याचा जोर विशेष होता, त्यामुळें पायास घर लागेना. तेव्हां त्यांनीं पूर्वींच्या समजुतीप्रमाणें मांत्रिक बोलावून अनुष्ठानास सुरुवात केली; व कुमारस्वामी कोमटी यांचे विद्यमानें, पुलाचे पायांतील पाणी व वाळू बंद व्हावी ह्याकरितां, शके १७१८ सालीं अधिक भाद्रपद वद्य ८ पासून अनुष्ठानास प्रारंभ केला. ही गोष्ट नाना फडणविसांस कळली. तेव्हां त्यांनीं पुलाचे कामास मांत्रिकी अनुष्ठानाचा कांहीं उपयोग होणार नाहीं, असें भास्करपंत कुंट्यांस कळवून, अनुष्ठान बंद करविलें; आणि बेकरनामक एका युरोपियन कारीगरास (इंजीनियर ह्यास) २०,००० रुपये देऊं करून, पुलाचा पाया खोदण्यास प्रारंभ केला. त्यानें प्रथमतः पुलाचे पायांतील पाणी काढावयास दोन बंब तयार करविले, परंतु ते लागू झाले नाहींत. तेव्हां त्यानें कलकत्त्याहून कळीचे बंब आणवून काम पुरें केलें.

ह्या गोष्टीवरून इंग्रजी यंत्रकलेची मदत मराठी राज्यामध्यें कशी घेऊं लागले होते, त्याची कल्पना येते.



## २१. पेशव्यांच्या वाड्यांतील स्वार.

श्री.

हजिरी सरकारच्या वाड्यांत व वाड्याबाहेर स्वार चौकीस आहेत त्यांची. सुरुसन इसने समानीन मया व अलफ छ २७ सवाल. विद्यमान बाबुराव बल्लाळ कारकून शिलेदार, गुजारतजानेखान भालदार.

२८३. दिवसासः—

६३ वाड्याबाहेर स्वार छबिन्यास प्रातःकालपासून संध्याकाळपर्यंतः—

१९ निसबत महिमांजी शिंदे, चाकरीस शिंदराम शिंदे.

९ निसबत जानोजी भोइटे, चाकरीस खेत्रोजी भोइटे.
३० मिर्जा फाजल अलीबेग, चाकरीस खासा.
५ निसबत जिवाजी आटोळे, चाकरीस खासा नाहीं.
६३

तपशील
५३ दिल्लीदरवाजापुढें.
१० गणेश दरवाजापुढें.
६३

२२० वाड्यांत पायउतारा लोकः—
१०१ प्रातःकालपासून दोनप्रहरपर्यंत
२१ चाफेखणांत
१ सोनजी मोरे.
१ विरोजी बारावकर, चाकरीस हणमंतराव बारावकर.
५ हैबतराव ढमढेरे, चाकरीस रघोजी ढमढेरे.
१ गणोजी शिर्के, चाकरीस अमरसिंग शिर्के.
१२ शिंदे पोर्गे.
१ सुजानसिंग सदर बारगीर दिंमत हुजरात.
२१

८४ दिवाणखान्यांतः—
२७ हजारी कारंजापुढील दिवाणखान्यांत पागा दिंमत जनार्दन राम, चाकरीस निळो गणेश.
२८ खासा दिवाणखान्याखालीं पागा दिंमत मानसिंग खलाटे चाकरीस सटवाजी राजपुरे सरनोबत.
२८ तिरंदाजीच्या दिवाणखान्यांत.
५ दिंमत पागा हुजूर.
१४ दिंमत पागा हुजूर निसबत गोविंदराव सदाशिव चाकरीस खासा.
९ निसबत खास चौकी.
१ इमामखान
१ खंडोजी रणदिवे
१ शंकराजी रणदिवे.

१ धर्माजी शिंदे.
१ हैबतराव गाइकवाड.
१ महादजी पोवार.
१ मालजी उघडे.
१ संताजी यादव.
१ मोराजी जगताप.

९

२८

१ कृष्णाजी ताटे शिलेदार.

८४

१०५

११५ दोन प्रहरपासून संध्याकाळपर्यंत.
२७ चाफेखणांत.
१५ संताजी मोहिते, चाकरीस खासा.
७ सदर बारगीर दिंमत हुजरात.
१ धारराव निंबाळकर.
१ आबाजी भोंसले.
१ बयाजी भोंसले.
१ सुभानजी माने.
१ हणगोजी शिर्के.
१ खंडोजी चवाण.
१ पिराजी पिसाळ.

७

५ शिंदे पोर्गे.

२७

८८ दिवाणखान्यांत.
२९ हजारी कारंजापुढील दिवाणखान्यांत पागा दिंमत जनार्दन राम; चाकरीस खासा.
२९ खाशा दिवाणखान्याखालीं पागा दिंमत मानसिंग खलाटे चाकरीस खासा.[१]

३० तिरंदाजीच्या दिवाणखान्यांत.
६ दिंमत पागा हुजूर.
१३ दिंमत पागा हुजूर निसबत गोविंदराव सदाशिव, चाकरीस चिंतामणराव सदाशिव.
८ निसबत खास चौकी.
*१ कुसाजी निंबाळकर.*
१ पिराजी उघडे.
१ बाबुराव यादव.
१ मळोजी सुळे.
१ महादजी चोपडे.
१ मानाजी शिंदे.
१ भवानजी चोपडे.
१ इमाम भालदार.
८
१ खंडेराव बिन मर्दनसिंग सदरबारगीर दिंमत हुजरात.
२ मिर्जा मोंगल व सैद फैजुलाबेग निरंदाज.
३०
८८
११५
२२०
२८३
२३९ रात्रीस.
१२५ वाड्याबाहेर स्वार, छबिन्या दिंमत तोफखाना निसबत माधवराव कृष्ण वगैरे पानसी, चाकरीस बाळाजी विठ्ठल कारकून दिंमत मजकूर.
११० दिल्लीदरवाजापुढें.
१५ गणेशदरवाजापुढें.
१२५
११४ वाड्यांत पायउतारा.
३२ चापेखान्यांत.

१५ वाड्यांतील मुलें दिंमत हुजरात, चाकरीस उदाजी भोंसले.
१० शिंदे पोरें.
७ सदर बारगीर दिंमत हुजरात, चाकरीस धारराव निंबाळकर वगैरे.

३२

८२ दिवाणखान्यांत.

२८ हजारी कारंजापुढील दिवाणखान्यांत पागा दिंमत जनार्दन राम, चाकरीस वेंकाजी कृष्ण कारकून.

२९ खाशा दिवाणखान्याखालीं पागा दिंमत मानसिंग खलाटे, चाकरीस खासा.

२४ तिरंदाजीच्या दिवाणखान्यांत.

५ दिंमत पागा हुजूर.

१२ दिंमत पागा हुजूर निसबत गोविंदराव सदाशिव. चाकरीस खासा नाहीं.

७ निसबत खास.

१ जोगोजी शेडगे.
१ महादजी सुळे.
१ मकाजी ढमढेरे, चाकरीस विठोजी ढमढेरे.
१ शेटिबा रणदिवे.
१ रघुनाथ चोपडे.
१ जानोजी जगथाप.
१ गंगाजी चोपडे.

७

२४

१ यशवंतराव मचाले खाशाजवळ.

८२

११४

२३९

५२२

# २२. झांशीचे सुभेदार रघुनाथराव हरी.

झांशी हें बुंदेलखंडांतील मराठ्यांचें एक प्रसिद्ध संस्थान. हें थोरल्या बाजीराव साहेब पेशव्यांच्या कारकीर्दीत छत्रसाल राजाकडून मराठ्यांस मिळालें. येथें पेशव्यांचे सुभेदार असत. इ. स. १७७० मध्यें थोरले माधवरावसाहेब पेशवे ह्यांनीं रघुनाथराव हरी नेवाळकर नामक एका शूर व मुत्सद्दी गृहस्थास झांशीची सुभेदारी दिली. तेव्हांपासून झांशी संस्थान त्यांच्याच वंशजांकडे इ. स. १८५३ पर्यंत चालत होतें. इ. स. १८५३ मध्यें येथील शेवटचा राजा गंगाधरराव हा निपुत्रिक मरण पावला. सबब, लार्ड डलहौसी साहेबांच्या कारकीर्दीत, तें ब्रिटिश राज्यांत सामील करण्यांत आलें. त्यामुळें इ. स. १८५७ च्या बंडांत तेथील राणी लक्ष्मीबाई ही सामील झाली व तिनें आपलें नांव इतिहासांत प्रसिद्ध केलें. ह्या संस्थानचे मूळपुरुष रघुनाथराव हरी हे होत. ह्यांचें उपनांव नेवाळकर. हे जातीचे कऱ्हाडे ब्राह्मण. ह्यांनीं झांशी येथें सुमारें २० वर्षें सुभेदारी केली. इ. स. १७७० पासून इ. स. १७९४ पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत जीं राजकारणें घडून आलीं, त्यांमध्यें ह्या पुरुषानें आपलें बुद्धिकौशल्य व बाहुबल व्यक्त करून, बुंदेलखंडांत मराठ्यांचें वर्चस्व चांगल्या रीतीनें प्रस्थापिलें. ह्यांचीं कित्येक अस्सल पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं आहेत. तीं सवडीनुसार प्रसिद्ध होतीलच. तथापि; ह्या मुत्सद्द्यासंबंधानें विलियम हंटर नामक एका युरोपियन गृहस्थानें, त्यांची भेट घेऊन, त्याबद्दलची जी हकीकत लिहिली आहे, ती फार वाचण्यासारखी आहे. त्यावरून रघुनाथराव हरीसारखे मराठे मुत्सद्दी पाश्चात्य लोकांच्या संसर्गानें युरोपियन शास्त्रें व कला ह्यांचें ज्ञान संपादन करण्याची विशेष लालसा बाळगूं लागले होते, व त्यांच्यावर त्या ज्ञानाचा चांगलाच संस्कार झाला होता, असें दिसून येतें. रघुनाथराव हरी यांच्या भेटीचें वर्णन विलियम हंटर ह्यांनीं इ. स. १७९६ मध्यें लिहिलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

"On our arrival we were agreeably surprised to receive from the Subahdar, a present of cabbages, lettrice, celery, and other productions of an European Garden. In the evening the Subahdar paid us a visit: he appeared to be about sixty years of age, rather below the middle stature; his countenance bespoke intelligence, and his manners were pleasing. Having had occasion, on account of some bodily infirmity, to repair to the English Station of Cawnpur for medical assistance, he had contracted a relish for European manners and customs. He had discernment enough to perceive our superiority in arts and sciences over his countrymen; and

possessing a spirit of liberal inquiry, and an exemption from national prejudices, which is very uncommon among the natives of Hindustan, he was very desirous of gaining a knowledge of our improvements Next morning when we returned his visit, he received us in an upper room of the castle, which, instead of Hidustani Muslum, was furnished with chairs and tables in the European manner He showed us several English books, among which was the second edition of the Encyclopedia Britannica. Of this he had got all the plates neatly copied by artists of his own. To get at the stores of science which these volumes contain, he had, even at that advanced period of life, formed the project of studying the English language He expressed great anxiety to procure a teacher, or any book that could facilitate his pursuit, and was highly gratified by Lieutenant M'Pherson's presenting him with a copy of Gilchrist's Dictionary He entertained us with several tunes on a hand organ which he had got at Cawnpur, and exhibited an electrical machine constructed by a man of his own service. The cylinder was a common table shade, with this he charged a vial, and gave pretty smart shocks to the no small astonishment of those who were the subjects of his experiments, and of the spectators As the weather was very dry, the operations succeeded remarkably well. He even proposed sensible queries on the nature of the caustic fluid, and the parts of the phial on which the accumulation took place, as whether in the glass, or the coating &c, which showed that he did not look on the experiments with an eye of mere childish curiosity, which is amused with novelty, but had a desire to investigate the cause of the phenomena. I am sorry to add, that this man being, about two years ago, seized with some complaint which he considered as incurable, repaired to Benares, and there drowned himself in the Ganges

रघुनाथराव हरी ह्यांनीं इ. स. १७९४ मध्यें श्रीकाशी येथें भागीरथीमध्यें जलसमाधि घेतली.



## २३. बाजी प्रभूचें चित्र.

ह्या अंकांत प्रारंभीं दिलेलें बाजी प्रभूचें चित्र बडोद्याचे प्रो० माणिकराव ह्यांनीं आमच्याकडे पाठविलें आहे. त्या संबंधानें त्यांनीं पुढील माहिती दिली आहे:—

"अफझुलखानाचा वध झाल्यानंतर, आपल्या बापाचा सूड घेण्यासाठीं फाजलखान, शिद्दी जोहारासमवेत दहा बारा हजार मोंगल सैन्य बरोबर घेऊन पन्हाळगडावर श्रीशिवाजी महाराज असतांना, गडाला वेढा घालून बसला. बरेच महिने महाराजांनीं शत्रूला दाद दिली नाहीं; व पुढें निभाव होणें कठीण जाणून, काळोख्या रात्रीं त्यांनीं व बाजी प्रभु देशपांडे यांनीं, मोंगलावर

अचानक छापा घालून, त्यांची फळी फोडून, रांगण्याची वाट धरली. रांगण्याच्या नजीक तीन कोसांवरील खिंडींत जाऊन पोंहचतात, तोंच फाजलखान सगळें लष्कर बरोबर घेऊन पाठोपाठ माग काढित चालून आला आहे, असें त्यांस समजलें. शत्रूचें अफाट लष्कर, किल्ला तीन कोस दूर, व प्रसंग तर महाराजांचे जिवावर येऊन गुदरलेला, हें पाहून बाजींनीं प्रभुचरणीं विनंति करून, शत्रूस खिंड उलटून पुढें येऊं देत नाहीं, असा पण लावून अत्यंत आग्रहानें, शिवबांना अर्धें लष्कर देऊन किल्ल्यावर पाठविलें, व आपण बाकीचे मावळे झाडींत लपवून ठेवून, निवडक पन्नास साठ लोकांनिशीं, खिंडीचे तोंडावर उभा राहिला. शत्रु पुढें आला कीं यानें हाणून पाडलाच, असा प्रकार दोन प्रहरांपर्यंत चालला होता. तेवढ्या अवकाशांत त्या मर्दाला पांच पंचवीस जखमा लागल्या असतांहि तिळप्राय न डगमगतां, शिवरायांच्या क्षेमकुशलतेचा पांच तोफांचा इषारा किल्ल्यावरून येईपावेतों, त्यानें शत्रूंस एक रेंसभर सुद्धां पुढें पाऊल ठेऊं दिलें नाहीं. स्वामिरक्षणार्थ धारातीर्थीं देह ठेवणाऱ्या या वीराचा फोटो आह्मांस महाडचे कै० आबाजी परशुराम कर्णिक ऊर्फ महाडकर यांचे घरीं एका अत्यंत जुन्या बखरींत जीर्णावस्थेंत सांपडला."

हें चित्र अर्थात् एका जुन्या बखरींतील रेखाचित्रावरून काढिलें आहे, हें उघड आहे. बाजी प्रभूसारख्या शूर वीराचें चित्र प्रसिद्ध होणें अतिशय इष्ट आहे. ह्मणून त्याची प्रतिकृति 'इतिहाससंग्रहा'च्या वाचकांस सादर केली आहे. बाजी प्रभूचा सविस्तर व वीररसप्रचुर वृत्तांत योग्य प्रसंगीं प्रसिद्ध होईल. बाजी प्रभूच्या युद्धाचें साल पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

"शके १५८२ शार्वरी नाम संवत्सरे आषाढ वद्य पक्ष."



## २४. संताजी घोरपड्याच्या खुनाबद्दल ह्मसवडकर माने ह्यांच्या बखरीमधील उल्लेख.

[जानेवारी इ. स. १९१० चे 'इतिहाससंग्रहा'चे अंकांत संताजी घोरपड्याच्या खुनाबद्दल जी माहिती प्रसिद्ध केली आहे, तीं काफीखान ह्या मुसलमान इतिहासकाराच्या आधारानें लिहिलेली आहे. ह्मसवडकर माने ह्यांच्या बखरीमध्यें ह्याच मुद्यासंबंधानें वेगळी हकीकत दिलेली आहे. ती आमचे मित्र व बडोद्याचे मानकरी रा. सा. लक्ष्मणराव माने ह्यांनीं आमच्याकडे प्रसिद्धीकरितां पाठविली आहे. ती येणेंप्रमाणेंः—]

## म्हसवडकर मान्यांच्या बखरींतील उतारा.

"नागोजींस स्त्रिया तीन. त्यांत वडील सौ० राधाबाई घाटे. यांच्या बापाचें पारिपत्य संताजी घोरपडे यांनीं केलें होतें. संताजी हे शिवाजीराजापाशीं वीस हजार फौजेनिशीं होते. त्यांनीं शिवाजीस* विनंति केली कीं, मी विजापुरचें तक्त व राज्य साध्य करितों. त्याप्रमाणें त्यांस हुकूम झाला. तेव्हां संताजी हे पंचवीस हजार फौजेनिशीं निघून मौजे माणकी दहीगांव मुक्कामास आले.

हें वर्तमान सौ० राधाबाई माने यांस कळतांच, त्यांचें मनांत आलें कीं, आपल्या बापाचें उसनें घ्यावें. असें मनांत आणून म्हसवडचे एक हजार लोक जमा करून त्यांस सांगितलें कीं, कोणत्याही रीतीनें संताजीचें शिर कापून हातास येईल, असें केलें पाहिजे.

सदरप्रमाणें बाईचे सांगण्यावरून लोक घाटतोंडीं बसले. घोरपड्याबरोबर माणकीकर, निंबाळकर वगैरे मिळून फौज चाळीस हजार होती! ती त्यानें पुढें लावून दिली, व आपण पांच चारशें लोकांनिशीं तिसरे प्रहरीं पालखींत बसून निघाले. कांहीं लोक घाट चढत होते, कोणी खालीं पोहोंचले होते, व कित्येक पालखीबरोबर होते. तों सौ० राधाबाईकडील लोकांनीं पालखी येतांच गर्दी केली. तेव्हां कित्येक तेथेंच दबकून उभे राहिले, कित्येक पळाले, व कित्येक झटापटींत मेले. त्या गर्दींत बाईकडील 'सुभाना' स्वार यानें संताजीचे पोटावर तलवारीचा तीक्ष्ण वार केला. तोंच आप्पाजी काळीयानें गोळी लाविली, तिजमुळें संताजी ठार झाले. तेव्हां भोई पालखी टाकून पळाले. काळीयानें घोरपड्याचें शिर कापून घेतलें. या घाटास 'घोरपडेघाट' असें अद्याप म्हणतात.

पुढें सौ० राधाबाईनें घोरपड्याचें शिर आणवून माहेरीं बंधूकडे पाठविलें; व निरोप पाठविला कीं, मीं आपल्या बापाचें उसनें घेतलें."



## २५. कृष्णराव खटावकर.

हा सातारा प्रांतांतील एक नामांकित शूर पुरुष होता. ह्याचें घराणें फार पुरातन असून, ह्याच्या पूर्वजास मुसलमानी अमदानीमध्यें खटावच्या ठाणेदारीचा हुद्दा मिळाला होता. मूळ पुरुष नारोपंत. ह्यांस औरंगजेब बादशाहानें इ.स.१६८८ मध्यें कसबे खटाव येथील ठाणेदार नेमिलें. त्यांनीं दोन वर्षे तें काम केलें. नंतर त्यांचे चिरंजीव रामचंद्र नारोजी ह्यांनीं ८ वर्षें ठाणेदारीचें काम केलें. ते खटावास ठाणेदार असतां भोसरगांवचे माळावर त्यांची व निंबाळकर ह्यांची लढाई झाली.

* संताजी घोरपड्याचा वध झाला, त्या वेळीं शिवाजी महाराज मृत्यु पावले होते व राजाराम महाराजांची कारकीर्द चालू होती. द. सं. कर्ते.

त्या लढाईत ते मरण पावले. पुढें त्यांचे नातू कृष्णराव भगवंत ह्यांस बादशाहानें इ.स.१६९८ मध्यें कार्तिक वद्य ९ शनिवारीं वजिरीचीं वस्त्रें, मोर्चेल, माहीमरातब, शिक्केकट्यार, साहेबनौबद, वगैरे बहुमान देऊन 'राजे' हा किताब दिला. हे खटाव येथील ठाणेदारीच्या अधिकारावर असतांना, नारोजी घोरपडे व पिराजी घाटगे हे फौज घेऊन तासगांवाकडून मसुरेस आले. तेथील मोंगलाकडून ठाणेदार यासीनखान कराडीं होता. तो शाहू महाराज ह्यांस मिळून व त्यांची फौज कुमकेस घेऊन लढावयास आला. त्या लढाईत कृष्णराव भगवंत हे हत्तीवर बसून लढत असतां गोळी लागून मरण पावले. त्यांस चिरंजीव तीन होते. त्यांपैकीं वडील नारायणराव ह्यांस शाहू महाराजांनीं खटावची ठाणेदारी व गांव इनाम करून दिलें. इनामाची सनद राजशक ५५ (इ. स. १७२८–२९) ची आहे.

कृष्णराव खटावकर हा फार संस्कृतज्ञ व विद्वान् पुरुष होता. ह्यानें धर्मकृत्येंही बरींच केलीं आहेत. मौजे जेजुरी तालुके पुरंदर येथें ह्यानें मल्हारीचें देवालय व दक्षिण बाजूच्या ओवऱ्या व घाट बांधिला. ह्याचे वंशज अद्यापि खटाव येथील इनामाचा उपभोग घेत आहेत. त्यांस 'खटावचे महाराज' अशी बहुमानाची संज्ञा अद्यापि चालू आहे.

## २५. जनीजनार्दन स्वामींच्या वंशजाचें नानांस पत्र.

जनीजनार्दन स्वामी हा प्रसिद्ध जनार्दन स्वामींचा शिष्य. हा जातीचा वाजसनी ब्राह्मण असून ह्याचें मूळगांव बीड हें होय. ह्याची समाधि मोंगलाईत भूम येथें आहे. ह्याचे वंशज पुढें दीन स्थितीप्रत पोहोंचले. त्यांपैकीं कोणी पुरुषानें नाना फडणविसांस पुढील कविताबद्ध पत्र पाठविलें. तें वाचून नानांस करुणा आली व त्यांनीं ह्या सत्पुरुषाच्या वंशजास बेलबागेमध्यें कांहीं नेमणूक करून दिली. तेथें मार्तंडबावानामक एक पुरुष श्रीविष्णूपुढें कथाकीर्तन व गायन करीत असत; ते ह्याचे वंशज होत.

**श्रीगजानन प्रसन्न.**

**"श्रीमंत विष्णुमूर्ती । कल्पद्रुमतुल्य कीर्ति ॥**
**वांछित यथा तथाप्रति । निश्चित देती सर्वदा ॥ १ ॥**
**श्री जनीजनार्दनवंश । जाणूनि करावा पोष्य ॥**
**कुटुंब बहु मनुष्य । ययाचा तोष स्वानंदें ॥ २ ॥**
**धर्मार्थ पुत्रलग्नें । सिद्धान्नें जीव वा प्राण ॥**
**वस्त्रेंही जीर्ण जीर्णें । संरक्षण यथाविधि ॥ ३ ॥**
**पुत्रवत् करितां पालन । वंशीं होय पुत्ररत्न ।**
**सत्य सत्य नारायण । वदे वचन त्रिवाचा ॥ ४ ॥**



श्री० छत्रपति संभाजी महाराज.

# भाग ५ वा.

## शहाजी राजाची कारकीर्द.

### ( इ. स. १६८४-१७११. )

तंजावर येथील मराठ्यांच्या राजघराण्याचे संस्थापक व्यंकोजी* राजे हे इ. स. १६८४ मध्यें मृत्यु पावल्यानंतर, त्यांचे वडील पुत्र शहाजी राजे हे तंजावरच्या गादीवर बसले. ह्या राजाची कारकीर्द सुमारें २७ वर्षे झाली. त्यानें वारा वाहील तशी पाठ देऊन आपली गादी संभाळली. व्यंकोजी राजे मृत्यु पावल्यानंतर कर्नाटक प्रांतामध्यें दोन मोठ्या राजक्रांत्या घडून आल्या. सर्व हिंदुस्थानावर मोंगली साम्राज्य संस्थापित करूं इच्छिणारा औरंगजेब बादशाहा दक्षिण प्रांतीं येऊन, त्यानें इ. स. १६८६ सालीं विजापुरचें व इ. स. १६८७ सालीं गोवळकोंड्याचें राज्य बुडवून, कर्नाटक व दक्षिण हिंदुस्थान पादाक्रांत करण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता. इ. स. १६८६ सालीं विजापुरचें राज्य रसातळास गेल्यानंतर, विजापुरकराचे बाह्यात्कारें तरी मांडलिक ह्मणविणार, दक्षिण हिंदुस्थानांतील नायक राजे, पाळेगार व इतर जमीनदार आपोआप स्वतंत्र झाले. त्या वेळीं तंजावरचा मराठा राजा शहाजी हाही स्वतंत्र होऊन, आपणा स्वतःस राजा ह्मणवूं लागला. परंतु दिल्लीपति औरंगजेब बादशाहानें कर्नाटक प्रांतावर आपलें स्वामित्व व दरारा बसविण्यासाठीं, तिकडेही कासीमखाननामक मुसलमान सुभेदार पाठवून, इ. स. १६८७ पासून कर्नाटकांत आपली सत्ता प्रस्थापित करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें तंजावरच्या शहाजी राजास आपल्या वडिलार्जित जहागिरीस मुकावें लागलें.

---

* व्यंकोजी राजा व्यवहारचतुर असावा असें दिसतें. त्यानें आपल्या मरणापूर्वी आपल्या मुलांची फार चांगली व्यवस्था केली होती. त्यानें वडील मुलगा शहाजी यास तंजावरचें राज्य दिलें होतें. दुसरा मुलगा सरफोजी यास कुंभकोनम्‌जवळ साकोली ह्मणून एक महाल आहे, तो दिला होता; व तिसरा मुलगा तुकोजी यास तंजावरचे दक्षिणेस महादेवपट्टणम् ह्मणून गांव आहे तो त्यास दिला होता. तात्पर्य, तिन्ही मुलांनीं आपल्या पश्चात् भांडूं नये हा त्याचा मुख्य हेतु होता.

इ. स. १६८० मध्यें शिवाजी महाराज मृत्यु पावल्यानंतर, संभाजी राजे मराठ्यांच्या गादीचे अधिपति झाले. त्यांच्या कारकीर्दीमध्यें राज्याचा बंदोबस्त पूर्वीप्रमाणें राहिला नाहीं. त्यामुळें मराठ्यांचे दूरदूरचे प्रांत निरनिराळे सत्ताधारी राजे घेण्याची इच्छा करूं लागले. कर्नाटकामध्यें मोंगल सैन्यानें आपलें स्वामित्व स्थापन करण्याचा जोराचा प्रयत्न चालविला. त्यांचा सेनापति कासीमखान हा, बंगलूर वगैरे मराठ्यांच्या ताब्यांतील जहागिरीचा मुलूख घेण्याच्या उद्देशानें, त्यावर स्वारी करून आला. ह्या वेळीं शिवाजीचा जांवई व परम विश्वासू सेनापति हरजी राजे महाडीक हा जिंजी येथें सुभेदारीवर होता. त्यानें बंगलूरचा किल्ला मराठ्यांच्या ताब्यांतून मोंगलाच्या ताब्यांत जाणें इष्ट नाहीं असें पाहून तिकडे सैन्य पाठविलें. ह्मैसूरचा राजा चिक्कदेवराज ह्यानें बंगलूरच्या जहागिरीचा खरा मालक जो तंजावरचा राजा ह्याजकडे संधान लावून, तो प्रांत ३ लक्ष रुपयांस विकत घेण्याबद्दल बोलणें चालविलें. त्या वेळीं तंजावरचा राजा *शहाजी ह्यानें व्यापारी दृष्टि लढवून, ह्मैसूरच्या राजाकडून तीन लक्ष रुपये घेऊन त्यास बंगलूरचा किल्ला व जहागीर विकत दिली. ह्या एकाच उदाहरणावरून तंजावरच्या शहाजीराजास ह्या वेळीं बलवत्तर प्रतिस्पर्धी निर्माण झाले होते, व त्यास त्यांच्यांशीं टक्कर देणें अशक्य झालें होतें, हें स्पष्ट दिसून येतें. ह्मैसूरचा राजा चिक्कदेवराज ह्यानें औरंगजेबाचा सेनापति कासीमखान ह्याच्याशीं सख्य करून मोठ्या युक्तीनें बंगलूर प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. औरंगजेब बादशाहास मराठ्यांची कर्नाटकांतील सत्ता समूळ नष्ट करण्याची इच्छा होतीच; तेव्हां त्यानें कांहीं काळपर्यंत ह्मैसूरच्या राजास त्रास न देतां, त्याशीं दोस्ती बाळगून फक्त मराठ्यांच्या ताब्यांतील मुलुखावरच आपली मोहीम चालू ठेविली.

ह्याच समयास शहाजी राजास तंजावरची राजसत्ता सुरक्षित ठेवण्यासाठीं त्रिचनापल्ली येथील नायकराजा व अर्काटचा नवाब आणि रामनादचा मरवार राजा ह्यांच्या बरोबर वारंवार लढाया कराव्या लागल्या. पट्टुकोट्टाई येथील किल्ल्यामध्यें इ. स. १६८६-८७ सालचा एक शिलालेख सांपडला आहे, त्यावरून शहाजी राजाचा कारभारी श्रीवीणाजी पंडितार ह्यानें पंबनार नदीपर्यंत सर्व प्रांत जिंकून तंजावरच्या अंमलाखालीं आणिला होता, असें दिसून येतें. परंतु इ. स. १६९१ पासून शहाजी

* ह्मैसूरचे इतिहासकार विल्कस् ह्यांनीं, तंजावरचा राजा व्यंकोजी ह्यानें इ. स. १६८७ मध्यें बंगलूर प्रांत चिक्कदेवराज ह्यांस तीन लाख रुपयांस विकला असें लिहिलें आहे. परंतु ह्या वेळीं तंजावरच्या गादीवर व्यंकोजी राजा नसून त्याचा पुत्र शहाजी हा होता.

राजास, जिंजी येथील मराठ्यांच्या सैन्यास वेढा देण्यासाठीं आलेल्या मोंगल सैन्यापासून, आपला प्रांत रक्षण करितां करितां पुरेवाट झाली. त्यामुळें त्यास पांच सहा वर्षें बिलकूल स्वस्थता मिळाली नाहीं.

इ. स. १६९० मध्यें औरंगजेब बादशाहानें संभाजी राजाचा वध केल्यानंतर, सर्व मराठे मुत्सद्द्यांनीं, मोठ्या शहाणपणानें, मराठ्यांची गादी रक्षण करण्याकरितां राजाराम महाराज ह्यांस कर्नाटकांतील जिंजी किल्ल्यावर पाठविण्याची युक्ति योजिली. जिंजी ऊर्फ चंदीचा किल्ला फार बळकट असून, तो शिवाजी महाराजांनीं मोठ्या दक्षतेनें व बंदोबस्तानें आपल्या ताब्यांत ठेविला होता. त्या किल्ल्याच्या सुभेदारीवर त्यांनीं आपला जांवई हरजीराजे महाडीक ह्याची खुद्द योजना केली होती, हें वर सांगितलेंच आहे. हरजी राजे हा मोठा मुत्सद्दी व तरवारबहाद्दर पुरुष होता. त्यानें जिंजीचा बंदोबस्त उत्तम प्रकारें ठेऊन, ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं राजाराम महाराजांस जें साह्य केलें, त्याचें वर्णन करावें तेवढें थोडें आहे. जिंजीच्या किल्ल्यावर असा कडेकोट बंदोबस्त होता, ह्मणूनच राजाराम महाराजांस तेथें पांच वर्षेंपर्यंत मोंगलांशीं टक्कर देऊन राहतां आलें. ह्या पांच वर्षांच्या अवधी- मध्यें औरंगजेबानें झुल्फिकारखाननामक आपला नामांकित योद्धा जिंजीच्या मोहिमीवर पाठवून, मराठ्यांना पादाक्रांत करण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला होता. त्याप्रमाणें झुल्फिकारखानानें कर्नाटक प्रांतांत ठिकठिकाणीं आपलें सैन्य पाठवून, मराठ्यांच्या मुख्य मुख्य जागा आपल्या ताब्यांत घेण्याचा चांगला यत्न केला. तंजावरचा शहाजी राजा हाही भोंसल्यांच्या कुळांतील असून, तो राजारामाचा चुलत बंधू असल्यामुळें, तो मराठ्यांचा पक्षपाती व साह्यकारी असणें अगदीं साहजिक आहे. तेव्हां झुल्फिकारखानानें जिंजी पादाक्रांत करण्यासाठीं तंजावरावर प्रथम स्वारी केली, व तेथून जिंजीस शह दिला. तंजावरावरील ह्या झुल्फिकारखानाच्या स्वारीची साद्यंत हकीकत उपलब्ध होत नाहीं. इ. स. १६९१ मध्यें झुल्फिकारखानानें तंजावरावर स्वारी करून तेथील राजाकडून खंडणी घेतली, एवढाच उल्लेख इंग्रजी ग्रंथांतून आढळतो. तथापि, शहाजी राजानें जिंजी येथील मराठ्यांस साह्य केलें असावें हें स्पष्ट आहे. झुल्फिकारखानानें तंजावर येथें आपले सरदार पाठवून, तेथील राजांकडून जिंजीच्या मराठ्यांस बिलकूल मदत मिळूं नये

ह्मणून इ. स. १६९६ सालीं पुनः प्रयत्न केला.* ह्या स्वारीस तंजावरच्या इतिहासांत 'मुल्लाची स्वारी' असें ह्मटलें आहे. झुल्फिकारखानाच्या सैन्याबरोबर लढाई करण्याचें सामर्थ्य शहाजी राजास नव्हतें, ह्मणून त्यानें मोंगलांशीं सख्य करण्याचें मान्य करून, झुल्फिकारखानास एक यादी लिहून दिली. ही यादी अत्यंत महत्वाची असल्यामुळें तिचा सारांश येथें सादर करितोंः–

"महान् थोर व बलवान् नवाब झुल्फिकारखान ह्यांनीं तंजावर घेण्याचा विचार केला असल्यामुळें, मी तंजावरचा जमीनदार शहाजी, असा करार करितों कीं, पूर्वीप्रमाणें मी आपलें वर्तन न ठेवितां तें सुधारीन, व इतःपर रामराजाशीं कसलाही संबंध ठेवणार नाहीं, व त्यास साह्य करणार नाहीं. महावैभवशाली व परम बलाढ्य जी बादशाही सत्ता तिजपुढें विनम्र होऊन, तिची इमानेंइतबारें सेवाचाकरी करीन. तसें करण्यांत माझें कल्याण आहे हें जाणून, मी आपला आज्ञाधारक व मांडलिक आहें असें मान्य करितों; व आपणास दरसाल ३० लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल करितों. त्याप्रमाणें मी सांप्रत नक्त व जवाहीर व हत्ती मिळून २० लक्ष रुपयांचा ऐवज आपल्या हवालीं करितों, व बाकी १० लक्ष रुपये राहतील, त्यांची फेड पुढील वर्षीं करण्याची हमी घेतों. जिंजीवर स्वारी करण्यासाठीं मीं एक हजार स्वार व चार हजार फौज देण्याचें कबूल केलें होतें. त्या ऐवजीं मी पालमकोट्टा, सितोनर (?) आणि तंक हे तीन किल्ले व त्या सभोंवतालचा प्रांत देतों; आणि रामराजाकडून घेतलेल्या कलमानरगुडी, शिमुलती........ इत्यादि जागा, मी नवाबास खंडणीदाखल देण्याचें मान्य करितों. बादशाही तख्ताचा मी चाकर झालों आहें, त्या अर्थीं माझ्या नांवें बादशाही फर्मान येऊन मला 'राजा' ही पदवी व तंजावरची जमीनदारी देण्यांत येईल अशी आशा आहे. नवीन काबीज केलेल्या प्रांताच्या संरक्षणार्थ जें सैन्य ठेवण्यांत आलें

* झुल्फिकारखानानें तंजावरावर केव्हां स्वारी केली, तें नक्की समजत नाहीं. परंतु तंजावरच्या स्वारीमध्ये तो विजयी होऊन आल्यानंतर त्यानें आपलें लग्न करण्याचा विचार केला. त्या वेळी मद्रास (फोर्ट सेंट जॉर्ज) येथील इंग्रजांनीं त्यास नजर पाठविण्याचें ठरविलें, असा उल्लेख आढळतो. त्यावरून तंजावरच्या स्वारीचा अजमास करितां येतोः—

"*Thursday, 2nd September*, 1697:—The Nabob Zulfikar Khan being lately returned from his victory over Tanjore to Wandewash, and since his return taken old Ginjee, and being about marrying,—it is thought a convenient time to send him a present &c. &c."

ह्यावरून ता. २ सप्तंबर इ. स. १६९७ च्या पूर्वी तंजावरची स्वारी झाली असावी हें निश्चित आहे.

आहे, त्यास हरएक प्रकारें मी मदत करीन. त्याचप्रमाणें मी सार्वभौम सरकाराशीं आज्ञाधारकपणानें वागेन, व सेवकपणाच्या कर्तव्यांत अंतर करणार नाहीं. ता. ७ सवाल. राज्याभिषेक वर्ष ३८. "*

ह्याप्रमाणें शहाजी राजानें नवाब झुल्फिकारखान ह्यास विनंतिपत्र पाठविलें, व तो आपणांस बादशाही ताबेदार ह्मणवून घेण्यास तयार झाला. तेव्हां झुल्फिकारखानानें त्यास एक कौलनामा (अभयपत्र) पाठवून, त्यास त्याच्या गत अपराधाबद्दल क्षमा करून बादशाही फर्मान आणवून देण्याचें मान्य केलें.† हा

---

* ह्या सनदेचें इंग्रजी भाषांतर उपलब्ध झालें आहे, तें येणेंप्रमाणें:—

"It having pleased the most high and mighty Zulphukar cawn, Nabob, to intend taking Tanjore from me, Sahougee, zemindar thereof,—I do hereby promise and engage to act differently from my former conduct and to have no connection with, and give no assistance to, Ram Rage, but faithfully and humbly to pay submission to the Imperial Court of his high Majesty, which is like Solomon's in glory and magnificence; and being convinced that remaining his faithful subject, must contribute to my present and future welfare and advantage, I therefore submit myself to his orders, and promise to serve him as his vassal; and I have agreed to pay him a tribute of thirty lacks of rupees annually. I will now pay twenty lacks in ready money, jewels and elephants, and I will be answerable for ten lacks in the next year; instead of furnishing the said Nabob, in his expedition against Gingee, with a thousand horse and four thousand sepoys from my troops (as was intended), I will deliver him of three forts, *viz.* Pollamcottah, Cittoners, and Tank with their districts; and also Culmanargoody, Sheemulty, Tuttegoodynar, Imrapoor, Elvansore, Haulcoorchy and Pandalum, *etc.* which I took from Ram Rage; all which I give the said Nabob as a tribute. I hope as a servant of the court, to receive the gracious Phermaun in my name, through the means of the said Nabob, giving to me the title of Rajah, and zamindary of Tanjore. I promise that I will by every means support a connection with the garrisons, which are placed in the new-conquered countries; and I will not, in any respect, be guilty of disobedience or deviate from the path of subjection.—Given this 7th of Shavaul, in the 38th year of his Majesty's reign."

† ह्या कौलनाम्याचें इंग्रजी भाषांतर उपलब्ध झालें आहे. तें वाचनीय आहे सबब येथें दाखल करितों:—

"Cowlnama from Nabob Zulphukar cawn Bahadur, Nabob of the Carnatic, to Sahougee, the son of Ekoji, Naig or zamindar of Tanjore.

I have received your obligation in writing, containing assurances of your humiliation, submission, penitence, and dejection, and of your avoiding

कौलनामा फारशी भाषेच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें अलंकारांनीं परिपूर्ण असून, त्यांत आत्मगौरव विशेष भरलेलें आहे. ह्यावरून शहाजी राजास इ. स. १६९६ मध्यें सार्वभौम सत्तेचें मांडलिकत्व स्वीकारावें लागलें, हें उघड आहे.

शहाजी व झुल्फिकारखान ह्यांच्या मधील करारनाम्याचा जो उल्लेख वर केला आहे, त्या संबंधानें आँके डु पेरान ह्या फ्रेंच ग्रंथकारानें निराळी हकीकत दिली आहे. त्याचें मत असें आहे कीं, "झुल्फिकारखानानें शहाजीकडून १० किल्ले घेतले, ही गोष्ट खरी आहे. परंतु शहाजीनें जी सैन्याची मदत देण्याचें अभिवचन दिलें होतें, तें त्यानें मान्य केलें नाहीं. जिंजीच्या किल्ल्यावरील मराठ्यांचें सैन्य व तंजावरचें मराठी सैन्य एक झालें, तर उलट अनिष्ट परिणाम होईल, अशी त्यास भीति होती. त्याचप्रमाणें शहाजीनें बादशाहास खंडणी वगैरे देण्याचा जो करार केला होता, तो सर्व वरकांतीं होता. तो वंशपरंपरा मुळींच चालला नाहीं." परंतु त्या वेळच्या राजकारणांच्या बिकट स्वरूपावरून शहाजीस

---

your former untoward conduct, and not assisting Ramah, begging pardon for your past faults, and engaging to become a faithful subject of the Empire; and also engaging to pay an annual tribute of thirty lack of rupees, twenty lack you will pay now, with jewels and elephants, and ten the next year; and in the room of furnishing me with a force, you will deliver up to me the forts of Pollamcottah, Cittoners, and Tank, with their districts; and also Cantenan-aegoody, Sheamulty, Tutlegodynar, Imrapoor, Elvanapoor, Haulcooret, and Pandalum, &c., which you took from Ram Raje, and further, begging to have the gracious Phirmaun, pardoning your faults, and giving you the title of Ragah, and the zamindari of Tanjore.—Though your faults, from the beginning to this time, do not merit forgiveness, and by the blessing of God, the reduction of Tanjore was as good as accomplished, yet as the Imperial Court is replete with mercy and forgiveness, and the servants thereof are ever disposed to pardon offences, considering your humiliation and submissive entreaties, I have agreed to your proposal, on condition of your discharging the stipulated tribute, and not by any means assisting the rebellious Ramah.—I have sworn by the king, who is the shadow of the most High (for whose safety may thousands give their lives) and having marked this paper with the palm of my hand, have sent it you, as an assurance that you may, in peace of mind and in confidence, discharge your tribute, deliver up the forts and districts, avoid any connection with the rebel, and not act in any manner whatsoever, contrary to orders; that we may write to the presence of the king, and obtain for you his gracious Phirmaun, granting you forgiveness of your faults, and giviug you the title of Rajah, and the zemindari of Tanjore;—by which yon will be honoured and exalted!"

आपलें राज्यरक्षण करण्याकरितां मोंगलांशीं, निदान वरकांतीं तरी, तह करणें भाग पडलें, ही गोष्ट निर्विवाद आहे.*

जिंजीची मोहीम संपल्यानंतर इ. स. १६९७ सालीं झुल्फिकारखान कर्नाटक प्रांताचा सुभेदार झाला. त्याच्या नंतर इ. स. १६९९ त दाऊदखान हा सुभेदार झाला. त्याच्याशीं शहाजीनें युद्धाचे प्रसंग फारसे आणिले नाहींत. इ. स. १६९९ मध्यें शहाजीनें ट्रांकिबार येथें ४०००० लोकांनिशीं वेढा घातला होता, अशी माहिती मिळते. ह्यापेक्षां शहाजीच्या राजकारणांची किंवा युद्धप्रसंगाची अधिक माहिती मिळत नाहीं.

शहाजी राजाची कारकीर्द प्रजेच्या दृष्टीनें सुखावह झाली. त्याच्याजवळ व्यंकोजीच्या वेळचे शहाणे मुत्सद्दी होते, त्यांनीं राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालविला. त्याचप्रमाणें त्याची आई दीपाबाई हिचें त्यास उत्कृष्ट साह्य झालें. दीपाबाई ही मोठी राजकारणकुशल व शहाणी बाई होती, हें मागें सांगितलेंच आहे. शहाजी स्वतः गुणज्ञ व रसिक राजा होता. त्यानें आपल्या राजवाड्यामध्यें संगीत व नृत्यशाळा स्थापन केल्या होत्या. तो कवींचा आश्रयदाता होता. त्याचप्रमाणें त्यानें पुष्कळ ख्रिश्चन मुलें आपल्या राजवाड्यांत ठेवून, त्यास संगीतज्ञान शिकविण्याची सोय केली होती. त्याच्या संबंधानें त्या वेळचे ख्रिस्तपंथाचे फादर

* जिंजीच्या वेढ्याचे वेळी तंजावरच्या राजास आपलें राज्य राखण्यासाठी मोंगलांशीं खरोखर तह करणें भाग पडलें व त्याला राजारामाचा पक्ष सोडावा लागला, असें मानण्यास कांहीं पुरावा सांपडतो. परंतु अस्सल कागदपत्रांच्या अभावीं ह्या मुद्याचा पूर्ण विचार करणें थोडें कठीण आहे. कर्नल मांकेंझी ह्यांच्या ऐतिहासिक संग्रहामध्यें (Historical Collection) रामचंद्र नीलकंठ आमात्य ह्यांनी राजाराम व प्रल्हाद निराजी ह्यांस लिहिलेल्या कांहीं पत्रांच्या नकलांचीं भाषांतरें उपलब्ध झालीं आहेत. त्यांमध्यें तंजावरच्या राजानें मोंगलांशीं तह करून त्यांचा पक्ष स्वीकारिला होता, असा स्पष्ट उल्लेख आढळतो. त्यांतील पुढील उतारा वाचण्यासारखा आहे:—

"The provisions have been wasted that were in the fort and the supplies of provisions that come day and night from Tanjore by the wood of *Vatavalam* having been stopped and the Tanjore Chief having entered into service of the Mussulmans and settled a tribute with them, came to aid the Moguls. The Maharaja attending to the words of Goolāms or slaves, who highly enraged against the Chief, whom we both sent against Tanjore, for which the Commander-in-Chief was much grieved seeing that his assiduity and labour was in vain and that if the kingdom is lost by attending to the words of the Goolams, he will incur infamy and disgrace."

लोक ह्यांनीं अनुकूल उद्गार काढिले आहेत. त्यावरून तो सर्वप्रिय होता, असें दिसून येतें.

तंजावरचे इतिहासकार मि० हिके हे लिहितातः—"शहाजी राजानें राजवाड्याची पुष्कळ सुधारणा केली; नवीन दरबारमहाल बांधिला; किल्ल्याचे चारी दरवाजांजवळ चार धर्मशाळा बांधिल्या. गरीब लोकांकरितां अन्नछत्रें व दवाखाने बांधिले; आणि हैदराबाद व अरबस्थान वगैरे लांब लांब ठिकाणांहून वैद्य व हकीम आणविले. त्यानें दिवाणी व फौजदारी कामासाठीं स्वतंत्र अदालती स्थापन केल्या." ह्यावरून त्याची कारकीर्द सर्व प्रजेस सुखदायक अशी झाली असली पाहिजे, हें उघड आहे.

शहाजी राजा हा ता. २७ सप्तंबर इ. स. १७११ रोजीं मृत्यु पावला. त्याच्या मृत्यूबद्दल तंजावरच्या शिलालेखामध्यें, "शहाजी राजे, चांगल्या नीतीनें बहुत दिवस राज्यभार करून, शके १६३५ नंदनसंवत्सरीं परम पदास पावले," असा उल्लेख आहे. त्यास पुत्रसंतति नसल्यामुळें त्याच्या पश्चात् त्याचा कनिष्ठ बंधु सरफोजी हा तंजावरच्या गादीचा अधिपति झाला. शहाजी राजाच्या पत्नीचें नांव चिमाबाई असें होतें. त्यास परिगृहीत स्त्रियाही उदंड होत्या. एकंदरींत तंजावरचें राज्य शहाजीनें आपल्या बापाप्रमाणें चांगल्या रीतीनें चालविलें व लौकिक मिळविला. कर्नल फुलर्टन ह्यांनीं शहाजीच्या कारकीर्दीमध्यें राज्याचा वसूल व्यंकोजीच्या कारकीर्दीइतकाच होता, असा उल्लेख केला आहे. त्यावरून मुसलमानांच्या स्वाऱ्या झाल्या तरी तंजावरची सांपत्तिक स्थिति शहाजीनें कमी होऊं दिली नाहीं, असें मानणें भाग आहे. ही गोष्ट त्याच्या कारकीर्दीस फार भूषणावह होय असें कोण ह्मणणार नाहीं?



# लेखांक २३.

पैवस्ती चंद्र १२ जमादिलाखर **श्री.** ता० १८ फेब्रुवारी इ. स. १७८९.
तिमा ममानीन बराबर कामीदजोडी.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः—आह्मी चंद्र १७ जमादिलावलीं मथुरेस पोंहचलों. तेच दिवशीं राजश्री पाटिलबावांचे गुरुभाऊ देशींहून आले. यांचे भेटीस पाटिलबावा गेले होते. मग आह्मी आपले डेऱ्यास येऊन दाखल जालों. दुसरे दिवशीं चंद्र १८ रोजीं पाटिलबावा आमचे डेऱ्यास आले. भेटी जाल्यानंतर ते आपले डेऱ्यास गेल्यावर, गंगाजी आव्हाड बोलत होता कीं, पाटिलबावांचें ह्मणणें असें आहे जे, "तुह्मीं येथें राहावें. तुह्मांबरोबर दाहा हजार स्वार व चार पलटणें ठेवितों, आणि खर्चावेचाची सोय करून देतों. किल्ले मुलूख तमाम तुमचे हवालीं करतों. तुह्मी न राहिल्यास मुलूख आह्मी फिरंग्याचे स्वाधीन करूं. अथवा आमचे मनास वाटेल त्याचे हवालीं करूं, आणि देशास जाऊं. आह्मांस देशास जाणें अगत्य, याकरितां आह्मी राहात नाहीं. तुह्मी राहिल्यास तुमचा बंदोबस्त मजकडेस, व सरकारचा अपराध मी आपले पदरीं घेईन. तुह्मी येविसींची काळजी करूं नये." याप्रमाणें गंगाजीचें बोलणें पडलें, व राजश्री धारराव शिंदे आले होते, त्यांचेंही बोलणें याच अन्वयें कीं, तुह्मी हें कबूल करीत नसिलां, तर शिबंदी कैशास चढवितां? आमचें मनास वाटेल तसें करून घेऊं. कारभाऱ्याचा अहसान कशास पाहिजे? याप्रमाणें बोलणें आहे. पाटिलबावाही रुबरू हेंच बोलतील. त्यास याचा जाब आह्मीं दिल्हा आहे कीं, तुह्मी मातबर सरदार, तुमची जरब या प्रांतांत, तुह्मांजवळ पोक्त सरंजाम, आणि कोट्यानूकोटीचा मुलूख सरंजाम तुह्मांस असतां, हिंदुस्थानी यांणीं तुह्मांस जख दिल्ही. आह्मी तों गैरमाहित, आणि आह्मांजवळ सरंजाम किती? श्रीमंतांकडून सरंजाम यावा, पैका यावा, त्यास तिकडील वोढ आपले ध्यानांतच आहे. असें असतां आमची निभावणी कशी होईल? तेव्हां त्यांणीं उत्तर केलें, हल्लीं कोण्हीच राहिला नाहीं. इस्माल्या वगैरे खुळें आहेत. त्यांचा बंदोबस्त सहजांत करून देऊं, ह्मणाले. परंतु त्यांचे निरोप आह्मांस आले आणि आह्मीं उत्तर दिल्हें असें नाहीं. तेही सहजांत बोलले व आह्मीही सहजांतच बोललों. तेव्हां ते ह्मणूं लागले कीं, हा निरोप आह्मी पाटिलबावांस पोहोंचवितों. त्यास आह्मीं उत्तर केलें कीं, आह्मी मुहूर्त पाहून, मग जें बोलणें तें तुह्मांसीं बोलूं. त्यास आह्मांस मुख्य आपण. आपण

सांगितील ती वर्तणूक करावयाची. मग आह्मांस पाटिलबावा रागें भरले तरी चिंता नाहीं. याकरितां या पत्राचें उत्तर, पत्र वाचितांच लेहून रवाना जालें पाहिजे. पाटिलबावा आह्मांस ह्मणणार आहेत कीं, तुह्मी नाकरते ह्मणून मामलत आटोपून घेत नाहीं. तेव्हां आह्मी उत्तर करणार कीं, पस्तीस हजार स्वार व पंधरा पलटणें आह्मांस द्यावीं. याचे दोन वर्षांचे खर्चाची हमी सावकारी द्यावी. व किल्ले आपले आपण आपल्याकडे ठेवावे, आणि आह्मी चाकरी करावयासी सिद्ध आहों. अथवा, तुह्मीं दुसरा कोणी सरदार ठेवावा. त्याचे चाकरीस आह्मांस ठेवावें. तेथें अवघड जागा असेल तेथें चाकरीस आह्मी सिद्ध. ऐसा बोलण्याचा बेत केला ह्मणजे त्यास पैक्याची हमी मिळत नाहीं, व आह्मांस कोणाचें निसबतीस ठेऊं शकत नाहीं. ऐसा एक डौल काढिला आहे. पंधरा वीस दिवस मुहूर्ताखालीं अगर हरएक तऱ्हेनें घालवितों. तोंपर्यंत पत्राचें उत्तर येऊन पोंहचलें पाहिजे. हे तर निश्चयें उठोन येतात. छ १९ रोजीं आह्मी त्यांचेकडे गेलों. त्यांचे गुरुभावास भेटलों. मग पाटिलबावांकडे आलों. घटका चार एक बसलों होतों. तेव्हां त्यांणीं सांगितलें, एकीकडे बसावें. तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, आज दिवस चांगला नाहीं. दिवस सुदिन पाहून आपणांसीं येऊन बोलतों. ऐसें ह्मणून उठोन आलों. तों मागाहून राजश्री आप्पाजीराव दाभोळकर आले. त्यांणीं सांगितलें कीं, पाटिलबावांनीं सांगितलें आहे जे, "आह्मांस सरकारांतून पहिल्यानें कितीक पत्रें पाठविलीं कीं, हा बंदोबस्त फिरंगी यांजकडे न जावा. आपलेकडे राखावा. याविसीं खर्चही पडला तरी चिंता नाहीं. आह्मी सरकारांतून मदत करूं. फिरंगी याचा पाय पातशाहाजवळ पडों न द्यावा. तेव्हां आह्मी हा कारभार हरएक तऱ्हेनें मसलती करून आपल्याकडे आणिला. नाहीं तर, आह्मी गोहदचा बंदोबस्त उरकून देशास जाणार होतों. देशीं गेलों असतों तर खर्चाखालीं कशास आलों असतों? आजपावेतों सरकारचाकरीस अंतर केलें नाहीं. खर्चाखालीं आलों. अंगमेहनत केली. ऱ्याचा नक्ष राखिला. इतका मुलूख बदलला, परंतु साऱ्यांचें पारिपत्य केलें. चाकरी दाहा वर्षें केली. हल्लीं फौज तुमची रहात नाहीं. आणि आह्मांस देशास जाणें अगत्य. याकरितां तुह्मीं हा कारभार संभाळावा." असें कितेक तऱ्हेचें बोलणें आणिलें होतें. त्यास आह्मीं मसलतीखालीं घातलें आहे. तर उत्तर लौकर आलें पाहिजे. रवाना चंद्र २२ जमादिलावल बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक २४.

श्री. ता. १९ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांस—

॥ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः— राजश्री महादजी शिंदे यांजकडील पत्रें आलीं, त्यांच्या नकला करून आपणाकडेस पाठविल्या आहेत. त्यांजवरून कळों येईल. लवकर जावयाची तरतूद जाहल्यास सत्वर जाऊन पोंहचों. दौलताबादी रुपयांचे बट्टयाविषयीं राजश्री आपाजीपंत विनंति करतील, ते मान्य केली पाहिजे. तीन महिन्यांची बेगमी केली होती, तो ऐवज येथेंच झडत आला. याकरितां पुढील बेगमीचा बंदोबस्त करून फौज सत्वर येऊन पोंहचे, असें केलें पाहिजे. दिवसगत याच देशीं लागत चालली आहे. राजश्री महादजी शिंदे यांस पत्राचें उत्तर लिहिलें की, सत्वरच आपलें लिहिल्याअन्वयें येऊन पोंहचतों. कळावें. चंद्र २३ जा॥वल बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक २५.

ता. २१ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"पुरवणी राजश्री नाना गोसावी यांसीः—

विनंति उपरीः— आह्मी चंद्र २२ रोजीं राजश्री पाटिलबावांकडे गेलों, आणि बहुत तऱ्हेनें सांगितलें कीं, आपण देशास जाऊं नये. आह्मांस आपण वडील. कांहीं दिवस राहून तयार करावें. परंतु त्यांचे ह्मणण्याचे भाव एकच कीं, आह्मी राहत नाहीं; तुह्मीं राहावें. तुह्मांस पुण्याहून ताकिद आहे कीं, आह्मी सांगूं तें ऐकावें. त्यास आह्मी सांगत असतां ऐकत नाहीं. गोष्ट ठीक नाहीं. त्यास हें मान्य करावें, अथवा नाहींतर 'नाहीं' साफ सांगावें, व आंतून भाव त्यांचा कीं, आमचें सांगणें मोडूं नये. कदाचित् पुणेकरांनीं मनाई केल्यास, चिंता नाहीं. आह्मी सांगूं, त्याची निभावणी करूं. असें आह्मांस बोलूं लागले. तेव्हां आह्मीं धमकी घालावयाकरितां जाबसाल सांगितला कीं, आमचा बंदोबस्त कसा करून देतां? आमची फौज तेरा हजार आहे. त्याखेरीज वीस बेवीस हजार स्वार व पंधरा हजार पायदळ, एकूण सारा जमाव पन्नास हजारांचा; व त्याचे खर्चवेच झाडोन बंदोबस्त करून द्यावा. पुण्याहून एक पैसा येणार नाहीं, व हरएक विषयीं जाबसाल आमचा कमतीभरतीस करावा लागेल. हा जाबसाल कबूल करीत असल्यास मान्य करितों एक, अथवा नाहींतर महिनाभर दम खावा. आह्मी आपली जागा हरएक विचार करून जें सांगणें तें सांगूं. तेव्हां त्यांजला

पहिल्यानें हा जाबसाल दोन तीन वेळां सांगितला; परंतु ध्यानांत न भरे. मग आह्मीं सखतचा जाबसाल केला, "बहुत उत्तम आहे, संभाळं. परंतु आपण बेजार होऊं नये पैका मागता वेळेस." त्यावरून त्यांनीं आपले मंडळींत बसून विचार केला आणि उत्तर सांगितलें कीं, बरें आहे. महिन्याभरांनीं काय विचार करून सांगणें तो सांगावा. पाडव्यापावेतों दिवस तुमचा व मग आमचा. आह्मी सांगूं तें ऐकावें. त्याचें उत्तर आह्मीं केलें कीं, मान्य करणें अथवा न करणें हें तेव्हां सांगूं. असे निश्चय करून उठोन आलों. याकरितां उत्तर सत्वर एक महिन्यांत आलें पाहिजे. वरकड ह्याडोन मजकूर, पेशजीं दोन पत्रें पाठविलीं त्यांत लिहिलाच आहे, व या पत्रांतीलही लिहिलाच आहे. ते सर्व मजकूर ध्यानांत आणून उत्तर आलें पाहिजे. त्याप्रमाणें लागलेंच तोंडानें सांगूं, अथवा जैसें आपण लिहितील, तें अमलांत आणूं. कदाचित् दिवसगत उत्तर यावयास लागले, तर आह्मांस बहुत अवघड पडेल. हें जाणोन दोन पत्रें एकाच अन्वयाचीं लिहिलीं कीं, पत्र आपणास पोहोंचोन उत्तर आलें पाहिजे. रवाना छ २५ जमादिलावल बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक २६.

श्री. ता. ३० एप्रिल इ. स. १७८९.

"अपत्यें अलीबहादूर चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना तागाईत चंद्र ४ साबानपावेतों साहेबांचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री पाटिलबावांसीं जाबसाल करावयाचे ते आज्ञेप्रमाणेंच करीत असों. राजश्री राणेखान व सदाशिव शामराज पुढें पटाल्यापर्यंत गेले आहेत. तिकडील खंडणी घेऊन माघारे फिरणार आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २७.

श्री. ता. ७ मे इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः— आपण चंद्र २५ जमादिलावलचें पत्र पाठविलें, तें चंद्र ६ शाबानीं पावलें, व बारीक पुरवणीचें उत्तर लिहिलें, तें अवगत जालें. त्यास त्याचा जाब येथून अलाहिदा लिहिला आहे. त्यावरून कळों येईल. चंद्र १० शाबान. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक २८.

श्री. ता० २ जून इ. स. १७८९.

"आशीर्वाद उपरीः—तुह्मी चंद्र ६ रमजानचें पत्र पाठविलें, तें पावलें. इस्माईलबेगावर आह्मीं आपल्याकडून बळवंतराव सदाशिव रवाना केले. त्यांस सांगितलें कीं, तुह्मीं पुढें दरमजल निघोन जावें. त्यांचे बराबरील लोकांस पंचवीस हजार रुपये कर्ज काढून दिल्हे. त्यावर त्यांचें बोलणें पडलें कीं, पालखी द्यावी व एक पागा द्यावी. भोंसले व पुरंदरे सरदार द्यावे, व आह्मीं सांगितलें कीं, सरदारांचे लोक झाडून येतात; पागाही घेऊन जावी. त्यावरून त्यांनीं पागे यांस सांगितलें. तेव्हां पागे बोलले कीं, आमचे रोजमरे द्यावे व नालबंदीपैकीं कांहीं द्यावे. त्यावरून सदाशिवपंतांनीं आह्मांस सांगितलें कीं, पैक्याची तजवीज करावी. तेव्हां आह्मीं सांगितलें कीं, आमचा हात चाले तोंपावेतों कर्ज घेतलें. तुह्मी दिवाण आहां. कांहीं कर्जाची सोय पहावी. तें त्यांचे मनास आलें नाहीं. तेव्हां आह्मीं सांगितलें कीं, पंचवीस हजार रुपये घेतले, त्यांपैकीं तेरा हजार रुपये वांटले. बारा हजार येशवंतराव नाईकास देऊन, पांचशें लोक काढावे असें निश्चयांत आणिलें; परंतु त्यांची अड पालखीविसीं पडली. त्याचें उत्तर केलें कीं, पुण्यास लिहून पाठऊन परवानगी आणून देवितों. शिलेदारासारखें अडवून घेऊं नये. तेव्हां ते बोलले कीं, आह्मी आपले लोकांस बोलावून घेतों. व कितेक प्रकारें बोलले. त्यावरून जरूर जाणून पालखी दिल्ही, व दुसरें बोलणें सदाशिवपंताचें दोघांजवळ पडलें कीं, आमच्या विचारें पाटिलबावांनीं पुण्यास लिहून पाठविलें आहे कीं, पाटिलबावांची सरंजामी फौज घेऊन सदाशिवपंतांनीं आह्मांजवळ राहावें. इतलाखी फौज घेऊन अलीबहादर यांनीं देशास जावें, व आह्मींही पत्रें पुण्यास लिहिलीं आहेत. असें बोलतात. ऐकिलें वर्तमान लिहिलें आहे. राजश्री हरिपंततात्यांस सदाशिवपंतांनीं लिहिलें आहे, असें तेंच बोलत होते ह्मणून विस्तारें लिहिलें, तें कळलें. त्यास तुह्मांकडे सरदारीचें थोरपण आहे, तेव्हां सर्वांस पोटांत घेऊन चालविणें योग्य. सदाशिवपंतांनींही मनापासून तुह्मांसीं सरळ चालावें. तुह्मी चांगल्या गोष्टी सांगत असतां त्यांनीं असें करूं नये; व तुह्मीं जें करणें तें त्यांस घेऊन करीत असावें. असें असतां ते वांकडे, उदासपणें, चालूं लागल्यास, तुह्मी थोरपण करून, घराऊ रीतीनें, चौघांच्या साक्षीनें दोनदा चारदा सांगून बोलून समेटावें. असेंही असून त्यांनीं वांकडी चाल धरल्यास चिंता नाहीं. तुह्मीं होऊन दुखऊं नये. पाटिलबावांचीं पत्रें या मजकुराचीं अद्यापपावेतों तर येथें आलीं नाहींत, व आलीं तरी उत्तरें

समर्पकच जातील. तुह्मी येविसीं चिंता करूं नये, व सदाशिवपंताचें पत्र हरिपंततात्यांस आलें असेंही आढळांत येत नाहीं. राजश्री पाटिलबावांची चाल संदेह न पडावयाचे तेथें पाडतील. दुही नसेल तेथें करतील. त्यास दुही दिसूं देऊं नये. येविसीं सदाशिवपंत यांसही आह्मी सूचना लिहून पाठवितों. तुह्मीं लिहिलें अर्थ खोलून सदाशिवपंत यांस लिहावें, तर तुह्मींच गिल्ला लिहिला असें दिसतें. यास्तव सूचना मात्र मोघम लिहून पाठवितों."

## लेखांक २९.

### श्री.

( हें पत्र अलीबहादुराचे दिवाण यांस नानाफडणविसांनीं लिहिलें आहे. )

" विशेषः– तुह्मीं वैशाखमासचीं दोन पत्रें व ज्येष्ठ मासचीं दोन पाठविलीं, तीं प्रविष्ट जाहालीं. जोधपुर व जयपुरकर व इस्मालखान एक जाहाले, हे मसलत तूर्त येऊन पडली आहे. मालिट, टिपूचें राजकारणाकरितां परभारा आपलेकडे बोलतो, हें येथें विषम जाहालें आहे. गोसावी मोकळा केला. याची चिठी फितुरी सांपडली ह्मणजे पारिपत्य करावें, हा येथील मानस बहुत आहे. इंग्रज प्रकर्णीं इकडच्यांचें बोलणें:–नबाबांनीं व त्यांणीं इंग्रजांची कुमक करणें समजलेंच आहे, दाब मात्र उडेल. अशीं व्यंग बोलणीं होतात. तहमुरशा पातशाहा यांजकडील एक वकील, त्यांजबराबर घोडे दोन व नग दोन असा, मुलतानपर्यंत येऊन पोहोंचला. आल्यानंतर काय तें कळेल. इस्मालखान याची मसलत लांबत चालली. बाबास पाठवाल तर पारिपत्य करून येतों, ऐसें चिटणीस याजवळ बोललों. परंतु येथील मानस दिसत नाहीं. फौजा पुढें गेल्या होत्या. तेथें दाणा माहाग व पाण्याचा तोटा. पलटणाखेरीज वरकड फौज तमाशा पाहात्ये. रसद यांजकडील जाते. त्याजवर भेवाती पडतात. यास्तव तीन कोस फौजा अलीकडे आल्या. मथुरेस तिघे सरदार मिळोन बारा पंधरा हजार फौज आहे. जयपुर व जोधपुरवाल्यांनीं दौलतरामास वस्त्रें देऊन पंधरा वीस हजार फौजसुद्धां मथुरेवर मधूनच रवाना करणार, हें वर्तमान पाटिलबावांकडे आलें होतें. त्यावरून चिंतेंत होते. कलकत्त्याहून डाकेबराबर जलमार्गें पत्रें आलीं. त्यांत अन्वयः– टिपू व इंग्रजांची लढाई मातबर जाहाली. मदराजचे किल्ल्यास टिपूनें मोर्चे लाविले ऐसें ऐकिलें, व रामजी पाटील यांचें पत्र आलें कीं, अशांत तुह्मी याल तर हें राजकारण तुमच्या हातें होईल. यास्तव पाटिलबावांचा मानस आहे कीं,- इकडची मसलत आटपून पुण्यास लवकर जावें. इंग्रजांकडील बंदोबस्त आपल्या हातचा गेला, हें ठीक नाहीं.

सदाशिवपंत लोकांजवळ सांगतात कीं, पाटिलबावांचें व अलीबहादर यांचें बनत नाहीं, यास्तव त्यास देशीं लावून आम्हीं राहावें ऐसें केलें आहे. अशीं साधनें करितात. आणिकही पर्याय अधिक दुसरे शब्द यजमानास बोलतात. बारीक गोष्ट असली तर, जिकडे न जावी तिकडे त्याजकडून जाते, ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें." त्यास अशा गोष्टी ज्या तुह्मांस आढळत जातील त्या वरचेवर अलीबहादर यास सांगत जाव्या, व येथेंही हांसील लिहीत जावें. सदाशिव शामराज व बहादर या उभयतांचे चित्तांत संशय आले आहेत, यामुळें कामकाज नीट होत नाहीं. यास्तव तुह्मीं दरम्यान बोलोन स्वच्छता उभयतांची करून द्यावी. किरकोळ गोष्टींवरून परस्परें संशय येणें व लौकिकांत वाईट दिसणें या गोष्टी चांगल्या नव्हेत. तर येविसीं सफाई करून कामकाज सुरळीत चाले, असें करवावें. मालीट टिपूचे राजकारणाकरितां सरकारांत बोलतो. याकरितां पाटिलबावांस वाईट वाटून, तिकडील मसलत आटोपून देशीं येणार, हे गोष्ट मनसब्यानें दिसत नाहीं. फार दिवस तिकडे जाहाले, याकरितां यावयाचें करितील तर करोत. तथापि तिकडील मसलत सोडोन येणार नाहींत. गोसावी मध्यें येऊन पडला, त्यामुळें पाटिलबावासीं वांकडें आलें. याकरितां कांहीं काम न होतां लाखों रुपयांचा खर्च अंगावर आला. मध्यें स्वच्छता बाबारायाचे विचारें होऊन, पत्रें बहुत चांगलीं, खलष तुटला, राजकारणें हल्लीं बाहादराचे हातून घेणार, वगैरे बहुत संतोष मानून आलीं. परंतु आह्मांस परिणामास जाईल हें दिसलें नाहीं. येविसीं अलीबहादर यास लिहिलेंही होतें कीं, तुमचे हातून करवितील हें घडणार नाहीं. असो. अद्याप पाटिलबावांचे मनांत स्वच्छता नाहीं. मग बाबारायाचे हातून व चिटणिसाचे हातून केलें तें काय?"

## लेखांक ३०.

**श्री.**

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः— आपण चंद्र २५ शाबानचें पत्र पाठविलें, तें चंद्र १३ रमजानीं पावलें. "राजाकडील वकिलाचें बोलणें जसें होत जाईल, तसें राजश्री पाटिलबावांस सांगत जावें, व इस्मालबेगाकडील जाबसाल होत जाईल तो पाटिलबावांस कळवीत जावा. नाहीं तर उगेंच एकादें निमित्त ठेवितील. याकरितां फार जपून करणें तें करीत जावें, व खर्चास मागितलें त्याचें उत्तर पाटिल-

बावानीं केलें; त्यास दरमहाच्या दरमाहा देऊं असा करार केला असतां हल्लीं असें बोलतात. तेव्हां कर्ज खाऊन तेथें राहणें ठीक नाहीं" ह्मणोन लिहिलें, तें कळलें. ऐसीयास मागें वकील बोलणें बोलत होता, तेव्हां त्याचे कानावर घालीत होतों. हल्लीं जाबसाल बंद आहे, व खर्चाचे पर्याय तर पूर्वीं आपणास चार पांच पत्रीं लिहिले आहेतच. त्यास येथें खर्चास मिळणें दूर गोष्ट आहे. कदाचित् ते लाख रुपये देत होते ते आह्मीं टाकिले, तितके मात्र देतील. अथवा गरज आहे ह्मणून आणखी एखाद लाख दोन चार महिन्यांत दिल्हे तर देतील. वरकड ऐवज मिळावयाची गोष्ट घडणें अवघड आहे, व मुलखाची वांटणी तर मिळणेंच नाहीं. तत्राप खर्चापुरतेही माहाल लाऊन देणें हे गोष्ट देखील घडावयाची नाहीं. त्यास आपली मर्जी! कदाचित् येथेंच ठेवावयाची असल्यास तेथून खर्चाचा पुरावा आजपावेतों केला, तैसा पुढेंही करावा. येथें आमची खर्चाची हलाकी फार जाली आहे. त्यास, येथें फौज ठेवून सरकारांत नफा किमपि पडावयाचा नाहीं, व पाटिलबावाही बंदोबस्त करून देणार नाहींत. यास्तव आपला जाब मात्र लौकर यावा. त्यासारिखें करण्यांत आणूं. हेंच वारंवार लिहिलें आहे. परंतु आपण लिहिलें कीं, तुह्मांस पत्र पूर्वीं लिहिलें त्याचें उत्तर आलें नाहीं. त्यास आह्मीं तर तेव्हांच उत्तरें पाठविलीं आहेत. कळावें. राजश्री गोपाळराव रघुनाथ पाटिलबावांकडून सरदार पुढें गेले आहेत. त्यांची व इस्मालबेग याची लढाई सुरू आहे. हल्लीं मातबर लढाई जाली. यांजकडील शेंदोनशें माणसें जाया जालीं. अलीकडे दोन चार दिवसांत दुसरी लढाई नाहीं. परंतु गोपाळराव यांजवळून आंबोजी इंगळे मुलूख मारावयाकरितां आठ दाहा कोस उठून वेगळे जाहाले आहेत, व येथून बारुत गोळा पाटिलबावा वरचेवर रवाना करीत आहेत; व फौजही नवीन ठेवून वरचेवर पाठवितात. व आह्मांकडील राजश्री बळवंतराव सदाशिव येथून पांच कोस गेले. लोक निघावयास दिकत पडली होती. हल्लीं सत्वर जाऊन पोहोंचतील, व उंट खरेदी करून पाठवणें ह्मणोन व बादशाहाजादे याजविसीं दोन पत्रें श्रीमंतांचीं आलीं. त्यास उंट येथें महाग आहेत. करितां चाळीस पन्नास कोसांवरून खरेदी करून आणऊन लवकरच पाठविण्यांत येतील. व बादशाहाजाद्याचा जाबसाल पाटिलबावांसीं आह्मीं रुबरू आजपावेतों केला नाहीं. परंतु बळवंतराव सदाशिव येथून दोन चार मजला पोहोंचले ह्मणजे रुबरू जाऊन शहाजाद्याचा व खर्चाचा जाबसाल विचारून घेतों. तूर्तच विचारिलें असतें, परंतु आपली फौज पुढें गेली नव्हती. याकरितां पाटिलबावांची मर्जी आह्मांवर बिघडली होती. यास्तव विचारण्यास दिवसगत लागली. हल्लीं विचारोन लौकरच लिहून पाठवितों. रवाना चंद्र १६ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

# लेखांक ३१.

[हेंही नाना फडणविसांचें पत्र आहे.]

जून. इ. स. १७८९.

"आशीर्वाद उपरी:—तुम्हीं पत्र पाठविलें, तें पावलें. बाबाराव वकील यांस आम्हीं जाबसालांत घातलें नाहीं. आमची वळख नवती, परंतु पाटिलबावांनीं बोलण्यांत घातलें. होळकर व शिवाजीपंतबापू वगैरे आणखी कितेकांकडून सफाईचे संदर्प लाविले, परंतु कोणाच्यानेंही न होय असें समजून द्यावयास केले व ऐवज दिल्हा. परंतु सरकारांतूनच दिल्हा असें पुर्तेपणें दाखविलें नाहीं. गोसावी मुक्त जाला सबब त्यानें........प्रमाणें पर्याय दाखविला. गोसावी यांसही सांगितलें. त्यानेंही मान्य केलें. अवकाश पडल्यास सरकारांत खर्च पडावयाचा नाहीं. अलीकडे गोसावी याची नेहमीं मुक्तता होईल असें दिसोन येतें, व ज्या गृहस्थाकडे पत्रें पाठविलीं त्यांचीं उत्तरें आलीं. तें पाटिलबावांचे कानावर घालीत गेलों. त्यांनीं सांगितलें कीं, जाबसाल होत असल्यास करावे, आळस नसावा. त्याचें बोलणें आहे कीं अजमेर सरकारांत देवितों. उदेपुरची खंडणी देवितों. आमचा मात्र बंदोबस्त करून द्यावा. त्यास अलीकडे पाटिलबावांनीं सांगितलें जें, हें महकूब करावें, त्याचें पारिपत्यच करूं. त्यावरून हल्लीं सिलसिला बंद केला. कौलनामा तर पूर्वींच जाऊन चुकला. त्याचाही पेंच न ये असें करतों ह्मणून लिहिलें. त्यास कोणाच्याच हातून सफाईचा जाबसाल शेवटास न जाय, व पाटिलबावांनींही बाबाराव यांचेच हातून बोलविलें; तेव्हां यांचेच हातून बोलोन सफाई करणें प्राप्त. तेव्हां केलें तें बरेंच केलें. ऐवज दिल्हा तो सरकारांतून नाहीं, गोसाव्याकडून दिल्हा, असें दाखविलें, हें बरें केलें. परंतु पूर्वीं तुमच्या लिहिण्यांत बारीक अक्षरांच्या पुरवणींत खलष तुटावयाकरितां आह्मांस पंचवीस हजार रुपये देऊं केले आहेत असें लिहिलें, आणि हल्लीं आह्मीं दिल्हे असें लिहिलें. यावरून पूर्वीं लिहिलें तें समजून लिहिलें नाहीं, असें दिसलें. असो. ऐवज गोसाव्यापासोन उगवून घ्यावा ह्मणजे सरकारांत खर्च पडणार नाहीं व इतके ऐवजास गोसावीही महाग नाहीं. तुह्मीं गृहस्थाकडे पत्र पाठविलें व त्याचीं उत्तरें आलीं. त्यांत अजमेर देववितों व खंडणीचा पैका देवितों, असें असतां पारपत्य करणार. व तुह्मांकडूनही सिलसिला बंद करविला. त्यावरून तुह्मीं बंद केला, उत्तम केलें. कौलनाम्याचे तुह्मांवर दोष न येई अशी तोड काय योजाल, ते लिहून पाठवावी. तुह्मी स्वच्छ रीतीनें कांहींएक परियाय लावून बोलाल, तोंच दस्तावेज तुमचा धरून दोष लावतील. येविसीं संभाळून दोष न ये ऐसें करावें. रुपये माघारा

द्यावयाचा मजकूर यत्न करून पाहूं. परंतु माघारा येणें कठीण. पाटिलबावांच्या कानावर घातलें तर माघारा आल्यास येईल. परंतु त्या गृहस्थाशीं फारच वांकडें पडेल. हें अंतस्त बहुत सरकारकामाचे उपयोगीं पडेल. तो गृहस्थ शरमिंदा राहील. पुढें आपण लिहितील त्याप्रमाणें करण्यांत येईल ह्मणून लिहिलें. त्यास रुपये माघारा द्यावयाचें करूं नये व येथूनही माघारा रुपये घ्यावे असें लिहिलें नाहीं. येथून कागद गेला त्याचा अर्थच तुमचे मनांत आला नाहीं असें दिसतें. व बारीक पुरवणीचें पत्र तुह्मीं लिहिलें, त्यांत खलष तुटावयाकरितां आह्मांस पंचवीस हजार रुपये देऊं केले आहेत, अशीं अक्षरें स्पष्ट लिहिलीं होतीं. याकरितां त्याचें उत्तर लिहून पाठविलें होतें. तो मजकूर तुमचे चित्तांत आला नाहीं असें दिसतें. पहिल्या पत्रावरून दरबारखर्च तुह्मीं घेतला असें समजण्यांत आलें. हल्लीं तुह्मीं दिल्हे हें समजलें. त्यापक्षीं माघारा घेणें ठीक नाहीं. यांत तुमची अगदींच पत जाते. सदरहू ऐवज गोसाव्यापासोन उगऊन घ्यावा. तुह्मांस मात्र भ्रम वाटत होता कीं, पाटिलबावा, इस्माईलबेग व जैपूर जोधपुराकडील राजकारण आमचे हातें करवितील. परंतु ही गोष्ट तुमचे हातून करवितील असें होणार नाहीं. तुह्मांस सर्व गोष्टीचे अनुभव येतील. बहुत संभाळून चालत जावें. तुह्मांसीं निखालस बोलून एखाद्यास कागद लिहिवितील. तुह्मी ल्याहाल तो धरून बोलूं लागतील कीं, अलीबहादर असे फितूर करतात. तुह्मी ह्मणाल पाटिलबावांचे सांगितल्यावरून लिहिला. ते ह्मणतील आह्मीं सांगितलें नाहीं. अशावर आणतील. याकरितां कोणाचें राजकारण करा ह्मणाले, अथवा पत्र ल्याहा ह्मणाले, तर तुह्मी त्या मजकुराची याद लिहून, त्यावर त्यांचे हातचें कांहीं करून घेऊन, मग करणें तें करावें."

## लेखांक ३२.

ता. १६ जून इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

६९ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः— रा. सदाशिव शामराज यांचा मजकूर पेशजीं आपणास लिहिलाच आहे. त्यास त्याचे अलीकडे बहुतच लोकांत बोलण्यांत येतें कीं, अलीबहादुरास पुण्यास बोलावणार व सरदारीवर आह्मांस ठेवणार, याप्रमाणें बोलत आहेत. व राजश्री पाटिलबावांकडेही आंतून त्यांचें बोलणें याप्रमाणें होऊन आपणास पत्रें

लिहिलीं आहेत, असेंही ऐकलें आहे. त्यास, या गोष्टीचा बंदोबस्त करण्यास उशीर न लागता; परंतु आपणास पत्रें गेलीं आहेत, याजमुळें मात्र आह्मी कांहींच बोलत नाहीं. त्यास ह्याविषयीं कसें काय करावयाचें तें आपण लिहावें, ह्मणजे त्याप्रमाणें करावयास येईल. चंद्र २० रमजान. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ३३.

**श्री.** ता. १८ जून. इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः— राजश्री सदाशिवपंत यांचा मजकूर पेशजीं लिहिलाच आहे. त्यास आह्मी दोन महिने त्यांस सांगतों कीं, रोजमरयाचा गवगवा फार आहे. कर्ज पाहावें आणि लोकांस रोजमरे वांटावे. त्याजवरून त्यांनीं एका साहुकाराचें बोलणें बोलूं लागले कीं, दोन लाख रुपये देतों. त्यास आज लाख रुपये घ्यावे आणि पुण्यास वरात दोन लक्षांची द्यावी. तेथें रुपये पटले ह्मणजे बाकी लाख राहिले, तेही देईल. तेव्हां आह्मी मान्य जालों. तदनंतर दोन चार दिवस जाऊन मग बोलूं लागले कीं, लाख देतों. सदरहू पर्यायें निमे आज द्यावे, निमे तेथें पटल्यावर द्यावे. त्यासही मान्य जालों. मग कांहीं दिवस जाल्यावर ह्मणों लागले कीं, पाऊण लाख देतों, लाख मिळत नाहींत. तेही सदरहू अन्वयें निमेनिम त्यासही मान्य जालों. तेव्हां बोलूं लागले कीं, कदाचित् तेथें ऐवज न मिळे, तर येथें द्यावा लागेल. तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, येथें मिळणें गोष्ट कठीण आहे. कदाचित् देणच जालें तरी तजवीज करणार तुह्मीच आहां. अथवा राजश्री पाटिलबावांकडील ऐवज आला तरी दिलह्यास चिंता नाहीं. असे जाबसाल जाले असतां, पाग्याजवळ बोलूं लागले कीं, आह्मीं साहुकार आणिला, त्याजपासून ऐवज घ्यावयाची मर्जी यांची नाहीं, व पाटिलबावा दोन लाख रुपये देत असतां घेत नाहीं. असें खोटें भाषण लोकांजवळ बोलूं लागले. लोक आह्मांजवळ बोलतात. आह्मीं त्यांसी उत्तर केलें कीं, पाटिलबावा लाख रुपये देत होते, ज्याजती कांहीं घ्यावें ह्मणोन टाकिले. जाबता आहे कीं कांहीं ओढ केल्यानें अधिक मिळेल. याजकरितां टाकिले. दोन लाख देत होते, असें त्यांनीं खरें करून द्यावें. व साहुकाराची जाली हकीकत सांगितली, व लोकांस सांगितलें कीं, तुह्मीं

दिवाणजीजवळ जाऊन ऐवज मागावा. आमच्यानें तर्तूद जाली तोंपावेतों केली. कांहीं थोडकी बहुत तजवीज त्यांणींही करावी, व मागती आह्मी तजवीज करीतच आहों. असें बोलून लोक त्यांचे घरीं मागावयास जाऊं लागले. चार दिवस जाले. मग छ० २१ रमजानीं त्यांनीं सारे लोकांस ताकीद केली कीं, आह्मांस कारभारही नको, व आमचे घरीं कोणीं येऊं नये. सरदाराकडे जावें. तेच तजवीज करतील. हें साऱ्यांनीं येऊन आह्मांस सांगितलें. तेव्हां पुसावयास पाठविलें कीं, तुमचे मुखें अशीं अक्षरें निघूं नयेत. त्यावरून त्यांनीं सांगून पाठविलें कीं राजश्री भिकाजीपंत व आपाजीपंत येथें पाठवून द्यावे. त्यावरून त्यांस पाठविलें. तेव्हां उत्तर जालें कीं, "आह्मांस कारभार पुरवत नाहीं. तुह्मी जाणा आणि लोक आणा." असे जाबसाल केले. आह्मींही सांगून पाठविलें कीं, "उत्तम. आपली मर्जीच आहे तरी बरें आहे." याप्रमाणें जाहाली हकीकत लिहिली आहे. मागाहून कोणती वर्तणूक घालतील तें लिहिण्यांत येईल. पुढें लढाईचा प्रसंग तर आहे तोच आहे. आंबोजी इंगळे जाळपोळ करावयास वेगळे जाहाले आहेत. ते आपल्या उद्योगांत आहेत. विशेष कांहीं नाहीं. रवाना छ० २२ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ करावा, हे विनंति."

## लेखांक ३४.

**श्री.** ता० २६ जून इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

७ सकल गुणालंकरण अखंडीतलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः— पूर्वीं पत्रें पाठविलीं आहेत, त्याजवरून विदित जालेंच असेल. येथून राजश्री तुकोजीबावा होळकर यांचा निरोप घेऊन डंगाईत जावें हा निश्चय केला, परंतु राजश्री पाटिलबावांकडील कांहीं संधान आलें. त्याजवरून तिकडील काय अर्थ तो समजावयास्तव व सुभेदार यांचेंही ह्मणणें पडलें कीं, जैपूरचे खंडणीचे तहाचा ठराव जाला आहे, त्याजकडील ऐवज वसूल पडावयाचा. याकरिता चार दिवस दम खाऊन राहावें. वसूल येईल त्यापैकीं तुह्मीं खर्चास दरमहा पन्नास हजार रुपये घ्यावे. पर्जन्यकालचे दिवस. डंगाईत पर्जन्य बहुत. छावणी करावयास ठीक पडावयाचें नाहीं. आह्मांपाशीं चार दिवस राहून, पुढें पाटिलबावांकडील समेट जाली तर तिकडे जावें. अथवा नानांचें पत्र येईल त्याप्रमाणें करावें. त्यास विचार पाहतां, आह्मांस पाटिलबावांकडील समेटाचें संधान राखणें होतेंच. डंगाईत गेल्यानें

लांब पडेल. यास्तव येथें राहून पाटिलबावांकडील काय अर्थ तो समजावयाकरितां होळकर यांजपाशीं राहिलों. तूर्त थोडीबहुत खर्चाची सोय होऊन पाटिलबावांकडील-ही पुरतेपणें काय तें समजण्यांत येईल, व पूर्वीं आपणाकडे पत्रें पाठविलीं आहेत, त्यांचीं आपलीं उत्तरें येतील, त्या अन्वयें करावयास येईल. यानंतर रा॥ हरिकर्ण रविकर्ण साहुकर याचा ऐवज बहुत देणें आहे. त्याजपैकीं पुण्यास वराता दिल्या आहेत. त्यांपैकीं दोन लक्ष तीस हजार रुपये यास पावले नाहींत. दहा महिने होत आले, याजमुळें देण्याची निकड लागून अब्रू राहणें यास संकट पडलें आहे. त्याविषयीं दोन तीन वेळ पत्रें आपणास लिहिलीं, परंतु ऐवज द्यावयाची परवानगी जाली नाहीं. त्यास, हल्लीं परवानगी होऊन ऐवज यांस पावता होय, तो अर्थ केला पाहिजे. याची अब्रू राखणें आपणाकडे आहे. चंद्र २ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

---

## लेखांक ३५.

श्री. ता० २८ जून इ. स. १७८९.

" सेवेसीं विज्ञापना:— राजश्री अलीबहादूर व त्यांचे कारभारी यांस स्वामी-कडील आज्ञापत्रें वरचेवर येतात. खर्चाची सोय जाल्यास राहावें, नाहीं तर बावांचा निरोप घेऊन देशीं यावें. येथेंही फौजेचें प्रयोजन आहे. दोन्हीकडील खर्चाची सरबरा होणार नाहीं. असें असतां हे बावांकडे जाऊन कांहीं बोलत नाहींत. कारभारी सरकारचे. यांचे विचार आज्ञेप्रमाणें जाऊन रुबरू जाबसाल करावा. त्यास कांहीं घडत नाहीं. आजपावेतों कर्जदार जाले. पुढें लोका........बसतील. हे कित्येक बारीक मोठें ल्याहावें, तर सर्वांच्या बातम्या हुजूर आहेत. यास्तव संकलित लिहिलें आहे. परंतु यांची व बावांची शुद्धता होत नाहीं. याचा परिणाम ठीक दिसत नाहीं. पागे पथकें नित्य खर्चाकरितां बोलतात. सरकारच्या जाबत्यामुळें आजपावेतों लोकांनीं दम धरिला. याचा विचार काय तो करावा आणि निक्षून पत्रें पाठवावीं. द्यामुशें लिहिल्यानें हे लोभास गुंततात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ३६.

श्री. ता० ३० जुलई. इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

७ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥. अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून, स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे.

विशेषः—आपल्यास रा. पाटिलबावांनीं हिंमतबहादूरप्रकर्णीं पत्रें लिहिलीं आहेत, ह्मणून वर्तमान आहे. त्यास अलीकडील हकीकतः— पांच सात दिवस जाले, त्यांनीं फेरपगडीचे जाबसाल केले कीं, हिंमतबहादूर आमचे हवालीं करावा, असा बेत आहे. त्यास सारांश अलीकडे रा. शिवाजी विठ्ठल बापू मध्यस्थींत पडोन आमची त्यांची रफै खलिश व्हावा ऐसे बेतांत आणिलें आहे. त्यास त्यांनीं पुसिलें कीं, तुमचें बोलणें त्यांसीं कैसें जालें, वर्तणूक कैसी हें सांगावें. त्यावरून बोलण्याच्या यादी करून दिल्या. त्याच्या नकला करून पाठविल्या आहेत. वर्तणूक कशी करणार, त्याचें उत्तर केलें कीं, आह्मीं कांहीं त्यास येथें आणिलें नाहीं. आला असतांही पाठीशीं घातला नाहीं. तुह्मीं शपथ द्यावी, आणि खातरजमा करावी. हें त्यांनीं सांगितल्यावरून शपथ देऊन खातरजमा केली. ऐसें असतां फिरोन गोष्ट हल्लीं मांगतात. त्यास आह्मांस जातीनें काढोन देणें आणि हिंमतबहादूर घेऊन जाणें. त्याजवरून पाटिलबावांचें बोलणें आहे कीं, तुह्मी चोर पाठीशीं घालितां. आह्मी देशास जाऊं. त्यास 'आह्मीं कांहीं पाठीशीं घातला नाहीं. तुमच्या सांगितल्यावरून केलें आहे. कदाचित् तुह्मी देशास जाऊं लागलां तरी आह्मी कोठें राहतों ? आपल्या बरोबरच चालणार.' असें बोलणें बोलिलों आहों. त्यास आपल्या मनांत कदाचित् गोसावी यांचे हवालीं करावयाचा बेत असिला, तर त्यास पुण्यास नेऊन मग आपले विचारास येईल तसें करावें. राजश्री तुकोजीबावा होळकर वृंदावनास आले आहेत. उदईक भेटी होणार. आमची भेट, हिंमतबहादर लोकांसहित आमचे जवळ आहे, याजकरितां त्यास सोडून जातां नये. होईल तैसें लेहून पाठवूं. जयपुरचे मसलतीवर तुकोजीबावा यांची फौज रवाना केली, व पाटिलबावाही फौज रवाना करणार. दहा बारा पलटणें ग्वालेरीस नवी तयार होत आहेत. त्यांचीही रवानगी तिकडेच होईल. शहाजाद्याविसीं आपण लिहिलें होतें. त्यास, याचा मजकूर पाटिलबावांनीं आपल्यास लिहिला आहे. त्याच अन्वयें आह्मीं आलाहिदापत्रीं लिहिलें आहे. आह्मीं जाऊन रदबदली करावी, तरी त्यांचें मन स्वच्छ गोसावी याजमुळें नाहीं. बुंदेलखंडप्रकरणीं मजकूर तर पूर्वी लिहिलाच आहे. त्यास पाटिलबावांस आह्मीं दोन चार वेळां सांगितलें आहे कीं, पुण्याचीं पत्रें आह्मांस आलीं आहेत कीं, बुंधेलखंडप्रकरणीं तुह्मांस मागाहून लिहून पाठवूं. त्याअन्वयें तिकडे जाऊन बंदोबस्त करावा. असें असतां आपण फौज पाठऊं नये. परंतु त्यांचें ह्मणणें आह्मांसही पत्र पुण्याचें आलें आहे कीं, वसूल करून घ्यावा. तेव्हां त्यांस सांगितलें कीं, असें जाल्यावर मग आह्मांस पत्र असें कशास येतें ? बरें,

असो. आपणास दिसत आहे व आह्मांसही आहे. त्या अर्थी आतां लिहून आपण व आह्मीं पाठवावें. ज्या अन्वयें जाब येतील त्या अन्वयें करावें. महिनाभर दम खाल्यास चिंता काय? इतके दिवस जाले, तसा एक महिना आणखी लागेल. त्यास त्यांच्या मनांत गोष्ट भरत नाहीं. त्यास हिंमतबहादराचें प्रकरण मध्यें आलें आहे. ऐशास आह्मी या दिवसांत बोलल्यास अधिकच वाईट वाटेल. ..................आह्मांस हल्लीं कांहीं तिळमात्र मोजीत नाहींत. जे जाब साल करितात ते जबरदस्तीचे, असा रंग जाला आहे. याचा बंदोबस्त करणार आपण धनी जबरदस्त आहांत. आह्मीं त्याहावें ऐसें नाहीं. रवाना चंद्र ७ जिलकाद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक ३७.

ता० १४ आगस्ट इ. स. १७८९.

"राजश्री नाना गोसावी यांसः–

७ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ अलीबहादूर राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेषः– हिंमतबाहादर गोसावी याचा मजकूर काल सविस्तर पत्रीं लिहिला आहे. त्याजवर पाटिलबावांचें बोलणें कीं, उमरावगीर गोसावी आणून द्यावा, नाहीं तर तो उपद्रव करील. यास्तव आणवावा हें उत्तम. तुह्मीं वचन दिलें, त्यास चिंता काय आहे? असें बोलणें पडलें. त्याजवरून उमरावगीर याजविषयीं गोसावीमजकूर यास सांगितलें. त्याचें उत्तर त्यानें केलें कीं, आह्मी आटकेंत पडलों, तेव्हां तो आह्मांपाशीं अटकेंत पडावयासी येईल, हें समजलेंच आहे. परंतु त्याची कांहीं तुह्मीं पोटाची बेगमी करून दिल्हीयास, त्याजपासून फंदफितुर केला तर माझें पारपत्य करावें ऐसें बोलिला. त्यावरून पाटिलबावांस हें बोलणें सांगितलें, परंतु त्यांचे विचारास येत नाहीं. उमरावगीर तर येत नाहीं. आमचें वचन खोटें करावें, बदलौकिक जाला तर हो असें दिसोन आलें. त्यास सरकारांत पाटिलबावांनीं कित्येक मजकूर लिहिले असतील. त्यास हा नक्ष सरकारचा आहे. त्यास कदाचित् त्यांचे स्वाधीन केल्यास सरकारचा नक्ष राहत नाहीं. जो जाबसाल जाला तो पाटिलबावांच्या सांगितल्यावर जाला आहे. हल्लीं त्यांनीं पालटून गोष्टी सांगितल्या. त्यास कदाचित् मर्जी असल्यास पुण्यास आणवून घ्यावा. पुढें त्यांचेही हवालीं केल्यास चिंता नाहीं. परंतु येथें हवालीं करण्याची परवानगी नसावी. आह्मी हरएक प्रकार करितों तो आपल्या आधारावर करितों. परंतु हा अभिमान धरल्याखेरीज लौकिक राहणार नाहीं. आह्मीं शफत केली ते पाटिलबावांच्या सांगितल्यावर केली. (अपूर्ण.)"

## लेखांक ३८.

**श्री.**

"तीर्थस्वरूप राजश्री नाना वडिलांचे सेवेसीं:—अपत्येंसमान नारो चिमणाजी मानू दोन्ही कर जोडून चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत माघ वद्य १३ पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून मुक्काम किल्ले अरुणा येथें बालकाचें व किल्ले मजकूरचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:—सरकारचें आज्ञापत्र छ० ४ रविलावलचें सादर जाहलें. त्याची नक्कल व वडिलांचें आज्ञापत्र छ० ५ रविलावलचें आलें. तेथें आज्ञा कीं, "अनुपगीर गोसावी व त्याचे पुतणे तीन असामी यांस राजश्री अलीबहादूर तुह्मांकडे अरुणांत कैदेंत ठेवावयास पाठवितील. त्यांस जागा मध्यावर चांगली, भोंवत्या चौक्या बसोन बंदोबस्त राहील असे, स्थळांत ठेवावा. पुतणेसुद्धां त्यास शिधा उत्तम प्रतीचा व वस्त्रपात्र लागेल तें, व बराबर चाकरीचीं माणसें असतील त्यांस शिधा शिरस्तेप्रमाणें नेमणुकीची याद अलीबहादूर करून पाठवितील, त्याप्रमाणें देत जावें. गोसावी मातबर माणूस मनसबेबाज, शहाणा आहे. पायांत बेड्या घालावयाच्या नाहींत. मोकळाच बंदोबस्तानें ठेवावा. विश्वास धरूं नये. तुह्मांजवळ काय बोलेल व काय मागेल व बराबर माणसें कोण येतील तें व बातमी कची वरचेवर तपशीलवार लिहीत जाणें." ह्मणोन. अशास गोसावी येथें आल्यास आज्ञेप्रमाणें बंदोबस्ताचे जाग्यांत ठेऊन चौकी, पहारा, शिधा वगैरे याचा बंदोबस्त जातीनिशी विश्वास कोणाचा न धरितां करून, गोसावीबावा बोलतील व मागतील तें सविस्तर वरचेवर विनंति वडिलांचे सेवेसीं लिहीन. सरकारलक्षाप्रमाणें वडिलांचे आज्ञेनुरूप वर्तणूक करीन. वरकड माहालचें वर्तमान चिरंजीव बच्याजीपंत सेवेसीं विनंति करितील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ३९.

**श्री.**

[ नानांचें अलीबहादुरास पत्र. ]

"तुह्मी पाटिलबावांचा निरोप घ्यावयास गेलां, तेथें संदेह प्राप्त जाला, ह्मणून माघारे गोटास आल्याचे मजकुराचीं पत्रें तुमचीं पूर्वीं आलीं होतीं. त्यावरून तो मजकूर येथें राजश्री रामजी पाटील यांशीं बोलण्यांत आणिला. भवति न भवति बहुत जाली. तेव्हां शेवटीं रामजी पाटील बोलले कीं, अलीबहादरांनीं इकडे तूर्त येऊं नये. आहेत तेथें मुक्काम करून राहावें. आह्मी पाटिलबावांस लिहितों, आणि

## २८. नानांचा व पाटिलबावांचा गैरसमज.

नानांचा व पाटिलबावांचा कांहीं राजकीय गोष्टींत गैरसमज झाला होता. पाटिलबावांचे कारभारी आपाजी राम दाभोळकर ह्यांनीं ह्या बाबतींत त्यांचा समक्ष खुलासा विचारून एक पत्र लिहिलें आहे, तें अत्यंत महत्त्वाचें आहे. त्यावरून पाटिलबावांनीं आपलें समर्थन कसें केलें आहे, तें दिसून येतें. हें पत्र अर्थात् इ. स. १७८२ च्या सुमाराचें आहे.

[मिथवलीदप्तर.] श्री. ता० १३ फेब्रुवारी इ. स. १७८२.

"सेवेसी विज्ञापना ऐसीजे:-आपण आज्ञा केली, त्या आज्ञेप्रमाणें मसलतीचें व घराऊ वर्तमान राजश्री पाटिलबावांस सर्व श्रुत केलें व आपलें पत्रही दिलें. त्याजवर एक दोन बैठकेंत जाबसाल जाहाले. त्यांतील भाव दिक्क मर्जीनें उत्तरें जाहलीं, ऐसा दिसला. त्याजवर मीं विनंति केली जें, "मजला श्रीमंत नानांनीं आपले मर्जीचा भाव कसा आहे ? पाटिलबावांचे आमचे भेटीस दोन सवादोन वर्षे होत आलीं, यास्तव परस्परें भाव समजावे. पहिल्याप्रमाणें निखालस्ता असून दिवसेंदिवस अधिक निखालस्ता चालून सरकारचाकरी व्हावी. श्रीमंतांचें कल्याण त्याजमध्यें आपलें कल्याण. आमचे उभय पक्षीं इष्ट थोडके आहेत. यास्तव उभय पक्षीं निखालस्ता असल्यावर कोणाचा दरजा चालत नाहींत. याजकरितां निखालस्तेचा खुलासा निघून कच्चें पक्कें वर्तमान सविस्तर लिहावें.• ऐसी आज्ञा केली असतां, आपण उदासीन वृत्तीनें जाबसाल देतात. त्याजमध्यें काहींच समजण्यांत येत नाहीं. तरी मजला झकांड्या देऊं नयेत. परंतु खुलाशानें वर्तमान निखालस्तेचें सांगितलें पाहिजे." त्याजवरून राजश्री पाटिलबावा बोलले जें, "निखालस्तेचा प्रकार ऐकावा. नबाब निजामअलीखान व हैदरखान व भोंसले व इंग्रज व गाईकवाड व श्रीमंत दादासाहेब हे सहा जण यांजकडे आमचीं सूत्रें व वकील येऊन, श्रीमंतांचें अकल्याण व राजश्री नानांचें वाईट करावें येविषयीं बारकाईनें शोध करून पहावें. ज्या तऱ्हेनें पहावयाचें असेल त्या तऱ्हेनें पहावें. हैदरखानाकडे वकील पाठविला, तो सरकारआज्ञेप्रमाणें पाठविला. आतां हैदरखानास पत्र लिहितों, तें सरकारचेंच इतल्यानें लेखन करितों. याजमध्यें कोठें निखालस्तेस कमती असेल तरी सांगावी. याजखेरीज श्रीमंतांचे पदरचे सखारामपंत व राजश्री मोरोबा दादा वगैरे मंडळी दादाकडील, यांजकडे संधानें राखून सरकारनुकसानी व राजश्री नानांचें अकल्याण केलें न केलें, हें त्यांस अनुभवच आहे. प्रस्तुत राजश्री होळकर व हरिपंततात्या व परशरामभाऊ व दुसरे मातबर सरदार व मानकरीसुद्धां व पागे वगैरे यांजवळ संधानें राखून सरकारनुकसानी व नानांचें अकल्याण केलें असेल, तरी सांगावें. आह्मांविषयीं कोणी कसें राजश्री नानाजवळ सांगो. आमचा खंबीर श्रीमंतांचे पायाजवळ व राजश्री नानांचे भाऊपणा-

विषयीं आहे. उभय पक्षींचें अकल्याण आह्मांकडून होणें नाहीं. येविषयीं खातरजमा जाणावी. एखादे मसलतीचा प्रकार व सरकारचे अम्मलदार यांजविषयींचा मजकूर तरी, तितक्यापुरता तितकाच लिहावा. कमाविसदार यांची कांहीं चौकशी करूं नये." ऐसें बोलले. त्याजवर विनंति केली जे, "याचें कारण काय? तें मजला खुलाशानें सांगितलें पाहिजे." त्याजवर बोलले त्याचा बितपशील कलमें:-

"पवार यांजकडे सरकारची कर्जपट्टी येणें. ती द्यावयासी दिवसगत लागली. त्याजमुळें हमीरपूर जप्त बाळाजी गोविंद यांजकडून सरकारांतून जाहलें. त्याजविषयीं सरकारची आज्ञा जाली जें, बाळाजी गोविंद यांसी ताकीद करून महाल मजकूर हिस्सेरसीद घेऊन, बाकीचा ऐवज पवार यांजकडे देणें, ऐसी आली. तेव्हां मशारनिल्हेस ताकीद केली. त्याजवर कबूल केलें जे, हिशेब कितेब पाहून ऐवज देतों. त्याजवरून सरकारांतही एक दोन वेळा लिहिलें. हल्लीं बुंदेले यांनीं सरकारांत समजाविलें जे, इंग्रज, पवार यांनीं काल्पीस आणिला. त्याजला पैका द्यावयाचा नाहीं. ऐसें समजाविलें. तें समजून हल्लीं पत्र या तऱ्हेचें वकिलास आलें. त्यास आठ महिने जाले! हें वर्तमान नव्हतें. हल्लींच कसें निर्माण जालें, हें त्यांजला न पुसिलें. पवार चाकर आपले. यांच्यानें इंग्रज कसा आणवेल हेंही दुरंदेश पहावा. अथवा पवाराचा दस्ताऐवज आहे किंवा (फाटलें आहे)...........कोणीं जाऊन इंग्रज आणिला, हा मुद्दा असल्यास पवाराचा मुलाजा काय आहे? मुद्दा असल्यास कांहीं चिंता नाहीं. मुद्दा नसतां लटकेंच अम्मलदार यांचे लिहिल्यावरून अथवा वकिलांचे सांगितल्यावरून हल्लीं या तऱ्हेचे लिहिलें आलें. तेव्हां कसे करावें?" ऐसें बोलले. कलम. १

"अहल्याबाई होळकर यांजकडील जाबसाल भवति न भवति होऊन ठरावांत आला तो आह्मांस लिहिला, आणि बाईस सांगून कबूल करवणें ऐसेंही लिहिलें आलें. त्याजवरून बाईस बहुत प्रकारें लिहून कबूल करविलें. हल्लीं दुसरा प्रकार लिहून येतो आणि हेंही बाईकडून कबूल करवणें ऐसें लिहिलें येतें. तेव्हां बोलण्यास चलबिचल होते. दुसरी तोड निघत असतां, सरकारकामास कमती होईल, तरी बोलण्यास चलबिचल नसावी. तरी होळकर यांचा मुलूख देशीं पंचवीस तीस लक्षांचा, त्याचा अम्मल बाईकडे नाहीं. माळव्यांतील प्रकार तरी सांवेरी व महतपूर व पेंढावा वगैरे वगैरे महाल निम्मे माळवा सरंजामी यांजकडे आहे. सरंजामी वाघ व बुळे व वाघमारे व फणशे व लांबहाते व बारगळ वगैरे सरंजामी यांजकडे आहे. बाकी निम्मेपैकीं शिरोंज व रामपुरा व पाटण केशवरायांचें व बुंदी वगैरे एका दुसऱ्या महालचे अम्मलदार राजश्री तुकोजीबावांकडील कमाविसदार आहेत. बाकी दोन चार महाल व किरकोळी गांव वगैरे बाईकडील अम्मलदार आहेत. तेव्हां बाईनीं पैका कशाचा द्यावा, आणि आह्मीं त्यांस काय सांगून आयकावें? येविषयीं छान नसतां दुसऱ्यांनीं सांगितल्यावरून लिहिलें येतें. तेव्हां कसें करावें!" ऐसें बोलले. कलम. १

"मसलतीचा प्रकार तरी, आह्मीं त्यांस सुचलें तें सांगावें. त्यांनीं आह्मांस वरचेवर सुचवीत असावें. परंतु कोणे वेळेस सुचविलें, त्याचा कोणे वेळेस उल्लेख असावा. आह्मी पुण्याचे मुक्कामीं पादशाहाचें सूत्र व बंगाले याचे मसलतीचें बोललों होतों. त्यास पादशाहाजवळ अबदुल हयातखान कारभारी होता. नजबखान यांजकडे फौजेचा कारभार मात्र होता. तेव्हां पक्कें सूत्र पादशाहाचें होतें. अलीकडे अबदुल हयातखान नजबखानानें कैद करून सारा कारभारसुद्धां आपण करूं लागला. तेव्हां (फाटलें आहे) कमती पडली. परंतु दोहींकडे संधानें राखून इंग्रजांस न मिळेत ऐसे मात्र राहिले. अबदुलखान कारभार करीत असता, तरी पहिलें सांगितल्याप्रमाणें घडतें. बंगाले याची मसलत पुण्यांत सांगितली, तेव्हां ते समयीं पलटणें माळव्यांत आलीं नव्हतीं. गुजराथेची मात्र मसलत होती. ते मात्र संभाळून आह्मांस बंगालेयाची मसलत सांगावी ऐसें बोलणें होतें. ते समयीं फौज मजबुती व पैक्याचीही तरतूद होती. अलीकडे गुजराथचे मसलतींत खराबी जाहली. त्याजवर पलटणें यांची मसलत पडली. छावणी कर्तव्य प्राप्त जाहली. पुढें इंग्रज माघारें गेले. ते अंतरवेदींत आहेत. तेव्हां शह संभाळून राखावें लागतें. यांत बंगालेयाचे मसलतीचें पहिलें बोलणें याचें लिहिलें आतां येऊं लागलें. तेव्हां दोन्ही मसलती कशा कराव्या? कोणते वेळेस मसलत सांगितली, त्यास कर्तव्यता कोणते वेळेस लिहून येऊं लागली? तेव्हां मसलत लिहावयासी भ्यावें लागलें. मसलत घडेल ती लिहावी ऐसें जाहलें." कुलम. १

"आंबोजी इंगळे यांनीं, मवासी गढ्या आहेत त्यांस फौजा पाठवून, पारिपत्य करून चार रुपये घ्यावे ऐसें समजाविलें. त्याजवरून कांहीं फौज पाठविली होती. सरकारचे अमलांतील मवासी ठाणीं आहेत, हें समजण्यांत येतांच फौजा माघाऱ्या बोलाविल्या. राजजी देशमुख यानें समजाविलें होतें. त्याची पागा काढली; इतराजी केली. याजहूनही अधिक पारिपत्य करणें ऐशी मर्जी असल्यास आह्मांस लिहावयाचें होतें. त्याचे घरीं चौक्या बसवाव्या, तेव्हां आमचा लौकिक कसा राहील? लहान सरदार असला तरी त्यास सांगून, त्याजकडून त्याचें चाकराचें पारिपत्य जाहल्यास महत्त्व राहतें. परस्परें सरकारांतून जाहल्यास लौकिकीं विलग पडतें. हें न समजे ऐसा विचार नाहीं. दुसरें, शिरोंजचे जमिनदारांनीं शिप्रीस येऊन इंग्रज आणिला; आणि भेलशें घेऊन द्यावयासी पुढें मोहरा कबूल केला. त्याजपासून चार रुपये घेतले, व रणोदकर अम्मलदार याचे ठाण्याखालीं इंग्रज जवळ होता, त्याजवर गोळी चालविली नाहीं. आह्मी गेलों तेव्हां रवेवर गोळ्या चालविल्या, व सरकारचे अमलांत गढीबंद जमीदार वगैरे मवासी त्यांनीं छापेयांत तोफखान्याकडील बैल व बुणगे कांहीं लुटले. त्यांचे पारिपत्याकरितां सारेच अम्मलदार यांचे बोभाट सरकारांत गेले. त्याजवर आह्मांस लिहून त्यांची छाणपछाण करावी, तें न होतां, कमाविसदाराबरावर परभारी ताकीदपत्रें येऊं लागलीं. त्याजवरून आकत्यारीचा अर्थ समजला. तेव्हां सरकारचे अमलांत आह्मीं चौकशी कशी करावी?" ऐसें उत्तर जाहलें. कलम, १

"राजश्री मोरोबादादा यांनीं व होळकर यांनीं मसलत उभारून पुरंधरीं आले. तेव्हां विसाजीपंत व इंगळे यांचे अनुमतें, राजश्री तुकोजी होळकर यांचा कल फिरवून, होळकर आपल्यांत मिळवून, राजश्री मोरोबादादा वगैरे मंडळीची विलगता पाहून, पेंचांत आणिली. याची माहितगिरी सर्व राजश्री नानांस आहे. तेव्हांच विसाजीपंत यांसी सरकारांतून गांव दिला. त्याचीही माहितगिरी आहे. एक वर्ष कर्जपट्टी घेतली, ते सर्वांबरोबर घेतली. त्यास गुंता नाहीं. सालमजकुरींही ऐवज गांवचा घ्यावयासी रोखा जाहला. लोकांचे सांगण्यावरून त्यास लोकांचें बहुतेकांचें आमचें इष्टत्व आणवावें अथवा वैमनस्य आहे तें कांहींएक समजावितील. तेव्हां मर्जी कशी खंबीर असेल, ऐसें चित्तांत येऊं लागलें. नारो गणेश यांजला उभयतां इंगळे व विसाजीपंत यांचें पारिपत्य पुरंधरचें स्मरण करून करावयाचें निजध्यास लागला आहे. यास्तव दुसरें निमित्य ठेऊन पारिपत्य सरकारांतून करावें, हें त्यास ध्यान आहे. परंतु सरकारांत पुरतेपणें समजून कर्तव्यता असावी. त्याची गलबल होऊं लागली. तेव्हां आपले ममतेचें त्यांस कसें भासेल व ममतेनें कोण कसा येऊन कामास येईल, ऐसें भासूं लागलें." कलम. १

"...... मसलतीस शरीक नबाब निजामअल्लीखान व भोंसले व हैदरखान व गाईकवाड व सरकार इतक्यांनीं मिळून करार केला कीं, सर्वांनीं तंबी पोंहचाऊन पारिपत्य करावें ऐसें होतें. त्या वेळेस मी बोललों कीं, इतक्यापैकीं मसलतीस निदान हैदरखान राहील व बाकीची मसलत सरकारांवर झाडून पडेल ह्मणून पेशजीं बोललों होतों, त्याप्रमाणें घडलें. सरकारांवर मसलत पडली आहे, तरी श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे दैवेंकरून हेंही ईश्वर पार पाडील ऐसें बोलले." कलम. १

"गोहदवाला इंग्रजास मिळून इतका बैदा करून ग्वालेर वगैरे सारा मुलूख घेतला. पुढें जावें त्यास मागें शत्रु, हें विलग पडतें, व लबाडी केली यास्तव पारिपत्य करावें ऐसा मजकूर ठरून, ग्वालेर प्रांतीं पंचमहालांत आले. पंचमहालच्या दोन तीन गढ्या घेतल्या. चिनोर व बडची सराई यांस मोर्चे लाविले आहेत. उज्जनीहून थोरल्या तोफा आणविल्या आहेत. मागाऊन होईल वृत्त तें सविस्तर तोफा येऊन पोंहचल्यावर सेवेसीं लिहीन." कलम. १

सदरहूप्रमाणें जाबसाल जाहले. तेव्हां हें वर्तमान राजश्री श्रीमंत नानांस आज्ञा होईल तरी लिहून पाठवूं ह्मणून बोललों. त्याजवर उत्तर जाहलें जे, "कांहीं लिहावयाचें कारण नाहीं. तुह्मांस मात्र कळावें यास्तव सांगितलें" ऐसें बोललें. त्याजवर दिकत घेतली जे, "श्रीमंत नानांनीं निखालस्तेविषयीं व राजश्री पाटिलबावांचें मर्जीचा भाव कच्चा पक्का पाहून सविस्तर लिहावें, ऐसी आज्ञा असतां आपण न लिहावें, ऐसें ह्मटल्यास कसें करावें? त्याजवर बोलले जें, "निखालस्तेचा मजकूर सर्व लिहावा. कारभारसंमधीं व मसलतसंमधीं फार लिहूं नये. थोडें बहुत कार्याकारण लिहावें, ऐसें बोलले. परंतु स्वामींची आज्ञा कच्चें पक्कें वर्तमान मनास आणून लिहावयाची. यास्तव तपशीलवार

सेवेसीं लेखन केलें आहे. कळावें. फडणीसीचे बंदोबस्ताविषयींची याद कलमांची दाखविली. बंदोबस्त करूं, ऐसें बोलले. घडेल त्याचा मजकूर लेखन करूं. आपले कारकुनीची याद दाखविली. निदान आपण आज्ञा केली तीही सांगितली. त्याचा जाबसाल बोलून 'करून देऊं' ऐसे बोलले. त्यास मी वरचेवर पुसून बोलणें होईल तें मागाऊन लेखन करीन. त्याचीं उत्तरें निखालस्तेचीं एक पुरवणी निराळी, आपले व राजश्री पाटिलबावांचे भाऊपण्याविषयींची, निखालसपणाची लिहिल्याअन्वयें यावी, व दुसरें तपशीलवार उत्तर माझे पत्रीं लिहावयास आज्ञा जाहली पाहिजे. कां कीं, जो मजकूर बावांनीं लिहावयास सांगितला, त्याचें उत्तर येईल तें त्यांस दाखवावें लागेल. आणि मीं कच्चे वर्तमान स्वामींस कळावे ह्मणून लिहिलें आहे, त्याचें उत्तर निराळें असावे चंद्र २ सफर फाल्गुन शु॥ १ सौम्यवासर. वरकड होईल तें वर्तमान मागाऊन सेवेसीं लिहून पाठवीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

ॐ ॐ ॐ

## २९. तोतयाचें बंड.

पेशवाईत जें तोतयाचें बंड झालें, तें इतिहासांत प्रसिद्ध आहे. तोतयास कुलाब्याचे राघोजी आंगरे यांनीं इ. स. १७७६ मध्यें पकडून पुण्यास पाठविलें. त्या कामीं महादजी स्वतः कुलाब्यास गेले होते. त्यांनीं नानांस लिहिलेलीं एक-दोन पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकी एका पत्रामध्यें 'तोतयास पिंजऱ्यांत घालून पाठविलें' असा उल्लेख आहे, व दुसऱ्या पत्रामध्यें दादासाहेब 'पाण्यांत पळोन गेल्यास उपाय काय?' ह्मणोन उल्लेख आहे. ते लक्ष्यांत घेण्यासारखे आहेत.

[मिणवलीदप्तर.] श्री.

पैवस्ती छ. २६ रजमान ता० ८ नोवेंबर इ. स. १७७६.
सायंकाळ शनिवासर.

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीः—

दंडवत विनंति उपरी. राजश्री राघोजी आंगरे यांजकडे तोतयास आणावयास राजश्री बाळाराव गोविंद व राणेखान पाटील त्यांजकडून पेशजीं पत्रें आलीं, तींच बजिन्नस आपणाकडेस पाठविलीं, व राजश्री सदाशिव दिनकर पाठविले. त्यावरून सविस्तर कळलेंच असेल. वासुदेवबावा व त्रिंबक सूर्याजी व घोरपडे मुंबईस गेले. त्यांणीं इंग्रजास गैरवाका समजाऊन आंगरे यांजकडे इंग्रजाकडून वकील पाठविला. आंगरे यांणीं यावयाची तयारी केली होती. परंतु इंग्रजाकडील वकील आला, त्यामुळें अंदेशांत पडून, बाळाराव व राणेखान यांस नागोठण्याहून कुलाब्यास बोलावून नेलें. उभयतां गेले. त्यांच्या पांच चार भेटी जाहल्यावरी पत्र आलें. तेंच बजिन्नस आप-

णाकडे पाठविलें आहे. त्याजवरून सर्व अर्थ समजतील. आंगरे इकडे येणार. मागें त्यांचे स्थळास इंग्रज उपद्रव करितील हा आंदेशा दिसतो. तरी आपण इंग्रजाकडील वकील तेथें आहेत त्यांस सांगोन त्यांचीं पत्रें व सरकारचीं मुंबैस परभारें पाठवावीं, व एक पत्र मुंबैकर इंग्रजांचे नांवें इकडे लिहून पाठवावें, व आंगरे यांसीं एक पत्र खातरजमेचें पाठवावें, ह्मणजे इकडील गुंता लौकर उरकोन येईल. पत्रें सत्वर मुंबैस व इकडे रवाना जालीं पाहिजेत. श्रीमंत राजश्री दादासाहेब कल्याणापासून जवळ आहेत. त्यांजपासीं सामान फार थोडें आहे. आपण जाऊन हस्तगत करून आणिलियास उत्तम आहे. आपले जाण्यानें भडकतात असें असलें, तरी फौज भिवराव यांजकडे पाठवून काम होय तें करावें ह्मणोन लिहिलें. त्यास श्रीमंत दादासाहेब तारापुरापासीं आहेत. त्याजकडील बातमी आंगरे यांजकडे आली. त्याचें वर्तमान बाळाराव यांचे पत्रावरून कळेल. दीडशें माणसानिसीं आहेत. आह्मीं येथून कूच करून त्यासुमारें चालल्यास बातमी कळतांच भडकून पळोन जातील. पाण्यांत पळोन गेल्यास उपाय काय? तोतयाविसीं सूचना अगोदर आंगरे यांसी होती. ह्मणून आंगरे यांणीं तोतया हस्तगत केला. दादासाहेबांपासीं सामान भारी असतें, तरी आह्मीच कूच करून जातों. सामान थोडकें, तेव्हां तेथें ठरणार नाहींत. फौजसुद्धां गेल्यानें मुलकाची खराबी होईल. यास्तव राजश्री भिवराव व विसाजीपंत लेले येथें आले आहेत. त्यासमागमें फौज इकडील देऊन रवाना करावे, हे सल्ला ठराविली आहे. उदईक यांची रवानगी करूं. श्रीमंत पुण्यवान् प्रतापी आहेत. सर्व खुळे दूर होऊन बंदोबस्त होईल. रवाना छ० २५ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."

## श्री.

पैवस्ती छ० २७ रमजान  ता० ९ नोवेंबर इ. स. १७७६.
सबा आश्विन.

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीः—दंडवत विनंति उपरी आपण पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री राघोजी आंगरे वजारतमाहा सरखेल यांणीं कुलाब्यास तोतया मंडळीसुद्धां धरून ठेविला आहे. त्यास आणावयास आपणाकडून राजश्री बाळाराव व राणेखान गेले आहेत. त्यांचे हवालीं सरखेल यांणीं केलेंच असेल. ते घेऊन आपणाजवळ येतील. तदनंतर तोतयास व त्याचे मंडळीस बेड्या घालून इकडे रवाना करावें, अथवा पक्कया बंदोबस्तानें पाठवावें, ह्मणोन लिहिलें तें सविस्तर कळलें. ऐसीयास तोतयास आणावयास येथून उभयतां पाठविले. त्यांजकडून पत्रें आलीं, तीं पेशजीं आपणाकडे पाठविलींच आहेत. इंग्रजाकडील भला माणूस तोतयाकरितां सरखेल यांजकडे गेला, त्यामुळें आंदेशांत होते. त्यास येथून लेहून कागदींपत्रीं व उभयतांकरवीं सरखेल यांची खातरजमा केली. त्याजवरून तोतयास

घेऊन, सरखेल आज मंदवारीं कुलाब्याहून निघतात. त्यास घेऊन लवकरच येतों, ह्मणोन राजश्री बाळाराव व राणेखान यांचें पत्र काल रात्रीं आलें. याउपरी येण्यात गुंता दिसत नाहीं. लौकरीच येतील. आल्यानंतर तोतयास पिंजऱ्यांत पाठवून व मंडळीस पक्कया बंदोबस्तानें घेऊन येऊं. पूर्वी लिहिलेप्रमाणें इंग्रजास पत्रें तुह्मांस पाठवून, सरखेल यांसीं बरकसी न करीत तें करावें. आह्मी त्यांची खातरजमा बहुताप्रकारें केली. त्यावरून आज कुलाब्याहून निघोन येणार आहेत. कळावें रवाना छ० २६ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."



## ३०. सातारच्या राज्याचे अस्सल कागदपत्र.

मराठेशाईची खरी गादी ह्मणजे सातारच्या छत्रपतींचें सिंहासन होय. येथील अस्सल कागदपत्रांची काय व्यवस्था झाली, हें समजण्याची कोणासही उत्कंठा वाटल्यावांचून राहणार नाहीं. जुन्या दप्तराचा शोध करीत असतां पुढील दोन पत्रें वाचण्यांत आलीं. त्यावरून सातारच्या छत्रपतींचे अस्सल कागद पेशव्यांनीं पुण्यास नेले होते, असें दिसत नाहीं. त्यांचें काय झालें हें पत्रांत नमूद केलें आहे. त्यावरून पुष्कळ कागद ताराबाईनें कोल्हापुरास नेले असें दिसतें. परंतु सांप्रत कोल्हापूर येथें इ. स. १८१२ च्या पूर्वीचे जुने कागद अस्तित्वांत नाहींत.

### लेखांक १.

[सातारादप्तर.] श्री.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—पोष्य गोविंद खंडेराव कृतानेक दंडवत प्रणाम विनंति येथील कुशल तागाईत भाद्रपद शुद्ध पंचमीपर्यंत यथास्थित असे. विशेष:— स्वामींनीं पत्र पाठविलें, तें प्रविष्ट जालें, 'नवाब निजाम अल्लीखान याचे तहाचा जाबसाल होत आहे, याजकरितां कैलासवासी महाराजांचा व निजामनमुल्ख याचा तह जाला, तेव्हांचे कागदपत्र पारसी, हिंदवी, चौथाई सरदेशमुखीसंबंधें व भागानगर वगैरे सुभे येथील तहाचे असतील ते पाठवावे,' ह्मणून लिहिलें. ऐसीयासी नवाब निजामनमुल्ख याचे कारकीर्दीत चौथ सरदेशमुखीचा तह जालाच नाहीं. यापूर्वी सैदाचे अमलांत तह जाला, तेव्हांचे कागदपत्र व पादशाही फर्मानें कैलासवासी नानांनीं दिल्लीहून करून आणिलें, तें सारें राजश्रींनीं जतन करावें ह्मणोन रत्नशाळेंत ठेविलें होतें. त्याअलिकडे कैलासवासी राजाराम यांणींही रत्नशाळा आपणाजवळ नेली. त्याबराबर कागदपत्रही नेऊन जतन ठेविले आहेत, ह्मणोन

ऐकण्यांत आहे. नबाब निजामनमुल्क याचे अमलांत पहिले तहापेक्षां जाजती ज्या समई जसा प्रसंग पडला, तसें कैलासवासी राव साधीतच आले. तें कैलासवासी नाना यांचे कारकीर्दीपर्यंत साधलेंच आहे. भागानगर नवाबांनीं इजारा करून घेतला, तेव्हांच इजारा प्रतिनिधी यांणीं दिल्हा. त्याप्रमाणें करार असे. एक पत्र राजश्रीचें जालें. इजारपत्र नवाबांनीं दिल्हें असेल, अथवा कराराचा फर्द केला असेल, तो प्रतिनिधीजवळ असेल. याचें कांहीं स्मरण नाहीं. किरकोळ मतलब जेव्हां जसे पडले, तसे बहुतकरून राव यांजकडे पडले. त्याचा कागदपत्र आपले संग्रहींही असावा. अथवा सुमंताचे दप्तरीं असेल तरी नकळे. राजश्रीकडे यावयाजोगें पडलें नाहीं, असें वाटतें. येविसीं राजश्री सदाशिवपंत सातारीयास आल्यानंतर आपले आज्ञेप्रमाणें त्यांणीं लेहून पाठविलें. त्यासही उत्तर रत्नशाळेंत कागदपत्र होता, असें लेहून पाठविलें आहे. आह्मांजवळही कांहीं दाखला निघता, परंतु गायकवाडाचे दंग्यांत सातारीयाहून निघतेसमई रुमाल राहिले, ते मातुश्री ताराबाईसाहेब यांणीं राहिली वस्तवानी नेली, त्यांत रुमालही नेले. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २.

### श्रीराजावरद.

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजीपंत स्वामी गोसावी यांसी:— पोष्य निळकंठ बाबूराव आमात्य नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष:- तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. नवाब निजामअलीखान बहादूर याजकडील तहाचा जाबसाल होत आहे; तर श्रीमंत कैलासवासी शाहू महाराजांचे वेळेस नवाब निजामनमुल्क यांचा तह जाहला, तेव्हां चौथाई व सरदेशमुखीसंबंधें भागानगर वगैरे सुभे येथील तहाचे कागदपत्र असतील, त्यांचा दप्तरीं शोध करून हिंदवी फारसी जे असतील ते पाठवावे ह्मणोन लिहिलेंत, तें कळलें. त्यावरून दप्तरीं शोध करितां, या तहासंबंधें सरदेशमुखीचे आकाराची याद निघाली, ते पाठविली आहे. आणखीही दप्तरीं शोध करितों. कामाचा कागद सदरहू प्रकर्णी निघाल्यास पाठवून देऊं. बहुत दिवसांचे कागदपत्र होते. त्यांतील कांहीं रुमाल घर तीर्थरूपाचे वेळेस दग्ध जाहलें, त्यांत गेले. सदैव पत्र पाठवून संतोषवीत असिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंति."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] मार्च १९१०. [अंक ८ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# ऐतिहासिक काव्यें.



## श्री. नारायणराव पेशवे ह्यांच्या वधाचा पद्यात्मक वृत्तांत.*



श्रीगणेशाय नमः॥

वंदूं आधीं गजानन । चौदा विद्यांचें जें धन ॥
हरि हर ब्रह्मा चतुरानन । मानव करिती विषयाची ॥ १ ॥
पेशव्यांचे वंशीं वीर । एकापेक्षां एक रणधीर ॥
धरामाजीं नरवीर । क्षेत्री केले असे जे ॥ २ ॥
बाजीराय मोहरा सुंदर । चिमाजी आपाचा सहोदर ॥
महा कठीण कदर । राज्य केलें चातुर्यें ॥ ३ ॥
त्याचे पुत्र धुरंधर । नाना भाऊ धनुर्धर ॥
कीं अवतरले जगदोद्धार । गोब्राह्मणसंरक्षण ॥ ४ ॥
मन्मथस्वरूप वितुलें । दान धर्म कर्णातुल्य ॥
देवालयें आणि पूल । ठाईं ठाईं बांधिले ॥ ५ ॥
सौख्य संपत्ती घरीं उल्लास । बहुतांपरी भोगविलास ॥
रिद्धी सिद्धी बोलल्यास । उपमा दुसरी काय ते ॥ ६ ॥
बाजीरायाचे धाकटे सुत । एक दादाचें कर्तृत्त्व ॥
पहिल्यापासून प्रकृत । ऐसीच होती तयाची ॥ ७ ॥
विश्वासराव भाऊचा इतिहास । ते राहिले पाणिपतास ॥
त्याचे काळजीनें उदास । नाना जाहले बहुतची ॥ ८ ॥

---

* हें काव्य 'पांडुरंग'नामक कवीनें लिहिलें असून, तें पुणें मुक्कामीं आश्विन शुद्ध ५ मंदवासरे शके १७३० विभवनाम संवत्सरे ह्मणजे ता. २४ सप्तंबर इ. स. १८०८ मध्यें त्यानें समाप्त केलें आहे. अर्थात् पेशवाई असतांनाच हें काव्य तयार झालें असल्यामुळें ह्यांतील श्री. नारायणराव पेशव्यांच्या वधाचा वृत्तांत पुष्कळ खरा असावा असें दिसतें. नारायणराव पेशव्यांचा वध होऊन ह्या वेळीं सुमारें ३० वर्षें झालीं होतीं, तेव्हां त्या वेळीं कवीस प्रत्यक्ष त्या प्रसंगाची माहिती मिळण्याचा विशेष संभव होता, हें निराळें सांगणें नकोच. ह्या काव्याची प्रत कै. न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे ह्यांनीं इ. स. १८९८ मध्यें आह्मांस मद्रास येथून मिळवून दिली. ह्याच काव्याची दुसरी प्रत कर्नल म्याकेंझी ह्यांचे ऐतिहासिक संग्रहांत असलेली आह्मीं तपासून पाहिली. दोन्ही प्रतींमध्यें फारसें अंतर नाहीं. ह्या पांडुरंग कवीची अधिक माहिती कोणी लावील, तर त्याचीं आणखींही ऐतिहासिक काव्यें उपलब्ध होण्याचा संभव आहे.

सौख्यसंपत्तीचा करून त्रास । नाना गेले कैलासास ॥
राघोबादादा माधवरायास । राज्यस्थानीं स्थापिलें ॥ ९ ॥
माधवरायें केलें राज्य । नानांमागें रामराज्य ॥
शरीरभोगें जाह्ले·वाज । ह्मणून देह त्यागिला ॥ १० ॥
राज्यभार चालवावयास । स्थापूनि नारायणरायास ॥
राघोबादादा त्या समयास । आणखी होते मुत्सद्दी ॥ ११ ॥
राव विष्णूचा अवतार । त्यांचा पराक्रम फार ॥
कलियुग हें साचार । महादुष्ट जाण तें ॥ १२ ॥
कैलासा गेले माधवराय । त्यांचे मागें नारायणराय ॥
त्यांचा ऐका अभिप्राय । जाह्ला तो सकळ ॥ १३ ॥
आहो, शिक्के कट्यार । दिल्हा राजांनीं अधिकार ॥
वस्त्रें भूषणें अलंकार । दिले पेशवाईचे ॥ १४ ॥
राज्य करी एकनिष्ठ । जो कां पुण्यशील कर्मिष्ठ ॥
सुभाषित पंडित शिष्ट । ब्राह्मण असती आश्रयीं ॥ १५ ॥
राज्यादि कारभार । सखाराम बापू कुलमुखत्यार ॥
हरिपंतावर दया फार । तो कीं मित्र जिवाचा ॥ १६ ॥
आहो, नाना फडणीस । आले रायाचे मर्जीस ॥
कारभारी वांकनीस । ज्यांचा बंदोबस्त उत्तम ॥ १७ ॥
जैसे हरिश्चंद्र वीर । तैसे राव सत्वधीर ॥
जे का उदार गंभीर । कर्णाची ते साम्यता ॥ १८ ॥
नित्य करी दानधर्म । स्नानसंध्यादि षट्कर्म ॥
कामक्रोधादि काम । ज्याचे शरीरीं नसे हा ॥ १९ ॥
अखंड देवाचें भजन । नित्य विष्णूचें पूजन ॥
शाळिग्राम देवतार्चन । जो का ब्राह्मणभक्त तो ॥ २० ॥
ज्याचें स्वरूप सुंदर । कीं हा उगवे भास्कर ॥
मी वर्णू कोठवर । जैसा दुसरा मन्मथ ॥ २१ ॥
तेंवी शोभे सुलक्षण । ज्याची बुद्धी विचक्षण ॥
करी ब्राह्मणसंरक्षण । आणखी प्रजापाळणीं ॥ २२ ॥
बाजीरायाचे पुत्र । दादा, जाणते सुपुत्र ॥
यांणीं केलें कळासूत्र । तपश्चर्येचेनि बळें ॥ २३ ॥
मागें आनंदवल्लीस । लागोन लोकांचे बुद्धीस ॥

नाहीं गेलें सिद्धीस । मग हा त्यांचा मनसुबा ॥ २४ ॥
फौजा तमाम धरून । माधवरायास बोलाऊन ॥
युद्ध करितां दारुण । शेवटीं आलें अपयश ॥ २५ ॥
आहो, दगा देऊन । गेले सरदार पळून ॥
किल्ल्यावर ते वेधून । मग हो केली वळकटी ॥ २६ ॥
नाहीं दुसरा कोणी साह्य । तेथें न चाले उपाय ॥
राहते करोन लवलाहें । किल्ल्याखालें उतरले ॥ २७ ॥
राव घेऊन दादांस । मग ते आले हो पुण्यास ॥
ठेवून वाड्यामध्यें त्यांस । बंदोबस्त भोंवताला ॥ २८ ॥
मनीं धरोनी तोचि राग । केला संपत्तीचा त्याग ॥
अनुष्ठान यथासांग । आराधन सूर्याचें ॥ २९ ॥
पुत्र नानांचा जाण । त्याचें ऐका वर्तमान ॥
दोन्ही अवतार समान । जैसे राम कृष्ण ते ॥ ३० ॥
ज्याचे पुण्यप्रताप । सुटे बहुतांला कांप ॥
शरण आलिया करिती माफ । ज्याची दहशती ॥ ३१ ॥
कुफरान कितेक । केले फितूर अनेक ॥
तितके किल्ल्यावर देख । नेऊनियां घातले ॥ ३२ ॥
माधवरायांचें पुण्य । कोठें न पडे न्यून ॥
कीर्ति आठवितां अझून । ऐसा नाहीं होणार ॥ ३३ ॥
दुर्जन खल ते शासून । कायाकष्ट ते सोसून ॥
नाना गेलीयापासून । ज्यांनीं राज्य राखिलें ॥ ३४ ॥
थेऊराच्या मुकामास । बोलावुनीयां दादांस ॥
दिलें हातीं रायास । सुखरूप राज्य करा हो ॥ ३५ ॥
मोठा आहे बुद्धिवान् । ह्मणोनि बापू दिवाण ॥
नारायणरायाला जाण । बापूस बहुत निरविलें ॥ ३६ ॥
हें अज्ञान बाळ । तुह्मी करा प्रतिपाळ ॥
बाळापरी सांभाळ । तुह्मी आधीं करा हो ॥ ३७ ॥
रमाबाई वारंवार । निरवी दादांसी फार फार ॥
तुह्मांविना दुसरा थार । नाहीं रायासी कोठें तो ॥ ३८ ॥
सांगून गेले कैलासास । विसरून रायाच्या दुःखास ॥
त्याचे मागें कमास । राज्य केलें चांगलें ॥ ३९ ॥

माधवराय नारायणराय । दोघे होते बंधुराय ॥
त्यांचा पराक्रम काय । फितूर तेथें न चाले ॥ ४० ॥
राव गेलियावर । नाहीं दुसरा पाठीवर ॥
राहिला एक तो नृपवर । ज्याचें वय लहान ॥ ४१ ॥
राव बोलती दादांस । सोडोनियां वादास ॥
आतां चालवूं राज्यास । तुह्मी आह्मी यथार्थ ॥ ४२ ॥
न करावें अनुचित । तुह्मी आह्मी एकचित्त ॥
करुनियां आपुलें हित । दोघे असूं एकत्र ॥ ४३ ॥
ऐसा सांगोनि अभिप्राय । गेले गंगापुरा राव ॥
परी दादांचा भाव । राज्य मीच करीन ॥ ४४ ॥
मग रचून कुफराण्यास । कागद पाठविला हैदरास ॥
ती तों बातमी रायास । अवघी कळली यथास्थित ॥ ४५ ॥
जाहला चित्ताचा विक्षोभ । पुणियास आले तावडतोब ॥
........................ । बंदोबस्ती करावया ॥ ४६ ॥
तें तों विघ्न निवारून । बंदोबस्ती करून ॥
फितूरवाले धरून । किल्ल्यावरते घातले ॥ ४७ ॥
नाहीं केला विवेक । करूनि कारखाने एक ॥
सभोंवते गाडदी देख । खडे पाहारे करविले ॥ ४८ ॥
आक्रांतुनी जिवास । दादा करी उपवास ।
जाणोनियां भाव चित्तास । तपश्चर्या मांडिली ॥ ४९ ॥
तपश्चर्या अनिवार । केली दादांनीं ती फार ॥
ह्मणती सांब अवतार । दादा तो हा क्षोभला ॥ ५० ॥
तप केलें भोगोनि क्लेश । नाहीं पापाचा लवलेश ॥
पुण्य जाहलें विशेष । संकट पडलें देवासी ॥ ५१ ॥
होता दादांचा हेत । राज्य करीन हाच बेत ॥
ह्मणोनि देवांनीं हेत । त्याचा तो कीं पुरविला ॥ ५२ ॥
जाणूनियां तयास । कैसें केलें पापास ॥
ब्रह्महत्यादि दोषास । तो कां मागें लाविला ॥ ५३ ॥
देव मोठा चतुर । कैसा करविला कीं फितुर ॥
लिहून आणिलें दस्तुर । कागद दिल्हा दादांनीं ॥ ५४ ॥

मोक्षपदप्राप्तीस । नवलक्ष रुपये त्यास ॥
आणखी देऊनि किल्यास । केले ते कीं संतुष्ट ॥ ५५ ॥
देखुनी रुपयांस तुष्ट । जे कां भुलले खल दुष्ट ॥
कैसी पाडिली हे तूट । ऐसे महाघातकी ॥ ५६ ॥
बोलाउनियां तमाम । दादा ह्मणे करा काम ॥
त्यांनीं पाहून बेफाम । तो कां घाला घातिला ॥ ५७ ॥
खरगसिंग जमातदार । भेदला तो करार ॥
सुमेरसिंग हा निर्धार । महा खल दुरात्मा ॥ ५८ ॥
गाडदीयाचा कुलअख्त्यार । महमद इसुफ सरदार ॥
आणखी तुलाजी पवार । तो कां त्यांसी मिळाला ॥ ५९ ॥
ज्याचे खाऊनि अन्नास । फिरून पडले हो त्यास ॥
जन्मोजन्मीं नरकवास । कदाकाळीं चुकेना ॥ ६० ॥
ऐसे पापी महा खळ । कैसी साधोनियां वेळ ॥
जैसे काळकावळे । तैसे ते कां धांविले ॥ ६१ ॥
सकाळीं राघोजी आंग्र्यास । गेले होते भेटावयास ॥
दो घटका दिवसास । गेले होते स्वारीला ॥ ६२ ॥
आंग्र्यांस भेटून । देवीचें दर्शन घेऊन ॥
आले परवतीहून । लवलाहें वाड्यांत ॥ ६३ ॥
उशीर जाहला रायास । लवकर बसले जेवावयास ॥
मेजवानी गोसावी यांस । उद्यां करूं ह्मणाले ॥ ६४ ॥
जेवतेवेळीं गुणगुण । कळलें रायालागून ॥
हरिपंतास बोलाऊन । ह्मणती आणा मनास ॥ ६५ ॥
बोले हरिपंत उत्तर । जेऊनि आलीयानंतर ॥
नेली गोष्ट हंशावर । नाहीं केला शोध तो ॥ ६६ ॥
जाणोन विकल्प चित्तांत । राव गेले महालांत ॥
परी लिहिलें प्रारब्धांत । कदाकाळीं चुकेना ॥ ६७ ॥
पुरती बातमी घेऊन । राव निजले पाहून ॥
तुळाजीनें जाऊन । गारद्यांसी कळविलें ॥ ६८ ॥
ऐसी सांगोनी खबर । उठा ह्मणे लवकर ॥
तुळाजीचा फितुर सविस्तर । कळला आहे वाड्यांत ॥ ६९ ॥

लाग करा अशांत । नाहीं तर पडाल फाशांत ॥
अवघ्या गोष्टी साहित्य । त्या कां जाहल्या अनुकूळ ॥ ७० ॥
घेऊन सामान ऐन खबरदार । जाहले गारदी तयार ॥
सुमेरसिंग सरदार । तो कीं पुढें चालिला ॥ ७१ ॥
चालले गारदी उतावेळ । होती जेवावयाची वेळ ॥
दिल्लीदरवाज्याजवळ । येऊन ते ठेपले ॥ ७२ ॥
चौकीदार दरवाज्यांत । नका जाऊं ह्मणती वाड्यांत ॥
हजिरीसाठीं आह्मी आंत । जातों ऐसें ह्मणाले ॥ ७३ ॥
जाऊं दे आह्मां चौकीदार । तेथें उपसून तरवार ॥
बुदसिंग जमादार । तो कां तेथें तोडिला ॥ ७४ ॥
ऐसी देखोनि मारामार । पळाले ते चौकीदार ॥
हे गारद्यांचे भार । जिकडे तिकडे पांगले ॥ ७५ ॥
ठीक दो प्रहरांत । करूनि विश्वासघात ॥
गारदी शिरले वाड्यांत । नाहीं खबर कोणासी ॥ ७६ ॥
हत्ती यावया जावयास । मोठा उंच करायास ॥
ह्मणोनियां दरवाज्यास । पाडिलें होतें रायानें ॥ ७७ ॥
त्या दरवाजियावरून । गारदी शिरले तिकडून ॥
सफेलीवर चढून । वाडा बळकाविला तो ॥ ७८ ॥
गारदी मोठे अनिवार । करूं लागले मारामार ॥
सन्मुख भेटला तो ठार । जिवें मारूं लागले ॥ ७९ ॥
इच्छाराम पागे हुजूर । जे कां अवघ्यांमध्यें शूर ॥
येत होते जरूर । कांम रायापाशीं तें ॥ ८० ॥
तुळाजी बोले गारदीयांसी । मार द्या हो गुलामासी ॥
कैसी करुणा देवासी । नाहीं आली तयाची ॥ ८१ ॥
इच्छारामपंतावर वार । ह्मणोनि एक ती तरवार ॥
गाईचा तो आधार । त्याणें केला लपावया ॥ ८२ ॥
नाहीं पाहिलें विचारून । जिवें गाईला मारून ॥
तेथें पाडिला तोडून । इच्छारामपंत तो ॥ ८३ ॥
मोठी गडबड देखून । गारदी आले धाडून ॥
आबाजीपंत उठोन । गेला कवाड लावावया ॥ ८४ ॥

गारदी बोलती 'दीन दीन' । कवाड लावी तांतडीनें ॥
आली वेळ कठीण । ठार तेथें पाडिला ॥ ८५ ॥
नवल जाहलें विख्यात । मारामारी वाड्यांत ॥
खबर दिवाणखान्यांत । गेली रायापासीं ते ॥ ८६ ॥
उठा ह्मणती रायास । गारदी आले मारायास ॥
नाहीं वाट जावयास । गारदी चहूंकडे ते ॥ ८७ ॥
जवळ नाहीं चोपदार । नव्हती एकही तरवार ॥
चाफाजी तो खिजमतगार । होता जवळ एक तो ॥ ८८ ॥
नाहीं रायाला धीर । पडली मोठी ती फिकीर ॥
नव्हते सदर बारगीर । केले होते दूर बापूनें ॥ ८९ ॥
संकट पडिलें दुर्धर । बाहेर न पोहोंचे खबर ॥
नव्हतें कोणी बरोबर । राव जाहले घाबरे ॥ ९० ॥
होता डोकीस फेटा । आंगावर तो दुपेटा ॥
गारद्यांनीं वाटा । धरल्या चहूंकडे ॥ ९१ ॥
जिकडे तिकडे होतें स्वस्थ । कांहीं नव्हता बंदोबस्त ॥
खरगसिंगानें समस्त । कवाडें हो लाविलीं ॥ ९२ ॥
जाऊं ह्मणती राय । दुसरा नाहीं उपाय ॥
आतां दादांशिवाय । नाहीं आश्रा कोणाचा ॥ ९३ ॥
पुरतें चित्तीं बिचारूनी । बरावर शिष्यासी घेऊनी ॥
मग देवघरांतुनी । दादांकडे चालले ॥ ९४ ॥
करती गारदी हे फंद । जिकडे तिकडे कवाड बंद ॥
कैसें साधलें हें द्वंद्व । त्या हो खरगसिंगानें ॥ ९५ ॥
मग एकें धाब्यांतून । राव वरते चढून ॥
तेथें कवाड मोडून । आले माडीवरतें ॥ ९६ ॥
लागला दादांचा निजिध्यास । चुकाऊनी गारद्यांस ॥
लक्ष्मणभट उपाध्यास । बरोबर घेऊन चालिले ॥ ९७ ॥
केली गारद्यांनीं दाणादाण । मारामारी हाणाहाण ॥
राव कोठीच्या जिन्यांतून । दादांकडे गेले ते ॥ ९८ ॥
जाऊनि दादांच्या महालांत । धरिला रायांनीं तो हात ॥
गारद्यांनीं तो आकांत । वाड्यामध्यें केला तो ॥ ९९ ॥

तुह्मीं केला हा फितुर । गारदी मारिती निष्ठुर ॥
ह्मणोनियां जरूर । तुह्मांपाशीं आलों मी ॥ १०० ॥
दादा बोलले रायास । उठले शोध करावयास ॥
होती बातमी गारद्यांस । मागोमाग आले ते ॥ १ ॥
मारामारी करीत । जवळ आले रगडीत ॥
जैसा वाघ गुरगुरत । ती कां गाय देखुनी ॥ २ ॥
गारदी आले यानंतर । दादा न बोले उत्तर ॥
कैसें पीडिलें अंतर । नाहीं तेव्हां बोलले ॥ ३ ॥
नागव्या तरवारी घेऊन । गारदी आले ते चालून ॥
मग दादांसी जाऊन । मिठी घातली रायानें ॥ ४ ॥
राव विनविती दादांस । समजावा गारद्यांस ॥
जें मागतील तें त्यांस । देऊनि वाटे लावा हो ॥ ५ ॥
तुह्मी गरीब नवाज । जिवदान द्यावें आज ॥
सुखी करा हें राज्य । मजला घालुनी कैदेंत ॥ ६ ॥
कराया राज्याचा कळस । केला दादांनीं आळस ॥
सुमेरशिंग त्या वेळेस । जाहला निष्ठुर मारावया ॥ ७ ॥
देखोनि गारद्यांचा भाव । न सोडी दादांसी राव ॥
घाली तरवारीचा घाव । सुमेरसिंग तेव्हां तो ॥ ८ ॥
कां लपतोसी ह्मणोन । तुळाजीनें जाऊन ॥
आणिलें रायासी ओढून । तेव्हां गेली शुद्ध ते ॥ ९ ॥
संकट देखोनि अनिवार । बोले चाफाजी खिजमतगार ॥
लहान लेंकरूं सकुमार । करुणा येऊं दे कांहीं रे ॥ १० ॥
न ऐके सुमेरसिंग । मारूं लागला निःसंग ॥
जवळ होता खरगसिंग । त्यानें घर हें घेतलें ॥ ११ ॥
होऊनि सुमेरसिंग उदास । जाहला निष्ठुर मारावयास ॥
मग धरिलें रायास । चाफाजीनें जाऊन ॥ १२ ॥
धन्य चाफाजी खिजमतगार । जाहला जिवावर उदार ॥
तेथें तो पडला ठार । जो कां रायापासीं तो ॥ १३ ॥
जन्मा येऊन सार्थक । दुसरा नारोजी फाटक ॥
एका वारानें मस्तक । ह्मणोनि तेथें पाडिला ॥ १४ ॥

मग न धरी कोणी धीर । पडली रायावरती मार ॥
हाणले वारांवर वार । त्या हो सुमेरसिंगानें ॥ १५ ॥
पृथ्वी समुद्रवलयांकित । ज्याची असे अंकित ॥
नाहीं मारल्याची क्षित । धर्म कलियुगाचा ॥ १६ ॥
धरून दादांचा विश्वास । कैसा घातला हा फांस ॥
आहा, केला हा नास । कैसा कुलक्षय तो ॥ १७ ॥
माता कापी बाळकास । कोण राखी तयास ॥
तैसी गत रायास । केली ती हो दादांनीं ॥ १८ ॥
युद्धाठाई अभिमन्यूस । करूनि वेगळे पांडवांस ॥
चक्रव्युहूमध्यें त्यास । कपटेंकरूनि मारिलें ॥ १९ ॥
तसेंच केलें यथार्थ । जेथें न कळे पुरुषार्थ ॥
केला दादांनीं स्वार्थ । तो कां राज्यपदाचा ॥ २० ॥
बाळ सकुमार कोमळ । नव्हती जागा निर्मळ ॥
राव मोरीच्या जवळ । पडिलें होतें तेथें तें ॥ २१ ॥
करून रायाचें काम । ऐसे पापी जे हराम ॥
करून दादांसी सलाम । सदरेवरुतें आणिलें ॥ २२ ॥
लुटालुटी गारद्यानें । केली वाड्यामध्यें जाण ॥
नाहीं सोवळ्याचा ठिकाण । जोड्यांसकट फिरले ॥ २३ ॥
गारद्यांनीं आकस्मात । तांबे सोवळें धोत्र पात्र ॥
नाहीं ठेविलें तिळमात्र । नेलें त्यांनीं सर्वही ॥ २४ ॥
केले गारद्यांनीं वेडे चार । त्याचा न वर्णवे विस्तार ॥
नाहीं ठेविला आचार । केलें लाचार सर्वांसी ॥ २५ ॥
सर्वही जागा विटाळून । लुटालुटी करून ॥
नाहीं पाहिलें विचारून । हौदामध्यें थुंकले ॥ २६ ॥
आतां वर्णू कोठवर । दादा होते सदरेवर ॥
सुमेरसिंग बरोबर । आणखी होते गारदी ॥ २७ ॥
नाहीं चित्तामध्यें खेद । वाजविती शाहाजानें चौघड ॥
गारदी करती आनंद । झाली फिरवनी दादांची ॥ २८ ॥
कळली वातमी तहकीक । जासूद नारोजी नाईक ॥
येऊन दादांपाशीं ठीक । त्यानें जाबसाल केला ॥ २९ ॥
"काय कीर्ति लोकांत । केला कुळाचा घात ॥"

टाकला गारद्यांनीं हात । इशारत होती ते ॥ ३० ॥
नाहीं गारद्याला धीर । उडविलें नारोजीचें शीर ॥
नाहीं लागला उशीर । गेला त्याचा प्राण तो ॥ ३१ ॥
जाहली वाड्यांत मोठी धूम । बाहेर लोक सामसूम ॥
एकाएकींच धूम । लोक पळूं लागले ॥ ३२ ॥
विचारिती एकमेकांस । नाहीं ठाऊक कोणास ॥
वाड्याजवळ आसपास । माणूस तेथें ठरेना ॥ ३३ ॥
गारदी मोठे अनिवार । करिती बंदुकीचे बार ॥
होऊनि घोड्यावरते स्वार । हरिपंत आले इतुक्यांत ॥ ३४ ॥
देखूनि गारदी निष्ठूर । जाहले हरिपंत चकचूर ॥
न कळे वाड्यांतील प्रकार । तेव्हां मनीं खोंचले ॥ ३५ ॥
केला भोंवताला बंदोबस्त । बोलाविले समस्त ॥
नाहीं चित्तामध्यें स्वस्थ । उपाय न चाले ह्मणोनी ॥ ३६ ॥
बातमी पोहोंचतां जाऊन । सरदार आले ते धाऊन ॥
वाड्यापाशीं येऊन । पुढें सरसावती ते ॥ ३७ ॥
मोठमोठाले उमराव । त्यांचें ऐका तुह्मी नांव ॥
पाटणकर आपाजीराव । जे कां जाले रणशूर ॥ ३८ ॥
बारगे खंडोजी जगताप । ज्याला देखतां सुटे कांप ॥
पराक्रमी प्रताप । बहुत वीर मिळाले ॥ ३९ ॥
रास्त्यांचा समुदाव । गणपतराव आनंदराव ॥
दुसरे मामा त्रिंबकराव । ज्यांची दहशत कर्नाटकांत ॥ ४० ॥
आपा बळवंतराव । गाईकवाड गोविंदराव ॥
प्रतिनिधी भवानराव । तावडतोब आले ते ॥ ४१ ॥
मालोजी घोरपडे सत्वर । आले ऐकतां खबर ॥
मालोजी राजे निंबाळकर । आणखी पागा हुजूर ॥ ४२ ॥
खंडेराव दरेकर । गेले होते भोंसल्यावर ॥
बाळोजी पलांडे अगोदर । आधीं गेले होते ते ॥ ४३ ॥
आले बापू दिवाण । ऐकतांच वर्तमान ॥
बज्याबा पुरंदरे जाण । आले ते कीं धाऊन ॥ ४४ ॥
विसाजी कृष्ण सरदार । हिंदुस्थानचा विचार ॥
जाट रोहिले बेजार । युद्धीं शरण आले ते ॥ ४५ ॥

ऐसे मिळाले अपार । तोफखान्याचा सरदार ॥
भिवराव पानसे करार । आणखी काळे कृष्णराव ॥ ४६ ॥
दामले बाळाजीपंत जाण । गारदी त्याचे आधीन ॥
हें ऐकतां वर्तमान । गेली त्याची शुद्धी ते ॥ ४७ ॥
ऐसें सांगूं कोठपर्यंत । ठोसर बाळाजीपंत ॥
आनंदराव बळवंत । रावजिबाचे लेक ॥ ४८ ॥
राघोजी आंगरे कुलाब्याहून । आले बोलावलें ह्मणून ॥
तेही तयार होऊन । आले लवलाहें ते ॥ ४९ ॥
मोरोबा नाना फडणीस । मुजूमदार चिटणीस ॥
किती धरावे गणतीस । होईल तो विस्तार ॥ ५० ॥
मुत्सद्दी आणि सरदार । ऐसे मिळाले अपार ॥
मिळोन करिती विचार । एके जागां बसून ॥ ५१ ॥
राव गुंतले वाड्यांत । करिती खेद चित्तांत ॥
हत्ती घोड्यांची बुधवारांत । दाटी जाहली मोठी ते ॥ ५२ ॥
जाहला वाड्यांत कहर । बाहेर न पोहोंचे खबर ॥
बुधवाराच्या चावडीवर । बापू बसले जाऊन ॥ ५३ ॥
मोठमोठाले सरदार । मिळोन करती ते विचार ॥
करूं एकदाच मार । गारदी देऊं उडवोनी ॥ ५४ ॥
गुंतले वाड्यांत राय । करितां नये तो उपाय ॥
आह्मांपुढें गारदी काय । ते हो करतील बापूसी ॥ ५५ ॥
नाना फडणीस हरिपंतास । काळजी दोघांच्या चित्तास ॥
मोरोबा दादा एकांतास । बसून करिती खलबत ॥ ५६ ॥
बाळाजीपंत दामले हवालदार । बसून आणवितो खबर ॥
गारदी त्यांच्या बरोबर । कांहीं होते राहिले ॥ ५७ ॥
मिळाले सरदार आटोकाट । बुधवारांत एकची थाट ॥
नाहीं माणसाला वाट । ती कां तेथें जावया ॥ ५८ ॥
दाटी देखून बुधवारांत । हूल पडली शहरांत ॥
जिकडे तिकडे लोक रस्त्यांत । गडबडले मोठे ते ॥ ५९ ॥
दुकानें लाविती हालोहाल । पळतां लोकांचे ते हाल ॥
पुणीयाचे जे कोतवाल । धोंडोपंत जाणते ॥ ६० ॥
न चले कोणाचा उपाय । अवघे ह्मणती हाय, हाय, ॥

एक ह्मणती पुसावा ठाय । त्या कां गारदीयांचा हो ॥ ६१ ॥
एक ह्मणती करूं हल्ल्यास । दुजे वर्जिती हो त्यांस ॥
खवळतां गारद्यांस । वाड्यांत करिती आकांत ॥ ६२ ॥
गारदी हे मदोन्मत्त । न चले कोणाचें मत ॥
बापूचें जें अनुमत । हल्ला करूं नये तो ॥ ६३ ॥
तुह्मी हल्ला करूं जाल । वाड्यांत गारदी करतील हाल ॥
करा दुसरा निकाल । त्या हल्ल्यावेगळा ॥ ६४ ॥
ऐकोन बापूचे वचनास । मानलें अवघ्यांचे चित्तास ॥
नाहीं केलें हल्ल्यास । मग हो त्यांणीं हल्याचे ॥ ६५ ॥
मनसुबे नानापरी । करिती आपुले परोपरी ॥
मग इतकीया उपरी । चोपदार आला वाड्यांतून ॥ ६६ ॥
मुत्सद्दी आणि सरदार । मिळोन करिती ते विचार ॥
तों आला चोपदार । ह्मणे दादांनीं पाठविलें ॥ ६७ ॥
पाठविलें कोणत्या कामास । अवघे पुसती हो त्यास ॥
बज्याबा मालोजी दोघांस । बोलाऊं आलों मी ॥ ६८ ॥
मग दोघां जणांस । चोपदार घेऊन गेला त्यांस ॥
नाहीं येऊं दिलें माणसास । बाहेर ते ठेविले ॥ ६९ ॥
बरोबर एक खिजमतगार । नाहीं हतीयार तरवार ॥
मग दादांसी नमस्कार । केला बज्याबानीं तो ॥ ७० ॥
मालोजीनें केला राम राम । दादा बसले ते आराम ॥
जाहालें रायाचें काम । वर्तमान सांगितलें ॥ ७१ ॥
ऐकतांच वृत्तांत । खोंचले ते चित्तांत ॥
तुह्मीं कीर्ति लोकांत । बरी केली चांगली ॥ ७२ ॥
गेली गोष्ट नाहीं येत । ऐसें दादा बोलत ॥
करा पुण्याचा बंदोबस्त । द्वाही आमची फिरवुनी ॥
आज्ञा शिरीं वंदुनी । बाहेर आले ते निघुनी ॥
अवघ्यांपाशीं येऊनी । सांगती ते खबर ॥ ७४ ॥
जाहलें बरें नाहीं आतां । अवघे दचकले ऐकतां ॥
ह्मणती दादांनीं पुरता । तो वैर साधिला ॥ ७५ ॥
गारदी निष्ठुर हें जाण । घेतला रायाचा तो प्राण ॥
चाफाजी हा निधान । तो कां जाहला सोबती ॥ ७६ ॥

केली वाड्यांत धामधूम । कितेकांचें केलें काम ॥
हुजूर पागे इच्छाराम । आणखी नारोजी आहेत ॥ ७७ ॥
आणखी तोडिलें वाड्यांत । नाहीं जाऊन पाहिलें आंत ॥
ऐसा सांगतां वृत्तांत । शक्ती गेल्या अवघ्यांच्या ॥ ७८ ॥
केलें दादांनीं उचित । आतां बरी नाहीं स्थित ॥
केलें कर्म अनुचित । त्या कां गारद्यांनीं हो ॥ ७९ ॥
आला कठीण वख्त । गळाली अवघीयांची शक्त ॥
सरदार मुत्सद्दी समस्त । गेले आपुले घरोघर ॥ ८० ॥
प्रतिनिधी भवानरायास । नेलें बोलाऊन त्यांस ॥
त्यांणीं जाऊन दादांस । उत्तर केलें चांगलें ॥ ८१ ॥
तुह्मी तर साधू परमार्थी । केला राज्यपदा स्वार्थ ॥
मोठा करून पुरुषार्थ । बरा केला लौकिक ॥ ८२ ॥
क्षण न लागतां गारद्यांस । मी एकला पुरे यांस ॥
यांणीं केला हा नाश । कर्म अघटीत तें ॥ ८३ ॥
बरें झालें अजून काय । गारदी ह्मणजे पदार्थ काय ॥
ऐसें बोलतां भवानराय । गारदी भ्याले मग ते ॥ ८४ ॥
ऐसें करितां उत्तर । दादा न करी प्रत्योत्तर ॥
पडिलें रायासी अंतर । चित्तीं दादांच्या जाणिलें ॥ ८५ ॥
समस्तांसी हळ हळ । जाहाला रायाचा तो काल ॥
तो होतांचि संध्याकाळ । बातमी शहरांत फूटली ॥ ८६ ॥
आकांत वर्षला थोर । पुणीयामध्यें घरोघर ॥
कर्म केलें आघोर । बुद्धी आनंदीबाईची ॥ ८७ ॥
जाहला संध्याकाळ वेळ । होतें अवघें निश्चळ ॥
आनंदीबाई रायाजवळ । जाऊन तेथें बैसली ॥ ८८ ॥
कपट हें चित्तांत । ह्मणे लोककुळाचा घात ॥
दांभिक भक्ती जनांत । दावी राक्षसी माउली ॥ ८९ ॥
चरित्र हें स्त्रियेचें । न वर्णवे वेदवाचें ॥
कर्म केलें साचें । दादांसी शिकऊनी ॥ ९० ॥
पार्वतीबाईसी दुःख फार । शोक करिती अनिवार ॥
मारिला बाळ सकुमार । नाहीं आली करुणा ती ॥ ९१ ॥
कर्म केलें करूनी भेद । नाहीं चित्तामध्यें खेद ॥

करा माझा शिरच्छेद । ह्मणोनि दादांसी बोल्ली ॥ ९२ ॥
आपटिलें मस्तक । ह्मणे कुळाचा दीपक ॥
पेशव्यांचे वंशीं एक । होता तो कीं राहिला ॥ ९३ ॥
त्याचा पुशिला हा ठाय । लेंकरूं अज्ञान हें राय ॥
तुह्मी पुढें वांचोनि काय । मोक्षपदा जाल हो ॥ ९४ ॥
तुमचे हातीं देऊन रायास । माधवराव गेले कैलासास ॥
नाहीं होऊं दिले नवमास । तेंही लाविलें ठिकाणीं ॥ ९५ ॥
जाहलें दुःख हें दुगुणें । आठऊन रायाचे ते गुण ॥
हस्तें हृदय पिटून । शिरींचे केश तोडिले ॥ ९६ ॥
सगुणाबाई आकांतून । कळवळ सुटली पोटांतून ॥
गेले राव दुनयांतून । कोठें पाहूं आतां मी ॥ ९७ ॥
सुटला आवघ्यां गहींवर । गहजब गंगाबाईवर ॥
कैसा रुक्मिणीवर । देव तो हा क्षोभला ॥ ९८ ॥
निष्ठुर जाहला चिंताक्रांत । कैसा करविला आकांत ॥
पडिले राय ते एकांत । दादांच्या महालांत ॥ ९९ ॥
रात्र जाहली एक प्रहर । तेथें मिळाले समग्र ॥
पुणीयासारखें हें नगर । आजी रायांनीं त्यजिलें ॥ २०० ॥
साहित्य रायाचें करावयास । सोंपलें त्रिंबकराव मामास ॥
हें तुटलें आकाश । लावितां नये ठिगळ ॥ १ ॥
जाहला गंगाबाईचा । निश्चय बरोबर जावयाचा ॥
मोडिला कल्प तिचा । अवघ्या बायांनीं मिळून ॥ २ ॥
परतून ह्मणे मी न राहें । आनंदीबाईनें केलें काय ॥
लोटून खोलींत लवलाहें । बाहेर कडी घातली ॥ ३ ॥
मग उपाय चालेना । न ये देवासी करुणा ॥
ऋणानुबंध हा जाणा । दोघांचा हो तितका ॥ ४ ॥
आकांत एकच कल्लोळ । पडिला मोठा तो घोळ ॥
हृदय जळून जाहलें कोळ । सुटला गहिंवर अवघ्यांसी ॥ ५ ॥
रात्र दो प्रहरां समयास । नेले राव नदीतीरास ॥
अग्न देऊनियां त्यांस । केलें दहन यथाविधी ॥ ६ ॥
विजय संवत्सराचें नांव । शके सोळाशें पंच्याण्णव ॥
भाद्रपदाचें वैभव । शुक्लपक्ष होता तो ॥ ७ ॥

तो हा जगन्निवास । सोमवार दिवसास ॥
अनंतचतोर्दशीसमयास । वास केला स्वर्गलोकींचा ॥ ८ ॥
जाहलें हें ऐका वर्तमान । आलें रायाला विमान ॥
रायासाठीं दिधले प्राण । गेले तेही बसून ॥ ९ ॥
केला रायाचा घात । त्याचा होईल आघात ॥
त्याला यम नरकांत । कुंभपाकीं घालील ॥ १० ॥
जे कां होते भेदांत । त्यांसी होईल अधःपात ॥
त्यांचे पूर्वज नरकांत । पडतील ते रवरवीं ॥ ११ ॥
विश्वास बापूवर प्रमाण । कैसा केला अभिमान ॥
कळलें असतां वर्तमान । नाहीं रायाला कळविलें ॥ १२ ॥
मोठमोठाले जे आंत । होते ह्या कां फितुरांत ॥
त्यांचा होईल निःपात । आणखी यमजाचणा ॥ १३ ॥
नाहीं पापासी अंतपार । नये नरदेह वारंवार ॥
याजकरितां सारासार । विचार नाहीं पाहिला ॥ १४ ॥
ऐसे दुष्ट जे साचार । त्यांचा न करावा उच्चार ॥
जाहला पृथ्वीवर भार । तो का त्या पापिष्ठांचा ॥ १५ ॥
राय गेले स्वर्गासी । काळजी लागली बहुतांसी ॥
पाहा देवाच्या चित्तासी । कैसें आलें ह्मणती हो ॥ १६ ॥
ज्याचे स्वरूप गुण । गहींवर ते आठवून ॥
जाहलें वाईट ह्मणोन । कष्टी लोक होती ते ॥ १७ ॥
कैसें सिंहाचें घर । जाऊन जंबूक भितर ॥
ईश्वरमाया इतर । कौतुक नव्हे कोणाचें ॥ १८ ॥
काय राज्याचा विषय । केला दादांनीं कुळक्षय ॥
नाहीं धरिलें चित्तीं भय । केलें आपुलें अनहित ॥ १९ ॥
आपुलें नासीक कापून । वंशा केला अपशकुन ॥
कामधेनू विकोन । लोकाघरीं ताक मागे ॥ २० ॥
देखूनि पुरुष हा दुसरा । आवडे चित्ताला बरा ॥
ह्मणून मारून भ्रतारा । विधवा जाहली पाहा हो ॥ २१ ॥
चिंतलें दे चिंतामणी । तो हा घालून गोफणीं ॥
दिल्हा दूर हो झोंकोनी । पाहे किती लांब गेला ॥ २२ ॥
आपली कांता सुंदर । न येती हो चित्तावर ॥

वेश्या आवडे प्रियकर । ह्मणोनि तिसी मारिलें ॥ २३ ॥
कल्पतरू दे कल्पिलें । तोडोनि त्याचें घर बांधिलें ॥
परिसालागीं टाकिलें । नेऊनि महा डोहांत ॥ २४ ॥
आतां असो हा दृष्टांत । जाह्ला ऐसाचि वृत्तांत ॥
नाहीं हो पापाला अंत । कलियुगाचा महिमा ॥ २५ ॥
देखोनि कलियुगाचा भाव । केली देवांनीं ती माय ॥
कैलासीं नेले नारायणराव । पुण्यश्लोकी पवित्र ॥ २६ ॥
राव योगी ते साचार । केली तपश्चर्या फार ॥
जाह्ला अंतकाळीं संचार । कीं हें राज्य भोगावें ॥ २७ ॥
मग जन्मून पेशव्यांचें कूस । राहून वर्षें एकोणीस ॥
परंतु देवाचे करणीस । उपाय तो न चाले ॥ २८ ॥
राज्य आणि स्त्रीसुख । नाहीं कधीं भोगिलें दुःख ॥
परमार्थी वर्तणूक । स्नानसंध्या देवपूजा ॥ २९ ॥
नाहीं शरिराला रोग । राज्य करावया योग्य ॥
जैसा गंगेचा ओघ । तैसे राव सुशील ते ॥ ३० ॥
धार्मिक बुद्धिवान् ते फार । जाणे विचार सारासार ॥
त्यांजकरितां वारंवार । कीर्ती रायाची वर्णिली ॥ ३१ ॥
कुलांगार हे दुष्ट जाण । काय त्यांच्या आधीन ॥
कलियुगींचें महिमान । जाली सृष्ट उफराटी ॥ ३२ ॥
जे कां करिती दान धर्म । त्यांचे पाठीं लागे कर्म ॥
जे कां करिती अकर्म । स्वधर्म चाले त्यांचा ॥ ३३ ॥
ऐसे कलियुगाचे गुण । किती वर्णावे अवगुण ॥
होईल विस्तार ह्मणोन । थोडक्यांत आटोपिलें ॥ ३४ ॥
नारायणराव यांचें चरित्र । तुह्मी ऐका तें पवित्र ॥
तेणेंकरून होईल मित्र । देव तुह्मांलागीं तो ॥ ३५ ॥
आपुलें दिसो नेदी आंग । कौतुक करितो श्रीरंग ॥
ह्मणोनि पांडुरंग । वर्णी चरित्र रायाचें ॥ २३६ ॥

[मिती शके १७३० विभवनाम संवत्सरे आश्विन शुद्ध ५ मंदवासरे मुक्काम पुणें येथे समाप्त जाह्लें असे.]





मुंबईचें इंग्रजी आरमार.

सर्व जहागिरदार व दौलतदारांनीं आपआपले तर्फेचा एक वकील हुजूर सरकारांत ठेवीत जावा. त्या वकिलानें आपले यजमानाचीं विनंतिपत्रें सरकारांत प्रविष्ट करून, जी विनंति करणें असेल ती करीत जावी. कोतवाल हजर नसल्यास कोणत्याही मोठे कामदारानें कोतवाली कामाचें कायद्याचें पुस्तक जवळ ठेवून, त्याप्रमाणें त्याचे कामाचा बंदोबस्त ठेवीत जावा, व मोठे कामदारांनीं अशी अंदेशा कदापि मनांत आणूं नये कीं, कोतवालाचें काम मी कसा करूं? ही ईश्वराची मुख्य सेवाच आहे असें जाणून, अति यत्न करून हें काम करीत जावें. तें असें की, हरएक शहर व कसबे व गांवगन्ना येथील कोतवालांनीं कारकुनांकडून घरें किती व इमारती किती याचा झाडा लिहीत जावा, व खानेसुमारीचाही हिशेब दुरुस्त राखावा: आणि हरएक पेठेंतील दर घरचीं मनुष्यें किती तीं लिहून ठेवावीं. तीं कशा प्रकारचीं मनुष्यें आहेत, असा झाडा असावा. ह्मणजे बायका व पुरुष व मुलें किती आहेत, हें लिहिणें तयार ठेवावें. आणि शेजाऱ्याचे घरास घरजामीन घेऊन ठेवीत जावें, व पेठा ठरवून दरएक पेठेंत त्या पेठेचा एक मुख्य अधिकारी कामदार करावा, आणि त्या पेठेंतील चांगलें अगर वाईट काम जें होणें तें त्याचे विद्यमानें होत असावें, व पेठेंत एक जासूद नेमावा. त्या जासुदानें, रात्रीं अगर दिवसा, त्या पेठेंत जो कोणी उतरण्यास येईल अगर कोठें जाईल, त्याचा झाडा कारकुनाकडून लिहीत जावा; आणि त्यानें अशी साफ ताकीद करीत जावी कीं, जरकरितां चोर चोरीस येतील, अथवा आग लागेल, किंवा या प्रकारचें कोणतेंही घातांचें कलम होईल, ते समयीं शेजारचे अडोसीपडोसी राहणारांनीं त्यास मदत करून, तें संकट निवारण करीत जावें. जो कोणी अशा जरुरीचे समयीं त्या ठिकाणीं हजर न होईल, तो सरकारचा गुन्हेगार आहे अशी ताकीद करावी; व पेठेंतील अधिकारी कामगारांस व शेजारचे राहणारांस व कोणास देखील खबर न देतां कोणी कोठें बाहेर गांवास जाऊं नये; व तसेंच खबर न देतां कोणास कोठें उतरूंही देत जाऊं नये. ज्यास कोणी जामीन मिळत नसेल, त्याजला राहण्यास एक निराळी धर्मशाळा करून ठेवावी; आणि ज्या पेठेंत जी धर्मशाळा असेल तेथें त्या पेठेंतील मुख्य कामगारांनीं व रखवालदारांनीं त्याची चौकशी करीत जावी, व पेठेंतील कामगारांनीं आपले पेठेंतील कोणाचे घरीं जमा किती, ह्मणजे कोणास उत्पन्न किती व त्याचा खर्च किती, ह्याविषयीं बारकाईनें समजून पहात जावें. आणि ज्याचें उत्पन्न थोडें असून जो खर्च बहुत ठेवितो, तो खास दगलबाज आहे यांत कांहीं संशय नाहीं, असें समजून त्या प्रकर्णी चौकशी ठेवीत जावी. ह्मणजे जमा थोडी असून इतका खर्च कसा चालतो, हा कोठून काय आणितो, अशी

बारकाईनें चौकशी ठेवावी. आपली कुलीनता व कल्याण सोडूं नये ह्मणजे उगाच एखाद्याचा घातही करूं नये. हें कर्तव्य यजमानाचे दौलतीचें कल्याण इच्छिण्याचें व बंदोबस्त ठेवण्याचेंच आहे असें जाणावें. हें कांहीं जुलूमजबरदस्तीपैकीं काम आहे असें समजूं नये.

हरएक प्रकारचे दलालांकडून जामीन घेऊन, नंतर ते दलाल बाजारांत नेमावे. आणि जी कांहीं खरेदी किंवा विक्री होईल, ती त्या दलालास कळवून होत असावी. आणि असें ठरवावें कीं, दलालास खबर न देतां जो कोणी खरेदी किंवा विक्री करील, त्यांना दंड द्यावा लागेल, व खरेदी करणार व विकणार या उभयतांचीं नांवें रोजनाम्याचे कागदांत लिहून ठेवीत जावीं, व बाजारांत जितकी कांहीं खरेदी विक्री होईल, ती पेठेंतील अधिकारी कामगार व रखवालदार यांचे विद्यमानें होत असावी. शहरचे रस्त्यारस्त्यांत व गल्लोगल्लींत संरक्षणाकरितां रात्रीं चौकीपहाऱ्याचा बंदोबस्त पक्का ठेवावा. तो असा पूर्ण सावधपणानें कीं, पेठेंत अगर बाजारांत व गल्लींत कोणीही अनओळखीचा मनुष्य रात्रीं राहूं देऊं नये. व चोर व उचले व गट्टेछोड व खिसे कापणार वगैरेंची फारच बारकाईनें चौकशी ठेऊन, त्यांस पकडून त्यांचें पारिपत्य असें करीत जावें, कीं पुन्हां या लोकांपैकीं कोणाचा किंचित्‌ही कोठें प्रवेश न होय. असा बंदोबस्त ठेऊन, या प्रकारचे लोकांस कोठेंही राहूं देत जाऊं नये; व जो कांहीं असबाब, जिन्नस, हरएक कांहीं, जो चोरीस जाईल, अगर कोणी लुटून नेईल अथवा हरवेल, त्या जिनसासुद्धां चोरास पकडून हजर करीत असा, रखवालदाराकडून बंदोबस्त राखावा. रखवालदार असें न करील, तर तें रखवालदारीचें काम त्याजकडून दूर करून, त्याचें उत्पन्न दुसरे रखवालदारास देऊन त्या कामावर दुसरा नेमावा.

मयताचे माल व जिनगी यांविसीं पुरी चौकशी असावी. जरकरितां त्याचा वारीसदार चौकशीअंतीं खरा ठरून, तोच त्याचा वारीसदार असें पुढें नजरेस येईल, तर ती जिनगी त्यास देण्यास कांहींएक हरकत करीत जाऊं नये. वारीसदार समयीं हजर नसेल तर ती जिनगी अमीन याचे ताब्यांत देऊन, त्या जिनगीचा तपशील हुजूरसरकारांत कोतवालानें करीत जावा. कारण कीं, कोणतेही रीतीनें त्याचे वारीसदाराचा ठिकाण लागोन ती जिनगी त्या वारीसदारास मिळावी. या कामांतही बहुत भलेपणा व कुलीनता स्वीकारीत जावी. ह्मणजे नीच मनुष्यासारखें काम करून जिनगीची अफरातफर ह्मणजे घालमेल करूं नये.

मद्य कोठेंच किंचित्‌ही न राहे असा फार बंदोबस्त असावा, व मद्य खरीद करणार व विकणार व प्राशन करणार यांजला पकडून, मुख्य कामगाराकडून

त्यांस अशी शिक्षा देत जावी कीं, तें पारिपत्य पाहून दुसरे मनुष्यानें देखील लज्जा धरावी, कीं असें कर्म कदापि करूं नये. योग्य कारणास व औषधाकरितां जर कोणी मद्य घेईल, तर त्यास मनाही करीत जाऊं नये. औषधास कांहीं चिंता नाहीं.

बाजारचा निरख सस्ताईनें कायम राही, असा बंदोबस्त अति यत्नेंकरून ठेवावा. ज्यापाशीं फार द्रव्य आहे, त्याजला फार गल्ला खरीदी करूं देऊं नये. कारण, हंगामीं खरीदी करून महर्गतेंत विक्रय करून नफा मेळवावा, असा हेतु मनांत धरून तो खरीदी करितो. त्या एकासच खरीदी करूं दिल्यास गोरगरीबांस धान्य दुर्मिळ होऊन त्यांचीं मुलेंमाणसें उपोषी मरतात व त्यायोगें निरखही महाग होतो. सबब, जो गल्ला खरीदी करितो, त्याचे घरचीं मनुष्यें किती व त्याचे निर्वाहापुरतें खरीदी करीत असेल तर घेऊं द्यावा. कारण, जो घेऊन विकणार त्याविषयीं प्रतिबंध असावा. ह्मणजे निरख या स्थितीवर कायम राहील.

नवरोजी वगैरे ईदीचा समारंभ बहुत यत्नेंकरून करीत जावा. कारण, सर्व ईदींत–ईदे-नवरोज–ही ईद मोठी धरली आहे, व या ईदीचा प्रारंभ ज्या समयीं सूर्य मेषराशींत येतो तेव्हांपासून आहे. व माहे, फरवरदी या महिन्यापासून आरंभ आहे. या महिन्यांतील एकोणिसावे तारखेस बहुत कल्याणाचा दिवस आहे. त्या दिवशीं ईद व आरबीबेहस्त या महिन्यांतील तिसरे तारखेस ईद आहे. अशा तीन ईदी या दोन महिन्यांत आहेत. या ईदींचा वहिवाटीप्रमाणें समारंभ करीत जावा, व षबेनवरोज व षबेषर्फ या दोन ईदींचे रात्रीस षबेबरातप्रमाणें ह्मणजे दिपवाळीचे रात्रीअन्वयें दीपोत्साह करीत जावा. आणि पहिले रात्रीचे प्रातः-काळींच ईद आहे, त्या रात्रीस ईदीचे समयीं चौघडा वाजवावा. ईदीचे दिवसांत दर प्रहरास चौघडा वाजत असावा.

बायकांनीं जरूरीचे कारणाशिवाय घोड्यावर बसूं नये. हरएक ठिकाणचे पाणवठे व पाणी भरण्याच्या जागा व स्नानांच्या जागा, पुरुष व स्त्रिया यांचे भिन्न भिन्न असावे. स्त्रियांची व पुरुषांचे स्नानाची एकच जागा असूं नये. स्त्री जिन्यांतून उतरत आहे, तर खालून पुरुषानें वर चढूं नये. .... स्त्रियांनीं दारांत सहसा उभें राहूं नये. कारण, तो जाण्यायेण्याचा रस्ता पडल्यामुळें स्त्रीची अमर्यादा होण्याचा संभव असतो.



# ११. मराठ्यांची भूगोलविषयक माहिती.

नाना फडणवीस ह्यांचे दप्तरांत एक भूगोलविषयक माहितीचें गुंडाळें सांपडलें आहे. तें संपूर्ण नसावें असें त्याच्या स्वरूपावरून दिसतें. ह्या गुंडाळ्यावरून मराठ्यांच्या राज्यामध्यें जगांतील अन्य राष्ट्रांविषयींचें भूगोलविषयक ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न कसा केला होता, त्याची चांगली कल्पना येते. ही माहिती वाचून पाहिली ह्मणजे मराठे मुत्सद्दी, हिंदुस्थानाखेरीज इतर राष्ट्रांच्या संबंधानें देखील, सर्व प्रकारचें ज्ञान संपादन करीत असत, असें स्पष्ट दिसून येतें. ह्या गुंडाळ्यामध्यें इंग्रज लोकांसंबंधीं जी माहिती दिली आहे, त्यावरून नाना फडणविसांस युरोपखंडाचा भूगोल व इतिहास चांगला माहित असावा, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं.

श्री.

"इंग्रजलोक यांची उत्पत्तीचा वगैरे मजकूरः— यांची विलायत व यवनांचें रूमस्थान नजीक आहे. रूमाचे पश्चिमेस कहरदर्या. यांत विलायत मुख्य टापू, अवरस व चवरस पाऊणशें कोस आहे. त्याचें नांव 'इंग्लिश' लंधन. वरकड आणखी समुद्रांत खुषकी, बेटें व शहरें बहुत आहेत. कर्नाटकच्या पश्चिम समुद्रांत हजार कोस टापू आहे, तेथें फरासीस राहतात. मुख्य टोपीगारांत शिपाई व पातशाहा फरासीस, व आपले खुषकीवर मुख्य एकछत्री रूमचा बादशाहा. त्यापासून दिल्ली वगैरे शेकडों सुभे सरसुभे ह्मणवितात. त्यांत इकडे, हिंदुस्थान सोळा सुभे, व दक्षण साडेसहा सुभे, मिळोन साडेबेवीस सुभ्यांचा सरसुभा दिल्ली. यास रूमाहून तुगरा शिक्का वगैरे येत असतात. दिल्लीस 'हिंदुपतपातशाहा' असें ह्मणतात. असे रुमाखालीं सरसुभे बहुत. दिल्लीखालीं मुलूख रामेश्वरपासून काश्मीर, गंगोत्री, बद्रीनाथपर्यंत. याची उत्तर दक्षिण लांबी पंधराशें कोस, आणि रुंदी पूर्व समुद्र, महोदधीपासून पश्चिम समुद्र रत्नाकर याचे मध्यें. त्यांत रामेश्वराकडे अरुंद आहे. आणि उत्तरेकडे जसें जसें जावें, तसें रुंद अधिक आहे. दिल्लीपासीं पूर्वेस २०० कोस. कलकत्ता पांच सहाशें कोस. पश्चिमेकडे द्वारका च्यारशें कोस. याप्रमाणें हिंदूंचा गुजारा अटक व काश्मीरपर्यंत. पुढें हिमालय शुद्ध उत्तरेस वायव्येचे कोनास. पृथ्वीचा अंत नाहीं. अटकपार झाडून यवन मुसलमान यांची वस्ती, व बादशाही मोठ्या मोठ्या आहेत. तितके रूमवाले याचे ताबीन आहेत. दिल्लीप्रमाणें अटके-

पासून पांच सहाशें कोस रूमाकडे जाण्यास पहाडी वगैरे मुलूख लागतो. नंतर रूमवाल्याचा मुलूख आठशें कोस साफ मैदान आहे. पुढें रूम व शाम शहरें लागतात. मुलूख अस्तंबोल, तेथें वजीर व बादशाहा असतात; तीं शहरें मध्यें आहेत. त्यांच्या गीर्दनवाईकडे उत्तर वायव्येस व पूर्व पश्चिम आठशें आठशें कोस, कोणीकडे गेलें तरी पहाड वगैरे खडा नाहीं. मुलूख साफ, भरवस्ती, व संस्थानें, व सरसुभे, व पातशाहाती, बहुत आहेत. त्या मुलुखांत मोठ्या नद्या तीन आहेत. त्या हिमालयांतून येऊन पश्चिमेस कहरदर्यास मिळाल्या आहेत. त्यांची रुंदी बेवीस, चोवीस, अठ्ठावीस कोस याप्रमाणें आहेत. त्यास मिठादर्याय ह्मणतात. त्यांतून मोठीं मोठीं जहाजें व नावा माल भरून देशादेशांत जिकडे पाहिजे तिकडे नेतात, आणितात, व जिकडे पाहिजे तिकडे जावें. समुद्रांत येऊन मग इकडे वगैरे पश्चिम रत्नाकरांतून या खुषकीवर यावें. असे रस्ते जलमार्गें पाहिजे तिकडे जहाजांतून जावें. खुषकीवरून पायमार्गें जावें, तर लांब बहुत, अडचणी फार, व हजारों कोसांचे हेलपाटे पडतात. रूमाचा मुलूख आठशें कोस, चहूंकडे गीर्द सफा मुलूख जाहल्यावर पहाडी वगैरे मुलूख लागतो. तो पूर्वेकडे पांचशें कोस. मग हिमालय पहाड पश्चिमेस साफच मुलूख, परंतु शें पन्नास कोस खडतर लागून मग कहरदर्याय. इकडे यावयास आठशें कोस सफा जाल्यावर, पांच सहाशें कोस पहाडी वगैरे मुलकांतून येऊन ज्वालामुखीकडे यावें व उत्तरेस रूमापासून आठशें कोस सफा जाल्यावर मग पहाडी वगैरे लागतो. मग पलीकडे अंत नाहीं, व दिवसही कमती होत होत साठ घटिका रात्रच असा अंधकार आहे. तिकडे मनुष्याचा संचार नाहीं. रूमास तख्तावर शिकंदर बादशाहा पराक्रमी जाहला. तो स्वारीस निघून जितकी खुषकी आणि मनुष्याचा संचार आहे, तेथपर्यंत फिरोन पुढें अंधकार आहे तिकडे गेला. लक्षावधी फौज बरोबर होती. पुढें जाण्याचा इलाज नाहीं. तेव्हां त्या ठिकाणीं भिंत घालून मनुष्याचे जाण्याची हद्द करून ठेविली. नंतर समुद्रांत महोदधी व रत्नाकर हे दोन्ही समुद्र फिरोन पुढें कहरदर्यांतून, अरबस्थानाचे पश्चिमेकडून, रामेश्वर डावा घालून लंकेपलीकडून, चीनीचे पूर्वेकडून, हिमालयाच्या सुमारापर्यंत येऊन, आणखी कहरदर्यायांत आऊन, पलीकडे जहाज चालण्याचा उपाय नाहीं असें पाहून, कहरसमुद्रांत हद्द करून ठेविली. ती पुतळी करून ठेविली. तिकडे जहाज जात नाहीं. याप्रमाणें पराक्रम करून मुलखाचा बंदोबस्त केला. रूमाचे शुद्ध दक्षिणेकडे खुषकी वाढत आली आहे, ती रामेश्वरचे पश्चिमेकडे रत्नाकर समुद्राचे पलीकडे आली. रूमाचे मुलखापासून इकडे यावें, तर हिंगजेकडे येऊन द्वारकेकडे

यावें. आणि त्याच खुषकीवर फिरणें तर, त्या मुलकापासून आठशें कोस मक्क्यास अर्बस्थानांत यावें. मसकत, बसराई, वगैरे बातशाहाती व मुलूख आहे. मोतीं त्या बंदरास रास उत्पन्न होते, व पुतळी व रयाल (?) होतात, ती खाण सोन्याची व चांदीची अर्बस्थानांत आहे. पिंवळी वाळू आहे. तिची भट्टी लाऊन त्यांत उत्पन्न करितात. आणि पुतळ्या करून त्यांजवर शिक्का पाडतात, व पांढऱ्या वाळूची भट्टी लाऊन रुपें उत्पन्न करितात. त्यांत तांब्याचा खार टाकून रयाल शिक्का पडतो. चांदी निखालस ठेवणें तर शिक्का पाडीत नाहींत. तसेच गट इकडे आणितात. त्या मुलुखांत खारीक, खजूर, बेदाणा, लवंगा, व पोवळीं, वगैरे किराणा बहुत उत्पन्न होतो. तो इकडील बेपारी जहाजें घेऊन जाऊन, रत्नाकर समद्रांतून पलीकडे पश्चिमेस अर्बस्थानांत जाऊन तेथील बंदरावरून घेऊन येतात. तो मुलूख रूमाच्या मुलुखापासून दक्षिणेस शेवटपर्यंत चवदाशें कोस लांबी आहे, व सातशें कोस रुंदी आहे. यांत अरब व हाबशी व मुसलमान वगैरे आहेत. याचे शेवटीं दक्षिणेकडे वगैरे टापू किरकोळ आहेत. त्यांजवर इतर टोपीगार आहेत; आणि मोठा टापू आहे त्याजवर फरासीस आहेत. कलम १.

पूर्वेस महोदधी समुद्रापलीकडे टापू आहे, त्यास चीन ह्मणतात. तो हिमालयाच्या पहाडापासून साफ मुलूख दक्षिण उत्तर लांबी चवदाशें कोस आहे. रुंदी सातशें कोस. त्याचे पूर्वेकडे कहरदर्याय व पश्चिमेकडे महोदधी समुद्र. त्या मुलुखांत एक मोठें शहर आहे, त्याचें नांव चीन. तेथें मुख्य बादशाहा राहतात. त्यामुळें त्या टापूचें नांव चीन पडलें. तें शहर बहुतच उत्तम आहे. हवेल्या वगैरे भूमी व भिंती चिनीचे पेल्याप्रमाणें व कांच बिलोरमय सारें. तें पाहिलें असतां स्वर्ग पाहण्याची इच्छा रहात नाहीं. याचें कारण, तें पूर्वीं विश्वकर्म्याचें स्थान. तेथें पूर्वीं पांडवांनीं मयसभा केली होती. त्या समईं कारागीर त्या बादशाहापासून मागून आणिला होता. त्याचें नांव मयासुर. त्या टापूवर रयत गोरेच लोक ह्माइून. त्यांस चीनवाले ह्मणतात. तेथें दुसरे जातीचें मनुष्य इंग्रज वगैरे कोणासच आपले बंदरांत घेत नाहींत. त्याचे राज्यांत कारागिरी व कसबी अतिकुशल लोक. त्यांनीं कसबावर पैसा उत्पन्न करीत असावा. त्या राज्यांत उत्पन्न जिन्नस होतोः—रेशीम, रेशमी सरंजाम, व मातीचा जिन्नस, त्याजवर कवड्यांचें रोगण, व बिलोरी सरंजाम, झुंबर, झाडें, हंड्या, फाणूस, वगैरे पितळी पानें, व हरजिनसी पितळी सरंजाम, व कांच व आयने मोठे, घड्याळें, व दुरबिणी, व छत्र्या, व पंखे, वगैरे कागदी, चंदनी, व कापड चिटें वगैरे. त्यास

चंदन रुई इकडून जाती, त्याची चीज करून विकतात, व तसबिरा, व पुतळ्या, मातीच्या, व लोखंडी हत्यारें, व शस्त्रें, व पेट्या, व चर्मी सरंजाम, तयार करितात; व इकडून कथील जातें त्याची चांदी करून गट बांधून त्याजवर छापे करून देतात, ते इकडील बेपारी घेऊन येतात. याप्रमाणें हरतऱ्हेनें उत्पन्न करून इतर टापूंचा पैसा ओढतात. जिन्नस देऊन पैसा घ्यावा, परंतु तो जिन्नस जाया जाहला असतां त्याचें कांहीं उत्पन्न होऊं नये. चहूंकडील बेपारी जहाजें घेऊन जातात. त्यांनीं वीस कोसांपलीकडे राहावें. आपले बंदरास जहाज ठंऊं देत नाहींत. परस्परें दलाल यांनीं सवदा करून मचवे भरून नेऊन द्यावें, आणावें. इंग्रजांचा बेपारी कोणी आला, तर त्यानें पन्नास कोसांपलीकडे असावें. इंग्रज लोक कोणी त्या टापूवर जाऊं पावत नाहीं. इकडून जहाजें महोदधींतून पूर्वेस चिनीच्या बंदरास तीस दिवसांत जातें. द्वारकेकडून कलकत्त्यास जाणें, तर इकडून रत्नाकर समुद्रांतून श्रीनगर कोचीबंदराकडून दक्षिणेस जाऊन, लंका व रामेश्वर डावा घालून, मंदरास ह्मणजे चेनापट्टण व मच्छलीबंदर महोदधी समुद्रांत उत्तरेकडे शिरून, जगन्नाथ व बंगालें डावें टाकून कलकत्त्यास जावें. तसेंच इकडे येणें तर, महोदधींतून कलकत्त्याहून गंगासागर, व जगन्नाथ व चिनापट्टण उजवें टाकून, कहरदर्यायांत जाऊन, लंका व रामेश्वर उजवा टाकून, रत्नाकरांत शिरून, इकडे अगर अर्बस्थानांत अथवा मक्क्याकडे पाहिजे तिकडे जावें; आणि रूमाच्या राज्यांत जाणें तर मक्क्याकडे खुषकीवर उतरून जावयास बहुत दिवस लागतात. सबब, लंकेचे पलीकडून कहरदर्यायांत शिरून, फरासीसाचा टापू व अर्बस्थान उजवें टाकून, कहरदर्यायांतून शें पन्नास कोसांवरून पाण्यांतून कडेनेंच जावें. उत्तर वायव्य कोनास यावें. मग पाहिजे तर मिठेदर्यायांतून ह्मणजे गोड्या नद्या रूमच्या त्यांत शिरून, बेपारी यांनीं रूमचे राज्यांत पाहिजे तिकडे जावें. इंग्रजांनीं परभारेंच कहरदर्यायांतून विलायत इंगलीष मुलखांत आपले टापूंवर जावें. रूमाच्या राज्यांत व यवनी विलायत अर्बस्थान येथें इंग्रजाची पैरवी अद्यापि नाहीं. . पुढें ईश्वरसत्ता. याप्रमाणें आहे. चीनवाले यांचे टापूंचे उत्तरेकडे शेवटास ब्रह्मराज्याचा अंमल आला आहे, तो कलकत्त्याचे पूर्वेस. तेव्हां इतर राज्यांतील व इतर खुषकींतील फौज वगैरे चढून आपले टापूंत येईल, सबब चीनवाल्यांनीं आपले राज्याचा शेवट उत्तरेस हिमालयाचे लगत, ब्रह्मराज्याचे राजाकडे लागला, तेथें हद्दीवर चाळीस हात उंच व चारशें हात रुंद, आणि महोदधीपासून त्याचे पश्चिमेपासून ती पूर्वेस कहरदर्यापर्यंत, सातशें कोस लांबी दिवाल भिंत चिरेबंदी घालून, त्याचे आंतले बाजूनें चाळीस कोस रुंदी व सातशें कोस लांबी मुलूख आहे, त्यांतील गिराशे व सरदार

यांस मुलूख दिल्हा आहे, त्यांनीं तो मुलूख खाऊन त्या भिंतीचा जाबता व रखवाली करावी याप्रमाणें बंदोबस्त आहे.

पृथ्वीवर जितका मनुष्याचा संचार सांप्रत आहे, तितके पृथ्वीवर साडेतीन बादशाहा. मुख्य रूम प्रथम, दुसरा फरासीस, तिसरा चीनचा, आणि आर्धा इंग्लिश विलायतचा इंग्रज सवदागीर. एकून साडेतीन बादशाहा याप्रमाणें आहेत. व अठरा टोपीवाले यांचीं नांवें:-

| | | |
|---|---|---|
| १ फरासीस. | १ ———— | १ ———— |
| १ फिरंगी. | १ ———— | १ ———— |
| १ चिनीवाले. | १ ———— | १ ———— |
| १ इंग्रज. | १ ———— | १ ———— |
| १ रूस. | १ ———— | १ ———— |
| १ पुरूष. | १ | १ |
| ६ | ६ | ६ |

१८

येणेंप्रमाणें अठरा टोपीवाले. यांस संस्कृत नांव "हूण" अशी संज्ञा आहे. त्यास प्रमाण "दंडकारण्यमाहात्म्य" आहे. त्यांत देव दंडकेश्वर लिंग कर्नाटकांत "मृकंडु" ऋषीचें व मृगादेवीचें क्षेत्र. त्याचें नांव मूर्तजाबाद ऊर्फ मिरज. त्या शहरापासून ईशान्येस तीन कोस पर्वतावर दंडोबा ह्मणोन देव, प्राचीन देवालय आहे. त्यास दंडकारण्यमहात्म्यांत प्रमाण आहे त्याचे श्लोकः-

॥ कलौ पंचसहस्रांते हूणाक्रांता भविष्यति ॥
॥ इति प्रमाणं भविष्यकालोक्ति वर्तते ॥
॥ तस्मिन्न यत्र कुत्र चित् । हूणास्ताम्रमुखा ॥
॥ स्मृता इति अपरपर्यायोपि दृष्टो वर्तते ॥ १ ॥

याप्रमाणें पूर्वीं पुराणांतरीं भविष्यकथन आहे. कलयुग पांच हजार वर्षें व्हावयाचे सुमारें, या जातीकडून क्रांत ह्मणजे व्याप्त होईल. पूर्वीं यवनाच्या राज्यांत मक्क्याकडे पैगंबर उत्पन्न जाले. ते 'इसा' व 'मुसा'. यास किताब अस्मानांतून उतरले. प्रथम इसा पैगंबर यास किताब आला. त्याजवर अंमल करून कांहीं दिवस धर्म चालविले. त्या किताबांत दाखला होता कीं, पुढें 'मुसा' उत्पन्न होणार. त्यास किताब 'नाजल' होईल. त्याप्रमाणें लोकांनीं धर्माचरण करावें; मागील रद्द असेत; याप्रमाणें होतें. पुढें हजारों वर्षें गेल्यावर 'इसा' समाप्त होऊन 'मुसा' जाले. त्यास किताब आली.

अलीबहादरासीं करार केला आहे, त्याप्रमाणें मुलूख लाऊन देवितों; व पैकाही देवितों. गोसावी हवालीं करावा आणि गोडी करावी. याप्रमाणें सरकारांतून अलीबहादरास पत्रें जावीं. आह्मी पाटिलबावांस लेहून याप्रमाणें घडवितों, असें खातरजमेनें बोलले. त्यावरून तुह्मांस लिहिलें कीं, तुह्मी जेथें असाल तेथें मुक्काम करून राहावें. पाटिलबावांकडून तुह्मांसीं बोलावयास कोणी येईल. तें ऐकून त्यांजकडे जाऊन गोसावी हवालीं करावा, आणि कराराप्रमाणें पैका व मुलूख लाऊन घेऊन राहावें. सफाई करावी. हें न घडे तर, देशीं गोसावी झांशीस ठेऊन यावें. याप्रमाणें येथून तुह्मांस लिहिलें. तुमचें उत्तरही आलें. रामजी पाटील यांणीं पाटिलबावांस लिहिलें. असें असतां तुह्मीं कृष्णगडवाला पाटीलबावांचे लक्षांत, त्याचे गांव लुटले, जाळले, व नजफकुली व रावराजा यांस पाटिलबावांनीं गोकुलकडास इसमालबेगाचे पारिपत्यास रवाना केलें असतां, तुह्मीं त्यांस पत्रें व कारकून पाठवून राहाविलें. येविषयीं रवळ जगदाळा खिजमतगार पाटिलबावांकडील, उभयतांचें कूच करावयास गेला होता, त्याचें पत्र पाटिलबावांस आलें. त्याची नक्कल रामजी पाटील यांजकडे आली, तीच त्यांनीं दाखविली. यावरून पाहतां तुह्मीं अशा गोष्टी केल्या ह्मणून पाटिलबावांनीं तुह्मांस बोलाविलें नाहीं. तें बरेंच जालें असें दिसतें. अशा गोष्टी येथून लिहिलें असतां तुह्मीं करूं नयेत. असो. जालें याउपर कोठें खटला न करितां, व पाटिलबावांचे लक्षांत आहेत त्यांशीं राजकारण न करतां, उगीच मुक्काम करून राहावें. रामजी पाटील यांसीं बोलणें जालें आहे तें पाटिलबावांस लिहिणें. तसें लिहितील. तुह्मांस आपले जवळ येणेंविषयीं पत्र पाठविलें तर होळकरांस सोडून त्यांजकडे जाऊन गोसावी हवालीं करावा, आणि पूर्वींचे कराराप्रमाणें बंदोबस्त करून देतील तो घ्यावा, आणि राहावें. यांतून कांहींच न घडे त्या अर्थीं राहून फळ नाहीं. पूर्वींचे लिहिल्याप्रमाणें देशीं यावें. पाटिलबावांस वाईट वाटे असें करूं नये."

## लेखांक ४०.

श्री. ता. ८ मार्च इ. स. १७८९.

"राजश्री अलीबहादुर गोसावी यांसी:—आशीर्वाद विनंति उपरी. तुह्मी छ० ११ जमादिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. कित्येक मजकूर येथें ऐकिले आहेत. त्यास येथील गुंता उरकल्यांत आलाच आहे. तेथें कांहीं अधिकउणी आढळल्यास पंचवीस दिवसांत येऊन आपल्याजवळ दाखल होऊं. येविसींचें विस्तारें जन्म घेतल्याचें सार्थक वगैरे फार निखालस्तेनें लिहिलें, तें कळलें. त्यास येविसीं

आमची खातरजमा आहे कीं, समयास तुह्मांपासोन अंतर व्हावयाचें नाहीं. तसा प्रसंग इकडे कांहींच नाहीं. मग तुह्मीं कशावरून ऐकून इतकें लिहिलें असेल, हें ध्यानांत येत नाहीं; व तसाच प्रसंग दिसोन आल्यास ईश्वर अवघडही पडूं देत नाहीं, व तुह्मांसही सूचना होईल. दुसरें लिहिलें कीं, राजश्री पाटिलबावांस आह्मीं विचारिलें होतें कीं, राज्याचें व इसमालबेगाचें संधान आल्यास करावें कीं नाहीं? त्यावरून पाटिलबावांनीं सांगितलें कीं, उत्तम आहे. त्यास अजमेरही येईल व खंडण्यांचेही जाबसाल होतील. हे यत्न सरकारचे ह्मणोन लिहिलें. त्यास पाटिलबावांनीं सांगितलें, एवढ्यावरच तुमचे मर्जीनें घेतलें. परंतु तुमचे हातून शेवटास जाऊ देतील, हें घडणार नाहीं. व जोधपूरवाले अजमेर एकाएकीं देतील असें वाटत नाहीं. मग श्रीमंतांच्या दैवानें काय घडणार तें घडो, व राजश्री बाबाराव वकील नबाबाकडील बहुत उपयोगी पडले. व पुढें कितीक कामें सरकारउपयोगी त्यांचा तपसील लिहिला. बशर्त व हीं कामें जाल्यावर याकडे गांव मोंगलाईतून आहे, तेथें सरकार अंमल आहे, तो त्यास देविला पाहिजे, ह्मणून लिहिलें. त्यास जितकीं कामें तुह्मी बशर्त लिहिलीं, तितकीं घडून आल्यावर व याचा अनुभव आल्यावर करावयास येईल."

---

## लेखांक ४१.

**श्री.** ता. १८ जून इ. स. १७८९.

"विशेषः–तुह्मी छ० १६ रमज्यानचें पत्र पाठविलें तें पावलें. राजे यांजकडील वकील बोलणें बोलत होते. तेव्हां राजश्री पाटिलबावा यांचे कानावर घालीत होतों. हल्लीं जाबसाल बंद आहे. खर्चास येथें पाटिलबावांकडून येणें हे गोष्ट कठीण. लाख रुपये देत होते ते टाकिले. तितके मात्र देतील. अथवा दोन चार महिन्यांत गरजेमुळें आणखी एखाद लाख देतील. मुलकाची वांटणी मिळावयाची नाहीं. तत्राप खर्चापुर्ते माहाल लाऊन देणें, ऐसेंही घडावयाचें नाहीं. खर्चाची हलाखी तर फार आहे. राजश्री गोपाळराव रघुनाथ पाटिलबावांकडून सरदार पुढें गेले आहेत. त्यांची व इस्मालबेग यांची हल्लीं लढाई मातबर जाहाली. अंबोजी इंगळे मुलूख मारावयाकरितां फौजेंतून वेगळे जाले आहेत. आह्मांकडील राजश्री बळवंतराव सदाशिव येथून लोकसुद्धां निघोन गेले. लवकरच पोहोंचतील. उंट खरेदी करून पाठवणें व बादशाहाजादे याजविसीं श्रीमंतांचीं पत्रें आलीं. त्यास उंट लवकरच पाठविण्यांत येतील. शाहाजादे याजविसीं हल्लीं पाटिलबावांजवळ रुबरू जाबसाल लवकरच पुसोन

घेऊन लिहून पाठवितों, ह्मणोन लिहिलें तें कळलें. ऐशास, राजे यांजकडील बोलणें पाटिलबावांनीं बंद करावें ह्मणून सांगितलें. तसेंच तुह्मांस ठेवणें तर सोय करावी, नाहीं तर निरोप द्यावा, ऐसें लिहिलें आहे. सोय केली, बरेंच जाहालें. राहावें, नाहीं तर निरोप घेऊन यावें, दोहोंतून कोणतें तें सांगावें ह्मणून. कोणतें तरी दोहोंतून एक सांगतील. लढाईचा मजकूर लिहिला, तो कळला. तुह्मांकडील फौज पुढें गेली, हें उत्तमच केलें. उंट तुह्मीं आणविलेच आहां. आले ह्मणजे पाठवावे. बादशाहाजादे याचा जाबसाल पुसोन घ्यावा. ते काय सांगतील तें लेहून पाठवावें.

## लेखांक ४२.

श्री.

"पुरवणी राजश्री नाना गोसावी यांसीः—

विनंति उपरी. हिमतबहादूर गोसावी प्रकर्णीं आपलीं पत्रें आलीं. ते इकडोन येथें आमचा नक्ष बहुतच राहिला कीं, सरकारची कृपा यावर बरी आहे. त्यास आमचा सर्व अभिमान आपणासच आहे. आईबापांचे पोटीं जन्म मात्र घेतला. परंतु आई, बाप, धनी सर्व आपण आहे. एक आपले पायाची जोड केली आहे. आणि आसरा आपला बाळगीत आहों. आणि इच्छा ही आहे कीं, या देहापासून आपली सेवा घडावी. आपले कृपेचें अहसान तें कोठवर आह्मी फेडूं. परंतु ईश्वराजवळ इतकें मागतों कीं, कांहीं सेवा घडावी. आणि आपले छायेखालीं सदोदित आनंदांत राहावें. पत्र आलें यामुळें आनंद जाहाला. तो कोठवर ल्याहावा? रवाना छ० २२ जिल्हेज बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक ४३.

श्री. ता. २५ नोव्हेंबर १७८९.

"सेवेसीं विज्ञापनाः—स्वामींनीं चंद्र १७ रबिलावलचें पत्र पाठविलें, तें चंद्र ९ मीनहूस कालचे प्रहर दिवसास पावलें. राजश्री अलीबहादर यांनीं पुरवणीपत्र गुजरत जासुदाबराबर काठींत कागद घालून पा। तें पावलें. यांतील विचार पहातां परिणाम नाहीं. खर्च मात्र आंगावर सोसून पुढें पायरहा (?) देत असावें येविशीं तुमचे मतें कसें? पत्र पाहून पाठविणें ह्मणून आज्ञा केली, ती कळली. पत्र वाचून पाहिलें. सविस्तर समजलें. त्यांनीं स्वार्थाची गोष्ट लिहिली आहे ती खरी; परंतु परिणाम नाहीं, त्या पक्षीं करूं नये. आधीं गोसाव्यामुळें

अलीबहादर बद्ध जाले आहेत. पाटिलबावा खट्टे. त्यांत हें कलम प्रसिद्धींत आलें ह्मणजे पुर्तेपणें अलीबहादराकडे शह लागतो. याजकरितां शिंद्यास सांगावें. चौकशीमुळें ठिकाण लागेल. पहिली वस्तभाव आहे त्याची गत होईल ती याची. गोसावी सुटोन वस्तभाव त्याची त्याचे हवालीं होणें, हा प्रकार समजलाच आहे. शिंद्यांस मिळाली येवढी गोष्ट खरी. सरकारांत तर घेतां येत नाहीं. असा प्रकार आहे. पत्र पा। आहे. अलीबहादर यांस उलगडून ल्याहावें. रवाना चंद्र ९ रावल सायंकाळ. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ४४.

श्री. ता. १७ दिसेंबर १७९०.

"पुरवणी राजश्री रामजी पाटील जाधव गोसावी यांसीः—

रामराम विनंति उपरी. नजफकुली व रावराजा याचा पुत्र बखतावरसिंग यांची रवानगी गोकुळगडास करावयाचें ठराऊन, नजफकुली व बखतावरसिंग अलवरास होते, त्यांणीं जलद कूच करून जावें ह्मणोन रवळ जगदळा खिजमतगार ताकिदीस रवाना केला होता. त्यावरून एक कूच एका कोसाचें उभयतांनीं गोकुळगडचें सुमारें केलें. इतक्यांत होळकर व अलीबहादर व गोसावी अनुपगीर यांजकडून पत्रें व कारकून बखतावरसिंग यांजकडे गेले. त्यांणीं नजफकुली व बखतावरसिंग यांणीं गोकुळगडास इसमाल्याचा बाप आहे, त्याजवर न जावें ह्मणोन सांगून त्यांसीं जाबसाल केले. त्या मजकुराचें पत्र जगदळा मजकूर याचें आलें, तेंच बजिन्नस पाठविलें आहे. राजश्री बाळाजीपंत नाना यांसी दाखवावें, ह्मणजे त्यांचेही ध्यानांत येईल. उत्तर पाठवणें. रवाना छ० १० रविलाखर सुमा इहिदे तिसैन मया व अलफ. हे विनंति."

## लेखांक ४५.

पैवस्ती चंद्र ९ रविलाखर सुमा इहिदे तिसेन मुक्काम नजीक सागर. श्री. ता. ११ दिसेंबर १७९०.

"श्रीमंत महाराज साहेब साहेबांचे सेवेसीं:—आज्ञाधारक रवळ जगदळा मुक्काम आलवर, पायावर डोई ठेऊन विनंति विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० ४ माहे रविलाखर प्रथम प्रहरपावेतों सुखरूप असों विशेषः— येथील मजकूर तर राजश्री रावराजे यांचा उत्साह होऊन राजे बखतावरसिंग व नबाब या उभयतांची फौज तोफखाना वगैरे सरंजाम तयार होऊन, मार्गेश्वर शुद्ध ५ पंचमीचे दिवशीं प्रस्थानास कोसीवर राहिले. पुढें कूच दरकूच जावें असा जाबसाल ठरला. यावर

रायाच्या उत्साहाकरितां राजश्री होळकर यांजकडील कारकून विठ्ठलपंत व अलीबहादर यांकडील बापू लक्ष्मण व रामजी हुजऱ्या व गोसावी यांजकडील कारकून वस्त्रें प्रावर्णे घेऊन आले. दिवस जाहालियावरी आह्मीं निकड कुच्या-करितां केली. त्यास, हे तिन्ही एकत्र होऊन, राजांसीं व नबाब यांसीं जाबसाल लाविला जे, तुह्मी कूच रेवाडीस कराल तर आह्मी तुमच्या मुलखाची खराबी करोन लुटूं. यावर हा जाबसाल उभयतांनीं ऐकून उत्तर केलें जे, आह्मांस आज्ञा महाराजांची प्रमाण. जसी आज्ञा करतील तसी वर्तणूक करूं. परंतु त्या त्रिवर्गांचा आग्रह बहुतच आहे कीं, तुह्मीं आमचे होऊन राहणें. ह्मणजे सर्वा गोष्टीनें बचाव तुमचा होईल. असा साफ जाबसाल लाविला आहे. त्यास गोसाव्याकडील कारकून यानें क्षुद्र लक्षोन साफ बोलतो जे, महाराज जयपुराकडे गेले, आणि आमच्या फौजा या देशीं आहेत. तुह्मांस तिकडे जाणेंचें आहे. तरी आमची खंडणी करोन जाणें. इतकियावर जातच असाल तर मुलूख राहाणार नाहीं. असें साफ बोलतात. यावर यांनीं संशय घेतला आहे कीं, आह्मांस दुतर्फा अडचण जाहाली. आड विहिरीचा लेखा जाहाला आहे. मी कुचाची निकड करावयास जातों, तर ते उभयतां ह्मणतात कीं, तूं आह्मांस लेहून दे कीं, फौजा आमच्या मुलखांत आल्या आणि आह्मीं लुटून घेतल्या, तरी त्याचा आरोप आह्मांकडे न यावा. मग म्यां उत्तर केलें जे, मी महाराजांचा आज्ञांकित. महाराज आज्ञा करितील त्याप्रमाणें मी वर्तणूक करीन. यास्तव विनंति सेवेसीं लिहिली जे, या पत्राचें आज्ञाउत्तर येईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. त्यास या उभयतांसही पत्रें ल्याहावीं. त्याप्रमाणें वर्ततील. तूर्त संशयांत पडले आहेत. विनंति हेच कीं, पत्रें लिहिल्यावर चिटी आली जे, राजगडापासोन सातां कोसांवर फौजा आल्या आहेत. येऊन उभयतांचे मुलखांत पोहोंचल्या. त्यास या पत्राचें उत्तर जलद रवाना करावें. त्याजसारखी वर्तणूक होईल. आह्मीं आपल्यांकडून वकीलही जाबसालास पाठविला आहे. नबाबसाहेबांची व राजे यांची आज्ञा कीं, जर अलीकडे दो कोसांवर आले, तरी साफ आह्मी लढाई करूं. त्यास आज्ञाउत्तर रवाना सत्वर केलें पाहिजे. याचें आज्ञाउत्तर करावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति.

आपला हुकूम आला तर मी होळकराकडे जाईन हे विज्ञाप्ति.

भोजराज बाजी येथें आले होते. त्यास निजामकुलीस व रामसेवक यांस बोलला जे, रस्त पोहोंचावयाची आज्ञा आहे. त्यास मी अंतरवेदींत रवळोजी शिंदे याजकडे कामकाजास जातों. तेथोन रस्त दिल्लीस शाहाजीकडे रवाना करवीन, तेथोन पुढें लष्करांत दाखल करावी. त्यास नबाब व रामसेवक बोलिले जे.

आह्मीं रेवाडीस गेलियावर रवळ हुजरे यास दिल्लीस रवाना करूं. तेथोन रस्त रेवाडीस येईल. रेवाडीपासोन आह्मी लष्करांत सारायेपावेतों पोहोचाऊं. तेथोन महाराजांनीं न्यावी. पावती करूं. याप्रमाणें करार जाहाला आहे."

## लेखांक ४६.

श्री. ता. १५ सप्टेंबर १७९१.

"राजश्री नाना गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः—राजश्री राघो अनंत व बच्याजी नारायण कारकून नि॥ दप्तर यांस सालमजकुरीं नवीं अफ्त्यागिरें दिल्हीं. ते वेळेस उभयतां घेत नव्हते. आपले परवानगीची दिकत केली. तेव्हां खातरजमा करून सांगितलें कीं, तुह्मीं दिक्कत करूं नये. आह्मी पुण्यास लेहून जाब आणवितों. त्यावरून उभयतांनीं अफ्त्यागिरें घेतलीं. त्यास येविसीं उभयतांस लेहून पाठवावें. रवाना छ० १६ मोहरम. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."

## लेखांक ४७.

मसुदा जाहाला. दुसरें लिहून रवानगी केली. छ० २९ रजब आर्बा. ता० २६ फेब्रुवारी १७९४.

श्री.

"राजश्री अलीबहादर गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी जनार्दन आशीर्वाद. विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेषः प्रथम डंघेस जाऊन मसलत करण्याचें कारण कोणतें? तुह्मांजवळ फौजसुद्धां येऊन, आमचा बंदोबस्त करून द्यावा, सरकारांत पैका व मुलूख अमकी बेरीज असें बोलणें कोणाकडील कोण येऊन बोलले? त्याचें दारमदार कसकसें केलें? पुढें डंघेस गेल्यावर कोणाचा पक्ष धरून कोणाचीं पारपत्यें केलीं, व कोणाचे बंदोबस्त कसकसे करून दिल्हे? त्यांपासून सरकारांत काय घेतलें? मध्यें सरकारास रुजू कोण जाहाले? गैर रुजू कोण कोण? त्याचीं कारणें काय? दारमदार कोण करीत होते? ते फिरले कां? याचीं कारणें पर्णेकर संस्थानिक असे दुसरे संस्थानिक किती? कोणाकडे मुलूख किती? बेरजेचा याचा तपशील व तुह्मीं जसी कोणकोणाकडील मुलखाची किती केली? एकूण एकंदर मुलूख सरकारांत जसीस किती आहे याचा तपशील, ज्यांसीं ज्यांसीं लढाया तुमच्या

जाल्या त्याचीं कारणें, याप्रमाणें सविस्तर पुढें जलद लिहून पाठवावें; व सर्व माहीतगारी ज्यास असेल असा कोणी तुह्मांकडील लवकर आला पाहिजे. त्यास राजश्री आप्पाजी बाबाजी माहीत व कोणताही जाबसाल पडला असतां समजाऊन द्यावयाजोगे आहेत. याकरतां त्यांस लवकर पाठवून द्यावें. येथें प्रीतिसिंग बुंदेले चरखारीकर आले आहेत. त्यांचें बोलणें सरकारांत आहे. परंतु आह्मांकडून सर्व मजकूर समजून घेऊन उत्तर करणें तें करावें. याकरतां जलदीनें लिहून पाठवावें, व मशारनिल्हेची रवानगी लवकर येऊन पोहोंचत अशी करावी. विलंब लावूं नये. अर्जुनसिंग कोण, गजसिंग कोण, तसेंच धोकळसिंग याचे भाऊ शिरजेतसिंग व बुदसिंग अर्जुनसिंगाचा लेक व जैतपूरकर केशरसिंग व राजधर व चरखारीवाले कोण? व बघेलखंडवाले कोण व बांधेवाले हे कोणाचे कोण? व इंग्रजांकडे वकील पाठवून बोलणें लाविलें कीं, निमे मुलूख तुह्मीं घ्यावा आणि आमची मदत करून अलीबहादरास काढून द्यावें. हें राजकारण कोण करीत होते? याचा दस्ताऐवज कांहीं आहे कीं काय? व वरकडही राजकारण-संबंधीं कोणाचे दस्ताऐवज मुद्देपत्ते कोणाचे कसे? हें सविस्तर लिहून लवकर पाठवावें. लागलेंच आप्पाजीपंत यांची रवानगी जलदीनें करावी. रवाना छ० ९ रजब बहुत काय लिहिणें लोभ असों दिले. हे विनंति."

---

## लेखांक ४८. [ता. ४ जानेवारी इ. स. १७९२ पासून ता. १५ दिसेंबर १७९४.]

श्री.

अलीबहादर व सदाशिवपंत आस्वलकर यांजकडून डंघाईतील राज्यांचें बोलण्यासंबंधें पत्रें आलीं. त्यांतील मजकूर ईा छ० ९ जमादिलोवल सन इसन्ने तिसैन तागाईत छ० १५ जमादिलावल सन आर्बा तिसैन.

राजे धोकलसिंग संस्थान पर्णे. अलीबहादर याचे पत्रांतील मजकूर. पत्रें.

१. छ० ९ जमादिलावल इसन्ने तिसैनः—गजसिंग व अर्जुनसिंग यांचा मोठा हाडदावा होता. त्यास कालपीवाले यांणीं एकत्र केलें. गजसिंगाकडील मुलूख अर्जुनसिंगाकडे होता, तो गढयासुद्धां गजसिंगास देविला. त्यास गोसावी याजकडून गजसिंगाकडे संधान करऊन अर्जुनसिंगास न मिळावें, भेटीस यावें, अशा बेतानें त्यास मिळऊन घेतों.

२. छ० २७ व चंद्र २९ जमादिलाखरः—रामचंद्र नारायण यांस येथून बहुत वेळां लिहिलें कीं, जाबसाल उरकोन टिका करावा. त्यास राजांनीं कांहीं अंतस्थ देऊन टिका करून घेतला, व पर्णेवाले यांचा जाबसाल गंगाधर गोविंद यांजकडून

लाविला. परंतु रामचंद्र नारायण यांणीं दिवसगतीवर घालविलें. त्यास राजे व रामचंद्रपंत यांस सरकारचीं पत्रें आल्यानें लौकर फडशा उरकतील. अर्जुनसिंगास गुडघा राजे यांणीं दिल्हा आहे.

१. छ० १९ साबानः—रामचंद्र नारायण व हुजरे यांजबरोबर पर्णेवाले यांजविसीं पत्रें आलीं आहेत. त्याअन्वयें त्यांचा बंदोबस्त मुलुखासुद्धां करून द्यावा, आणि आह्मांस सामील असावें. फंदफितूर करूं नये. येविसीं गंगाधर गोविंद यांचे मार्फतीनें करार होऊन, राजे यांजकडील गजसिंग यांणीं फौजसुद्धां सामील व्हावें, असें ठरलें आहे. ते येऊन एक दोन दिवसांत भेटतील. यांजकडील मुलूख अर्जुनसिंगानें दाबला होता. तेथील गढ्या वगैरे जागा घेऊन जरफी केली. ती जागा अवघीच माघारी सरकारचे ठरावाप्रमाणें द्यावयाचा करार केला. त्यास टिक्याबद्दल ऐवज तर ते देतीलच. परंतु फौजेचे खर्चाबद्दल कांहींच लिहिलें आलें नाहीं. यास्तव त्यांसीं बोलतां न आलें. त्यास येविसीं सरकारची आज्ञा राजास व बाळाजी गोविंद यांस यावी.

१. छ० ५ रमजानः—पर्ण्याचे वकील येऊन पुण्याहून पत्रें त्यांनीं आणिलीं, तीं दाखविलीं. त्याप्रमाणें तह रद्द करून कराराच्या यादी करून दिल्ह्या. फौजसुद्धां लढाईस सामील असावें. तेव्हां फौजखर्च माफ करावा. येणेंप्रमाणें करार होऊन बाहेदार दिल्हें. त्याजवर गजसिंग घाटीखालीं उतरोन आला. त्यास आणावयास सदाशिव शामराज व गंगाधर गोविंद यांस घाटीपाशीं पाठविलें. त्यांणीं अर्जुनसिंगाचे लढाईस सामील व्हावें, ते न जाले. सात आठरोज लाविले. आमची फौज देखील गुंतोन राहिली. मग त्यांची वाट न पाहतां अर्जुनसिंगासीं लढाई करून जिवें मारिला. गजसिंगास सांगोन पाठविलें कीं, तुह्मी लढाईस सामील न जालेत, यांजकरितां फौजखर्च तुह्मांस द्यावा लागेल. हें त्यांणीं ऐकोन, माघारे घाटी चढोन पर्ण्याकडे गेले. त्यांचें बोलणें आह्मांस पुण्याहून टिका व पगडी श्रीमंतांनीं पाठविली. टिक्याची नजर करार केली आहे. त्याशिवाय आह्मांस कांहीं द्यावयाचें नाहीं. ऐसें त्यांचें उत्तर जाहालें.

## खमस तिसैन.

१. छ० २७ जिल्काद. धोकलसिंग व गजसिंग यांस दोन वेळ सरकारचीं पत्रें आलीं, तीं येथून रामचंद्र नारायण व रामचंद्र कचेश्वर यांस बोलण्यास पाठविलें, त्यांजबराबर रवाना केलीं. त्यास वीस पंचवीस दिवस होत आले. राजे कांहीं उत्तर देत नाहीं.

१. छ० ९ सफरः—गोहोऱ्याकडे यशवंतराव नाईक निंबाळकर रवाना केले होते. त्यांजवर गजसिंग चालोन आला. तेव्हां नाईक पुढें गेले. लढाई द्यावी, तों गजसिंग रात्रीस कूच करून गेला. तेथून आह्मांस लेहून पाठविलें कीं, तुह्मांबरावर मला लढाई द्यावयाची नाहीं. नाईक चालोन आले, याकरितां मी माघारा आलों.

२. छ० १ रबिलावलः— गंगाधर गोविंद यांचे विद्यमानें तहाचें बोलणें बोलतात. आणि परगणे गोहोरा येथें निंबाळकर आहेत. तेथें दंगा करावयाकरितां पर्णेवाले यांणीं केशर नाईक आपलेकडील सरदार जमियतेनसीं पाठविला. लोहरीचे गढीपासीं लढाई जाली. निंबाळकर यांणीं हल्ला करून केशर नाईक याचें शिर कापून आणिलें. धोकलसिंग व गजसिंग लोन नदीतीरीं आले. इकडून गंगाधरपंत गेले. त्यांच्या भेटी जाल्या. मामल्याची बेरीज ठरेल ती मागाहून लिहून पाठवूं.

१. छ० ११ जमादिलाखरः— चाळीस पन्नास लक्षपर्यंत खंडणीचें बोलणें घातलें होतें. परंतु त्यांचें बोलणें सत्रा लाखपर्यंत आलें. पुढें न चढत. तेव्हां कबूल केलें. त्यापैकीं नक्त सालमजकुरीं पांच लाख व बारा लाखांचा मुलूख लावून देऊं. त्यास मान्य जालों असतां अद्याप पैक्याची निशा होत नाहीं. हल्लीं दिवाणजीस बहुत निकडीचीं पत्रें लिहिलीं. त्याजवरून लवकर मामला उरकोन येणार आहेत.

१. छ० १ साबानः—पर्णेकराचे बोलण्यास लोन नदीवर गंगाधर गोविंद यांणीं सदाशिवपंत व आप्पाजीपंत यांस बराबर नेलें. जाबसाल ठरला कीं, सत्रा लक्ष रुपये मामला घ्यावा. त्यांत पांच लक्ष नक्त द्यावे. बाकी बारा लक्ष. त्याचे वसुलास सत्रा लक्षांचा मुलूख द्यावा. बारा लक्षांचा फडशा जालियावर सोडून द्यावा. त्यास अडीच महिने पांच लक्षांची निशा पटत होती. पण ठिकाण न लागे. तीन लाखांची निशा देतो. बाकी दोन लाख राहिले. त्यास मामला ठरोन अडीच तीन महिने जाहाले. त्याचा वसूल तुह्मांकडे आला आहे. तो मजुरा द्यावा ह्मणोन बोलूं लागले. तेव्हां तीन महिन्यांचा फौजखर्च मागितला. परंतु खर्च देणार नाहीं, असें उत्तर केलें; व बारा लक्षांचे वसुलास मुलूख वाईट दाखवूं लागले. त्याजवर सत्रा लक्षांची निशा सालमजकूरसुद्धां तुमचे सावकाराची करून देतों ऐसें बोलिले. तेंही आह्मीं कबूल केलें. तेव्हां आमचे मुलुखांत या तीन सालांत कोणाचा उपद्रव आल्यास निशा सावकारी नाहीं, असें सांगितलें. याचें उत्तर केलें कीं, मुलखासीं सावकारासीं संबंध नाहीं. आमचे सावकाराची तुह्मी खात्री

करून देणार. तेव्हां ज्याप्रमाणें हसेबंदी तीन सालांची करून घाल, त्याप्रमाणें सावकारापासून घेऊं. मग त्यांनीं अड घातली जे, पाटिलबावांनीं उपद्रव करूं नये. याचें उत्तर, जिमा कोणाचाच होणार नाहीं; सरकारचा मात्र जिमा करून घेऊं. यावरून गंगाधरपंतांचें बोलणें पिळपिळीत पडों लागल्यावर, पारपत्य करावयाविसीं डेरेदाखल जालों.

१. छ० १५ साबानः—घोकलसिंग राजे यांणीं लबाडकीचा जावसाल मामल्याविषयीं बदलून बोलूं लागले. याकरितां त्यांचे ज्येष्ठ बंधु सिरजेतसिंग पहिले येथें आणिले. त्यास चार लाख रुपयांचा मुलूख खर्चास लाऊन देऊन लढाईस आघाडीस रवाना केलें, व तुह्मांस वांटणी करून देऊं, असें सांगितलें आहे.

१. छ० २४ रमजानः—पर्णेकराचे वकील येऊन बोलूं लागले कीं, कराराबमोजीब मामला देत असतां घेत नाहीं, याचें कारण काय? तेव्हां आह्मीं सांगितलें कीं, करारांबरहुकूम फडशा तुह्मी करून देत नाहीं. तेव्हां ते बोलिले, तुह्मांकडील गृहस्थ बोलण्यांत होते, त्यांणीं करार करून कागदपत्र लिहून देण्याविसीचे मसुदे आह्मांजवळ दिले आहेत; तें पाहावें. त्याजवरून मसुद्यांच्या नकला त्यांणीं आणून दाखविल्या. त्याप्रमाणें चालतां सरकारांत कांहींच मिळावयाचें नाहीं. तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, तुह्मी बोलतां हें लटकें. या अन्वयें मसुदे करून देणार नाहींत. मग ते बोलिले कीं, साडेचार लाख रुपये नख्त घ्यावे, व साडेसत्रा लाखांचा मुलूख लावून घ्यावा. तें कबूल केलें. परंतु ऐवजाची निशा लवकर जाल्यास जावसाल उरकून घेऊं, नाहींतर पारपत्य करूं.

## आर्बातिसैन.

१. छ० १५ सवालः—पर्णेकर पैशाची निशा न करीत, व आंतून जमाव करून बदलून गोष्ट सांगावी, व घाट्याही बंद केल्या होत्या. परंतु घाटी चढून गेल्यावर दबावानें राजे पळोन पवईचे डांगेंत गेले, व राजधरही घाट उतरोन गेला. आह्मी पर्ण्यास दाखल जाहालों. मुलखाची जप्ती करून बंदोबस्त करितों.

१. छ० १ जिल्कादः—हल्लीं राजाकडून बोलणें आलें आहे कीं, आह्मीं पहिला मामला बोलिलों आहों, त्याप्रमाणें घ्यावा. त्यास उत्तर केलें कीं, तुमचा मुलूख पंचेचाळीस लक्षांचे कमालाचा आहे. त्यास आह्मी एक साला कमालाबरहुकूम मामला घेऊं. याप्रमाणें बोलणें घातलें आहे. परंतु पंचवीस तीस लक्षपर्यंत जावसाल उरकल्यास ठरावांत आणूं. नाहींतर जप्ती बसवीत चालिलों आहों.

१. छ० ४ मोहरमः—यशवंतराव नाईक निंबाळकर यांजकडे गोहोरा परगणा दिल्हा आहे. त्यांत बारगड व कल्याणगड बदलले. त्यांणीं दुंडी केली. नाईक

बिजावराकडे गेल्यामुळें त्यास नाईकांनीं हें वर्तमान ऐकोन तेथून कूच करून गोह्रोऱ्यांत गेले. त्यांणीं दोन्ही किल्ले सोडविले. इकडे राजधरांनीं आप्पाजी-पंताची फौज हलकी पाहून, झाडींत होता तो मैदानांत येऊन, तिकडील बुदसिंग व अर्जुनसिंगाचा लेक व जेतपूरवाले वगैरे सरदार व जमीदार सर्व एक करून, फौज पांच सहा हजार पायदळ व अडीच तीन हजार स्वार जमा केली, आणि आप्पाजीपंतावर चालोन आले. आह्मी कुमकेस जाऊं लागलों, तों लोण नदीस पाणी फार. तेव्हां यमुनेकडून नावा आणावयाकरितां माणसें पाठविलीं. आह्मी सारे एक जागां जाल्यावर इलाज चालणार नाहीं, हें जाणोन आप्पाजी-पंतावर आठ नऊ हजार स्वार प्याद्यांनसीं चालोन आला. यांची त्यांची लढाई बहुत निकडीची होऊन सरकारची फत्ते जाली.

१. छ० २१ सफरः—आजरोजीं राजधरानें जमाव करून लढाईची तयारी करूं लागला. याकरतां आह्मी लोन नदी उतरोन अलीकडे आलों. तेव्हां राजधर पळोन खटोल्या परगण्याचे झाडींत गेला. आह्मी कुलपाहाडचे किल्यानजीक आलों. मोर्चे लावावे तों, राजे घोकलसिंग याजकडील तीन चार हजार पावेतों पायदळ घेऊन पर्ण्याचें शहर कांहीं लुटलें व ठाणें बसविलें. हें वर्तमान गनीबेग दाहा कोसांवर होते, त्यांस कळतांच धांऊन आले. यांची त्यांची लढाई भातबर जाली. त्या दिवशीं यांची काबू त्याजवर चालली नाहीं. यास्तव दुसरे दिवशीं फिरोन चढोन गेले. तेव्हां रांगडे पळाले. यांणीं शहरांत ठाणें बसविलें.

१. छ० १० रबिलोवलः—गणपतराव बर्वे पवईचें ठाणें बसविण्याकरितां पाठविले होते. तेथें राजे चार कोस पुढें चालोन आले. त्यांची व यांची लढाई जाली. त्यांस मागें हटोन घातलें. परंतु त्यांणीं माघारे पवईस जाऊन, चहूंकडे फौज त्यांची फुटोन राहिली होती, ती हल्लीं एक जागा . जमा करून, लढाई घेणार आहेत, व त्यांणीं काशीस इंग्रजांकडे वकील पाठवून बोलणें लाविलें आहे कीं, निमे मुलूख तुह्मीं घ्यावा, व आमची कुमक करावी; अलीबहादरास काढून द्यावें. त्याजवरून आह्मीही, लखनऊ व कानपुरास इंग्रजांकडून सरदार आहेत, त्यांस पत्रें लिहिलीं आहेत.

१. छ० ९ रबिलाखरः—राजे पवई तालुक्यांत राहून पर्ण्याचे जिल्ह्यांत तुंडी करितात. यास्तव निंबाळकर व गनीबेग फौजसुद्धां राजावर गेले. राजांनीं घाटी बांधिली होती, ती चालोन जाऊन घेतली. हें वर्तमान राजांस कळतांच राजा पळोन गेला. लखनऊचे इंग्रजांकडील पत्रांचीं उत्तरें आलीं कीं, सरकारचा आमचा पूर्वीपासून घरोबा, त्यापक्षीं आह्मी तुमचा वैरी त्याची कुमक करूं, असें

घडणार नाहीं. हें वर्तमान रांगड्यांस कळतांच विरस जाहाले. सदाशिवपंत आखलकर यांचे पत्रांतील मजकूर. पत्रें

## इसन्ने तिसैन.

१. छ० १० जमादिलोवलः—पर्णेकर यांजकडे अर्जुनसिंग जाऊन, पूर्वील वैरभाव सोडून, इमानप्रमाण करून एक जाहाले. अर्जुनसिंगानें मुलूख त्यांचा घेतला होता तो सोडला. परंतु गजसिंग यांणें वकील पाठवून बोलणें लाविलें कीं, आह्मीं सरकारचीं पत्रें आणविलीं आहेत, त्याप्रमाणें बंदोबस्त करून द्यावा; ह्मणजे गजसिंग भेटीस येतील. पत्रांप्रमाणें बंदोबस्त करून देऊं. परंतु फौजखर्चाचा बंदोबस्त तुह्मांस करावा लागेल. असें बोलणें होऊन, त्यांजकडील वकिलांनीं सरकारचे वकिलांस घेऊन गेले. तेथून मातबर माणूस येणार. मग पक्केपणें ठरेल त्याप्रमाणें गजसिंगास भेटीस आणणार.

२. छ० २६ व छ० २७ जमादिलाखरः—गंगाधर गोविंद यांचीं व बहादर यांचीं पत्रें पर्णेकर राजास व रामचंद्र नारायण यांस पाठविलीं कीं, येथें येऊन बोलणें होऊन, मग टिकाही द्यावयाचें होईल. त्यास येथें न येतां रामचंद्र नारायण यांणीं 'टिका केला. धोंडो नारायण वकिलीस पर्णेकराकडे पहिलेच गेले होते. त्यांस लिहिलें कीं, तुह्मीं उठोन येणें. तेव्हां राजे यांचा कारभारी गजसिंग आपणाकडे येणार. त्यास घेऊन घाटीखालीं येतों. आप्पाजीपंत दामले यांस त्यांची खातरजमा करावयास पाठवून द्यावें.

१. छ० ५ रमजानः—पर्णे येथील वकील येऊन, पुण्याहून पत्रें त्यांणीं आणिलीं तीं दाखविलीं. त्याप्रमाणें तहरह करून कराराच्या यादी करून दिल्ह्या. फौजसुद्धां लढाईस सामील असावें; तेव्हां फौजखर्च माफ करावा. येणेंप्रमाणें करार होऊन बाहेदार दिल्हा. याजवर त्याचा कारभारी गजसिंग घाटीखालीं उतरोन आला. त्यासी आणावयास गंगाधर गोविंद व आह्मांस बहादर यांणीं पाठविलें. तेथें सात आठ रोज लागले. जलदीनें सामील व्हावें, तें न जालें. मग गजसिंग याची वाट न पाहतां, अर्जुनसिंगासीं लढाई करून जिवें मारिला. फत्ते जालियावर गजसिंग यास सांगोन पाठविलें कीं, तुह्मीं लढाईस सामील असावें ह्मणोन फौजखर्च माफ केला होता. त्यास तुह्मी समयास आलां नाहीं. याजकरितां फौजखर्च तुह्मांस द्यावा लागेल. ऐसें त्यास समजल्यावर घाटी चढोन माघारे पर्णीयाकडे गेला. त्याचें बोलणें, राजास पुण्याहून टिका व पगडी श्रीमंतांनीं पाठवून नजर करार केली आहे, त्याशिवाय कांहीं द्यावयाचें नाहीं.

१. छ० ६ जिल्कादः—पर्णेकरांस फौजखर्चाचें मागणें केलें. राजास पत्रें सरकारचीं पाठविलीं, तीं रामचंद्र नारायण या समागमें पर्ण्यास पाठविलीं. त्याचा जाब अद्याप आला नाहीं.

१. छ० २२ रविलाखरः—पर्णेकराचें बोलणें निदान वीस लक्षपर्यंत आहे. टिक्याची नजर आहे, व दरबारखर्च मिळोन अधिक पांच लक्ष होतील, ऐसा रंग दिसतो. पर्णेकर जप्तीमुळें वसूल सरकारांत आला आहे, तो मजुरा मागणार. आह्मीं वसूल मजुरा देणार नाहीं ह्मणोन साफ सांगितलें. जो करार होईल, त्यापैकीं निमें तूर्त व निमेचे महाल लाऊन द्यावे, ऐवजाचा फडशा जाल्यावर महाल सोडावे, याप्रमाणें बोलत आहे.

१. छ० २ साबानः—गंगाधर गोविंद यांणीं पर्ण्याची मामलत केली. रुपये सत्रा लक्ष, पैकीं सहा लक्ष रुपये दरसाल प्रमाणें दोन सालांत बारा लक्ष. पेस्तर सालापासून सावकारी निशा महालमजकूर शिवाय नक्तच बर्शत अमल दोन सालांत द्यावी. पांच लक्ष रुपये तूर्त सालमजकुरीं द्यावे. याची सावकारी निशा द्यावी. येणेंप्रमाणें सत्रा लक्षांचा झाडा करून द्यावा. ऐसें बोलणें जालें. तें सरदाराचे खातरेस न येऊन मोडलें.

१. छ० १७ रमजानः—पर्ण्याचें मामलतीचें बोलणें साडेचार लक्ष रुपये सध्यां द्यावे. त्याची निशा घ्यावयास बांधेवालीयाचे कारभारी पाठविले आहेत. त्यांचे जाबसाल मळमळीत आले. याकरितां निंबाळकर वगैरे फौजा घाटी चढोन गेले.

## आर्बा तिसैन.

१. छ० २ जिल्काद–पर्ण्याचे मामलतीचे तूर्त पांच लक्ष प्रथम बोलण्यांत होते. मग तीन लक्षांची निशा. बाकी दोन लक्ष, रबीचा माल त्याजवर तिजाई वसूल होईल, तेथें दोन लक्षांत मजुरा घेऊन बाकीचा ऐवज द्यावा, ऐसें ह्मणों लागले. त्यास अडवून रविकर्णाची निशा देणें ह्मणोन ह्मटल्यानें निशा होईना. रविकर्ण खचित निशा आपल्याकडे आले न ह्मणे. मग पर्ण्यास जाण्यास स्वारी बारीगडाहून निघाली. त्याजवर गोसावी याजकडे मामल्याचें बोलणें होऊं लागलें. त्यास तूर्त साडेचार लक्ष बोलिले. परंतु निशा होईना. याजमुळें राहिले. घाट चढोन मजल दरमजल पर्ण्यास आलों. राजा व राजधर निघोन गेला. पर्ण्याची जप्ती केली.

राजे विजेबहाद्दर चरखारीकरः अलीबहाद्दर यांचे पत्रांतील चंद्र ९ जमादिलाखल सन इसन्ने तिसैन.

चरखारीवाले येऊन भेटले. त्यांचे आमचे विचारें खंडणीचे ऐवजीं मुलूख घ्यावा, व कांहीं त्यांचे खर्चास मुलूख देऊन चाकरीस ठेवावे, ऐसा करार करून ठेऊन घेतलें. पत्र १.

सदाशिवपंत अस्वलकर यांचे पत्रांतील मजकूरः—

इसन्ने तिसैन.

१. छ० १० जमादिलोवलः—चरखारीवाले येऊन भेटले. त्यांचे वांटणीस मुलूख साडेदहा लक्षांचा. त्यापैकीं लक्ष रुपयांचा त्यांजकडे राहिला आहे. बाकी अर्जुनसिंगानें घेतला. तो सोडवून द्यावा. त्याप्रमाणें व चालत आहे त्यासुद्धां चौ लक्षांचा राजास (अपूर्ण.)

---

## लेखांक ४९.

[लेखांक ४९ पासून ५६ पर्यंतचीं पत्रें अलीबहादराजवळचे मुत्सद्दी भिकाजी नारायण पाळंदे यांचीं आहेत. तीं संगतवार नाहींत. आधलींमधलींच आहेत. तीं अली-बहादराच्या पत्राचे पुडक्यांत सांपडलीं, सबब ह्या प्रकरणांत सामील केलीं आहेत.]

श्री.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १ जिल्काद मुक्काम मौजे करमळें पेटा साद्डा प्रांत मेवाड नजीक चितोड वर्तमान यथास्थित असे. विशेषः— उदेपूरकर राणाजी यांसी व त्यांचे कारभारी भीमसिंग चितोडकर यांसी बेबनाव जाला आहे. याजकरितां राणाजींनीं कोटेकर जालमसिंग यांसीं राजकारण करून, त्यांचे हातून होळकराकडे राजेश्री अंबोजी इंगळे यांचे मार्फतीनें बोलणें लाविलें आहे कीं, आमचे कारभारी बदलले आहेत; याचा बंदोबस्त करून द्यावा. त्याजवरून होळकर यांनीं थोडासा आधार दिल्हा आहे. यास्तव जालमसिंग कोट्याहून मुहूर्तेंकरून बाहेर निघोन लष्करांत येत आहेत. दोहों चहूं रोजांत येऊन पोंहचतील, व राणाजीचे पुरातन कारभारी भीमसिंग चितोडकर यांचें बोलणें, होळकराकडील शरीफभाई बोलतात कीं, आपण हा कारभार चित्तावर धरूं नये, याप्रमाणें आहे. परंतु कोटेकर आलियावर ठरेल तें खरें. जोधपुरकराकडील वकील होळकराचे घरीं लग्न जालें, त्याचीं वस्त्रें घेऊन चितोडास आला आहे. दोहों तिहीं रोजांत लष्करांत यावा असें

आहे. आलियावर त्याचा काय मजकूर आहे तो समजेल. राजकारणाचें बोलणें यांतच बोलावें असें आहे. राजश्री पाटिलबावा यांचीं पत्रें अंबोजी इंगळे यांस आलीं. त्यांतील व आणखीही बातम्या आल्या. त्याचा मजकूर कीं, पाटिलबावांचा मुक्काम मथुरेवरच आहे. भागीरथ शिंदे व हिंमतबहादूर यांस वगैरे फौजसुद्धां दिल्लीस बंदोबस्ताकरितां रवाना केलें. त्यांनीं जाऊन शहराजवळ मुक्काम करून पातशाहासीं राजकारण लाविलें. हें वर्तमान गुलामकादर व इस्मालबेग यांस कळतांच यमुना उतरून शहराचे बुरुजाखालीं येऊन मुक्काम केला, आणि शहाकडे अर्जी सांगून पाठविली कीं, आह्मी मुलाजमतीस येतों. त्याजवरून हुकूम जाला जे, उभयतां सडे येणें. तेव्हां त्यांनीं फौजसुद्धां तयार होऊन शहरांत चालले. त्याजवरून शहरचे दरवाजे दिल्हे. त्यांनीं दरवाजे यांस हत्ती लाविले, व शहरांतील मोंगल वगैरे लोक फोडिले. हें वर्तमान शाहास विदित होतांच, वकील पाठवून नाईलाज होऊन, त्यांस फौजसुद्धां आंत घेतलें. नंतर भेटी जाल्या. उपरांत सार्वभौमाचें बोलणें पडलें कीं, आह्मी तुमचे आधीन जालों आहों. जें करणें असेल तें करावें. त्याजवरून त्यांनीं उत्तर केलें कीं, आह्मी बंदगींत हजर आहों; दुसरा विचार नाहीं. साहेबांचाही दुसरा विचार नसावा. शाहा लाचार होऊन त्यांच्या सर्व गोष्टी मान्य केल्या. नंतर त्यांनीं नजबकुलीखान व शीख वगैरे यांस पातशाही खिलता घेऊन पाठविल्या जे, तुह्मी फौज सुद्धां जलद येथें येऊन पोंहचणें. नजबकुली या उभयतांचे मतांतच पहिल्यापासून आहे. त्या पक्षीं तो लवकरच येऊन पोहोंचेल, असें आहे. त्याजबरोबर सामान एक कंपू व कांहीं फौज याप्रमाणें आहे, व यांजपाशीं दहा पंधरा हजार फौज आहे. उभयतांनीं शहरचा व शाहाचा बंदोबस्त केला. हें वर्तमान भागीरथ शिंदे व हिंमतबहादूर यांस कळतांच, फौजसुद्धां बलमगडचे मार्गें चालिले. तेव्हां रोहिले वगैरे यांनीं दौड करून हिंमतबहादूर याच्या दोन तोफा व कांहीं बुणगें लुटून नेलें. यांनीं बलमगडास मुक्काम करून पाटिलबावांस पत्रें लिहिलीं. त्याजवरून पाटिलबावांनीं समस्त फिरंगी यांचीं बेगमेचीं चार पलटणें व आणखी फौजा कुमकेस रवाना केल्या. याप्रमाणें वर्तमान आहे. पुढें ठरेल तें सेवेसीं लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५०.

**श्री.**

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ रमजानपावेतों स्वामींचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः- राजश्री

सरदारांसीं व सदाशिवपंत दिवाणजी यांसी आंतून वितुष्ट बहुत पडलें. याचें कारण दिवाणजी लोकांजवळ बोलिले कीं, सरदारास पुण्यास नेणार, व आह्मांस सरंजामी फौज देऊन येथें ठेवणार. याप्रमाणें राजश्री पाटिलबावांनीं बेत केला आहे. असें सरदाराचे ऐकण्यांत आहे. त्याजवरून त्यांनीं ही गोष्ट आह्मांपासीं काढिली. त्यास आमचे ऐकण्यांत आहे कीं, राजश्री पाटिलबावांचें व सरदाराचें वितुष्ट पडलें, याजमुळें पाटिलबावा, सरंजामी फौज मात्र येथें ठेऊन घेऊन अलीबहादरास निरोप द्यावा याप्रमाणें बोलले. इतकें मात्र आमचे ऐकण्यांत परभारें आलें आहे. पक्का शोध लागेल तो मागाहून सेवेसीं विनंति लिहून पाठवूं. ही गोष्ट सरदाराची व दिवाणाची रुबरू जाली नाहीं. फौजेंत खर्चाचा बहुत गवगवा, याजमुळें सावकारापासून दिवाणजीस कर्ज मिळविण्याविषयीं सांगितलें. ती तर्तूद त्यांच्यानें न होय, याजमुळें वांकडें आलें ह्मणोन जाहिराण्याचे बोलण्यांत आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५१.

श्री. ता. ५ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ७ जमादिलावल स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष:—गोसावी यास अरुणचे किल्ल्यांत पाठवण्याविषयीं दोन चार पत्रें स्वामींचीं सरदारांस आलीं. परंतु अद्यापि त्याचा पाठविण्याचा बेत कांहीं घडला नाहीं. अलीकडे आह्मांपासीं दोन तीन वेळां सरदार बोलिले कीं, गोसाव्यासीं व राजश्री पाटिलबावासीं बोलणें लागलें आहे कीं, गोसावी यासी मुक्त करावा. त्यास त्यांचें बोलणें आहे कीं, गोसावी यानें दहा वीस लोकांनिशीं आह्मांपासीं राहावें, याप्रमाणें आहे. परंतु या कामास पंचवीस तीस हजार रुपये दरबारखर्च द्यावे लागतात. याप्रमाणें आह्मांस सांगितलें. तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, सरकारांतून रुपये द्यावे यांत चांगलें कीं काय? व नफाही कोणता आहे? गोसावी याकडून परभारें कार्य होत असल्यास बरें आहे. तेव्हां त्यांनीं उत्तर केलें कीं, "गोसावी त्यांजवळ राहण्यासी कबूल होत नाहीं, व पैकाही द्यावयास कबूल होत नाहीं. माझी मुक्तता करून स्थलांतरीं पोंहचावून द्यावें अथवा आपणाजवळ ठेवावें, असें जाल्यास च्यार रुपये देईन. नाहीं तरी मला पैसा मिळावयाचा नाहीं. याप्रमाणें त्याचें बोलणें आहे, व दरमाहाचे खर्चाची बेगमी पेशजीं करार होऊन एक दरमाहा पावला आहे त्याप्रमाणें द्यावा, असें बोलणें लागलें आहे." त्याप्रमाणें

## ३१. अंताजी माणकेश्वराचें पत्र.

दिल्लीवर आबदालीनें स्वारी केली, त्या वेळीं अंताजी माणकेश्वर हा पेशव्यांचा सरदार तेथें होता. त्यानें त्या प्रसंगाचें तपशीलवार वर्णन ह्या पत्रांत लिहिलें आहे. त्यावरून नारो शंकर, गोविंदपंत बुंदेले वगैरे मराठ्यांच्या प्रमुख सरदारांचें वर्तन कसें होतें, तेंही दिसून येतें. पानिपतच्या लढाईमध्यें मराठ्यांना जें अपयश आलें, त्याचीं कारणें सूक्ष्म रीतीनें पहाणारांस हें पत्र अतिशय मनोरंजक व उपयुक्त वाटेल.

[फिरकोळ] श्री. पैवस्ती छ २१ जमादिलाखर.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना:—सेवकाचें वर्तमान तागाईत माघ शुद्ध १ प्रतिपदा मुक्काम तालकटेरा सुखी असों. आबदालीची फौज साठ सत्तर हजार आटक उतरून, लाहोरास घेऊन, दिल्लीस दाखल जाहली. दिल्लींतील फौज नजीबखान रोहिले वगैरे सरदार, त्यांत बापूजी महादेव वकील मिळोन, अगोदर .........साहा कोस दिल्ली राहतां जाऊन भेटिले. आह्मी पुढें सडेस्वारीनिशीं गेलों. दोन लढाई मातबर जाहलीया घोडे दीडशें ठार जाले. साठ सत्तर असामी ठार जाली. जखमी घोडीं माणसें दोनशें चारशें आहेत. त्याचीं घोडीं च्यारशेंपर्यंत पाडाव केलीं. दोन तीनशें आबदालीचा धारकरी मारिला. परंतु फौज त्याची भारी, आणि सडी फौज नामांकित. तीस कोस नित्य घोडा धांवतो. तिकडे आबदाली, इकडे दिल्लींतील वजीर, पातशाहाचे उमराव, रोहिले, बलोच, खानखाना, सलाबतखान, बापू वकील, सामील जाहलें. तेव्हां पातशाहा—वजिरापाशीं चार हजार स्वार राहिले नाहींत. एक आमची फौज बारा हजार मात्र. आह्मी झुंजास गेलों, तेव्हां पांच स्वार दिल्लीचे समागमीं नाहींत. तिकडे आबदाली, इकडून दिल्लीची घरची फौज फितुरी. ऐसा सारा पेंच आह्मांवरी येऊन पडला. स्वामींचा प्रताप थोर. एवढ्या आरिष्टांतून दिल्लीस बुनगियांत दाखल जाहलों. तों वजीर खासा स्वार एक हजार घेऊन भेटीस गेला. तेव्हां आह्मी गुरुवारीं सकाळीं कूच करून हत्ती, कबिले, बुणगे कूच करून, पुढें घालून, पाठीवरी फौज चालोन फरिदाबादेस आलों. तों बारा कोस फौजेनें आमचा पाठीलाग केला. तो परस्थावा पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. ईश्वर तो दिवस वैरियास न आणो! तीस चाळीस घोडे वाटेनें आणिक ठार जालीं; परंतु वीस हत्ती, कबिले व झाडून बुनगे सुतळीचा तोडा जाऊं न दिला.........फरिदाबादेपासून दुसरे दिवशीं आजी लष्कर कसबे पळवल सुरजमलाच्या मुलुखांत लाऊन देऊन, आह्मी माघारें बाराफुलें याजवरी गेलों. तों वजीर त्यास भेटला. त्यांनीं नजरबंद केले. ऐसें खबर आली. पातशाही किल्ल्यांत त्याचे लोक दाखल पातशाही अटकेंत ठेऊन दिल्लीस द्वाही त्याची फिरली. फौज त्याची खासा आबदाली दिल्लीपासून सहा कोसांवरी आहे. वजीर त्याजपाशीं आहेत.

पातशाहा किल्ल्यांत त्याचे स्वाधीन आहेत. दिल्लींत अंमल दाखल आबदालीचा जाला. फौजा दिल्लीभोंवत्या त्याचे आहेत. आजी संध्याकाळीं मागतीं त्याचे फौजेचें आमचें झुंज भारी जालें. लोकांनीं शर्त केली. आबदालीनें तीन पातशाहा तिकडील जिंकून हिंदुस्थानची पातशाही घेतली; परंतु स्वामींच्या फौजेस बहुत मानवला. परंतु हिंदूंचे पूर्ण द्वेषी. त्यांत बापूजी महादेव सारे दिल्लीवाले यासी घेऊन........केलें, व जाठाचा मुलूख सोडवितों, ऐसें कबूल केलें असतां आमचें भेटणें उचीत काय? लाख स्वार आतां त्यांजकडे दिल्लींतील फितुरीयासुद्धां जमा जाहला. आह्मीं कोठवरी जीव धरावा? बारा हजार फौजा, त्यांपैकीं हिंदुस्थानची फौज च्यार हजार, ती दळाची शोभा मात्र. वरकड आठ हजार फौज देशची. त्याजवरी एव्हढें लढाई हे मारीत आली. आह्मी दिल्लीभोंवते आठचार दिवस ठोंसरें मारितों. सुरजमलाकडे वरचेवरी पत्र पाठवितों. जरी तो आला, तरी आमच्या सरकारच्या मुलुखाची व जाठाच्या मुलुखाची मेंढा राखोन राहूं. नाहींतरी आमची इलाज नाहीं. पातशाहा व वजीर याजपाशीं आह्मी मार्गेश्वर मासीं आलों. आजी दीड महिना आलों. बारा हजार फौज होती. त्याची पंधरा हजार हजरी देऊन, तीस लाख रुपये फौजेस शिबंदी करार करून घेतली, व रोख त्याच्या घरांत कवडी नाहीं. तेव्हां त्याचे सर्फखांसचे महाल ४ चार वसुली दहा लाखाचे परवाने करून घेतले, कीं आमचे तीस लाख फिटलीयावरी मग ही जहागीरच आह्मास द्यावी. परवाने तयार होऊन महालास कमाविसदार रवाना केले. त्याचे आठवे दिवशी आबदाली येऊन दाखल जाहले. महाल दिल्लीचे बारा पंधरा........तेथे आंमल आबदालीचा जाहला. पातशाहा व वजिराची आमची क्रिया जाहली होती कीं, लाहोरात वगैरे तीस लाखांची जहागीर द्यावी. आमचे आक्षेयी चालवावें. फौजदारी मागतीं दिली. सनदपत्र सर्व करून घेतले. पातशाहा रात्रंदिवस हेच ह्मणे की, "हे पातशाहात बाळाजीरायाची आहे. त्याचे सरदारास सत्वर बोलावून हें काम सिद्धीस नेणें. आमच्या घरांत कवडी नाहीं. आह्मांजवळ राहिला मुलूख आहे तोही घेणें." त्यास आह्मीं आपले प्रयत्न बहुत केले. राजेश्री समशेरबहादर यासीं हरोळ नारो शंकर जाले आहेत, ह्मणून त्याणीं आमच्या हातें हें राजकारण करूं दिल्हें नाहीं. वकिलाकडे निराळा जाबसाल लाविला, आणि रा. समशेरबहादरांस ग्वालेरीसच गोऊन, आमचे सरंजाम लुटून सत्यानास करविला. इकडे येऊं दिल्हें नाहीं. आपण आला नाहीं. सरकारचीं पत्रें त्यांजला स्वामींनीं आह्मांजवळ पाठविलीं, तीं त्यांजकडे पाठविलीं. त्याचीं उत्तरें वेडींवाकडीं लिहिलीं. आमची इलाज नाहीं! नाहींतर नारो शंकरांनीं नामर्दी करून जो घात केला, तो त्याची शीरछेदच करावासा केला. आमचे हातीं काय? स्वामीपाशीं त्याची आसामी शिपाईगिरीची भारी. आजीतागाईत जागां जागां कामें पडलीं, तेथें पळतच फिरला. परंतु कोठें डोईवरी घेऊन काम केलें नाहीं. आतां तरी पाताशाहातच बुडवून आह्मांस बुडविलें. ब्राह्मण आह्मी! आमचा विलाज नाहीं. नाहीं तरी त्याचा परिणाम जो होता तो होता. गोविंद बल्लाळाचे पुत्र, त्रिंबकराव शिवदेव, व धोंडोपंत यांस दोन दोन महिने व वजिराचे तर्फेनें राजकारणें बहुत केलीं. त्याचे मुद्दे सर्व कबूल केले, परंतु उगीच अंतरवेदींत

आहेत. परतु एकानें येऊन पांचा खारांनीं मदत केली नाहीं. कारण, हेच अंताजीपंत पातशाहा वजिरापाशीं पेश फार. त्याचे हातें हें न व्हावें, व बापू वकील मात्रागमनी. मन माने तेसें त्यास बहकावून लिहितो. त्याप्रमाणें त्यांनीं केलें. दिल्लींतून दामोदर महादेव तिघे भाऊ कबिले, पैका, हत्ती, खजाना, भारी घेऊन पळोन गेले. एक बापू व त्याची कलावंतीण सडी दिल्लींत आहेत. तो त्यास भेटला आहे. बरें, च्यार दिवस काबू साधोन श्रीमंत व सरदार येत, तोंवर सरकारच्या मुलुखांत अंमल तऱ्ही चांगला राहू देता, तर उत्तम. ते आधीं अंमल उठवावयास रोहिले वीस हजार तयार करणार! त्याचें अनुष्ठान सबळ. स्वामी त्याचें कांहींच चित्तावरी घेत नाहींत. आतां मोठी आशा आह्मांस दोन. नादरशाहाप्रमाणें मागतीं हेच पातशाहा व वजीर स्थापून माघारा गेला, तरी आमचा उपकार याजवरी राहोन, आमची जहागीर, माहाल पाया कायम होईल; पातशाहावरी जन्मवरी येहसान होईल; स्वामींच्या घरांत च्यार खेडीं येतील. याजकरितां मरत फिरतों. नाहीं तर पातशाहा वजिराचेंच वाईट जालें, तरी आमची सरकारची मुलुखाची अंमल झाडून उठेल. त्याची कांहीं तजवीज जाट व आपण मिळोन करावी हें काम. या दोहों कामांसाठीं दिल्लीभोंवते फिरतों. नाहीं तरी लाख फौज, दिल्लीची पातशाही त्यांनीं घेतली असतां, तमाम राजे अमीर शंभर कोस पळाले, धरणीकंप जाहला, तेथें आमची कथा काय? परंतु जिवास संकल्प घालून, हे कंबर बांधून फिरतों. वरकड तमाशा पाहातात! आबदाली येऊन दिल्लीस आला तोंवरी तीन झुंजें माझीं मात्र जालीं. नाहींतरी सर्व पळोन गेले. कांहीं त्यास भेटोन हरोळ जाले. याप्रमाणें दगा करून पातशाही बुडविली. आजी दोन महिने आटक उतरला, त्या दिवसापासून आह्मांस पातशाहा वजीर फौजांसाठीं बहुत मिनत करितात. आह्मी सर्वांस लिहित गेलों. सर्वांनीं दगाबाजीच चित्तीं आणून न आले. राजे माधोसिंग व बिजेसिंग तो परिछिन्न आबदालीस ह्मणतात:–"आमचा पातशाहा कामाचा नाहीं. मराठीयांसीं आह्मांस बांधोन देतों. तुह्मी आमचे पातशाहा. आह्मी तुमची सेवा करून हरोळ होतों. दक्षिणीयांपासून मुलूख सोडवूं." त्याच संमतांत बापू वकील. सारांश, त्यास दिल्लींतून नेहमीं उठविलें, तऱ्ही तमाम पठाण, रोहिले, राजे, आबदाली जमले, तऱ्ही सारें हिंदुस्थान जाईल; फार भारी पडेल.' लाखो फौजा जमा करणें लागतील; ह्मणून इतकें लिहितो. आह्मीं मनसबा केला तऱ्ही आमच्या घरास कांहीं जात नव्हतें. परंतु सर्वांनीं द्वेष केला. फौजेची वाट ह्मणावी [तर] साल गुदस्तां कर्जें घेऊन काम चालविलें. साल मजकुरीं गोविंद बल्लाळ यांनीं इटावे शुकुराबाद फफुंद येथील इजारीया प्रांतीं चिठ्या झाडून पुत्रावरी दिल्या आणि देशीं गेले. कबजें देखील रसीदेचीं घेतलीं. चिठ्या व्याज कापून ज्यास याल तो पैका देईल, ऐसें ह्मणून चिठीया दिल्या. शेवटीं चिठीया आगरीयासीं सेटजी विकून ऐवज घेऊन काम चालविलें. तों एक महिनीयानीं गोविंद बल्लाळ यांणीं पुत्रास लिहिलें कीं, श्रीमंतांनीं अंताजीपंताची जहागीर काढिली, तुह्मीं चिठीयाची कवडी न देणें. त्यानें चिठीया माघारीया टाकिल्या. मग फुकाचे भेटलेही नाहींत! एक भेटीचा रुपया, भाजीचा देंठही दिल्हा नाहीं! मी कमाविसदार दुसरें करून आंमल करितों. आमची असामी नाहक बदमामलीची असामी पडेल.

याजकरितां न केलें. त्याजवरी येथें खटपट करून जागा पायाशुद्ध केला. त्या पायावरी लाला बलगोविंद सावकार यानें पुष्कळ कर्ज दिलें. तों हें अरिष्ट आबदालीचें आलें. एकूण आह्मांवरीच ईश्वरी क्षोभ. आजी वीस लक्ष कर्ज शेटजी व लाला बलगोविंद व रामाजी अनंत मिळोन जालें. पुढें एका दिवसाचें खावयासी नाहीं. या प्रसंगीं येऊन बोलिले. याउपरी राजश्री गोविंद बल्लाळ यांजकडील अंतरवेदीचा ऐवज माझा झाडून देववावा व पुढें श्रीमंतांसही माझे विषयीं लिहावें. माझ्या श्रमावर कांहीं तऱ्ही स्वामींनी दृष्टी द्यावी. पुढें तपशीलवार वजिराचें, पातशाहाचें, तमाम लोकांचें, जें जैसें तपशीलवार होईल, तें पांचा सातां दिवसांनीं तपशीलवार लिहून पाठवीन. बापू वकील लबाडीच्या खबरी मनच्या भलत्याच लिहून पाठवील. तरी सर्व लबाड आहे. सेवकानें लिहिलें त्यांत काडीमात्र तफावत नाहीं. हत्ती, बुणगे, कबीले, सर्व जाटाचें मुलखांत लाऊन दिले. त्याची चिंता करीतच नाहीं. आह्मी सडे फिरतों. परंतु एके रात्रींतून दोहों जागा फिरावें लागतें. घोडीयांचीं जीनें रात्रीं दिवसां उतरत नाहीं. जिवावरी साटें करून फिरतों. न फिरावें तऱ्ही आतां कोणती गत करावी? सुरजमलाचें अवसान ठिकाणीं नाहीं. किरकोळ ठाणीं ठाकणार. परंतु आह्मीं त्यास आणावयास सुभेदार पाठविला. आला तरी उत्तम; नाहींतर विलाज नाहीं. याउपरी धोंडोपंत, त्रिंबकराव, गोविंदपंतांचे पुत्र, नारोशंकर, समशेरबहादर सारे मिळोन अंतरवेद तऱ्ही राखावयासी अंतरवेदींत येतील, तऱ्ही उत्तम. नारो शंकर परम दुष्ट. त्यानें गोहदेच्या मुलुखांत फोजा गोऊन त्यास पाडिलें. विलाज काय? आमच्या जिवांत जीव आहे, तोंवरी चाकरी जिवापेक्षां करून दाखवूं. त्याचे ध्यानास आणून ऊर्जित करावयासी खावंद समर्थ आहेत. आमची परत खावंदांनीं करावी. निसरसांड न करावी. इटावे, शुकुराबाद, फुफुंदेचा दुसाला हिशेब खमस सीतचा सरकारांत विल्हें न लावावा. अंताजीपंतांनीं तुह्मांपासून घेतला आहे, तोच प्रमाण. आम्ही अंताजीपंतापासून आपला हिशेब घेऊं, ऐसेंच असों द्यावें. कदाचित् स्वामींनीं विल्हेस लाऊन घेतला, तऱ्ही खावंदाचें केलें मोडूं नये. परंतु मी विल्हेस लागला हिशेब फिरवून घेईन. सबब माझी जहागीर आहे. एक रुपया जो मजला कळला, तो राहूं देणार नाहीं. पुढील जाबसाल कांहीं नवा त्यांसीं न बोलावा. तेही बहुतां दिवसीं दरबारास आले; वरीसभर रहातील. आह्मींही तिसरे सालचे मुलूखगिरीचें अखेर सालीं यंदा येऊन, रुबरू जे गोष्टींत आमचीं सरदारी सरंजाम आह्मांकडेस राहून स्वामीचा पैसा आकारेल, तेंच स्वामी करतील. त्याची चिंता नाहीं. उतावळीचें प्रयोजन नाहीं. तूर्त गोविंदपंतीं आमचे कबजे घेऊन पुत्रावरी चिठिया दिल्या, तो ऐवज सावकारास पंताकडून निक्षून ताकीद करून देववणार स्वामी समर्थ आहेत. सेवकाची विनंति उदास न करावी. जरी मागतीं याची स्थापना होऊन माघारें गेले, तरी सर्व उत्तम. नाहीं तर कांहीं बरें नाहीं. हे विज्ञापना."

* * *

# ३२. पेशवाईतील शिमग्याचा सण.

शिमग्याच्या सणाचें सांप्रत जें अनीतिपर व अश्लील स्वरूप कित्येक ठिकाणीं प्रचलित आहे, तें पूर्वीपासून चालत आलें आहे असा कित्येकांचा समज आहे. त्यावरून पेशवाईमध्यें ह्याहीपेक्षां शिमग्याच्या सणाचें स्वरूप अमंगल व अश्लील असलें पाहिजे, अशीही कित्येकांची कल्पना होते. परंतु वास्तविक प्रकार तसा नव्हता. सवाई माधवरावांच्या कारकीर्दीतील शिमग्याच्या सणाचा वृत्तांत दिलेलीं एक दोन अस्सल पत्रें येथें देतों. ह्मणजे पेशवाईतील शिमग्याचा सण कशा प्रकारचा असे, तें समजून येईल.

## लेखांक १.

[मेणवलीदप्तर.] श्री. ता. १६ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत फाल्गुन वद्य द्वितीया विशेषः—हुताशनीचे दिवशीं, श्रीमंत दिल्लीदरवाज्याचे बाहेर सायंकालीं दोन घटिका रात्रीं होळीजवळ येऊन, दर्शन घेऊन, दरवाज्याचे वरते एक क्षण बसून, तमाशा पाहून मग आंत गेले. दुसरे दिवशीं प्रातःकालीं चार घटका दिवसांत भोजन करून, तिरंदाजीचे दिवाणखान्यांत बसून, वरकड जवळचे बसणारे अमृतराव व वोढेकर व आबा हशबनीस व आनंदराव रास्ते, व मोरोबा फडके दोघे मुलें घरचीं घेऊन आले होते. शिदोबा नाईक थत्ते वगैरे मंडळी होती. खेळ, तमाशे, बीन, चार पांचशेंपर्यंत होते. अगोदर वाघबकरीचा खेळ जाहला. तदनंतर श्रीमंत उठोन पाणी प्यावयास गेले होते. समागमें मल्हारपंत भडभडे होते. मागतीं येऊन बसले. जेठीची लढाई लाविली. आबाजी व इश्रा यांची लढाई दोन घटिका पावेतों जाली. दोघेही समतुल्यच राहिले. मग मनाई जाली. दहा घटिका दिवसपर्यंत खेळ जाहला. मग श्रीमंत तेथून उठले. मंडळी घरास गेली. खेळांत पुढाईत बाळाजीपंत ठोसर व बाळाजीपंत केळकर हे दोघे. रात्रीं डफगाणें चार फड आणिले होते. गोविंदा सोंग्या व राणू पाटलाचा पुतण्या पोरे पांच जण होते. त्यांत एक चांगला होता. वरकड कांहीं चांगले नवते. श्रीमंत भोजन करून तिसरे घटकेस चाफेखणांत आले. वाड्यांतील मंडळी समागमें होती. अमृतराव पांचवे घटिकेस आले. बाळाजीपंत लेले, व मोरोबा फडके, खंडेराव त्रिंबक, खंडो अनंत, व शिदोबा नाईक थत्ते, जनार्दन राम, बाळंभट थत्ते, वरकड मंडळी होती. पांच सांत सोंगें गुदस्तप्रमाणें आलीं. एक प्रहर रात्र जाली. श्रीमंत उठोन निद्रेस गेले. वरकड मंडळी सर्वेच गेली. होळीचे अगोदर कोतवालास ताकीद "गांवांत कोणी खटखट न करी, अशी पेठोंपेठीं ताकीद करणें." त्यावरून कोतवालांनीं आपले प्यादे व कारकून पाठवून ताकीद केली. कोणाशीं

कजीया जाले नाहीं. वाड्यांतील आंत बाहेर चौकीचा बंदोबस्त चांगला होता. सेवेसीं कळावें हे विज्ञापना. वद्य तृतीया भृगुवार विशेषः– काल दुसऱ्यानें वाड्यांत खेळ भवानीपंताचा जाला. श्रीमंत दोन घटिका रात्रीं येऊन चाफेखणांत फर्डी तेथें बैठक. दोन तीन पोरे नाचणार होते. मागें डफगाणें. भवानीपंताचा अशकारा मात्र. सोंगें कांहीं चमत्कारिक नव्हतीं. तमाशा पहावयास मंडळी आली, त्यांची नांवनिशीः–अमृतराव, मोरोबा फडके, व वोढेकर, व खंडो अनंत, जनार्दन आप्पाजी, व त्यांचे चिरंजीव, रामचद्र नारायण व महादाजीपंत गुरुजी, व जनार्दनराम, सोयरे थत्ते मंडळी, वाड्यांतील मंडळी होती. खाले तमास बीन. एक प्रहर खेळ जाला. तदनंतर श्रीमंत उठोन निद्रेस गेले. वज्याबा मामा यांस बोलाऊं पाठविलें होतें. त्यांचें कपाळ दुखतें ह्मणून चोपदार सांगत होते. सेवेसीं कळावें. पोर्णिमेचे दिवशीं मोरोबादादाची सून प्रसूत होऊन पुत्र जाला. दोन घटिका होता. मृत्यु पावला. आज चार रोज जाले. विसाजीपंत बरवे यांचा पुत्र वारला. भिकोबा वैद्य यांनीं भाऊ विठोबा वैद्य यांचा पुत्र घेतला होता, तो पांच वर्षांचा होऊन मृत्यु पावला. कळावें. काल सकाळचे पोरांचे खेळांत दो ठिकाणीं कजीया जाला. एकः–बुधवारचे हवदाजवळ दोघे तिघे ब्राह्मण द्रावीड जात होते. पोरांनीं शेण अंगावर टाकिलें. ते शिव्या देत. पोरें अनिवार. अधिक धूळ टाकिली. एक दोघांस टाळक्यास धोंडे लागले. रडत निघाले. कोतवालांनीं समजाऊन वाटें लाविले. दुसरेंः–जोगेश्वरीजवळ तेलंग ब्राह्मणास धक्काबुक्की केली. इतकें जाले. हे विज्ञापना."

## लेखांक २.

[मिणवलीदप्तर.] श्री. ता. २० मार्च इ. स. १७८६.

"सेवेसीं विज्ञापनाः—तागाईत छ १९ जमादिलावल विशेषः–काल श्रीमंत पंचमीस बाळाजी नाईक थत्ते यांचे येथें भोजनास गेले होते. सौभाग्यवती रमाबाई अगोदर गेली. मग श्रीमंत प्रहर दिवसांनीं घोड्यावर बसून, दिल्लीदरवाज्यानें निघोन, समागमे अमृतराव, मल्हारपंत भडभडे, व बाळाजीपंत टोसर, वाड्यांतील मंडळी कार्याकारण गेली. भोजन होऊन थत्ते यांनीं श्रीमंतांस पोशाख दिल्हा. तदनंतर घोड्यावर बसून गणेशदरवाज्यानें आंत गेले. तिसरा प्रहरां पंचमीचा रंग केला. मजलस गणपतीचे दिवाणखान्यांत केली. कलावंतिणीचे दोन तीन ताफे होते. अमृतराव तिसरा प्रहरां आले. ते चाफेखणांत फर्डी बसून मग मजलसींत गेले. मंडळीस अगोदर बोलावणीं केलीं. तेही आले. पांच सहा घटिका दिवस राहतांना श्रीमंत आले. जवळच असणारे अमृतराव, कृष्णाजी नाईक थत्ते, बाळाजी नाईक थत्ते, बज्याबा मामा व आनंदराव रास्ते, बाळाजीपंत लेले, वोढेकर, खंडो अनंत, जनार्दन राम पागेवाले, जनार्दन आप्पाजीचे चिरंजीव, रामचंद्र नारायण, व गुरुजीचे चिरंजीव, व पारसनिसांचे मूल, चिटणीस, मजमदाराचे कारकून, हरी गोपाळाचे चिरंजीव, व मोरोबा फडके, चिटकोपंत व गोविंदराव

प्रभु व वाड्यांतील मंडळी वगैरे लोक होते. चार घटिका नाच होऊन मग रंगास आरंभ केला. श्रीमंतांनीं आपले हातें पिचकांडीनें कार्याकारण यांचे अंगावर घातला. बाळाजीपंत ठोसर व केळकर यांनीं सर्वांचे अंगावर घातला. तदनंतर रंगाची व गुलालाची रेल जाली. आंग व पोशाख भिजून चिंब जालीं. येथपर्यंत रंग खेळले. मग उठोन संधेस गेले. रात्रीं खेळ करावयास सांगितलें. भोजन करून दोन घटिका रात्रीं चाफेखणांत येऊन फडीं बसले. जवळचे बसणारे रास्तेखेरीज आवघे होते. गुरुजीबावाही आले होते. खेळ, डफगाणें, व पोरांचा नाच, गोविंदाचीं सोंगें सहा घटिकांपर्यंत खेळ जाहला. मग श्रीमंत उठोन निद्रेस गेले. पांच दिवस खेळ जाला. पहिले दिवसीं दिवसां जेठीची झोंबी व वाघबकरीचा खेळ, सायंकाळीं डफगाणें, पोऱ्याचा नाच, गोविंदा राणू यांनीं सोंगें आणिलीं. दुसरे दिवसीं त्याप्रमाणेंच भवानीपंताचा फड व तिसरें डफगाणें. महादु सुतार यानें लाकडाची बाहुली कळासूत्री व सूर्याचा रथ केला, तो चवथे दिवशीं दिल्लीचे कळासूत्री मजालस पातशाही अमीरपसंत तो खेळ चांगला जाला. पांचवे दिवशीं दिवसां रंग, रात्रीं डफगाणें. पोरे नाचणारे, गोविंद राणू सोंगाडे, याप्रमाणें पांच दिवस खेळ जाला. यांमध्यें चांगले पोरे नाचणारे सासवडकर एक, दुसरा जंगमाचा; शाहीरही गाणारे त्यांचेच हें चांगलें. बाकीचे कनिष्ठ भरती आणिले होते. सोंगांत भवानीपंतापैकीं दोन सोंगें, एक दाईचें व दुसरें मोगलाचें. गोविंदापैकीं गणपतीचें व दुसरें मुरळीचें. राणूपैकीं तपकिरीची नक्कल व सुतारापैकीं सूर्याचें. याप्रमाणें तमाशा जाहला. सेवेसी कळावें. काल आपले येथील सौभाग्यवती उभयतां बाई आपलाकें माहेरास गेल्या होत्या. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

* * *

## ३३. भाऊसाहेब पेशव्यांचें पत्र.

श्रीगजानन. ता. १८ एप्रिल इ. स. १७६०.

[नक्कल]

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोपाळराव गणेश स्वामी गोसावी यांसीं पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष:–तुह्मीं छ २५ रजबचीं पत्रें पाठविलीं, तीं छ २७ साबानीं पावलीं. आबदालीचें वर्तमान, व सरदाराकडील, व बंगाल्याकडील वगैरे कितीएक लिहिलें, तें कळलें. ऐशास प्रस्तुत सरदार कोठें आहेत? आबदाली कोणे ठिकाणीं आहे? मनसबा काय करितात? हें बारीक मोठें सर्व शोध करून वरिचेवरी जलद जोडीबराबर लिहीत जाणें. खासा स्वारीही देशीं मोंगलाचें पारिपत्य यथास्थित करून, मजल दर मजल हिंदुस्थानांत आबदालीच्या पारिपत्याकरितां येत आहे. छ २९ साबानीं हंडीयाचे घाटें नर्मदा पार जाहली. मालबर फौजसुद्धां सुरोंज खेचीच्या मार्गे दर कूच येत आहे. सरदारांच्या भेटींनंतर पोख्त मनसबा होऊन सर्व गोष्टी यथास्थित होऊन येतील. तुह्मीं तहांकडील वर्तमान यथातथ्य बारीक मोठें वरीचेवरी लिहीत जाणें. या गडबडीमुळें

आह्मीं राऊत, प्यादे, शिबंदी ठेऊन, अंमलठाणीं हा कालवरी रक्षिलीं. जरी शिबंदी नसती ठेविली, तऱ्ही अंमल उठला जाता. गडबड वारे तों शिबंदी दूर करितां येत नाहीं ह्मणून लिहिलें, तें कळलें. ऐसेयासीं शिबंदी ठेऊन अंमल राखिला, हें बरेंच केलें. आद्यापि बंदोबस्त ठीक होय तों कार्योकारण शिबंदी राखून सावध राहणें. सुज्यातदौलाच्या मनांत गडबड करावयाचें आहे. दबावितात ह्मणोन लिहिलें; तऱ्ही त्यांचेंही पारिपत्य लौकरच होऊन येईल. सुजाद्दौला यांणीं पहिल्यापासून स्नेहानेंच बर्तन राखिलें. आतां हे गोष्टी मनांत न आणावी. तुह्मीं मागें त्याचेविषयीं फार बोलत होतां. त्यास सांप्रत तैमूर याची पातशाही गारत आबदालीनें केली, ह्मणजे अमीर रजपूत आहे याची पादशाहात घ्यावयाशी राहील कीं काय ? जेथें लहानाचे थोर, दोन दोन पिढ्या तीन तीन पिढ्यांची पातशाही राखावयासीं आह्मी झुंजतों भांडतों, हे जर या गोष्टीची फिकीर मनांत न आणीत, तरी यामुळें आबदाली काय मनांत आणील, इतबार कसा पडेल, हें कळतच आहे. अखेर आह्मी जबरदस्त, आमचा पेंच त्यास आहे. तो जर स्नेहानें वर्तला तर त्याचा आमचा काय दावा आहे ? परंतु तो आह्मी एक होऊन, तैमूर याचे सलतनेचा नाश करावा हें आह्मांस योग्य नाहीं; व हे सारे आमचे स्नेही यांसहित सर्वांचें वाइट. हिंदुधर्म, व तैमूर याचें कांहींच नाहीं असें होणें, हें आमचे पाहिल्यांत कसें येईल ? व यांणींही हीच गोष्ट मनांत आणावी. कमर बांधून आह्मांस् व सरदारांस येऊन सामील व्हावें. घरचे पेंच असतील ते त्याचे आमचे विचारें दूर होतील. परंतु हा शत्रू नाहींसा करावा हेंच त्यास योग्य. याअन्वयें त्याशीं भाषण करणें. हें तुह्मांस सवड असली, कांहीं अनुसंधान असलें, तर ठीक करून त्यांणीं बमय फौज यावें. दुसरा विचार न करावा, हेंच करवणें. सुजातदौलाचे मार्फतीनें नजीबखान रोहिल्यानें आलीगोहर यासीं राजकारण कांहीं लाविलें आहे कीं काय किंवा नाहीं ? आलीगोहर कोठें आहेत ? त्यांची फत्ते कशी जाहली ? पुढें काय विचार करितात ? तें सर्व लिहिणें. तुह्मीं तिकडील जे जमीदार वगैरे असतील, ते सर्व आपले लगामीं लावून, त्यांजपासून आबदालीच्या अंमल तिकडे होऊं न पावें ऐसें करणें. आपला अंमल ठासून राखिला, उत्तम केलें. पुढेंही याच प्रकारें करणें. जाणिजे. छ १ माहे रमजान सुमा सितैन मया व अलफ. नारो खंडेराव व पांचशें राऊत शाहाजादी-याजवळ तुमचा आहे. त्यास उत्तम आहे. त्यास येथून आलीगोहरास लिहिलें आहे कीं, सारे अमीर व रजवाडे राजे यांसीं पत्रें, फौजसुद्धां आह्मांस येऊन सामील व्हावें, ऐसें पाठवावयाविषयीं लिहिलें आहे. तरी हीं पत्रें तुह्मीं लेहून सत्वर येत असें करणें व परभारेंही असेंच लिहिलें आहे. शहाजादीयानें तिकडील बंदोबस्त करून सत्वर यावें. पातशाहाअत दिल्लीस कायम करून परकी शत्रू नाहींसा करावा. मग घरचा बंदोबस्त सहजांत होईल. तरी हाही मजकूर लिहिणें. डौल धरावा. वारंवार बातमी बारीक लिहित जाणें. जाणिजे. छ १ रमजान बहुत काय लिहिणें ? हे विनंति."

* * *

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] एप्रिल १९१०. [अंक ९ वा.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें

तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

## २७. खेळोजी भोंसले.

खेळोजी भोंसले हा, मालोजी भोंसले ह्यांचा धाकटा भाऊ विठोजी ह्याचा थोरला मुलगा. हा आपल्या चुलत्याप्रमाणेंच अहमदनगर येथील निजामशाहीमध्यें प्रसिद्धीस येऊन तेथें त्यास मनसबदारी मिळाली होती. तो मोठा पराक्रमी सरदार होता. इ. स १६२९ चे सुमारास ज्या वेळीं शहाजीनें निजामशाहीचा पक्ष सोडिला, त्या वेळीं तो मालोजी व परसोजी ह्या दोन भावांसह मोंगलांस जाऊन मिळाला. तेथें त्यास 'पंचहजारी' ह्मणजे पांच हजार स्वारांची मनसब मिळाली. त्याप्रमाणें त्यानें मोंगलांच्या बाजूनें पुष्कळ शौर्याचीं कामें केलीं. परंतु इ. स. १६३३ मध्यें, ज्या वेळीं मोंगलांनीं दौलताबादच्या किल्ल्याला वेढा घालून तो हस्तगत करण्याचा प्रयत्न केला, त्या वेळीं कांहीं कारणावरून, खेळोजी भोंसले मोंगलांचा पक्ष सोडून विजापुरास गेला, आणि विजापुरकरांच्या वतीनें त्यानें मोंगलांशीं वारंवार लढाया केल्या. तो महाप्रतापी व रणझुंजार वीर असल्यामुळें मोंगलांस फारच शिरजोर वाटूं लागला. तेव्हां त्यांनीं त्यास दुसऱ्या एका मार्गानें ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला. त्याची बायको गोदावरीच्या कांठीं कांहीं पर्वणीनिमित्य गंगास्नानास गेली होती. तिला तेथील मोंगल सुभेदारानें पकडून आपल्या कैदेंत ठेविली. ती महा पतिव्रता असून तिजवर खेळोजीचें विशेष प्रेम होतें. हें जाणून, त्या सुभेदारानें, खेळोजीस विनम्र करण्यासाठीं, त्या बाईचे पातिव्रत्याचा भंग करण्याची त्यास भीति घातली. त्यानें खेळोजीस असा निरोप पाठविला कीं, "मनुष्याची अब्रू राखण्यासाठीं त्याच्या द्रव्याची किंमत. तूं जर मला चार लाख रुपये खंडणी देशील, तर मी तुझ्या बायकोला काडीमात्र उपसर्ग न लावितां तिची सुटका करीन. रुपये न देशील तर तिची अब्रू राहणार नाहीं." हें ऐकून खेळोजीनें निरुपायास्तव चार लाख रुपये त्या मोंगल सुभेदारास देऊन आपल्या प्रिय पत्नीची सुटका करविली. ह्यानंतर लौकरच विजापुरचा बादशाहा व मोंगल बादशाहा शहाजहान ह्यांचा तह झाला, त्यामुळें खेळोजीस आपल्या नौकरीचा राजीनामा द्यावा लागला. अर्थात् खेळोजीनें आपल्या पराक्रमाची अनेक प्रसंगीं शर्थ करून दाखविली असून त्याच्या पाणीदार स्वभावाप्रमाणें त्याचा यथायोग्य गौरव कोठेंच होईना, व वेळोवेळीं मोंगल लोकांच्या हातून त्याचा अपमान व मानखंडना होऊन अनेक प्रकारचें नुकसान झालें, तेव्हां तो त्रस्त होऊन आपल्या पूर्वजांचें वतनी गांव जें वेरूळ तेथें आला, व तेथें आपलें स्वतंत्र सैन्य जमवून त्यानें आसपासच्या मुलखांत लूटमार व दंगेधोपे सुरू केले. ही बातमी औरंगजेबास कळतांच, त्यानें मलिक हुसेन नामक सरदाराबरोबर कांहीं सैन्य देऊन, त्यास

त्याच्या बंदोबस्तास पाठविलें. त्यानें खेळोजीवर छापा घालून त्यास इ. स. १६३९ च्या आक्टोबर महिन्यांत धारातीर्थी पाठविलें. येणेंप्रमाणें शहाजीचा चुलत भाऊ जो खेळोजी त्याचा शेवट झाला.



## २८. इ. स. १७६८ मधील धुळपाचें आरमार.

इ. स. १७६८ मध्यें विजयदुर्ग येथें आनंदराव धुळप ह्यांचे हाताखालीं जें आरमार होतें, त्याची एक याद सांपडली आहे. ती मनोरंजक वाटल्यावरून पुढें दिली आहे. ह्या यादीमध्यें त्या वेळच्या जहाजांचीं नांवें व त्यावरील हशम ह्मणजे लढाऊ शिपाई व दर्यावर्दी लोक ह्यांची संख्याही दिलेली आहे. त्यावरून इ. स. १७६८ मध्यें विजयदुर्ग येथें धुळपाचे ताब्यांत किती आरमार होतें, त्याची कल्पना येईल.

| गुराब तिरकसी. | हशम लोक | दर्यावर्दी | एकूण. |
|---|---|---|---|
| १ दत्तप्रसाद | ११० | ७८ | १८८ |
| १ आनंदीप्रसाद | १०१ | ६८ | १६९ |
| गुराब दुघोसी. | | | |
| १ शिवप्रसाद | ६५ | ४९ | ११४ |
| १ रामप्रसाद | ६५ | ४९ | ११४ |
| १ गणेशप्रसाद | ४० | ३९ | ७९ |
| १ साहेबसदर | ७५ | ५४ | १२९ |
| | ४५६ | ३३७ | ७९३ |
| भत्यां गलबतें. | | | |
| १ सवाई रघुनाथ | २५ | २४ | ४९ |
| १ नरनाथ | २८ | २९ | ५७ |
| १ फत्तेलष्कर | २८ | २९ | ५७ |
| १ शंभू | २८ | ३४ | ६२ |
| १ खांदेरी उंदेरी | २५ | २५ | ५० |
| १ अच्छा सरदारी | १५ | २० | ३५ |
| १ शहातीर | २५ | २० | ४५ |
| १ नवरतन | १५ | २० | ३५ |

**भर्त्या गलबतें.**

| | | | |
|---|---|---|---|
| १ सुग्रीव | १५ | २० | ३५ |
| १ यशवंती | २० | २० | ४० |
| १ हवावीर | १० | १० | २० |
| १ गरुड | १० | १५ | २५ |
| १ हनुमंत | ९ | ११ | २० |
| १ सवाई समशेर | २५ | २५ | ५० |
| १ लहिरी | २५ | २४ | ४९. |
| १ दौलती | ८ | १० | १८ |
| १ वावडी | ६ | ९ | १५ |
| १ यशवंतराव | १५ | २० | ३५ |
| १ हिरकणी | १७ | १८ | ३५ |
| १ नारिंजा (?) | २५ | २४ | ४९ |
| १ सडक | ४० | ३४ | ७४ |
| १ पवन | २० | १५ | ३५ |
| १ वसई समशेर | २४ | २७ | ५१ |
| | ९१४ | ८२० | १७३४ |

किरकोळ.

| | | | |
|---|---|---|---|
| २ महागिऱ्या<br>२ लांगबोटी<br>१ वाघी | १० | ४० | ५० |
| | ९२४ | ८६० | १७८४ |

ह्यावरून इ. स. १७६८ मध्यें, विजयदुर्ग येथें आनंदराव धुळपाजवळ मोठ्या तिरकसी गुराबा २, दुघोशी गुराबा ४, भर्त्या गलबतें २३, आणि किरकोळ महागिऱ्या वगैरे ५ मिळून ३४ गलबतें होतीं, व त्यांवर हशम लोक ९२४ व दर्यावर्दी ८६० मिळून १७८४ लोक होते. हें आरमार पुढें पुष्कळ वाढलें होतें, हें निराळें सांगावयास नकोच.

* * *

## २९. गंगाधरशास्त्री पटवर्धन.

हे विद्वान् ब्राह्मण गृहस्थ श्रीमंत गायकवाड सरकारचे दिवाण होते. हे गायकवाड सरकाराकडून पुणें येथें दुसरे बाजीराव पेशवे ह्यांच्याकडे वकिलीस आले होते. बाजीरावसाहेबांचें व ह्यांचें कांहीं कारणावरून वांकडें येऊन, त्यांनीं त्रिंबकजी डेंगळे ह्यांचे मार्फत, पंढरपूर येथें त्यांचा इ. स. १८१५ मध्यें खून करविला, हें इतिहासप्रसिद्धच आहे. गंगाधरशास्त्री हे फार बुद्धिमान् व शहाणे मुत्सद्दी होते. ते ब्रिटिश सरकारच्या मध्यस्थीनें व त्यांची हमी घेऊन पुणें येथें आले होते. त्यामुळें त्यांचा व इंग्रज रेसिडेंट मि० एल्फिन्स्टन ह्यांचा चांगला परिचय झाला होता. त्यांना संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान होतें. त्याप्रमाणेंच त्यांनीं इंग्रजी भाषेचीही थोडी ओळख करून घेतली होती. राजकारणनिमित्तानें त्यांचें व इंग्रज लोकांचें बरेंच दळणवळण झाल्यामुळें त्यांस इंग्रज लोकांविषयीं अधिक आदरबुद्धि उत्पन्न झाली होती. ते नेहमीं त्यांचें अनुकरण करण्यांत तत्पर असत. त्यांच्याबद्दल मि० एल्फिन्स्टन ह्यांनीं एके ठिकाणीं उल्लेख केला आहे, तो फार मौजेचा आहे. ते लिहितातः—

"This man, Gungadhar Shastree, is a person of great shrewdness and talent, who keeps the whole state of Baroda in the highest order, and here lavishes his money and marshals his *suwary* in such a style as to draw the attention of the whole place. Though a very learned Shastree, he affects to be quite an Englishman, walks fast, talks fast, interrupts and contradicts, and calls .the Peshwa and his ministers "old fools" and "damned rascals" or rather "dam rascal". He mixes English words with everything he says, and will say of some one (Holkar, for instance): "Bhot *tricks*-walla thā; laikin burra akulkund, kukeye (cock-eye) thā."

ह्यावरून, गंगाधरशास्त्री ह्यांच्याबद्दल मि० एल्फिन्स्टन त्यांचें काय मत होतें, तें उघडच आहे. शास्त्रीबुवांचें हिंदुस्थानीमिश्रित इंग्रजी भाषेचें ज्ञान "यशवंतराव होळकर बहोत ट्रिकवाला था, लेकिन बडा अकलकंद, काकआय (काकचक्षू) था," ह्या वाक्यावरून दिसून येतें. मराठी अमदानीमध्यें एतद्देशीय लोक इंग्रजी कसें बोलत असत त्याचा थोडासा मासला ह्यावरून समजून येतो.

* * *

दुर्गोजी राजे महाडीक यांच्या नांवें कोल्हापूरचे महाराज शंभु छत्रपति यांनीं राजशक ५१ (इ. स. १७२५) मध्यें दिलेलीं कांहीं सनदापत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांवरून दुर्गोजी राजे यांनीं कोल्हापूरकरांस मिळून त्यांच्या साह्यानें बराच प्रांत काबीज करण्याचा प्रयत्न केला असावा असें दिसतें. हीं पत्रें येणेंप्रमाणें:—

श्री.

"श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री दुर्गोजी राजे माहाडीक यांसीः—

प्रति राजश्री राजा शंभु छत्रपति आशीर्वाद उपरीः– तुह्मीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन, लेखनार्थ तुह्मांकडून त्रिवर्ग आले यांणीं सविस्तर कुशल अभिप्राय सांगितला, तो विदित होऊन परम समाधान वाटलें. यापेक्षां उत्तम तें काय? तुह्मीं अंगेज करून राजकार्य मनसुबा करावा हेंच अवश्यक. याकरितां येविसींची आज्ञा यांस जें करणें तें करून पाठविले आहेत. कागदपत्र सनदा यांजवळ दिल्या आहेत. सविस्तर तुह्मांस सांगतील त्यावरून कळेल. तरी तुह्मीं याउपरी अंगेज करून, जे सामील करून घ्यावयाचें ते सामील करून घेऊन, त्या प्रांतें इकडील सेवकपणाचा भारीपणें घंटाघोष करून, संतोषवर्तमान लेहून पाठवणें. तुमचें वरचेवरी जसें साहित्य करणें तसें करून, केल्या अंगेजाचें सार्थक होय ऐसी गोष्ट केली जाईल. तुमचे मनोदयानरूप चालविण्यास अंतराय होणार नाहीं. येविसीं सर्व प्रकारें समाधान रक्षून योजिला प्रसंग सिद्धीस पावविणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें."

श्री.

"स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ५१ क्रोधीनामसंवत्सरे फाल्गुन शुद्ध नवमी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी यांणीं, चिरंजीव राजश्री दुर्गाजी नाईक माहाडीक यांसी आज्ञा केली ऐसीजेः–तुह्मांस स्वामिकार्याची आज्ञा करून तुह्मांकडे फौजेचे बेगमीस सरंजाम खेरीज इनाम व खासगी व किल्ले कोटाचे गांव खेरीज करून मुकासे लेहून दिले असेतः—

सरकारें बारा एकूण माहाल.

| | | |
|---|---|---|
| १ | परांडे माहाल १९ | प्रांत भागानगर. |
| १ | धारूर ७ | १ |
| १ | नलदुर्ग १ | |
| १ | सोलापूर १ | |
| १ | अक्कलकोट १ | प्रांत सगर |
| १ | कलबुरगे ५ | १ |

१ येतगिरी १ प्रांत कर्डे रांजणगांव
१ मल्खिड ६ १
१ हवेली बेदर ८
१ कल्याण २
१ नांदेड ३५
१ रामगीर २२
१२

येणेंप्रमाणें बारा सरकारें वतनप्रांत मुकासा करून दिला असे. या सरंजामांतील फौज तुह्मांस सामील होईल, त्यांचा सरंजाम त्यांस चालवणें. सामील नव्हेती, त्यांचा सरंजाम नसे. फौजेस देऊन जमाव करणें, आणि फौजमवाफिक सरंजाम करून देणें. खाजगीचे माहाल व गांव आहेत, तेथील ऐवज व बाबतीचा ऐवज तहाप्रमाणें हुजूर पाठवीत जाणें. बहुत काय लिहिणें."

श्री.

"राजश्री बजाजी नाईक निंबाळकर गोसावी यांसीः—

ॐ अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शंभु छत्रपति उपरी चिरंजीव राजश्री दुर्गोजी राजे माहाडीक यांणीं स्वामींचें राज्य अभिवृद्धीतें पावावें येविसींचा अंगेज केला आहे. याकरितां यांसी त्या प्रांतें रवाना केले आहेत. हे तुमचें दर्शन घेऊन सविस्तर आपले खाजगत भावार्थ सांगतील, तो चित्तास आणून सर्व प्रकारें यांची साह्यता करणें. कदाचित् समयानरूप आपणाकडील लोकांचे कबिले तुमचे स्थलास आणून ठेवतील, त्यास अंतर पडों न देतां जागा देऊन, पुढें योजिला कार्यभाग सिद्धीतें पावे तें करणें. स्वामींचें राज्य वृद्धीतें पावावें, हेंच तुह्मीं पहिलेपासून अगत्य धरीत आहां. त्यास कोण्हेविसीं अंतर करितां ऐसें नाहीं, हा तुमचा भरंवसा स्वामींस पूर्ण आहे. जाणिजे. बहुत काय लिहिणें."

श्री.

"राजश्री मालोजी नाईक निंबाळकर गोसावी यांसीः—

ॐ अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शंभु छत्रपति उपरी चिरंजीव राजश्री दुर्गोजी राजे माहाडीक यांणीं स्वामींच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी, येविसींचा अंगेज केला आहे. याकरितां यांसी आज्ञा देऊन त्या प्रांतें रवाना केले आहेत. ऐसीयास स्वामींच्या राज्याविना तुह्मी इतर अवश्यक जाणत नाहीं. तरी हें तुह्मांस लिहोन व सांगोन पाठवितील, त्याप्रमाणें अंतर होऊं न देतां, साह्यता करून स्वामींचें मनोभिष्ट सिद्धीतें पावे, तें करणें. समया-

नुरूप हे आपणाकडील लोकांचे कबिले आणून ठेवतील. त्यांस जागा देऊन पुढें योजिला कार्यभाग सिद्धीस पावे, तें करणें. बहुत काय लिहिणें."

श्री.

"राजश्री साबाजी नाईक निंबाळकर गोसावी यांसीः—

५ अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य प्रति राजश्री राजा शंभु छत्रपति उपरी चिरंजीव राजश्री दुर्गोजी राजे माहाडीक यांसी कितेक स्वामिकार्याची आज्ञा करून त्या प्रांतें पाठविले आहेत. आज्ञेनुरूप स्वामिकार्याचा अंगेज करून साहित्या-विषयीं तुह्मांस लिहितील व सांगतील. त्याप्रमाणें सर्व प्रकारें अनुकूल होऊन स्वामिकार्य सिद्धीस जाय, स्वामी तुह्मांवरी संतोषी होत, तें करणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें."

ह्या सर्व पत्रांवरून दुर्गोजी राजे हे कोल्हापुरकरांस सामील होऊन कर्नाटकांत भागानगराकडे वगैरे राजकारणें खेळवीत होते, हें सिद्ध होतें. ह्यांनीं माहुर प्रांता-वर मुलूखगिरी केली होती, असेंही प्रत्यंतर पुराव्यावरून दिसून येतें.* हे दुर्गोजी राजे, शंकराजी राजे ह्यांचे भाऊ किंवा पुत्र, हा निर्णय करितां येत नाहीं. कदाचित् हे शंकराजी राजे ह्यांचे पुत्रही असण्याचा संभव आहे. कारण, शंकराजी राजे ह्यांस दुर्गोजी व आंबाजी असे दोन औरस पुत्र होते. त्यांपैकीं वडील पुत्र

* माहूरच्या मुलूखगिरीवर असताना त्यांनीं त्रिपतीच्या श्रीव्यंकटेश देवास नवस केल्याचा उल्लेख पुढील पत्रांत आढळतो. हें पत्र वाचनीय आहे. तें येणेंप्रमाणें:-

"अक्षय्य सौभाग्यसपन्न ॥ अभंग गळसरी बांधे नारायण ॥ तेणें अभंग वज्र कंकण ॥ चंद्रार्क जोंवरी नृपती ॥१॥ अवतार धरी नारायण ॥ तेथें शक्ती प्रगटे आपण ॥ लक्ष्मीचें नामाभिधान ॥ देव ठेवी कौतुकें ॥२॥ शेषाद्रि पर्वतावरी ॥ स्वयें नांदे श्रीहरी ॥ तेथें लक्ष्मी अधिकारी ॥ सांभाळ करी भक्ताचा ॥३॥ ऐशिये लक्ष्मीचे सेवेसीं ॥ चित्त गुंतलें दिवानिशी ॥ उपेक्षा न धरावी मानसीं ॥ हेचि विनंती सेवेतें ॥४॥ पालन करी बालकासी माता ॥ ज्ञान उपदेश करी पिता ॥ तेचि कुळींची कुळदेवता ॥ लक्ष्मी माता तूं एक ॥ ५ ॥ श्रीव्यंकटेश भूवैकुंठ ॥ त्रिमल त्रिपती सरकार अर्काट ॥ सहस्रायु चिरंजीव भक्त ॥ राजे दुर्गोजी माहाडीक ॥ ६ ॥ वास्तव्य तारळें यांसीं:— आशीर्वाद उपरी, तुह्मी माहूरच्या मुलुखगिरींत बिटरगांव मोकामीं बोलले होतेत, आह्मी क्षेम गृहास पावल्यानंतर श्रीस नऊ तोळे सुवर्ण व ताडपत्री पासोडी एक देऊं, ऐसा तुमचा संकल्प आहे. यासी साक्षी भानजी माहाडीक व यशवंतराव मदने आहेत. तुह्मीं पत्रदर्शनीं श्रीचा नवस, देवपुत्र तुह्माकडे पाठविले आहेती, याचे हस्तीं प्रविष्ट करणें. आपण ह्मणतील श्रीनें जागृति आपणांस करावी. ऐसें जरी भिस्ती आणतील, तरी आपली हुंडी तुह्मांवरी नाहीं. ऐसाच नवस लहानपणीं राजसबाई बोलली होती. त्यास स्मरण धाकुटपणींचें नव्हतें. मग स्मरणपत्र पाठविल्यानंतर त्यांनीं नवस प्रविष्ट केला. त्यास तेंही पत्र तुह्मांकडे पाठविलें आहे. अंतरसाक्षी मी आहें. ठेवाल जरी नवस तरी, कलौ श्रीव्यंकटेश तुह्मीं पत्र वंदून पूजन करणें. तेणेंकरून यश लक्ष्मी आयुष्याभिवृद्धि होईल. बहुत काय लिहिणें? हे आशीर्वाद. आनंदनाम संवत्सर पौष वद्य नवमी. या पत्रास मिथ्या ह्मणेल तो स्वधर्मास मुकेल."

दुर्गोजी ह्यांस शंकराजी राजे ह्यांचें सर्व वतन व जहागीर मिळणें रास्त होतें. परंतु कागदपत्रांवरून असें दिसून येतें कीं, वडील पुत्र ह्मणजे दुर्गोजी राजे ह्यांचा वारसपणाचा हक्क शंकराजी राजे ह्यांच्या पश्चात् श्रीमंत छत्रपति शाहू महाराज व महाडिकांचे गोत ह्यांनीं मंजूर न करितां, सर्व वतन धाकटे पुत्र आंबाजी राजे ह्यांच्या नांवें करून दिलें. ह्या संबंधाचें वृत्तिपत्र उपलब्ध झालें आहे. त्यांत "दुर्गोजी महाडीक ज्येष्ठ पुत्र यांसी आपणापासून वारंवार द्रव्यांश विशेषात्कारें पावला असोन, अमर्यादेनें वर्तोन विभक्त आहे" असें कारण दाखविलें आहे. परंतु शाहूमहाराजांचे प्रतिपक्षी कोल्हापूरचे शंभु छत्रपति ऊर्फ संभाजी राजे ह्यांस दुर्गोजी राजे हे सामील झाल्यामुळें, शाहूमहाराजांच्या मनांत त्यांच्याविषयीं अप्रेम उत्पन्न होऊन, कदाचित् त्यांचा वारसदारीचा हक्क नाहींसा होण्याचा प्रसंग आला असेल असेंही संभवतें. परंतु ह्या संबंधाचे सर्व अस्सल कागदपत्र उपलब्ध झाल्यावांचून ह्या शंकेचा निर्णय होणार नाहीं. असो. आंबाजी राजे महाडीक ह्यांस मिळालेलें वृत्तिपत्र पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

श्री.

"राजश्री आंबाजी बिन शंकराजी राजे महाडीक यांसी दिल्हें वृत्तिपत्र ऐसीजेः—

सौभाग्यवती मातोश्री भवानीबाई महाडीक यांसी तर्फ तारळें येथील वतन सरदेशमुखी व नाडगौंडा व इनाम कसबे दरोबस्त वगैरे देहे तर्फ मजकूर आपण दिल्हें होतें. त्यास राजश्री शंकराजी राजे महाडीक देहावसान पावले. भवानीबाई यांणीं सहगमन केलें. ते समयीं दुर्गोजी महाडीक ज्येष्ठ पुत्र यांसी आपणापासून वारंवार द्रव्यांश विशेषात्कारें पावला असोन, अमर्यादेनें वर्तोन विभक्त आहे. आंबाजी महाडीक यांसी कांहीं पावलें नाहीं. तरी सदरहू वतन इनामें कुली यांस देऊन यांचें चालविलें पाहिजे, असें बोलोन स्वामींचे हातें दिल्हें. त्यास प्रस्तुत सर्व सभेच्या मतें ज्येष्ठ पुत्रास यापैकीं कांहीं न द्यावें ऐसा निश्चय जाहला. त्यावरून सदरहू वतनें व इनामाचा विभाग करून तुह्मांस विभाग करून दिला आहे. बितपशीलः—वतन सरदेशमुखी व नाडगौंडकी देहाय. १ कसबा तारळें, १ मौजे बोपोशी, १ मौजे तोंडोसी, १ मौजे वजरोसी, १ मौजे मरळोसी, १ मौजे कडवे खुर्द, १ मौजे घोट, एकूण ७.

खालसा व हुजूर वसुली इनाम देहे. १ मौजे बोपोशी, १ मौजे मरळोसी, एकूण २. इनाम पट्टी देशमुख व देशपांडे तर्फ मजकूर रुपये १०८.

इनाम दुतर्फा. १ कसबा तारळें दुतर्फा देखील इनाम तिजाई कुलबाब, कुलकानू व जकात तर्फ मजकूर. ३ दुतर्फा देखील इनाम तिजाई देखील कुलबाब कुलकानू. (१ मौजे घोट, १ मौजे तोंडोसी, १ मौजे कडवे खुर्द) एकूण ४. धनगरवाडा वस्ती तर्फ मजकूर यांजकडून सरदेशमुखी व नारगोंडकीचा हक्क होईल त्यापैकीं निमे ·॥· किता १.

येणेंप्रमाणें तुह्मांस व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें दिल्हे असे. तरी तुह्मीं सदरहूप्रमाणें अनुभवून सुखरूप राहणें. येविशीं पत्रें पौष बहुल द्वितीया इंदुवासर मुक्काम पाली.*"

असो. शंकराजी राजे ह्यांच्या पश्चात् त्यांचे धाकटे पुत्र आंबाजी राजे हे त्यांच्या वतनाचा कारभार पाहूं लागले. ह्यांची कारकीर्द किती वर्षें झाली व ह्यांनीं पराक्रम काय केले, ह्याची माहिती समजत नाहीं. ह्यांची मुलगी गुणवंताबाई ही धाकटे शाहूमहाराज ह्यांस दिली होती. इ. स. १७४९ मध्यें शाहूमहाराज मृत्यु पावल्यानंतर मराठ्यांची सर्व राजसत्ता पेशव्यांच्या हातीं गेली. तेव्हांपासून महाराष्ट्रांतील अनेक जुनीं मराठी घराणीं मागें पडून तीं लुप्तप्राय झालीं, व त्यांचें पराक्रमतेज अस्तंगत झालें. त्याबरोबर हें महाडिकांचें कुलीन व पुरातन घराणेंही नामशेष झालें, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ह्या घराण्याचा शरीरसंबंध खुद्द सातारकर छत्रपतीबरोबर अनेक वेळां झाल्यामुळें त्यांतील पुरुष कांहीं तैनाती उपभोगून आपली कालक्रमणा करीत असत.

आंबाजी राजे हे कधीं मृत्यु पावले हें समजत नाहीं. त्यांस हरजी व सखोजी असे दोन पुत्र होते. त्यापैकीं हरजी हे बरेच प्रसिद्ध होते. ह्यांस श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधी ह्यांनीं लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून त्यांची योग्यता त्या वेळीं किती होती तें दिसून येतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"राजश्री हरजी राजे महाडीक गोसावी यांसः—

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधी आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेषः— राजश्री निळोपंत बक्षी कसबा तारळें येथें मुक्कामास आले. त्यांजपाशीं तुह्मी लोक सुद्धां सामील झालां ह्मणोन मशारनिल्हे यांनीं लिहिलें. ऐशास, तुह्मी पुरातन, पदरचे कर्ते माणूस, या दौलतीचा भार सर्व तुह्मां लोकांवर आहे; आणि

* हें पत्र ता. १२ जानेवारी इ. स. १७२९ ह्या मितीचें आहे. ह्यामध्यें शंकराजी राजे ह्यांची पत्नी भवानीबाई ही आपल्या पतीबरोबर सती गेल्याचा उल्लेख आहे. ह्यावरून इ. स. १७२८ मध्यें शंकराजी राजे मृत्यु पावले हें सिद्ध होतें.

संरक्षणही करणार तुह्मीच आहां. कळेल त्या प्रकारें करून दौलत संरक्षण करणें सर्व दौलत तुमची आहे. वरकड राजश्री निळोपंत तुह्मांस करारमदार करून देतील त्याप्रमाणें सरंजाम देऊन चालविलें जाईल. जाणिजे. चंद्र ३० माहे सफर बहुत काय लिहिणें."

हरजी राजे कधीं मृत्यु पावले तें समजत नाहीं. त्यांस भवानजी राजे व कुसाजी राजे असे दोन पुत्र होते. त्यांपैकीं कुसाजी राजे हे शूर असून स्वारी-शिकारींत फार तरबेज होते. ह्यांची मुलगी बाईसाहेब ही श्रीमंत महाराज प्रतापसिंह ह्यांचे धाकटे बंधू रामचंद्रराव ऊर्फ भाऊसाहेब ह्यांस दिली होती. ती इ. स. १८३३ मध्यें वारली. कुसाजी राजे हे पेशवाई बुडाल्यानंतर इंग्रजांस मिळाले; ह्मणून इंग्रजसरकारांनीं त्यांची खानदानी लक्षांत घेऊन, त्यांस दरसाल १५०० रुपयांची नेमणूक करून दिली.* ह्यांच्यावर श्रीमंत छत्रपति प्रतापसिंह महाराज ह्यांची पूर्ण कृपा होती. सबब त्यांनीं त्यांस आपल्या दरबारांत लष्करचे सरदारीची जागा दिली होती व चांगली नेमणूकही करून दिली होती. कुसाजी राजे ह्यांच्यावर सातारचे रेसिडेंट कप्तान ग्रांटडफ साहेब ह्यांचीही फार मेहेरबानी होती.

कुसाजी राजे हे पुढें लवकरच मृत्यु पावले. त्यांच्या मागून त्यांचे चिरंजीव भवानजी राजे हे आपल्या वडिलांच्या सरदारीचे मालक झाले. ह्यांच्यावर श्रीमंत छत्र-पति शहाजी राजे ऊर्फ आपासाहेब महाराज ह्यांची चांगली कृपा असल्यामुळें त्यांच्या शौर्यादि उत्तम गुणांचें चीज होऊन, त्यांस स्वारांच्या रिसाल्याचे मुख्य अधिकारी

* This is to certify that a pension of Rupees one thousand and five hundred 1500 per annum for life and during good behaviour has been granted by the British Government to the bearer *Kooshaba Raja Maharick* native of the District of Tarley. This pension to commence with the last Fuslee viz. the 6th of June 1819.

CHAPLIN.

Poona.
5th July 1820.

**सरकारदौलत मदार कंपनी इंग्रेज बहादर.**

बईस कुसाजी राजे माहाडिक वस्ती तारळें यांसी सालीना पेनशीन रुपेय १५०० मोबलग एक हजार पांचशें रुपेये ताहयात वर्तणूक चांगली आहे तोंपर्यंत कंपनी सरकारांतून मोकरर करून दिल्हें असे. तरी याप्रमाणें अलफ अशरीन मयातैन व अलफ शुरू छ ६ जून स. इसवी १८१९ मुताबला सन १२२९ फसलीपासून पोंचत जाईल. जाणीजे. तारीख ५ जुलई सन १८२०, मुताबला सन १२३० फसली सु॥ इहिदे अशरीन मयातैन व आलफ मुकाम पुणें.

Compared
J. MACLIOD,
Assist. Secretary.

नेमण्यांत आलें होतें. त्यांच्या अंगच्या उत्तम गुणांची फार प्रशंसा होऊन त्यांस श्रीमंत महाराज शाहाजी राजे ह्यांच्याकडून अनेक पारितोषिकें मिळालीं. इ. स. १८४८ मध्यें सातारचे महाराज मृत्यु पावले व तें राज्य खालसा झालें. तथापि, इंग्रजसरकारानें भवानजी राजे महाडीक ह्यांच्या शौर्याची तारीफ करून त्यांस "सरदारबहादूर" असा किताब दिला. ह्या संबंधानें सातारचे कमिशनर मेजर ओगलव्ही ह्यांनीं भवानजी राजे ह्यांस पाठविलेलें पत्र उपलब्ध झालें आहे, तें येणेंप्रमाणें:—

### सन १८५१.

"मेहेरबान भवानजी राजे महाडीक रिसालदार सरदारबहादूर सलामहू

७३ अज तर्फ थॉमस वोगलवीसाहेब इस्कौयर कमीशनर इलाखा सातारा सलाम अर्की:—आपण सातारा संस्थानाकडे बिनदेरसी स्वारांवरील रिसालदारीची नोकरी चांगले प्रकारें केल्याबद्दल आपल्यास "सरदारबहादूर" ही किताब देण्याविसीं इकडून मुंबई सरकारास लिहिलें होतें. ते इंडियाचे गवरनरजनराल-इन-कौंसल यांणीं मेहेरबानगीनें पमंत केलें, ह्मणोन मुंबईहून मेहेरबान मालीट साहेब चीफ सकटतारी निसबत सरकार यांणीं नंबर २४३८ तारीख ९ जून सन १८५१ इसवीचे पत्रांत इकडे लिहून कळविलें, त्याजवरून आपल्यास "सरदारबहादूर" ही किताब दिल्याचें मालुम व्हावयास्तव लिहिलें आहे. तारीख १४ माहे जून सन १८५१ इसवी."

भवानजी राजे ह्यांचे वंशज तारळें येथें आपला प्राचीन वतनाचा उपभोग घेत अद्यापि हयात आहेत. ह्यांच्या जवळील जुने कागदपत्र उपलब्ध झाले, तर महाडिकांच्या थोर व प्राचीन घराण्याची अधिक माहिती जगापुढें येण्याचा संभव आहे.



**फलटणचे निंबाळकर.**

( श्रीमंत मुधोजीराव बापूसाहेब. )

## २ फलटणचे निंबाळकर*.

### श्रीमार्तंड.

"सूर्यवंशी परमार कुळांतील राजघराणेदार यांतील एक पुरुष निंबोदा पवार याणें, शंभु महादेवाचें शिखर शिंगणापुरचे नजीकचे निरथडीचे अंगास, निंबाचे झाडींत, तप करण्यास पर्णकुटिका बांधून, निरहारव्रतानें तपास अर्बा सबा सीत मयांत करून, अकरा वर्षे उग्र तप केलें. पुढें बारा वेळ आश्विनमासीं नवचंडीचे घटाची स्थापना करून, अष्टमीचे पर्यंत दररोज महामंत्राचा जप एकासनीं करून, मध्यरात्रीं होम करून, पूर्ण आहुती आपले शिरकमळाची दिली. तेव्हां देवी प्रगट होऊन सावध करून दर्शन दिल्हें, आणि वर देऊन मोरचल दिल्हे. पुढें याची कीर्ति ऐकून पुष्कळ लोक जमले, व दिल्लीचें सैन्य येऊन एक वर्षानें त्यास मिळालें. नंतर चार वर्षांनीं अनागोंदीचे किरटी रामराजासीं युद्ध जाहलें, त्यांत त्याचा पराजय जाला. पुढें त्यानें याच्याशीं सलोखा केला. नंतर त्याजकडे जाऊन एक वर्षानें आपल्या गांवीं जयघोष करीत परत आला. पुढें एक वर्षानें त्यानें कैलासवास केला. त्यांस पुत्र धारापत नामें होता. दिल्लीचा सरदार मलिक-उल्-तिजार याणें नर्मदेअलीकडे येऊन, मुलखाच्या बंदोबस्तास धारापत यास साहाय्य अशर सबा यांत करून घेऊन, आपण दिल्लीस गेला. धारापत पुंडावे, झोडीधाडी करीत असत. त्या वेळेस दिल्लीस अल्लाउद्दीन बादशाहा होता. नंतर तीन वर्षांनीं याचे पराक्रम पाहून सरदारी दिली. तैनातीस बारा हजार स्वार दिल्हे. नंतर अजमासें पंधरा वर्षांनीं आपला चिरंजीव निंबराज यास बरोबर घेऊन, दिल्लीस जाऊन, तेथें पंजाबचे लोकांशीं युद्ध करून, ते त्यांत पतन पावले. तें बादशाहानें पाहून त्यांस तुह्मी पुन्हां समरास जाऊं नये असें सांगितलें. तरी तें न ऐकितां जाऊन पडले. यामुळें त्यांचे चिरंजीव निंबराज यांचा सर्व सरदारांसमक्ष बहुमान करून वस्त्रें दिलीं, व 'नायक' किताब देऊन वतन जहागीर साडे तीन लक्षांची दिली. ती समान अशरीन सबा मयांत देऊन डंका वगैरे राज्योपभोगाचीं सर्व चिन्हें दिलीं. नंतर ते वतनाची सनद घेऊन निंबळकास आले. पुढें फलटणची वस्ती तीन वर्षांनीं चांगली केली. वेशी व तट बांधिला. पुढें अजमासें दहा वर्षांनीं यांचे पदरचे चोथे व कुचे या लोकांनीं

* ही लहानशी कैफियत फलटणचे जहागीरदार श्रीमंत महाराज बापूसाहेब नाईक निंबाळकर ह्यांचे जुने दप्तरांत सांपडली. ही इ. स. १८२२ मध्यें लिहिलेली असून हींत उपयुक्त माहिती विशेष आहे, सबब ती येथें प्रसिद्ध केली आहे.

खजिना लुटला. त्यांस धरून त्यांनीं कैद केलें. नंतर एक वर्षानें निंबराज यांस पुत्र जाहला. त्याचें नांव वणंगभूपाळ ठेविलें. तेव्हां कैदी बंधमुक्त केले. पुढें ते आठ वर्षांनीं बाळराज्य करून परलोकास गेले. त्याचे अगोदर त्यांनीं फलटण येथें देवीचें देऊळ बांधिलें. चोथे व कुचे व मुक्तबोध यांणीं बेदरचे सुभेदारास अनुकूल करून, सैन्य जमवून, भोजनाचे वेळेस मारा करून, नायक मंडळीस मारून टाकिलें. त्या वेळेस त्यांची तिसरी बायको जयवंताबाई यांणीं आपलें मूल सहा महिन्यांचें घेऊन गुप्तपणें बाहेर पडून शिंप्याचे घरीं जाऊन राहिली. तेथून कांहीं लोकांचे साह्यानें मोठ्या गुप्तपणानें बाहेर पडून, मोठें दुःख वाटेंत भोगून, निंबोडी येथें वणजारी कारभारी याचे घरीं नेऊन ठेविलें. त्यांणीं शत्रूंच्या भयास्तव तेथून बाईस मुलासुद्धां नेऊन जाळोली कोळोली येथें बाळोजी पाटील ढमे याचे घरीं ठेविली. पुढें तें मूल थोर होऊन त्याणें लोक जमवून, गुप्तपणानें बाजारचें मिष करून फलटणांत शिरून, चोथे, कुचे व मुक्तबोध यांचे सर्व लोक मारून आपलें राज्य परत घेतलें. ते सल्लास तिसा सबा मयांत हा प्रकार जाहला. वणंगपाल राज्य करूं लागले. सर्व लोक आनंदित जाहले. त्यांणीं नजराणे दिले. पुढें त्यांनीं आपले आईस फलटणास आणिलें. सर्व लोकांस पोशाक देऊन मार्गस्थ केलें. नंतर वणंगपाळ यांणीं दिल्लीचे बादशाहा यांस भेटून, 'आमचें राज्य पुंडांनीं घेतलें, तें आह्मीं परत हस्तगत करून घेतलें,' असें कळविलें, त्याजवरून त्यांस पोशाक व फरमाना दिल्हा. पुढें गांवीं येऊन राहिले. नंतर दोन वर्षांनीं पोटशूळाचे आजारानें खमस तिसा सबा मयांत मरण पावले. नंतर त्यांचे चिरंजीव वणंगोजी—यांच्या डोळ्यांच्या पापण्या लांब असल्यामुळें यांस 'पलख वणंगोजी' नांव पडलें होतें—यांणीं आपले मुलकाची लागण चांगल्या रीतीनें लोकांस तगाई देऊन केली. नंतर दोन वर्षांनीं दुर्गादेवीनामें दुष्काळ बारा वर्षें पडला. यामुळें मुलूख उठून गेला. दुष्काळांत लोकांचें संगोपन नायकांनीं चांगलें केलें. तीं बारा वर्षें सरतांच एक वर्षानें आजारानें नाईक मरण पावले. नंतर त्यांचे चिरंजीव मालोजीराव नाईक हे राज्य करीत असतां, पांच वर्षपावेतों मुलकांत पर्जन्य बरोबर न झाल्यामुळें लोकांची हैराणगत जाहली. मालोजी क्षयरोग होऊन अकरा वर्षांनीं पुढें— ह्मणजे इहिदे अशरीन समान व मया यांत— परलोकवासी जाहले. त्यांचे चिरंजीव बाजी नाईक हे गादीचे अधिकारी जाहले. हे राज्य करूं लागल्यापासून सुमारें दहा वर्षें मुलकाची हैराणगतच दुष्काळामुळें होती. यांचे कारकीर्दीचीं तेरा वर्षें जाहल्यावर, पुढें वसूल भरकमाल येऊं लागला. पुढें यांणीं स्वार ठेऊन सुमारें आठ दहा वर्षें पूर्ववत्प्रमाणें राज्य यथास्थित

केलें. नंतर यांस वायू होऊन हिजरी ८६० यांत मरण पावले. नंतर त्यांचे चिरंजीव पवारराव नाईक यांणीं आपले बापाचे मागें दहा वर्षें राज्यकारभार उत्तम करून, फसली ८६५ यांत दिल्लीस जाऊन बहिलोल-खान बादशाहाची भेट घेतली. त्या वेळेस ऐवनपूरचे (?) बादशाहाची लढाई सुरू होती. त्यांत यांणीं मोठा पराक्रम करून लौकिक मिळविला. नंतर बादशाहा खुष जाला. पुढें प्रकृति अस्वस्थ जाल्यामुळें ते बादशाहाची परवानगी घेऊन फलटणास आले. ते क्षयरोगानें विक्रम शक १५२७ सालीं मरण पावले. नंतर त्यांचे चिरंजीव दुसरे बाजी नाईक आपले वडिलांमागें राज्य करूं लागले. यांणीं हिजरी ९०४ सालीं विजापुरचा युसफ आदिलशाहा याची भेट घेऊन, त्याचे सल्यानें राहण्याचा निश्चय करून, सन १४९० दांत आपले पूर्वजांनीं मिळविलेली सनद दाखवून दुमालपत्र करून घेतलें, व बादशाहानें स्वारांचा रिसाला नायकाचे ताब्यांत दिल्हा. तो फसली ९२५ मध्यें दिला. त्याच सालीं तिमाजी आंग्रे याची व बादशाहाची लढाई जाली. त्यांत दुसरे बाजी नाईकांनीं मोठें शूरत्व केलें. त्याजवरून बादशाहा खुष होऊन नायकाचा मोठा सन्मान करून वस्त्रें दिलीं. पुढें नाईक फलटणास आले. नंतर सन ९१३ त दुसरे बाजी नाईक हे अतिसाराचे दुखण्यानें समाप्त जाहले. नंतर त्यांचे चिरंजीव मुधोजी नाईक हे राज्य चालवूं लागले. ते विजापुरास जाऊन युसफ आदिल-शाहा बादशाहा यास आपले वडील निवर्तल्याची हकीकत सांगून, त्यांचे मर्जीनें तेथें राहून स्वाऱ्या शिकाऱ्या करीत. त्यामुळें त्यांचा पराक्रम पाहून त्यांस बादशाहांनीं ४० हजार होन बक्षीस दिल्हे. ते घेऊन नाईक फलटणास आले. नंतर त्यांनीं आपले मुलकांत राहून राज्याचा बंदोबस्त चांगला केला. सन ९२८ त काजी कलबुर्गेकर यांचा कज्जा बादशाहांनीं यांजकडे दिल्हा, त्याचा निकाल त्यांनीं ताथवडा येथें केला. तेव्हां काजीप्रमाणें निकाल जाहला नाहीं. सबब प्रतिपक्षकारांनीं नाईकास नजर चुकाऊन ठार मारिलें. त्या जखमेनें कांहीं वेळानें नाईक तेथेंच मेले. त्यामुळें फलटणचे लोकांस व नाईकाचे माणसांस दुःख जालें. नंतर त्यांचे चिरंजीव बाजी धारराव हे राज्यावर बसले. त्याच सालीं त्यांनीं विजापुरास जाऊन सुलतान इस्माल आदिलशाहाची भेट घेतली. त्यानें त्यांस सन्मानपूर्वक ठेवून घेतलें. बाजी धारराव यांचें वय, वडील मरण पावले ते समईं, अजमासें ८ वर्षांचें होतें. ते विजापुरचे बादशाहाची आज्ञा घेऊन फलटण येथें हिजरी ९४९ सांत आले. ते विजापुरीं सहा सात वर्षें होते. तेथून आल्यावर त्यांणीं आपलें लग्न केलें. यामुळें त्यांस संतति उशीरानें जाहली. पुढें त्यांणीं आपले

पाशीं सैन्य बरेंच जमविलें व पुंडावे करून द्रव्य मिळविलें. त्यांनीं दहा वर्षें फसली ९६३ पर्यंत फलटणांत राहून सुखानें राज्य केलें. त्यानंतर विजापुरचा बादशाहा इस्माल आदिलशाहा हिजरी ९६९ त हक्क जाला. त्याचा पुत्र सुलतान मल्लू आदिलशाहा गादीचा अधिकारी जाला. त्याचे भेटीस नाईक गेले. त्यानें त्यांचा मोठा सन्मान केला, व त्यांस आपल्यापाशीं ठेऊन घेतलें. त्यानंतर मुत्सद्दी लोकांनीं मल्लू आदिलशाहास सन ९५६ त मारिलें, व त्याचे जागेवर त्याचा भाऊ सुलतान इब्राहीम यास बसविलें. त्याणेंही नाईकाचा सन्मान चांगला राखिला. पुढें सन ९५८ त तो बादशाहा हक्क जाला. नंतर त्याचे गादीवर त्याचा पुत्र सुलतान आदिलशाहा आला. त्याणेंही नाईकाचा बहुमान केला. त्यानंतर नाईक सन ९६० त फलटणास आले. त्या वेळेस त्यांस क्षयाचा आजार जाहला होता. त्या आजारानें फसली ९७० ते कैलासवासी जाहले. नंतर त्यांचे चिरंजीव दुसरे मालोजीराव गादीचे अधिकारी जाहले. त्या वेळेस त्यांचें वय सुमारें ३० वर्षांचें होतें. मालोजी नाईक यांस चिरंजीव वणंगोजी नाईक ऊर्फ जगपाळराव जाहला. ह्यासच फलटणराव नाईक ह्मणत, व मालोजीराव यास कन्या जाली तिचें नांव दिपाबाई होतें. सुलतान आदिलशाहा यांणीं नाईकास विजापुरास नेऊन तालीकोटचे लढाईवर पुढारी करून पाठविलें. त्यांत त्यांनीं जय मिळविला. त्यामुळें बादशाहा खुष जाले. पुढे ते त्यांचे आज्ञेनें फलटणास आले. पुढें फसली ९८० पोटांत रोग होऊन मरण पावले. नंतर वणंगपाळराव नाईक हे आपले वडिलांचे गादीचे अधिकारी जाले. ते पुढें विजापुरास जाऊन सुलतान आदिलशाहा ह्यास भेटोन, आपले वडील परलोकवासी जाहले यामुळें दुःख जाहलेलें सांगून, तेथें थोडे दिवस राहून, त्याचे आज्ञेनें फलटणास आले. ह्याच सुमारास मालोजी व विठोजी राजे भोंसले आपत्काळ असलेमुळें नाईकापाशीं नोकरीस राहिले. नाईकांनींही त्यांस सालिना बाराशें होन देण्याचें कबूल केलें. पुढें त्यांच्या सहित नाईकांनीं कोल्हापुरावर स्वारी केली. त्या स्वारींत भोंसले यांणीं चांगला पराक्रम करून कोल्हापूर सर करून घेतलें. तें वर्तमान विजापुरचे सुलतान आदिलशाहास समजलें. त्याणें चौकशी केली. त्यांत वणंगोजी नाईक हे आपले पदरचे असोन त्यांणीं स्वारी केली. त्यामुळें त्यांस बोलावून नेऊन स्वारीखर्चाबद्दल तीस हजार होन घेणें आणि कोल्हापूर परत देणें असें बोलणें जाहलें. त्याजवर नाईकांनीं खर्च न घेतां कोल्हापूर तसेंच परत दिल्हें. मालोजी व विठोजी यांचा तपास करितां, त्यांचें वतन नगरचे बादशाहानें जप्त केलें आहे, असें बादशाहास समजलें.

त्या वेळेस त्यांचा मोठा सन्मान जाहला. पुढें फलटणास आल्यावर भोंसले नाईकाची आज्ञा घेऊन पडळगांवास गेले. तेथें जाधवराव यांजकडून पत्र आलें कीं, तुमची जहागीर खुली जाहली. नंतर हें वर्तमान नाईकास समजल्यावर नाईकांनीं आपली बहीण दिपाबाई मालोजी राजे यांस लग्न करून दिली. ते सन ९७३ त फलटणांत आले. पुढें ७४ त विजापुरास सुलतान इब्राहीम यास भेटण्यास गेले. तेव्हां कर्नाटकचे नबाब बदल जाहले होते, त्यांजवर पाठविलें. तिकडे जाऊन त्यांनीं चांगला बंदोबस्त करून, आपले तर्फे मनुष्य नेमून बादशाहाचे आज्ञेनें फलटणास आले. पुढें फसली ९९० सालीं त्याजकडून पत्र आलें कीं, बादशाहा सुलतान इब्राहीम आदिलशाहा मरण पावला. त्याचा पांचवा पुत्र सुलतान आदिलशाहा गादीवर बसला. पुढें कांहीं दिवसांनीं मालोजीस पुत्र जाहला. सन १५९४ इसवी. हें वर्तमान नाईकास समजलें. त्यांणीं मोठा आनंद केला. कांहीं दिवसांनीं ह्मणजे हिजरी १०१९ त शाहाजीस लुकजी जाधवराव यांची कन्या देण्याचें ठरलें असोन रहित केलें. ही गोष्ट फलटणास वणंगोजी नाईकास समजली. त्यांणीं फौजेची तयारी केली. पुढें नगरचे बादशाहा अहमदशाहा याची भेट जाली. त्यांणीं युक्तीनें भोंसले यांस आणवून आपण तें लग्न करविलें. नाईकांनीं फौज वाढविली होती. पुढें विजापुरचे बादशाहाचे व नगरचे बादशाहाचे प्रधानाची लढाई जाली. त्यांत नाईकांनीं विजापुराकडून त्यांच्याशीं लढाई मोठी केली व पराक्रम केला. यामुळें बादशाहांनीं नाईकास पंचवीस लक्ष रुपये इनाम देऊन, पुढें सांगितलें कीं, स्वस्थता जाल्यावर आणीकही इनाम देईन. त्या वेळेस सन १०२६ असोन पुढें एक वर्षानें नगरचा प्रधान मलिकंबर मरण पावला. त्याच संधींत विजापुरचा बादशाहा इब्राहीम आदिलशाहा मरण पावला. त्याचे गादीवर महमद आदिलशाहा बसला. नंतर दिल्लीचा शाहाजाहान बादशाहा याची नगरचे बादशाहासीं लढाई जाली. त्यांत विजापुरचे बादशाहा नगरचे पक्षानें होते. यामुळें नाईक त्यांत होते. तेव्हां नाईकास जखमा लागून नगरांतच फसली १०४० मध्यें मरण पावले. त्याच सालीं त्यांचे चिरंजीव मुधोजीराव गादीचे अधिकारी जाले. ते दिल्ली आणि विजापुरचे राज्यांत पुंडावे करीत. हें वर्तमान उभय ठिकाणचे बादशाहांस कळलें. त्यावरून त्यांणीं नाईकास धरण्यास सैन्य रवाना केलें. त्यांत विजापुरचे लष्कराची व नाईकाची गांठ सातान्यानजीक पडली. तेथें मोठी लढाई जाली. त्यांत नाईकास सेनापतीनें धरून सातारचे किल्ल्यावर नेऊन ठेविलें. तेथें त्यांनीं सेनापतीचे द्वारें आपलें धाकटें कुटुंब व चिरंजीव

बजाजीराव नाईक यांजला आपणापाशीं आणविलें. कारण, त्यांचे जिवास कांहीं अपाय होईल ह्मणोन या भीतीनें आणविलें, व जहागीर वतनावर गुमास्ते ठेविले. हें वर्तमान दिल्लीचे सैन्यास नर्मदेतीरीं कळतांच तेथून तें माघारें गेलें. नाईकाचे पहिले बायकोचे चिरंजीव जगदेव व साबाजीराव यांणीं आपले मातुश्रीसहित विजापुरीं जाऊन, बादशाहाची नोकरी धरून त्यास खुष करून, दहिगांव व भाळवणी जहागीर वतन वंशपरंपरेनें करून घेतली, आणि हुजूर राहण्याची आज्ञा बादशाहानें दिली. त्यावरून त्यांणीं वतनाचा बंदोबस्त करून बादशाहाचे हुजूर राहूं लागले. हा प्रकार इ. सन १६३४ इसवींत घडला. किल्ल्यावर नाईक हे अटकेंत अजमासें दहा वर्षे होते. पुढें ते शाहाजी राजे भोंसले यांचे द्वारें महमद आदिलशाहा बादशाहाचे हुकुमानें खुले जाहले व त्यांस बादशाहानें फलटणास जाण्याविसीं आज्ञा करून, फलटणचे अंमलदारास नाईकांचे स्वाधीन जहागीर वतन वगैरे करण्याचा हुकूम केला. त्यावरून नाईक तो हुकूम घेऊन फलटणास सन १०४० त आले. ते कुटुंब व चिरंजीव बजाजीराव यांचे सुद्धां आले. पुढें आपले मुलखाची लागण केली. नंतर नाईकांनीं आपली मुलगी सईबाई, शाहाजी राजे भोंसले यांचे चिरंजीव शिवाजी राजे यांस देऊन, लग्न विजापुरीं केलें. त्या लग्नांत महमद आदिलशाहा बादशाहा यांणीं येऊन सन्मान केला. नंतर सन १०४१ त जगदेव व साबाजीराव व बजाजीराव या तिघांच्या वांटण्या करून, बजाजीस फलटण जहागीर वतन देण्याचा ठराव करून, विजापुरचे बादशाहाचा हुकूम आणिला. ते समई विक्रम सन सोळाशें अठ्याण्णव होता. नंतर नाईक आपलें कुटुंब व चिरंजीव बजाजी नाईक यांसुद्धां शिरवळानजीक भोळी येथें आपले जांवई शिवाजी राजे यांचे ह्मणण्याप्रमाणें पुंडावे करण्याचे कामीं मदतीस छावणी करून राहिले. तेथें वाठारचे चोर यांची विधवा कन्या आपलें द्रव्य घेऊन नाईकाचे आश्रयास राहिली. तिचे बापानें नाईकास विनंति केली व नाईकांनींही तीसह जावयास सांगितलें. परंतु नाईकापुढें तिचे बापानें जगदेव व साबाजीराव यांस हा मजकूर कळवून, त्यांनीं नाईकाचा सूड उगविण्याचें मनांत आणोन, नाईक पुंडावे करितात हें वर्तमान बादशाहास समजलेंच होतें त्यांतच गिल्ला करून, त्यांजला धरून आणण्यास आपण साह्य होऊन, भोळी येथें लढाईत नाईकास ठार मारिलें. ते समई फसली दहाशें त्रेपन्नचें साल होतें. तेव्हां बजाजीराव यांस धरून विजापुरीं बादशाहाकडे नेलें. त्या समई त्यांची स्त्री गरोदर होती. ती गुप्त रूपानें आपले माहेरीं गेली. तेथें प्रसूत जाली. पुत्र जाहला, त्याचें नांव महादाजी नाईक ठेविलें. बादशा-

ह्मनें फलटण जहागीर जप्त केली, ते समई राजाळकर निंबाळकर यांणीं बादशाहापासून फलटण प्रांताची देशमुखी आपले तनख्यांत मागून घेऊन सनद घेतली. नाईकास बापाचे अपराधाबदल जिवें मारण्याची आज्ञा जाली. पुढें बादशाहाचे सरदार माने, घाटगे, घोरपडे आदिकरून व काळोजी शिंदे ताथवडेकर यांणीं विनंति करून, मारण्याचा हुकूम रहित करोन, मुसलमान धर्म स्वीकारून, बादशाहाची मुलगी बेगम इच्यार्शी बादशाहानें लग्न लाऊन, आपलेपाशीं कांहीं दिवस ठेऊन घेऊन, पुढें बेगमचे वतीनें नाईकांनीं फलटणचा अमल आपलेकडे घेऊन, बादशाहाचा फरमान घेऊन, फलटणास सन सोळाशें एकावन्नांत येण्यास निघाले. पुढें महादेवीं येऊन शुद्ध जाले. नंतर फलटणीं आल्यावर बेगम हक्क जाहल्याचें समजलें. तेव्हां नाईकास दुःख जालें. पुढें फलटण प्रांताची लागण केली. नंतर महादाजी नाईक यांचें लग्न शिवाजी राजे भोंसले यांचे कन्येबरोबर पुण्यांत जालें. यावर फलटणास येऊन पुढें थोडक्याच मुदतींत महादाजी नाईक यांचें ओहर आपले कुलस्वामी श्रीखंडेराव जेजुरीचे देवास नेलें. वाटेंत वाल्हेगांव लागला. तो पाहून महादाजी नाईक बोलले कीं, हा गांव चांगला आहे, आपल्यास मिळेल तर बरें होईल. त्यावर पुढें दिपवाळीचे ओवाळणीबद्दल सकुबाईनीं शिवाजी राजे भोंसले यांजकडून तो मागून घेतला. त्याजबद्दल गांवास ताकीद दिल्ही. हा प्रकार सन सोळाशें सत्तावनांत जाहला. बजाजीराव यांची स्त्री सावित्रीबाई मरण पावल्यावर त्यांनीं आणखी दोन लग्नें केलीं. त्यांत वडील कुटुंबास गोरखजी नाईक सन १६५८ इसवींत जाले, व धाकटे कुटुंबास दोन पुत्र जाले. त्यांत वडील वणंगोजी नाईक यांचा जन्म विक्रम शक १७१५ त जाला. धाकटे मुधोजीराव यांचा जन्म फसली १०१७ त जाला. नंतर बजाजीराव यांचे पुत्रही शिवाजी राजे यांचे वतीनें वागूं लागले. नाईक हे मौजे बावडें तर्फ इंदापूर येथें छावणी करून राहून त्यांस मदत करीत असत. पुढें गोरखजी नाईक अतिसाराचे आजारानें मरण पावले. तेव्हां सन दहाशें एकाचें साल होतें. पुत्रशोकानें नाईक कित्येक दिवस अन्न नित्याप्रमाणें सेवन करीत नसत. नंतर वणंगोजी नाईक यांचें लग्न शिंदकेरचे जाधवराव यांचे कन्येबराबर सन सोळाशें बहात्तर इसवींत जालें. त्या बाईचें नांव लक्ष्मीबाई असें ठेविलें. पुढें एक वर्षांत ह्मणजे सन सोळाशें त्र्यहात्तर इसवींत मुधोजीराव यांचीं दोन लग्नें साधारण प्रतीच्या मराठ्यांचे कन्यांबरोबर केलीं. त्यांत वडील बाईचें नांव शिवाऊ व धाकटे बाईचें नांव जिवाऊ अशीं ठेविलीं. पुढें नाईकास बावडें येथें अपस्मार वायु अकस्मात् होऊन कैलासवासी जाले. त्या वेळेस त्यांचें वय त्रेसष्ट

वर्षांचे होते. त्या वेळेस महादाजी नाईक भागानगर येथें शिवाजी राजे यांचे आज्ञेनें छावणी करून होते. तेथें नाईक वारल्याचें वर्तमान त्यांस समजलें. तेव्हां ते फलटणांस येण्यास निघाले. परंतु महाराजांनीं सांगितलें कीं, "तुम्ही फलटणचे जहागिरीचा हक्क सोडून द्या, आम्ही तुम्हांस मोठें राज्य देऊं व तुमचे हातून महत् कार्य होणार आहे. याजकरितां वणंगोजी नाईक याजला अधिकारी गादीचे करण्यास परवानगी द्यावी." त्याप्रमाणें जाहल्यानें वणंगोजीस गादीचा अधिकार प्राप्त जाहला. पुढें बजाजी नाईक यांचा गुमट बांधिला. तिसरे वणंगोजी नाईक यांचे बंधू मुधोजी नाईक यांस स्त्रिया दोन. त्यांत जिवाऊस पुत्र बनाजी नाईक सन सोळाशें सत्त्याहत्तर इसवींत जाला. नंतर सहा महिन्यांनीं शिवाऊस पुत्र जाहला, त्याचें नांव बजाजी नाईक. पुढें जिवाऊस दुसरा पुत्र सन सोळाशें ऐशी इसवींत जाला. त्याचें नांव मालोजी नाईक. पुढें दोन वर्षांनीं तिसरा पुत्र जाहला. त्याचें नांव जगदेवराव नाईक असें होतें. तिसरे वणंगोजी नाईक यांणीं फलटणचा राज्यकारभार करून लोक खुषींत ठेविले. वणंगोजी नाईक यांचे वडील बंधू महादाजी नाईक हे कलबुर्गे येथें छावणी करून राहत असत. व त्यांनीं आपले कनिष्ठ बंधूचे प्रथम चिरंजीव जानोजी नाईक फसली दहाशें अठ्याण्णवांत दत्तक घेतले, आणि राज्याचा कारभार मुधोजीराव यांणीं पहावा असें केलें. पुढें संभाजी राजे भोंसले यांस औरंगजेब यानें तुळापूर येथें हाल करून फसली दहाशें नव्याण्णवांत मारिलें. त्यावरून महादाजी नाईक हे त्यांचे आप्त असल्यामुळें बादशाहानें ग्वालेरीचे किल्ल्यांत ठेविलें. तेथें ते मरण पावले, व स्त्री सकुबाई ही सती गेली. महादाजी नाईक यांचे राखीचे पुत्र रंभाजी बाजी हैद्राबादेंत राहिले होते. त्यांस पुत्र जानोजी व त्यांचे पुत्र रावरंभा हे पुढें राजाराम महाराज यांजकडे गेले. पुढें बाळाजी विश्वनाथ यांचें व त्यांचें बनेना, सबब तेथून ते निघोन हैद्राबादेस गेले. तेथें सरदार जाले. त्यांनीं मोठा लौकिक मिळऊन पन्नास लक्षांची जहागीर मिळविली. तिसरे वणंगोजी नाईक नवज्वराच्या आजारानें सन १६९३ इसवींत कलबुर्गें येथें मरण पावले. पुढें फसली अकराशें चार यांत, राजाराम महाराज यांणीं आपली कन्या जानोजी नाईक यांचे पहिले घरचे बंधू बजाजीराव यांस सोयराबाई या नांवची देऊन लग्न केलें. नंतर त्यांचे साह्यानें नाईकांनीं फलटण प्रांत .............. पा॥ गांव इंदापूर पैकीं गांव १२, बिड पैकीं गांव २२ येणेंप्रमाणें इनाम करून घेतले. मुधोजीराव बिड येथें राहत होते. तेथून राज्यक्रांतीचे संबंधानें जेजुरीस आले. तेथून मौजे पाडगांव .मुकामीं पाण्यांतील शिकार करून सर्दी होऊन तेथेंच ते

कैलासवासी जाह्ले. पुढें सन सत्राशें सहा इसवींत औरंगजेब याचा पुत्र यानें सर्व मराठे सरदारांस बोलाविलें. त्यांत जानोजीराव नाईक व बजाजीराव नाईक हे उभयतां आले. त्या वेळीं त्यांचा पूर्वीचा संबंध पाहून उभयतांस फरमान दिल्हे आणि आपल्यापाशीं सन १७०६ त ठेऊन घेतलें. पुढें बजाजी नाईक हे राजाराम महाराज यांचे आप्त असलेवरून त्यांचा फरमाना रद्द केला. नंतर बजाजी नाईक यांणीं आपलेबराबर बंधू मालोजी नाईक यांस घेऊन दियानतखान याचे द्वारें पुन्हां दिलसाफीचा फरमान उभयतांनीं बादशाहापासुन संपादन केला. पुढें औरंगजेब मरण पावला. त्या संधींत राज्यक्रांति जाली. ते समईं बजाजीराव यांणीं महाराजांस हकीकत कळऊन, जानोजी नाईक यांचे अपरोक्ष, ह्मणजे यांस न समजूं देतां, आपले नांवें फलटण परगणा व वाल्हेगांव आणि रातांजन परगणा इनाम करून घेतला. त्या वेळेस फसली अकाराशें अठराचें साल होतें. त्याजप्रमाणें राजाराम महाराजांनींही सनदा करून दिल्या. पुढें जानोजी नाईकांसही महाराजांनीं सात महालचा मोकासा दिल्हा. पुढें नाईक हे येऊन फलटणास राहिले. नंतर फलटण जहागीर वतनाबद्दल उभयतांचा वाद व लढाई जाली. त्यांत जानोजी नाईक हे मागें सरले आणि इंदापुरास जाऊन राहिले. इसवी सन सत्राशें बारांत त्यांणीं महाराजांसीं पत्रव्यवहार फलटण प्रांताबद्दल चालविला. परंतु त्या काळीं त्यांचें कांहीं चाललें नाहीं. जानोजी नाईक यांचा आप्तपणा मलवडीकर घाटगे यांजकडे असलेवरून ते तेथें गेले होते. तेव्हां तेथें रामनवमीचा उत्साह चालू होता. तेथें प्रसाद जाला तो सन १७१५ इसवींत. पुढें त्यांस त्या प्रसादाप्रमाणें मुलगा जाह्ला, तो सन १७१६ इसवींत जाला. त्याचें नांव मुधोजीराव ठेऊन पुढले सालापासून रामनवमीचा उत्साह करण्यास आरंभ केला. नंतर जानोजी नाईक यांचे पहिले घरचे बंधू बजाजी नाईक यांस पुत्र सन १७२२ इसवींत जाला. त्याचें नांव बाजी धारराव होतें. पुढें शाहू महाराजांनीं आपले बायकोचे भावाची मुलगी राजसबाई शिर्के यांची कन्या जानोजीराव नाईक यांचे चिरंजीवास देऊन लग्न उत्तम प्रकारचें केलें. या संधींत नाईकांनीं महाराजांस कळविलें कीं, फलटणचे जहागिरीचा वारसा आमचा असतां, जहागीर बजाजीराव यांणीं आपणास भलताच मजकूर कळऊन आपले नांवें करून घेतली, ती आमची आह्मांस द्यावी. त्यावरून महाराजांनीं बजाजीराव यांस आज्ञा केली. त्या (नंतर) ह्मणजे बाजी धारराव जाल्यावर दोन वर्षांनीं तिसरा पुत्र जाला. त्याचें (नांव मुधोजी ऊर्फ सोयराजी असें ठेविलें. पुढें बाजी धारराव कांहीं दिवसांनीं मरण

त्याप्रमाणें धर्म जारी लोकांमध्यें केला. कोणी इसाचा पक्ष करूं लागेल, त्यांचें पारिपत्य करावें. अशीं हजारों वर्षें जालीं. पुढें मुसाही समाप्त जाले. आणि महंमद रसुल पैगंबर यवने पैदा जाले. त्यासही "कुराण शरीफ कलामुल्ला" किताब नाजल आली. त्यांत दाखला कीं, आतां पैगंबर होणार नाहींत व किताबही येणार नाहीं. याजवरच जमाना अखेर आहे, असें लिहिलें आहे. त्या कुराणावर यवनांचे धर्म चालत आहेत. त्यासही हजारों वर्षें गुजरलीं, व महंमद पैगंबर आतां आहेत, हयात अमर आहेत. परंतु "गैब" अंतरधान आहेत. किताबेप्रमाणें धर्म चालवितात. परंतु दिवसेंदिवस धर्म विछिन्न होत चालले. असेच हिंदूंचेही धर्म विछिन्न जाले. पुढें "इसा" पैगंबराचे मतवाले कीसे करीत असतां, कांहीं एक दिवशीं रूमाचे विलायते-कडे मोठा कज्जा उत्पन्न होऊन कुराणाचे धर्म टाकून गैरचाल करूं लागले. त्या मतांत कांहीं लोक शिरोन बादशाहा व सरसुभे व सुभे सामील जाले, आणि "दीना" करितां परस्परें बहुत फौजा मिळून शेंकडों वर्षें लढाया चालल्या. परंतु हल्लींच्या कुराणास बादशाहा व अमलदार वगैरे झाडून साथ. तेव्हां इसाचे मतवाले शिकस्त जाले. तेव्हां त्यांनीं आपले मुलखांतून काढून दिल्हे. तें लाखों मनुष्य त्या मतांत होतें. त्यांतून कांहीं रुजू होऊन मिळून राहिले, ते राहिले. कांहीं निघोन गेले, ते इंग्लिशांच्या टापूंवर जाऊन राहिले. तेथें अमलदार टोपीवाला होता. त्यानें त्यांस ठेऊन घेतलें. तेव्हां यांनीं "इसा"चा पक्ष धरून चालले. तेव्हां अमलदाराचें कांहीं चालेनासें जालें. नंतर यांनीं तेथें अमल बसविला, आणि एक बादशाहा करून बसविला. ते दिवसापासून इसवी सन चालू केलें. त्यापासून इंग्रज यांची प्रबलता होत चालली. कारण, हिंदू व मुसलमान यांस गर्व विशेष झाला, व दिल्लीस शके ५१२ मध्यें यवनी अंमल होऊन फकीरानें बादशाहा तख्तावर बसवून आर्बी सन चालू केलें. तेव्हां बादशाही करशील म्हणोन दुवा दिला; आणि सांगितलें कीं, पुढें धर्म उच्छिन्न होऊन तेरवी सदींत कुफराण माजेल. तेरवी सदी म्हणजे सन सुरू जाल्यापासून बाराशें वर्षें गेल्यावर तेरावा शेंकडा लागेल, ती तेरवी सदी म्हणावी. याप्रमाणें सांगितल्यावर यवन ईश्वरापाशीं "पना" मागूं लागले कीं, तेरवी सदीमध्यें "शूकरा"चाही जन्म देऊं नको. याचें कारण, तेरवी सदी केवळ निषिद्ध आहे. अशीं भविष्यें पेशजीं जाहलीं आहेत. हिंदूंचीही कलियुगाचीं पांच हजार वर्षें भरत आलीं आणि तेरवी सदीही आली. असे योग एकत्र होऊन दिवसें-दिवस धर्माचा उच्छेद व्हावा, यास्तव इंग्रजी लोकांत ईश्वरी शक्ति जास्त होऊन हिंदू व मुसलमान यांचा गर्वपरिहार होऊन, इंग्रजांचा व्याप पृथ्वीवर होत चालला.

इंग्रजांनीं कोसलगार (Councillor) चाळीस असामी करून त्याचें नांव "कंपीण" असें ठेविलें. त्यांजवर बादशाहाचा हुकूम; आणि "कंपिणी"चा हुकूम चहूंकडे. याप्रमाणें दिवसेंदिवस त्यांची बुद्धि व कल्पना अधिक वाढून, जें करतील त्यास यश येत असावें. सवदागिरी पेशानें पैरवी करून, ताबेदार ह्मणोन राहून, राज्यें घेऊन, मुखत्यारीनें अंमल करावा; परंतु आपण मुखत्यार ह्मणवूं नये. इंग्रजी विलायतच्या टापूंवर बावन लाख मनुष्य हल्लीं आहे. जकातीचें उत्पन्न बहुत. सर्वांनीं "कंपिणी"च्या हुकुमानें चालावें. तेथील बादशाहा रयतेच्या स्वाधीन. बादशाहा गैरचाल करूं लागल्यास रयतेनें दोन चार वेळां जाहीरनामे करून बादशाहाचे दरवाज्यास लावावें. तितक्यावर समजून नीट वागल्यास उत्तम. नाहींतर दुसरा बादशाहा तख्तावर बसवावा; आणि नव्या कल्पना सर्वांनीं काढून सर्वानुमतें राज्यकारभार चालवावा अशी रीत आहे."



# १२. पेशवे दप्तरांतील लिहिण्याची पद्धति.

१ सालवार लिहिणें मराठी साल धरून लिहीत नसत. मुसलमानी फसली साल धरून लिहीत होते. फसली साल आरंभ, मृग नक्षत्र ज्या दिवसीं निघतें, तो प्रथम दिवस धरून, दुसरे सालीं मृग निघे तोंपर्यंत आखेर साल. या मानानें मुसलमानी बारा महिने अकरा दिवस एक सालांत येतात. असे मानानें साल धरण्याची वहिवाट होती. हे दिवस वाराचे नव्हत, वारानें ३५४-३५५.

१ हुजूर पेशवे दप्तरांत प्रथमपासून कागद तयार होत होते त्याचा तपसीलः—

१ 'रोजकीर्द' दरएक तारखेचे मोकळे बंद लिहीत असत. यांत खालीं लिहिलेले प्रकार असतातः—

१ रोख पैसा मामलेदार यांजकडून रसद व नजरभेट इतर लोकांकडून व हरएक कामासंबंधीं हरकी, गुन्हेगारी, व संस्थानिकाकडून खंडणी सालाबाद येणें ती, व सरंजामदार लोकांकडून दत्तकसंबंधें वगैरे हरएक प्रकारें पैसा आलेला, व दुसरे हरएक कारणानें जो पैसा येतो तो जमा असतो. त्यास 'पोता' असें ह्मणत असत.

१ 'रवासुदगी' ह्मणजे वर लिहिलेले प्रकारचे लोकांकडून रसद व नजर येणें रक्कम पैकीं सरकारांस दुसरे लोकांस पैसा देणें असतो, त्या लोकांस वराता देत असतात, ती या सदरांत लिहिण्याची चाल आहे.

प्रथम अव्वल पेशवाईचे वेळेस सनदापत्रें ही या 'रवासुदगी' सदरांतही एखादे वेळेस बार करीत होते. ती वहिवाट पुढें बंद होऊन रवासुदगींत फक्त वराता मात्र बार करून, सनदापत्रें 'दफाते' सदरांत बार होऊं लागलीं.

१ 'दफाते' ह्मणोन एक सदर रवासुदगीचे खालीं असतें. त्यांत सनदापत्रें जीं हुजूराहून हरएक प्रकारचीं होत होतीं, तीं बार करीत होते. सनदापत्रें दोन प्रकारचीं होत होतींः—

१ मुख्य नांवचीं सनदापत्रें जीं होणें तीं फडणिसीकडून होत होतीं.

१ त्या मुख्य पत्रास साहित्यपत्रें जमीदार व मोकदम व कमावीसदार वर्तमान भावी वगैरे लोकांस जीं पत्रें लिहिण्याचीं तीं चिटणीसीकडून होत होतीं.

येणेंप्रमाणें दोन दप्तरांतून सनदापत्रें होत होतीं. सनदापत्रांवर फडणीसांची तारीख, व 'आज्ञा प्रमाण' हें चिन्ह मुजूमदार यांचें होत होतें; व बारनिसींतही दोघांचीं चिन्हें वेगळालीं अशीं होत असत. 'कीजे' हीं अक्षरें फडणीसाकडील व मुकरर हें 'अक्षर' मुजूमदार यांचें होत होतें.

एखादे वेळेस चिटणीसी पत्रें जारी न होतांही अर्थीच रवाना होत असत. असें पत्र खरें समजण्यास अक्षर व पद्धत वगैरे पाहून ओळखावें लागतें.

१ जामदारखाना म्हणून सदर असतें. या सदरांत कापड, रोख खरेदी किंवा नजर वगैरे आलेलें जमा असतें.

१ जवाहिरखाना या सदरांत जवाहिर दागिने सोने चांदीचे, व हिरे, पांच, मोतीं वगैरे हरएक प्रकारचे जिन्नसवार दागिने जवाहिरखान्यांत जमा जालेले या सदरांत जमा होत असत.

१ हुजुरचे मुतालिकी शिक्के तयार होत असत. तेही या सदरांत जमा धरून लोकांस देत असत.

या प्रकारें जमेचीं सदरें साधारण मानानें जमा असत. याप्रमाणेंच पोतापैकीं किंवा जामदारखान्यापैकीं अथवा जवाहिरखान्यापैकीं लोकांस दिलेला पैसा किंवा कापड व दागिने वगैरे खर्च पडलेले, सदरील जमेप्रमाणें सदरास खालीं खर्च लिहीत होते.

१ सरंजामदारास अथवा एखादे ब्राह्मणास इनाम वगैरे दिल्हाबद्दल प्रथम मखलासी याद दप्तरांत फडणीसीकडे होत होती. त्या मखलासी यादीवर फडणीसांची तारीख व 'करार' करावें अथवा 'देववावें,' अशीं अक्षरें खुद्द पेशवे यांचीं हातचीं असत. सनदापत्रावर फक्त शिक्क्याशिवाय सरकारचे हातचें दुसरें चिन्ह कांहीं होत नव्हतें.

१ यादी मखलासीची जाल्यावर सनदापत्रें होत होतीं. तीं कीर्दीत दफात्यास बार होत होतीं.

१ सरंजामदार यांस सरंजामास महाल व गांव वगैरे देण्याविसीं मखलासी यादी व सनदापत्रें जालीं, म्हणजे त्या सरंजामदारास एक तैनात जाबता किंवा एकंदर याद करून हुजुराहून देत असत. त्यांत एकंदर जातीस व फौजेस किती आकार चालवायाचा तो प्रथम आंकडा नमूद करून, त्या बेरजेस दिलेले महालाचा आकार तपशीलवार दाखल असतो. त्यांत त्या महालगांवचा आकार एकंदर किती व यापैकीं दुमाले, नक्त किंवा गांवजमीन वगैरे कोणांस किती चालवावयाची ती बेरीज वजा करून, बाकी निव्वळ बेरीज सरंजामास लावून दिल्हेली असे, व त्याखालीं कलमबंदीही सरंजामदार यांणीं चाकरी कोणते प्रकारें कसकसी करीत जावी यांसमंधें ठरावाचीं कलमें लिहीत असत.

१ "बेहेडा खतावणी" म्हणोन एक प्रकारचा कागद प्रत्येक सालांत महालवार व हक्कवार मोकळे बंदाचे आवर्जे लिहिण्याची वहिवाट होती. हा कागद कीर्दीवरून तयार होत असे. यांत खालीं लिहिलेले प्रकार असतात.

सरदारांनीं सांगितलें. त्यावरून आह्मीं उत्तर केलें कीं, "ज्या गोष्टींत सरकार-नफा होऊन नक्ष राहील, तीच गोष्ट आपण करतील. राजश्री नारो गणेश यांचे विद्यमानें बोलणें लागलें आहे, ह्मणून सांगितलें. परंतु पुर्तेपणें समजण्यांत येऊं देत नाहींत. आंतील बातमी राजश्री आबा चिटणीस यांचे विद्यमानें लागली आहे. एक वेळा कोणी कारभारी समागमें न नेतां, आपणच चिटणिसांचे घरीं जाऊन चार घटका खलबत केलें. सायंकाळीं डेऱ्यास आल्यानंतर आह्मांस सांगितलें कीं, "गोकुळास जात होतों, परंतु तेथें नावा नवत्या. याजकरितां माघारें फिरोन येतेसमयीं चिटणीस यांचे बंधूचा हात दुखावला आहे, याजकरितां त्यांचे समाचारास गेलों होतों. तेथें आबाची आमची गांठ पडली. तेव्हां त्यांस एकीकडे घेऊन जाऊन बोलणें जालें कीं, पाटिलबावांसीं आह्मांसीं सफाई व्हावी. त्यांनीं आह्मांवर ममता पूर्ववत् करीत जावी." तेव्हां चिटणीस बोलले कीं, "गोसावी यास एकादे स्थलीं नेऊन पोंहचवावा, ह्मणजे सफाई होईल." तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, "तुह्मांसारिख्यास मध्यस्तीस घालून बोलावयाचें फल काय? गोसावी पाठविला असतां मग तों ममता करतीलच. परंतु गोसाव्याची मुक्तता होऊन त्यांची आमची सफाई होय, अशी गोष्ट तुह्मां-सारख्यांनीं करावी." असें कितीएक प्रकारें त्यांसीं बोलिलों. परंतु त्यांचे बोलण्याचा भाव, विना गोसावी स्थलांतरीं गेल्याशिवाय सफाई होईल, असा पडत नाहीं. तेव्हां फिरोन उत्तर केलें कीं, जर तुह्मी आह्मांवर ममता करीत नाहीं तर येथें राहणेंच ठीक नव्हे. एकादे दिवशीं पाटिलबावांस पुसोन निरोप घेऊन देशींच जाऊं. अशीं उदासीनतेचीं बोलणीं बोलिलों. याप्रमाणें सरदारांनीं सांगितलें. परंतु आंतील बोलणें कसकसें जालें, त्याचा भाव ते जाणेत. चिटणिसांचे घरीं गेल्यामुळें लोकांत चांगलें दिसलें नाहीं. काय समजोन गेले असतील तें न कळे. सलाह पुसल्यास बरा दिसेल तो सांगावा. न कळतांच होऊं लागल्यास उपाय नाहीं. अलीकडे गोसावी यासी बोलावयास राजश्री आप्पाजीपंत दामले व बदीपुदीखान जात असतात. राजश्री तुकोजीबावांसीं व नारो गणेश यांसीं आंतून बहुतच बांकडें आलें आहे. सुभेदारांनीं फौजेचे वगैरे रोजमुऱ्याकरितां ऐवज सावकारापासून जातीनेंच कर्ज घेऊन वांटणी केली. त्यांस बोलाविलें नाहीं. या उभयतांचें सख्य व्हावयाचीं बोलणीं, आंतून राजश्री पाराशरपंत वगैरे बोलत आहेत. परंतु अद्यापि सख्य जालें नाहीं. इस्मायलबेग कसबे भेवानी येथील शहरास मोर्चे देऊन बसला होता. त्यास शहरांत जमाव भारी; याजकरितां इलाज चालला नाहीं. तेव्हां तेथून कूच करून पलीकडे

पंचवीस कोसांवर हरीयाण्यांतील गांव मारून, मुक्काम करून राहिला आहे. राजश्री काशीराव होळकर पुढें दिल्लीचे सुमारें गेले." (अपूर्ण.)

## लेखांक ५२.

श्री. ता. २४ मार्च इ. स. १७८९.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५ जमादिलाखर स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः— पेशजीं श्रीकाशीचे व मथुरा वृंदावनचे मजकुराविसींची विनंति लिहिलीच आहे. मथुरा वृंदावनचे सनदांचे मसुदे करून दिल्लीस राजश्री पाटिलबावा पाठविणार आहेत. सनदा लवकरच होऊन येतील. त्यास येथील कामकाज राजश्री अलीबहादूर-बाबाकडे सांगितलें असतां, ते कोणास ठेवितील हें नकळे. समागमें त्यांचे आप्तविषयी बहुत आहेत. त्या पक्षीं ब्राह्मणमंडळींतच सांगतील, असा भरंवसा येत नाहीं. स्वामींनीं येविसींचा मजकूर तों त्यांस लिहिलाच नसावा. परंतु येथें आह्मांस जें करणें तें त्यांचे अनुमतेंच केलें पाहिजे. तें कदाचित् त्यांनीं एखादे आपले-कडील कोणाचें नांव घेतल्यास, केवळ नाहीं ह्मणतां येणार नाहीं. स्वामींनीं क्षेत्रींची जागा जाणोन धर्मस्थापना यथास्थित घडावी यास्तव सरकार खालशांत असावयाचें केलें आहे. त्यास येथील कामकाजाची सेवकास आज्ञा जाली, तरी आज्ञेप्रमाणें करण्यांत येईल. दुसरा मजकूरः— राजश्री आबाजी नाईक वानवळे बुंदेलखंडचे दहा लक्ष रुपये दरसाल याप्रमाणें पंच सालांची निशा करणार, असें बोलत आहेत. येविषयीं पूर्वीं लिहिलेंच आहे. परंतु उत्तराची आज्ञा जाली नाहीं. नाईक वारंवार आह्मांसीं येऊन बोलत असतात. त्यास मशारनिल्हेचें बोलणें आहे कीं, कदाचित् ग्रामलतीची घालमेल करावयाची नसल्यास, आह्मांस उभें करून सरकारकिफायत करून द्यावी. त्यास जसें उत्तर येईल, त्या-प्रमाणें यांसीं बोलून सेवेसीं लिहून पाठवूं. तसबिरा मेळऊन ठेविल्या आहेत. यथास्थित पोहोंचावयाजोगी सोबत मिळाल्यावरी पाठवून देऊं. आणखीही तोफा तरीख जिनसांचा शोध करीत आहोंत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ५३.

श्री. इ. स. १७८९.

"पुरवणी सेवेसीं भिकाजी नारायण विज्ञापना विशेषः— येथून सरकारची फौज पुढें जयपुराचे मुलखांत घासदाणा घ्यावयाकरितां रवाना करावी असें

बोलण्यांत ठरलें आहे. त्यास फौजेंत कोणीं पाठवावा? त्यास राजश्री सदाशिवपंत दिवाणजी यांसीं व सरदाराशीं वैमनस्यता पडली आहे. अलिकडे चौघांनीं रदबदल करून उगेच बाह्यात्कारीं ऐक्यता करून दिल्ही आहे. चित्त शुद्ध नाहीं. याजकरितां त्यांस पुढें पाठविणें सरदाराचे चित्तांत येत नाहीं. दुसरे कोणाबरोबर मोठे सरदार जाणार नाहींत. पेशजी राजश्री बलवंतराव सदाशिव यांजबरोबर कोणी सरदार द्रोबस्त गेले नाहींत. याजकरितां सरदार आह्मांस ह्मणत आहेत कीं, इकडे जाण्याचा निश्चय जाहल्यास तुह्मांस जावें लागेल. आह्मीं उत्तर केलें कीं, आमचें लिहिण्याचें काम. त्यांत आपण कांहीं पाहिलें नाहीं. दुसरा कोणी केलेला माणूस पाठविल्यास उत्तम. तेव्हां ते बोलिले कीं, दुसरे कोणाबरोबर लोक जाणार नाहींत, हें तुह्मांस माहीतच आहे. सदाशिवपंतांस तों पाठवावयाचें नाहीं. फौज गेल्याशिवाय पाटिलबावा देतात हेंही देणार नाहींत. अशी निमित्याची गोष्ट सांगितली. माझ्यानें जों-पर्यंत टळेल तोंपर्यंत टाळीत आहें. नाइलाजास्तव मान्य करावें लागेल असें दिसतें. ह्मणोन स्वामींस सूचना लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५४.

**श्री.** ता. ५ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १ जमादिलावल स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—स्वामींनीं छ १ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें छ ६ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, तोफ-खान्याचे कामाविषयीं तुमचें पत्र आल्यावर शोध करितां, अलीबहादूर यांस पत्र लिहून विनंति होऊन, लाखोटा करून रवानगीसमयीं राहिला, तो गैरविल्हेस पडला होता, तो सांपडला. त्याजवर तारीख पाहिली. ते छ २१ सवालची होती. पत्र राहिलें तेव्हां सरदारांनीं व सदाशिवपंतांनीं तुह्मांस काय सांगावें? कार्याची अवधी लांबवर असल्ये. हल्लीं राजश्री अलीबहादूर यांस पत्र लिहून अलाहिदा पाठविलें आहे, व स्वारीपैकीं पांच हत्ती, दहा तोफा पाठविणार ह्मणोन लिहिलें, तें उत्तम आहे. तुह्मी तसबिरा पाठवितों ह्मणून पूर्वी लिहिलें होतें, त्याचें कसें केलें? अलीबहादुराकडून दोनदां तसबिरा आल्या; त्या उत्तमांत नाहींत. तुह्मांकडील कशा येतील, त्या पाहिल्यावर समजेल ह्मणोन लिहिलें. त्यास तोफखान्याचे कामाविषयीं आमचे लाखोट्यांत सरदारांस छ २१ सवालचें पत्र पाठविलें, तें त्यांस दिल्हें. पत्र बहुत दिवसांचें ह्मणोन मात्र बोलले. वरकड कांहीं

उत्तर केलें नाहीं. पत्र बहुत दिवस राहिलें याचाही पर्याय लिहिला आल्याप्रमाणेंच सांगितलें. स्वामींचे आज्ञेप्रमाणेंच कार्य होण्यांत येईल. कदाचित् दिक्कत पडल्यास पुस्तपन्ना स्वामीच करतील. फिरोन हटकल्यानंतर काय ठरेल ते विनंति लिहून पाठवूं. हत्ती व तोफा वगैरे लौकरच रवाना होतील. तसबिरा येथें मिळतात, त्यांत चांगल्या पाहून घेतल्या आहेत. पाहिल्यानंतर पसंदीस येतील त्या खऱ्या. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५५.

श्री. ता. २८ मे. इ. स. १७८९.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ. १ रमजानपावेतों वर्तमान यथास्थित असे विशेषः—स्वामींनीं छ २७ व छ २९ जमादिलाखरचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. सोन्याचें तबक, व पानदान, व गुलाबदाणी, व अत्तरदान, यांजवर मिना, जमीनीवर हिरवा व वर बूट चांगले खुलत अशा तऱ्हेचे, करवून पाठवावे; व तंबुरे चांगले दोन उंच सुराचे, व दोन चौकीचे गाण्याचे बहुत चांगले तारीफदार पाठवावे ह्मणोन आज्ञा. त्यास मिन्याचा कारीगर चांगला एकच येथें आहे. त्याचे हातचा तरवारेचा परज वगैरे श्रीमंतांसाठीं येथून सरदारांनीं तोफखान्याबराबर रवाना केला आहे. परंतु त्यांत सरदाराचे पसंदीकरितां दरोबस्त काम एकरंगी सबज रंगाचेंच जालें आहे. रवदडी घाटाची डबी मिनेगारीची करून पाठवावी ह्मणोन पेशजीं आज्ञा आली, त्याजवरून डबी तयार जाली आहे. लौकरच रवाना करितों. त्यांत चहूं तऱ्हांचे रंग केले आहेत. कारीगर एकच आहे. याजकरितां कामास दिसगत लागते. अबखोरा सोन्याचा घाट तयार जाला आहे. एक दोहों रोजीं त्याजवर काम चालीस लावितों. वरकडही दागिनेयांचें काम लौकरच चालतें करितों. तंबुऱ्याकरितां भोपळे चांगले थोर, तलाश करून मेळविले आहेत. कारेगरही चेतसिंगराजे याजपाशीं आहे, त्यास आणून काम चालविलें आहे. पंधरा वीस दिवस तयार व्हावयास लागतील. तयार जाले ह्मणजे लौकरच सेवेसीं रवाना करितों. परभारें करविले असतां कसे होतील, याजकरितां दिल्लीहून आणविले नाहींत. रुबरूच करविले आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

# लेखांक ५६.

श्री. ता. १ जून इ. स. १७८९.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ५ रमजानपावेतों मुक्काम लष्कर नजीक मथुरा क्षेत्र वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील मजकूर बितपशीलः— प्रांत बुंदेलखंड प्रकर्णी पेशजीं दोन तीन वेळ विनंति लिहिली, त्याचें उत्तर आलें. त्याप्रमाणें राजश्री अबाजी नाईकासीं खचित बोलण्यांत आणिलें आहे, व मशारनिल्हेंनीं आमचे पत्रावर हवाला देऊन विनंति लिहिली आहे. त्यास सरकारची फौज या प्रांतीं आहे, त्या पक्षीं बुंदेल्यांवर जरब पडली असतां, सरकारांत किफायत होईल नाहीं, त्या अर्थी नाईक किफायतीचा जाबसाल बोलतच आहे. या थरास बुंदेले येऊं देणार नाहींत. सरकारची निकडशी समजल्यास त्यांकडूनच अर्थ होईल. कलम १.

तालुके झांशीचे जाबसालाविषयीं कोणी एक गृहस्थ बोलत आहे, कीं दरसाल लाख रुपये देऊं. याप्रमाणें साहुकारी निशेचें बोलणें बोलत आहे. परंतु स्वामींकडील आशय समजण्यांत नाहीं. याकरितां उगेच बोलणें मात्र लाऊन ठेविलें आहे. त्यांत दुसरेंही बोलणें बोलत आहे कीं, महालची रुजवात जाली असतां सरकारकिफायत आहे. परंतु स्वामींकडील आशय समजल्याशिवाय त्यांसीं काय ह्मणोन बोलावें? परंतु सरकारकिफायतीचा जाबसाल आढळला, यामुळें लावून ठेविलें आहे. त्यास येविषयीं कांहीं बोलावें असें असल्यास आज्ञा येईल त्याप्रमाणें तपशीलवार विनंति लिहून पाठवूं. त्याजवरून ध्यानास येईल. कलम १.

तोफखान्यांत चांगला कारकून विश्वासू मर्दमाणूस असा योजून राजश्री अलीबहादूर यांसीं बोलून नांवनिशी लिहून पाठवावी ह्मणोन आज्ञा. त्यास राजश्री पाटिलबावांकडील पांच तोफा आल्या होत्या. त्याजवर दारोगा त्यांनींच ठेऊन दिल्हा आहे. तोच नव्याही तोफांचें कामकाज़ करीत आहे, व फडणिशीचें काम राजश्री रामचंद्रपंत गोरे यांचे पुतणे निळो बल्लाळ यांसी अलीबहादूरबाबा यांनीं ठेविले आहेत. त्यास कारखाना थोर नेमला यास्तव मातबर मनुष्याचे हवाला असावा. त्यास येथें आह्मांपाशीं राजश्री गोपाळ रामचंद्र ह्मणोन उमेदवारीनें आज वर्ष सवावर्ष समागमें आहेत. मशारनिल्हे राजश्री आप्पाजी गणेश भागवत बराणपूरकर यांचे पुतणे, चांगले मर्दमाणूस, अंगावर एक दोन जखमाही आहेत. विश्वासाविषयींही सेवकाची खातरजमा पुर्तेपणें आहे. त्यास यांजकडे कारखान्याचें कामकाज असावें असें मर्जीस आल्यास अलीबहादूरबाबांस लिहावें. त्यांजपाशीं-

ही मशारनिल्हेचें येणें जाणें आहे. आज्ञा आल्यास त्यांचाही अनमान व्हावयाचा नाहीं. कलम १.

येथें ऐवज सावकारापासून कर्ज घ्यावें लागतें. त्यास दर शेंकडा सहा रुपये मनोती व चार रुपये हुंडणावळ याप्रमाणें देऊन येथें प्रतापगडी रुपये व निमें नाणें देतों, आणि हुंडीचे पोतेचाल पुण्यांत पावतात, असें सरकारांतून नुकसान द्यावें लागतें; व लोकांचाही शेरा थोडा. त्यांचीही बुडवणूक होते. त्या पक्षीं बुंदेलखंड व झांशीवर वराता जाहल्यास किफायत पडेल. कलम १.

पुढें फौजा गेल्या होत्या त्या माघान्या फिरोन छ २९ साबानीं दाखल मुक्काम मजकुरीं जाहल्या. राजश्री यशवंतराव नाईक निंबाळकर व भवानजी लोखंडे व कृष्णराव हरी पुरंधरे, याप्रमाणें पथकें कर्नाला अंबाल्याचे सुमारें ठेविले आहेत. परंतु त्यांस पत्रें गेलीं आहेत कीं, साहारणपूरचे सुमारें गनीबेग आहेत, त्यांजकडेस जावें. गनीबेग यांजकडून बातमीचीं पत्रें येतात. त्यांत दहा पांच हजार शीख व गुलामकादर याचा भाऊ दोन हजार रोहिल्यांनिशीं एक जाले आहेत. साहारणपुराकडे यावें असा इरादा आहे. याजकरितां आपल्या दोन्ही फौजा एक व्हावी ह्मणोन पत्रें गेलीं; परंतु ही गोष्ट राजश्री पाटिलबावांचे मर्जीस आली नाहीं. बावांचें ह्मणणें होतें कीं, दोनी तोंडें राखावीं. आह्मीही मदतीस फौज दोही रोखांवर पाठवितों. परंतु येथें आठ ( दिवस ) ह्मणाल्यास महिना दोन महिने सहजांत लागतात. यामुळें कबूल केलें नाहीं. यास्तव त्यास वाईट वाटलें आहे. परंतु एक जागा न केल्यास दोहींकडे जमाव थोडका राहतो, यामुळें करणें प्राप्त. कलम १.

याप्रमाणें विनंति लिहिली आहे, त्याजवरून ध्यानास येईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५७.

श्री. दरजबाब—११ मे इ. स. १७८९.

सदाशिव शामराज यांस नानांनीं लिहिलेले पत्राचा मसुदा.

"विशेष तुह्मीं छ १४ साबानचीं पत्रें दोन पाठविलीं, तीं पावलीं. गोसावी मोकळा केला, परंतु त्याचे ठायीं राजश्री पाटिलबावांची मर्जी खुलासा जाली नाहीं. त्यांजकडील महाल, मुलूक, हत्ती, घोडे, वगैरे कांहीं सोडलें नाहीं. त्याचा दस्तऐवज सांपडोन पारिपत्य करावें, परंतु सध्यां मोकळा करावा, येविषयीं राजश्री अलीबहादर यांचें बोलणें अंतरंगींचें होऊन आलेले निमे करून घेऊन मोकळा केला. रात्रंदिवस तो आपले ठायीं जपत आहे. राजाराम वकील जयपूरचा आला

आहे. तो व गोसावी दरबारास येऊन खलबतें होतात. त्या बातम्या पाटिलबावांस कळोन वैषम्य वाटतें. कांहींएक निमित्य ठेवून त्याचें पारिपत्य करावें, हें मानस आहे. सध्यां इस्मालबेगाची मसलत प्राप्त जाली ह्मणोन विसगतीवर पडलें आहे. पूर्वी फौज चाकरीस पाठवावयाचें सांगोन सफरचे महिन्याचे खर्चास एकमाही दिल्हें आणि फौज पाठविली नाहीं. हल्लीं सर्वांच्या फौजा गेल्या. तुह्मींही सरकारची फौज पांच साहा हजार सदाशिवपंत याबरोबर देऊन रवानगी करावी. खर्चासही देतों ह्मणोन चार वेळां पाटिलबावांनीं सांगोन पाठविलें, फौज बाहेर काढावी. एक लक्ष रुपये खर्चास देतों ऐसे बाबा यांजकडे निरोप आले. त्याजवर पाटिलबावांस आपलें पत्र आलें, तें देऊन जाबसाल पुसिले. एक लक्ष रुपये देऊं. मुलूक आणखी सुटेल तेव्हां देऊं. मागील कांहीं ऐवज घ्यावयाचा नाहीं. पेशजीं करार केल्यापासून दरमहा सत्याहत्तर हजार रुपये साहा महिने राहिले ते देत नाहींत. खर्चास सोईसोईनें पावेल ऐसे जाबसाल जाले. निखालस्ता बाह्यात्कारें दिसते, परंतु अंतर्यामीं सरळता नाहीं, व विठ्ठलपंत ह्मणोन बेरोजगिरी गृहस्थ आहे, त्याचे हातून गोसावी मोकळा करण्याविषयीं बाबाराव व आबा चिटणीस यांसीं दरबारखर्चाचें बोलणें होऊन, पाटिलबावांसीं बोलणें होऊन, पाटिलबावांसीं बोलोन सध्यां मोकळा केला आहे. गोसावी यांसीं दरबारखर्चाचें बोलणें जाहालें, तें आह्मांस कळलें नाहीं. अलीकडे फौजेचे खर्चाचे व महाल मुलूक लाऊन घ्यावयाविषयींचे निरोप आह्मांस न समजतां, विठ्ठलपंत यांस चिटणीस यांजकडे पाठवून जाबसाल होतात. आह्मांस पाटिलबावांकडे जाऊन बोलावयास सांगत नाहीं. येथें प्रकार तर याप्रमाणें आहे. मजबरोबर फौज देऊन पाठवावें ह्मणोन पाटिलबावा रुबरू एक वेळ बाबांजवळ बोलिले. त्याप्रमाणें जालें नाहीं. याचे मर्जीप्रमाणें ऐकोन रवानगी केली असती, तर खर्चाचाही बंदोबस्त अधिक आगळा जाला असता. आह्मी येथें अलीबहादर यांचे मर्जीप्रमाणें वर्तणूक करून आहों ह्मणोन लिहिलें, तें कळलें. ऐशियास गोसावी याचा मजकूर अलीबहादर यांणीं केला. परंतु पाटिलबाबा यांची स्वच्छता खुलासा नाहीं. जयपूरचा वकील व गोसावी दरबारास येऊन खलबतें करितात, यामुळे पाटिलबावांस चांगलें वाटत नाहीं, या गोष्टी खऱ्याच आहेत. पूर्वी सफरचे महिन्याचे खर्चास पावलें असतां फौज गेली नाहीं, व तुह्मांबरोबर फौज देऊन रवाना करावी असें पाटिलबावांनीं सांगितलें असतां, तेंही जालें नाहीं. याजमुळें पाटिलबावा खर्चास देत नाहीं; व मुलूक सुटेल तेव्हां देऊं असें बोलिले. या बोलण्यावरून व तुमच्या लिहिल्यावरून असें दिसतें कीं, तुमची व बहादर यांची

स्वच्छता नाहीं. त्यास ही गोष्ट ठीक नव्हे. तुह्मी पोख्त, बहुत पाहिलेले, असें असोन अशा गोष्टी कशा होऊं दिल्या? सरदारांनीं एक वेळ गोष्ट न ऐकिली, तर तुह्मीं दहा वेळ समजावून, मसलतीची गोष्ट चांगली असेल ती करवीत जावी, व त्यांची मर्जी राखावी. वांकडेपण लौकिकांत येऊं नये. एकवाक्यता तुमची व सरदाराची असती, तर अशा गोष्टी न होत्या. हल्लीं तुमचे चिरंजीवाबरोबर फौज देऊन पाठविलें, तेव्हां तुह्मी गेलां ऐसें जाहालें. आतां पाटिलबावा सरबरा करितील. गोसावी सोडण्याचा मजकूर विठ्ठलपंत यांणीं बोलोन सोडविला. त्याचे दरबारखर्चाचा मजकूर तुह्मांस समजला नाहीं, व पैका मागावयाचें व महाल मुलूक वांटणीचे घ्यावयाचें, या बोलण्यास विठ्ठलपंत जाऊन बोलत असतात ह्मणोन लिहिलें. त्यास गोसावी याचे खटला तुटावा, ह्मणोन होळकर, शिवाजी विठ्ठल वगैरे साऱ्यांकडून पाटिलबावांजवळ यत्न करावयाचा तितका केला. कोणच्यानेंच तोड पडेना. तेव्हां जिकडून बनेल तिकडून जाहीरदारी तरी तोड पाडणें प्राप्त. ये गोष्टीचें तुह्मीं चांगलें मानावें, असें असतां दुहीसारखें दाखविलें हें नीट नाहीं. येविषयीं बहादर यांस लिहिलें आहे. तुह्मींही त्यांची मर्जी राखोन कामकाज त्यांचे आज्ञेप्रमाणें मन घालून करीत जावें. दहाजणांत अधिकउणें बोलणें तें संभाळून बोलत जावें. बाहेर फूट दिसों देऊं नये. सारांश, सरदारापासून अथवा तुह्मांपासून एकादी गोष्ट गेली, तत्रापि परस्परें सांभाळीत जावी. तुह्मीं पोक्त, शहाणे, केलेले, असें समजोन तुह्मांस बरोबर पाठविलें. आतां दाहाजणांत तेथें वांकडेपणें दाखविणें, उदास राहाणें, या गोष्टी चांगल्या नव्हेत. पुढें बहादर यांचे मर्जीत राहून कामकाज करीत जावें. विलग दिसों देऊं नये."

---

## लेखांक ५८.

**श्री.** ता. १७ मे इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:— येथील कुशल छ २१ रजबपर्यंत, मुकाम देवासें, प्रांत जयपूर येथें स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— पूर्वीं जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. अलीकडील वर्तमानः—राजश्री पाटिलबावा यांजकडे राजश्री यशवंतराव नाईक व चिरंजीव राजश्री बलवंतराव पाठविले होते. ते छ० १६ रजबीं येथें येऊन पोंहचले. उभयतां बहुतांप्रकारें खातरजमेचीं बोलणीं बोलिले. परंतु त्यांच्या मनांतील संशय दूर होऊन स्वच्छता व्हावी, हा अर्थ घडला नाहीं. तेव्हां राजश्री आबा चिटणीस यांसी मायेंत घेऊन त्यांजकडून अगोदर डंगाईत जाण्याविषयीं बोलविलें,

व उभयतांही बोलिले कीं, "आह्मीं तर निःसंशय होऊन, आपली खातरजमा करावी, कांहींएक कल्पना मनांत राहूं नये, याच अर्थे आलों आहों. परंतु आपल्या मनांतील संशय दूर होत नाहींत. त्यास चार महिने पटालियाकडे शिखांच्या पारपत्यास आगर डंगाईत जाण्यासी सांगावें. आमची वर्तणूक चांगली दिसोन आल्यास पुढें आमचा बंदोबस्त करून द्या." त्याचें उत्तर त्यांनीं केलें कीं, डंगाईत जावें, उत्तम आहे. परंतु तिकडील आमच्या लक्षांत असतील त्यांस उपद्रव करूं नये; व गोसावी यास जेथें ठेवावयासी सांगूं तेथं ठेवावा. पुढें सरळपणाची चाल सर्व समजण्यांत येईल. तेव्हां नाईकांनीं व चिरंजीवानें उत्तर केलें कीं, आपल्याकडील पलटणें गारदी यांचीं व तोफा समागमें द्याव्या, व पत्रेंही द्यावयाचीं असतील त्यांस द्यावीं. याचें उत्तर जालें कीं, पत्रें श्रीमंतांचीं असावीं. आह्मांकडील पत्राचें प्रयोजन नाहीं; व पलटणें मारवाड प्रांतीं चाकरीवर आहेत. त्यांचें देणेंही बहुत आहे. याजमुळें द्यावयाची सोय नाहीं. याप्रमाणें तेथील वर्तमान जालें. तें साद्यंत उभयतांनीं सांगितलें, तें सेवेसीं विनंति लिहिली आहे. येथोन कूच करून डंगाईत जाण्याचा विचार जाला, तों स्वामींकडील पत्र राजश्री अलीबहादरबाबास आलें, व राजश्री शिवाजीपंत बापू यांस आपण पत्र लिहिलें, त्याची नकल पाठविली. त्यावरून येथून बापूंस पत्रें पाठविलीं आहेत. पाटिलबावांचें व त्यांचें बोलणें होऊन उत्तर यावयासी आठ दिवस लागतील, तोंपर्यंत येथें मुकाम करून आहों. समेटीचा आशय त्यांस दिसून आलियावर, तेथून बोलावण्याविसीं पत्रें आलीं, तरी त्यांजकडे जाणें होईल. नाहींतर डंगाईत जावयाचा विचार केलाच आहे. जातेसमयीं झांशीस गोसावी यासी आज्ञेप्रमाणें ठेवावयाचें होईल. डंगाईती संधानें बुंदेलियांचीं आलीं आहेत. चार रुपये नक्तही द्यावे व मुलूखही द्यावा, ऐसें बोलण्याचे उद्गार वकिलाचे आहेत. निश्चयांत आलियावर सेवेसीं लेहून पाठवूं. त्या प्रांतीं माहित रा० बाळाजी गोविंद आहेत. त्यांस पत्र व राजश्री रघुनाथ हरी यांसी सामील होण्याविषयीं पत्रें सरकारचीं पाठवावयाचीं आज्ञा जालियास उभयतां सामील होतील. येणेंकरून सरकारकामें होऊन येतील. सेवकास आज्ञा कर्तव्य असेल ती केली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५९. ता. १८ जून इ. स. १७८९.

श्री.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:-येथील वर्तमान छ २२ रमजानपावेतों, स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेषः-स्वामींचें पत्र छ

५ रमजानचें आलें, तें येथें छ २१ रमजानीं आह्मांस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री पाटिलबावा फौजेच्या खर्चाची बेगमी करून देतील; अथवा मुलूख लाऊन देऊन चांगली बंदोबस्ती केली तर तेथें राहावें; नाहींतर कर्ज खाऊन राहणें ठीक नाहीं. निरोप मागोन यावें. ये गोष्टीचा निश्चय होईल तें वर्तमान सत्वर लेहून पाठवणें, व इस्मालबेग व राजे यांजकडील वकील येऊन अनुसंधानें लागलीं आहेत. त्यांसीं बोलणें तें पाटिलबावांस पुसोन बोलावें. नाहींतर पुढें पंचाइती पडतील. जपोन करणें तें करावें ह्मणून आज्ञा. ऐसियासी राजश्री अलीबहादरबाबा जें करणें तें त्यांस पुसोनच करीत असतील. आह्मांकडे कोणी वकीलही येत नाहीं आणि आह्मी बोलतही नाहीं. तेव्हां पंचाइती कशास पडतील? फौजेच्या बंदोबस्ताचें पुसावयासी एका दों दिवसांनीं खासेच पाटिलबावांकडे जाऊन बोलणार. निश्चय ठरेल तें सेवेसीं लिहोन पाठवितील. पाटिलबावांकडे आमचें जावयाचें कारणही पडत नाहीं. ऐसें असतां आह्मांसीं दोष आला तर परिणामीं निर्दोषही होईल. सर्व फौजेच्या लोकांनीं रोजमरे पांच महिन्यांचे द्यावे ह्मणून निकड बसविली आहे. राजश्री नाईक निंबाळकर व पागे येऊन रोजमरे मागतात. त्यास आह्मीं दिवाण कर्जें काढून द्यावीं ह्मणतात. निदान बाबासाहेब बोलिले कीं, आह्मीं लाख रुपये कर्ज करून देतों, व तुह्मीं लाख रुपये काढावे; व भिकाजीपंत लाख रुपये कर्ज करून देतील. तेव्हां भिकाजीपंत यांनीं सांगितलें कीं, आमचा कायदा कर्ज द्यावयाचा नाहीं, आणि श्रीमंतांची आज्ञाही आह्मांस नाहीं. व आह्मीं उत्तर केलें कीं, तुमच्या संमतीखेरीज आह्मांस पैसा कोण देतो? आपली आह्मांवर कृपा नाहीं, त्याअर्थीं आह्मांस कर्ज जातीवर मिळत नाहीं. पुणियाहून श्रीमंतांची आज्ञा कीं, कर्ज खाऊन राहूं नये. तेव्हां पुण्यास सावकारास पैसा कोठून पावणार? चिरंजीव बळवंतराव यांजसमागमें तीन हजार फौज देऊन ईस्मालबेगावर रवाना केलें आहे. त्यास खर्चास मिळेना. पाटिलबावा लाख रुपये फौज गेल्यावर देऊं ह्मणतात. ते देतील तेव्हां खरें! पुढेंही ऐवज दरमाहा येईल ऐसें दिसत नाहीं, व मुलूखही लावून देतील हा भरंवसा येत नाहीं. सावकारांचें येथें सात लाख रुपये कर्ज देणें आहेत. पुढें कर्ज द्यावयास अनमान करितात. पुण्यावर ऐवज देविला तो पावत नाहीं. तेव्हां आमची अब्रू राहणें कठीण, ऐसें सावकार ह्मणतात. याजमुळें अडचण पडली आहे. जालें वर्तमान सेवेसीं विनंति लिहिली आहे. मजला आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे हे विज्ञापना.”

---

## लेखांक ६०.

श्री. ता. १९ जून इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:-येथील वर्तमान छ २३ रमजान मुकाम श्रीमथुरा, स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेष:-छ ५ रमजानचें पत्र स्वामींचें आलें, तें छ २१ रमजानीं पावलें. तेथें आज्ञा कीं, राजश्री पाटिलबावा यांसीं बोलोन फौजेच्या खर्चाची बेगमी चांगली करून दिल्ही, अथवा महाल मुलूक लाऊन दिल्हा तर तेथें राहावें; नाहींतर निरोप मागोन यावें. दोहींतून निश्चय होईल त्याचें उत्तर सत्वर पाठवणें, व इस्मालबेग व राजेरजवाडे यांजकडे यांचे वकील येऊन अनुसंधानें लागलीं आहेत. त्यांसीं जें बोलणें तें पाटिलबावा यांसीं पुसोन करीत जावें. पुढें पंचाईत पडेल ऐसें न करणें. ह्मणून आज्ञा. त्यास पाटिलबावांकडे जाणेंही आमचें होत नाहीं व राजेरजवाडीयांचे वकील वगैरे अनुसंधानाचें बोलणें काय होतें, तेंही आह्मांस कळत नाहीं. बोलतात तें पाटिलबावांस पुसोनच करीत असतील. फौजेच्या बंदोबस्ताचा मजकूर तर दरमाहाचा ऐवज पेशजीं करार केला, तेव्हां फौज चाकरीस पाठविली नाहीं. याजमुळें मागील ऐवज द्यावयाचा नाहीं ह्मणतात. हल्लीं इस्मालबेगावर फौज पाठवावी ह्मणोन सांगोन पाठविलें, त्यावरून राजश्री अलीबहादूरबावा यांनीं आमच्या चिरंजीवासमागमें सरंजामी पथकें व इतलाखी साहशें लोक नेमिले आहेत, परंतु सरदार कोणी जात नाहींत. त्यांजकडील कारकून राऊत घेऊन गेले आहेत. फौज गेली तर लाख रुपये देईन ह्मणतात. देतील तेव्हां खरें. महाल मुलूक लावून द्यावयाचा अर्थ दिसत नाहीं. एका दों दिवसांनीं खांसेच पाटिलबावांकडे जाणार. समक्ष जाबसाल होऊन काय ठरेल तें सेवेसीं लेहून पाठवितील. यानंतर पांच महिने लोकांस रोजमरा नाहीं, याजमुळें गवगवा फार होऊन, लोक येऊन आह्मांपासीं बसले. तेव्हां आह्मीं व भिकाजीपंत उभयतां जाऊन, राजश्री अलीबहादरबाबा यांसीं विचारलें. लोक येऊन बसले आहेत; रोजमरा पांचां महिनीयांचे मागतात. त्याचें उत्तर त्यांनीं केलें कीं, कर्ज घेऊन द्यावे. लाख रुपये आह्मी देतों, लाख रुपये तुह्मीं द्यावे. लाख रुपये भिकाजीपंत देतील. तेव्हां भिकाजीपंत यांनीं सांगितलें कीं, आमचा कायदा नाहीं आणि आह्मांस श्रीमंतांची आज्ञाही नाहीं. याउपरी आह्मी बोलिलों कीं, जातीवर कर्ज आह्मांस मिळावयाचें नाहीं. बाबासाहेबांनीं खातरजमा केलीयाखेरीज आह्मांस कोणी सावकार ऐवज देणार नाहीं. आह्मांसच कर्ज द्यावें ह्मणतात. तेव्हां कल्पना आमचे विषयींची

काय जाली आहे तें समजत नाहीं. तेव्हां बोलिले कीं, कर्ज तुह्मांस मिळतें किंवा नाहीं, हें साफ सांगावें. त्यावरून आह्मीं, राजश्री भिकाजीपंत व राजश्री आपाजीपंत यांजपाशीं सांगितलें कीं, बाबासाहेबांची मर्जी आमचे ठायीं प्रसन्न नाहीं; त्याअर्थी आह्मांस कांहींच होत नाहीं. धणी ते आहेत, त्यांनीं करणें तें करावें. आह्मांस आज्ञा करतील ते करूं. ऐसें उत्तर करून स्वस्त आहों. जालें वर्तमान सेवेसीं विनंति लिहिलें आहे. सेवकांस आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना.''

## लेखांक ६१.

**श्री.** ता. १ जुलई इ. स. १७८९.

[ सदाशिव शामराज ह्यांस नानांनीं लिहिलेल्या पत्राची नक्कल. ]

''विशेषः–तुह्मीं छ २० रमजानचें पत्र पाठविलें, तें पावलें. इस्मालबेगावर चिरंजीव बळवंतराव यांजबरोबर फौज देऊन रवानगी केली. चोहों कोसांवर पांचशें फौजेनिशीं राहिले आहेत. लोकांस ताकीद होत आहे. दोहों चहों दिवसांत लोक अवघे गेलियावर, तेथून कूच करून मजल दरमजल शिंदे होळकर यांच्या फौजा आहेत, तेथें जाऊन दाखल होतील. आजपर्यंत दहा रोजमरे लोकांचें देणें आहे. याजमुळें धरणीं बसतात. उपास होतात. पाटिलबावा तरी रुपये देत नाहीं. फौज रवाना जाहालियावर लाख रुपये देऊं ह्मणतात. पुढें दरमाहा द्यावयाचा भरंवसा नाहीं. राजश्री अलीबहादर सावकारांचा पैसा घेऊन लोकांस द्यावा ऐसें आह्मांस ह्मणतात. आमची पत सावकारींत आहे नाहीं, हें सर्व ध्यानांत आहे. पाटिलबावांजवळ निक्षोन बोलोन निश्चयांत आणावयाचें, अलीबहादर यांच्या विचारास येईल तेव्हां बोलतील. एक वेळ बोलिलों कीं, आह्मांस सांगाल तर आह्मी पाटिलबावांकडे जाऊन जाबसाल करून येऊं. त्याजवरून मुहूर्त पाहून सांगतों, ऐसें बोलिलें. सांगितल्यावर जाऊन निक्षून पुसोन आलियावर सेवेसीं लिहून पाठवीन, ह्मणोन लिहिलें तें कळलें. ऐसियास फौज तिकडे गेली हें उत्तमच केलें. कर्जाचा मजकूर, तुमची व बहादर यांची निखालसता नाहीं, हें ठीक नाहीं. मन घालोन कारभार एकवाक्यतेनें केलियावर दुई दिसत नाहीं, पैकाही मिळतो, हें तुह्मी समजतच आहां. लिहावें ऐसें नाहीं. याउपरी सरदारांचे व तुमचे चित्तांत संशय परस्परें आले आहेत. ते कसेंही करून काढून टाकून स्वच्छ रीतीनें कामकाजें करीत जावीं.''

## लेखांक ६२.

दरजबाब. श्री. ता. २ जुलई इ. स. १७८९.

"विशेष. छ २२ रमजानचीं पत्रें-एक खास दस्तूर पुरवणी व एक पत्र ऐसीं दोन पाठविलीं, तीं पावलीं. सदाशिवपंत एका सावकारापासून दोन लाख रुपये कर्जाऊ घ्यावयाचे बोलत होते. त्यांचीं बोलणीं तिहीं प्रकारचीं तीन वेळ पडलीं. आह्मीं त्याप्रमाणें मान्य केलीं असतां, त्या अन्वयेंही घडलें नाहीं. पागाचे लोक त्यांजकडे ऐवज मागावयास पाठविले होते. त्यांजवळ कारभार आह्मांस नको ह्मणोन बोलले, व भिकाजीपंत व आपाजीपंत यांस पाठवावें ऐसा निरोप आला. त्याजवरून उभयतांस पाठविलें होतें. त्यांजवळ उत्तर जालें कीं, आह्मांस कारभार पुर्वत नाहीं, तुह्मी जाणा! याप्रमाणें जाबसाल उभयतांजवळ केले. येविषयीं मशारनिल्हेंनीं ऐसी तऱ्हा केली. ही गुडघ्याशिवाय नाहीं. पुढें येथें बंदोबस्त करून दिल्लास राहाण्याचा बेत करूं. हें न घडे तर, कूच करावयाचा डौल घालून, बंदोबस्त जाल्यास करून घेतों. नाहींतर सहजच कूच करणें प्राप्त आहे. व उभयतां राजे यांचें मानस आहे कीं, सरकारचा जो सरदार असेल त्याचें बोलणें मात्र कबूल. असी तऱ्हा त्यांची आहे. ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसियास सदाशिवपंतांनीं एका सावकाराचें बोलणें दोन लाख रुपयांचें अधिक उणें तीन वेळ तिहीं प्रकारचें समजाविलें. ही गोष्ट ठीक न'केली. पागाचे लोक पैसा मागावयास मशारनिल्हेकडे गेले होते, व भिकाजीपंत व आपाजीपंत बोलावयास गेले होते. त्यांजवळ त्यांनीं उत्तरें केलीं, हीं ठीक नव्हेत. येविषयीं त्यांस चांगले तऱ्हेनें लिहिलें आहे. कोणाचाही गुडघा असला तरी नीट वर्तणूक याउपरी करितील. तुमचे तेथील बंदोबस्ताविषयीं, ठेवणें तर सोय करून द्यावी; नाहींतर निरोप द्यावा. येविषयीं पाटिलबावांस पत्रें लिहिलीं आहेत. ते बंदोबस्त करून देतील तर उत्तम. न देतील तर निरोप घेऊन यावें. खर्च चढतो, हें नीट नाहीं. उभयतां राजांचें बोलणें सरकारचे सरदार यांचे बोलण्यावर कबूल आहे, ह्मणोन ते ह्मणतात. त्यास हे गोष्ट पाटिलबावांस मानणार नाहीं. तेव्हां फळ काय?"

---

## लेखांक ६३.

पैवस्ती छ २२ जिल्काद तिसैन श्री. ता. २५ जुलई इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:—येथील वर्तमान छ २ जिल्काद मुकाम श्रीमथुरा, स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेष:— हिंमतबहादर गोसावी यांचें वर्तमान, काल सविस्तर लिहिलें आहे. त्यास

अलीकडे गोसावी मजकूर याचा भाऊ उमरावगीर यास त्यांजकडून आणवावें. न आला तर यास तसदी केलियानें त्यास घेऊन येईल. अगोदर राजश्री अलीबहादर यांस सांगोन इनाम देविलें, ते समयीं हें बोलणें नव्हतें. मालमवेसी त्याची लुटावयाची ऐसा करार असतां, घोडीं, हत्ती, उंटें सरकारांत घ्यावीं, ऐसें दोन मजकूर नवीन राजश्री पाटिलबावांनीं राजश्री कृष्णोबा चिटणीस व रायाजी पाटिल यांस पाठवून जाबसाल केले. त्यांसीं उत्तर केलें कीं, मालमवेसी घ्यावयाची ना. तथापि आह्मीं घोडीं, उंटें, हत्ती जप्तींत आपल्या ठेवितों. सहा महिन्यांत त्यानें फंदफितूर केला तर घोडीं, उंटें, हत्ती कोठें गेले नाहींत. आह्मांपासीं आहेत, ते आपलियापाशींच आहेत. आपल्या महालांत ठेवितों. त्यांस खर्चास तुह्मीं द्यावें. आपण न दिलीयास आह्मी देऊं. महा महिने त्याची सुरळीत वर्तणूक जालियास त्याचा बंदोबस्त करावासा करार केला आहे; त्याप्रमाणें करावा. उमरावगीर याचा जाबसाल गोसावीमजकूर यांसीं पुसिला. त्यानें उत्तर केलें कीं, मी कैदेंत पडलों, मजला तसदी केली, ह्मणून तो कांहीं कैदेंत पडावयास कसा येतो? त्याच्या पोटाची बेगमी केली तर तो श्रीगंगातीरीं बसोन स्वस्थ राहील. त्याजपासून फंदफितूर जाला, तर माझें पारिपत्य करावें. त्यास येथें आणा ह्मणाल, तर तो यावयाचा नाहीं. याप्रमाणें गोसावी याचें बोलणें जालें. याप्रमाणें मजकूर पाटिलबावांस त्यांनीं सांगितलीयावर त्यांची मर्जी फिरली. इमान दिल्हें तर काय जालें? गोसावी यासी आपल्याकडे पाठवून द्यावें हा मनोदय होऊन विरुद्ध भाषणें बोलतात. त्याच्या सांगितल्यावरून इमान दिल्हें. याउपरी गोसावी यास त्यांजकडे पाठविल्यानें हिंदुस्थानांत आमचा आब जाऊन, कोणी पुसणार नाहीं. याचा अभिमान सर्वोप्रकारें स्वामींस आहे. हिंमतबहादर यास पुण्यास नेऊन त्यांजकडे देणें तर द्यावा. परंतु राजश्री अलीबहादरबाबांनीं येथें दिलियानें यांचें स्वरूप राहणार. स्वरूपाचें संरक्षण करणार स्वामी समर्थ आहेत. त्यावर वर्तमान मशारनिल्हे यांचे पत्री लिहिलें आहे. त्याचा अन्वय ध्यानास आणून आज्ञा कर्तव्य ते केली पाहिजे. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे हे विज्ञापना."

---

## लेखांक ६४.

पैवस्ती छ २१ जिल्काद तिसैन. **श्री.** ता. ३० जुलई इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान छ ७ जिल्काद मुकाम श्रीमथुरा, स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेषः—हिमतबहादर

गोसावी याचा मजकूर पेशजीं सेवेसीं लिहिला आहे. त्याअलीकडे राजश्री पाटिलबावांनीं फिरोन गोष्ट सांगितली कीं, हिमतबहाद्दर गोसावी यासी आमचे हवालीं करावें. यां प्रकरणीं पांच सात दिवस जाबसाल करीत आहेत. त्यास हल्लीं शिवाजीपंतबापू मध्यस्थींत पडोन आमची सफाई करावी या बेतांत आहेत. त्यांणीं पुसिलें कीं, तुमचें त्यांचें बोलणें पहिलीयापासून कैसें जालें, व तुमचा निश्चय करण्याचा कैसा आहे, याच्या यादी आह्मांपासीं द्याव्या. त्याअन्वयें त्यासीं बोलोन जाबसाल करूं. त्यावरून त्यांजपासीं यादी लेहून दिल्या; त्यांच्या नकला करून पाठविल्या आहेत. येविषयींचें वर्तमान राजश्री अलीबहादरबाबा यांनीं लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. सारांश, दोन दिवस गोसावी यासी घेऊन जाणें ह्मणून निक्षोन सांगोन पाठविलें असतां त्यांनीं नेलें नाहीं. तुह्मीं इमानप्रमाण देऊन कैदेंत ठेवावें; त्याची अन्न घ्यावयाची नाहीं; चार साहा महिने त्याची निखालस वर्तणूक आढळलीयावर त्याचा बंदोबस्त होईल; ऐसें बोलणें होऊन इमानप्रमाण द्यावें ह्मणून सांगितलें. त्यावरून इमान दिल्हें. ऐसें जालें असतां, हल्लीं आमचे हातीं द्यावा ऐसें ह्मणतात. हरामखोरास इमान देऊन पारपत्य केल्यास चिंता नाहीं, ऐसे जाबसाल होतात. राजश्री अलीबहादरबाबा यांचा निश्चय कीं, आह्मांकडून तुह्मीं इमान देविलें, याउपरी तुह्मांकडे द्यावयाचा नाहीं. हे जाबसाल ऐकोन आह्मांस इकडे राहावयाचें नाहीं; देशास जाऊं. तुह्मीं सर्व आटोपावें आणि इकडे राहावें. याचें उत्तर केलें कीं, आह्मी आपल्या समागमेंच येणार. ऐसें उभयपक्षीं जाबसाल जाले. पाटिलबावा इकडून जाऊं ह्मणतात, परंतु या प्रांताची आस्था सोडून जातील ऐसें दिसोन येत नाहीं. राजश्री तुकोजीबावा होळकर वृंदावनावर येऊन राहिले आहेत. उदईक श्रावण शुद्ध ६ षष्ठीस भेटी होणार. भेटी जालिया-वर होईल वर्तमान तें लेहून पाठवूं. गोसावी डेरीयांत आहे. त्याजकडील लोक सभोंवते आहेत. याजमुळें सध्यां आह्मांकडील भेटी होणार नाहींत, पुढें होतील. सारांश, गोसावी आह्मांपासीं कैदेंत असलियानें सरकारचा नक्ष राहोन आमचें स्वरूप राहील, येविषयींचा बंदोबस्त करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना."

---

## लेखांक ६५.

श्री. ता. १४ आगष्ट इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना: येथील वर्तमान छ २२ जिल्काद मुकाम श्रीमथुरा, स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेषः–छ १९

जिल्कादीं, सेवेसीं विनंतिपत्र कासीदजोडीसमागमें पाठविलें आहे, तें पावोन पत्रार्थ विदित जाहला असेल. त्याआलिकडे, राजश्री पाटिलबावा यांनीं राजश्री अलीबहादरबाबा यांसी सांगोन पाठविलें कीं, "भिकाजीपंत फडणीस यांजसमागमें फौज देऊन पाठवितां, त्यास त्यांनीं कांहीं देखिलें नाहीं; लढाईचे प्रसंग पाहिले नाहींत. यास्तव त्यांजला पाठवूं नये. सदाशिवपंत तेवढे माणूस आहे. तो रंग राखून स्वामिसेवा करी ऐसा आहे. तरी तुह्मीं आपलियापासीं हजार फौज ठेऊन, वरकड अवघी फौज सरदारसुद्धां त्याजसमागमें देऊन लौकर रवानगी करावी. दोन लक्ष रुपये तूर्त देवितों." ऐसा जाबसाल त्यांजकडील आलियाउपरी यांनीं सर्वांनीं बसोन, विचार करून, विठ्ठलपंत यांजसमागमें सांगोन पाठविलें कीं, तुह्मीं सांगितल्याप्रमाणें सदाशिवपंत यांजसमागमें फौज देऊन रवाना करितों. त्यावरून त्यांनीं दोन लक्ष रुपयांची निशा खुशालचंद्र सावकार यांजकडून रविकर्ण यासी देवावी, ऐसा निश्चय करून राजश्री आबा चिटणीस यांस सांगितलें. याउपरी आह्मांस फौज घेऊन चाकरीस जावें ऐसें ह्मणणार. त्यास बहादर यांच्या मनांत आलें आहे कीं, आह्मीं पाटिलबावांकडे सांगोन पाठविलें असेल, ह्मणून यांचें नांव घेऊन त्यांनीं निरोप पाठविला, ऐसा संदेह आला. ह्मणून परस्परें वर्तमान ऐकिलें. ऐसियासी पूर्वील पाटिलबावांची आमची वळखही नाहीं, आणि हल्लीं शपथपुरस्कर आह्मीं सांगोन पाठविलें नसतां, आमची सरळ वर्तणूक दिसों न आली! गोसावी याच्याजवळ व वकील आलेत त्यांसीं हे खलबतें करीत नाहींत ह्मणून आमचे ठायीं पाटिलबावांचें वांकडेपण नाहीं. तेणेंकरून यांच्या मनांत संशय आला आहे. यास्तव आह्मीं आग्रह धरून स्वारीस न गेलों तरी पाटिलबावांच्या मनांत विपर्यास येऊन, पैका न दिला तर सरकार-काम दिकतींत पडलियानें स्वामींच्या ध्यानांत येईल कीं, अलीबहादर यांनीं विचार करून, शेवटीं फौज घेऊन जावयास सांगितलें असतां, सरकारचाकरीस गेले नाहींत, ह्मणून दिसगतीवर पडलें. हा दोष मजवर येईल. याजकरितां मजला चाकरी सांगतील तेव्हां त्यांसीं बोलेन. अलीबहादरबाबा निकालसपणें आह्मांस चाकरीस पाठवितील, तर फौज घेऊन जाईन. सेवाचाकरी श्रीमंतांचे प्रतापें मदार घडेल ती करीन. परंतु फौजेस दरमाहा साठ हजार रुपये रोजमरीयास स्वारींत पाहिजेत. त्याची तरतूद करून अलीबहादरबाबा यांनीं पाठवावी. येविसीं स्वामींनीं पत्र येथें यांसीं पाठविलें पाहिजे. जाल्या वर्तमानाची विज्ञाप्ति लिहिली आहे. स्वामी आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना."

---

## ३४ मराठ्यांचें ह्मैसुराकडील राजकारण.

'इतिहाससंग्रह' पुस्तक २ अंक ४ मध्यें "मराठ्यांचें ह्मैसुराकडील राजकारण" ह्या सदराखालीं जें पत्र छापलें आहे, त्याच संबंधाचें दुसरें सविस्तर पत्र उपलब्ध झालें आहे. तें अतिशय महत्त्वाचें असल्यामुळें येथें दिलें आहे. ह्या पत्रावरून मराठ्यांच्या ह्मैसुराकडील राजकारणाचा चांगला बोध होतो.

[ लेलेदप्तर. ] श्री.

"श्रीमंत राजेश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीः–विनंति सेवक मुकुंद श्रीपत साष्टांग दंडवत विज्ञापना येथील क्षेम तागाईत छ २३ रबिलाखरपर्यंत स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें व प्रांतमजकूरचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– स्वामींनीं पेशजीं आज्ञापत्र सादर केलें कीं, "नंजराज सर्वाधिकारी यास (व) हैदर नाईकास जीद वाढला आहे. या समयीं अंतरंगीं संदर्भ लाऊन, नंदराजाकडून करारनामा आणवावा कीं, चौथाई व सरदेशमुखीचा अंमल बसवून द्यावा. येणेंप्रमाणें आपलें मोहरेनिशीं लिहून दिलिया, हैदर नाईकाचें पारिपत्य करून नंजराजाची स्थापना करावी म्हणोन." येविषयीं पेशजीं लिहिणें तें लिहून पाठविल्यास नंजराजाकडील पत्रें मोघम आलीं होतीं. तीं पत्रें सेवेसीं रवाना करून सेवकाकडून सेवेसीं विज्ञप्तिपत्रें लिहिलींच आहेत. त्यांवरून श्रुत जाहलेंच असेल. अलीकडील वर्तमान नंजराजाकडे सविस्तर लिहून पाठविलें कीं, मोघम लिहिल्यास कार्यभाग समर्पक होणार नाहीं. आपले मोहरेनिशीं श्रीमंतांचे नांवें करारनामा, चौथाई व सरदेशमुखीचे अंमल बसवून देवितों, फौजेचे खर्चास तरतूद करून लिहून पाठविल्यास फौजसुद्धां कुमक करून तुमची स्थापना केली जाईल, ह्मणोन लिहोन पाठविलें आहे. करारनामा व खर्चाचे मजकुरास सेवकाचे नांवीं त्याचे कारभारी यांचे नांवचें पत्र पाठविलें आहे. सदरहू पत्रें बहुत निकडीनें ब्राह्मण माणूस घेऊन छ २१ रोजीं रात्रीं येऊन होसकटेस दाखल जाहले. बजिन्नस त्यांचे मोहोरेचा करारनामा येथें ठेविला आहे. त्याची नक्कल व कारभारी व्यंकटराव व श्रीनिवासराव बारकी यांचें पत्र आमचे नांवीं आलें तें पत्र, देखील नंजराजांनी सेवकास लिहिलें पत्र, बजिन्नस सेवेसीं पाठविलें आहे. त्यावरून सेवेसीं श्रुत होईल. म्हैसुराकडील वर्तमानः– नंजराजाकडील जमाव अर्धकोस अलीकडे चौकीबंदी करून उतरले होते. हैदरनाईक आपले जमावासुद्धां पट्टणापलीकडे दोन कोस उतरले होते. त्याचा यांचा अर्धकोसाचा तफावत होता. नंजराजाकडील कित्येक फिरंगी वगैरेंनीं फितुरांत मिळाले. त्याजवरून वीस दिवसांखालीं लढाई जाहाली. ते समयीं फितुरीमुळें हैदरनाईकांनीं एक पेठ घेऊन किल्ल्याचे समोर एक मोर्चा कायम केला आहे. हैदर नाईकाकडील जमावपैकीं कृष्णगिरीकडे कित्येक फौज गुंतली आहे. हल्लीं ह्मैसूरजवळ दोन हजार स्वार व तीन हजार बार, तोफा वगैरे सामान आहे. नंजराजाचें मत जे, ये समयीं कुमक पावलिया

कार्यभाग विवेक होऊन आपली स्थापना होते. पुढें ऐसा समय मिळणार नाहीं. त्यावरून जरूर जाणून राजेश्री भगवंतराव त्रिंबक व राजेश्री महिपतराव कवडे यांजकडे दोन अवर्ते पत्रें पाठविलीं. परंतु तिकडे बसालतजंगाचा शह लागला होता. हल्लीं बसालतजंग दरकूच अदवानीकडे जाणार, ऐसी अवाई घातली आहे. त्याचें जाणें तिकडे जालीया कडपेकडील जमाव येईल. ते जमाव आलीया घोरपडे-कडील जमाव आणून स्वामींचे पुण्यप्रतापेंकरून राजकार्य घडऊं ये. या जरूरास इतके प्रयत्न होणेस गांठी कैशी पडेल? थोर राजकारण अनायासें येऊन बनलें आहे. फौज हाताखालें नाहीं. त्यावरून आणखी टाकोटाक कडपेकडील फौजेस लिहिणें तें लिहिलें आहे. येविषयीं हुजुरून फौज रवाना करून आणि कडपेकडील राजेश्री भगवंत त्रिंबक व महिपतराव कवडे यांचे नांवें लिहिणें तें लिहून, सांडणीस्वारास पाठऊन, कुमक पोहोंचेसे आज्ञा केल्यास काम घडून येणेस संशय नाहीं. यावरी सेवकास जे आज्ञा होईल, त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. सडी फौज पांच हजार स्वार जलद रवाना करावे. बाहीर बुणगा माघारें येईल. सडी फौजेस ताकीद रुबरू व्हावे कीं, कूच दरकूच बारा कोस चौदा कोस येणेंप्रमाणें येऊन पावावे. ऐशी आज्ञा व्हावी. येविषयीं राजेश्री मुराररराव घोरपडे व महिपतराव कवडे यांचे नांवीं ताकीदपत्रें सादर व्हावीं. नंजराज यांजकडे हैदर नाईक यांनीं राजकारण लाविलें होतें कीं, लक्ष होनांचें राज्य तुह्मांस देतों; खाऊन सुखी राहणें. परंतु सेवकांनीं इकडून वरचेवर धीर देऊन पत्रें लिहीत गेले, व स्वामींचें अभयपत्र त्यांस होतें, तें प्रविष्ट केल्यावरून त्यांस धैर्य येऊन, हैदर नाईकाची गोष्ट कबूल न करितां, स्वामींचे ठायीं निष्ठा धरून, म्हटल्याप्रमाणें कबूल करून, करारनामाही लिहोन पाठविला. हल्लीं त्यांचा अभिमान धरून नाईकमजकुराचें पारिपत्य होई तें करणार धनी समर्थ आहेत. सारांश, हल्लींचा समय पुढें येणें नाहीं. हल्लीं अल्प कष्ट करून नंजराजाची स्थापना होऊन चौथ सरदेशमुखीचा अंमल बसतो, पुतें संस्थान आपलें होतें. हे समयीं खामखा स्वामींनी यांजवर कृपा करून पांच हजार फौज सडी जलदीनें पाठविली पाहिजे. सदरहू फौज आल्यावर सर्व काम होतें. राजश्री नंजराज यांजवळ हल्लीं तीनशें फिरंगी, दीड हजार स्वार, तीन हजार बार तोफखाना सरंजाम आहे; परंतु त्यास कुमक नाहीं. सरकाराकडून कुमक जाहलीयास, ते तिकडून, आह्मी इकडून, त्याचें पारिपत्य यथास्थित होईल. स्वामींचा प्रताप थोर आहे. ये समयीं नंजराज यांजवर येहसान होऊन सरंजामाचें काम मातबर होतें. याजवर धनी समर्थ आहेत. आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. राजेश्री महिपतराव कवडे यांस पत्रें पाठविलीं आहेत. इतक्यांत येऊन पावले, तर घोरपडेही सामील करून घेऊन, ये सुमारास दाखल होत आहे. सारांश, अंगेजी केल्यास हैदर नाईक याची बिशाद कांहींच नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

* * *

## ३५ राणोजी शिंद्यांचें एक बाणेदार पत्र.

ग्वाल्हेर येथील श्रीमंत महाराज आलिजाबहादर शिंदे सरकार यांचे घराण्याचे पूर्वज राणोजी शिंदे ह्यांनीं पेशव्यांस लिहिलेलें एक जुनें पत्र उपलब्ध झालें आहे. हें पत्र अत्यंत महत्त्वाचे असून, त्यावरून राणोजी शिंद्यांच्या स्पष्टवक्तेपणाची व बाणेदार स्वभावाची चांगली कल्पना करितां येते. थोरल्या बाजीरावांच्या कारकीर्दींत जे नामांकित सरदार उदयास आले, त्यांत राणोजी शिंदे हे प्रमुख होत. त्यांच्या स्वामिनिष्ठेचें मूर्तिमंत चित्र ह्या पत्रांत आहे.

[सातारादप्तर.] श्री.

"विनंति सेवक राणोजी शिंदे कृतानेक विज्ञापना उपरीः— स्वामींनीं जासुदाहातीं आज्ञापत्र पाठविले कीं, तुह्मीं मोंगल पेडीगांवास येई तोंवरी ठाणें न सोडावें म्हणून. त्यास मोंगल येवो न येवो, परंतु दहा पांच हजार फौज भीमेअलीकडे येई, तोंवरी कांहीं ठाणें सोडावें ऐसें नाहीं. फौजही आली तरी, गांव झुंजवावा; परंतु पाटस कांहीं एक दिवस झुजवावयाजोगी जागा नाहीं. असो. त्याचें काय आहे? जें होईल तें पाहतच आहों. परंतु आमच्या पोटाची अवस्था कठीण. आह्मी तुमचा फौजदार येतो ह्मणऊन त्याची वाट पाहात एक दोन रोज राहिलों होतों. त्यास ठाणेंयांत राहण्याची आज्ञा आली. पांचशें घोडे सकाळीं जमा होईल. रोज शंभर रुपये दिल्यानें पोट भरणार नाहीं. आह्मांपाशीं तों पैसा नाहीं. दोनेकशें तूर्त आहेत, तेच उपवासी मरतों! त्यास मिळवून खाणें! थोरात, निंबाळकरांसीं झुंजों मोंगल येईल, तोंवरी ठाणें न टाकणें. पांचशें राऊत फुकट मिळऊन खाऊन, राज्याचे शिवेचें भांडण राज्यांत कोणी भांडेना, तें भांडणें. ह्मणोन धनी आज्ञा करितात. त्यास हें आह्मांस पूर्वीच कळोन आह्मीं झक मारिली! स्वामींनीं पूर्वी समजाविसी मांडली, तेव्हां जे कामाचे लोक होते, त्यांस एकेकास हजार दोन हजारपावेतों रोख दिले. ते अवघ्या अगोदरींच तुह्मांपासून गेले! त्याउपरी पतके समजाविलीं. तेव्हां रोख रुपये व पुणें देशांतून नगदी रुपये व नख्त रुपया खांदाडिया भरून देऊन जे समजाविलें, ते स्वामींचे जीवलगच आहेत! आह्मांपाशीं सामान नाहीं. लोक कामाचे नाहींत. आह्मी कांहीं भिडेचे तुह्मांपाशीं नव्हों (नाहीं) आणि पिटल्यानेंही जाणार नाहीं! यामुळें आह्मांस रुपया न देतां अगदीं पिटलें, बाहेरच घातलें, परंतु आह्मी निदान कबूल करून स्वारी शिकारी केली. कांहीं आईबाई न ह्मणतां मात्रागमनाचा विचार करून लोकांसींही लांडेलटिकें बोलोन चार लोक जमा केले. लाखा दों चौचा वसुली सरंजाम खातात, दहाबारा हजार रुपये जातीस जाहले, त्यांच्यानें या प्रसंगास शंभर राऊत बाळगवत नाहीं! आह्मी शें दीडशें माणूस जमा केलें. परंतु स्वामींच्या चित्तास न ये, ऐसें पूर्ण कळलें! एका दिवसाचे पोटास जवळी नाहीं. गांव तमाम बेचिराख. कोठें रुपयांस जागा नाहीं. या समयांत मिळवून खाऊन पांचशें फौज जगवा ह्मणतां, तेव्हां एक दोन उपवास जाल्याउपरी लोक उठून जातील. मग आह्मीं तोंड हिंमट करून राहावें! पुढें

पागा तों खर्चाचा सागर! खासदार, बारगीर जातीलच. शेवट टाकूनच पळावें ऐसें तुह्मीं करावें. त्याहून आह्मांसीच निरोप देऊन, वरकड लोकांप्रमाणें या पथकाची बेगमी केल्यानें, दोन तीन हजार फौजेचा जीव शें दीडशें लोक तुमचे तुह्मांस जतन होतील. हें आह्मांमुळें न गमावणें. झुंझा भांडणाची चिंता नाहीं. परंतु एका महिन्याचे पोटास तूर्त पाठवा. पुढें ठाणें यांत शेव्याजी पवार पाठविणें. परंतु दाटी आहे तों आह्मी राहून मग त्याचे हवाला करून, आह्मी या लोकांसाठीं तुमच्या निरोपास येऊं. जर चित्तास येईल तर पोटाची आमची बेगमी शेव्याजी अगर कोणी येथें ठेवावा ऐसें पाठविलें पाहिजे. आह्मी महिना पंधरा रोज सांगाल तितके रोज राहून, ठाणें त्यांचे हवाला करून येऊं हे विज्ञप्ति. हें होत नाहीं तरी या सरदारीस एक योजून पाठवावा. आह्मीं आपले पुरातन चाकरीस यावें, ऐसें तुमच्या चित्तांत आहे तरी येऊं. ही विज्ञप्ति."

* * *

## ३६ पेशवाईतील बायकांच्या धर्मभोळ्या समजुती.

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें प्रसिद्ध करतांना पूर्वीच्या समाजस्थितीची जितकी माहिती मिळेल तितकी प्रसिद्ध करणें इष्ट आहे. अशा प्रकारची ऐतिहासिक माहिती वेळोवेळीं 'इतिहाससंग्रहां'त प्रसिद्ध करण्याचा आमचा प्रयत्न चालू आहेच. नाना फडणविसांच्या कारकीर्दींत त्या वेळच्या स्त्रियांच्या धर्मभोळ्या समजुती कशा प्रकारच्या होत्या, हें दाखविण्यासाठीं पुढील पत्र येथें दाखल केलें आहे. नाना फडणविसांची बायको वारली, त्या वेळीं त्यांच्या नातेवाईकांपैकीं कोणी वडील स्त्रीनें हें पत्र लिहिलें आहे. तें मनोरंजक आहे. त्यावरून पत्र लिहिणारी बाई किती स्पष्टवक्ती होती, हें चांगलें दिसून येतें.

[मेणवलीदप्तर.] श्री.

"चिरंजीव राजश्री नाना यांस आशीर्वाद. उपरीः— तुह्मांकडील अप्रिय वर्तमान तुमचे बायकोचें ऐकिलें. तेणेंकरून चित्तास असंतोष जाला कीं, तुमचे जन्मास पन्नास वर्षें जालीं, आणि पुढें बायको किंवा मुलें यांस कांहींच थांग नाहीं. तर हें दैवयोगेंकरून ईश्वरी सत्तेनें होणें तें होतच असतें. परंतु मनुष्यप्रयत्न आहेत ते करावे. आतां दोन लग्नें करावीं आणि पूर्वीच्या बायकोचे टांक करून गळ्यांत घालावे. कोणी जाणते असतात, त्यांचा शोध करून आंगारे करावे. हें तुह्मां पुरुषांस नीट करितां येत नाहीं, आणि सारें लटकेंच वाटत असतें. परंतु आह्मांस या गोष्टीचे अनुभव आहेत. संसारामध्यें हें सारें खरेंच आहे. तर, तुमच्या घरांत कोणी वडील बायको नाहीं. तुह्मी तालेवार. तुह्मांस करावयाचा उद्योग होणार नाहीं. यास्तव तीर्थस्वरूप सौ॥ चिमाबाई, तुमची मामी, त्यांस हे गोष्टीविसीं सांगितल्यानें, ती आंगारा, औषध-

उपाय, काय लागेल तें करील. तुमचे चित्तांत आल्यास लेक घ्यावयाचा उद्योग कराल तर बरें आहे. इतकें ल्याहावयाचें प्रयोजन काय ह्मणाल, तर बहिणाबाई तों आमचीच होती; आणि बाबा, तुमचे तीर्थरूप, त्यांणीं आमचे घरामध्यें कोणे तऱ्हेनें चाकरी मेहेनत केली, ते आइकली आहे. तें स्मरोन, त्यांचा वंश व आमचा वंश ईश्वरें समान चालवावे, या अर्थी इतकें उद्योगें लिहिलें आहे. तुह्मी सुज्ञ आहां. तुह्मांस जे गोष्टींत जें चांगलें दिसेल तें कराल. पत्राचें मनन करून लिहिलेप्रमाणें करावें. रवाना छ १९ सफर. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विनंति."

* * *

## ३७ मुंबईचे गव्हरनर जॉन हॉर्न ह्यांचें थोरले बाजीराव पेशवे ह्यांस पत्र.

इ. स. १७३५ मध्यें मुंबईचे गव्हरनर जॉन हॉर्न ह्यांनीं थोरले बाजीराव पेशवे ह्यांस लिहिलेले पत्राची नक्कल उपलब्ध झाली आहे. त्यावरून इंग्रज गव्हरनरचीं पत्रें मराठी भाषेमध्येंच पेशव्यांस इ. स. १७३५ मध्येंही येत होतीं असें दिसतें. ह्यापुढील पत्रेंही सर्व मराठी भाषेमध्येंच आलेलीं आहेत.

[धावडशीदप्तर.] "अजम बाजीराऊ पंडित प्रधान दाम महव्बतहू:—

रफअत व अवालिपन्हाशोकत व हशमतदस्तगाह ऐंतजाद दोस्तान् अजदिल् एखलास जान हॉर्न गोवर्नदोर जनराल वालाजा बरतानिया (ब्रिटानिया) पातशाही इंग्रेजान साहेबी थोर अखतियार हशमतपन्हा दस्तगाह आनराबल कोंपनी फोर्त बम्बई वाके हिंदुस्थान या पार्सीया आरबस्तान या बअमल मै जंजीरे मुंबै. सलाम सलामत अंजयाम आंकी येथील खैरियत जाणून मोहिबीं आपली खैर आफियत हमेशा मरकूम फरमाऊन शादमानी हांसिल केली पाहिजे. दिगर, मोहिबांकडील किताबती ३ तीन नेकसात येऊन पोंचल्या. मोहिबांची खुष खबरी रुएदाद आयां होऊन बहुतसी खुषी हांसिल जाली. मौजे अलिबागेहून कूच करून मजलदरमजल घांटावर गेले व आजम कपितान इंचबर्ड व इज्जत आसार कृष्णाजीराम यांचे मूंजबानीवर होवे ह्मणून. तर मशारनिल्हे येऊन बिलकल मूंजबानी आयां केलें. त्याजवरून इजहार झालें व मोहिबांच्या फत्तेनसरतींच्या कितेक खबरा कलमीं केल्या, त्या मालूम होऊन खुषवक्त झालों, व डाख्तर सांडी यांस रवाना करणें ह्मणून कलमीं केलें. ऐसियास बरसातकाल असे, आणि बंदरमजकुरीं अजारी बहुत, याकरितां मशारनिलेस यावयास माफगत होत नसे; व ईजानेबास मालुम होऊन आलें कीं, मशारनिले कृष्णाजीराम यांस मोहिबीं येथें ठेवलें, सबब कीं ईजानिबाचे कर्तव्याची पाळत करून घ्यावी ह्मणून. हाल्लीं माा निलेस मोहिबांचे नजीक पाठवून दिला असे. अम्हा यावरून तर्फेनची दोस्ती तमाम झाली असें नसे. सबब कीं ईजानीब हरयेक मोहिबांची कार खिदमत

चाहत असेत. ज्यादा काय लि॥. र॥ छ २३ मोहोरम हे किताबती. ता। ४ जून सन १७३५ इंग्रजी हे किताबती."

* * *

## ३८ जनार्दनपंत पेशव्यांचें पत्र.

थोरले बाजीरावसाहेब पेशवे ह्यांस जनार्दनपंत ह्मणून एक मुलगा होता. तो अल्पवयी होऊन वारला. त्यामुळें त्याचें नांव इतिहासांत विशेष प्रसिद्ध नाहीं. तथापि तो बुंदेलखंडच्या एका स्वारीमध्यें गेला होता असें दिसतें. त्याचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें मासल्यासाठीं येथें देतों.

श्री.

[धावडशीदप्तर.] "तीर्थरूप राजश्री वडिलांचे सेवेसीं:—

अपलें जनार्दनानें साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ. ५ मोहरम मुकाम कोटरादुर्ग भा ना चा नजिक गंज नदी धसाण वडिलांचे आशीर्वादें यथास्थित असे. विशेषः— वडिलीं आशीर्वाद पत्र छ १ मोहरमचें कासिदासमागमें पाठविलें, तें आजी छ मजकुरीं दोन प्रहरां पावलें. मोंगल ठाईंचे ठाई आहेत. सादतखान यमुना उतरोन गेल्याचें वर्तमान लिहिलें तें कळलें. तुह्मीं बहुत लौकर येणें ह्मणून आज्ञा. ऐसीयास वडिलांचा मुकाम गोहदेवरी होता, तेथून पत्र आलें. त्यास आह्मी गोहदेवरी यावें किंवा कोणत्या ठिकाणास यावें, हें कांहीं कळत नाहीं. अगोदर प्रथम पत्रें वडिलांचीं रवाना जाहलीं, तीं आह्मांस पावलीं नाहीं. तेथें तऱ्ही निश्चयें अमके जागां येणें ह्मणून लिहिलेलें असलें, तरी तीं पत्रें पावलींच नाहींत. माघारे गोहदेच्याच मुकामावरी यावयाची आज्ञा असली तरी आह्मी येतों. रोहिडा, सिंद नदी, पाटोर, कोंच, कोठडे सैदाचे लहचुरावरून आलों. एकेक जागा आठरोज, कोठें दाहारोज, मुकामें जाहलीं. पांच पांच. सा सा गांवावरी वैरणीची काडी त्या मार्गे येईल ह्मणतां मिळणार नाहीं. दुसरे खळ्या खोचरें बहुतच आहेत. लष्कर हैरान येतां जाहलें, तसेंच जातां होईल. ऐसा प्रसंग आहे. त्याहीमध्यें अमकें जागां येणें हाही निश्चितार्थ न कळे. याकरितां हें पत्र वडिलांस लिहिलें आहे. ज्याप्रमाणें आज्ञा होईल, तिकडून यावयाचें करूं. तोंवरी येथें एक दुसरें मुकाम करितों. येथून वैरण काडी, पाणी पाहून थोडी थोडी मजल करून, खरगापुरच्या रोंखें पत्राचा मार्ग लक्षीत राहतों. तरी जे आज्ञा कर्तव्य ते करून, सत्वर उत्तर पाठवावया आज्ञा केली पाहिजे. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे. हे विज्ञापना."

* * *

## ३९ दमाजी गायकवाडाचें महत्त्वाचें पत्र.

बडोद्याच्या गायकवाडांपैकीं रणशूर दमाजी गायकवाड ह्यांनीं इ. स १७५७ मध्यें अमदाबादेस वेढा घालून, तें शहर मोंगलांचा सरदार मोमीनखान ह्याजपासुन

घेतलें, त्या प्रसंगाचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें फार वाचनीय आहे. दमाजी गायकवाडानें ह्यामध्यें आपली स्वामिनिष्ठा फार वर्णन केली आहे. 'जैसें सुरास संकटीं अंतरिक्षवाणी कल्याणदायक, तेणेंप्रमाणें साहेबांचें लेखन युक्त आह्मांस.' ह्या वाक्यांत त्या वेळच्या गायकवाड सरदारांच्या स्वामिनिष्ठेचें किती बहारीचें वर्णन आहे, हें रसिक वाचकांच्या लक्षांत येईलच.

[किरकोळ.] श्री. ता. ११ आक्टोबर इ. स. १७५७.

"श्रीमंत राजश्री प्रधान साहेब साहेबांचे सेवेसीं:-विनंति सेवक दमाजी गायेकवाड समशेरबहादर कृतानेक दंडवत विज्ञापना अधिक वद्य १३ त्रयोदशीपर्यंत साहेबांचे कृपावलोकनेंकरून आनंदमय असों. विशेष कीं, साहेबीं कृपापत्र पाठविलें, तें मस्तकीं वंदून, अक्षरशः विलोकन करून समाधान पावलों. पत्रीं मजकूर कीं अमदाबाद घेतलें, ऐसें परस्पर वर्तमान ऐकिलें. परंतु तुमचें कोणाचें पत्र नाहीं. मोमीनखान याचें उत्तम प्रकारें पारपत्य करून ह्मणून आज्ञा. ऐशीयासी येथें नित्यांनीं लढाई होते. तें शहर घेतल्यांतच येतें. कांकीं इतकी झोटधरणी होती. त्या प्रकारें कोणीं लिहिलें असेल. आह्मांस तों साहेबांचें पत्र जयसूचक. जैसें सुरास संकटीं अंतरिक्षवाणी कल्याणदायक, तेणेंप्रमाणें साहेबांचें लेखन युक्त आह्मांस. आतां शहर घ्यावयासी दिवसगत लागतेसें नाहीं. साहास श्रम करून जीवित्व वेचूं. चरणपरायण हाच धर्म. विशेष तें काय ल्याहावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

✻ ✻ ✻

## ४० दादासाहेबांसीं शेवटचा करार.

श्रीमंत दादासाहेबाबरोबर नाना फडणवीस व हरिपंत फडके ह्यांनीं जो शेवटचा करार केला, त्याची नक्कल उपलब्ध झाली आहे. ती येणेंप्रमाणें:—

[मेणवलीदप्तर] श्री. ता. २१ मे इ. स. १७८३.

"यादी तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांजकडून कलमेंची याद खास दस्तुरची आली. त्यांचे करार विद्यमान राजेश्री बाळाजी जनार्दन व हरी बल्लाळ सु॥ सल्लास समानीन मया व अलफ.

परगणे नीके ऐवज सुमार सालीना ६ इंग्रजाचे तहांत तीन लक्ष रुपये करार आहे, त्यासंबंधी जाजती वडिलांचे मर्जीप्रमाणें गोदातीरीं राहणार, सबब एक लक्ष रुपये येथें, चार लक्ष रुपये सालीनापैकीं एक लक्ष रुपयांचे महाल व इतलाखी तीन लक्ष रुपये प्रमाणें पावतील. येणेंप्रमाणें करार करावें.

आह्मांकडील लोक व शागीर्दपेशा कोणास तसदी नसावी. स्वस्थ आह्मांजवळ राहत असें करावें. घरास जातील त्यास प्रतिबंध नसावा. गैररहा वर्तणूक कोणीं करूं नये ह्मणजे उपद्रव लागणार नाहीं. येणेंप्रमाणें करार करावें.

विक्रीस तयार.

# श्रीएकनाथी भागवत.

## पुस्तकरूपानें.

**किंमत ४॥ रुपये. ट. ख. ८ आणे.**

भक्तिरसाची केवळ मूर्ती असें जें श्रीमद्भागवत त्यांतील केवळ ज्ञानाचा गाभा एकादशस्कंध आहे. श्रीएकनाथ महाराजांनीं आबालवृद्धांस ज्ञान प्राप्त व्हावें ह्या हेतूनें एकादशस्कंधावर अत्यंत रसभरित सुबोध प्राकृत ओंवीबद्ध टीका केली आहे. सदर पुस्तकांतील कठीण शब्दांवर रा० रा० **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर** बी. ए. यांनीं भरपूर टीपा दिल्या आहेत.

---

# बालबोध पांचवें पुस्तक.

**पृष्ठें २९२. धडे ८०. किंमत १२ आणे.**

ह्यांतील ऐतिहासिक, शास्त्रीय, वाङ्मयात्मक इत्यादि विषयांची निवड आणि रचना पूर्वीच्या चार पुस्तकांच्या धोरणावर, अगदीं नवीन पद्धतीची असून, भाषापरिज्ञान विशेष होण्याकरितां, आणि लेखनव्यवसायाची आवड उत्पन्न होण्याकरितां ह्यामध्यें भाषासरणीवर २ धडे घातले आहेत, आणि वाक्यचर्चेवर ३ धडे घातले आहेत. मराठी भाषेचा अभ्यास मार्मिक रीतीनें करण्याविषयीं ह्या धड्यांच्या योगानें विद्यार्थ्यांस इच्छा होईल, असा अजमास आहे. आस्थेवाईक मातापितरांनीं आणि शिक्षकांनीं ह्याचा अनुभव घ्यावा.

मुलीचा मजकूर हे ईश्वरी तंत्र आहे. मर्जीशिवाय नाहीं. घडेल. येणेंप्रमाणें करार करावें.

वाटखर्च व कर्ज वारावयास ऐवजः—

पन्नास हजार रुपये सुरतेचें कर्ज वारावयास, व वाटखर्चास तीस हजार येथें, ऐशी हजार रुपये देऊं. येणेंप्रमाणें करार करावें.

गंगातीर, कृष्णातीर, भीमातीर यामध्यें यात्रेस येणें जाणें होईल त्यास दिक्कत मनांत न आणावी. सुबत्याचे दिवस असल्यास लिहून पाठवीत जावें. विनंति करीत जाऊं. त्याप्रमाणें करावें येणेप्रमाणें करार करावें.

आह्मांस कोणेंविषयीं प्रतिबंध नसावा. स्वस्थतेनें राहणें ठेवावें.

आपण स्वस्थचित्तें, निरमळतेनें, वेडेंवांकडें फितूर राजकारण न करितां, निखालसतेनें असावें. प्रतिबंधाचें कारण नाहीं. येणेंप्रमाणें करार करावें.

आह्मांकडील लोकांची तगीरी बहाली आह्मी करूं. त्यांत तुह्मांकडील उपरोध नसावा. आपले स्वारीबरोबर शागीर्दपेशाचे माणूस व चौकीपहाऱ्याकरितां चाळीस पन्नास स्वार पागे सुद्धां, व क्षेत्रशेंपर्यंत गारदी राहतील त्यांची तगीरी बहाली आपण करावी. त्यांत कुन्हा मात्र नसावा. येणेंप्रमाणें करार करावें.

तुह्मांस न्यावयास निदान दोघांनीं यावें.

आपली स्वारी कोंडाईबारीं असली ह्मणजे राजेश्री हरि बल्लाळ व तुकोजी होळकर येऊन भेटतील. येणेंप्रमाणें करार करावें.

मर्जीची जागा ... चांगली पाहूं तिथें राहूं.

गोदातीरीं आनंदवल्लीं, कचेश्वर, कोपरगांव यांत मर्जीस येईल तेथें रहावें. येणेंप्रमाणें करार करावें.

येणेंप्रमाणें नऊ कलमें करार केलीं आहेत. त्यास यापूर्वीं आणा शपता बहुत वेळ जाल्या. विरुद्धें वाढलीं. दौलतीस पेंच पडले. या गोष्टी ध्यानांत नाहींत असें नाहीं. सांप्रत कालीं कृपा करून गंगातीरीं स्नानसंध्या करून राहणार, त्या पक्षीं फिरून संशयास कारण व लौकिकास विरुद्ध ती गोष्ट सर्वथैव होऊं नये. स्वस्थ चित्तें करून गंगातीरीं स्नानसंध्या करून, आह्मांस दौलतीस कल्याण ती गोष्ट घडत असावी. कोणीं कांहीं सांगितलें असतां मनांत येऊं नये. वरचेवर सांगत जावें. दिवसें दिवस परस्परें संशय न येत असें होत असावें. इकडील कलमांची याद अलाहिदा पाठविली आहे. त्याप्रमाणें करार करून पाठवावी. सदर्हू इकडील व आपणाकडील यादीप्रमाणें श्रीसांबाचे शपथपूर्वक वडिलांकडून अमलांत यावें. ह्मणजे सदर्हू यादीचे कराराप्रमाणें इकडून अमलांत येईल. अंतर होणार नाहीं, येविषयीं श्रीगणपतीची शपथ असे. छ १९ जमादिलाखर शके १७०५ शोभननाम संवत्सरे येणेंप्रमाणें करार करावें."

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] मे १९१०. [अंक १० वा.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें

तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



**राजा सरफोजी.**

( कारकीर्द इ. स. १७११-इ. स. १७२९. )

# ३०. दुसरे मल्हारराव होळकर व मालकम साहेब.

इंदूरच्या होळकर घराण्यांतील प्रसिद्ध शूर पुरुष यशवंतराव होळकर हे मृत्यु पावल्यानंतर त्यांच्या मागून इ. स. १८११ मध्यें मल्हारराव होळकर हे बालराजे गादीवर आले. हे अल्पवयी असल्यामुळें सर्व राज्यकारभार तुळसाबाई ही करीत असे. ह्या बाईचें नांव इतिहासांत प्रसिद्ध आहे. हिच्या कारकीर्दीमध्यें अनेक कारस्थानें व बेबंदशाही होऊन, महतपूर येथें होळकरांची व इंग्रज सैन्याची लढाई झाली. नंतर ता. ६ जानेवारी इ. स. १८१८ रोजीं होळकरांचा व इंग्रजांचा तह झाला. ह्या तहाचें काम सर जॉन मालकम् ह्यांच्या राजकारणचातुर्यामुळें सिद्धीस गेलें व त्यांच्याच योगानें मध्यहिंदुस्थानामध्यें चांगली शांतता उत्पन्न झाली. ह्मणून सर जॉन मालकम् ह्यांची कीर्ति अद्यापि प्रसिद्ध आहे. हा तह झाल्या-नंतर मल्हारराव होळकर ह्यांची मालकम् साहेबांनीं भेट घेतली, व "तुह्मांस काय पाहिजे?" ह्मणून विचारिलें. त्या वेळीं ह्या बालराजानें सांगितलें, "साहेब, माझा हरवलेला छोटा हत्ती मला आणून द्या." साहेबांनीं लगेच लष्करांत लोक पाठवून त्यांचा लाडका हत्ती आणवून दिला. नंतर त्यांनीं त्यांस एक पेगूचा घोडा बक्षीस दिला, व त्यांचें नानाप्रकारें कोडकौतुक पुरवून त्यांचें प्रेम संपादन केलें. ज्या वेळीं मालकम् साहेब माळव्यांतून गेले, त्या वेळीं ह्या बालराजास अतिशय वाईट वाटलें, व त्यानें असे उद्गार काढिले कीं, "साहेब, तुमच्यासारखा खेळांचा व शिकारीचा शोकी आह्मांस दुसरा कोणी मिळणार नाहीं!"*

---

* ह्याबद्दलचा उल्लेख मालकम साहेबांनीं आपल्या एका पत्रांत केला आहे, तो येणेंप्रमाणें:—

"I have been lately with my young *ward* Mulhar Rao Holkar, and certainly the change of a few weeks is wonderful. The fellows that I was hunting like wild beasts are all now tame, and combine in declaring that I am their only friend. All the chiefs of Holkar are in good humour. The boy himself is at present delighted with a small elephant (which is lost, and I recovered and sent him) that dances like a dancing-girl; and a little Pegu pony, of which I made him a present, and which ambles at a great rate. I went out to hunt with him a few days ago, and we had great fun. The little fellow, though only eleven years of age, rides beautifully. He mounted a tall bay horse very fairly broken, and taking a blunt spear nine feet in length, tilted with two or three others in very superior style, wheeling, charging and using his spear as well as the rest of them. He expressed grief at my going away, as he discovered that I was very fond of play and hunting."

## ३१. चांदजी माने पतंगराव.

चांदजी माने व गोराजी व सूर्याजी माने हे बेदरचे बादशाहाकडे सरदार होते. ते समयीं पादशाहाच्या कन्या पांच जणी, वैराग्य घेऊन, कोणास न कळतां देशांतरास गेल्या. ही हकीकत पादशाहा यास कळली. मग पादशाहा यानें शोधास हारकारे वगैरे हुजूरचे लोक पाठविले. त्यांस कोठें शोध लागेना, ह्मणून ते माघारी आले. नंतर चांदजी माने व गोराजी माने व सूर्याजी माने यांस हुजूर बोलावून हुकूम केला कीं, "हारकारे वगैरे हुजूरचे लोक कन्येचे शोधास गेले होते. त्यांस कोठें शोध लागला नाहीं. माघारीं आले. आतां तुह्मीं सरंजामासुद्धां तयार होऊन त्यांचा शोध करीत जावें." असा हुकूम करितांच तो मस्तकीं वंदून, चांदजी माने यानें अर्ज केला कीं, 'आज्ञा मान्य आहे.' असें पादशाहा यानें ऐकून, तिघां माने बंधूंस सरंजामास जहागीर पाऊण लक्षाची करार करून, शोधास रवाना केलें. तेथून निघून शोध करीत करीत ते गांवगन्ना थांग लावीत चालले. कोठें ठिकाण लागेमासारखा जाहला. तेव्हां चांदजी माने यांस मोठें संकट प्राप्त जाहलें. मग चांदजी माने यानें, दृढनिश्चय करून ठिकाण लावणेबद्दल तीन दिवस अन्नपाण्याविरहित उपास करून, एका ठिकाणीं बसून तीन उपवास केले. चवथे दिवशीं रात्रीस पंच बीबी मासाहेब यांनीं स्वप्नांत सांगितलें कीं, "आतां तूं श्रमी होऊं नको. मिरज प्रांतीं खानापूर आहे, तेथें आमचें वास्तव्य आहे. तरी त्वां तेथें येऊन रात्रीस पीरसाहेब यांचे दरग्यांत येऊन राहावें. तेथें जें सांगणें तें तुजला सांगूं." असें स्वप्न चांदजी माने यांस जाहलें. मग त्यानें आपले भावांस बोलावून याप्रमाणें स्वप्न पडलें तें सांगितलें. नंतर दुसरे दिवशीं ते कुच करून खानापुराकडे मिरज प्रांतीं लष्कर घेऊन निकडीनें खानापुरास आले. तों पांढर अगदीं ओसाड असून थोडी वस्ती होती. तेथें हणगोजी काळे माने यांची बायको रांडाव होती. तिनें येऊन चांदजी माने यांजकडे आपलें वर्तमान सांगितलें कीं, "मी एकटी बायको पाहून माझें वतन भगत व जाधव खातात. त्यास तेंच वतन तुह्मीं घेऊन माझें पाळग्रहण करणें." अशी हकीकत आपली निवेदन केली. ते वेळीं चांदजी माने यानें ती गोष्ट मान्य करून, तिजला आपले जवळ ठेऊन घेऊन, जाधव व भगत यांची पाळत राखून, उभयतांवर मारा करून, अठरा माणूस जीवें मारून टाकलें. मग पीरसाहेब यांचे दरग्यांत मासाहेब यांचें स्मरण करून रात्रीस निजले. तों साहेबीं रात्रीं दृष्टांत देऊन सांगितलें कीं, 'आमचें वास्तव्य येथें आहे. त्याप्रमाणें खूण मुद्रा, ऊद फूल व पांचपदर साहेबांचे पाहिले. स्वप्नांत सांगितलेप्रमाणें खूण दृष्टीस पडली. हे सिद्धांत पाहून, सरंजाम खानापुरीं टाकून, सडेस्वार

होऊन, पादशाहाकडे अर्ज करून हकीकत निवेदन केली कीं, मिरज प्रांतांत खानापूर आहे, तेथें पीरसाहेब यांचे दरग्यानजीक मासाहेबांचा ठिकाण लागून तेथें त्या गुप्त जाहल्या आहेत. असा दृष्टांत आह्मांस झाला. त्याची साक्ष मुद्रा पाहून साहेबांस अर्ज करावयास आलों. त्याजवरून पादशाहा यांणीं अर्ज ऐकून संतोष जाहले. सरंजाम दिला होता तोच मुक्रार करून, खानापूर येथें बादशाहानें चांदजी माने यांस जहागीर करून दिली, व 'पतंगराव' अशी पदवी दिली, आणि जहागिरीची सनद करून दिली. कसबे मजकूरचे पाटील-कीचें उत्पन्न निमें करार करून मानपान सुद्धां दिल्हें. ह्याप्रमाणें शिक्का, मोर्तब व मोरचल देऊन, सरंजाम व कसब्याच्या निमे पाटीलकीच्या सनदा करून देऊन, चांदजी माने यांस लावून दिल्हें. त्यानें येऊन खानापुरास ठाणें घातलें. ते समयीं देशमुखी जैन भयान्ना काकान्ना करीत होते. पादशाई सनद करून दिल्हेली पाहून त्यावर जैन देशमुख यांनेंही आपला शिक्का करून दिला. याप्रमाणें पतंगराव यास कसबे खानापूर येथील पाटीलकीचें वतन निमें दुगोबस्त करार करून, सनदापत्रें करून देऊन, मशारनिल्हे पतंगराव माने यांची तेथें स्थापना केली. चांदजी माने हा एकनिष्ठ भक्त मासाहेब यांचा होता. त्याची स्वामिनिष्ठा पाहून मासाहेब प्रसन्न झाल्या व त्यांनी वरदान देऊन त्याची खानापुरीं स्थापना केली. मासाहेबांची व बादशाहाची भेटी झाली. तेव्हांपासून मान्यांचें वतन चालत आहे. चांदजी माने ह्यांस एक पुत्र झाला. त्याचें नांव धावजी माने पतंगराव असे ठेविलें. त्याचा वंश अद्यापि खानापूर येथें चालत आहे.*



## ३२. रामाजी नारायण कोल्हटकर.

रामाजी नारायण कोल्हटकर हे नागपुरकर भोंसल्यांचे गुरु. हे कोंकणांतील नेवरें गांवचे राहणारे. हे मोठे हरिभक्तिपरायण सत्पुरुष होते. ह्यांनीं शाहू महाराजांस विनंति केली कीं, "आपण स्वामींच्या राज्यांत राहोन, स्नानसंध्या व श्रीचें भजन करून व स्वामींस व स्वामींच्या राज्यास कल्याण चिंतून आहों." तेव्हां शाहू महाराजांनीं त्यांचा योगक्षेम चालावा ह्मणून त्यांस इ. स. १७०८ मध्यें कोंकणांत नेवरें गांवाजवळ कांहीं जमीन इनाम करून दिली. हे वांईजवळ पांडवगडाखालीं पांडववाडी आहे, तेथें येऊन जाऊन राहत असत. हे कोंकणांत जात येत असतां; कोयना नदीचे कांठीं भैरवगडाखालीं मुक्काम करीत

* ही माहिती खानापूरचे माने पाटील याचेकडून आमच्या एका मित्रानी पाठविली आहे.

असत. तेथें बापूजी, परसोजी व साबाजी असे तीन बंधू भोंसले उपनांवाचे राहात असत. ते मोठ्या भक्तीनें ह्या ब्राह्मणास आपल्या घरीं आणून त्याचें आदरातिथ्य करीत. त्यामुळें त्यांचा विशेष स्नेह जडला. एके वेळीं भैरवगडावर जंजिऱ्याच्या हबशाची स्वारी आली. त्यानें त्रिवर्ग भोंसल्यांचें घरदार लुटून त्यांस कैद केलें. ही गोष्ट रामाजी नारायण ह्यांस समजली. तेव्हां त्या परोपकारी ब्राह्मणानें हबशाकडे जाऊन भोंसल्यांच्या सुटकेबद्दल प्रयत्न केला. हबशानें त्रिवर्गांबद्दल तीन हजार रुपये खंड मागितला. तेव्हां रामाजीपंतानें कोंकणांत जाऊन, आपली सर्व जिंदगी विकून, हबशास तीन हजार रुपये दिले व त्रिवर्ग भोंसल्यांची सुटका केली. नंतर हे भोंसले बंधू रामाजीपंताबरोबर पांडववाडी येथें येऊन त्यांच्या आश्रयानें राहिले. तेथें बापूजीचे पुत्र लिंबाजी भोंसले ह्यांस रामाजीपंताच्या आशीर्वादानें पुत्र झाला. त्याचें नांव त्यांनीं रघूजी असें ठेविलें. हेच रघूजी भोंसले पुढें प्रख्यात पुरुष होऊन, ह्यांनीं 'सेनासाहेब सुभा' हें पद मिळविलें, व आपल्या पराक्रमानें नागपुर येथें मोठें राज्य संस्थापित केलें. असो. रामाजीपंतांच्या विद्यमानें परसोजी भोंसले ह्यांचा शाहू महाराजांच्या दरबारांत प्रवेश झाला व पुढें ते आपल्या कर्तृत्वगुणानें चांगले उदयास आले. ह्या रामाजीपंतांच्या आशीर्वादानें व साह्यानें आपला भाग्योदय झाला, ह्मणून भोंसल्यांनींही त्यांच्या कुटुंबाचें कल्याण केलें. त्यांनीं रामाजीपंतांच्या दोनी मुलांस आपल्या पदरीं ठेविलें व त्यांना मोठमोठ्या जागा दिल्या. रामाजीपंतांचे वडील चिरंजीव कोन्हेर राम हे नागपुरकर भोंसल्यांचे पुढें दिवाण झाले, व धाकटे भास्कर राम हे सेनापति झाले. ह्या उभयतांनीं आपल्या अंगच्या लोकोत्तर गुणांनीं आपलें नांव नागपुरच्या इतिहासांत अजरामर करून ठेविलें आहे.

## ३३ भास्कर राम.

भास्कर राम हे रामाजी नारायण कोल्हटकर ह्यांचे द्वितीय पुत्र. ह्यांस रघूजी भोंसल्यांनीं आपली बक्षीगिरी ह्मणजे सेनापतीची जागा दिली होती. हे मोठे तरवारबहादूर व धाडशी होते. ह्यांनीं दोन वेळीं बंगाल प्रांतावर स्वारी केली व तेथील नबाब अलीवर्दीखान ह्यांस अगदीं त्राहि त्राहि करून सोडिलें. इ. स. १७४२ मध्यें ज्या वेळीं भास्कर रामांनीं मकसुदाबादेवर चढाई केली, त्या वेळीं अलीवर्दीखानास आपली सत्ता कायम राहणें कठीण वाटूं लागलें. भास्कर रामाच्या शौर्यापुढें नबाबाच्या सैन्याचा टिकाव लागेना, त्यामुळें भोंसल्यांचा अंमल

बंगाल्यांत एकसारखा बसूं लागला. अलीवर्दीखानास परम संकट प्राप्त झालें. बाळाजी बाजीराव पेशव्यांस मागें परतविण्याकरितां त्यानें त्यांस २० लक्ष रुपये खंडणी देऊन त्यांची कशीतरी समजूत केली. परंतु त्यांस हें भोंसल्याचें सैन्य मागें फिरविणें फार कठीण झालें. शेवटीं त्यानें कांहीं कपटयुक्ती योजून भास्कर रामाचें अरिष्ट टाळण्याचा बेत केला. त्यानें मुस्तफाखान व जानकीराम असे दोन वकील भास्कर रामांकडे पाठविले, व त्यांच्या द्वारें भास्कर रामांस असें कळविलें की, "तुह्मी मागाल ती खंडणी देण्यास मी तयार असून तुमच्याशीं तह करण्याची माझी फार इच्छा आहे. तरी तुह्मीं माझ्या भेटीस यावें." ह्याप्रमाणें वचनप्रमाण झालें, व भास्कर राम ह्यांनीं वकिलांच्या गोड बोलण्यावर भुलून जाऊन नबाबाची मुलाखत घेण्याचें मान्य केलें. त्याप्रमाणें ते मुर्शिदाबादेजवळ दहा मैलांवर मुद्दाम भेटीसाठीं तयार केलेल्या तंबूमध्यें, नबाबाच्या इच्छेप्रमाणें आपलें सैन्य दूर ठेवून, निवडक सरदारांनिशीं आले. ते तेथें येतांच नबाबानें 'भास्कर राम कोणते?' असा प्रश्न विचारिला, व लगेच त्यास सांकेतिक उत्तर मिळतांच त्यानें एकदम भास्कर रामावर हल्ला करण्याबद्दल आपल्या लोकांस इशारत दिली. त्या क्षणीं त्याचे सरदारांनीं तंबूच्या दोऱ्या तोडून भास्कर रामांवर हल्ला केला, आणि त्यांस व त्यांच्या निवडक २२ सरदारांस यमसदनीं पाठविलें. ह्याप्रमाणें भास्कर रामाचा दगा करून अलीवर्दीखानानें वध केला. ही गोष्ट इ. स. १७४४ मध्यें घडून आली. ही बातमी रघूजी गायकवाड ह्यानें नागपुरकर भोंसल्यास कळविली व त्यांनीं आपलें सैन्य तयार करून अलीवर्दीखानावर स्वारी केली. ह्या स्वारीमध्यें भोंसल्यांनीं कटक, ओढिया वगैरे प्रांत हस्तगत करून, अलीवर्दीखानाकडून भास्कर रामाच्या 'मुंडकटाई'बद्दल २५ लाख रुपये घेतले. नंतर अलीवर्दीखान शरण आला व त्याशीं भोंसल्यांनीं तह केला. भास्कर राम हे मृत्यु पावले, तेव्हां त्यांची पत्नी गरोदर होती. तिला काशी येथें एक पुत्र झाला. त्याचें नांव काशीराम भास्कर असें होतें. भास्कर रामाचें नांव बंगाल्याच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे.



## ३४. अलीवर्दीखानाची एक आख्यायिका.



अलीवर्दीखानानें भास्कर रामांस ज्या वेळीं भेटीसाठीं डेऱ्यामध्यें बोलाविलें व पूर्वसंकेताप्रमाणें त्यांवर हल्ला करण्याबद्दल आपल्या लोकांस इशारत दिली, त्या वेळीं ते एकदम तुटून पडले व त्यांनीं तंबूच्या काढण्या तोडल्या. त्या वेळीं अलीवर्दी-



**बंगालचा नबाब अलीवर्दीखान.**

( कारकीर्दः—इ. स. १७४१—इ. स. १७५६ ).

खानही तंबूमध्यें होता. त्यास, एकदम बाहेर येऊन, हत्तीवर बसून पळून जाण्याबद्दल त्याच्या नौकरांनीं सूचना केली. त्याप्रमाणें तो त्या गडबडीमध्यें एकदम बाहेर पडला. त्या वेळीं त्याच्या पायांतील एक चर्मपादुका तंबूमध्यें राहिली. त्या प्रसंगीं त्यानें आपल्या हुजऱ्यास सांगितलें कीं, "माझा जोडा राहिला आहे, तो घेऊन ये. तो येईपर्यंत मी येथून हालणार नाहीं." त्या वेळीं त्याचा एक सरदार ह्मणालाः— "खावंद, जोडा पाहण्याची ही वेळ आहे काय?" ह्या वेळीं अलीवर्दीखानानें धिमेपणानें असें उत्तर दिलें कीं, "छेः, मी जर या वेळीं जोडा टाकून गेलों, तर पुढें लोक असें ह्मणतील कीं, नवाब साहेब मोठ्या गर्दीनें आपला जोडा टाकून पळून गेले! याकरितां मला तसें करणें उचित नाहीं."



## ३५. पेशव्यांच्या दरबारचे इंग्लिश वकील मिस्टर एल्फिन्स्टन यांच्या लवाजम्याचा एक महिन्याचा खर्च.

पेशव्यांच्या कडील गुप्त बातम्या जशा कंपनीकडे जात, तशाच कंपनीच्या व तिच्या वकिलांच्या गुप्त बातम्या पेशव्यांकडे येत. वकिलांचे पगार व त्यांच्या गुप्त हेरांचे नांवनिशीवर तनखे पेशव्यांकडे दररोज व महिनेवार येत. पैकीं इ. सन १८१५ च्या मे महिन्याचा एल्फिन्स्टनच्या लवाजम्याचा खर्च ज्यांत इंग्रजींत टिपला आहे, असा एक खर्डा सांपडला आहे. तो रा. रा. वि. का. राजवाडे ह्यांनीं आमच्याकडे पाठविला आहे. तो येणेंप्रमाणेः—

"Account Particulars of Disbursements for the Public Service made by the Hon'ble Mr. Elphinstone, Resident at the Durbar of the Peshwa, for the Month of May 1815:-

1815 To SALARIES.

May 31st. My Salary for this month.

Calcutta Sa. Rs. 2859-3-3 or Chandoree Rs. 3226-3-56

Cash paid Lieut Closes'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| Salary for | Rs. 750 | or Chan. | 846 | 1 | 80 |
| Do. Mr. F. W. Russell's | Rs. 600 | or do. | 677 | 0 | 64 |
| Do. Lieut. Pottinger's | Rs. 500 | or do. | 564 | 1 | 20 |
| Do. Doctor Jefferys's | Rs. 800 | or do. | 902 | 3 | 52 |
| Do. Doctor Coats's | Rs. 500 | or do. | 564 | 1 | 20 |

6,781-3-92

TO TABLE ATTENDANTS AND CAMP EQUIPAGE

| | | | |
|---|---|---|---|
| Table Expenses with Europe Shop Bills | 4006 | 1 | 0 |
| Servants' Wages ... ... ... | 1400 | 0 | 0 |
| Cattle expenses ... ... ... | 450 | 0 | 0 |
| Amount Office Establishment ... ... | 875 | 0 | 0 |
| Stationary ... ... ... ... | 171 | 3 | 25 |
| 1 Shroff... ... ... ... ... | 15 | 0 | 0 |
| | 1,061-3-25 | | |

TO PRESENTS

Purchased sundry articles for presents given to the Dessye of Kittoor, his son and attendants as follows:—

For Kittoor Dessye

| | | | |
|---|---|---|---|
| 1 Pair of gold embroidered shawls ... | 500 | 0 | 0 |
| 1 Piece of kincob ... ... ... | 275 | 0 | 0 |
| 1 Turban ... ... ... ... | 30 | 2 | 0 |
| 2 Pieces of muslins ... ... ... | 40 | 0 | 0 |
| | 845—2—0 | | |
| 1 Pearl string... ... ... ... | 2,000 | 0 | 0 |
| 1 Serpench ... ... ... ... | 452 | 0 | 0 |
| 1 Jeega ... ... ... ... | 350 | 0 | 0 |
| | 3,620—2—0 | | |

FOR HIS SON

| | | | |
|---|---|---|---|
| 1 Pair of Shawls ... ... ... | 457 | 0 | 0 |
| 2 Pieces of Muslins ... ... ... | 32 | 0 | 0 |
| 1 Pearl String ... ... ... ... | 1,200 | 0 | 0 |
| 1 Serpench ... ... ... ... | 275 | 0 | 0 |
| 1 Jeega ... ... ... ... ... | 250 | 0 | 0 |
| | 2,232—0—0 | | |
| 10 Pair of shawls for his Diwan and Sirdars ... ... ... ... | 1750 | 0 | 0 |
| 7 Pieces of Kincob ... ... ... | 295 | 2 | 0 |

( येथें कांहीं भाग बिलकूल फाटून गेला आहे. )

| | | | |
|---|---|---|---|
| 13 Turbans ... ... ... ... | 239 | 2 | 0 |
| 2 Dooputtas ... ... ... ... | 120 | 0 | 0 |
| 2 Sellas and Turbans... ... ... | 56 | 0 | 0 |
| | 4,659—0—0 | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | 5 Serpenches ... ... ... ... | 995 | 0 | 0 |
| | | 1 Jeegah ... ... ... ... | 325 | 0 | 0 |
| | | 1 Diamond and Pearl Haur ... ... | 650 | 0 | 0 |
| | | 1 Pair of Diamond Pounchee ... | 475 | 0 | 0 |
| | | | 2,445—0—0 | | |
| 8th | | Presented to Lawl Mahamed a Shawtir of Shah Shooja-ool-moolk | 400 | 0 | 0 |
| | | Enams and Charity to different People at Poona ... ... ... ... | 355 | 8 | 0 |
| | | | 18,047—1-57 | | |
| | | To Secret Intelligence. | | | |
| | | 1 Carcoon and 4 jassooses at Merich ... | 115 | 0 | 0 |
| | | 1 Carcoon and 4 Do. in Candeish | 115 | 0 | 0 |
| | | 1 Carcoon and 4 Do. in the Vinchoorker's Camp ... ... ... | 115 | 0 | 0 |
| | | 1 Carcoon and 4 Do. at Neepawny | 115 | 0 | 0 |
| | | 1 Carcoon and 4 Do. at Colapore | 115 | 0 | 0 |
| | | 1 Kishen Rawaji and 6 jassooses ... | 254 | 0 | 0 |
| | | 1 Carcoon in the Peshwa's Camp ... | 100 | 0 | 0 |
| | | 1 Naik and 4 jassooses for whole month and two jassooses for 22 days at Poona ... ... ... | 54 | 0 | 0 |
| | | Akbar Writer in Hindostan ... ... | 30 | 0 | 0 |
| | | | 1,013—0—0 | | |
| | | Carried over Rupees | 33,089—1—59 | | |
| | | Brought over Rupees | 33,089—1—59 | | |
| 1815 | | To Dawks | | | |
| May | 31st | For amount Cash paid Mr. I. Jefferys Post-master as pr. his account of particulars accompanying this, Poona Salary Rupees 3855 or Chandoree Rupees | 4,163 | 1 | 60 |

पावला. व सोयराजी नाईक यांचें लग्न घाटगे यांचे कन्येबरोबर करून त्या बाईचें नांव मैनाबाई असें ठेविलें. त्यावर पुढें पूर्वींप्रमाणें उभयतां एकविचारें वागावें, नाहींपेक्षां आह्मी बंदोबस्त करूं. त्याजवर बजाजी नाईकांनीं कांहींच उत्तर दिल्हें नाहीं. हा प्रकार सन १७२८ इसवींत जाला. पुढें बजाजीराव नाईक यांणीं हा मजकूर शाहू महाराजांस कळऊन लढाई करण्यासाठीं फौज दहा हजार मागितली, आणि फौजेसहित इंदापुराहून कूच करून त्यांणीं फलटणास येऊन लढाई केली; आणि जानोजीराव यांस सांगून पाठविलें कीं, आह्मी आपले मुलामाणसांसुद्धां मोगलाईत जातों, तुह्मीं आमचे बंधू महादाजी नाईक यांस कांहीं नेमणूक देऊन बंदोबस्त करावा. हें सांगून सन १७२९ इसवींत निघोन गेले. नंतर जानोजीराव नाईक फलटण जहागिरीचें काम स्वतः पाहूं लागले. त्यांनीं रामनवमीचे उत्साहासाठीं पूर्वींचा रामओटा नीट करून आपल्यास राहण्यास वाडा बांधविला. नंतर सन १७३५ इसवीचे सुमारास जंजीऱ्याचा शिद्दी मरण पावला. त्याचे पुत्र आपसांत भांडूं लागले व अबदुलाखानास ठार मारिलें. त्यावरून शाहू महाराज यांणीं याकुबखान याचे पक्षानें पेशव्यांस तिकडे जाण्याविशीं आज्ञा केली. त्यांत जानोजीराव जाण्यास तयार जाले. परंतु त्यांचे चिरंजीव मुधोजीराव यांणीं त्यांस जाऊं न देतां, आपण स्वतः गेले. त्या लढाईत जय प्राप्त जाहला. त्यावरून मुधोजीरावावर महाराज व पेशवे खुष जाहले. नंतर ते त्यांची आज्ञा घेऊन फलटणास आले. नंतर थोडेच दिवसांनीं महाराजास भेटण्यास राजसबाई साताऱ्यास गेली. त्या समईं महाराजांपासून मौजे होळ व मुरुम हे दोन गांव इनाम मागून घेतले. त्याजवरून महाराजांनीं दोनी गांवचीं इनामपत्रें करून त्या गांवांस ताकिदीही दिल्या. हा प्रकार सन १७३५ इसवींत घडला. पुढें फलटणचा कारभार वडिलांचे आज्ञेवरून मुधोजीराव पाहूं लागले. तिकडे बजाजीराव यांणीं निजामसरकारास पूर्वींची आपले वडिलांची हकीकत कळऊन, अठरा लक्षांची जहागीर संपादन केली. नंतर सन १७४० इसवींत बिडगांव येथें ते मूळव्याधीचे आजारानें मरण पावले. त्यांची स्त्री गिरजाबाई सती गेली. पुढें मुधोजीराव यांस कन्या जाली. तिचें नांव बचाबाई. ती मलवडीकर घाटगे यांस दिल्ही. दुसरा पुत्र जाहला, तो दोन वर्षांनंतर मरण पावला. नंतर तिसरी कन्या जाली. तिचें नांव आंबूसाहेब. ही तारळेकर महाडीक यांस दिल्ही होती. महाडीक मरण पावल्यावर ती फलटणीं येऊन राहिली. तिसरी कन्या भवानीबाई ही राजे शिर्के यांस दिल्ही. नंतर सन १७४४ इसवींत राजसबाई शाहू महाराजांस भेटावयास जाऊन, पूर्वींचा वाल्हेगांव सकुबाईनीं मागून घेतलेला

पुन्हां मागून घेऊन, इनामपत्र करून घेतलें. पुढें सन १७४६ इसवीपासून जानोजीराव नाईक हे परलोकाचे साधनास लागले. सदोदित रामनामाचा जप करून, एक पळभर काल रामनामावांचून गेला असतां तें पळ व्यर्थ गेलें, असें मानीत. नंतर सन १७४८ इसवींत नाईकाची प्रकृति अगदीं थकून गेली; व त्यांनीं सर्व आपले पदरचे लोकांस आमचे परलोकास जावयाची वेळ जवळ आली असें सांगून, मोठ्या सावधपणानें राम राम ह्मणत देह ठेविला. त्या वेळेस त्यांचे चिरंजीव मुधोजीराव सातार्‍यास होते. येथून मुधोजीराव यांची कारकीर्द सुरू झाली. येणंप्रमाणें हकीकत असे."



# ३ शिर्के राजे.*

१ कानोजी रामोजी राजे शिर्के सेनासरखेल वजारतमाब देशमुख सुभे दाभोळ व सरदेशमुख मामले रायरी, जात क्षत्रिय, वय वर्षे ३०, राहाणार मौजे कुटरें तालुके चिपळूण जिल्हा रत्नागिरीः—

२ "आह्मी सूर्यवंशी, दशरथ रामराजाच्या कुळांतील, अस्सल क्षत्रिय, रामाच्या वंशांतील. त्याजबद्दल कथानक प्राचीन रामायण आदिकरून ग्रंथांत वर्णन आहेच. पुढें तोच वंश चालत आला असोन, रामाचें गोत्र वयाघ्र तेंच आमचें. प्रवर आंगिरस ..............त्रिप्रवरान्वित व वैयाघ्र गोत्रोत्पन्नोहं असोन, आह्मांस वेदाचे आज्ञेप्रमाणें यजुर्वेदाचा पूर्ण अधिकार आहे. मूळ आमची गादी हस्तनापुरीं, राम निजधामास गेले त्याचेपुढें कितीएक वर्षांनीं स्थापित झाली असून, पुढें आमचे पूर्वज दिल्ली तक्तावर असतां आमच्या पूर्वजास (कुटर) बादशाहा असें नामाभिधान होतें, व हिंदुपद बादशाहा सार्वभौम नात्यानें आह्मीं राज्य करीत असतां, पदरीं यवन जातीचे दोन सरदार अफगाणस्थानांतून आणोन चाकरीस ठेविले होते. त्यांचे मदतीस फौज देऊन सर्व हिंदुस्थान देशाचा बंदोबस्त करण्याचें काम आमचे पूर्वजांनीं त्यांस सांगितलें होतें. तेव्हां

* राजे शिर्के ह्याचे घराणें महाराष्ट्रमंडळामध्ये फार प्राचीन व श्रेष्ठ मानिलें जातें. ह्या घराण्याची माहिती फारशी प्रसिद्ध नाही. परंतु सरकारानें ही माहिती मिळविण्यासाठी कुटरेकर शिर्के श्रीमत कानोजी राजे ह्यास ता. ३० मार्च इ. स. १८८३ रोजी असें पत्र पाठविले की, "मुंबई ग्याझेटीयर ह्या नावाचा सरकारचे हुकुमावरून मुबई इलाख्याच्या सविस्तर माहितीचा एक मोठा ग्रंथ तयार होत आहे. ह्यात इतर उपयुक्त माहितीबरोबर प्राचीन व अर्वाचीन ऐतिहासिक माहिती दिली जाती. ह्या सबधानें ह्या इलाख्यातील राजे रजवाडे, व पहिल्या व दुसऱ्या व तिसऱ्या वर्गाचे सरदार व मानकरी ह्याचा इतिहास मिळविणे अवश्य आहे. हा इतिहास दुसरे ठिकाणी मिळणे अशक्य असल्यामुळें आपल्याकडे ही यादी पाठविली आहे. तर वरील कामाचे महत्त्व लक्षात आणून खाली लिहिलेले मुद्यावर आपल्या घराण्याच्या सबधानें सविस्तर व सप्रमाण माहिती देणेची मेहरबानी करावी. ही माहिती ग्याझेटीयरसारिख्या सरकारी पुस्तकात प्रसिद्ध जाहल्यानें सर्व सुधारलेल्या राष्ट्रांच्या नजरेपुढे येणार आहे, व आपल्या वाडवडिलाचा इतिहास आपल्याला एका ठिकाणीं वाचण्यास मिळणार आहे." त्याप्रमाणें श्री० कानोजी राजे ह्यांनी जी माहिती पाठविली, ती ह्या कैफीयतीमध्यें दाखल आहे. ही माहिती बरीच उपयुक्त असल्यामुळें येथें दिली आहे.

त्याच यवन जातीचे सरदारांनीं पुढें (कुटर) बादशाहा याजबरोबर लढाई करून सर्व कुटुंबाचा घात केला व सर्व मुलेंमाणसें मारलीं गेलीं. त्यांतून एक पुरुष आपला जीव वांचवून, वेष पालटून, इकडे दक्षण प्रांतीं आला. तो शके ७०५ सालीं प्रथम रायगड ह्मणोन किल्ला आहे, त्यावर राहून, कांहीं थोडी फौज पदरीं ठेवून, त्यानें थोडा बहुत मुलूख काबीज केला, आणि निर्वाह करून होता. त्यास अकराशें वर्षें झालीं. पुढें तेंच कुटुंब वाढवून मोठें झालें, व खाशीं माणसें कुटुंबांचीं पुष्कळ झालीं. पुढें सर्व देशांत मुसलमानांचा अंमल जाहला. नंतर वारंवार त्याजकडोन आमचे पूर्वजांवर छापे येत व लढाया होत असत. मुसलमानांनीं रायगडावर सर्व कुटुंबाचीं माणसें ठार मारलीं व एक सुर्वे यांचे कुळांतील मुलगी केली होती, ती माहेरीं गेली असोन गरोदर होती, ती मात्र वांचली. बाकी सर्व कुटुंब नाहींसें झालें. पुढें तिजला दैवयोगानें पुत्र झाला. त्याचें नांव वज्रपाळ असें ठेविलें. पुढें तो वयांत आल्यावर त्याणें, हल्लीं सचीव इलाख्यांत मुसेंखोरें येथें शिरकवली या गांवीं, जंगलांत, शिरकाई देवीचें स्थान आहे, तेथें कांहीं दिवस श्रीदेवीची आराधना केली. त्याजवरून देवी प्रसन्न होऊन तिणें वर दिला व प्रसाद झाला. नंतर पुढें तो वज्रपाळ तळकोंकणांत जाऊन प्रथम चौऱ्याशीं गांव हस्तगत करून राहिला. त्यास हल्लीं 'शिरकण टप्पा' असें ह्मणतात. तो ठाणें जिल्ह्यांत निजामपुर तालुक्यांत आहे. तेव्हांपासोन (कुटर) हें आडनांव जाऊन शिर्के असें ह्मणों लागले. पुढें युक्तिप्रयुक्तीनें मुसलमानांशीं युद्ध करून सर्व कोंकण प्रांत काबीज केला. त्या मूळ पुरुष वज्रपाळापासून आमची हल्लीं पिढी सतरावी आहे. त्याजपुढें वणंगोजी (१) असेंही ह्मणतात. त्यापुढें यशवंतराव (२) जाहला. तानाजी (३); तुकोजी (४); वणंगोजी; (५) तानाजी (६); वाघोजी (७). येथपर्यंत पिढी येऊन त्यास दोन पुत्र. त्यांत पिलाजी राजे शिर्के मळेकर यास हल्लीं 'मळेकर शिर्के' असें ह्मणतात—तानाजी (८) कानोजी (९). यास पुत्र तीनः—रामोजी आमचे कुटरेकराचा पूर्वज. दुसरा विठोजी आळंदेकराचा पूर्वज. तिसरा दौलतराव हा सिंधकराचा पूर्वज. रामोजी (१०); कानोजी (११); लक्ष्मणजी (१२); सखोजी (१३); तानाजी (१४); बहिरजी (१५). आमचे आज्यास पुत्र पांच वडील मुख्य आमचा बाप रामोजी (१६). त्यास पुत्र चार. पैकीं आह्मी वडील कानोजी (१७). ह्याप्रमाणें आमच्या पिढ्या चालत आल्या असोन दरम्यान वेगळालीं घराणीं आमचे भाऊबंदांचीं पुष्कळ जाहलीं. सदरीं घराणीं लिहिलीं आहेत, त्याखेरीज ज्या गांवास जें गांव व हक्क बळकावून राहिले त्यांस तींच आडनांवें पुढें पडलीं. तीं अशीं कीं, काजवेकर शिर्के, अंतरवल्लीकर शिर्के,

वडुस्तेकर शिर्के, मुंढेकर शिर्के ह्याप्रमाणें पुष्कळ घराणीं वेगळीं जाहलीं. आमचे कुटरेकर पैकीं नंबर १० रामोजी हे, गुजराथ प्रांतांत दाभाडे व पेशवे यांचीं युद्धें जाहलीं, त्यांत कामास आले ह्मणजे लढाईत पडले. व आळंदेकरांपैकीं किरतसींग राजे हे करनाटकांत कामास आले. वरपासून जे हल्लीं ९ कानोजीपर्यंत आमचे पूर्वज कोंकणांत स्वतंत्र राजे होते व राज्य करीत होते, त्या वेळीं सातार जिल्ह्यांत कुंभारली घाट हल्लीं चालू आहे, त्याचे दक्षिणेस दोन कोसांवर सह्याद्रीचे माथ्यावर बहिरवगड ह्मणोन किल्ला आहे, तीच मुख्य राहण्याची व सर्व व्यवस्थेची जागा होती. वेळोवेळीं मुसलमान यांणीं युद्ध करून नंबर १ वणगोजीपासून नंबर ९ कानोजीपर्यंत हाच क्रम चालू होता. सर्व कोंकणप्रांत आमचे पूर्वजांचे हस्तगत होता. ते सह्याद्रीचे खालीं कोणचेही वाटेनें मुसलमानांस येऊं देत नव्हते. ह्मणजे, जितक्या घाटमाथ्याच्या वाटा आहेत, त्यांवर आमचे पूर्वजांकडोन फौज मावळे लोकांची ठेविली असोन, नेहमीं युद्धप्रसंग चालू होते. असें कितीएक वर्षें चाललें असतां, दिल्लीचे सुभे पुढें दक्षिणेंत आले. त्यांत बेदरचा सुभा होऊन प्रथम राज्य स्थापित जाहलें. त्या वेळीं दुर्गादेवीकृत असा बारा वर्षांचा दुष्काळ पडला. बारा वर्षेंपर्यंत या देशांत अगदीं पर्जन्य पडला नाहीं. यामुळें कोट्यावधि जीव नाहींसे जाहले. परंतु आमचे पूर्वजांनीं, त्या वेळीं आपले हातून होईल तितकी तजवीज करून, तळकोंकणांतील पुष्कळ माणसें व जनावरें जगविलीं. कारण, त्या वेळीं सर्व कोंकण प्रांताचा वसूल ऐनजिन्नस व गल्ला वसूल येत असलेमुळें संग्रहास बहुत गल्ला होता. त्यामुळें लाखों जीवांचें रक्षण त्या वेळीं जाहलें. व त्याअलिकडे व पलिकडे कितीएक लोकांस इनामें व धर्मादाय, देवस्थानें, खोत्या वगैरे आमचे पूर्वजांनीं दिल्या. त्या हल्लीं दयाळु महाराणी सरकारांनीं चालविल्या आहेत. यामुळें आह्मी फार संतुष्ट आहों. पुढें बारा वर्षांचा दुष्काळ संपून आबादी जाहली, परंतु मुलूख बहुत उजाड जाहला. पुढें बेदरचे राज्याचे चार तुकडे जाहले. विजापुर, अहमदनगर, गोवळकोंडें, वऱ्हाड, हीं वेगळीं जाहलीं. परंतु बेदरचें राज्य पुढें कांहीं दिवस चाललें होतें. सन १३४७ ह्या वर्षीं पुढें त्याची जी स्थिति जाहली, ती क्यापटन ग्रँटडफ साहेब यांणीं 'मराठ्यांचा इतिहास' ह्मणून इंग्रजींत जो ग्रंथ लिहिला आहे, त्यांत सर्व वर्णन लिहिलें आहे. त्यांत शिर्के राजे यांजबद्दल त्यांस माहिती जेवढी मिळाली त्याजवरून त्यांणीं लिहिलें आहे. कोंकणांत व देशांत मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या होत असतां 'कोंकणांत शिर्के राजे ह्मणोन मोठा बलाढ्य सरदार आपलें रक्षण करून होता.' असें

त्याणें लिहिलें, तेच आमचे पूर्वज. पुढें मुसलमान लोकांचें अति प्राबल्य जाहल्यावर कोंकण प्रांत व सह्याद्रीचे माथ्यावरील सर्व किल्ले घ्यावे असा मोंगल सरकारांत ठराव होऊन, मलिक-उल-तिजार नामक सरदार यास नेमिलें. त्याणें प्रथम चाकणाजवळ फौज जमा करून, कोंकणांत आमचे किल्ले व मुलूख घ्यावयास प्रारंभ केला. तेव्हां त्याणें आमचे पूर्वजांस व सर्व रयतेस असा उपदेश केला कीं, "तुह्मीं सर्वांनीं मुसलमान व्हावें आणि मुसलमानी धर्माप्रमाणें वागावें. तरी आह्मी तुह्मांस जीवंत राहूं देऊं. नाहींपेक्षां सर्वांचा नाश करूं." त्याजवरून आमचे पूर्वजांनीं हुकूम न मोडतां, युक्तीनें असें सांगितलें कीं, "आमचे आरद (नातेवाईक ?) ह्मणजे छत्रपति शिवाजी महाराज यांचे पूर्वज, ते आमचे आरद आहेत. त्यांस प्रथम मुसलमान करावें व मुसलमानी धर्मानें वागवावें, ह्मणजे आह्मी वागूं. तसें आपण न कराल, तर आह्मीच मुसलमान जाहलों असतां आमचा सर्व मुलूख ते घेतील व आह्मांस ठार मारतील. तर प्रथम त्यांस मुसलमान करावें." असें युक्तीनें सांगोन त्यास फौजेसहित सिंहगडाकडे मार्गस्थ केलें. आणि वाटेंत त्या मुसलमानांवर छापा घालून सर्व फौजेसुद्धां त्यांचा नाश करून अगदीं मोड केला. ही हकीकत मराठ्यांचे इतिहासांत प्रसिद्ध आहे. पुढें छत्रपति शिवाजी महाराज यांचा उदय होऊन मुसलमान लोकांचें प्राबल्य कांहीं कमी होत चाललें. परंतु आह्मी शिर्के राजे हे स्वतंत्रपणानें कोंकण प्रांतीं व वर सह्याद्रीचे माथ्यावर अंमल चालवीत होते. सु॥ तिसा आशर मया व अलफ. इसवी सन १७१८ ह्या सालीं. चंदीचे मुक्कामीं राजाराम महाराज असतां, चंदीस वेढा व मोर्च्ये तांब्राचे बसले. त्या वेळेस गणोजी राजे शिर्के मळेकर हे तांब्राकडे असतां, राजाराम महाराज यांस त्यांचे कटांतून बाहेर मुलें लेंकरांनिशीं घेऊन, वेलोर मुकामीं आणोन सुखरूप पोंहचविलें. तेव्हां राजाराम महाराज प्रसन्न होऊन, दाभोळ सुभ्याचें देशमुखीचें वतन वंशपरंपरा दिलें. त्याजबदल सनद दिली ती आह्मांपाशीं आहे. पुढें आमचें क्षत्रियाचें अस्सल मोठें उंच जातीचें कूळ असल्यामुळें छत्रपति शिवाजी महाराज यांचे व आमचे घराण्याशीं शरीरसंबंध व्हावा, असा त्यांचा बहुत काळापासून असलेला इरादा सिद्धीस जाण्यास अनायासें सवड जाहली व शरीरसंबंध घडले तेः—

१ छत्रपति शिवाजी महाराज यांची दुसरी बायको सोयराबाई आमची शिर्के यांची कन्या.

१ शाहू महाराज यांची बायको सकवारबाई ही आमचे पूर्वज नंबर १० रामोजी राजे यांची कन्या. ती शाहू महाराज यांजबरावर सती गेली.

१ संभाजी महाराज यांची बायको येसूबाई पिलाजी राजे शिर्के मळेकर यांची कन्या.

१ धाकटे शाहू महाराज यांचें कुटुंब शिर्के यांची कन्या.

१ प्रतापसिंग महाराज यांचें धाकटें कुटुंब शिर्के यांची कन्या.

१ शाहाजी उर्फ आप्पासाहेब महाराज यांचें दुसरें कुटुंब सगुणाबाई उर्फ आईसाहेब महाराज ह्मणोन आमचे पणजे नंबर १४ ची कन्या. तिसरी माई-साहेब महाराज लक्ष्मणजी राजे शिर्के कुटरेकर यांची कन्या. चवथी बयासाहेब महाराज किरतसिंग राजे शिर्के आळंदेकर ह्मणजे नंबर १० चे बंधू यांची कन्या.

१ हल्लींचे सातारचे दत्तक चिरंजीव श्रीमंत राजाराम महाराज यांचें थोरलें कुटुंब, गोपाळजी राजे शिर्के कुटरेकर यांची कन्या.

१ कोल्हापुरचे छत्रपति संभाजी महाराज यांस शिर्के यांची कन्या दिली, तिचें नांव दिवाणसाहेब. दुसरी बबईसाहेब महाराज ही शिर्के यांची कन्या होती. ह्या संभाजी महाराजांस मोहिते यांणीं गोळी घालून ठार मारिलें.

१ हल्लींचे कोल्हापुरचे छत्रपति शिवाजी महाराज हे हल्लीं नगरास आहेत. त्यांचें कुटुंब आमचे चुलत आजे वाघोजी राजे शिर्के ह्मणजे नंबर १५ चे सापत्न बंधु यांची कन्या.

सदरहूप्रमाणें सातारचे व कोल्हापुरचे राजघराण्यांशीं व आमचे कुळाशीं शरीरसंबंध झाले. यामुळें छत्रपति शिवाजी महाराज व संभाजी व शाहू-महाराज यांणीं पेशव्यांकडे राज्याधिकार सोपवीपर्यंत आमचें राज्य स्वतंत्र-पणानें चाललें, व आमचीं राज्यें घ्यावीं अगर आह्मांस इनामें द्यावीं असें त्यांचे मनांत आलें नाहीं; आह्मी मात्र त्यांस फौजेसुद्धां नेहमीं मदत करीत असलेमुळें मुसलमानांचा अगदीं पराभव होऊन छत्रपति शिवाजीचें स्वतंत्र राज्य संस्थापित झालें. एके वेळीं गणोजी राजे शिर्के यांणीं शाहू महाराज यांज-बरोबर त्यांचे बचावाकरितां समुद्रांत उडी टाकली व त्यांस समुद्रांतून बाहेर काढून त्या उभयतांनीं आपले जीव वांचविले. ही गोष्ट ग्र्यांटसाहेब यांणीं केलेले मराठ्यांचे इतिहासांत प्रसिद्ध आहे. पुढें शाहू महाराज यांणीं पेशव्यांस सर्व राज्याधिकार सुपूर्त केला. तरी आमचें कांहीं कमी झालें नव्हतें. पेशव्यांकडे राज्याधिकार गेल्यावर, माळवे प्रांतांत व इतर ठिकाणीं होळकराबरोबर पेशवे यांजकडोन आमचे पूर्वजांची नेमणूक जाहली. तेव्हां राज्य कमाईचे कामीं फार उपयोग झाला. सबब, होळकरांकडोन कोराळें तालुक्यांतील मोकासा गांवचा बारा हजार रुपायांचा दिला. तो आमचे एकंदर घराण्याकडे आजवर निर्वेध

चालत आहे. खेरीज यवनांकडोन चंद्रराव मोरे राजा जावली गांवीं राहून सर्व वाई प्रांताचें राज्य करीत होता. त्यांजवर आमचे पूर्वजांनीं स्वारी करून चंद्रराव मोरे याचा अगदीं मोड केला, व पांडवगडचे लढाईत आमचे पूर्वजांनीं फत्ते केली, व किल्ला सर केला. तेव्हां शिवाजी महाराज यांणीं निजामपूर पेठ्यांत निमे पांच गांव इनाम करून दिले, ते आमचेच खुद्द वहिवाटीस आहेत. त्याजबद्दल राज शके ३९ ह्मणजे इसवी सन १७१२ सन सतराशें बारा ह्या सालीं शाहू महाराज यांणीं निरंतर जातसरंजाम ह्मणोन सनद करून दिली, ती आज आमचेपाशीं आहे. तुराणी अहमदशा गिलचा याजबरोबर सदाशिवराव भाऊ व विश्वासराव पेशवे यांची पानपत येथें लढाई झाली. तेव्हां आमचे पूर्वज लढाईत होते. उपयोगास आले आहेत. खेरीज हैदराबादचे नबाब याजबरोबर खरड्याची लढाई झाली व मश्रुल-उल्-मुलूख यास पुण्यास धरून आणलें, तेव्हां आमचे पूर्वज यांणीं लढाईचे कामीं फार उपयोग केला आहे. व शाहू महाराज यांणीं आमचे पूर्वजांस निरंतर आमचे कुळास (गोत्राधिकारी) करून आपले सर्व मराठी कुळांचें स्वामित्व आह्मांस दिलें. तो अधिकार सह्याद्रीचे घाटमाथ्यावरील गांवांत व तळकोंकणांत हल्लीं आह्मांकडे चालत आहे. मराठ्यांचें राज्य उदयास येण्यास शिर्के राजे यांची मोठी मदत झाली, व जो आमचा हिंदु धर्म मुख्य तो जागृत राहिला. ही आमचे पूर्वजांनीं मोठी कामगिरी केली आहे.

शाहू महाराज यांणीं पेशव्यांकडे राज्याधिकार सुपूर्त केल्यावर आह्मी छत्रपतीचे आरद या संबंधानें आमचें कांहीं न्यून पडूं दिलें नाहीं, असें सदरीं लिहिलेंच आहे. पुढें असा प्रकार झाला कीं, आमचे पूर्वज नंबर १२ लक्ष्मणजी राजे हे शरीरानें फार खुजे होते. ते बहिरगड किल्ल्यावर नेहमीं राहत असत. पुढें कोंकणांत त्यांचे कारभारी यांणीं कांहीं बंड केलें, यामुळें पेशवे सरकारांतून फौज ठेवून आमचे बंधु लक्ष्मणजी यांस पुण्यास पकडून नेले, व पाहिलें तों, हे खुजे माणूस बंड करणार नव्हेत. असा विचार ठरवून, सहा ६ हजार रुपयांचा जात सरंजाम अशी सनद सुरसन समान सितैन मया व आलफ ह्मणजे इसवी सन १७६७ ह्या वर्षीं माधवराव बल्लाळ पेशवे यांणीं निरंतर चालेल ह्मणोन देऊन, त्याचे भरतीस गांव व खजिन्यांतून नक्त अशी एकंदर भरती करून दिली. त्यास कितीएक वर्षें लोटल्यावर जरी सर्व कोंकण प्रांताचा मुलूख घेतला, तरी छत्रपतीचे अगदीं जवळचे सोयरेधायरे असल्यामुळें, त्यांजकडोन आमचे कुळांत पुरुष जन्मला कीं, त्याचा बंदोबस्त होत असे. शाहूमहाराजांनंतर जे जे पुरुष सातारचे गादीवर झाले, ते जरी परतंत्र होते, तरी पेशव्यांकडून त्यांस कच्चा खर्च

लाखो रुपये येत असे. ते आमचा सर्व परी सांभाळ करीत होते. पुढें अखेरचे प्रधान बाजीराव रघुनाथ प्रधान यांचें व आनरेबल इष्ट इंडिया कंपनीचें युद्ध पुणें वगैरे ठिकाणीं जाहलें, त्यांत आमची मंडळी लढाईत होती तीः—

१ अमरसिंग राजे कुटरेकर.
१ जगजीवन राजे मळेकर हे बापू गोखले यांजबरोबर लढाईत पडले.
१ आनंदराव राजे शिर्के आळंदेकर.
१ तानाजी राजे शिर्के नंबर १४ आमचे पणजे.
१ चिमणाजी रामाजी राजे शिर्के कुटरेकर.
१ कानोजी सखोजी राजे शिर्के कुटरेकर.
१ अमरसिंग राजे शिर्के सिंदकर.
१ बहिरजी राजे शिर्के नंबर १५ आमचे आजे.
८

येणेंप्रमाणें मंडळी लढाईत होती. कांहींस वार लागले, व कांहीं अजी पडले. अखेर बाजीरावाचा पराभव होऊन बाजीराव काशीप्रांतीं जाऊन राहिले, व सर्व राज्याचा अधिकार आनरेबल कंपनीचे हातीं आला. तेव्हां सातारचे महाराज युद्धांत कंपनीचे हातीं लागले. त्यांचें खानदान बहुत दिवस चालत आलें असें समजून, आनरेबल कंपनीनें त्यांची मंडळी ह्मणजे आह्मी, ह्यांचे शानशोकती-करितां, घेतलेले विस्तीर्ण राज्यापैकीं कांहीं थोडा मुलूख निरंतर तह करून दिला. हा तहनामा प्रथम छत्रपति प्रतापसिंह महाराज यांजबरोबर केला. ते जेव्हां काशीस गेले, तेव्हां पुन्हां तहनामा करून शाहाजी ऊर्फ आप्पासाहेब महाराज यांस गादीवर बसविलें. तेव्हां कोल्हापुराजवळ पन्हाळा व पावनगड येथील गडकरी लोकांनीं सन १८४६ सालीं बंड केलें व लढाई करूं लागले. तेव्हां महाराजतर्फे आमचे आजे बहिरजी राजे नंबर १५ व चिमणाजी राजे व आन-रेबल कंपनीचे तर्फे ग्रॉहाम साहेब असे जाऊन, पन्हाळा किल्ला सर केला, व कर्नल वोव्हान्स साहेब यांस सोडवून आणलें. त्या लढाईत हिक साहेब पडले. व कोल्हापुरच्या राज्याचा बंदोबस्त करून, शिर्के यांची कन्या दिवाणसाहेब यांस कैद करून पुण्यास नेलें. याप्रमाणें कामगिरी मोठ्या शर्तीनें बजाविली. त्याज-बद्दल बहादरीचीं पत्रें आह्मांपाशीं आहेत.

पुढें सन इसवी १८४८ सालीं सातारचे छत्रपति श्रीमंत शाहाजी महा-राज हृक झाले. त्यांणीं दत्तक घेतला असोन आनरेबल कंपनीनें तो नामंजूर करून राज्य खालसा केलें. तेव्हां मात्र आमचा आसांचा निरुपाय झाला. आमचे विस्तीर्ण कुटुंबाचे माणसांचें जें महाराज यांजकडोन चालत होतें, तें

अगदीं बंद जाहलें. तेव्हां कांहीं आरदांस कंपनी सरकारांतून पोलिटिकल पेनशन करून दिली. त्या वेळीं आनरेबल सर वाल्टर फ्रियर साहेब बहादुर रेसिडेन्ट होते, व रामसीन साहेबही कामावर होते; व महाराज यांचा मोंगलाई रिसाला होता. त्यांपैकीं कांहीं सरदार व कांहीं मानकरी यांस साहेब यांणीं नोकऱ्या दिलया, व ज्या लोकांनीं नोकऱ्या कबूल केलया, तो रिसाला "सदर्न मराठा हॉर्स" असें नांव ठेऊन, कर्नाटकांत कलादगी ह्मणजे घटप्रभा नदीचे कांठीं मोठा गांव आहे, तेथें छावणी सन १८५० सालीं केली. पुढें सन १८५७ चे सालीं कंपनी सरकारची फौज जेव्हां हिंदुस्थानांत बाजी जहाली, त्या वेळेस तेही बंड करूं लागले. तेव्हां आह्मां शिर्के राजांपैकीं रामचंद्र गुणाजी राजे शिर्के मळेकर हे हलगली व नरगुंद व सुरापुर बेरडाचें येथें, हणमंत सांवत यांच्याशीं लढाया झाल्या. त्यांत मशारनिल्हे यांस जखमा लागल्या. अखेर त्यांणीं आपली सरशी करून सुरापुरचें राज्य खालसात करण्याचें कामीं मदत केली, व सर्व बंडें दक्षण प्रांतींचीं मोडलीं. पुढें धाकटे उदेपुरावर तात्या टोपे यांजबरावर सामना झाला. त्यांत बंडवाल्यांचा अगदीं पराभव करून हाकून लाविलें. पुढें तरीच्या मार्गानें अबु शहरचे लढाईवर गेले होते. तेथेंही फत्तेच केली. सबब सन १८५७ सालीं सरकारांतून त्यांस एक बिल्ला व पदवी मिळाली. इतकेंच करून राहिले नाहींत, तर सन १८७८, ७९, ८० सालीं काबुल कंदाहारची लढाई जहाली. त्यांत महाराणी सरकाराकडोन फौज गेली. त्यांत मशारनिल्हे रामचंद्रजी राजे शिर्के रिसालदार अशा हुद्यांत गेले असोन, पुना हॉर्सचे रिसाल्यांत सरदार होते. पुढें कंदाहारचे लढाईत तारीख १ सप्टेंबर सन १८८० रोजीं कोतल मोर्च्यावर पन्नास स्वारानिशीं जाऊन उंट भरलेले धरून आणले. अशीं मोठीं जिवावरचीं कामें यांणीं केलीं. त्याजबद्दल सन १८६३ सालीं मशारनिल्हेकडे चांद आला आहे. एकूण दोन बिल्ले त्यांस मिळाले आहेत.

१. हल्लीं सरकार जर आमचे घराण्यांतील इसमास मोठ्या हुद्याच्या नोकऱ्या देऊन लढाईवर पाठवितील, तर सहजीं सरकारचे ध्यानांत येईल कीं, हे मोठे शूर आहेत.

२. पुढें आनरेबल इष्ट इंडिया कंपनीनें आमचे सहा हजार रुपयांचे सरंजाम आमच्याकडे चालत असतां, दरम्यान आमचे पणजे तानाजी राजे हक जहाले, तेव्हां सर्व उत्पन्नाची जप्ती केली. पुढें ती मोकळी करून ठराव केला तो असा कीं, सहा हजार रुपयांपैकीं तुह्मीं सन १८६७।६८ चे पुढें चार हजार रुपये

मिळविले सबब दिडपुस्त चालेल. बाकी दोन हजार रुपयांचा सरंजाम वंशपरंपरा चालेल. असा ठराव नंबर ३३९९ तारीख २१ नवेंबर सन १८६२ चा केला.

३. आमचें .नांव सरदारपटांत तिसरे क्लासांत आहे. व आमचे आजे बहिरजी राजे शिर्के यांचें होतें. व पणजे तानाजी राजे शिर्के यांचेंही होतें.

४. आमचें नांव सरदारपटांत आज तीन पिढ्या चालत आहे. व वंशपरंपरा चालत आहे.

५. आह्मांस मानपान पुण्याचे एजन्ट साहेब यांजकडोन हमेशा मिळतात. खेरीज आह्मांस 'राजे' अशी पदवी आहे. राजे असा किताब आमचा मुळचाच आहे. खेरीज 'सेनासरखेल वजारतमाब' असा किताब छत्रपति शहाजी महाराज ऊर्फ आप्पासाहेब महाराज यांणीं वंशपरंपरा दिला आहे, व पूर्वींचा आमचा देशमुख सुभा दाभोळ व सरदेशमुख मामले रायरी असा किताब शाहू महाराज यांणीं दिलेला आहे; व दिवाणी फौजदारीही आमची आमचेकडे होती. परंतु सातारचें राज्य खालसा झाल्यावर तो अधिकार काढून घेतला. गोताचा अधिकार आमचा आमच्याकडे आहे."

---

## श्रीशिरकाई प्रसन्न.

यादी वंशावळ जबानी गणोजी बिन भिकाजी राजे शिर्के मळेकर खोत व इनामदार मजरे कोंडमळा तर्फे सावर्डें तालुके अंजनवेल सलासिन मयातैन व अलफ-शके १७५४ नंदन नाम संवत्सरे माहे मार्गशीर्ष वा। १३ मूळ पुरुषाची. स्मरणार्थ आजपावेतों प्रती घेणार रामचंद्र गणोजी राजे शिर्के मळेकर श्रावण शु॥ २ शके १७८८.

गणोजी राजे याचा पुत्र तानाजी राजे. याचा पुत्र कृष्णाजी राजे. त्याचा पुत्र तानाजी राजे. त्याचा पुत्र वाघोजी राजे. यास पुत्र २ दोन.

वडील तानाजी राजे शिर्के कुटरेकर ता। सावर्डें यांस पुत्र कानोजी राजे.

कानोजी यांस पुत्र तीन ३

१ वडील रामोजी राजे
१ दुसरे विठोजी राजे
१ दौलतराव राजे

३

पिराजीराजे शिर्के कोंड मळेकर तर्फे सावर्डें यांस पुत्र पांच ५

१ गणोजी राजे शिर्के
१ देवजी राजे शिर्के
१ बाबाजी राजे शिर्के
१ वाघोजी राजे शिर्के
१ संभाजी राजे शिर्के

५

वडील रामोजी राजे यांस पुत्र ७
१ कानोजी राजे कुटरेकर
१ बहिरजी राजे काजवेकर
१ कुवरजी राजे काजवेकर
१ उदत्तसिंग राजे बेहेलेकर तो चिपळूण
१ बाजी राजे अंतरोलीकर
१ जैसिंग राजे वडुस्तेकर
१ वाघोजी राजे काजवेकर. यांचे नकल होऊं लागले, सबब उदत्तसिंग राजे बेहेलेकर यांणी आपला पुत्र गणपतराव यास देऊन वंशवृद्धि चालती केली.
७

कानोजी राजे यांस अवलाद कुटरेकर यांस पुत्र २
१ लक्ष्मणजी राजे
१ रामोजी राजे. यांचे नकल जाहले
२

लक्ष्मणजी राजे यांस पुत्र ३
१ सखोजी राजे
१ रामोजी राजे
१ अमरसिंग राजे
३

वडील सखोजी राजे यांस पुत्र २
१ तानाजी राजे
१ कानोजी राजे
२

तानाजी राजे यांस पुत्र ३
१ बहिरजी राजे
१ उदत्तसिंग ऊर्फ दादा

वडील देवजी राजे यांस पुत्र २
१ भिकाजी राजे शिर्के
१ पिलाजी राजे
२

भिकाजी राजे यांस पुत्र चार
१ देवजी राजे
१ खंडेराव राजे
१ बहिरजी राजे
१ गणोजी राजे
४

देवजी राजे यांस पुत्र ४
१ माहालोजी राजे
१ जगजीवन राजे
१ रखमाजी राजे
१ गुणाजी राजे
४

वडील माहालोजी यांस पुत्र २
१ खंडेराव राजे
१ यशवंतराव राजे ऊर्फ आनंदराव
२

जगजीवन राजे यांस पुत्र एक वाघोजी राजे तात्या
रखमाजी राजे यांस पुत्र एक भिकाजी राजे
गुणाजी राजे यांस पुत्र ३
१ बाळकृष्ण राजे
१ रामचंद्र राजे
१ गुजाबा राजे यांचे नकल
३

खंडेराव यांस पुत्र एक पिलाजी राजे.
पिलाजी राजे यांस पुत्र २

१ बाघोजी राजे

३

वडील बहिरजी राजे यांस पुत्र ५

१ रामोजी राजे ऊर्फ राज्याबा

१ लक्ष्मणजी ऊर्फ भाऊ राजे

१ बळवंतराव राजे

१ जिज्याजी राजे

१ मनाजी राजे

५

कानोजी राजे यांस पुत्र ४

१ सखाजी राजे ऊर्फ दाजीबा

१ नानाजी राजे

१ जिज्याजी राजे

१ बोवा राजे

४

रामोजी राजे यांस पुत्र ३

१ विठोजी राजे

१ चिमणाजी राजे

१ हरजी राजे

३

विठोजी राजे यांस पुत्र २

१ साहेबजी राजे ऊर्फ दादासाहेब

१ कृष्णाजी ऊर्फ भाऊसाहेब

२

चिमणाजी राजे यांस पुत्र नाहीं सबब हरजीचा पुत्र तिसरा येशवंतजी राजे ऊर्फ नाना यांस दत्तक घेतलें. हरजी राजे यांस पुत्र ५ पैकीं चिमणाजीस १ देऊन बाकी.

१ दशरथजी राजे

१ गोपाळजी राजे

१ कीरतसिंग यांस पुत्र ३

१ रामराजे यांस पुत्र १

२

तिसरे बहिरजी राजे शिर्के यांस पुत्र एक कृष्णाजी राजे ऊर्फ बाबासाहेब.

गुणाजी राजे यांस पुत्र ३

१ जैसिंग ऊर्फ चिमासाहेब. यांची नकल

१ बहिरजी राजे ऊर्फ आबा

१ मानसिंग राजे शिर्के

पिलाजी राजेबद्दल देवजी राजे यांस पुत्र एक होता. तो लहानपणींच मृत्यु पावला. पुढें पिलाजी-राजेही मृत्यु पावले. त्यांचें क्रियाकर्मांतर देवजी राजे यांणीं बहिरजी राजे आपले तिसरे भाऊ यांजकडोन करविलें. सबब, बहिरजी राजे यांणेंही माहितीनें वाद सांगोन पिलाजी राजे शिर्के यांची क्रिया बाप असतां केली. तेव्हां पिलाजीचाच पुत्र जाहलों ह्मणोन सातार मुकामीं ही माहिती करून तूर्त त्यांच्या हिशाला देश सरासरी खाते आहेत परंतु निरवेद जाहलें नाहीं. ऐशी-यास आपले वंशांत जो पराक्रमी होईल त्यांणें चौथा हिस्सा बहिरजी राजे यांचे पुत्रास हिस्सेरसीनें देऊन, बाकी विभागाप्रमाणें भिकाजी राजे यांचे अवलादीनें घ्यावा. असें दखलबाज लिहून ठेविलें आहे. हें गणोजी राजे यांनीं सांगितल्यावरून लिहिलें आहे.

१ बापाजी मयत
१ मनाजी राजे
४

अमरसिंग राजे यांस पुत्र ४
१ जैसिंग राजे ऊर्फ रावसाहेब
१ प्रतापजी राजे ऊर्फ आबासाहेब
१ लक्ष्मणजी राजे ऊर्फ आप्पासाहेब
१ बळवंतराव राजे
४

याची अवलाद. प्रतापजीस पुत्र नाहीं ह्मणोन दत्तक नातु जयसिंग राजे रावसाहेब यांचा पुत्र तो ग्वालेरीस दिला. लक्ष्मणजी यांस पुत्र मनाजी राजे हे नरसोबाचे वाडीस मयत जाहले. त्यांस पुत्र १. भाऊ बळवंतराव यांस पुत्र नाहीं.

बहिरजी राजे काजवेकर यांची अवलादः—यांस पुत्र १. जगजीवन राजे. जगजीवन राजे यांस पुत्र ५
१ बहिरजी राजे
१ कुवरजी राजे
१ नारायणजी राजे
१ मनाजी राजे
१ रतनजी राजे
५

नारायणजी राजे यांस पुत्र १ जगजीवन. जगजीवन राजे यांस पुत्र ३
१ बहिरजी राजे
१ जिज्याजी राजे
१ रतनजी राजे
३

तिसरे बहिरजी राजे याचे नकल जाहले. संतान नाहीं. नागपुरास आहेत. त्यांच्या वंशजाचें नांव वाघोजी राजे. यांस बहिरजी राजे. बहिरजीस पुत्र गणोजी राजे. यांस पुत्र संभाजी राजे. यांस पुत्र गणोजी राजे. यांस पुत्र चार ४

१ बहिरजी राजे
१ परवतराव राजे
१ तिसरे आनंदराव राजे
१ .... .... ....
४

संभाजी राजे यांस पुत्रसंतान नाहीं हे डेरवणकर, असोन, मळेकर यांचे घराण्यांतील पुत्र न घेतां तळसरकाराचा घेतला. सबब कोंड मळेकर वडील. खंडेराव यास पुत्र४

१ बळवंतराव राजे
१ चिमणाजी राजे
१ .... .... .... ऊर्फ आबा
१ .... .... .... ऊर्फ दादा
४

वाघोजी राजे यांस पुत्र एक. नांव माहित नाहीं.

भिकाजी राजे यांस पुत्र एक १ जिज्याजी राजे

बाळकृष्ण राजे यांस पुत्र १ बळवंतसिंग राजे. पिलाजी खंडेराव राजे यांस पुत्र २

कुवरजी राजे यास पुत्र १ त्यांचे भाऊ त्यांचे नकल जाहले.

चौथे मनाजी राजे यांस पुत्र १ गणपतराव राजे शिर्के यांस अवलाद होणें असे.

१ अमरसिंग राजे
१ राम राजे
२

बहिरजीस पुत्र कृष्णाजी ऊर्फ बाबासाहेब. यांस पुत्र २
१ विठोजी राजे
१ सखोजी राजे
२

कुवरजी रामोजी राजे यांचे नकल जहाले. हे काजवेकर ७ सातवे. वाघोजी राजे काजवेकर यांस पुत्र नाहीं. सबब उदत्तसिंग राजे बेहलेकर यांनीं आपला पुत्र गणपतराव दिला असे. त्यांस येशवंतराव बि॥ माहालोजी. यांस पुत्र वाघोजी राजे. यांस पुत्र नाहीं.

उदत्तसिंग बेहेलेकर यास पुत्र एक रतनसिंग

रतनसिंग यांस पुत्र २
१ राघोबा राजे
१ नाना राजे
२

वडील राघोबा राजे यास पुत्र ५
१ .... .... ....
१ .... .... ....
१ .... .... ....
१ .... .... ....
१ .... .... ....
५

बाजी रामोजी यांस पुत्र १
आनंदराव राजे शिर्के वडुस्तेकर
यास पुत्र ५
१ .... .... ....

१ .... .... ....
१ .... .... ....
१ .... .... ....
१ .... .... ....
५

जैसिंग रामोजी राजे नकल जाहले

संतति नाहीं

येणेंप्रमाणें सात असामींची अवलाद ठाऊक होती त्याप्रमाणें लिहिली असे.

विठोजी कानोजी राजे दुसरे हे अलदेकर जाहले. पूर्वी कुटरेकर होते यांस पुत्र २.

१ कीरतसिंग राजे.
१ .... .... ....
२

कीरतसिंग राजे यांस पुत्र ३
१ बहिरजी राजे शिर्के
१ .... .... तात्या शिर्के
१ .... .... ....
३

वडील बहिरजी राजे शिर्के यांस पुत्र आनंदराव राजे

.... .... .... तात्या शिर्के यांस पुत्र नांव ठाऊक नाहीं. तिसरे कीरतसिंग राजे दौलतराव रावशिर्के यांस पुत्र ३

१ अमरसिंग राजे
१ रामोजी राजे
१ अनोपसिंग राजे
३

अमरसिंग राजे यांस पुत्र ३
१ गणोजी राजे
१ चिमणाजी राजे
१ बराणजी राजे शिर्के
३

१ जे महाल मामलेदार लोकांकडे कमाविसीनें असतात, त्या महालसंबंधें रोख वसूल पोत्यास आलेला, 'जमा पोता' ह्मणोन, या आवर्ज्यांत तारीखवार कीर्दीवरून जमा धरलेला असतो. असाच वराता दिल्हेल्या रकमेचाही तपशील रवासुदगी सदरांत जमा असतो. त्यास 'परभारें' ह्मणोनही सदराचें नांव ह्मणण्याची वहिवाट असे. प्रत्येक महालसंबंधें सनदा व ताकीदपत्रें कीर्दीत बार असतात, त्याचाच उतारा या बेहेडा खतावणीस 'दफाते' सदराखालीं अनुक्रमें तारीखवार बार होत असतो. एखादे तारखेची कीर्द हरवली असतां या बारनिसीचाही उपयोग पडतो.

१ जे महाल सरंजामास दिल्हेले असतात, त्या प्रत्येक महालाचा सरंजामदार मनुष्य वेगळाला असल्यास, प्रत्येक महालचा आवर्जा निरनिराळा सरंजाम महाल अमूक, निशाणी अमूक, असें लिहून, त्यांत सरंजामदार यांजकडून एकसाली पट्टी व कर्जपट्टी वगैरे हरएक कारणानें नजर वगैरे सुद्धां घेणें ठरलेला पैसा रोख आलेला 'जमा पोता' ह्मणून जमा असतो; व वराता दिल्हेल्या 'परभारें' ह्मणोन सदराखालीं दाखल असतात. सरंजामी महालांत इनाम वगैरे हरएक प्रकरणाबद्दल सनदापत्रें हुजूरचीं हरएक सालांत जालेलीं, तारीखवार, अनुक्रमानें, कीर्दीत बार असल्याप्रमाणें, या आवर्ज्यांत बार करीत असत.

१ एखादे सरंजामदाराकडे एकाहून अधिक महाल सरंजामास असल्यास, त्या सर्व महालांबद्दल त्या सरंजामदार मनुष्याचेच नांवचा आवर्जा दरएक सालचा होत होता. त्यांत वर लिहिल्याप्रमाणें पैसा जमा आल्याबद्दल सनदापत्रें वगैरे जालेलीं कीर्दीप्रमाणें या आवर्ज्यांत अनुक्रमानें तारीखवार बार करीत असत.

याप्रमाणें 'बेहेडा खतावणी' ह्मणोन हिशेबांत लिहिण्याचा प्रकार असतो.

१ एखादे प्रसंगीं स्वारीस एखादे सरदारास किंवा दुसरे भरंवशाचे माणसास पाठविण्याचें जाल्यास, त्याबराबर प्रसंगानरूप सनदापत्रें कौल देण्यास मुतालिकीचा शिक्का त्या मनुष्यास देत असत; व त्याचे स्वारीबराबर हुजूरचे दरकदार, फडणीस व मुजूमदार देत असत. त्यांच्या विद्यमानच्या कीर्दीही वर लिहिलेल्या पद्धतीप्रमाणें होत असत. ते स्वारीचें काम आटोपल्यावर शिक्का परत देत असत.

१ 'घडणी' ह्मणोन एक प्रकारचा कागद हुजूर तयार होत असतो, त्याची हकीकतः—

१ जे महाल मामलेदार लोकांकडे कमाविसीनें दिल्हे असतात, त्या महालांबद्दल प्रत्येक सालाबद्दल आवर्जा मोकळे वर्षाचा लिहीत असत. त्यांत हुजूर मखलासी जालेले ताळेबंदाप्रमाणें जमाखर्चाचा तपसील असोन, त्या महाल-

संबंधीं सनदापत्रें हरएक प्रकारचीं कीर्दींत तारीखवार बार जालीं असतात. त्या अनुक्रमानें एकंदर सालांत जालेलीं पत्रें बार होत असतात.

१ सरंजामदार यांजकडे एका मनुष्याकडे एक महालाहून अधिक महाल असल्यास, त्या सरंजामदाराचे नांवचा, अथवा एकच महाल असल्यास त्या महालचा आवर्जा, याप्रमाणें आवर्जे दरएक सालचे होत होते. या आवर्ज्यांस सरंजामजाबत्याप्रमाणें जमा महालची धरून, दुमाले वगैरे जाबत्याप्रमाणें खर्च लिहून, बाकी राहिलेला आकार त्या सरंजामदाराचे नांवें लिहीत असत. याशिवाय त्या महालसंबंधीं सनदापत्रें जालेलीं तारीखवार कीर्दींत जशीं बार असतात, त्या शेजेनें, एकंदर सालांत जालेलीं पत्रें या आवर्ज्यांत बार करण्याची वहिवाट होती. यांत सरंजामदार यांजकडून पहिले एकसाली वगैरे पट्टी आलेलीही जमा असते.

१ याशिवाय देवस्थान, वर्षासन व खैरात व रोजीनदार व धर्मादाय व इनाम व किरकोळ दफाते व जप्त मोकळीक व निवाडपत्रें व वतनपत्रें व उत्साहखर्च व श्रावणमासदक्षणा व हरदासबिदागी वगैरे प्रत्येक कलमाबद्दल एकंदर आवर्जे सालवार निरनिराळे तयार करीत असत. त्यांतही पैसा खर्च पडल्याप्रमाणें महालवार व हुजुराहून दिलेला पैसा तपशीलवार दाखल असतो. व त्या प्रत्येक कलमाबद्दल सनदापत्रें तारीखवार हुजुराचे कीर्दींत बार जालीं असतात. त्याप्रमाणें या आवर्ज्यांतही बार होत असत.

याप्रमाणें 'घडणी' हा कागद खतावणीअन्वयें मोकळे वर्षाचा हुजूर तयार होत होता.

याप्रमाणें हुजूर कागद तयार होत असतात.

१ खालसा महाल मामलेदार लोकांकडे कमाविसीनें दिल्हे, त्या महालांबद्दल हिशेब कसकसे होत असतात, याचा तपसीलः—

१ प्रथम कलमांत सांगितल्या वेळेस हुजुराहून त्या महालाबद्दल 'आजमास' अथवा 'नेमणूक बेहेडा' मामलेदार यांस हुजुरचे मखलासीसुद्धां शिक्क्यानिसीं देत असतात. त्या कागदांत प्रथम एकंदर त्या महालचा आकार, पूर्वीं ज्या सालीं जाजती आकार जालेला असतो त्या सालचे आकाराप्रमाणें करून, आकार किती, व यापैकीं दुमाले गांव व जमिनी वगैरे किती, कोणाकडे चालावयाच्या, याचा आकार वजा जातां, बाकी निवळ ऐनजमेचा आकार व याशिवाय बलुतें, मोहतर्फा, राबता व जकात वगैरे शिवाय जमासुद्धां एकंदर आकार जमा धरून, यांतून महालमजकूरबद्दल मुशाहिरा, मामलेदार व दरकदार व

कारकून व शिबंदीचा खर्च, असा एकंदरबद्दल मुकामचा आकार व बद्दल-मुशाहिरा, देवस्थान, धर्मादाय व रोजीनदार व खैरात वगैरे खर्च सरकारमंजुरीनें चालवयाचा तो, असा एकंदर वजा करून, बाकी राहिलेले बेरजेपैकीं निवळ रसद सरकारास किती यावी, व व्याज, हुंडणावळ व रसदेचा बट्टा वगैरे मामलेदार यांस मजुरा द्यावयाचा किती, याचा तपशील अखेरीस केलेला असतो. हा कागद हुजुराहून मखलासी करून मामलेदारास देतात.

१ नंतर मामलेदार यांणीं आजमासाचे धोरणानें साधेल तशी जमा करून, खर्च जो होईल तो तपशीलवार एकंदर कच्चे वहिवाटीचा हिशेब अखेर सालीं तयार करून, हुजूर पेशवे यांचे फडणीसीदप्तरांत द्यावा.

१ मामलेदार यांजकडून हिशेब हुजूर आल्यावर, हुजूरचे फडणीसीदप्तरांत त्या हिशेबाची तपासणी करून, नंतर हुजूर दसरीं एक ताळेबद तयार होत होता. त्यांत जमेचा तपशील व यांतून दुमाला गांव वगैरे आजमासांत लिहिलेले वजा करून, बाकी निवळ जमा किती आली, यापैकीं खर्च किती, याचा तीन प्रकारचा तपशील असे.

१ आजमासांत न मिळे खर्चापैकीं जो खर्च होतो, त्यास 'सनदी' असें सदर घालून, त्यांत बद्दल मुशाहिरा वगैरे सदर घडणीअन्वयें खर्च वजा करतात.

१ आजमासांत खर्चाची नेमणूक नाहीं, परंतु मागाहून हुकमानें जालेला खर्च, किंवा योग्य कारणानें खर्च जाला असे असल्यास तो खर्च, सरकारमजुरा देत होते. त्या खर्चास मुख्य सदर 'मखलासी होणें' असें लिहून, पोटीं तपसीलवार लिहीत होते.

१ योग्य कारणाशिवाय बिगर हुकुमानें मामलेदार यांणीं खर्च केला असेल, तो 'गैरसनदी' असें सदर घालून, त्या सदरांत तो खर्च लिहीत असत.

येणेंप्रमाणें तीन सदरें ज्या ताळेबंदांत असतात, तो हुजूरचा ताळेबंद असें समजावें. एकंदर खर्च वजा करून, बाकी येणें राहिली असेल त्यास दोन सदरें असतात. पैकीं एक सदर 'मुलकी बाकी' ह्मणजे गांवगन्नाकडून येण्याची व दुसरें सदर 'मुलकी बाकी निसबतवार' लोकांकडून येण्याची. अशी एकंदर बाकी येणें त्या बेरजेवर गैरसनदी मंजूर केलेला खर्च मामलेदार यांजकडून भरून घ्यावयाचा, ती बेरीज धरून, एकंदर बाकी येणें काढतात. एखादे महालांत मामलेदार यांचें फाजील देणें असें निघत असेल, तेथें त्या फाजीलांत गैरसनदी खर्च वजा करून, बाकी फाजील देणें काढतात. या ताळेबंदावर मखलासी

शेरे फडणिसीकडून होऊन, करार खुद्द पेशवे सरकारचे हातचे होत होते. याप्रमाणें प्रत्येक सालचे हिशेब येऊन हुजूरचे ताळेबंद होत असत.

१ मामलेदार यांजकडून हिशेब येतात, त्याजबराबर एकंदर देवस्थान, वर्षासन वगैरे खर्चाबद्दल 'कबजें' ह्मणजे पावत्या, व मामलेदार यांस हुजूरचीं सनदापत्रें प्रत्येक सालांत किती गेलीं, त्यांपैकीं अमलांत किती आलीं, व किती अमलांत येणें राहिलीं, याचा तपशीलवार दफाते झाडाही हुजूर येण्याची वहिवाट होती. येणेंप्रमाणें महालचे हिशेब तयार होत असत.

१ याशिवाय पूर्वीं लिहिण्याची परिभाषा हल्लीं कांहीं समजुतीस येत नाहीं अशा विषयींचा खुलासाः—

१ 'तैनात' ह्मणजे सालिना किती नेमणूक द्यावयाची त्याची बेरीज. यांस 'तैनात सालिना' असें ह्मणतात. तैनातही सरंजामी सरदार शिलेदार यासच बहुत करून असते.

१ सदरहू तैनातीचे पोटभाग आहेत तेः—

१ 'नालबंदी' ह्मणजे तैनातपैकीं कांहीं भाग आगाऊ खर्चास देणें त्यास ह्मणतात. ती नालबंदी जात व फौज सरंजामासही लागू आहे.

१ 'रोजमुरा' ह्मणजे वर्षांतून कांहीं वेळानें हप्तेहप्त्यानें पैसा द्यावयाचा, त्यास रोजमुरा असें ह्मणतात. दीड महिन्यांनीं किंवा दोन महिन्यांनीं एक वेळ असा रोजमुरा तैनातपैकीं देत असत.

१ 'समजावीस' ह्मणजे रोजमुरा व नालबंदी वजा जाऊन, बाकी देणें राहिले रकमेचा हिशेब करून, समजूत करीत असत. त्यास समजावीस असें ह्मणत.

१ तैनातीशिवाय कारणपरत्वें श्राद्धपक्षास किंवा लग्नकार्यास वगैरे सरकारां-तून बक्षीस देत असत. त्यांस 'अर्जबाब' असें ह्मणत असत.

१ रोजमुरा व नालबंदी जी देत असत, त्यांत कांहीं रोख व कांहीं कापड आंख देऊन भरती करीत असत. कापड याचा हिशेब दर रुपयास २॥ आंख किंवा तीन चार अशी मोडणी करून रुपये धरीत असत.

१ 'इजाफत जमा' ह्मणजे दुसरे महालांतून वगैरे पैसा खर्चाकरितां आणून जमा करितात, त्यास ह्मणतात.

१ 'मुजाफतखर्च' ह्मणजे या महालांतून दुसरे महालचे मामलेदार वगैरे यांस पैसा देणें, तो 'मुजाफतखर्च' असें ह्मणण्याची भाषा आहे.

१ 'बालपरवर्षी' ह्मणजे लढाईत एखादा मनुष्य पडतो, त्याचे मुलाचे संरक्षणास खर्च, कांहीं रोख अथवा जमीन वगैरे देत असत, त्यास ह्मणत होते.

१ 'रांडरोटी' ह्मणजे लढाईत पडलेल्या मनुष्याचे बायकोस निर्वाहाकरितां जमीन अथवा पैसा देत असत, त्यास ह्मणत असत.

१ 'स्वारी या सरकारकून' ह्मणोन खतावणी व घडणी वगैरेंत सदर आहे. त्या सदरांत अष्टप्रधानांचे नांवें ज्या नेमणुका वगैरे खर्चीं पडत, त्या या सदराखालीं येत होत्या.

१ 'पथके लष्कर' ह्मणजे सरंजामी सरदार व शिलेदार शिपाई वगैरे लोकांची जी नेमणूक, त्यास या सदराखालीं घडणींत खर्च पडत आला आहे.

१ 'सुभे लष्कर' ह्मणजे सेनापति दाभाडे व सरलष्कर गाईकवाड वगैरे मोठे सरदार, 'पथके लष्कर' या सदरापेक्षां जास्ती हुद्याचे, या सदरांत दाखल करीत होते.

१ 'दरुणी महाल' ह्मणजे महाराज सातारकर यांचे राण्यांस, वस्त्रें, अलंकार, अथवा गांवजमिनी, मोकासे अथवा रोख पैसा पावत होता, तो या सदराखालीं खर्च लिहिण्याची चाल होती.

१ 'परदरबार' ह्मणोन आवर्जे घडणींत आहेत. परदरबार ह्मणजे पेशवे यांचे बरोबरीचे राजांस किंवा त्यांचे वकिलांस वगैरे, पेशवे यांजकडून ज्या ज्या नेमणुका किंवा जवाहिर कापड वगैरे पावत होतें, तें या सदराखालीं लिहीत असत.

१ 'तरजुमा' ह्मणजे एकंदर राज्याचा एक हिशेब पेशवे करीत होते, त्यास तरजुमा असें ह्मणत होते. या हिशेबांत सर्व राज्यांतील हरएक प्रकारच्या उत्पन्नाचा व खर्चाचा दाखला असतो. तो फार करून गोळा बेरजेनें असतो. कच्चा तपशील नसतो.

१ पेशवे सरकारचे हुजुरचे कामगार यांजकडे काय काय कामें होतीं, याची हकीकतः—

१ शिवराम कृष्ण खाजगीवाले यांचे घराण्याकडे काम, पेशवे यांच्या सर्व खाजगी खर्चाचा हिशेब ठेवणें व खाजगी खर्चाची सर्व व्यवस्था पाहणें, हीं कामें होतीं.

१ आंबाजी त्रिंबक पुरंदरे व त्यांचे पुत्र महादाजी आंबाजी व निलकंठराव महादेव व महादेव निलकंठ यांजकडे दिवाणगिरी व साताऱ्याची मुतालिकी होती व पोतनिसी होती.

१ फडणीशीचें काम बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडणीस यांचे आजे जनार्दन बल्लाळ यांजपासून होतें. सवाई माधवराव यांचे कारकीर्दीपासून सर्व राज्याचा कारभार नाना फडणीस पहात होते.

१ मुजुमदार नीलकंठ नारायण यांचे घराण्याकडे अखेरपर्यंत मुजुमाचें काम होतें.

१ हशम लोकांचें काम शंकराजी केशव फडके यांजकडे होतें.

१ चिटणिशी सातारकर महाराज यांजकडून जिवाजी खंडेराव वगैरे यांचे घराण्याकडे होती.

१ तोफखान्याचें काम पानसे यांचे घराण्यांत माधवराव शिवदेव यांजपासून होतें. बाजीराव अखेरपर्यंत.

१ फडणिशीचें काम बाळाजी जनार्दन यांचे आज्यापासून होतें. त्यांचे घराण्यांत दोन भाग होतेः—

१ मुकामचे फडणिसीचें काम बाळाजी जनार्दन यांचे बापापासून त्यांजकडे होतें.

१ स्वारी सरकारची मुलखांत जाऊं लागली, ह्मणजे स्वारीबराबरचें काम बाबूराव राम व त्यांचे पुत्र मोरो बाबूराव यांजकडे होतें. त्यांस तैनात पालखी वगैरे नाना फडणीस यांच्याप्रमाणें होती. नाना फडणीस यांस कैद केल्यावर अजमासें सन १७९९ इसवी सालीं ते मयत जाले. नंतर कांहीं दिवस—दोन तीन वर्षे—बाळोजी कुंजर यांणीं कारभार पाहिला. यांस मुतालिकी शिक्का बाजीरावसाहेब यांणीं दिल्हा होता.

१ पुणें सुभ्याचें काम नारो आपाजी व त्यांचे पुत्र रामचंद्र नारायण यांजकडे बाजीरावसाहेब यांचे अमलापर्यंत होतें.



## १३. शिरक्यांचा कारभारी रामाजीराऊ ढमाले ह्याची हकीकत.*



श्री.

"कारकीर्द शिरके राजे मुकासे होते. ते वेळस देशमुखी शिरके राजे यांची, पौडखोरें गांव चाळीस संमत जुन्नर. बाजी शिरके पौडखोऱ्याची देशमुखी करीत होते. मग, त्यांजवरी मोंगलाच्या पातशाहाच्या हल्ला जाल्या कीं, शिरक्यास दूर करून टाकावें. त्यासी शिरके ह्यांचा कारभारी रामाजीराऊ ढमाला होता. चाकर होता. मग जे वख्तीं पातशाहा यांची हल्ला जाली, ते वख्तीं शिरके यांसीं बदलोन, बेइमानी करून, पातशाहा यांस भेटले. भेटोन देशमुखीचा डौल

* हा करिणा—ह्मणजे घराण्याचा जुना वृत्तांत—पौडखोऱ्यांतील एका गृहस्थाच्या जुन्या दप्तरांत सांपडला. तो 'यशवंत' ह्यांनीं आमचेकडे पाठविला आहे. ह्यामध्यें भोरकसचे देशमुख ढमाले ह्यांच्या पूर्वजांची माहिती आहे. शिरके हे प्राचीन मराठे सरदार उदयास आले, त्यांच्या पदरीं ढमाले हेही प्रसिद्धीस आले. त्यांची माहिती अप्रसिद्ध असल्यामुळें येथें दिली आहे.

पातशाहापाशीं घातला. मग पातशाहा यांनीं कौल दिधला कीं, जो कोणी पुंड असेल तो कापून काहाडावा, आणि जमीदार येऊन भेटेल त्यास कौल द्यावा. ऐसे कागद करून रामाजीराऊ ढमाला घेऊन आले. त्यास जमीदार भेटावयासी आले. बाजी शिरके देशमुख पौडखोरें गांव ४० चाळीस संमत जुन्नर भेटीस आले. त्यासी शिरपाऊ दिधला व पातशाहा यांचे कौलही दिधले. मग बाजी शिरके यांनीं कित्येक रोजीं देशमुखीचा अंमल केला. मग रामाजीराऊ ढमाले यांनीं पोटांत अवक्रिया धरून, मेजवानी करावयासी ह्मणऊन, बाजी शिरके देशमुख यांस नेऊन, वडुस्ते या गांवांत मेहमानीबद्दल (लोक) जमा करून, विश्वासघात करून, बाजी शिरके समेत माणूस १२५ सवाशें, देखील बाइका गरोदर होत्या त्या देखील मारिल्या. त्यांपैकीं बाजी शिरके यांची सून माहेरास अगोदर चंद्रराऊच्या जावलीस गेली होती. ते गरोदर होती. ते ईश्वरइच्छेनें तिजला पुत्र जाहला. त्याचें नांव बाजीराऊ शिरके. तो चंद्ररायाचे घरीं वाढला. उमेदवार जाला. वतनाची शुद्ध धरली. मग मामांनीं वतन सांगितलें कीं, तुमच्या वडिलांचें वतन पौडखोरें गांव चाळीस संमत जुन्नर येथील देशमुखी तुमची आहे, व पाटीलकीही ४० चाळीस गांवची तुमची, ऐसें वतन सबळ आहे. त्यासी तुमच्या वडिलांपासीं चाकर ढमाले होते. त्यांनीं मारून सफा केलें. तुह्मी एक जीव मात्र वांचले आहां. ऐसें सांगोन मग त्याचें नांवही बाजीराव शिरके होते. पडवळ ह्मणूं लागले. मग मामा चंद्रराव यांनीं वीस घोडे व माणूस वीस पंचवीस सांगातें देऊन, बेदरास पातशाहापासीं पाठविलें. तेथें जाऊन बारा वर्षें दरबार पातशाहा याचा रोजबरोज पोशाख करून, झाडूं करूं लागले. तेथें मराठा उमराऊ मालोजी भोंसले होते. त्यांचे हवेलीपाशीं डेरा देऊन राहिले. ऐशी बारा वर्षें सेवा केली. तों एक रोजीं पातशाहा यांच्या बीबी यांनीं महालावरून देखिलें कीं, रोजबरोज दरबार बहुत दिवस झाडितो, हा कांहीं आपला चाकर नव्हे. कोणी जमीदार वतनदार आहे. ऐसें आपल्या मनांत खास करून, रात्रसमई पातशाहा यांस मजकूर जाहीर केला, कीं ऐसा जमीदार कित्येक रोज दरबार झाडतो, आणि तुह्मीं कोणीही अगर कारभारी यांनीं खबर घेतली नाहीं. ह्मणून बहुत कांहीं पातशाहास सांगितलें. मग दुसरे रोजीं पातशाहा यांनीं हुकूम केला. तमाम चोपदार पाठविले कीं, कोण जमीदार येऊन दरबार झाडूं करितो, त्यासी अदालतेसी आणून उभें करणें. ऐसी ताकीद केली. मग सकाळीं बाजीराव पडवळ जाऊन, अदालतेसीं उभें राहून, पातशाहा यांस कुरनिसी करून, हकीकत जाहीर करून, ईलतमास गुजराणिला कीं,

आपलें वतन देशमुखी व पाटीलकी परगणे पौडखोरें गांव ४० चाळीस संमत जुन्नर येथील आहे. त्यासी आपले कारभारी रामाजीराऊ ढमाले होता. बळकावून बदलोन, साहेबांकडे येऊन, जमीदारास कौल करार घेऊन गेला. गेल्यावरी आपल्या वडिलांस कौल दिघलें. पातशाई कौल जाणून आपला वडील बाजीराव पडवळ भेटले. वतन खाऊं लागले. मग रामाजी ढमाला याणें विश्वासघात करून, मारा करून, समेत बायका १२५ आदमी कापून काढिला. आपली माय माहेरास जावली येथें चंदररायाचे घरीं गेली होती. तेथें आपण वांचलों. ह्मणून कुल हकीकत जाहिर केली. मग पातशाहा मेहरबान जाले. मग रामाजीराऊ ढमाले याजवरी हक फर्माविला कीं, त्याचा भोत करणें ह्मणून. बहुत इतराज जाले. मग बाजीराऊ पडवळ यांनीं खर्च केला. रुपये हजार. ऐसा खर्च केला कीं वादी यांसीं न मारावें व न नागवावें. रामाजीराऊ ढमाले राखिले. दरम्यान एका चाकराचा भोत काढून पातशाहास गुजराणिला. मग पातशाहा खुशाल होऊन पौडखोरें गांव ४० संमत जुन्नर येथील देशमुखी दरोबस्त करून फरमान दिघला, व दोनी गांव सेडाणी व वडुस्ते दोन इनाम गांव लेकराचें लेंकरी करून दिघलें, आणि देशमुखी करार करून दिघली; आणि निशाण, शिरपाऊ, घोडा व पांच कपडे व नगारा देऊन वाटें लाविलें. यांचा खून माफ करून वतनास वाटें लाविलें व सिसाळी, आधवड व जमीदारी जे हक्कलाजिमे दरोबस्त करून दिघले. व मार्गींचा दर बैलीं पैसा करून दिघला, व तिव्हड मण कितेक लाजिमे करून दिघले. ऐसे करून वतनास आले. मग देशमुखी करूं लागले. करितां पांच सात वर्षें जालीं. तों बेदरीचे पातशाहा [वर] मोंगलाची चाली [जाली]. मग रामाजीराऊ ढमाले यांनीं कुडविद्या योजून वाडियांत आड पाहावयास आपला नेले. नेऊन बाजीराव पडवळ व देशमुख यांसी आडांत ढकलून वरी धोंडे घातले. त्यांसी मारून टाकिलें. मग कुल मुलें, माणसें, कबिला परागंदा जालीं. मग देशमुखी ढमाले जोरावारीनें करूं लागले. मग मोकदमीचे गांव २ मौजे सेडाणी व वडुस्ते येथें एक भाऊ पडवळ नांवाचा राहिला. त्यासी तीन पिढीया गुदरल्यावर चौथे पिढीचा जैतजी नाईक पडवळ उरला. तों यांस संतान नाहीं. मग मोकदमीस खावंद कोणी नाहीं. मग भाऊ भिकाजी नाईक पडवळ मौजे शिरकोली प्रांत मुसेखोरें तेथें होता; तेथें जैताजी नाईक जाऊन वर्तमान सांगितलें कीं, "आपणास संतान नाहीं. वतन जातें. तुह्मी भाऊ आपले आहां. तरी आपला पुत्र वतनास खावंद देणें." मग त्याचा पुत्र आणिला. तों त्याचें नांव बाजी नाईक ठेविलें. दोही गांवचे मोकदमीचा खावंद करून ठेविला. पांचां गांवचे मोकदम मेळवून व

## लेखांक ६६.

श्री. ता. १४ आगष्ट इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:-येथील कुशल छ २२ जिल्काद मुकाम देवासें प्रांत जयपूर, स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेषः- स्वामींचें पत्र छ २५ रमजानचें व छ ५ सवालचें आलें तें पावलें. पत्रीं आज्ञा कीं, रामजी पाटिल यांसी येथें लिहिलें आलें कीं, राजश्री पाटिलबावांचें निखालस उत्तर आलें कीं, राजश्री अलीबहादरबाबा यांचें आमचें बनावयाचें नाहीं, त्या पक्षीं याउपरी तिकडे आंगावर खर्च खाऊन राहणें ठीक नाहीं. डंघाईकरांचीं संधानें आलीं आहेत, तरी तिकडे जावें. बुंधेले व झांशीवाले यांसीं पूर्वी लिहिल्यावरून पेशजीं पत्रें पाठविलीं आहेत, तीं पावलींच असतील. तर गोसावी झांशीस ठेऊन डंघाईंत गेलियानें नफा दिसत असल्यास, तिकडे जाऊन कामें असतील तीं करावीं. नाहींतर देशास यावें ह्मणून आज्ञा. ऐसियासी उष्णकाळीं तिकडे गेलियास सोय नाहीं. याजकरितां राजश्री होळकर यांजपाशीं राहोन राजश्री पाटिलबावांकडील संधान करून पाहिलें, परंतु कांहीं घडोन आलें नाहीं. होळकर यांणीं आज तागायत साहा महिने जाले, दरमाहा पन्नास हजार रुपये प्रपंचखर्चास दिल्हे. तितकीयावर कमकसर करून खर्च चालिला. मागील देण्यामुळें थोडें बहुत कर्जही जालें. पांचा साहा महिनीयांचे लोकांचे रोजमरे देणें राहिले आहेत. याजमुळें लोक येऊन बसतात; निकडही करितात. परंतु युक्तिप्रयुक्तीनें सांगोन आजपर्यंत कालक्षेप जाला. श्रावण अखेरपावेतों होळकर यांजपासीं राहावें, ऐसा विचार आहे. परंतु जयपूरकरांनीं रामपुरा ठाणें होळकर यांजकडे दिल्हें, त्याचें काम जालें. याउपरी दरमहाचा ऐवज द्यावयासी वोढ दिल्ही, तरी कूच करून डंघाईंत जावयाचें होईल. आज्ञेप्रमाणें गोसावी झांशीस ठेवावयाचें करितील. त्यासुमारें गेलियावर होईल वर्तमान तें सेवेसीं लेहून पाटवीन. स्वामींची आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करितील. होळकरापाशीं आलियापासून लोकांचें देणें मागणें यांचें कामकाज आमचे हातून घेतात. होळकर यांसी रहस्य राखून त्यांजपासून ऐवज घेऊन वहिवाट जाली. पुढें स्वामींच्या प्रतापेंकरून यथास्थित होईल. सारांश, स्वामींस कर्तव्यार्थ असेल तेणेंप्रमाणें आज्ञा येथें सर्वांस जालियानें तदनुसार वर्तणूक होत जाईल. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना."

---

## लेखांक ६७.

श्री. ता. ३१ आगष्ट इ. स. १७८९.

"सेवेसी सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:- येथील वर्तमान छ ९ जिल्हेज मुकाम श्रीमथुरा, स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेषः- येथील वर्त-

मानाचीं पत्रें वरचेवर सेवेसीं पाठविलीं आहेत, त्यावरून वर्तमान विदित जालें असेल. राजश्री पाटिलबावांनीं सांगोन पाठविलें कीं, फौज स्वारीस कोणाबराबर पाठवितां? त्यावरून राजश्री अलीबहादरबाबा यांनीं उत्तर पाठविलें कीं, राजश्री भिकाजीपंत फडणीस यांसी फौजेबराबर जावयास नेमिलें आहे. हें ऐकोन बोलिले कीं, "भिकाजीपंत यांनीं गोसावी याचा कारभार लांबविला व आपाजीपंत जयपूरचे वकिलींत पडले आहेत. हे उभयतां बराबर फौज पाठविल्यानें स्वारींत तंटे पडतील. याजकरितां सदाशिवपंत यांजबराबर फौज देऊन पाठवावी. सालगुदस्तां पटालीयाचे स्वारीस हे व राणेखानभाई आह्मांकडील होते. ते स्वारी, कजिया न होतां, वहिवाटून आले. वांकडी चाल त्यांची नाहीं. याजकरितां त्यास पाठवावें. ह्मणजे कराराप्रमाणें तूर्त दोन लक्ष व स्वारींत चार लक्ष व रेवाडी प्रांत साडेबारा लक्षांचे आठावीस महाल आहेत, त्याच्या सनदा देतों." ऐसें उत्तर आलें. त्याउपरी विठ्ठलपंत, जदीद कारकून, त्याजबराबर इकडून निरोप गेला कीं, "आह्मी तैसे दिवाणजी. ते स्वारींत असल्यास नालबंदीकरितां लोक आड घालून पैका घेतील. दुसरा पाठविल्यानें त्यांस बोलावयासी उरता आहे कीं, सरदार व कारभारी मथुरेस आहेत, त्यांजपाशीं गेल्यावर ते नालबंदीचा ऐवज देतील. ऐसी तोड त्यांस बोलावयासी आहे. आपली मर्जी सदाशिवपंतांसच पाठवावें हे आहे, तेव्हां नालबंदीकरितां तंटे पडोन नेकीबादी होईल. याचा विचार आह्मांकडे नाहीं." ऐसें जाऊन सांगितल्यावर त्यांजकडील उत्तर आलें कीं, "तुह्मीं सांगोन सरदारांकडून तंटा करविला तर होईल, नाहींतर कांहीं व्हावयाचें नाहीं. तत्रापि, आह्मी समजोन घेऊं." ऐसें बोलिले. सदाशिवपंत यांस पाठविल्यानें त्यांचें व आह्मांकडील सरदारांचें सुरळीत चालेल, कजिये पडणार नाहींत. याजकरितां त्यांसच पाठवावें. ऐसीं परस्परें उत्तरें जालीं. आमचें बोलणें पाटिलबावांसीं, स्वारीस आह्मांसच पाठवावें ऐसें असिलें, तरी स्वामींच्या पायाची शपत असे. आह्मांपासून कांहींएक न घडतां पाटिलबावांच्या आग्रहावरून, अलीबहादर यांच्या मनांत आमचे विषयीं विकल्प घालणार आसमंतांत जे आहेत, ते बहुत घालितात. हें जाणून आह्मीं सर्व सोडून स्नानसंध्या करून होतों. परंतु आमच्या दैवास हें प्राप्त जालें. पाटिलबावांचे मर्जीकरितां अलीबहादरबाबा यांनीं आह्मांस स्वारीस जावें ह्मणाले. तेव्हां आह्मी जात नाहीं ह्मणून साफ सांगितलें. तेव्हां बोलिले कीं, "तुह्मी न गेलां, तर दोन लक्ष रुपये तूर्त येणें ते येत नाहींत. तेव्हां फौजेचें जाणें राहिलें. चार लक्ष रुपये पुढील येणें, व महालाच्या सनदा येणें, त्याही राहिल्या. हा दोष सरकारचा तुमचेवर येईल." त्याचें उत्तर आह्मीं केलें कीं, "दोषाचा

अथवा यशाचा अधिकार आपल्याकडे आहे. आह्मी चाकर माणूस. मजकडे काय आहे?" तेव्हां बोलिले कीं, "आह्मी चाकरीसच पाठवितों, मनापासून तुह्मांस जावयासी सांगतों. याउपरी तुह्मी न गेलां तर श्रीमंतांस लेहून पाठवूं, कीं हे गेले नाहींत, ह्मणून सरकारनुकसानी जाली." ऐसें बोलिल्यावर विचार पाहतां यांनीं याप्रमाणें लेहून पाठविल्यानें स्वामी दोष मजवर ठेवितील. ऐसें जाणून, कबूल करून, छ ७ जिल्हेजीं पहांटेस निघोन डेरियास दाखल जालों. लोकांची समजुती पडल्यावर दो चौ रोजांनीं येथोन कूच करून जयपूर प्रांतांत जाऊं. स्वामींच्या प्रतापें सर्व होणें तें होईल. परंतु बाह्यात्कारें आह्मांस जावयास सांगितलें, आणि अंतर्यामींचे भाव दुसरे आहेत कीं, आह्मीं फडणीसास नेमिलें असतां पाटिलबावा यांचा आग्रह धरून पाठवा ह्मणाले, तेव्हा यांचें सूत्र असेल. हे आंदेशे मनांत आणून स्वामींस आर्जी पत्रें खासे व भिकाजीपंत व आप्पाजीपंत एकत्र बसोन, आह्मांवर दोषारोप काय ठेऊन लिहिलीं आहेत, हें समजलें नाहीं. याजकरितां विनंतिपत्र सेवेसीं लिहिलें आहे. पाटिलबावांनीं आमचे विषयीं आग्रह धरून आह्मांस द्वेषांत घातलें. आह्मीं आजीपर्यंत सेवा केली, परंतु कोठेंही द्वेष संपादिला नाहीं, आणि लोभही धरिला नाहीं. सर्व सोडून सरळभावें असतां हें दैवास आले! निरोपाय जाणून स्वारीस गेलों, परंतु लोक स्वारींत तंटे करतील ऐसा रंग निश्चयात्मक दिसोन आला. याजकरितां स्वामींस विज्ञाप्ति लिहिली आहे. तर सर्व सरदारांस व पागेयांसी नांवनिशीवार पृथक् पृथक् पत्रें, निंबाळकर, व बारवकर व शिदोजी पलांडे, वगैरे यांस पाठवावीं कीं, तुह्मीं नालबंदीकरितां सदाशिवपंत यांसीं तंटा न करणें. मथुरेस गेलीयावर, अलीबहादर हे एकत्र जालियावर, महालाच्या ऐवजासारखे देणें तें देतील. तुह्मीं स्वारींत सदाशिवपंत यांसीं मागणें न करणें. रोजमरे सोईनें देतील, ते घेत जाऊन सरकारचाकरी करणें ह्मणून, व भिकाजीपंत यांस पत्र कीं, तुह्मीं तेथें असतां सदाशिवपंत यांसीं वांकडें पडों दिल्हें हें ठीक नाहीं. अलीबहादर यांसीं बोलोन सर्वांनीं एके विचारें असावें. मखलासी करणें ते सदाशिवपंतांच्या अनुमतें करीत जावी. याच अन्वयें आपाजीपंत यांसीं पत्र. येणेंप्रमाणें अवघीं पत्रें चिरंजीव रामराव यांजपासीं द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. ह्मणजे चिरंजीव मुजरत जोडीममागमें पत्रें आह्मांकडे सडे स्वारींत पाठवील. जालें वर्तमान सायंत सेवेसीं लिहिलें आहे. यामध्यें सेवकापासून अंतर पडलें असल्यास स्वामींनीं आज्ञापत्र पाठवावें. त्याप्रमाणें सेवक वर्तणूक करील. स्वामींच्या पायांसीं अंतर तिळप्राय होणार नाहीं. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना."

---

# लेखांक ६८.

श्री. ता. ५ आक्टोबर इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:—येथील वर्तमान छ १५ मोहरम मुकाम नजीक गोवर्धन स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेष:— स्वामींचीं पत्रें छ २६ जिलकादचें व छ ३ जिल्हेजचें आलीं तीं पावलीं. याची विज्ञाप्ति पूर्वींच सेवेसीं लिहिली आहे. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री पाटिलबावांसीं बोलोन बंदोबस्त करून घ्यावा. इकडून ऐवज पावणें कळतच आहे. ऐसीयासी राजश्री पाटिलबावा यांजपासून दोन लक्ष रुपये घेऊन, राजश्री अलीबहादर-बाबांनीं आह्मांस स्वारीस जावयास सांगितलें. त्यांचे आज्ञेप्रमाणें कूच करून गोवर्धनानजीक येऊन मुक्काम केला आहे. भोंसले व पुरंदरे व वोढेकर व पवार व जाधव याप्रमाणें पथक राजश्री अलीबहादर यांनीं आह्मांकडे पाठविलीं आहेत. याउपरी राजश्री पाटिलबावा यांजकडे मुलुकाच्या सनदा मागावयासी मथुरेहून पाठविलें होतें. त्याचें उत्तर त्यांनीं केलें कीं, गोसावी याविषयीं तुह्मीं करार केला आहे, त्याप्रमाणें करावें. तेथर्लीया उपरी महालाच्या सनदा वगैरे जें कामकाज असेल, त्याचा बंदोबस्त करून देऊं. त्यास आपल्याकडून गोसावी याचा बचाव करण्याविषयीं प्रयत्न बहुताप्रकारें केला, परंतु ऐकेनात. हें पुर्तें समजलीयावर ध्यानास आलें कीं, आपण सवा वर्ष बचाव करून हल्लीं त्यांनीं पारपत्य केलें, तर आपण येथें राहिल्यानें स्वरूप नाहीं. येविषयींचें बोलणें राजश्री गोविंदराव बारवकर यांसीं राजश्री अलीबहादरबाबा बहुतां प्रकारें बोलिले, आणि सांगितलें कीं, तुह्मीं व सदाशिवपंत, राजश्री आबा चिटणीस याजकडे जाऊन, गोसावी याचा बचाव जाला तर करून पाहावा. राजश्री पाटिलबावांचा मुकाम शातनुकुंडावर आहे. तेथें तुह्मी जाऊन सदाशिवपंत यांसीं बोलावून, त्यास आमचा निरोप सांगोन बोलून पाहावें. त्यावरून त्यांनीं आह्मांस बोलावून नेऊन खाशाचा निरोप सांगोन, तुह्मी व आह्मी बोलोन पाहूं ह्मणून बोलिलें. आह्मीं बारवकर यांसी उत्तर केलें कीं, खाशांनीं पाटिलबावांपाशीं आण प्रमाण केली आहे, त्यापक्षीं तुमचें आमचें कसें ऐकतात? या कामांत पडल्यानें यश यावयाचें नाहीं. तुह्मांस वाटतें की, आपलें ऐकतील. त्यास पाटिलबावा कोणाचें ऐकावयाचे नाहींत. परभारें प्रयत्न बहुत केला आहे; ते ऐकत नाहींत, हें पुर्तें खाशांस समजलें आहे. ऐसें असतां तुह्मांस बोलावयास सांगितलें, त्यास हें काम व्हावयाचें दिसत नाहीं, ऐसें सांगितलें. याउपरी ते दिवसीं बारवकर माघारें गेले. मागतीं दुसरे दिवसीं गोविंदराव बारवकर यांसी शांतनुकुंडावर पाठविलें. त्यांनीं आह्मांस बोलावून नेऊन सांगितलें कीं, 'तुह्मांस व आह्मांस

बोलावयासी सांगितलें आहे. तुह्मी आह्मी आबा चिटणीस यांसीं बोलोन पाहूं. कार्य जालें तर उत्तम. न जालें तर आह्मीं कांहीं कबूल करून आलों नाहीं. बोलोन पाहातों. व्हावयाचें असल्यास होईल. न जालियास आमचा उपाय काय? ऐसें साफ बोलोन आलों आहों. तुह्मीं संशय न धरावा. त्यावरून आह्मीं, बारवकर, आबा चिटणीस यांजकडे जाऊन, सर्व आपल्या मतलबाच्या गोष्टी युक्तिप्रयुक्तीनें बोलिलों. परंतु त्यांनीं एकच जाबसाल केला की, राजश्री बाबाराव यांचे विद्यमानें खाशांनीं रुबरू करारमदार करून पाटिलबावांसीं आण प्रमाण केली आहे. त्या बोलण्यांत आह्मीच आहों. दोन महिन्यांचा वायदा केला. त्यास नव महिने होत आले. याउपरी गोसावी याचा विचार कराराप्रमाणें करावा. मग तुमचें बोलणें जें असेल त्याचा बंदोबस्त करून देतात. गोसावी यांसी काहीं मुक्त करीत नाहींत, ऐसें साफ सांगितलें. परंतु मागतीं बोलिलों की, आमची आणप्रमाणही राखावी आणि गोसावी याचाही बचाव करावा, हें तुमचे हातीं आहे. गोसावी यासीं आह्मी तुमचे हवालीं करितों. तुह्मीं अन्याय बक्षीस करून, राजश्री शिवाजी विठ्ठल बापू यांजपाशीं दहाविसा स्वारांनसीं चाकर ठेऊन चालवाव, ह्मणजे सर्व गोष्टी होतात. राजश्री अलीबहादरबाबाचें स्वरूप येणेंकरून राहतें. ह्मणून आग्रहपूर्वक बोलिलों. तेव्हां आबा चिटणीस बोलिले की, पाटिलबावा यासी पुसोन पाहतों. त्याउपरी दो दिवसांनीं मागती गोविंदराव बारवकर यांसी पाठविलें. त्यांनीं आह्मांस बोलावून नेऊन आबा चिटणीस यांजकडे जाऊन पुसिलें. त्यांनीं एकच जाबसाल केला की, गोसावी याचे गोष्टीशिवाय जें सांगाल तें ऐकूं. आमचा मारेकरी गोसावी. त्याची मुक्तता कैसी होईल? आणप्रमाण खाशांनीं आह्मांपासीं केली आहे, त्याप्रमाणें नमुदास आणावें. वरकड बंदोबस्त त्याजकडील जो असेल तो सर्व करून देऊं. त्यांत गुंता पडावयाचा नाहीं. ऐसें पाटिलबावा बोलिले. गोसावी याची सुटका व्हावयाची नाहीं, ऐसें साफ सांगितलें. त्याउपरी बारवकर मथुरेस गेले. राजश्री अलीबहादरबाबा याजकडे जाऊन वर्तमान सांगतील. आह्मी फौजेत येऊन दाखल जालों. याउपरी विचार करोन आह्मांस सांगोन पाठवितील, त्याप्रमाणें करूं. पुढें जावयासी सांगितलें तर पुढें जाऊं. त्यांनीं आपल्यापाशीं बोलावलें तर त्यांजपासीं राहूं. राजश्री अलीबहादर यांचे आज्ञेशिवाय काहीएक करावयाचें नाहीं. पूर्वींही त्याच्या सांगितल्याप्रमाणें वर्तणूक केली. पुढेंही तैसीच होईल. सेवकापासून अंतर व्हावयाचें नाहीं. जालें वर्तमान वरचेवर लिहित जाणें ह्मणून स्वामींची आज्ञा. त्यावरून लिहिलें आहे. पुढें होईल तें लेहून पाठवीन. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना.''

---

# लेखांक ६९.

**श्री.** ता. ४ नोव्हेंबर इ. स. १७८९.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:– येथील कुशल छ १५ सफरपर्यंत स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:–पूर्वीं गनीबेग यांसी सारंगपुराकडे पाठविलें होतें. तेथोन आलियावर राजश्री अलीबहादरबाबा यांनीं, पुरसीस केलियाउपरी आठ्यांऐशी हजारांची यादी अंतस्थाची त्यांस लेहून दिल्ही. ते यादी त्यांनीं आपल्या रुमालांत ठेविली होती. त्यास जामदारास सोन्याचें कडे देऊन, जामदारखात्यांतून रुमाल नेऊन, यादी काढून घेऊन, कमी यादी दुसरी लेहून, रुमालांत घालून, मागतीं रुमाल जामदाराचे हवालीं केला. त्याउपरी भवानी कलवंतीण मथुरेस आली होती. तिजला जिवें मारून मथुरेस पुरून टाकिली. तेथोन कूच होऊन जयपूर प्रांतीं आलियाउपरी गनीबेग यांजबराबर फौज देऊन, जप्ती मुलुखाची करावयासी पाठविलें होतें. तेथून आलियावर शिबंदीचा गवगवा करून, लोकांकडून सरदारास आडवावें, ऐसें केलें. तें वर्तमान राजश्री अलीबहादरबाबा यांसी समजलें. त्यांनीं आह्मांस व राजश्री आप्पाजीपंत दामले यांसी बोलावून नेऊन सांगितलें कीं, गनीबेग यासी कैद करावें. त्याची चीजवस्त सर्व जप्त करावी. येविसीं आण शपथ आह्मांसीं करून, आह्मांकडून त्यास कैद करविलें. हें तपसीलवार पूर्वीं सेवेसीं लेहून पाठविलें आहे. गनीबेग गारदी याच्या पाहारियांत होता. त्यास एक दिवशीं राजश्री गोविंदराव बारवकर येऊन, पुढें घालून त्यास आपले राहुटीस नेलें, आणि बोलिले कीं, त्याचा जाबसाल पडेल तो आह्मी करूं. पुढें दो चों दिवसांनीं त्याच्या रांडा कैदेंत होत्या, त्याही घेऊन गेले. हल्लीं त्याच्या हिशेबाचा फडशा आह्मांस करावा ह्मणतात. त्यास आह्मीं उत्तर केलें कीं, गनीबेगाचें वर्तमान पुण्यास लेहून पाठविलें आहे, तेथोन श्रीमंतांची आज्ञा येईल त्याप्रमाणें करूं. तुह्मीं आह्मांस निकड केली, तऱ्ही त्याचा फडशा आमच्यानें होत नाहीं. ऐसीयासी गनीबेगास नेऊन पुरसीस केलीयानें उत्तम आहे. येथें फडशा केलियानें दिक्कती फार पडतील. यास्तव सेवेसीं विनंति लिहिली आहे. तरी गोविंदराव बारवकर यांस पत्र पाठवावें कीं, गनीबेगाचा मजकूर, हुजूर मनास आणावयाचा आहे; तरी तुह्मीं आपले स्वाराबराबर देऊन हुजूर पाठवणें; आणि सरकारकामांत बखेडे पडतील ते न करणें. ऐसें मर्जीस आलियास सदरहूप्रमाणें पत्र आलियावर बखेडे होणार नाहींत. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना."

---

## लेखांक ७०. ता. १५ सप्टंबर इ. स. १७९०.

श्री.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:- येथील वर्तमान छ ५ मोहरमपर्यंत स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे, विशेष. येथील वर्तमान तपशीलवार छ ३ मोहरमीं सेवेसीं लेहून पाठविलें आहे, त्यावरून विदित होईल. आजमिराहून सरकारच्या फौजा निघोन राठोडाच्या फौजेवर गेले. मेडदावर राठोडाची फौज तीस चाळीस हजार होती; ते चालून बाहेर सरकारचे फौजेवर भाद्रपद शुद्ध २ आली. तेव्हां आपल्याकडील डंघाईचा कंपू यानें तोफांचा मार बहुत दिला. तेणेंकरून राठोड जखमी व ठार कांहीं जाले. याजमुळें मागें सरोन उभें राहिलें. त्याजवर सरकारच्या फौजेनें उठावणी केली. हातघाई होऊन राठोड शिकस्त होऊन पळून गेले. कांहीं मेडदांत शिरले आहेत. त्यांस तोफांचा मार होत आहे. श्रीमंतांच्या प्रतापेंकरून शत्रूचा परभाव जाला. मोठें यश आलें. सरकारची फौज चिरंजीव बळवंतराव याजसमागमे होती. त्याची उठावणी राठोडावर आधीं जाली. याजमुळें यांजवर मार बहुत जाली. पन्नास साठ माणूस जखमी जाले, व कांहीं ठार जाले. तरवारीचे जखमी बहुत आहेत, व घोडीं जखमी आहेत. त्यास गोठांत गेलियावर यादी लेहून पाठवूं ह्मणून चिरंजीवानें लिहिलें आहे. फौजेंतून संकलित वर्तमान लेहून पाठविलें आहे. मागाहून तपशीलवार वर्तमान आलियावर सेवेसीं लेहून पाठवीन. भाद्रपद शुद्ध प्रतिपदेस गुरुवारीं चार प्रहर तोफांचा मार परस्परें जाला. राठोडांच्या पंचवीस तीस तोफा होत्या. त्याउपरी दुसरे दिवशीं राठोड तयार होऊन प्रातःकालीं लढाईस उभे राहिले. लढाई निकडीची जाली. दोन पलटणें गारदी याचीं आपल्याकडील राठोडांनीं कापून काढिलीं. मग निकड करून फौजेवर उठोन एक प्रहर लढाई जालियावरी, सिकस्त खाऊन राठोड कांहीं पळाले, कांहीं मेडदांत शिरले आहेत. मेडद जागा मजबूद आहे. ते जागा धरून लढतील ऐसें आहे. ह्मणून राजश्री पाटिलबावांकडे वर्तमान आलें. आपलियाकडील पत्रेंही आज अगर उदैक येतील. त्यावरून सर्व सेवेसीं लेहून पाठवीन. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे, हे विज्ञापना."

---

## लेखांक ७१.

पैवस्ती छ २२ रबिलाखर सन इसन्ने तिसैन मार्गशीर्ष. श्री. ता. ६ नोव्हेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं सदाशिव शामराज साष्टांग नमस्कार विज्ञापना:- येथील कुशल छ ९ रबिलावल मुकाम वेत्रवती, स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे

विशेषः—पूर्वी जालें वर्तमान सेवेसीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. त्याउपरी झांशी प्रांतीं आलियावर संस्थान दतीये येथील खंडणी पाऊण लक्ष जाली, व सिमथरची पन्नास हजार जाली. याउपरी राजश्री गंगाधर गोविंद व राजश्री शिवराव हरी आपल्या जमावसुद्धां भेटीस आले. ओंडसीयाची खंडणी होणें आहे. ती शिवराव हरी यांच्या विद्यमानें होईल. डंघाईचा मजकूर तर, अर्जुनसिंग यानें पर्णेवालीयाचा व चरखारी व जयेतपुरचा मुलूख तिसा बत्तिसां लक्षांचा दाबून, दहा हजार फौजेचा जमाव करून, गुदस्तां राजश्री लक्ष्मणराव हरी दिमत राजश्री शिंदे यांसी लुटून, हत्ती व तोफा नेल्या. हल्लीं श्रीमंतांच्या प्रतापेंकरून बेणीहजुरीच्या पुत्रांसीं व त्यांसीं लढाई जाली. अर्जुनसिंगाची फौज शिकस्त जाली. त्याजकडील दहा बारा सरदार रणास आले. मागतीं जमाव करून त्यांजवर गेला आहे. आह्मांपासून पन्नास कोसांवर आहे. त्यांजकडील वकील हिंमतबहादर याच्या विद्यमानें आला आहे. त्याचें बोलणें गोसावीयापासीं जालें कीं, आमचा हिश्याचा मुलूख सतरा हजारांचा आहे. तो आह्मीं ठेवून नवा मुलूक तिसा लक्षांचा दाबला आहे, तो सरकारांत देतों. तो घेऊन मजला बहादरी द्यावी. मी भेटीस येतों. ऐसें बोलणें आहे. सध्यां त्याच्या मुलुकांत जप्ती करून, कमाविश राजश्री गंगादर गोविंद यांसी सांगावी. त्यांनीं तूर्त फौजेच्या खर्चास दीड लक्ष रुपये द्यावे, आणि दरमाहा पाऊण लक्ष रुपये रोजमरीयाकरितां देत जावे. ऐसें बोलण्यांत येऊन, त्यांनीं व चिरंजीव बळवंतराव यांनीं, पुढें फौज सुद्धां जाऊन, मुलुखाची बंदोबस्त करून अंमल बसवावा. ठाणीं असतील तीं घ्यावीं. चिरंजीवाबरोबर सरकारची फौज जदीदसुद्धां पांच हजार व गारदी चार हजार देऊन मुहूर्तेंकरून बाहेर काढलें आहे. त्याजसमागमें गंगादर गोविंद यांचीही फौज दोन हजार आहे. अर्जुनसिंगाकडील बातमी आली. त्याजपाशीं तीन चार हजार फौज व पायदळ मिळोन आहे. आणिकही जमाव करीत आहेत. त्याच्या मोहलियावर मुलुकाची जप्ती करीत गेल्यावर त्याचे गुर्मीचाही प्रकार दिसोन येईल. पुढें फौज जाईल त्याच्यामागें राजश्री अलीबहादरबाबाही दहा पंधरा कोसांच्या अंतरियानें जातील. स्वामींच्या प्रतापेंकरून पारपत्यही त्याचें होईल. दतीयेवालीयाची फौज हजार व पायदळ दोन हजार समागमें चाकरीस आहे. पोटास देऊं नये, मुलूक सुटली-यावर दोन लक्षांची जहागीर त्यास लावून द्यावी, ऐसें करारींत आणिलें आहे. त्याजपैकीं आकोडीचा तालुका तिसां हजारांचा आहे, तो किल्लीयासुद्धां दतीये-वालीयास द्यावा. बाकीचा मुलूक जोरतलबी द्यावा ऐसें केलें आहे. राजश्री

# ४१. उत्तर हिंदुस्थानांतील राजकारणें.

छ २९ जिल्काद. **श्रीराम.**

"श्रीमन्महाराज राजश्री पंत प्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक रामराऊ निळकंठ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम महाराजांच्या कृपाकटाक्षेंकरून तागायत वैशाख कृष्ण १ पर्यंत मुक्काम यमुनातीर नजीक रामघ्याचा घाट यथास्थित असे. विशेषः— स्वामी महाराजांचें आज्ञापत्र सादर जालें, तें शिरसा वंदिलें. पत्रीं आज्ञापिलें, तदनुरूप जो पूर्वीं वृत्तांत जाहला तो यजमानांनीं सेवेसीं लेखन केलेंच आहे. विद्यमान काळीं पुढें कर्तव्य तें आज्ञेनुरूप होईल त्याचा परियाय, महाराजांनीं आज्ञा केली येणेंप्रमाणें:—

"राजश्री दत्ताजी शिंदे व राजश्री जनकोजी शिंदे यांजकडील पत्रें अलीकडे येऊन वर्तमान कळत नाहीं. मारवाड्यांचा निर्गम होणें, तेथील पैका मातबर उगवणें, त्याचा विचार कसा केला तो लिहिणें. ह्मणोन आज्ञा केली." ऐसीयासी तेथील गुंता विशेष केला नाहीं जे, श्रम बहुत, फळादेश स्वल्प. डोंगर कोरून उंदीर काढावा. दुसरें अनृत भाषण करणें हें तों त्या लोकांचा स्वभावधर्म परंपरागत आहे. यास्तव पूर्वीं मुलूख निमेनिम घेतला तो करार व कांहीं ठाणीं बसवून, मुलुखाची खराबी जाली, त्यास दम दिलासा देऊन कमाविसदार ठेविले आहेत. पुढें आकार होईल तो साल तमाम जालिया कळेल. बिजेसिंगाकडील पैका येणें बहुत. त्यामध्यें त्यांजला संशय पूर्व दोषांचा बहुत. त्यामध्यें परिणाम स्नेह संपादिल्याखेरीज निर्वाह त्यांनीं न देखिला. मग कांहीं वाट केली. त्यामुळें त्यांचा दील खुलासा जाला. आणि पुढें आणखी कामावरी दृष्टी देऊन, त्या प्रांताच्या आग्रहास न गुंतोन, दिल्लीकडे येणें जालें. त्याचा वृत्तांत, पूर्वीं श्रीमंत उभयतांनीं सेवेसीं विनंति लेखन केली आहे, त्यावरून विदित जालेंच असेल.

साहेबीं पत्रीं आज्ञा केली कीं, लाहूर प्रांताकडील ऐवज आणून जरूर हुजूर पाठविणें ह्मणोन आज्ञा केली. त्यास त्या ऐवजाचा कांहीं वसूल आला. रबीचा ऐवज येणेंच आहे. त्याचा मजकूर श्रीमंत यजमानांनीं सेवेसीं लेखन केला आहे, त्यावरून विदित होईल. पूर्वीं कर्जाच्या उपयोगानिमित्त दहा लक्षांच्या हुंड्या सेवेसीं पाठविल्या, त्या पावल्याच असतील. हल्लीं कांहीं ऐवज जमा होईल, त्यास हुंडीचें अनकूळ पडत नाहीं. ज्या हुंड्या होतील त्या हुंड्या व रोख पैका उंटावर घालून सेवेसीं ज्येष्ठमासीं रवाना करतील. सारांश, जो पैका हातास येईल तो आपणाकडेच पाठवावयाची चिंता आहे. पूर्वीं पाठविलेच, त्याप्रमाणें ही खेप सेवेसीं प्रविष्ट होईल. पुढें या प्रांतींचा ऐवज रबीचा येणें, त्याजवरी वराता हुजूरीहून जाल्या, त्याप्रमाणें वरातदारांस ऐवज देविला. बाकी ऐवज येणें तो अखेर श्रावणपर्यंत येईल. जो येईल तो वरचेवर आपणाकडे येत जाईल, यांत संशय नाहीं. वरकड तोफा तरीक जिन्नस, या प्रांतीं सांप्रत पठाणांच्या दंग्यामुळें प्रांत हैराण बहुत जाहला; याजकरितां गोचर पदार्थ पाहतां, घोडे

तुर्की आहेत. त्याविषयीं आपली आज्ञा आली कीं, तुर्की घोडे पाठविणें. त्यावरून श्रीमंत उभयतांनीं कांहीं मिळविले आहेत, ते या खजानासमागमें पाठवितील. १

"अंताजी माणकेश्वर यांस हुजूर बोलाविलें असतां, नाना प्रकारचे बहाणे करून राहिला; येत नाहीं. हवाल्याबद्दल बाकी राहिली असली, तरी सख्त तगादा करून उगवावी. वजिराकडे त्याची फौज किती? चाकरी किती दिवस होती, मिरेट वगैरे महाल त्याजकडे आहेत, त्याचा ऐवज काय वसूल जाहाला? हुजूर तैनात जाबत्याची फौज चार पांच हजार आहे, तैसें लिहित असतात. परंतु वजिराकडील फौज व हुजूरच्या कराराची फौज दोन्ही मिळोन पांच सहा हजार असेल. हे ते मिळोन घालमील करीत असतील, यांत संशय नाहीं. तरी त्यांची भीड न धरितां चौकशी करणें." तऱ्ही खावंदगिरीनें सख्तीनें करणें. नाहींतरी मोघमच चौकशी करूं नये. येथें आलियावरी जैसें बनेल तैसें केलें जाईल. ह्मणोन आज्ञा केली. यास वरकड चौकशी दिल्लीची फुरोई वगैरेची करावी. तेव्हां दिल्लीस कैसें ठिकाण पडतें? वजिरानें आपणाकडील वसुलाचा कागदपत्र पावतीचा पंतमशारनिल्हेस करून द्यावा. तो सेवेसीं निवेदन करतील. दरबारांत तों पंतमशारनिल्हेचा स्वभावगुणाकरितां विश्वास पडत नाहीं. याजकरितां त्याची चौकशी येथें कोणे प्रकारें केली, तऱ्ही तेही निर्दोष नाहींत, आणि महाराजांसही इतबार पडणार नाहीं. याजकरितां पंतमशारनिल्हेस हुजूरच पाठवितात. यांत मुलाहिजा काडीइतका नाहीं. तेथें आल्यानंतर आपण सर्वज्ञ स्वामी आहेत. जें कर्तव्य तें करतील. विशेष लिहावें ऐसें नाहीं. बाकी हवाल्या राजांकडे येणें आहेत. त्यांसही तगादे लाविले आहेत. त्यांजलाही परिच्छिन्न सांगितलें आहे कीं, तुह्मीं गुंता उरकोन जाणें. तेही सिद्धता करितात. सांप्रत दिल्लीहून येणार आहेत. आले ह्मणजे आपणाकडे रवानगी त्यांची बेमुलाहिजा ते करतील. यांत अंतर नाहीं. १

येथील वर्तमान इतकेंच कीं, क्रोड रुपये, कर्जांत तीस लाख, मात्र सर्व फौज घरीं बसविली. वीस हजार मात्र फौज ठेविली. तीस ऐवज देणें लागेल. यास्तव तीस लाख कर्जदारांस देऊन, सत्तर लाख रुपये कर्ज देणें आहे. त्यापैकीं पन्नास लाख कर्ज राजश्री दतबांनीं फेडावें. एक दुसरें मातबर काम करावें. वांटणीचा अर्थ ध्यानांत न आणावा. जातेवेळेस समक्ष त्यांस सांगितलेंच आहे. त्या गोष्टीचा भरंवसा आहे. येविषयीं उभयतांस पत्रें लिहिलीं. तरी उमदा मनसबा करून, पैका मेळवून, कर्ज वारे तें करावें. येविषयीं राजश्री दतबा यांस स्मरण देत जाणें. येथील मर्जीस तुह्मी जाणतच आहांत, ह्मणोन आज्ञापिलें. त्यास तेथील फौज आपण कार्याकारण ठेविली, ते पाहोनच ठेविली. असलें कामच पडलें तरी आणखी ठेवणें. तरी ठेवणार महाराज समर्थ आहेत. फौजेची चिंता काय आहे? आपण राजश्री पाटिलबावांस जे आज्ञा केली, ते श्रीसत्तेकरून हे कांहीं आपला स्वार्थ वांटणी वगैरे काडीइतका ध्यानास आणीतच नाहींत. एक हेत हाच कीं, जो या स्वारीमुळें आकार होईल, तो खावंदास पाठवावा. यांत आपली अभि-

लाषबुद्धि इच्छित नाहीं. सारांश गोष्टी तेच कीं, भाषण बहुत केलें आणि अमलांत एकही न आलें. त्याजवरूनच कळों येतें कीं, बोलिल्याप्रमाणेंच कर्तृत्व आहे, किंवा प्रतणेंची वर्तणूक करितात. हें क्रियमानें परिणाम कळतो. त्यामुळें सेवक लोक सदैव सन्निध राहातात. तेही सदैव स्मरणीं सावध, मर्जी पाहून आहेत. ते विस्मरणांत पडूं देत नाहींत. आह्मां लोकांचें काम इतकेंच. वरकड होणें जाणें तें उभयतांच्या ठायीं आपली अंतःकरणापासून कृपादृष्टी आहे, तेंच यशास कारण आहे. यांचेंही चित्त स्वामीचरणीं एकनिष्ठ, कायिक, वाचिक मानसिक सर्व प्रकारें आहे. १

प्रांत लाहोर व बंगाला व पटणें हे तिन्ही मनसबे तुह्मांस करणें आहेत. त्यास लाहुरीं श्रीमंत राजश्री दादासाहेबीं अदिनाबेगखान सुभेदार करून ठेविला, तो मृत्यु पावला. त्याचा नायब लाहुरांत ठेवून उपयोगीं........................ सरदार फौज देऊन तिकडे पाठवावा. त्या प्रांतींचा बंदोबस्त करावा. बंगाला पटणें यांस स्वारी करावी. मातबर पैका मिळवून कर्जाबद्दल क्रोड दोन क्रोड मिळवून, कर्जाचा परिहार करून, फौज ताजी राखावी, असा विचार जाला पाहिजे पटणें हस्तगत करावें. तें स्थळ घ्यावयाचेंच आहे. खांसा उभयतांनीं मातबर फौजेनिसीं तिकडे जाऊन पटणें घ्यावें. तेथें छावणी करावी. तों श्रीमंत राजश्री दादासाहेब बादज बरसात येतील. तदोत्तर बंगल्याची स्वारी करावी. मातबर पैका मिळवावा. गुदस्तां मामलीत बरी चुकविली, यथास्थित न जाली. याजकरितां सांप्रत वकील आला असला, तरी अल्पस्वल्प तेथील कारभार विल्हेस न लावणें. बंगल्याखेरीज मातबर पैका मिळवावयाची जागा नाहीं ह्मणोन आज्ञा लेखन केली. त्यास लाहोर प्रांतीं आलिया उपर, सरहंद वगैरे श्रीमंत दादासाहेबीं सादिकबेग यास आदिनाबेगाची जामिनी घेऊन स्थापिलें आहे. त्याप्रमाणेंच करार ठेऊन, सांप्रत स्वारीमुळें पांच लक्ष रुपये जास्ती नजराणा तरीख ठराऊन, त्याचें काम त्याजवरीच बहाल ठेवलें आहे. आदिनाबेगाचा तालुका लाहोर व जालंधर वगैरे आहे. तो मृत्यु पावला. त्याची स्त्री व दत्तपुत्र घेतला आहे, तो भेटीस यजमानांच्या आलियावरी मागील द्रव्याचा भ्रम लोकांनीं विशेष सांगितला. परंतु तहकीक करितां, कांहीं द्वेषामुळें अधिक न्यून सांगूं लागले. सद्यकाळ हतांस येणें दुर्लभ. तो विचार यथास्थित करून पाहिला. त्याचा पर्याय यजमानांनीं विस्तारपूर्वक सेवेसीं लेखन केलें आहे, त्यावरून विदित होईल. मुख्य त्याचा माथां चौदा लक्ष रुपये ठहराविले. शिवाय, पेशजीं त्याचा तालुका श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींनीं दिल्हा, तोच करार ठरवून त्यासच स्थापिलें. परंतु लाहोर प्रांतींचा मुलूख बहुत. पलीकडे, अटक व मुलतान, कंदाहारपर्यंत मोकळा पडला. दुसरें पठाणाचा मार्ग. तोंच तेथील बंदोबस्त आपल्या कडील फौज व एक मातबर सरदार मामलेरास आणि मर्द माणूस लोकांस गिरवीदगी करून किल्येकांचें पारपत्यच केलिया उत्तम आहे. त्याचें शिष्ट कृत्यच केलें पाहिजे. कितीएक जंबूचे राजे पाहाडी आहेत. त्यास अंगीं लाऊन घेऊन, त्यांच्या हातें काम काज घ्यावें. आपला सर्व बंदो-

बस्त जालियावरी मग त्यांजला तोषीस देणें ते द्यावी. तोंवरी त्यांच्या रजाबंदी-प्रमाणें द्यावें. दहावीस हजार माणूस आज्ञेंत राहतील. येणेंकरून तो बंदोबस्त होईल. दुसरें शिखांचा दंगा या प्रांतीं बहुत. त्यांची तंबीच करितां उत्तम आहे. यास्तव त्यांची तंबी जालिया मुलुखाची उस्तवारी होऊन मुलूख लागेल. आबादी जालिया हा प्रांत क्रोडीचा आहे. दुरदस्त आहे. यास फौजेचें बळ पाहिजे. नेहमीं दहा बारा पंधरा हजार पर्यंत जोंवर चांगला अमल बसेल तोंवरी पाहिजे. मग पुढें गोडी लागलिया कार्यानुसार जे ठेवणें तें ठेवावी. दिल्लीचे गृहस्थ विभागी आहेत. मग त्यांस देणें तें आपल्या हातींच द्यावें. दस्त रस्त सर्व आपला आहे, तसाच असों द्यावा. आहे ऐसा विचार आहे. त्यास, सांप्रत राजश्री साबाजी पाटील त्या प्रांतीं आहेत. परंतु खातरजमा करून एकाजणास ठेविलें पाहिजे. तेणेंकरून या प्रांतीं चार दिवस सरदारांचें येणें कार्यामुळें न येणें जाले, तऱ्ही बंदोबस्त राहून पैका आकारांत ये, ऐसें योजून एक दोन पत्रीं आपली आज्ञा होतीं कीं, राजश्री नारोशंकर यांस ठेवणें ह्मणोन आपले आज्ञा जालीच होती, आणि उभयतां यजमानांच्या चित्तांत हाच विचार कीं, यांस ठेविल्यास शहाणा माणूस, कार्यकर्ता, मामलेदार लोकांस अंगीं लाऊन ज्यांस घेणें त्यांस घेतील; ज्याचें पारिपत्य करणें त्याचें करतील. या गोष्टींची निशा........आहे. त्यास राजश्री नारोपंतांस सांगितलें. त्यास त्याचा इरादा साहेबाच्या हुकुमाचा, व खातरजमेचें पत्र आपले यावें कीं, सरदार सांगतील त्या कामाचा बंदोबस्त त्या प्रांतीं राहून करणें. फौज हुजुरून पांच हजारपर्यंत पाठवावी लागेल. यास पेशजींची दोन हजार आहे. जाजती पांच हजार ठेवावयाची आज्ञा करावी. एकूण बारा हजार येथें राहिल्यास पैकाही मिळोन, वर्षादोन वर्षांनीं या मुलुखाची आबादी जाल्यावर आमदानी येईल, ते विदित होईल. याजउपरी तूर्त फौजेस छावणीस लोक राहावयास अनमान करितात, आणि यांजला आपणाकडील अभयपत्राची सादरता जालिया, आज्ञेप्रमाणें वर्तणूक करितील. वरकड यांचे मतलब आहेत, ते येथील बंदोबस्त करून, सडे आपणाकडे आल्यावर स्वामीचरणांचे दर्शनार्थी मनोरथ पूर्ण करणार धणी समर्थ आहेत. यास्तव सार्यंत वृत्त येथें लेखन केलें असे. हुजूर येतांच यजमानांनीं याची विचारणा केली आहे, परंतु यांचा अनमान महाराजाकडील आज्ञेचा आहे. येविषयीं जैसी आज्ञा होईल, तैसी वर्तणूक करतील. सांप्रत तूर्त लाहोर प्रांतींचा बंदोबस्त चरितार्थ मात्र केला, आणि यथास्थित करणें तो सेवेसीं विनंति लेखन केली. हे ध्यानास आणून आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. हल्लीं श्रीगंगापार होऊन बंगाला पटणें या प्रांतीं जावें हाच उद्योग धरून, मजल दर मजल गडमुक्तेश्वरास जातात. नजीबखान भेटीस येणार, तो येतो किंवा नाहीं? तूर्त प्रथमतः कटकट याजशीं करावी, तरी पुढील काम मातबर होणें, त्यास दिसगत लागेल. याजकरितां तूर्त यांस हातीं घेऊन गंगापार जालियानंतर तिकडील बंगाला पटणें इकडील कामे करावीं. मातबर पैका आज्ञेप्रमाणें कर्जाच्या उपयोगीं पडे ऐसें कार्य योजोन जातच आहेत. सर्व प्रताप

महाराजांचा समर्थ आहे. तो योग ईश्वर अनकूळ करीलच. संशय नाहीं. श्रीमंत उभयतांच्या चित्तीं रात्रंदिवस निजध्यास हाच कीं, मातबर काम करून विशेष द्रव्य संपादून ज्यांत खावंदाचा संतोष तो करावा. हेच चित्तीं रात्रंदिवस जपमाळ आहे. तो सुदिवस इच्छितात. ते श्री सर्वोत्तम सिद्धीस पावील. याजकरितां वजिरासही समागमें घ्यावें ह्मणजे बंगाल्याचा फितूर तुटेल. एक्या विचारें पैकाही पुष्कळ मिळेल. पटण्याचाही अंमल बसेल. काशी, प्रयाग, हीं क्षेत्रें हस्तगत करावीं हा विचार जाणोन, त्यांजकडे राजश्री अंताजी माणकेश्वर गेले आहेत. वजिराचें येणें होतें कीं नाहीं, हा निश्चय जाला नाहीं. आले ते तरी बरेंच जालें, नाहीं तरी तेच हतभाग्य होतील. सुजायतद्दौल्याची मामलत करून पुढें बंगाल्याची व पटणाची स्वारी करणें तें त्यांच्या विद्यमानेंच करावी लागेल, आणि हाच आला तरी मग सुजायतद्दौलासुद्धां बंगाला पटणें सर्व कामें होतील आणि आपणाकडेही कांहीं वजिराकडील शब्द राहणार नाहीं. तुह्मांस बोलाविलें, तुह्मी न आलां, येणेंकरून अनहित त्यांचेंच आहे. त्याचें उत्तर ते काय येतात कीं नाहीं हें कळेल. सारांश, यास आपले आज्ञेप्रमाणें निश्चयपूर्वक मग जे येतां येईल तो येवोत अथवा न येवोत. सर्व सिद्धीप्रद कार्य करणार महाराजांचा पुण्यप्रताप समर्थ आहे.

आणखी कितीएक वर्तमान श्रीमंत उभयतांनीं सेवेसीं लेखन केलें आहे, त्यावरून विदित होईल. सारांश, मनसबा जो करणें तो विचारून, ज्यांत विशेष लाभ होणें आणि केल्या कराराप्रमाणें द्रव्य उपयोगास ये तेंच आज्ञेप्रमाणें करतील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति."

* * *

[मेणवलीदप्तर.]

## ४२. पेशव्यांचा इंग्रजांशीं तह.

श्री. इ. स. १७८१ । ८२

"यादी कलमें श्रीमंत राजेश्री माधवराव नारायण पंडित प्रधान यांजकडील बमय सरदार समेत तहनामा याची. समस्त इंग्रज देखील मुंबईकर सुद्धां यांसी. इसने समानीन मया व अलफ.

साष्टी, उरण, व बेलापूर, व वसई, व आरनाळा व कल्याण व पारनेरा वगैरे ठाणीं पहिलीं व हल्लीं घेतलीं आहेत, त्यांजवर सरंजाम तोफा वगैरे जकीरा आमचे कागदींपत्रीं निघेल, तो जराबाजरा शफतपूर्वक जंजिरे व किल्ले व ठाणींसुद्धां सरंजाम सरकारांत द्यावा. कलम १.

पहिले तह लपटण ज्यान इपटणी यांनीं केला, त्याप्रमाणें अमलांत न आला. मुंबईकर यांनीं लढाई सुरू करून, बोरघाट चढोन इंदुरी तळेगांवपर्यंत राजेश्री रघुनाथराव यांजला समागमें घेऊन आले. लढाई शिकस्त जाहली. यावर मुंबईवाले यांनीं तह केला. त्यांत तहाची निभावणी तुह्मांकडून जाहली नाहीं. रघुनाथराव यांचा पक्ष

धरूं नये, असें ठरलें. रघुनाथराव आमचे जिमे केले, ते पुनरपि तुह्मांकडे गेले. त्यांचा पक्ष धरून लढाई केलीत. याजमुळें आमचा व सरदारसुद्धां खर्च मोबदला जाहला, व मुलखांतील पैका तुह्मीं वसूल घेतला आहे. सलूख तुह्मांकडून निभावणींत आला नाहीं. सबब खर्च जाहला आहे तो व मुलखांतील वसूल घेतला आहे तो द्यावा. कलम १.

राजश्री रघुनाथराव दादा यांनीं जवाहीर वगैरे मुंबईंत सावकाराकडे वगैरे गहाण ठेविलें आहे. तें जवाहीर सरकारी आहे. त्याचा पैका वाजवी सरकारांतून द्यावा, आणि दागिने सोडून घ्यावे. येविषयीं तुमची सावकारास ताकीद असावी. तुह्मांकडून दिकत पडों नये. कलम १.

परगणे भडोच किल्ल्यासुद्धां आह्मांस खासगत निसबत शिंदे, मोंगलाई अंमल द्यावयाचा तळेगांवचे समयीं करार आहे. त्याजप्रमाणें द्यावा. कलम १.

तुमचा आमचा तह होऊन स्नेह जाला, हा यथास्थित चालावा यास्तव समुद्रांतील टोपीवाले तुह्मांसीं मुखालिफ (विरुद्ध) होऊन आह्मांसीं स्नेह करावयास येतील, त्यांसीं आह्मी सलूख करणार नाहीं; आणि खुषकींतील पगडीवाले आह्मांसीं विरोध करून तुह्मांकडे येतील, त्याची तुह्मी पास करूं नये. आमचें आह्मी समजोन घेऊं. कलम १.

तुमचा आमचा तहनामा होऊन सलूख जाहला, ह्मणजे आमचे जिल्हेंत तुह्मांकडील लोक आहेत, ते तुह्मीं आपल्याजवळ बोलावून घ्यावे. कलम १.

सुरतेंत पहिला अंमल आमचा आहे, तो सुदामतप्रमाणें आमचा आह्मांकडे द्यावा. कलम १.

मुंबईकर जनरल यांनीं तुमच्या तहाप्रमाणें बिलाहुजत वर्तावें. तुमच्या हुकुमाशिवाय वर्तों नये. येविषयीं पोख्त खातरजमा आमची तुह्मीं करावी. कलम १.

प्रांत गुजरात येथील अंमल सुरत अठाविशी दरोबस्त नर्मदा उत्तर तीर व डभई व जंबुशर व भडोज सरकार अंमल व प्रांत अहमदाबाद वगैरे कुल अंमल गाइकवाडी सुद्धां दरोबस्त गुजराथ येथील किल्ले कोट व ठाणीं अंमल गाइकवाडी सुद्धां घेतला आहे, तो बमय सरंजाम किल्ल्यांतील जकीरासुद्धां माघारा द्यावा. कलम १.

प्रांत अंतरवेद येथील मुलूख सरकारचा व उभयतां सरदार वगैरे अंमल तुह्मीं नबाब सुजाउद्दवले यास मिळोन घेतला आहे, तो सोडून द्यावा. कलम १.

राजेश्री रघुनाथराव दादा तुह्मांकडे गेले, त्यांस तुह्मीं आसरा देऊन आपल्याजवळ ठेविले आहेत, ते आमचे स्वाधीन करावे. त्यांच्या खर्चवेचाचा बंदोबस्त आह्मी करूं. त्याजपासून तुह्मीं किल्ले कोटचे व मुलखाचे वगैरे दस्तऐवजी कागद करून घेतले आहेत, ते माघारी द्यावे. कलम १.

पेशजीं कैलासवासी श्रीमंत बाजीरावसाहेब व नानासाहेब व माधवरावसाहेब यांचे कारकीर्दींत तहनामा होऊन सुरळीत चालत आलें, त्याजप्रमाणें तुह्मीं आह्मीं चालावें. खत्रा पडों नये. कलम १.

श्रीकाशी व प्रयाग दोनी तीर्थांच्या जागा आहेत, त्या आह्मांकडे द्याव्या. कलम १.

समुद्रांतील जहाजांची वहिवाट दुतर्फा तुमची आमची पहिली सलुख्याचे समयीं चालत आली, त्याजप्रमाणें दुतर्फा चालावें. कलम १.

तुह्मांकडून लपटणी करणेल जान इपटीण याचे विद्यमानें तह झाल्याची निभावणी तुह्मांकडून जहाली नाहीं. मुंबईकर इंग्रज फौजबंदी करून आले, त्यांची लढाई शिकस्त जाहाल्यावर मुंबईकरांनीं तह केला; तोही निभावणींत न आला. तेव्हां नबाब निजामअल्लीखान बहादूर व हैदरखान व भोंसले व सरकार मिळोन मसलत जाहली जे, इंग्रजांशीं सर्वांनीं लढाईची मनसुबी करून लढाई सुरू करावी, व सलूख करणें तो सर्वांचे मतें सरकारांतून करावा, ऐसा ठराव जाहला. याजकरितां हैदर नाईक याचा सलूख जाहाला पाहिजे. कलम १.

सुजातउद्दवले यांचा आमचा करार आहे. त्याजप्रमाणें नबाब वजिरानें आह्मांसीं वर्तावें." कलम १.



## ४३. उदाजी चव्हाणाचें पत्र.

**श्री.**

"राजेश्री पंतप्रधान गोसावी यांसीं:—

छ सकल गुणालंकरणअखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित उदाजी चवाण हिंमतबहादुर दंडवत विनंति येथील कुशल श्रीदयाउत्कर्ष जाणून स्वकीय निजानंदादिलेखनें चित्त आनंदित करावें. विशेषः– सांप्रत पत्रद्वारें परामर्श होत नाहीं. तर आपले ह्मणविल्यास निष्ठुर चित्त न करून, प्रतिपदीं परामर्श अविस्मरणें करावा. यानंतर पूर्वीं राऊलाकडेस राजेश्री अंताजी नारायण व नारो चिमणाजी उभयतां पाठविल्यास आपण आज्ञा केली कीं, जेव्हां ह्मणाल तेव्हां घर तुमचें; सर्वस्वें आपले आहों; ह्मणोन कित्येक विशदें गुंता सांगोन पाठविलें. त्याजवरून परम संतोष मानिला कीं, आपले साभिमानी राऊल, न्यून पूर्णाधिकारी आपले ह्मणविल्यास अवलंब धरिल्यास सिद्धीतें पाववून, मनकामना तृप्ति करणार. हा दृढतर पर्याय चित्तीं आणिला कीं, आधींच कोठें राऊल भाषणीं गुंतत नाहींत. न होणाऱ्या कर्माचा अवलंब चित्तीं धरिला, तो परिणामास लावीत आहेत. सारांश कीं, हा जन्म कांहीं बहुत नाहीं. थोडक्यामध्यें आहे. त्यांहीमध्यें साधनें दोन, एक कीर्ति व एक अपकीर्ति. ज्यावर परमेश्वरी कृपा आणि पूर्व सुकृत, तेच कीर्तीचें सा' न साधितात. तसेंच राऊलाठायीं श्रीदया आणि पूर्वार्जित सुगम. तद्योगें या जन्मीं पूर्वोर्चितांसारिखा सुगम प्रसंग कीं, जें चित्तीं धराल तें सिद्धीतें पावतें. अशास स्नेह संपाद्य तर प्रामाणिक ठायींच संपादावा. नसोन संपादिल्यासारिखा साभिमान पूर्ण धरून आपल्यासारिखें करून दाखवावें. या आशयें आमचा हेत. आह्मांकडे अत्रेंही बहुत येतात. आह्मीही तशाकरितां अवलंब करितों. परंतु योग घडोनच येत नाहीं.

तस्मात् हा जन्मांतर गुण. ऋणानुबंधें हा योग घडतो. त्यास आह्मींही आपले चित्तीं दृढतर पर्याय आणिला कीं, प्रामाणिकता स्वामिकार्जी, एकनिष्ठ, सत्यसंभाषणी हे गुण राऊलाठायीं. तरीच महद्यश संपादोन कीर्ति जगप्रख्यात जाली; आणि आमची रीति वर्तणूक कोणे विचाराची तें परस्परें कळलें आहे. पत्रीं पाल्हाळ लिहिल्या शिफारसीचा प्रसंग दिसतो. त्यास कांहींएक विचाराविना प्रचीतीवांचून अनुभवास येत नाहीं. जेव्हां संग घडतो, तेव्हांच प्रचीतीस येतें. तंवपर्यंत काय कळे? आमचे चित्तींचा हेत कीं, नसोन पदरी पडल्यास साभिमान धरावा. आह्मीं सेवेसीं अंतर करूं नये, हाच दृढतर विचार व्हावा. निजामनमुल्काकडील अनुसंधान कागदपत्र हेजीब आलें. परंतु तिकडील कुविचारास चित्त अप्रशस्त. किंनिमित्य ह्मणाल, तर राऊळाकडे अन्न लाविल्यास एक वेळ सेवा करून दाखवावी. साभिमानें चित्तायोग्य पर्याय जाला तर उत्तम जालें. नाहीं तर एक वेळ कार्य करून दावावीं. नानाभिमानें अभिमान धरावा हें उचित. परंतु आपल्या थोरपणास श्लाध्य तेंच करणार. आपण ह्मणतील कीं असें काय निमित्य लिहिलें, तर राजेश्री अंताजीपंतापाशीं द्वैत्यार्थ धरून सिद्धांताची वाट सांगितली, तेच स्मरोन लिहिलें आहे. आपलें यश पराकडे जाऊं न देणें. येथें असतां तुमचे ह्मणोन राहिल्यास, स्वपक्षींही नेऊन आपले ह्मणोन ह्मणविल्याचे भूषण तें करावें. आपण तों साभिमानें योजिला अर्थ सिद्धीतें पावतील, हाच दृढतर विचार चित्तीं आणून हाल्लीं राजेश्री नारो चिमणाजी सेवेसीं पाठविले आहेत. साकल्य सांगतील. तीं आमचींच वचनें जाणून लौकिक उत्तम तें कीजे. सर्वस्वें हरएकविषयीं भरोंसा मानिला, त्यासारखें थोरपणास उचित तें करावें. बहुत काय लिहिणें, कृपा वर्धमान करावी हे विनंति."

❀ ❀ ❀

## ४४. अर्काटप्रांतावर मराठ्यांचा अंमल.

हें पत्र दक्षिण हिंदुस्थानांतील एका सरदारानें नानासाहेब पेशव्यांस श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब वारल्यानंतर लिहिलें आहे. ह्यामध्यें अर्काट प्रांत बाजीराव पेशव्यांनीं मराठ्यांकडे करार करून घेतला होता, तो निजामउल्मुलकाकडून पुनः करार करून घ्यावा व तो मराठ्यांकडे ठेवावा, अशी सूचना केली आहे. थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत अर्काट प्रांतापर्यंत मराठ्यांचा अंमल पोहोंचला होता, हें ह्यावरून दिसून येतें.

श्री.

"राजेश्री नानासाहेबांचे सेवेसीं:—

ॐ सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी राजमान्य स्नेहांकित लिंगोजी राऊत दंडवत विनंति उपरी येथील क्षेम साहेबांचे कृपादृष्टीकरून तारीख २६ जिल्काद दरजागा अरकाट जाणून यथास्थित असे. विशेषः— श्रीमंत आपा स्वामीस शरीर स्वस्थ

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] जून १९१०. [अंक ११ वा.

## विषयानुक्रम.





मुंबई:—काळकादेवीच्या रस्त्यावर कोलभाट गल्ली, घरनं. २३ येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



इंदूरचे पहिले तुकोजीराव होळकर.

## ५. नारायण दीक्षित पाटणकर.

गोदावरी व प्रवरा ह्या दोन नद्यांचे संगमावर कायगांव टोकें ह्मणून एक लहानसें क्षेत्र आहे. तेथील जहागीरदार "कायगांवकर दीक्षित" हे होत. यांचें जुनें घराणें महाराष्ट्रामध्यें फार प्रसिद्ध आहे. ह्या घराण्याचे मूळ पुरुष नारायण दीक्षित बिन गोविंद दीक्षित पाटणकर हे होत. हे मूळचे कोंकणांतील खेड रहाटागर येथील राहणारेशांडिल्य गोत्री कोंकणस्थ ब्राह्मण असून, हे सतराव्या शतकामध्यें कोंकणांतून देशांत आले. ह्यांनीं प्रथमतः गंगातीरीं पैठणास येऊन तेथें तपश्चर्या केली. त्यांची सत्कर्मपरायणता व तीव्र तपोनिष्ठा पाहून त्यांजवर गुरुप्रसाद झाला, व त्यांस सगुण साक्षात्कार होऊन ब्रह्मज्ञान झालें. नंतर ते भिक्षावृत्ति स्वीकारून, औरंगाबादेजवळ सातारें ह्मणून लहानसें गांव आहे, तें एकांतवासास योग्य स्थान आहे[१] असें पाहून तेथें गेले; आणि तेथें त्यांनीं अग्निसेवा चालविली. तेथें असतांना त्यांनीं भूतमात्रावर सारखें प्रेम ठेवून कोणत्याही जातीचा क्षुधितार्त अतीथि आला असतां, त्यास आपल्या भिक्षान्नानें संतुष्ट करण्याचा क्रम चालविला. त्यामुळें त्यांची कीर्ति दूरवर पसरून त्या प्रांतीं त्यांची विशेष प्रसिद्धी झाली.

नारायण दीक्षित ह्यांनीं कांहीं काल तीर्थयात्रा करून हिंदुस्थानांतील सर्व पुण्यक्षेत्रें व सुप्रसिद्ध देवस्थानें पाहण्यांत घालविला. प्रत्येक ठिकाणीं त्यांनीं अन्नसंतर्पण करून ब्राह्मणांस व दीन जनांस संतुष्ट केलें. त्यामुळें त्यांच्या औदार्याची ख्याति विशेष होऊन, त्यांचे ठिकाणीं आबालवृद्ध, रावरंक, स्त्रीपुरुष ह्या सर्वांची भक्ति फार जडली. नारायण दीक्षित ह्यांचें अशा रीतीनें फार माहात्म्य वाढत जाऊन, त्यांची कीर्ति श्रीमंत पंत प्रधान बाळाजी विश्वनाथ पेशवे व दुसरे प्रमुख मराठे सरदार ह्यांचे कानावर गेली. त्यांनीं भक्तिपुरस्सर ह्या थोर सत्पुरुषाचें दर्शन घेतलें, व महाराष्ट्रराज्यवृद्धीच्या कामीं त्यांचा आशीर्वाद घेतला. नारायण दीक्षित व बाळाजी विश्वनाथ ह्यांची भेट केव्हां झाली, ह्याचा काल निश्चित ठरवितां येत नाहीं. परंतु, नारायण दीक्षितांच्या कारकीर्दीचा शक १६१६ ह्मणजे इ. स. १६९४ हा प्रसिद्ध आहे. त्या अर्थी बाळाजी विश्वनाथ ह्यांचा व नारायण दीक्षित ह्यांचा परिचय पुष्कळ दिवसांचा असावा, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. नारायण दीक्षित ह्यांचा सर्वांत जुना हस्तलेख त्र्यंबकेश्वर येथील उपाध्यायाचे खतावणींत शके १५७३ सालचा सांपडतो[२]. त्या अर्थी नारायण

१. सातारें प्रांत औरंगाबाद येथें, नारायण दीक्षित तपश्चर्येसाठीं जेथें बसत असत, ती जागा अद्यापि लोक दाखवितात. २. ह्या लेखाची मिती कार्तिक वद्य ८ शके १५७३ अशी आहे.

दीक्षित ह्यांचा संचार महाराष्ट्रामध्यें इ. स. १६५० पासून होता, असें मानावें लागतें. परंतु, त्यांच्या नांवाचा उल्लेख श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज, संभाजी महाराज, किंवा राजाराम महाराज ह्यांच्या वेळच्या कागदपत्रांत किंवा बखरींत कोठें आढळून येत नाहीं. तथापि, बाळाजी बाजीराव पेशव्यांच्या एका पत्रामध्यें "थोरले दीक्षित महाराजांचा पूर्ण आशीर्वाद औरंगजेब बादशाहावर झाला होता" असा उल्लेख एक ठिकाणीं आला आहे. त्यावरून औरंगजेब बादशाहाची व नारायण दीक्षित ह्यांची भेट झाली होती, हें स्पष्ट होतें. औरंगजेब बादशाहा दक्षिणेंत व विशेषतः औरंगाबाद प्रांतीं बरेच दिवस राहिल्यामुळें ह्या सत्पुरुषाचा व त्याचा परिचय होण्याचा योग आला असावा हें संभवनीय आहे[१]. असो.

श्रीमंत छत्रपति शाहू महाराज व बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांची नारायण दीक्षितांच्या ठिकाणीं निस्सीम भक्ति जडली व त्यांनीं त्यांस गुरुस्थानीं मानून महाराष्ट्रराज्याभ्युदयाचे कामीं त्यांच्या आशीर्वादप्रसादाचा वेळोवेळी लाभ घेतला, हें निश्चित [२]आहे. शिवाजी महाराजांच्या वेळेपासून कोणत्याही राजकारणांत

१. ह्या संबंधानें पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे. "औरंगजेब बादशाहा औरंगाबाद प्रांतीं असतांना एके वेळी शिकारीस गेला. तेथे जंगलामध्यें फिरून फिरून तो फार श्रांत झाला, व त्यास फार क्षुधा लागली. तों आकस्मिक त्याचें लक्ष नारायण दीक्षित ह्यांच्या तपश्चर्येसाठीं केलेल्या जागेकडे गेलें, व त्या ठिकाणी तो आला. तो फार भुकेलेला असल्यामुळें त्यानें दीक्षित महाराजांजवळ अन्न मागितलें. दीक्षितांनी आपली झोळी आणून त्यांतून औरंगजेब बादशाहास व त्याच्या बरोबरच्या लोकांस लागेल तितकें अन्न दिलें. ह्या चमत्कार पाहून औरंगजेब बादशाहा फार थक्क झाला व त्याची ह्या सत्पुरुषाच्या ठिकाणी भक्ति जडली."

२. नारायण दीक्षित व बाळाजी विश्वनाथ ह्यांच्या भेटीसंबंधानें पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे. "नारायण दीक्षित हे औरंगाबादेजवळ सातारे येथें राहात होते. त्या सुमारास बाळाजी विश्वनाथ ह्यांच्या बंधूस जंजिऱ्याच्या हबशानें ठार मारल्यानंतर ते हबशाच्या भीतीने श्रीवर्धनाहून देशात आले. त्या वेळी नारायण दीक्षित ह्यांचा लौकिक त्यांच्या कानावर गेला. तेव्हां ते त्यांच्या दर्शनासाठीं सातारें येथे गेले. तेथें ते सहा महिने राहिले. तेथें असतांना एके दिवशीं नारायण दीक्षितांनीं त्यांस असा आशीर्वाद दिला की, "तूं महाराष्ट्रप्रांतीं साताऱ्यास जा. तेथें तुझा भाग्योदय होऊन तूं महत्पद पावशील." त्याप्रमाणें दीक्षितांची आज्ञा घेऊन ते महाराष्ट्रप्रांतीं आले. त्या समयीं नारायण दीक्षितांचे ज्येष्ठ चिरंजीव वासुदेव दीक्षित ह्यांनीं बाळाजीपंतांस म्हटलें कीं "तुमचें ईश्वरें तिकडे कल्याण केल्यास आमची आठवण ठेवावी." त्यावर बाळाजी विश्वनाथांनी असें एक पत्र लिहून दिले कीं, माझे ऊर्जित झाल्यास तुमच्या धर्मकार्यासाठी मी तुम्हांस लागेल तें साह्य करीन. हें पत्र वासुदेव दीक्षित ह्यांनीं जतन करून ठेविलें होते. पुढे बरींच वर्षे लोटल्यानंतर बाळाजी विश्वनाथांचे चिरंजीव बाजीरावसाहेब

सत्पुरुषांचा वाक्प्रसाद घेण्याची पद्धति होती. अर्थात् बाळाजी विश्वनाथ, त्यांचे पुत्र बाजीराव बल्लाळ, आणि नातू बाळाजी बाजीराव ह्यांनींही ती कायम ठेविली होती, हें निराळें सांगणें नकोच.

नारायण दीक्षित हे मोठे स्नानसंध्याशील, सत्कर्मानुष्ठानवेत्ते, भगवद्भक्त व वरदी पुरुष असल्यामुळें त्यांच्या विषयीं अनेक प्रकारच्या दंतकथा व आख्यायिका प्रसिद्ध आहेत. हे एके वेळीं द्वारकेस गेले असतां तेथ त्यांच्या चिरंजीवाची मुंज झाली. त्या वेळीं साक्षात् श्रीकृष्ण भगवानांनीं त्यांच्या मुलास भिक्षा म्हणून एक सोन्याची झारी दिली असें सांगतात.* ह्यामुळें द्वारकेस त्यांचा महिमा विशेष वाढला. तेथें असतांना त्यांनीं दोन लक्ष ब्राह्मणांस अन्नदान दिलें[१].

नारायण दीक्षित यांचा अन्नदानाबद्दल फार लौकिक आहे. त्यांचीं, काशी, कायगांव, व सातारें ह्या ठिकाणीं अन्नछत्रें व सदावर्तें होतीं. तेथें जाणाऱ्या पांथस्थ व अतीथिजनांस कधीं अन्न मिळालें नाहीं असें होत नसे. अन्नदानाचे कामीं त्यांचें विलक्षण औदार्य पाहून, प्रत्यक्ष श्रीअन्नपूर्णा त्यांस प्रसन्न झाली होती, अशी आख्यायिका आहे. एकदां काशी येथें असा चमत्कार झाला कीं, "कोणे एके वेळीं तिसऱ्या प्रहरच्या सुमारास, बरेच क्षुधार्त ब्राह्मण दीक्षितांकडे येऊन भोजन मागूं लागले. तेव्हां दीक्षित यांनीं त्यांस 'बरें' म्हणून, साहित्य-सिद्धता केली. परंतु, स्वयंपाकास कोणी मिळेना. तेव्हां आतां काय करावें

पेशवे हे निजामाकडील राजकारणानिमित्त औरंगाबादेस आले. तेव्हां ते मुद्दाम सातारें येथें नारायण दीक्षित ह्यांस भेटण्यासाठी गेले त्या वेळीं त्यांनीं आपल्या वडिलांच्या पत्राची आठवण देऊन तें परत मागितलें. नारायण दीक्षितांस त्याची कांहींच माहिती नव्हती. त्यांनीं आपल्या चिरंजीवास पत्राची हकीकत विचारून ते पत्र बाजीरावसाहेबांस परत दिलें. नंतर बाजीराव-साहेबांनीं दीक्षितांस योग्य सरंजाम करून दिला. तो पुढें त्यांच्या वंशजांनीं तसाच चालविला. पेशवाईअखेरपर्यंत दीक्षित व पेशवे ह्या दोन्ही घराण्यांचा ऋणानुबंध कायम होता."

१. द्वारका येथील देवावर नारायण दीक्षितांची विशेष भक्ति होती, सबब तेथें नित्य शंभर ब्राह्मणभोजन घालावें, असा त्यांच्या चिरंजीवांचा हेतु होता. ह्याकरितां त्यांनीं रघुनाथराव पेशव्यांकडून खर्चासाठीं पांच गांव मागून घेतले होते. ह्याचा उल्लेख रघुनाथ बाजीराव ह्यांच्या ता. २० मार्च इ. स. १७५४ च्या पत्रांत आढळतो. तो येणेंप्रमाणें:—

"प्रांत गुजराथ आपल्याकडे जाली आहे. थोरले दीक्षितांचें दैवत श्रीकृष्ण द्वारकाक्षेत्र आपणाकडे आलें आहे. तेथें शंभर ब्राह्मणभोजन नित्य घालावें ऐसें चित्तांत आहे. त्याचे खर्चास त्या प्रांतीं गांव नेमून द्यावे म्हणोन तुम्हीं विदित केलें. ऐशास आम्हीं पुणेंयास आलियावर पांच हजारांचे गांव वसुली सरकारांतून नेमून देऊं."

ह्या उल्लेखावरून गुजराथ व द्वारकाक्षेत्र इ. स. १७५४ च्या सुमारास पेशव्यांकडे आल्याचें दिसून येतें.

ह्मणून ते चिंताग्रस्त झाले. तों एक भव्य व वृद्ध स्त्री तेथें येऊन ह्मणाली: 'मी स्वयंपाक करणेस तयार आहें; आपण स्वस्थ असावें.' त्याप्रमाणें तिनें येऊन पाकसिद्धि करून सर्व ब्राह्मणांस संतृप्त केलें. नंतर ती परत गेली. परंतु तिनें स्वयंपाक करितांना, नाकांतील नथ काढून एका कोनाड्यांत ठेविली होती, ती तेथें तशीच राहिली. इकडे दुसरे दिवशीं, अन्नपूर्णेच्या देवळांतील पुजारी देवीची पूजा करावयास लागले; तों देवीच्या नाकांत नथ नाहीं. त्यावरून त्यांनीं पुष्कळ शोध केला. परंतु नथीचा ठिकाण लागेना. शेवटीं त्यांस देवीचा असा दृष्टांत झाला कीं, 'काल मी दीक्षितांचे घरीं स्वयंपाकास गेलें होतें; तेथें एका कोनाड्यांत नथ काढून ठेविली आहे. ती तेथें पहा ह्मणजे सांपडेल.' त्याप्रमाणें पुजारी सकाळीं दीक्षितांचे घरी गेले व त्यांनीं दृष्टांताप्रमाणें कोनाड्यांत नथ पाहिली. तों ती तेथें जशीच्या तशीच ठेविलेली होती. तेव्हां दीक्षितांस कळलें कीं, काल स्वयंपाकास आलेली स्त्री साक्षात् श्रीअन्नपूर्णा होती."[१] अशा प्रकारच्या अनेक चमत्कारिक आख्यायिका काशी येथें प्रसिद्ध आहेत. भगवद्भक्तांच्या चरित्रांतील हे चमत्कार सर्व देशांत सारखेच आढळून येतात.

नारायण दीक्षित यांनीं मराठ्यांच्या राजकारणांत किती भाग घेतला होता, हें स्पष्ट समजण्यास मार्ग नाहीं. तथापि, त्यांचा व पेशव्यांचा जो पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून त्यांच्यावर पेशव्यांची परम निष्ठा असून, त्यांच्या आशीर्वचनांच्या बळानें किंवा त्यांच्या सल्लामसलतीनें पेशव्यांचीं राजकारणें चालत असत, असें मानिलें असतां चुकीचें होणार नाहीं. नारायण दीक्षित यांची गंभीर, तेजस्वी, पुण्यशील आणि स्वधर्मनिष्ठ मूर्ति मराठ्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतील राजकारणांत पुष्कळ वेळां दिसून येते. प्रथमतः ते कायगांव टोकें येथें राहत होते. तेथून ते काशीस गेले. पुढें त्यांचें वास्तव्य बहुतकरून ह्याच पुण्यक्षेत्रामध्यें अखेरपर्यंत होतें. तथापि, त्यांना, दिल्ली, राजपुताना, लखनौ, मुर्शिदाबाद वगैरे ठिकाणच्या सर्व राजकारणांची अंतस्थ बातमी असून, पेशव्यांचें अभीष्ट चिंतन करण्यांत, त्यांना वेळोवेळीं सल्लामसलत देण्यांत व यशाची गुरुकिल्ली सांगण्यांत ते सदैव तत्पर असत, असें दिसून येतें. एके वेळीं थोरले बाजीराव पेशवे, सवाई जयसिंगाच्या अनुमतानें दिल्लीच्या राजकारणांत गुंतले असतांना,

१. काशी येथें नारायण दीक्षितांचा वाडा अद्यापि आहे. ज्या वाड्यांत अन्नपूर्णेनें स्वयंपाक केला व नथ ठेविली, ती जागा अद्यापि प्रसिद्ध आहे. ह्या जागेची भाविक लोक मोठ्या आस्थेनें अद्यापि पूजा करितात.

रजपुतांच्या स्नेहसंबंधावर विशेष लक्ष ठेवून, ते स्वसैन्यापासून दूर राहूं लागले. ही गोष्ट नारायण दीक्षित यांस समजतांच, त्यांनीं बाजीरावास उपदेशपर पत्र पाठवून शेवटीं असें लिहिलें कीं, "आपलें स्वसैन्य टाकून एक घटिका कोठें न राहणें. रहाल तर तुह्मांस माझी शफथ आहे." ह्या महापुरुषाच्या वाणीमध्यें जें निस्सीम प्रेम व जी कळकळ वसत असे, तिचा प्रभाव केवळ अवर्णनीय होय. तो जाणण्याइतकें सहृदयत्व व तादात्म्य पेशव्यांच्या ठिकाणीं होतें, ह्मणून त्यांस सत्पुरुषाचा कृपालाभ झाला, व त्यांनीं त्याचें आपल्या गुरूस योग्य चीज करून दाखविलें. नारायण दीक्षित ह्यांचा व बाळाजी विश्वनाथ व [1]बाजीराव ह्यांचा जुना पत्रव्यवहार अद्यापि फारसा उपलब्ध झालेला नाहीं. तथापि, बाळाजी बाजीराव व चिमाजी आप्पा ह्यांनीं लिहिलेलीं जीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत, त्यांवरून त्यांचा व पेशव्यांचा संबंध किती जिव्हाळ्याचा होता, व त्यांचीही दीक्षितांचे ठिकाणीं किती श्रद्धा होती, हें चांगलें दिसून येतें. ह्या पत्रांपैकीं दोन उतारे येथें मासल्यासाठीं देतों.

श्री. २९ सप्तंबर इ. स. १७४०.

"तीर्थरूप वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षित स्वामी वडिलांचे सेवेसीः— अपत्यें चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजीराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम आश्विन व॥ ५ मुक्काम कसबे पुणें स्वामींच्या कृपेंकरून यथास्थित असे विशेषः— स्वामींनीं ज्येष्ठ शुद्ध १० चें पत्र पाठविलें, तें पावलें. सविस्तर अर्थ कळला. सारांश, स्वामींचे आशीर्वादाचा सर्व आमचा विचार आहे. स्वामींच्या आशीर्वादापेक्षां दुसरें दैवत जाणत नाहीं.

'संसर्गदोषाचा परिहार करावा' याविशीं आज्ञा लिहिली, तर अवश्यक स्वामींचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं.

---

१. थोरले बाजीराव ह्यांची भक्ति नारायण दीक्षित ह्यांच्या ठिकाणीं व त्यांच्या चिरंजीवाच्या ठिकाणीं विशेष होती. नारायण दीक्षित हे बाजीरावांस फार उत्तेजन देत व शिवाजीरामदासांप्रमाणें त्यांचा परस्पर प्रेमसंबंध होता असे दिसतें. रामदास स्वामींनीं शिवाजीस ज्याप्रमाणें मोंगलाच्या ताब्यांतील गांव जहागीर मागितले होते, त्याप्रमाणें नारायण दीक्षितांनीं बाजीरावांस मथुरेजवळ धर्मकृत्यासाठीं दहा गांव मागितले होते. ता २४ जुलई इ स. १७३५ च्या पत्रामध्यें बाजीराव लिहितातः–"स्वामीनें मथुरेसन्निध धर्मकृत्यास दहा गांव मागितले. त्यास तेथें आपला अंमल बैसला ह्मणजे दहा गांव तुह्मी मागाल ते इनाम करून देऊं." पेशव्यांचा अंमल दूर प्रांतावर बसावा आणि महाराष्ट्र राज्याचा विस्तार व्हावा, असा ह्या सत्पुरुषाचा हेतु दिसतो.

ह्या पत्रांवरून लोकहिततत्पर थोर महापुरुष सत्कर्माचरणामध्यें निमग्न असून महाराष्ट्रराज्यवृद्धीचे कामीं पेशव्यांस कसे साहाय्यभूत झाले होते, हें चांगलें स्पष्ट होतें.

नारायण दीक्षित हे मोठे स्वधर्माभिमानी, कर्मिष्ठ व तपस्वी ब्राह्मण असून मोठे दूरदर्शी व मुत्सद्दी पुरुष होते. ते काशी येथें असतांना एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. श्रीक्षेत्र काशी हें हिंदुधर्माचें आगर. हें क्षेत्र यवनांचे ताब्यांत असल्यामुळें तें हस्तगत करून घेण्याची मराठ्यांची विशेष इच्छा होती. ती पूर्ण करण्यासाठीं पेशव्यांनीं व शिंदे होळकरादि सरदारांनीं बहुत प्रयत्न केले. त्याबद्दलचे उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रांत पुष्कळ सांपडतात. एके वेळीं (इ. स. १७४२ मध्यें) श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे बंगालचे स्वारीस निघाले असतां, काशी घेण्याचे निमित्तानें काशीकडे वळले. काशीचे अलीकडे मिर्झापूर येथें श्रीमंतांचा तळ पडला. ही गोष्ट अयोध्येचा नबाब सुजाउद्दवला ह्यास समजून तो फार घाबरला. त्यानें सर्व क्षेत्रींचे ब्राह्मण जमा करून, त्यांस असें सांगितलें कीं, "तुमचे ब्राह्मण राजे काशी घ्यावयास येतात; त्यांस माघारे फिरवावें. नाहींतर तुह्मा सर्वांस मुसलमान करीन." असें जरबीचें भाषण ऐकतांच, नारायण दीक्षितप्रभृति मंडळी उघडी बोडकी पेशव्यांकडे गेली, व त्यांनीं पेशव्यांस सर्व वृत्तांत कळवून अशी विनंति केली कीं, "आमचें ब्राह्मणपण राखावयाचें असल्यास आपण माघारे फिरावें हें चांगलें." श्रीमंतांनीं हा ब्राह्मणांचा उपदेश ऐकून स्वारीचा रोख बदलला. नारायण दीक्षित यांनीं या प्रसंगीं बाळाजी बाजीराव पेशव्यांस जी राजकारणाची सल्ला दिली, ती फारच महत्वाची व मुत्सद्दीपणाची असली पाहिजे, यांत शंका नाहीं.[१]

१ ही हकीकत इ. स. १७४२ मध्यें घडून आली. पेशव्यांच्या रोजनिशीमध्यें छ ८ रबिलाखर सलास आर्बैन ह्मणजे ता. १ जून १७४२ रोजीं मिर्झापूर येथें पेशव्याचा मुक्काम नमूद केलेला आहे व त्यापुढील मुक्काम नाहीत. त्यावरून स्वारी मिर्झापूरपर्यंतच गेली होती एवढें सिद्ध आहे. ह्याच प्रसंगाचें एक पत्र कायगावकर दीक्षिताचे दप्तरांत उपलब्ध झालें आहे. ह्या पत्राची तारीख २७ जून सन १७४२ ही आहे. ती वरील मुक्कामास मिळती आहे. ह्या पत्रामध्यें पेशव्याचे सरदार मल्हारजी होळकर ह्यांचा विचार, काशी घेऊन श्रीविश्वेश्वराजवळील मशीद पाडून, पुन्हां देऊळ करावें असा होता. परंतु तसें करणें काशींतील ब्रह्मवृंदास संकटावह होईल, अशा अर्थाचा उल्लेख आहे. तो वाचण्यासारखा आहे:—

नारायण दीक्षित पाटणकर ह्यांच्या संबंधाचे संपूर्ण अस्सल कागदपत्र उपलब्ध झाले ह्मणजे त्यांचें चरित्र सांगोपांग सिद्ध होईल, व त्यावरून त्यांची खरी योग्यता व त्यांची राष्ट्रीय कामगिरी ह्यांची बरोबर अटकळ करितां येईल. तथापि, त्याच्या अभावीं, सांप्रत उपलब्ध झालेल्या त्यांच्या तुटपुंज्या माहितीवरून एवढें सिद्ध आहे कीं, ते एक भगवद्भक्त, स्वधर्मनिष्ठ, आणि परोपकारपटु असे थोर सत्पुरुष होते, व पेशव्यांची त्यांच्या विषयीं पूज्यबुद्धि असून त्यांनीं त्यांना आपल्या गुरुस्थानीं मानिलें होतें. त्यांच्या सारख्या थोर व पवित्र सत्पुरुषांचीं चरित्रें अनेक दृष्टींनीं मनोरंजक व बोधपर आहेत ह्यांत शंका नाहीं.

नारायण दीक्षित पाटणकर ह्यांचा, काशी येथें, कार्तिक शुद्ध १४ शके १६७० ह्मणजे ता. १४ आक्टोबर इ. स. १७४८ रोजीं, अंत झाला. त्या वेळीं त्यांचें वय १२० वर्षांचें होतें असें ह्मणतात. नारायण दीक्षित ह्यांस लक्ष्मीबाई ह्या नांवाची पत्नी होती. तीही मोठी पतिव्रता व साध्वी असून, ती दीक्षितांच्या मनाप्रमाणें क्षुधितास अन्नदान देण्याचे कामीं अतिशय तत्पर असे. तिच्या पोटीं नारायण दीक्षित ह्यांस वासुदेव दीक्षित व बाळकृष्ण दीक्षित असे दोन पुत्र झाले. तेही बापाप्रमाणें मोठे स्वधर्मनिष्ठ, सदाचारसंपन्न व शहाणे निघाले. ह्या उभयतांच्या ठिकाणीं बाळाजी बाजीराव, रघुनाथ बाजीराव, व रघूजी भोंसले वगैरे सरदारांची अत्यंत निष्ठा असून, ते त्यांस गुरुस्थानीं मानीत असत. वासुदेव दीक्षित व बाळकृष्ण दीक्षित ह्यांनीं बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांस अनेक राजकारणांत उत्कृष्ट साहाय्य केलें. हैदराबादेकडील राजकारस्थानांत बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांची सर्व मदार वासुदेव दीक्षित यांजवर होती, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ह्यांचा पत्रव्यवहार फार महत्त्वाचा असून, तो मराठ्यांच्या

"मल्हारजीचे चित्तांत की, मशीद, विश्वेश्वराची ज्ञानवापीजवळील ते पाडून देवालय करावें. परंतु पंचद्राविडी ब्राह्मण चिंता करितात की, हे मशीद प्रसिद्ध आहे. पातशाहाचा हुकूम नसतां पाटील देऊळ करील. एकादा पातशाहा दुष्ट जाला ह्मणजे ब्राह्मणांस मरण येईल. जीवच घेईल. यवन प्रबल या प्रांतीं विशेष आहेत. सर्वांचे चित्तास येत नाही. दुसरे जागा बांधिलें तरी बरें आहे. ब्राह्मण चिंता करितात. * * * ब्राह्मणांची तरी दुर्दशा होईल. गंगा समर्थ! काशीत ब्राह्मण चिंता करितात. मना करीसा कोणी नाहीं. मना करावें तरी की, देवाची स्थापना मना करावी हा दोष! परंतु ब्राह्मणा संकट न पडे तें करावें, हें पुण्य विशेष. याजवर विश्वेश्वराचे चित्तांत येईल ते करील. चिंता करून काय होणें? याजवर मशीद पाडूं लागतील तेव्हां सर्व ब्राह्मण मिळतील आणि श्रीमंतांस विनंतिपत्र पाठवितील, ऐसा विचार जाला आहे. वर्तमान श्रवण केलें तें सेवेसीं लिहिलें. इ. इ. इ. मिती आषाढ शुद्ध हे विज्ञापना."

इतिहासांतील कित्येक गोष्टींचा चांगला खुलासा करण्यास फार उपयोगीं पडण्यासारखा आहे.

वासुदेव दीक्षित ह्यांची कारकीर्द इ. स. १७४८–१७६० पर्यंत झाली. ह्यांचे बंधु बाळकृष्ण दीक्षित ह्यांची कारकीर्द इ. स. १७६०–१७७० पर्यंत झाली. बाळकृष्ण दीक्षित हे वासुदेव दीक्षितांप्रमाणेंच मोठे चतुर व राजकारण-कुशल पुरुष होते. हे, वासुदेव दीक्षितांप्रमाणेंच नारायण दीक्षितांच्या शिक्षणामध्यें तयार झाल्यामुळें, त्यांच्या अंगीं लोकसंग्राहक शक्ति चांगली येऊन व त्यांचें वजन लोकसमाजावर चांगलें पडून, ते सर्वांस वंद्य झाले होते. ह्या उभयतां बंधूंचें परस्परांवर अत्यंत प्रेम असून, उभयतांनीं पेशव्यांस अनेक प्रकारें साहाय्य केलें होतें. बाळकृष्ण दीक्षित ह्यांची प्रतिष्ठा पेशव्यांच्याच दरबारीं होती असें नाहीं; परंतु निजाम व दिल्लीचे बादशाहा ह्यांच्याही दरबारीं त्यांची फार मान्यता असून, त्यांच्या घराण्याबद्दल त्या दरबारांत पराकाष्ठेची आदरबुद्धि असल्याचें दिसून येतें. इ. स. १७५४ सालीं श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब पेशवे व होळकर वगैरे सरदार दिल्ली येथें गेले होते. त्या वेळीं बाळकृष्ण दीक्षित हे काशी, गया, प्रयाग वगैरे त्रिस्थळीं यात्रा करून, दिल्लीपतीच्या भेटीसाठीं दिल्लीस गेले. त्या वेळीं त्यांचा बादशाही दरबारांत मोठा सत्कार होऊन, त्यांस बादशाहानें १५००० चे गांव, व पालखी, मोर्चेल, चवरी वगैरे सन्मान अर्पण केले. ह्या प्रसंगीं निजाम उल्मुल्क असफ्जहा ह्यांनीं बादशाहाजवळ दीक्षितांचे घराण्याबद्दल बहुत तारीफ केली. ह्या संबंधानें बाळाजी बाजीराव यांनीं वासुदेव दीक्षित ह्यांस लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें अत्यंत वाचनीय असून, त्यावरून दीक्षितांच्या घराण्याची योग्यता व थोरवी त्या काळीं केवढी होती, हें चांगलें दिसून येतें. तें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"वेदशास्त्रसंपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेसीं:—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत गेलें पाहिजे. विशेष:- दिल्लीकडील वर्तमान, चिरंजीव राजश्री रघुनाथराव व होळकर वगैरे सरदार फौजेसह दिल्लींत सुखरूप पोहोंचले. वेदशास्त्रसंपन्न महाराज राजश्री बाळकृष्ण दीक्षितबावा यांची सवारी दिल्लीस आली आहे. त्यांचा बादशाहाचे दरबारांत मानमरातब पूर्वापार आपले घराण्याचे योग्यतेनुरूप राहण्याची तजवीज राहावी ह्मणून निजामनमुलूख असफजहा

यांस तेथून लिहिलें होतें. चिरंजीव यांनींही, दोन मुकाम अगोदर, दीक्षितांची स्वारी आली आहे ह्मणून बादशाहास सूचना केली होती. त्यावरून योग्य तरतूद जाली, व याबद्दल नबाब निजामनमुलूख असफजहांचें पत्र मजकडेस आलें. त्यांत ते लिहितात कीं, "दीक्षितमहाराजांस दिल्ली शहरांत आणण्या-करितां लवाजम्यासह पेशवाईस जाऊन आणणेबद्दल बादशाहाचा मला हुकूम जाला होता. त्याप्रमाणें आदरपूर्वक सन्मानानें शहरांत आणिलें. बादशाहाचे भेटीचे दिवशीं, वर लिहिलेप्रमाणें मोठे सन्मानानें दरबारांत आणिलें. खुद्द बादशाहा दरवाज्यापर्यंत सामोरे येऊन, हात धरून नेऊन बसविलें. फार सत्कार ठेविला. बादशाहा दीक्षितांसी बोलले की, 'राजा शाहूचे जे गुरु, व थोरले दीक्षित महाराजांचा पूर्ण आशीर्वाद औरंगजेब बाहशाहावर जाला असून, आपलेच आशीर्वादानें ह्या बादशाहीची दिवसेंदिवस ऊर्जित दशा आहे. आपले वडील पैगंबराप्रमाणें होऊन गेले. तीच योग्यता आपली आहे. तेव्हां आपण येथें येऊन दर्शन दिल्यामुळें आह्मी आज कृतार्थ जालों.' वगैरे भक्तिपूर्वक भाषणेंकरून फारच गौरव केला. थोरले नारायण दीक्षितमहाराजां-प्रमाणें सन्मान ठेविला. नंतर पंधरा हजारांचा गांव जहागीर देऊन फरमान करून दिलें; व पोषाख, पालखी, मोरचेल, चवरी, जवाहीर वगैरे खिलत दिली. नबाबांनीं लिहिलें:—'दीक्षितांस जहागीरच काय! त्यांचें पुण्य बलवत्तर. त्यांस ईश्वराची कृपा व आपण त्यांचे शिष्य, तेव्हां त्यांस काय कमी आहे? परंतु रयासतीचें कल्याण व आह्मीं कृतार्थ व्हावें, ह्याकरितां ही यत्किंचित् सेवा केली." याप्रमाणें पत्र आलें. दीक्षित लवकरच काशीस जातील. शरीरेंकरून क्षेम आहेत. काळजी नसावी. वरचेवर पत्र येत असावें."

असो. यवनधर्मी दिल्लीचा बादशाहा व असफजहा निजाम-उल्-मुलूक ह्यांनीं ज्या महापुरुषांचा एवढा गौरव व बहुमान केला, त्यांची योग्यता जाणण्यास कोण समर्थ आहे? अशा थोर व परमवंद्य सत्पुरुषांच्या घराण्यांचा इतिहास प्रसिद्ध नसल्यामुळें त्यांची विस्मृति महाराष्ट्रास झाली आहे, ही अत्यंत दुःखाची गोष्ट होय.

नारायण दीक्षित हे संस्कृतज्ञ व विद्वान् होते. ह्यांचीं सर्व पत्रें बालबोध लिपीमध्यें आहेत. ह्यांच्या चिरंजिवांचीं पत्रेंही बालबोध लिपींतच आहेत. नारायण दीक्षित हे पुढें वार्धक्यानें अगदीं जर्जर झाले असून त्यांचा लिहितांना हात कांपत असे असें दिसतें. त्यांनीं बाळाजी बाजीरावांस लिहिलेलें पत्र वर दिलें

आहे. त्या पत्रावर त्यांच्या हातचीं 'श्रीकृष्ण' अशीं अक्षरें आहेत. ते नेहमीं आपली सही न करितां 'श्रीकृष्ण' असें लिहीत आहेत. ह्या अक्षरांचा अस्सल बरहुकूम मासला येणेंप्रमाणें आहेः–



वासुदेव दीक्षित व बाळकृष्ण दीक्षित ह्यांचे वंशज अद्यापि विद्यमान असून त्यांच्याकडे खानदेशांतील शेंदुर्णी व निजामाचे राज्यांतील कायगांव हीं गांवें जहागीर आहेत. हे महाराष्ट्रामध्यें शेंदुर्णीचे जहागीरदार ह्या नांवानेंही चांगले प्रसिद्ध आहेत.*

* नारायण दीक्षितांची वर दिलेली माहिती, त्यांचे वंशज व शेंदुर्णीचे जहागीरदार श्री० केशवराव जनार्दन दीक्षित व त्यांचे बंधु श्री० महादेव जनार्दन दीक्षित एम्. ए., बी. एस. सी., डेप्युटी कलेक्टर सातारा, ह्यांनीं आह्मांस दिली, ह्याबद्दल त्यांचे आह्मी फार आभारी आहोंत. रा. राजवाडे ह्यांनीं नारायण दीक्षित व त्यांचे चिरंजीव ह्यांचा कांहीं पत्रव्यवहार प्रसिद्ध केला आहे, परंतु त्याखेरीज जुना पत्रव्यवहार अद्यापि पुष्कळ अप्रसिद्ध आहे. तो लौकरच उजेडांत येईल अशी आशा आहे.

To MILITARY CHARGES

For amount cash paid to Captain W. D Cleiland, Commanding the Escort. Amount of his receipt, dated the 1st April 1815, Poona Sicca Rupees 1605 or Chandoree Rupees 1733 1 60

To PENSION

For amount cash paid to a Pensioner 5 3 76

Chandoree Rupees 38,693—0-63

E. E.

Nasseek 1st June 1885

M E. ELPHINSTONE,

Rt. at Poona.



## ३६. नागपूरकर भोंसल्यांचे चिटणीस.

श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे ह्यांनीं नागपूरकर रघूजी भोंसले ह्यांच्या तैनातीस, बाबाजी गोविंद नामक एका गृहस्थाची योजना केली. हे बाबाजी गोविंद नागपूरचे पहिले चिटणीस. हे थोरले रघूजी भोंसले ह्यांच्या कारकीर्दीपासून जानोजी भोंसले ह्यांच्या कारकीर्दीपर्यंत चिटणिमीचें कामकाज पहात असत. ह्यांचे जवळ कृष्णराव माधव ह्मणून एक हुशार पुरुष होते. ते बाबाजी गोविंद ह्यांच्या फार मर्जींतले होते. बाबाजी गोविंद मेल्यानंतर त्यांसच चिटणिशीचा दरक मिळाला, व ते त्यांचे जागीं बहाल झाले. त्यास तीन हजार रुपये दरमहा व पालखीची नेमणूक होती. यांचे बंधू गंगाधरराव. ह्यांस नेमणूक अडीच हजार रुपयांची होती. कृष्णरावांची नेमणूक पुढें पांच हजारांची झाली. कृष्णराव ह्यांचे हाताखालीं आपाजी ह्मणून मदतनीस होता. ह्या आपाजीचा पुत्र नारो आपाजी. मुधोजी भोंसले मेल्यानंतर कृष्णराव हे कांहीं दिवस राज्यकारभार पहात होते. इंग्रज बहाद्दराचे लढाईचे समयीं (इ. स. १८१७) कृष्णराव मृत्यु पावले. त्यांचे जागीं गंगाधर माधव बहाल झाले. नारो आपाजी ह्याजकडे कागदपत्र लिहिण्याचें काम होतें, तेंच कायम

राहिलें. परंतु त्यांची पेशकदमी अधिक अधिक होत गेली. ह्यास पुढें ९००० हजार रुपये व पालखीची नेमणूक झाली. ह्यांचेच वंशज नागपूरचे सुप्रसिद्ध नामदार गंगाधरराव चिटणीस हे होत.*



## ३७. हयग्रीवबास मानभाव.



गद्यकार सुप्रसिद्ध मानभाव हयग्रीवबास ह्यांचें नांव हिरण्यगर्भभट्ट असें होतें. हे गोदावरीचे कांठीं पंचाळेश्वराजवळ राक्षसभवन नांवाचें गांव आहे तेथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचा जन्मकाळ शके ११९७ माघमासीं झाला. ह्यांचे पिते माधवभट्ट. हे मोठे शास्त्रज्ञ असून विद्वान् होते. ह्यांची पत्नी कावेरी. तिच्या पोटीं हिरण्यगर्भभट्टांचें जन्म झालें. ह्यांचें प्रथमपासून श्रीमद्भागवताकडे फार लक्ष. त्यांतील दशमस्कंदाचा नित्य पाठ केल्यावांचून ते अन्नोदक घेत नसत. एके वेळीं ते काशीयात्रेस निघाले, ते मार्ग क्रमीत पारसनाथाचे शिरपुरास गेले. तेथें गोपाळ पंडित नामें महात्मधर्मातील प्रख्यात पुरुष होते. यास 'आनेराज' अशीही संज्ञा होती. तेथें दोघांचा शास्त्रोक्त संवाद झाला. त्यांत देवताधर्मापेक्षां परमेश्वरधर्म श्रेष्ठ ऐसें त्यांचे अनुभवास येऊन ते गोपाळ पंडितांचे शिष्य झाले, व त्यांनीं महात्मधर्मातील दीक्षेचा शके १२३१ सालीं स्वीकार केला. मग कांहीं दिवसांनीं ते पैठणास येऊन राहिले. ते भागवताचा नित्य पाठ करीत असत. त्या पाठासाठीं त्यांनीं दशमस्कंदावर प्राकृत श्लोकबद्ध टीका लिहिली आहे. ते २८० श्लोक आहेत. त्याचेंच नांव 'गद्य' असें आहे. हे पुरुष शके १२४६ सालीं वैशाख शुद्ध द्वादशीस पैठण येथें वारले.



---

* ही माहिती एका वृद्ध गृहस्थाच्या स्मरणवहींतून दिली आहे. नागपूरचे नामदार चिटनवीससाहेब आपल्या घराण्याची विस्तृत माहिती पाठवून देतील, तर ती आम्ही मोठ्या आनंदानें प्रसिद्ध करूं.

# ३८. रामाजी कामत.

१८ व्या शतकाच्या प्रारंभीं मुंबई येथें, जे धनाढ्य, लोकमान्य व राजमान्य असे रहिवासी होऊन गेले, त्यांमध्यें रामाजी कामत ह्या नांवाचा एक शेणवी गृहस्थ फार प्रसिद्ध होता. ह्याचें नांव 'रामा कामत' असेंही लिहिलेलें आढळतें. इंग्रजी ग्रंथांतरीं 'रामा कामती' (Ràmà Kàmati) असें लिहिलें आहे. त्यावरून मराठीमध्यें 'रामा कामांटी' असाही उच्चार होऊन, तो कामाठी जातीचा होता, असा गैरसमज होण्याचा संभव आहे. परंतु साधार माहिती-वरून त्याचें नांव 'रामा कामत' हेंच असून तो सारस्वत ब्राह्मण होता, हें आतां निश्चित झालें आहे. हा गृहस्थ फार धर्मनिष्ठ व उदार होता. ह्यानें मुंबई येथें पुष्कळ देवालयें बांधिलीं असून, त्यांपैकीं वाळकेश्वराचें देवालय अद्यापि प्रसिद्ध आहे. हा हिंदुधर्माचा अभिमानी होता, तथापि इतर धर्मांविषयीं त्याच्या मनांत द्वेषबुद्धि वागत नसे. ह्यानें तंबाखूची लागवड व व्यापार करून ४० वर्षांमध्यें पुष्कळ द्रव्य संपादन केलें होतें. त्याच्या संबंधानें मुंबईच्या कौन्सिलनें सुरतेच्या इंग्रजी अंमलदारास ता. ५ फेब्रुवारी इ. स. १६८६ रोजीं जें पत्र लिहिलें आहे, त्यावरून तो तंबाखूचा व्यापार प्रामाणिकपणानें करून सरकाराचे पैसे वेळचेवेळीं देत असे, असें दिसतें. त्याच्या संबंधानें मुंबईच्या इंग्रजी अधिकाऱ्यांचें त्या वेळीं अनुकूळ मत होतें. रामा कामताची दिवसेंदिवस अधिक भरभराट होत गेली व त्याचें लोकांमध्यें व इंग्रजांच्या दरबारीं चांगलें वजन वाढलें. तें इतकें कीं, इंग्रज अधिकाऱ्यांनीं त्यास एके वेळीं मुंबईच्या एतद्देशीय सैन्याचें आधिपत्यही दिलें होतें. परंतु 'नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण' ह्या न्यायानें त्यास लवकरच अवनतस्थिति प्राप्त झाली. इ. स. १७२० मध्यें कुलाब्याचा कान्होजी आंग्रे फार प्रबल होऊन, त्यानें मुंबईच्या समुद्रकिनाऱ्यावर एकसारखी चांचेगिरी सुरू केली होती; व त्यानें इंग्रज, पोर्तुगीज वगैरे परराष्ट्रीय व्यापारी लोकांस अगदीं त्रासवून सोडिलें होतें. त्या समयीं मुंबईस चार्लस बून ह्या नांवाचा गव्हनर होता. त्यास कान्होजी आंग्र्याची फार दहशत बसली. ही संधि रामा कामताच्या मत्सर करणाऱ्या शत्रुवर्गास, त्याचा नाश करण्यास फार अनुकूल आहे असें वाटून, त्यांनीं मुंबईचा गव्हरनर बून ह्यास असें कळविलें कीं, रामा कामत हा इंग्रज अधिकाऱ्यांच्या विरुद्ध असून, त्यानें कान्होजी आंग्र्याशीं राजद्रोही पत्रव्यवहार चालविला आहे व इंग्रजांची राजसत्ता उलथून पाडण्याचा

त्याचा प्रयत्न चालू आहे. ही गोष्ट रामा कामताच्या शत्रूंनीं खोट्या पुराव्यानिशीं सिद्ध करून दाखविली. त्यामुळें गव्हर्नर बून ह्याचें मस्तक खवळून गेलें. त्यानें त्याजवर राजद्रोहाचा आरोप ठेवून, त्याची चौकशी करण्याकरितां ब्रौन, कोर्टने, फिलिप्स व हॉर्न ह्यांची एक कमिटी नेमिली. त्यांनीं त्याजवर एकंदर सात आरोप ठेविले. ह्या आरोपांमध्यें रामानें कान्होजी आंग्र्यास लिहिलेलीं दोन पत्रें सामील केलीं होतीं. ह्या संबंधानें गव्हर्नर बून व त्याचें कौन्सील ह्यांच्या पुढें चौकशी झाली. अखेर रामावरील आरोप शाबीत ठरून त्यास ता. २१ एप्रिल इ. स. १७२० रोजीं जन्मठेपेची शिक्षा झाली; आणि त्याची सर्व मालमत्ता व जमीनजुमला जप्त करण्यांत आला. त्याची मुंबईच्या कोटांतील स्थावर मिळकत २०००० हजार रुपयांस विकली गेली, व त्याच्या नारळीच्या बागा वगैरे ३७९८९ रुपयांस विकल्या गेल्या ! ! ह्याप्रमाणें मुंबईच्या एका धनाढ्य व प्रतिष्ठित रहिवाशाचा निकाल लागला. रामा कामत हा शेवटीं तुरुंगामध्यें ८ वर्षांनीं ह्मणजे इ. स. १७२८ मध्यें मृत्यु पावला ! !

रामा कामत ह्याच्या मागून त्याचा साथीदार दुलबा भंडारी ह्याची चौकशी झाली व त्यासही ६००० रुपये दंड झाला.

रामा कामत व दुलबा भंडारी ह्यांच्या खटल्यांची हकीकत फार मनोरंजक असून तिच्यावरून त्या वेळच्या–ह्मणजे १८ व्या शतकाच्या प्रारंभीं–मुंबईत जी न्यायपद्धति होती, तिचा मासला दिसून येतो. ह्या खटल्यांत जो न्याय झाला, तो बरोबर नव्हता असें पुढें उघडकीस आलें, व रामा कामताचीं पत्रें बनावट केलेलीं असून त्याच्या वरील सर्व पुरावा जुलमानें तयार केला होता, असेंही जगजाहीर झालें ! *रामा कामताच्या खटल्याची खरी हकीकत मि० अंडरसन, मि० क्यांबेल व मि० एडवर्डस् ह्या इंग्रज लेखकांनीं सविस्तर दिली आहे, त्यावरून त्यांची सत्यप्रीति व्यक्त होते.



---

* मि० एस्. एम्. एडवर्डस् ह्यानी ह्या संबधानें असे स्पष्ट लिहिलें आहे कीः—

"The memory of what he (Mr Boone) effected towards ameliorating the helpless condition of our island is completely over shadowed by regret for this act of inhumanity, and regret which is heightened by the knowledge, now vouch safed to us, that Rama Kamati was guiltless, that the incriminating letters were the merest forgeries!'

—*The Rise of Bombay P. 155.*



**बंगालचा नबाब सुराज उद्दौला.**

(कारकीर्द:- इ. स. १७५६–इ. स. १७५७.)

## ४०. सवाई माधवराव ह्यांचा मरणशक.

सवाई माधवरावाच्या मृत्यूचा शक कोणी गृहस्थानें पुढील श्लोकांत वर्णन केला आहेः—

श्लोक.

नगकुनगकुशाके प्राग्दले राक्षसाब्देऽ
श्विनिभयुतकुजाहे पौर्णिमा चाश्विनस्य ।
अखिलनरवरश्रीमाधवाख्यः प्रधानो
दिनमणिरिव चास्तं देवलोकं जगाम ॥ १ ॥



## ४१. द्वामोशायन.

हा शब्द 'इतिहाससंग्रह' मासिकपुस्तकांतील महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें लेखांक ४९, पंक्ति १४, येथें आला आहे. ह्याचा अर्थ द्विधाभाव. द्वामोशायन हा द्वामुष्यायण ह्या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. कोणी पुरुषानें स्वार्थाकरितां व परार्थाकरितां गुरूच्या आज्ञेनें दुसऱ्याच्या बायकोच्या ठायी जो पुत्र उत्पन्न केला, त्याचें नांव द्वामुष्यायण. द्वामुष्यायण पुत्र द्विगोत्री असतो. बीज देणाऱ्या पित्याचें एक गोत्र व परस्त्रीच्या नवऱ्याचें दुसरें गोत्र. त्यामुळें ह्या द्वामुष्यायणाला दोन श्राद्धें करावीं लागतात. अर्थात् कोणत्याही एका श्राद्धांत तो एकनिष्ठ असूं शकत नाहीं. एकाचें श्राद्ध करावयाला जावें, तों दुसऱ्याची स्मृति होते; व दुसऱ्याचें श्राद्ध आरंभावें, तों पहिल्याची आठवण होते. असें द्विधा मन द्वामुष्यायणाचें होतें. हा दृष्टान्त अहिल्याबाईला विठ्ठल शामराजानें दिला आहे. तुकोजी होळकराला अहिल्याबाईनें नाना फडणिसाच्या कृपेनें मल्हारराव होळकराचा वारस केलें. ह्मणजे राजकीयदृष्ट्या तुकोजी हा द्वामुष्यायण पुत्र झाला. त्याची निष्ठा धड अहिल्याबाईच्याकडे राहीना व धड पेशव्याकडेही राहीना. पुणेंदरबारचें तुकोजीनें ऐकिलें ह्मणजे अहिल्याबाईस वाईट वाटे, व अहिल्याबाईच्या तंत्रानें तुकोजी वागला, तर तें पुणेंदरबाराला खपत नसे. अशा कठिण प्रसंगीं, तुकोजीनें वरिष्ठ व बलिष्ठ जो पुणेंदरबार त्याचा पक्ष धरला. तो अहिल्याबाईला खपला नाहीं.

ह्या न खपण्याच्या अवस्थेला विठ्ठल शामराजानें द्व्यामुष्यायणत्व ऊर्फ द्व्यामोशायन शब्द लाविला आहे. द्व्यामुष्यायणाची स्थिति ह्मणजे भाव जो, तें द्व्यामोशायन. भाववाचकनाम बनविलें आहे.



## ४२. दिलावरजंग फिरंगी.



पेशव्यांच्या सैन्यामध्यें फिरंगी लोक नेमून त्यांच्या कडून मराठी सैन्यास लष्करी शिक्षण देण्याची सुरुवात नाना फडणविसांच्या कारकीर्दीमध्येंच झाली. इ. स. १७८२।८३ मध्यें दिलावरजंग फिरंगी ह्मणून एक नवीन अंमलदार ठेविला. त्याच्या पगाराची याद सांपडली आहे. ती वाचण्यासारखी आहे. ती येणेंप्रमाणें:—

श्री.

"यादी नेमणूक दिलावरजंग फिरंगी वगैरे उमेदवार. सु॥ सल्लास समानीन मया व अलफ. बोली दरमाहा. रु.

२०४७५ नि॥ दिलावरजंग

५०० खांसा यांस. जाबीतजंग ह्याचे येथें दरमहा होता रुपये ७५०. सांप्रत करार निखर्ची.

१२५० असामी ५. त्यांस जाबीतजंग याचे येथें दरमहा होता, दर असामीस रुपये ३२५, सांप्रत ठराव दर असामीस रुपये २५० प्रमाणें. रुपये.

३३२५ फिरंगी असामी ९५. त्यांस जाबीतजंग याचे येथें दर असामीस रुपये ७० होता. सांप्रत ठराव दर असामीस रुपये ३५ प्रमाणें. रुपये.

१५४०० पायदळ असामी ११०० त्यास दर असामीस रुपये १४ प्रमाणें रुपये.

२०४७५

१९५०४ मुसा दरजा कुली तोफा बंदुका वगैरे वोतणार व पलटणें तयार करणार, त्यांस.

४०० खांसा असामी. त्यास जाबीतजंग याचे येथें दरमहा रुपये ६०० होता. सांप्रत ठराव रुपये.

७०० हाताखालीं असामी ५ त्यांसः—

३०० कित्ता असामी ३. त्यांचा दरमहा दर असामी रुपये १०० प्रमाणें.

४०० कित्ता असामी २. त्यांचा दरमहा दर असामीस रुपये २०० प्रमाणें.

७००

१८४०४ रोहिल्याचें पलटण १ एकूण असामी ११००

४०० खांसा

५०० इमतीयाजी असामी ५. दर असामीस रुपये १०० प्रमाणें.

१७५०४ असामी १०९४. दर असामीस रुपये १६ प्रमाणें आहे.

१८४०४

१९५०४

३९९७९.



जमीदार, देशमुख, देशपांड्ये मेळवून, दोही गांवींचे मोकदमीस खावंद करून ठेविला. त्यासी आर्जोजीराऊ ढमाले देशमुखी करीत होते. ते वेळेस शिवशेटी थिटे कासार लोहोगांवकर यांचें कर्ज आर्जोजीनें घेतलें होतें. होन बाराशें घेतले होते. त्यासी आर्जोजीराऊ ढमाले यांजपासीं शिवशेटी कर्ज मागावयासी आला. तों आर्जोजी ढमाले ह्मणों लागले कीं, तुह्मांस कर्जीत दोही गांवची मोकदमी मौजे सेडाणी व वडुस्ते ऐसी देतों. कांहीं महजरास शिरपाऊ व कांहीं सामान घेऊन येणें. ह्मणवून शिवशेटी गेला. तों आर्जोजी राऊ ढमाले मयत जाले. मग शिवशेटी कासार आला. तों त्याची बाईल पुतळाई आवा होती. तिनें कासारास सांगितलें कीं, आतां माझा दादला मयत जाला आहे. लेंकरें लहान मजपासीं आहेत. कांहीं (मोठीं) जाल्यावरी तुमचें कर्जही वारूं. मग पुतळी ढमालीचा लेक येशवंतराऊ ढमाले देशमुखीचा कारभार करूं लागला. त्याजपासीं शिवशेटी कासार कर्ज मागावयासी आला. येशवंत राऊ ढमाले यांनीं कासारास मारून इजती घेऊन बाहेर घातलें. मग शिवशेटी गेला. ह्मणों लागला कीं, कोणी खावंद जबरदस्त होईल ते क्षणीं येऊन कर्ज घेईन. ह्मणोन बोलोन गेला. येणेंप्रमाणें करिना जाला असे.''

## १४. जुने शिलालेख.

### मौजे अगासन तालुका कल्याण येथील सकु १२२२ तील एक मराठी शिलालेख.

हा शिलालेख सध्यां अगासन गांवांत किंवा गांवाच्या शिवेवर नाहीं. तेथून कोणी गाडींत घालून वर्ष दोन वर्षांपूर्वी कल्याणास नेला, असें तेथील पाटील सांगतो. बहुशः मुंबईस होणाऱ्या म्यूझियमकरतां तो मुंबईस गेला असावा. प्रस्तुत छापिली जाणारी नक्कल दोन वर्षांपूर्वी अगासन येथील एका कुणब्यानें केली. जुनी भाषा न समजल्यामुळें, व अस्सल बरहुकूम नक्कल करण्याचें कसब माहीत नसल्यामुळें, नक्कल अगदीं चुकलेली आहे, व भाषादृष्टीनें सर्वथैव निरुपयोगी आहे. तत्रापि, इतिहासदृष्ट्या तिला किंमत आहे. सकुसंवत् हें रूप महत्त्वाचें आहे. ज्याला प्रायः शकसंवत् ह्मणतात, त्याला येथें सकुसंवत् ह्मटलें आहे. शातवाहनवंशांतील पराक्रमी अशा सकु राजपुत्राच्या नांवानें जो संवत् सुरू झाला, तो सकुसंवत्. ह्यालाच शकसंवत्, शालिवाहनसंवत्, वगैरे इतर संस्कृत नांवें आहेत. दुसरी बाब ह्या शिलालेखांत इतिहासोपयोगी अशी ह्मटली ह्मणजे

ह्यांत शक १२२२ त, झाळुदेव हा रामदेव यादव याचा कोंकणाधिपति व महामंडलेश्वर होता. चुकला माकला असा उतरलेला हा शिलालेख येणेंप्रमाणें:—

## मौजे अगासन ता॥ कल्याण येथील शिळलेख.

"स्वस्ति श्री सकु संवत १२२२ सार्वती संवक सोमवारी दि१ प्रोभो अद्यह् श्रीमत्प्रौढप्रताप चक्रवर्ति श्रीरामचंद्र देव विलयोदयी तत्पाद्पद्मो पडीती महा मडलेमू ×[1] सकल सेनाधिपती पश्चिम समुद्राधिपति श्री × × रामदेवें निरोपित कोंकण अधिपती झाळुदेव करोनि श्रीरामदेवा × × × × × मानवुनि कोंकण सवंध ठाणा कोंकण × × × साबहि वाहने आ कृपा मनुनि प्रसादंतनि मुलुकें सवंधा आलण बाहे ग्रामू सपलीतिस्थ आ घाट मान् पुर्वेधारवली ग्राम् । पश्चिमे नदी। उत्तरे नदी। दक्षिणे नदी । × एवं चक्रवि आ घाट मान् ससीमा पर्यंत वृण काष्टों × को × वंसं वृक्ष मालानि दिनी दोष सहित महादोष विचलिन करूनि बंध × सुक्षुतपेंत × × सबहिवाहान पुत्रपौत्री भोगावी हामाठा पालिता पुनित लोको × × हा यी माढठ अ वों मंगल + झंत्री सुत संमत."

( येथें घोड्याच्या आकृतीचें चित्र आहे. )



## घारे यांचा बनावट ताम्रपट शक १२९३ ह्मणून बनविलेला.

१. ह्या ताम्रपटाचे एकंदर पत्रे तीन होते, पैकीं दुसरा पत्रा हरवला. पहिला व तिसरा पत्रा आहेत. पहिल्या पत्र्याचे बाराव्या ओळीवर मधोमध फुटून दोन तुकडे झाले आहेत.

२. पत्रे तांब्याचे असून, पहिल्या पत्र्याची रुंदी ७ इंच व लांबी १३ इंच आहे. तिसऱ्या पत्र्याची रुंदी ६ इंच व लांबी १२½ इंच आहे. अक्षर मोडी असून अक्षराचें वळण शिवकालीन आहे. शक १२९३ तील नाहीं. पत्रा बनावट केव्हां केला, तें समजण्यास मार्ग नाहीं.

३. शक १२९३ ला विकारी संवत्सर नाहीं. ताम्रपटाची मराठी भाषाहि शक १२९३ तील नाहीं. अक्षराचें वळणहि शक १२९३ तील नाहीं. सबब, ताम्रपत्र बनावट आहे.

---

१ ज्या ठिकाणी × अशी फुली आहे त्या ठिकाणची अक्षरें खपल्या निघाल्या आहेत, सबब दिसत नाहींत.

४. ताम्रपत्र दोन्ही बाजूंनीं लिहिलेलें आहे. प्रथम तिन्ही पत्र्यांच्या एका बाजूवर लिहून, नंतर तिसऱ्या पत्र्याच्या पाठीवर प्रारंभ करून, पहिल्या पत्र्याच्या पाठीवर शेवट केला आहे. ह्मणजे कागदावर जसा महजर पाठपोठ मराठींत पूर्वी लिहीत असत व निरनिराळे बंद लिहून व एकापुढें एक चिकटवून रास करीत असत, त्याप्रमाणें हा ताम्रपट लिहिला आहे. सर्व अक्षरें स्वच्छ आहेत.

५. लेहुन वगैरे ऊनप्रत्ययान्त धातुसाधितांचीं रूपें शिवकालीं लेहुनु अशीं दहापांचांतून तीनचार तरी येत. तशीं उकारान्त रूपें ह्या ताम्रपटांत बिलकुल नाहींत. सबब हा ताम्रपट शक १६०२ नंतर, कदाचित् शक १६२२ नंतर, बनविलेला आहे; व त्याच्यावर शक १२९३ घातला आहे. बनावट लेख तयार करणाऱ्यांना शक १२९३ ला कोणता संवत्सर होता, हेंहि माहीत नव्हतें. शक १२९३ चा खरा संवत्सर बनावट लेख तयार करणारांनीं घातला असता, तत्रापि, भाषेवरून व अक्षरवळणावरून लेखाचा बनावटपणा सिद्ध करतां आला असता.

## पत्रा १ बाजू पोट.

१ नागनाथ पातशाहा ताना
२ ० शाहा
३ महजरनामा सके १२९३ विकारी
४ नाम सवतछरे आस्विन वदि १३
५ ते दिवसी नामाजी वलद अडघोजी ई॥
६ रामजी घारे मोकदम मौजे घारगाउ
७ प्र॥ कर्डे त॥ राजनगाउ यासि कान्होजी
८ व॥ रामजी ई॥ एकोजी गौळी पा॥ मोक
९ दम मौजे मजकूर महजरनामा लेहून
१० दिधले ऐसे जे आपण मौजे मा॥रची
११ मोकदमी दरोबस्त काळी व पांढरी तु
१२ ह्मास दिधली असे अज सबब की बेद
१३ री पाताशाही याची होती त्यांचा
१४ उमराव हसनअलीखान होता त्यास

१५ मौजे मजकूर जाहागीर होती त्यास जागीर
१६ दारानी आपनास कैद करून बेदरा
१७ स नेले गावीचे लावणीचे व बाकीचे तस्ट
१८ लाविले मग आपण तुमच्या गंला पड
१९ लो तुह्मास बाजीद जालो की गावला
२० वनी करने बाकींचे तस्ट वारने ऐसे ( मोक )

## पत्रा ३ पोट.

२१ दमींचे हकलाजिमा दरोबस्त

| | | | |
|---|---|---|---|
| २२ | १ तिव्हाडास घुग | १ दिवाळीची | २२ |
| २३ | रीस गव्हाने ८१ | वाजवने आ | २३ |
| २४ | पाटलाची पाणो | धी | २४ |
| २५ | १ डी व पाटलिनी | तेलाच्या | २५ |
| २६ | ची चोळी बिघे १० | १ घानिया | २६ |
| २७ | १ खालता मुज्या | स तेल दर | २७ |
| २८ | चा मला | रोज ८८८९ | २८ |
| २९ | पाल भारा | १ ताबोळिया | २९ |
| ३० | सेल पाटी | चेथे पाने | ३० |
| ३१ | दर जिनस | दररोज ५० | ३१ |
| ३२ | १ हकिमा पा | १ चाभारा पा | ३२ |
| ३३ | सील सिरपाव | सी जुते | ३३ |
| ३४ | एक आधी | १ धनगरा पा | ३४ |
| ३५ | | सील चवळे | ३५ |

३६ सदरहू मोकदमीचे जे धार ३६
३७ असतील तितके तुह्मांस दिध ३७
३८ ले असेत तुह्मी पाढरीची क ३८

## पत्रा ३ पाठ.

३९ मावीस करून खाने यासि आन सा ३९
४० रिखे करुन तर आपल्या कुलस्वा ४०

| | | | |
|---|---|---|---|
| ४१ | मीची आण असे हा महजरनामा स | | ४१ |
| ४२ | ही | निशाणी नागर | |
| ४३ | गोही | | |
| ४४ | त्रिंबकजी वा॥ | | |
| ४५ | खंडोजी विथा | | |
| ४६ | पे मोकदम | बि॥ मैराळ गनेश वि | ४६ |
| ४७ | मौजे अस्वेली | प्रदास कुलकणी | ४७ |
| ४८ | | मौजे मा॥र | ४८ |
| ४९ | दीपाजी वा॥ त्रिं | महिपतजी वा॥ दि | ४९ |
| ५० | बकजी मे॥ स | डोजी कातोरे मोक | ५० |
| ५१ | वले मौजे राजापुर | दमं मौजे उलाव | ५१ |
| ५२ | | गाउ नागर | ५२ |
| ५३ | | | ५३ |
| ५४ | मानकोजी वा॥ | बहिरजी वा॥ हम | ५४ |
| ५५ | शाहाजी सवले | उजी मे॥ दैवख | ५५ |
| ५६ | मोकंदम मौजे | ले मौजे दोलप | ५६ |
| ५७ | कोडेगव्हाण | नि॥ नागर | |
| ५८ | | | |

## पत्रा १ पाठ.

| | | | |
|---|---|---|---|
| ५९ | एकोजी वा॥ लखमाजी | सुभानजी वा॥ | ५९ |
| ६० | चाभार मौजे मा॥र | जनकोजी न्हावी | ६० |
| ६१ | अलीखान वा॥ बुऱ्हान | मौजे मा॥र | ६१ |
| ६२ | खान मुलना मौजे मा॥र | सोमाजी वा॥ माहा | ६२ |
| ६३ | गन वरवा परीट वा॥ | दजी धरने गुर | ६३ |
| ६४ | तुकोजी मौजे मा॥र | व मौजे मा॥र | ६४ |
| ६५ | घसनाक वा॥ एकनाक | तिमाजी वा॥ ब | ६५ |
| ६६ | माहार मौजे मा॥र | याजी कोळी मौजे | ६६ |

| | | |
|---|---|---|
| ६७ दादनाकं वा। केदार | मा।र | ६७ |
| ६८ नाक माहार मौजे मा।र | | ६८ |

६. प्रस्तुत ताम्रपट पवनमावळांतील बेबडवहाळ या गांवचे शंकराजी राजे घारे यांनीं दिला. दुसरा पत्रा हरवून पन्नास पाऊणशें वर्षें झालीं, असें त्यांच्या सांगण्यांत आलें.

७. वतनासंबंधीं कज्जा चालला असतां पुराव्याकरितां हा ताम्रपट बनविलेला दिसतो. घारगाऊ येथील मोकदमी घोरे यांजकडे कदीमपासून असेल; परंतु त्यांच्याजवळ आधार कज्ज्याच्या वेळीं नव्हता असें दिसतें. तेव्हां, हा नूतन बनावट आधार तयार केला. खोटे ताम्रपट करतात, असा उल्लेख धर्मशास्त्रांतून आहे. लेखाचा बनावटपणा तत्कालीन मुसुलमान अधिकाऱ्यांच्या लक्ष्यांत बहुशः आला नसावा. कारण, मुसुलमानी अमलाच्या पहिल्या पाहारांत पूर्वींचे सर्व कायदेशीर निर्बंध गळाले होते.



## तळेगांव–दाभाडे येथील दोन मराठी शिलालेख.

दाभाड्यांच्या तळेगांवाच्या पूर्वेस एका मैलावर इंद्रायणीच्या तीरावर कोटेश्वराचें देवालय आहे. येथें नदी दक्षिणवाहिनी असून, देवालय पूर्वाभिमुख असल्यामुळें स्थानाला तीर्थत्व प्राप्त झालें आहे. खंडाळयाजवळ इंद्रपर्वत आहे. तेथून ह्या नदीचा उगम झाला. सबब इला इंद्रायणी ह्मणतात. इंद्रपर्वताच्या जवळ व इंद्रायणीच्या कांठीं इंदुरी ह्मणून एक पुरातन गांव आहे. ह्या इंदुरीचें मूळ नांव इंद्रपुरी. इंद्रपुरी=इंदउरी=इंदुरी अशा परंपरेनें सध्याचें इंदुरी हें नांव आलेलें आहे. इंद्रायणीच्या डाव्या तीरावर इंदुरी आहे व उजव्या तीरावर रानांत कोटेश्वराचें पुरातन देवालय आहे. हें देवालय मूळ कोणीं बांधिलें तें कळत नाहीं. देवळाचा घाट हेमाडपंती नाहीं. अर्थात् देऊळ यादवांच्या काळानंतरचें ह्मणजे शक १३०० नंतरचें आहे. देऊळ मराठेशाईच्या प्रारंभाच्या वेळचें असावें. देवळाला शिखर नाहीं; गच्ची आहे. तेव्हां मुसुलमानी घाटाचा विकार कारागिराला व मालकाला झाला होता, हें उघड आहे. कोटेश्वर हें नांव मूळचें कोटीश्वर असें असावें. इंद्रायणी दक्षिणाभिमुख होण्यापूर्वी तिला सुमारें तीन मैलांचें वांकण आहे. ह्या वांकणाच्या कोटीवर देवाचें लिंग असल्याकारणानें देवालयाला कोटीश्वर असें मूळ नांव दिलें गेलें. त्या नांवाचा अपभ्रंश कोटेश्वर. वाईजवळ कृष्णा-

नदीच्या वाकाच्या कोटीवर असेंच एक कोटीश्वर ऊर्फ कोटेश्वराचें देऊळ आहे. तळेगांवाजवळील कोटीश्वराच्या देवळाला लागून सहा वृंदावनें आहेत. पैकीं पहिलें वृंदावन मोडून गेलें आहे. दुसरें खालील दगड वाहून गेल्यामुळें कलंडण्याच्या बेतांत आहे, व तिसरें अगदीं नदीजवळचें सबंद शाबूत असून त्याच्या पूर्वेच्या तोंडावर खालील मराठी शिलालेख आहेः—

पंक्ति

१.—० ॥ श्रीमारतंडप्रसन्न ॥

२.— सके १६५४ परिधा

३.— विनाम संवत्छेरे भाद्र

४.— पदसुध प्रतिपदा गु

५.— रुवार तदिनि दामाजी

६.— खंडेरावसुत वाडरा

७.— व लिंगरस कुळकर्णि मौजे

८.— चरोली प्रांत पुणे याचा धर्मस्वे

९.— तु वृंदावन बांधिलें असे

शक १६५४ त वाडराव लिंगरस हा चऱ्होलीचा कुळकर्णी होता व त्याच्या पुण्यपुष्टिस्तव हा धर्मसेतु त्याच्या वंशजानें बांधिला. **धर्मसेतुबद्दल धर्मस्वेतु** अक्षरें लिहिलीं आहेत. गांभीर्यास्तव **से** बद्दल **स्वे** असा संस्कृत जोडाक्षरी उच्चार केला आहे. अडाणी लोक असे उच्चार गांभीर्यार्थ करतात. उदाहरणार्थ, मंगलोर येथें छापिलेल्या ख्रिश्चनपुराणांत **अवसर** ह्या शब्दाबद्दल **अवस्वर** असा गांभीर्यार्थी अडाणी उच्चार अनेकवार केलेला आढळतो. संवत्सर या शब्दांतील **त्स** या जोडाक्षराचा **त्छ** असा उच्चार केला आहे. सुध, तदिनि, ह्या दोन शब्दांतील **द्ध** बद्दल ध व द्दि बद्दल दि कोरली आहे. शक व शुद्ध या शब्दांतील **श** चा **स** उच्चार केला आहे. अक्षरांचें वळण शक १६०० च्या सुमाराचें आहे.



## दुसरा शिलालेख.

तळेगांवाच्या उत्तरेस रेल्वेच्या पलीकडे रेल्वेला लागून एक घुमट व वापी आहे. विहीर उत्कृष्ट बांधिली असून मजलेदार आहे. विहिरीवर खालील शिलालेख आहेः—

पंक्ति

१:—स्वस्तिश्रीनृपशालिवाहान: शके १६४५ पूर्ण: शोभनसंवत्छर व

२.—द्यफाल्गुण: भृगुवासर सप्तमि १ श्रीडोळस कुळस्वामीदेव: बजपाटिल

३.—दाभाडे तळेगाव: तयाचे पुत्र सदैव: येस पाटिल सोमाक्षी २ जेष्टिं जन्म

४.—ला खंडेराव: रूढ सेनापति नाव: शांभव पुर्ण वैभव: असे जया कारणे ॥ ३ ॥

५.—कनिष्टिं जन्म दोघां जणा: कृष्णाजि बाबुराव जाणा: बाबुरायाची पत्नि सगुणा:

६.—तस्ये कर्तव्य गुमट वापि ॥ ४ ॥ वौंशिं आहे सवाइ बाळ: यासि रक्षु

७.—श्रीगोपाळ: हा करिल प्रतिपाळ: गुमट आणि वापिचा ॥ ५ ॥

शिलालेखाच्या एकंदर सात ओळी असून अक्षरें नामी बाळबोध कोरिलीं आहेत. शिलालेख ओवीवृत्तांत रचिला आहे. ओव्या पांच आहेत. सहाव्या ओवींत तस्यै बद्दल तस्ये असें रूप योजिलें आहे.

| | | |
|---|---|---|
| वाहन | बद्दल | वाहान |
| पूर्ण | ,, | पुर्ण |
| फाल्गुन | ,, | फाल्गुण |
| वंशीं | ,, | वौंशिं |

अशी अक्षरवटिका घातली आहे. पांचव्या ओवींतल्या शेवटल्या चरणांत **गुमट** आणि **वापि** या दोन शब्दांना च प्रत्यय एकदा शेवटीं लावलेला आहे. आणि, व, इत्यादि अव्ययांनीं जोडलेल्या शब्दांतील शेवटल्या एकाच शब्दाला च प्रत्यय लावण्याची लकब महाराष्ट्रांत फार जुनी आहे, व ती वर्तमान लेखकांच्या व वक्त्यांच्या बोलण्यांत देखील सध्यां आढळते.

**वि. का. राजवाडे.**

# १५. नहपान व त्याचे आप्त.

नहपान हा शक असून क्षहरात वंशांत उत्पन्न झाला होता, हें त्याचा जांवई व दीनीकपुत्र उषवदात याच्या व त्याची मुलगी दक्षमित्रा हिच्या लेखांवरून सिद्ध होतें. हे लेख नासिकाजवळील व त्या वेळच्या गोवर्धन प्रांतांतील त्रिरश्मि नांवाच्या टेंकडींत जीं लेणीं खोदिलेलीं आहेत, त्यांत अद्याप सुस्थितींत दृष्टीस पडतात. "सिद्धं राज्ञः क्षहरातस्य क्षत्रपस्य नहपानस्य जामात्रा दीनीकपुत्रेण उषवदातेन...............सिधं राञो क्षहरातस क्षत्रपस नहपानस दीहितु दीनीकपुत्रस उषवदातस कुटुंबिनियदखमित्राय देयधम्मं ओवरको- सिद्धं राज्ञः क्षहरातस्य क्षत्रपस्य नहपानस्य दुहितुर्दीनीकपुत्रस्य ऋषभदत्तस्य कुटुंबिन्या दक्षमित्राया देयदर्मोपवरकः" यावरून नहपानाची व त्याच्या अगदीं जवळच्या आप्तांची त्रोटक माहिती उपलब्ध होते. उषवदात आपणास एके ठिकाणीं शक ह्मणवून घेतो. त्याचा श्वशुर शक होता, हें निराळें सांगावयास नकोच. पार्थियन भाषेंत क्षत्रप याचा अर्थ सुभेदार असा होतो. क्षत्रपांचीं नाणीं पार्थियन लोकांचे नाण्यांप्रमाणेंच असून, त्यांस हिंदुस्थानांत 'पारूय' असें ह्मणत. नहपानाची टोपी व पार्थियनांचें शिरोभूषण यांत बरेंच साम्य आहे. यास्तव नहपान व काठेवाडांतील क्षत्रप हे पार्थियन असावेत, असा तर्क पंडित भगवानलाल इंद्रजी यांनीं केला आहे व तो सयुक्तिक दिसतो. असो. आतां आपण नहपानाच्या नाण्याकडे वळूं आणि त्यावरून कांहीं माहिती मिळाल्यास पाहूं.

सात आठ वर्षांपूर्वी जोगलटेंभी येथें सांपडलेलीं नहपानाचीं सर्वच नाणीं समकालीन नाहींत, हें मागें एका लेखांत आलेंच आहे. ह्यांचे पुढील बाजूवर PANNIW IAHAPATAC NAHATTANAC असें ग्रीकूभाषेंत लिहिलेलें असून, मागील बाजूवर तीर व धनुष्यबाण आहे. सभोंवतीं खरोष्टी व ब्रह्मी भाषेंत "राञो क्षहरातस नहपानस, राणो छहरातसनहपानस" ह्मणजे 'क्षहरात वंशांतील नहपानाचें' असें लिहिलें आहे. ग्रीकभाषेंतील अक्षरांत मधून मधून रोमन अक्षरें घुसडलीं आहेत. रोमन लोकांच्या डिनॅरींच्या पद्धतीवर आपलीं नाणीं पाडण्याचा क्षत्रपांचा उद्देश होता. त्याचाच हा परिणाम असावा असें, रे० स्कॅाट ह्यांनीं ह्या नाण्यांसंबंधानें मुंबई रॅायल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें जो लेख प्रसिद्ध केला आहे, त्यांत लिहिलें आहे. येथें एवढें सांगणें अवश्य आहे कीं, नहपानाचे नाण्यावरील ग्रीक पहिला व दुसरा हे शब्द काय असावेत, हें निश्चित करण्यासाठीं पन्नास वर्षें, न्यूटन रेपसनसारख्या विद्वानांचीं खटपट चालली होती. परंतु त्यांचे प्रयत्न सफल झाले

नाहींत. नाण्यावरील प्रतिमा इतक्या भिन्नभिन्न दिसतात कीं, त्या एकाच व्यक्तीच्या आहेत किंवा नाहींत, याबद्दल विद्वान् लोकांस संशय येऊं लागला आहे. रे० स्कॉटसाहेबांचा मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलामध्यें जो लेख प्रसिद्ध झाला आहे, त्यांतही अशा प्रकारची शंका ध्वनित केली आहे. कांहीं दिवस माझेंही असेंच मत झालें होतें. परंतु साशंकवृत्ति धारण करण्याची आवश्यकता रहात नाहीं. याचीं कारणें माझ्या अल्पमतीप्रमाणें अशीं आहेतः—पंडित भगवानलाल इंद्रजी यांनीं काठेवाडांतील क्षत्रप व महाराष्ट्रांतील क्षत्रप हे, मूळचे एका देशांतील असले, तरी भिन्न कुळांत निर्माण झाले होते, हें नासिक गॅझिटियरमध्यें साधार सिद्ध केलें आहे. रे० स्कॉटसाहेबांनींही त्यांचा परस्पर संबंध जोडण्यास बिलकूल आधार मिळत नाहीं, असें नमूद केलें आहे.

जुनागडजवळ जीं १२०० नाणीं मिळालीं तीं १३ निरनिराळ्या क्षत्रपांचीं होतीं. पण, ह्या नाण्यांवर फक्त नहपानाचेंच नांव आहे. दक्षिणेंतील व उत्तरेंतील क्षत्रप एकाच कुळांतील असते तर त्यांवरही नहपान हेंच नांव हवें होतें. कारण, नहपानाची कारकीर्द सर्वांच्या अगोदर सुरू झाली. दोन्ही ठिकाणच्या क्षत्रपांचा सार्वभौम—मग तो नामधारी असो वा सर्वसत्ताधीश असो, आणि तो व्हेनॉन ठरो अथवा दुसरा कोणी निघो,—पण या एकछत्राचा परिणाम कांहीं तरी झाला असलाच पाहिजे. सर्व क्षत्रपांचें बऱ्याच गोष्टींत साम्य होतें व दळणवळणही होतें. तर मग, एका भागाचे सुभेदार आपआपलीं नांवें वेगळीं वेगळीं घालतील व दुसरीकडचे एकाचेंच नाणें चालू ठेवितील, हें फारसें संभवनीय दिसत नाहीं. निदान आपल्या पूर्वजांचे बरोबरच महाराष्ट्रांतील क्षत्रपांनीं आपलींही नांवें छापिलीं असतीं. पण नहपानाचेंच नांव कायम ठेवण्याचें कारण काय? एकच नांव चालू ठेवावयाचें होतें, तर पादशाहा व्हेनॉनचें किंवा इतर कोणाचें नांव त्यांनीं घ्यावयास नको होतें काय? नासिक जिल्ह्यांत सांपडलेल्या ताम्रपटांवर, नाण्यांवर व लेण्यांतील भिंतींवर नहपानाखेरीज इतर कोणच्याच क्षहराताचें नांव आढळत नाहीं, याचें कारण काय? गौतमीपुत्र शातकर्णी ह्मणतो कीं, मी क्षहरातवंश निरवशेष केला. "**खहरातवंसनिरवसेसकरस्य**" "**क्षहरातवंशनिरवशेषकरस्य.**" येथें वंश याचा अर्थ पुत्र, पुतणे वगैरे घ्यावयाचा नसून, नहपानाच्या मुलीचा वंश, जांवयाचीं मुलें, किंवा जांवई असा करावयाचा आहे. गौतमीनें आपल्या पुत्राची तुलना रामार्जुनांबरोबर करून त्यास एकांकुश, एकधनुर्धर असें ह्मटलें आहे. किंबहुना त्याच्या प्रत्येक लहान सहान कृत्यांची थोरवी गायिली आहे. गौतमीपुत्रानेंही ताम्रपटांतून आपलें बरेंच वर्णन केलें आहे. असें असून त्याच्या राजधानीपासून दहापांच कोसांवर राज्य

करणाऱ्या व आपली प्रतिमा घालून नाणीं पाडणाऱ्या क्षहरातवंशीय क्षत्रपांचा त्यानें एखादे ठिकाणीं उल्लेख केला नसता काय? नहपानाच्या वंशाचा मीं उच्छेद केला, असें गौतमीपुत्र शिलालेखांत कोरवितो, व उषवदाताचे लेख यापुढें सांपडत नाहींत. यावरूनही काय ध्वनितार्थ निघतो? गौतमीपुत्राचे व पुळुमाईचे लेख महाराष्ट्राबाहेरही पुष्कळ सांपडले आहेत. त्यांवरून त्यानें बहुतेक गोष्टी खऱ्याच लिहिल्या आहेत असा निष्कर्ष निघतो. नहपानाचे वंशज काठेवाडांत गेले असें गृहीत धरितां येत नाहीं. कारण, गौतमीपुत्रानें त्याचे वंशाचा उच्छेद केला, असें ताम्रपत्रांतून व शिलालेखांतून स्पष्ट ह्मटलें आहे.

अलीकडे विन्सेंट स्मिथ या विद्वानानें एक अप्रतिम ग्रंथ लिहिला आहे. त्यांत नहपानाबद्दल साधार व अत्यंत उपयुक्त अशी हकीकत दिली आहे. तो गौतमीपुत्राशीं फार निकरानें लढला, असा उल्लेख एका ताम्रपटांत आहे, व त्यांतच त्याचा अंत झाला असावा असा तर्क आहे.

आतां एकाच प्रश्नाचा उलगडा करावयाचा राहिला. नहपानाच्या नाण्यांवरील अक्षरें व चेहेरे भिन्न भिन्न कां? ह्याचें उत्तर इतकेंच कीं, नहपानाचा अंमल बऱ्याच मोठ्या भागावर असल्यामुळें त्यास आपलीं नाणीं एकाच ठिकाणीं पाडणें अशक्य अथवा दुर्घट होतें. निरनिराळ्या टांकसाळींत पाडिलेल्या नाण्यांवरच्या प्रतिमा सारख्या नसणें अगदीं साहजिक आहे. फार कशाला, अगदी अलीकडे काढिलेल्या महादजी शिंदे, राघोबादादा पेशवे, आदिकरून पुरुषांच्या तसबिरीत तरी मेळ आहे काय? नहपानाच्या प्रतिमा जमत नाहींत हें खरें, परंतु त्याच्या पोषाखांत मात्र फारसा फरक नाहीं—अगदींच नाहीं ह्मटलें तरी चालेल—ही गोष्ट लक्ष्यांत घेण्यासारखी आहे. तथापि, पुनः कांहीं नाण्यांवरील ग्रीक अक्षरें अशुद्ध व इतरांवरील शुद्ध असा प्रकार कां व्हावा, असा प्रश्न उद्भवतो. नहपानाचे वेळीं ग्रीक जाणणारे लोक बोटांवर मोजितां येण्याएवढे होते. तेव्हां हल्लीं ज्याप्रमाणें पर्शियन भाषेंतील सह्यांच्या नकला कांहीं कारकून शुद्ध व इतर अशुद्ध रीतीनें करितात, तसेंच त्या वेळींही झालें असावें. असल्या प्रकारास इतिहासांतरीं पुरावा आहे. मोंगलांच्या व गुजराथच्या सुलतानांच्या कांहीं नाण्यांवर शुद्ध नांवें, तर इतरांवर अशुद्ध अशीं आहेत. शिवाय, नहपानाची प्रतिमा ज्यांवर तंतोतंत जमते, त्यांवरीलही अक्षरें बरोबर मिळत नाहींत. खरोष्टी व ब्राह्मी भाषेंतील अक्षरांत सुद्धां मेळ सांपडत नाहीं.

नहपान व गौतमीपुत्र यांचे लेण्यांतून जे लेख कोरलेले आहेत, त्यांचीं अक्षरें खोदण्याचे पद्धतींत फारसा फरक दिसत नाहीं. यावरून यांचे जीवनकालांतही फारसें अंतर असणें शक्य नाहीं. तेव्हां पूर्व पुरुषाचे मागें त्याचे नांवाचीं नाणीं पाडणारे पांच पन्नास-क्षत्रप निघतील असें संभवत नाहीं. नहपानाचे नंतर त्याचा

जांवई व दुसरा सुभेदार यांनीं आपले धन्याचें नांव घालून आपआपली प्रतिमा छापविली असें गृहीत धरिलें, तरी नाण्यांवर दिसणाऱ्या पन्नास साठ निरनिराळ्या चेहऱ्यांची वाट काय?

रे० स्कॉट साहेबांनीं जोगलटेंभीस सांपडलेलीं १३२५० नाणीं आपला वेळ खर्च करून तपासून पाहिलीं, तसेंच मीं त्यांचेकडे पाठविलेलीं २१४ नाणींही काळजीपूर्वक पाहिलीं, याबद्दल त्या विद्वान् व निरभिमानी गृहस्थाचे अत्यंत नम्रपणानें आभार मानिल्यावांचून रहावत नाहीं.

नहपानानें आंध्र राजांचा पराभव करून आपला अंमल चालू केला. त्यानें तिसांहून अधिक वर्षें राज्य केलें, संस्कृत भाषेस उत्तेजन दिलें, व तिचें अध्ययन करणारांचा सन्मान केला. क्षत्रपांपैकीं तोच पहिला सुभेदार अथवा राजा होय. तो मोठा शूरपुरुष होता व एका निकराच्या युद्धांतच त्याचा अंत झाला असावा. त्यानें कोठून कोठपर्यंत राज्य केलें, याबद्दल यावा तसा पुरावा अद्याप पुढें आलेला नाहीं.

आतां नहपानाचा जांवई उषवदात याची जी माहिती मिळते ती देतों. पंडित भगवानलाल इंद्रजी यांचे मतें गुजराथचा दक्षिण भाग व कोंकणचा उत्तरभाग यावर हा सुभेदार नेमिला असावा. यास नहपानाची मुलगी दक्षमित्रा दिली होती. हा आपणास "**त्रिगोशतसहस्रद, सुवर्णदानतीर्थकर, अनुवर्ष ब्राह्मणशतसाहस्री भोजापयितृ, ब्राह्मणेभ्यः अष्टभार्याप्रद, भरुकछे दशपुरे गोवर्धने शोर्पारगे च चतुशालावसधप्रतिश्रयप्रद, इबा-पारादा-दमण-तापी-करबेणा-दाहनुका-नावापुण्यतरकर, ग्रामेनानंगोले द्वत्रीशतनालीगेरमूलसहस्रप्रद**" इत्यादि उपपदें लावितो. यावरून हा मोठा उदार असून लोकोपयोगी कृत्यें करण्यांत आपणास धन्य मानीत होता असें दिसतें. तसाच तो महापराक्रमी दिसतो. "**भटारकाअञतिया च गतोस्मि वर्षारत्रं मालयेहि रुधं उत्तमभाद्रंमोचयितुं तेच मालया प्रनादेनेव अपयाता-भट्टारकाज्ञप्त्या च गतोस्मि वर्षारात्रं मालवैःरुद्धमुत्तमभाद्रं मोचयितुं तेच मालवाः प्रणादेनैवापयाताः।**" यांत, आपल्या धन्याच्या (नहपानाच्या) आज्ञेवरून पावसाळ्यांत आपण उत्तमभद्राची सुटका केली. याचा माळव्यांतील लोकांनीं कोंडमारा केला होता, पण हे लोक आपल्या येण्याच्या आवाजानेंच (भिऊन) पळाले, असा उल्लेख आहे. ह्या लेखांत माळव्यांतील लोक जरी उत्तमभद्रकाचे अंकित झाले असें ह्मटलें आहे, तरी त्याच वेळीं उत्तर लोकांनीं नहपानास आपला रक्षणकर्ता कबूल करून, त्यास खंडणी देण्याचें कबूल केलें होतें, असें दिसतें. नहपानाच्या दुसऱ्या एका सुभेदाराचें अथवा त्याच्या अमात्याचें नांव अयमा असें होतें. यानेंही आपल्या धन्यास बरीच मदत केली. याचा एक लेख जुन्नर येथील लेण्यांत आहे.

"**यशवंत.**"

नाहीं ह्मणून ऐकिलें. याकरितां चित्तास समाधान वाटत नाहीं. ईश्वरदयेंकरून स्वस्थ जाहल्याचें वर्तमान लिहून पाठविणें. ह्मणजे तेणेंकरून चित्तास समाधान वाटेल. श्रीमंत .राव स्वामींस कैलासवास जाहला. ईश्वरें आह्मां लोकांवरी थोर कहर केला! ईश्वरकरणीस कोणाचा इलाज नाहीं. आह्मां लोकांस फार आसरा होता. त्यांचे ठायीं श्रीमंत आपास्वामी आहेत. आह्मांस कोणे गोष्टीची फिकीर काय आहे? हरएक विषयीं आह्मां लोकांचें उणें पुरें त्यांहींहून अधिक चालवितील. श्रीमंत रावसाहेबांचे ठायीं आपण आहां. लोकांस साहेबांचाच आधार आहे. साहेबांचा निरोप घेऊन आलों ते संताजी जाधव या समागमें पांच सहा महिने कालक्रमणा केली. लौकरच चाकरीस येऊन पावत असों. आह्मी कांहीं कार्यानिमित्त अरकाडास आलों होतों. तेथें राजश्री व्यंकाजी शिवदेव यांची भेटी जाहली. येथील कित्येक अर्थ मशारनिल्हेंनीं सांगितला. आह्मीं मनास आणिला. छ १ सवालपावेतों सुदामत आरकाड प्रांतींचा करार श्रीमंत रावसाहेबीं केला होता. त्यास अलीकडे राजेश्री फत्तेसिग व रघोजी भोंसले यांची धालमेल होऊन मुलूख वैराण जाहला. तरी सफदरअलीखान ह्मणत होते जे, रावसाहेबांहीं करार केलीयाप्रमाणे त्यास अंतर करीत नाहीं. राजेश्री व्यंकोजीपंतींही एक दोनदां निरोप मागितला. त्यास उभयतांचा शह वारिला ह्मणजे थोडें बहुत अनुकूल करून देऊन रवाना करूं, ह्मणत होते. त्यास अलीकडे छ १० सवालीचें वर्तमान येथें आलें आहे जे, श्रीमंत आपासाहेबांस बहुत वेवधान आहे. हें वर्तमान ऐकून पैके देयाचें मानसिक दिसतें. तरी साहेबांहीं निजामउल्मुलकाची भेटी घेतली, बहुत आदरसन्मान केला, ह्मणून ऐकोन संतोष पावले. तरी ऐसे समयीं निजाउल्मुलुकाकडून अरकाडचे सुभ्याचे नांवें एक पत्र ताकिदीचे, सुदामत प्रकारें जैसें चालत आलें त्याच प्रकारें आतांही साहेबांचे विद्यमानें होय, ऐसा अर्थ केला पाहिजे. रावसाहेबीं पहिला जागा सोडूं नये. हरइलाजेकरून आपल्याकडे करून घेणें. येथील विचार पाहून आह्मीं साहेबांस लिहिलें असे. याउपरी साहेब धनी आहेत. बहुत काय लिहिणें, हे विनंति."

* * *

## ४५ गोविंदपंत बुंदेल्यांची फौजेबद्दल मागणी.

[किरकोळ] श्री. [1]

"श्रीमंत राजेश्री भाऊ स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंद बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति तागाईत फाल्गुन शुद्ध १३ त्रयोदशीपावेतों स्वामींचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान सविस्तर पेशजींचे पत्रीं सेवेसीं लिहिलें आहे, त्यावरून विदित जाहलेंच असेल. इकडे हिंदुस्थानप्रांतीं हमेशा मातबर फौज पाहिजे. तेव्हां इकडील बंदोबस्त राहील. फौज न राहिली तर बंदोबस्त राहणार नाहीं. बुंदेलखंडापासून अंतरवेदीपावेतों रखवाली जाली पाहिजे. मातबर जागा, रांगडे लोक हरामजादे.

[1] ११ ऐ० टि० भा० २

फौज नसली तर दूर देशीं विचारीत नाहींत. तेव्हांच फिसाद करावयासी तयार होतात. दिल्लीमध्येंही बंदोबस्त नाहीं. दिल्लीमध्यें गडबड जाली ह्मणजे तेव्हांच सर्व रजवाडे यांची नजर फिरते. जागजागां गुळी करितात. श्रीमंत राजश्री दादा स्वामी या प्रांतीं होते, तेही देशास जाणार. तेव्हां सरदारही समागमें जातील. आह्मांकडे तैनातीस राजेश्री गंगाधर बाजीराव, राजेश्री मानाजी धायगुडे आहेत, हेही देशास जाणार; रहात नाहींत. फौज तों आह्मांजवळ नाहीं. हमेशा वीस हजार इकडे हिंदुस्थान प्रांतीं छावणी असावी. तेव्हांच इकडील लोक दबतील. फौज मातबर पाहिजे. आह्मांसही देशास येणें जरूर. जेव्हां स्वामीकडील मातबर फौज येईल, तेव्हां या प्रांतीं येऊन बंदोबस्त करून आह्मी देशास येऊं. ऐसीयासी स्वामींनीं मातबर फौज या प्रांतीं अविलंबें सत्वर रवाना करावी. फौज यावयास दिवसगत न लावावी. आमचे तैनातीस फौज पाठविणें ती जरूर पाठवावी. फौज ठेऊन सत्वर स्वामींजवळ येऊं. कित्येक आपलें वर्तमान विदित करणें. मागले गुंते उरकणें. याजकरितां फौज सत्वर पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. फौज पाठविणें ते, कैदेनें राबत, सरकारचे कामावर चित्त देत, जागजागा गांव न लुटीत, असें पाठवावें. नाहीं तर नित्य लूट करितां हैराण करितात, ऐसें न पाठविणें. वरकड वर्तमान चिरंजीव बाबूराव यांस लिहिलें आहे. ते विदित करतील. मीही आषाढमासीं येतों. सेवेसीं साद्यंत विदित करीन. हिंदुस्थान प्रांतीं फौज नसलिया एक तर बदोबस्त राहणार नाहीं; पैसा वसूल होणार नाहीं. हैगई जालियास फजिती आहे. वरचेवर सेवेसीं वर्तमान लिहीत जाऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

✻ ✻ ✻

## ४६ नागपूरकर भोंसले व नाना फडणवीस ह्यांच्या मधील शपथप्रमाण.

नाना फडणवीस ह्यांनीं, पुणें येथें दुफळी झाली त्या वेळीं नागपुरच्या मुधोजी भोंसल्यास अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न केला. नागपुरकर भोंसल्यांचे दिवाण दिवाकर पुरुषोत्तम हे पुण्यास आले होते. ह्या प्रसंगीं जें अंतस्थ कारस्थान व शपथप्रमाण झालें व परस्परांनीं देवावरच्या गंधतुळशी पाठविल्या, त्याची हकीकत पुढील पत्रांत आहे. ती फार महत्वाची आहे.

### लेखांक १. इ. स. १७७८.

[मेणवलीदप्तर] श्री.

''राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दिवाकरपंत स्वामींचे सेवेसीः—

पौष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेषः— आपण दोन तीन पत्रें पाठविलीं, तीं पावून संतोष

जाला. होळकर व मोरोबांनीं बखेडा केला, कारभार करूं लागले. सर्वांकडे पत्रें गेलीं व आलीं; परंतु येथून पत्रच न लिहिलें, व कांहीं उद्योग करावा तर आपणांस पेंच कसा पडेल नकळे;' व पत्र व सूचनाही नाहीं. वगैरे विस्तारें ममतायुक्त लिहिलें. त्यास आपण पुरंधरास आले, तेव्हांच खातरजमा पक्की जाली. तेव्हां पत्र लिहिणें कसें घडेल? तत्रापही आपण लिहिलें, तरी कांहीं दिक्कत यावयाचीच नाहीं. त्या लिहिण्यांतही आपण कांहीं कामच करते. परंतु तें अनुसंधानच आपण त्यांकडील येथें तोडून टाकिलें. तेव्हां पत्र त्यांस लिहिणें कैसें घडेल? आणि आपण उद्योग करतें तर येथें पेंच बसता, हेंही खरेंच. असें समजूनच सूचना न केली. आपण येऊन शरीरें मात्र भिन्न, इतकें करून गेलेंत. तेव्हां सूचना कां न होती? व सूचनेखेरीज आपणही उद्योग करितें. परंतु मनसबा आपणास फार समजतो. येथें पेंच पडले हें ध्यानांत येऊन, पुढें मातबर उद्योगाचें पाऊल चित्तांत आणिलें, तेंही आह्मांस समजलें. जर सूचना करितों, तर तुह्मांस उद्योग करणें जरूर. आह्मांस पेच पडेल याचकरितां न केली. हा मोहरा आपण ह्मणून समजलें. आपणांस व आह्मांस पेंच न पडतां, जसें बनलें तसें करून, श्रीमंतांचे प्रतापें कर्मानरूप सर्वांस जें होणें तें जालें. यांतही आपले बऱ्याकरितां दुसऱ्याचा उपमर्द करूं नये. परंतु श्रीमंतांचें अकल्याण होतें, तेव्हां उपेक्षा केल्यास मोठा दोष! तेव्हां करणें प्राप्त. या गोष्टीचा संतोष आपणांस पूर्वींपासून कीं, फितूर मोडावाच. त्याप्रमाणेंच घडलें, व याविषयीं संतोष जाल्याचीं पत्रे आपलीं आलीं. त्यावरून संतोष जाला; व पूर्वीच फितुरीयांचा बंदोबस्त करावा हें आपलें सांगणें वारंवार होतें. परंतु एकसमयावच्छेदें व इतक्यांचे आंगीं मुद्दे कसें लागतें? व असेंही करितां कांहीं लागते. त्याचा बंदोबस्त करतों तरी लौकिकांत होतें, कीं नाहक पारपत्य केलें! हा शब्द ईश्वरें रक्षिणें. याकरितां त्यांस बुद्धि होऊन पुरंधरावर चालून आले. हें पृथ्वीस जाहिराणा जालें. तेव्हां थोरलाच मुद्दा सर्वांचा जाला. येणेंकरून निर्दोषता जाहली. ही गोष्ट आपण श्रीहरिभजनभावेंकरून करितात, त्यांत आमचें कल्याण असावें असें स्मरण होतच असेल. त्याचेंच फल श्रीहरीनें करून दाखविलें. अशी परस्परें अंतःकरणाची ममता व स्वच्छता व प्रेम असतां, अलीकडे वर्तमान उगेंच ऐकण्यांत आलें आहे कीं, आपणाकडील संदेह आमचे चित्तांत आला, असें आपलें मनांत आलें. तेव्हां शास्त्र तर असें आहे कीं, कारणावांचून कार्याची उत्पत्ति नाहीं. आणि कारण तर नाहींच. यास साक्ष अंतःकरण. व शास्त्र तर ईश्वरी आज्ञा. तेथें दोष कोठील? तेव्हां याचें कारण एकत्वभाव या कालीं कोणासही सोसत नाहीं. तेव्हां राजकारणी मनुष्यांनीं येतद्विषयीं उद्योग करून कोणी देवता सिद्ध अनुष्ठानेंकरूनही सिद्ध केली असली ह्मणावी, तर आपली भक्ति श्रीहरिचरणीं निःसीम. तेव्हां क्षुद्र देवताचें काय चालणार? तेव्हां बुध्य (बुद्धी) चालत नाहीं. याची परीक्षा हेंच कीं श्रीहरीच अतःकरणांत आपले प्रेरक होऊन खातरजमा होईल, हा माझा निश्चय आहे. राजश्री बाबूराव यांची रवानगी आप-

णाकडे करतों. लौकरच येऊन पोहोंचतील. पुढें कित्येक मातबर मनसुबे व कामे करणें तीं आपणासच मन घालून करावीं लागतील. या समयीं श्रीमंतांचे पायांशीं एकनिष्ठ आणि आमचे मनसब्यास अनुकूल होऊन पुढाकारी जाहाले, याचा संतोष आपणास विशेषात्कारें असेलच. असावा, उचित आहे. श्रीमंत लहान आहेत तों जेथें उणें पडेल तेथें संभाळणें, हा हक्क भोंसल्यांचे घरापासून आपण घडवितील, यांत संदेह नाहीं. रवाना छ २१ साबान. बहुत काय लिहिणें, लोभ असों दीजे हे विनंति.

ताः— गुदस्ता इकडील वर्तमान मनस्वी गेलें, त्यावरून आपण शफथ वाहिली व आमचे लक्षांचे थोरवट करण्यांत आणावयाचे उद्योगाचें भाषण केलें, तें सर्व आह्मांस कळले, व पत्रेही आलीं होतीं. अशीं वारंवार स्मरणें तुमचे ममतेचीं व करण्याचीं घटकेघटकेस आठवतात. त्यांचा विस्तार काय लिहावा? वरचेवर पत्र पाठवून संतोषवीत जावें हें विनंति."

## लेखांक २.

### श्री.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दिवाकरपंत स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेषः— आपण पत्र पाठविले तें पावलें. राजश्री सेनाधुरंधर यांनीं खासदस्तुर पत्रांत श्रीची शपथ लिहून, पत्र व श्रीवरील तुळशी व गंध, सोन्याचे डबींत घालून पाठविले, हें घ्यावें; आणि आपले खास दस्तुरपत्र व श्रीस्वामींवरील तुळशीगंध याच रीतीनें यावें. आणि दक्षिणची दौलत स्वामी व श्रीमंत यजमान एकजीव प्राण जाले, तेव्हां देव राखील. या घराण्यांत अशा शपथा व कागद हें यामागे जालें न जालें, हे ध्यानांतच असेलच. उभयपक्षीं [स्नेहभाव] पुढें फार दिवस चालेल ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळले. त्यास आपण येथून जातेसमयीं बोलण्यांत आले कीं, श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे दौलतीचें कल्याण व आमचे बरेवाईटाचे सोबती येविषयीं राजश्री सेनाधुरंधर यांसी बोलून खातरजमा यावी. यावरून पत्रांत खास दस्तुरें शपथ लिहून व गंधतुळशीची डबी पाठविली. ती पावोन बहुत संतोष जाला. एक विशेष केले कीं, पुत्रपौत्रपर्यंत एकरंग केले. यामागे असें जाले नाहीं हें खरेंच; परंतु हा ईश्वरी इच्छेचा ऋणानुबंध, आणि आपणासारखे दूरंदेश. असा योग येथेच घडला. तेव्हां विहितमार्ग व उभय पक्षींही बहुत उपयोगी, तेंच आपण घडविले. येणेंकरून दक्षिणची दौलतदारी घरची होय. परंतु ईश्वरी कृपेनें आणि या ऋणानुबंधानें बहुत गोष्टी घडतील. येथून राजश्री सेनाधुरंधर यांसी पत्र खास दस्तुर शपथ लिहून व श्रीवरील तुळशी व गंध सोन्याचे मिनेगार डबीत घालून पाठविल्या आहेत. ईश्वर ह्याच गोष्टी निभावील. रवाना छ ११ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनंति."

## लेखांक ३.

श्री. इ. स. १७७८.

"राजेश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांसः—

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेषः— राजश्री दिवाकरपंत येथून आपणांपाशीं गेले; त्यांचें बोलणें बोलून, आपण आपले पुत्र व नातू यांसुद्धां आह्मांपाशीं व आमचे वंशपरंपरेशीं अंतर होणार नाहीं ह्मणून श्रीची शपथ लिहून, खास दस्तुरचें पत्र व श्रीवरील तुळशी व गंध पाठविलें, तें पावून बहुत संतोष व खातरजमेची निशा जाली. त्यास आमचाही निश्चय ईश्वराचे साक्षेनें हाच आहे कीं आपणाशीं व आपले पुत्र राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा व राजश्री खंडोजी भोंसले व राजश्री व्यंकोजी भोंसले व नातू राजश्री परसोजी भोंसले यांसी आह्मांपासून व आमचे वंशपरंपरेपासून जो आपला व आमचा परस्परें ऋणानुबंध जाला, यांत तिळमात्र अंतर होणार नाहीं. याविशीं श्रीच्या तुळशी व गंध पाठविलें आहे, तें घ्यावें. व हें पत्र आपण आपल्यापाशीं ठेवावें. रवाना छ ११ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनंति."

## लेखांक ४.

श्री.

"राजश्री मुधोजी भोंसले सेनाधुरंधर गोसावी यांसः—

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेषः— आपले व आमचे स्नेहांकित आज चार वर्षे होत आलीं. त्यास उभयपक्षींही ईश्वरानें व्यत्यास व संशय रतिमात्र दिसों दिला नाहीं, व सर्वप्रकारें श्रीमतांचे दौलतेचें कल्याण असावें व एक विचारें चालावें याविषयींची काळजी आपणांस आहे. वरचेवर सावध करणें हें आपणापासून घडत आले. ऐसें असतां सांप्रत ऐकण्यांत येतें कीं, आह्मांविषयींचा संशय आपणांस कोणीं भासविला आहे. त्यावरून परम आश्चर्य वाटले! उभयपक्षीं स्नेहाचीच इच्छा व परस्परें कल्याणाविषयीं मानस, तेथें हे संशय व्हावयास कारण काय? उभय पक्षींही विचार व दूरंदेशी असतां हा प्रकार घडेल? घडणारच नाहीं. हें खातरजमा पक्की. परंतु लबाडांनीं मध्येंच आपल्यामध्यें व आह्मांमध्यें संशय वाढवावा हा उद्योग आरंभिला असेल. याचें कारण जें, आपले व आमचे स्नेहाची व प्रेमममतेची गट्ठण आहे, ही सर्वांस वाईट. यामुळें हें करणें त्यांस जरूर असे. वरकड कांहींच नाहीं. आज चार वर्षे जे जे पेंच दौलतीवर आले, ते सर्व श्रीमंतांचे प्रतापेंकडून पार पडले. व पुढेंही आपणासारखे साथी. तेव्हां कोणतीही गोष्ट अवघड नाहीं. याविषयीं खातरजमा आहे. परंतु लबाडांची सीमा जाली! असो. उभय पक्षीं अंतःकरण एक, तेव्हां परस्परें संशय यावयाचा नाहीं. सारांश, राजश्री सेनासाहेब सुभा व दिवाकरपंत

गुदस्ता येथें आले, तेव्हां कोणताही द्वैतार्थ राहिला नाहीं. यास श्रीहरी साक्ष. तेच रीत हा कालपावेतों आह्मांकडून आहे, व पुढेंही दिवसेदिवस अधिकोत्तर श्रीहरीनें चालवावी हेच इच्छा अंतःकरणांतून आहे. त्याप्रमाणेंच ईश्वर घडवील. आपण थोर, बहुत केलें, देखिले, पाहिलें, व दुरंदेशी फार आहे. आपले अंतःकरणात छान करून संशय दूर करावे. याविषयीं सविस्तर राजश्री बाबूरावजी आपणाकडे पाठविले आहेत. सांगतील. त्यावरून कळेल. रवाना छ २ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनंति."

* * *

## ४७. जुन्या मराठे सरदारांचें एकीकरण.

पहिले बाजीराव पेशवे ह्यांनी जुने मराठे सरदार एकत्र करून, त्यांच्या हातून लष्करी नौकरी घेण्याचा चांगली प्रयत्न केला होता, असें अनेक जुन्या कागदांवरून दिसून येते. पूर्वीच्या जुन्या मराठे सरदारांस अनुकूल करून त्यांस उत्तेजन देण्याची रीत ज्या वेळीं सुटली गेली, त्या वेळीं महाराष्ट्रराजसत्ता कमकुवत होण्यास सुरवात झाली. असो. पुढील पत्र वाचण्यासारखें आहे.

श्री

"राजश्री नरसोजी नाईक वणजारे गोसावी यांसीः—

७ अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद समान अशरीन मया अलफ. तुमचें वर्तमान राजेश्री त्रिंबक गोपाळ यांनी निवेदन केलें, त्यावरून कळो आलें. ऐशास तुह्मी पुरातन राज्यांतील, तुमचे हातून सेवा घेऊन सर्व प्रकारें ऊर्जित करावें, हें अवश्यक आहे. कित्येक अर्थ मशारनिल्हेस सांगितला आहे. हे तुह्मांस सांगतील. तें चित्तास आणून स्वामिकार्य करून नक्ष करणें, व मशारनिल्हेस सामील होऊन स्वामिसेवा केलिया तुमचें बरें आहे. सर्व प्रकारें पूर्ववत्प्रमाणें चालेल, व ऊर्जित होईल. यास संदेह नाहीं. जाणिजे छ ६ जिल्हेज. सदर्हूप्रमाणें वरकडास पत्रेः—

१ यशवंतराव शिर्के.
१ जयसिंगजी शिर्के.
१ मानाजी रसाळ.
१ जिवाजी व उदाजी देवकांते.
१ साबाजी वाघमारे व आपाजी पंत.
१ नरसोजी वणजारे विवळेकर.
१ शिवाजी वणजारे.
१ उदाजी वणजारे रिपूरकर. (?)
१ अंताजी खडांगळे.

१ महिपतराव शिंदे.
१ जिवाई आवा शिंदे.
१ मालजी वणजारे.
१ खासा आमची सनद.
१ गवरोजी शिंदे.
महिपतराव यांस सनदा.
१ भगवंतराव काशी मुजुमदार.
१ कृष्णाजी नारायण चौथाई बाबती.
१ बापूजी बल्लाळ सरदेशमुख.
१ काशी नारायण सबनीस.
१ रायाजी काकाजी फडणवीस.
१ साबाजी तुकोजी चिटणीस.

## ४८. एका दरिद्री ज्योतिष्याचें नाना फडणिसास गद्यपद्यात्मक पत्र.

पत्र पाठविणारा बाबू जोशी अजरेकर नांवाचा कोणी तत्कालीन ज्योतिषी आहे. गद्यवाक्यें व पद्यें यथातथाच आहेत. परंतु त्यातील भाव बघावयाचा आहे. बाळाजी जनार्दन यांस त्यांच्या हयातींत नाना फडणीस हें नांव सर्वत्र झालें होतें, व त्यांची कीर्तिही सर्वतोमुखीं झालेली होती; वगैरे मुद्दे पत्रांतून निघतात. पुणें येथील गंगाधरशास्त्री दातार यांच्या पोथ्यांत हें पत्र सांपडलें. ज्योतिषाला कांहीं तरी दक्षिणालाभ झालाच असेल !

[राजवाडेसंग्रह.] श्री.

स्वस्तिश्री महाराज फड्णिस तुह्मी श्रीसंतगर्भोद्भवां ।
सत्पुत्रें कुळभूषणें विलसुनी नाना लिलें गौरवां ॥
सद्विप्रें तव पूर्वजन्मसुकृतें दीर्घायुपें सोत्सवां ।
तुह्मातें जगदीश राजपदवी इच्छीतसे वाग्भवां ॥ १ ॥

श्रीर्जयति.

सद्योगें रघुवीरराजसमताश्रीमत्कुलीं जन्मलां ।
सत्कर्तृत्वमहा + + + + कृती मंत्रीं पदीं अर्हलां ॥
शत्रूराज्यपदें समस्त हरुनी धर्मोपमें वर्त्तलां ।
स्वाचर्णें नृपतुल्य होउनि तुह्मी भूमंडळीं पूजिलां ॥ १ ॥
नाना हो ! तुह्मि धर्मराज्य करुनी नाना यशें साधिलीं ।
नानार्थें स्वकुलोद्धरोनि सुद्धिपें नानाद्भुतें जिंकिलीं ॥

नाना शास्त्र विलोकुनी श्रवणुनी नानार्थ जें गृह्विलीं ।
नाना पंडित वेदशास्त्रनिपुर्णी नाना कुळें भूषिलीं ॥ २ ॥
चित्तीं संतत एकनिष्ठ धरुनि श्रीमत्सवाई कृपाळ ।.
साक्षात् माधवरावपुण्य स्मरुनी त्यांतें प्रणीतां त्रिकाळ ॥
राज्यें राजकुळें असंख्य वदती यांचा असो सत्सुकाळ ।
श्रीरामें अवतार मुख्य धरिला हे दोघ पृथ्वीभुपाळ ॥ ३ ॥
आतां पुत्रसुपौत्रवंश त्वरिता वाढोन शत्रु नसो ।
लक्ष्मी पूर्ण चिरायुदेहदृढता कीर्ती यशस्वी वसो ॥
दृग्ज्योतिर्विद बाबु नित्य जपतो कल्याण तुम्हां असो ।
षण्मासोत्तर शोभनें तव गृहीं प्रत्यब्द दृष्टी दिसो ॥ ४ ॥

स्वस्तिश्रीमद्रमोमारमणचरणयुगुलस-
रोरुहांतःकरणसकलगांभीर्यसमस्तौ-
दार्यसंपूर्ण सुधारस माधुर्य अखिलन-
रनिधानवैडूर्य स्वस्तिश्री जयाभ्युदय-
श्रीमद्राजमान्यराजश्री श्रीमंत माहा-
राज नाना फडनीस महत्प्रभुवर्य धुरं-
धरवर्येषु

+ + + + + ताश्रयापेक्षीत आजिरेकर बाबूज्योतिर्विदाधारादि—
+ + + + + षड्चक्रविलसत्परमानंदमनसा सद्वेदशास्त्रस्मृतिश्रुति—
पुराणोक्तानंतपरिपूर्णाशिर्वोदाद्युपरि श्रीलक्ष्मीवंत महाराज नाना! आपुल्या सद्दर्शनानन्तरें यथाज्ञानें, कांहीं संस्कृतार्थी, कांहीं भूतभविष्यवर्तमानार्थी, कांहीं कांहीं वेदशास्त्रोक्तमंत्रमांत्रिकजपजाप्यार्थी, कांहीं परस्परशुभफलेच्छार्थी, परमसच्चिदानंदें आपण गर्भश्रीमंत भाग्यवंत सर्वज्ञ चतुरां प्रति परिपूर्ण आशिर्वाद लेहून द्यावा, ऐसें परम उत्कंठित मानस. त्यास आपण साक्षांत श्रीलक्ष्मीनारायण भगवंतअंशअवतार. या अर्थी आपुल्या पूर्ण कृपें श्रीभगवत्सत्तें सद्विप्रपूर्णआशिर्वादें आणि आमुचे पूर्वजपुण्यसुकृतें समयानुरूप घडोन येईल तें खरें, किंवा आपण सदयत्वें घडवितील तेव्हां खरे. विद्यमानी कांहीं पद्यपद्यार्थी कांहीं शब्दशब्दार्थी यथाज्ञानें परमोल्हासें आशिर्वाद लिहिला असे. त्यास परमक्षमत्वें आशिर्वाद पावला ऐसें लेखककर्वे उत्तर पाठविणार श्रीपांडवोपम आपण महासमर्थ आहेत. विशेषः— विरळा जानंति गुणान् विरळा कुर्वंति निर्धने स्नेहं विरळा रणेषु धीराः परदुःखेन दुःखिता विरळा । १ या अर्थान्वयान्वित आपण श्रीविक्रमराजोपम परदुःखभंजक आहेत. तेथें विशेष लिहितां स्फूर्ति न होय! परस्परदर्शनलाभ होय तो महत् सुदिन. सर्वेदेववरदो वरदो वः शारदास्तु वदना वदनाब्जे इंदिरास्तु खलु मंदिरसंस्था प्रस्थिता जलनिधिं तव कीर्त्तिः १ इहैव परिपूर्ण आशीर्वाद. ५ ५ ५ ५

इहैव पुनरुक्तिकल्पनोद्भव जो आपणासन्निध नानाशास्त्रप्रमेय करून नानार्थ जें शुभकल्याण आशीर्वाद सत्प्रतिज्ञे निश्चयात्मक लिहून देणार नागरीक नाना सद्विप्र आहेत. ऐसें असतां हें लिहिणें आश्चिर्य ऐसी कल्पना होऊ सके. त्यास चंद्रप्रकाशादि अनेक प्रकाश असतां खद्योतादिक स्वस्वप्रकाश दश्या + + + + + + + त नाहींत् जाणोन हे लिहिलें असे. परस्पर स्तुतिवादसा भासेल, तर पंचमुखीं यथार्थ जे तेंच लिहिणें आहे. क्षमा असावी.

वक्त्राग्रे भाग्यलक्ष्मी करतलकमले सर्वदा दानलक्ष्मी ।
दोर्दंडे वीरलक्ष्मी हृदयसरसिजे भूतकारुण्यलक्ष्मी ॥
सर्वांगे सौम्यलक्ष्मी निखिलगुणगणाडंबरे कीर्तिलक्ष्मी ।
खड्गाग्रे कीर्तिलक्ष्मी जयतु विजयते सर्वसाम्राज्यलक्ष्मी ॥ १ ॥

इहैव पुनराशीर्वादः ५ ५ ५ ५

## ४९. महादजी शिंदे ह्यांचे कडील राजकारणाचें पत्र.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"सेवेसीं आज्ञाधारक राघो बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ २० रजबपर्यंत मुकाम लष्कर नजीक लालसोट प्रांत जयपूर येथें स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—आपली आज्ञा घेऊन निघालों, ते लष्करास सुखरूप पावलों. आपण पत्र श्रीमंत पाटीलबावांस दिल्हें होतें तें, व तपसीलवार वर्तमान प्रथक प्रथक प्रकरणीं सांगावयास सांगितलें होतें, तें आज्ञे-प्रमाणें पत्र व वर्तमान निवेदन केलें, व हल्लीही आपण आज्ञापत्र पाठविलें त्यात आज्ञा जे, "तुह्मांस जातेसमयीं पाटीलबावांस तपसीलवार वर्तमान सांगावयास सांगितलें, त्यांचीं उत्तरें होतील तीं लिहून पाठविणें, ह्मणोन तुह्मांस सांगितलें होतें. त्यास तुमचें पत्र उत्तर जाल्याचें आलें नाहीं. यास्तव हाली मुजरद कासीदजोडी पत्रें देऊन पाठविली आहे. तरी पाटीलबावांनी उत्तरें सांगितलीं असतील तीं, तपसीलवार लिहून पाठवावीं" ऐसें आज्ञापत्र आलें. त्यावरून यजमानसाहेबास प्रथक प्रथक प्रकरणीं पहिलें तपसीलवार वर्तमान सांगितलें होतें. त्यांचीं प्रतिउत्तरें सांगितलीं; त्याची कलमवार बीतपसीलः—

इंग्रज प्रकरणीं मजकूर, एक कुमकेस यावें; व दुसरें फरासीस यांजकडील कुमक आणिल्यास इंग्रजास विषाद नसावा; व तिसरें मागील इंग्रजाचें टिपूच्या मसलतीच्या प्रकरणीं ऐसे तिन्हीं प्रकरणांचें वर्तमान सांगितलें. त्यांचीं उत्तरें जालीं जे, इंग्रजाचे कुमकेविषयीं इंग्रजाचे वकिलाजवळ बोलून कलकत्त्याहून पत्रें मुंबई-वाल्यास व श्रीमंताजवळ वकील इंग्रजाचा आला आहे, त्यांस पत्रें गेलीं आहेत.

सरकारांत कुमक लागल्यास वकिलास सांगोन मुंबईहून कुमक आणावी; करार होईल त्याप्रमाणें खर्चास द्यावें; व फरासीसाचे कुमकेविशीं इंग्रजाचें वकिलासीं बोलोन कलकत्त्यास लिहविलें. परंतु कलकत्त्याहून फरासीस कुमकेस आणावा हे सकत आलें नाहीं, व टिपूचे मसलतीचे प्रकरणीं गुा चा मजकूर याचीं पत्रें पेशजीं येऊन उत्तरें गेलींच आहेत. ऐसीं उत्तरें जालीं. कलम. १

हबशी यांजमध्यें दुई जाली आहे, यास्तव जंजिरे याजविशीं प्रयत्नेंकरून जंजिरा हस्तगत जाल्यास पाहावें, ऐसें आहे. याजकरितां इंग्रजांनीं कुमक करावी. हें न जाल्यास हबशासीं लढाई सुरू जाल्यावर इंग्रजांनीं हबशाची कुमक व सरंजाम पोचवूं नये, ऐसें इंग्रजांसीं बोलोन पक्के करावें. ऐसें सांगितल्याप्रमाणें श्रुत केलें. त्याचें उत्तर सागितलें जे, इंग्रजाचे वकिलासीं जंजिरेकर हबसी याजविसीं दोन तीन वेळां बोलोन इंग्रजाचे वकिलाकडून कलकत्त्यास पत्रे पाठविलीं. तेथील इंद्रसेन वकील यांस लिहिलें आलें जे, अठरा टोपीवाले यांतील हबशी आहे. पेशवेसाहेब यांचा व आमचा तह जाला आहे, त्यास विरुद्ध पडतें. यास्तव हबशी यांचा व पेशवेसाहेब यांचा पहिला तह जाला आहे, त्याप्रमाणें आह्मी दरम्यान बोलून तह करून देऊं. त्यांत हबशानें खलेल केल्यास पेशवेसाहेब यांची कुमक करावयासी येईल. ऐसें पत्र इंद्रसे-सेनास कलकत्त्याहून आलें. त्यांतील मजकूर इंद्रसेन वकील याणें सांगितलेला ह्मणून सांगितलें. कलम. १

भोंसले यांसीं गढेमंडळ द्यावयास केलें आहे. याचें कारण, टिपूचे मसलतीस मुधोजीबावा याणीं जातीनसीं यावें व गढेमंडळ द्यावयासीं केलें त्यामध्यें पुत्रानें पांच हजार फौजेनसीं चाकरी करावी ऐसा करार केला आहे. भोंसल्याकडे सरंजाम दिल्हा नाहीं. आपले दुसरे सरंजामी आहेत, त्याप्रमाणें पांचहजार स्वारांनसीं चाकरी करावी ऐसा करार करून गढेमंडळ दिल्हें. ऐसे सांगितल्याप्रमाणें श्रुत केलें. त्याचें उत्तर सागितलें कीं, प्रसंग पडल्यास करणें प्राप्त जालें. भोंसले काबूयार प्रसंग पाहून आपले काम करून घ्यावयाचें मागें सरकारकामास निखालस कोणत्या उप-योगीं आले, व पुढेंही निखालस कोणत्या उपयोगीं पडतील हा भरंवसा नाहीं. तत्राप समय पाहून सवड राखून कारभार केला. बरें आहे. ऐसें उत्तर सांगितलें. कलम. १

हिंदुस्थानचे मसलतीचा प्रकार एक रोखें मसलत करावी. चोहोंकडे मसलतीवर लांब फौजा फांकल्या ह्मणजे समयास सारी फौज जवळ असत नाहीं, व हिंदुस्थानचे फौजेवर केवळ विश्वास ठेवूं नये. चौकीपहाऱ्याचा बंदोबस्त असावा, ऐसें सांगितल्या-प्रमाणें बोललों. त्याचें उत्तर सांगितलें जे, प्रसंग पडल्यास मागें पुढें पहातां येत नाहीं. खेचीनें लबाडी केली, तेव्हां त्याचें पारपत्य करणें प्राप्त जालें. न करावें तर नक्ष जातो, व दुसरेही लबाडी करूं लागतील. यास्तव त्याचें पारपत्य करणें प्राप्त जाहालें. व बुंदेले यांचे घरांत कलह प्राप्त जाहला, तेव्हां त्याचा बंदोबस्त करावयासी फौज

पाठवणें पडली, व सिकाच्या तोंडावर फौज पाठवणें आली. जे करणें तें प्रसंग पाहूनच करणें लागतें. हिंदुस्थानी फौज हजरताकडील चाकर न ठेविल्यास दुसरेकडे जाऊन, चाकरीस राहून, फितूर फायदा करून बखेडा करूं लागतील; व हजरतीसही बरें वाटणार नाहीं. यास्तव फौज व पलटणें सुद्धां ठेवणें प्राप्त जाली. चौकीचा बंदोबस्त आपण लिहून सूचना केली, त्यावरून केला आहे. राघोगडची मसलत ते सिद्धीस गेली. फौज व पलटणें व तोफखाना येऊन दाखल जाला. खंडेराव हरी यांसही पत्रें गेलीं आहेत. तेही लौकरच येतील. सिकाचे तोंडावर नेहमीं फौज ठेविली पाहिजे. त्यास धारराव शिंदे वगैरे दाहा बाराहजार फौज व पलटणें दाहा पंधरा व कांहीं तोफखाना ऐसें पाणिपताचे पलीकडे नेहमीं ठेविलीं आहेत. ऐसें सांगितलें. कलम. १

त्रिंबकराव नारायण यांच्यानें सरदारीचा बंदोबस्त न होय. रोज उठोन बोभाट! पागे व मोतदार वगैरे लोक येऊन सरकारच्या डेऱ्यापुढें बसावें. तेव्हां रामजी पाटील यांसीं दोन चार वेळां सांगितलें. त्यावरून रामजी पाटलांनीं पाटीलबावांस पत्र लिहिलें. त्याचें उत्तर रामजी पाटील यांस आलें जे, त्रिंबकराव नारायण यांच्यानें बंदोबस्त न होय, तर सरकारांतून बंदोबस्त करतील तर करून ऐसें पत्र रामजी पाटलास आलें, व रामजी पाटील यांनीं खातरजमा केली. तेव्हां त्रिंबकराव नारायण यांची सरदारी काढून रघुपतराव नारायण यांस सांगितली. पाटीलबावांचे इतह्याखेरीज केलें ऐसा अर्थ नाहीं. ऐसें आपण सांगितल्याप्रमाणें श्रुत केलें. त्याचें उत्तर सांगितलें जे, रामजी पाटील यांणीं, चांगोजी कदम यांसीं, त्रिंबकराव नारायण यांना कारभार सांगितल्यास सरदारीचा बंदोबस्त होईल, ह्मणून लिहिलें. त्यावरून त्यांचें उत्तर, ज्यांत त्यांचे सरदारीचा बंदोबस्त होय तें करावें, ह्मणोन लिहिलें. त्रिंबकराव नारायण यांची सरदारी काढून रघुपतराव यांजकडे सांगावयाविसीं लिहिलें नाहीं. दादासाहेब यांच्या व मोरोबादादा यांच्या वगैरे यांचे फितुरांत रघुपतराव मिळाले व केसो कृष्ण याणें गणेशपंत बेहेरे यांसीं दोन तीन वर्षें मसलतीखालीं आणिलें. पंचवीस तीस लाखपर्यंत स्वारीसंमधें खर्च जाहला. एवढी नुकसानी केली. ऐसें फितुरी उभें करावें ऐसें लिहिलें नाहीं, व लिहिण्यांत हल्लींही येणार नाहीं. त्रिंबकराव नारायण यांजकडे अपराध नाहीं. त्याअर्थी त्यांची सरदारी त्यांजकडे सांगोन बंदोबस्त करून द्यावा. ऐसें उत्तर सांगितलें. कलम. १

टिपूचे मसलतीचा मजकूर व बादशाहाकडे टिपूचा वकील गेला आहे, त्यास काढून द्यावयाचें सांगितल्याप्रमाणें श्रुत केलें. त्याचें उत्तर सांगितलें. टिपूची मसलत, ज्याअर्थी नरगुंद घेतलें व शाहापूर बेळगांवपर्यंत फौज आली, त्याअर्थी मसलत करून पारिपत्य करणें प्राप्त जाहालें, व वकील बादशाहाकडे आला होता, त्यास हजरतास सांगोन काढून दिल्हा, ऐसें उत्तर सांगितलें. कलम. १

## ५०. पोर्तुगीज गव्हरनराचें पेशव्यांस पत्र.

(तालिक खत फिरंगी) श्री

सिनोर पंतप्रधान.

थोर दैवेंकरून दोन वेळां आशाहामतपन्हा हुजूर पावोन नाजुक मनसबेची बोली केली खरी, परंतु इज्यानेबाचे मेहेनतीचा परिणाम लागोन सर्वांच्या दिलबरहुकूम घडोन न आलें, याजवरून बहुत दिलगीर जाहालो.

तारीख १० माहार्च सन मजकूर आह्मी आपले आरमारासहवर्तमान दंडाराजपुरीस पोहोंचलों. याअगोदर साहा रोज तेथें इंग्रज प्रविष्ट जाहाले होते. सिद्दीनें फिरंगीयांचे मर्दानगीपुढें आपलें न चालें, हें पुर्ते समजोन इंग्रजा ताबीन आपले किल्ले वोपून दिले ते मागापासून त्यासी बोली चाली करीतच होते. आशाहामतपन्हाचे किफायतीस व आपण कबूल केलेस तफावत करून जंजिऱ्यास व किल्यास आपल्या निशाणा लावून आशाहामतपन्हाचे सरदारांस फौज उपेक्षणा करावयास लाविली. सिद्दीस आपण कुमक न करी ऐसे आशाहामतपन्हास निश्चयी सांगोन तथा न आचरला. तेव्हां तो विचार मुलाईजा करावयास सामान न्हवे. इंग्रज यांणीं आपला शब्द देऊन तफावत केली, काय कार्य ह्मणोन विचार मनास आणिलिया सहजच कळोन येईल. पठाणाम जैस (यश ?) आलें ह्मणोन चोहींकडेस वर्तमान त्यांहीं उठविलें, आण आह्मासही करार दिसोन यावयासी मोठे तरतुदीने गोमांतकी तैसेंच वर्तमान घातलें. कां तर, आह्मी आपले आरमारानसीं सिद्दीचे किल्ले काबीज करावयास न जावें. यासाठीं आशाहामतपन्हाचे वकील आज मोकामीं आहेत, त्यांसही प्रविष्ट असणार. फिरंगी आरमार ते मोहिमेस न जावें, ऐसे इंग्रजांचे दिली होते. निमित्त ह्मणावें न गेलें. या आशाहामतपन्हामी बिगाड करून घ्यावयाचें अगत्य नव्हतें. तें गेलेमुळें जगविख्यात शत्रुत्व प्रगट केलें, त्याचा विचार ह्मणावा तर सर्वांस टकाटकी करावयाचा.

इंग्रज बोलतात कीं, फिरंगी किल्ले मजकूर काबीज करून आशाहामतपन्हास वोपून देणार नाहींत, हें आपण जाणोन याजवास्ते आपण आपले ताबीन करून घेतले असत. आह्मीं आमचे निष्ठेस अंतर करणार असतों तर आशाहामतपन्हासीं आमचे किल्ले आहेत त्यांत स्वल्प जबरदस्ती हल्ली प्रसंगीं आहे, त्याजवरून त्यांपैकीं कांहीं काबीज करून घेतों. जे बळकटीनें जंजिरा व कांसा (?) काबीज करायास गेलों, तेच बळकटीनें आपणासारिखे वर्तोन आह्मी आमचे ठिकाणें घेणार होतों. ह्मणोन ते विवेक करीत नाहींत. यानंतर सिद्दीच्या किल्याच्या काबजातीची मुबारखी आशाहामतपन्हास दिल्ही जाली. कां ह्मणाल तर, किल्ले मजकूर इंग्रजास्वाधीन

जाहाले ते आपणास ऐसेंच असावें. किल्ले वोपून देतील, यास अंतर होणार नाहीं जरीही सिद्धीस साह्य होत असतें तरीही आशाहामतपन्हास ऐसें असलिया आवडी-युक्त तेंच करून, आपुलें हित होई तो मार्ग पाहोन घेणार, हा त्यांचा स्वयंभु गुण लक्षण आहे.

आशाहामतपन्हास इजानेबीं आपली मर्दानगी दाखविणें घडोन आलें नाहीं याजवरून बहुत दिलगीर जाहालों. आशाहामतपन्हाचे सेकून (शकून, वचन, शपथ) करार मानोन, एकबलवइजाल पन्हा कोंद विजुरे (!) साहेबासीं इजानेबीं सर्वत्र आपले शिरी घेऊन निशा केला जो, आशाहामतपन्हा कुल खर्च देणार यावरून एक दिलीनें हल्लीं मसलतीस इस्तादानें खर्च केला तो व आह्मांकडील जमाव जंजिऱ्यास होता त्याचा साहा महिने अधिकच मुशाहिरा देखील दिला नाहीं. यावरून इजानेबावर मोठा शब्द आहे.

आशाहामतपन्हा, आह्मांकडील जमावापासून कांहींच किफायत नसतां, त्यांसी मुशाहिरा आपले उमदेपणें चालवून लाविला असता, तिकडील सरदार सतादेस याणें पदरीं घातला नाहीं. सरदार मजकूर याणी धणीआज्ञा उलंघन केली. तेव्हां तो गुनाहागार जाहला....... ..त्याणें आपण आशाहामतपन्हाचे उपकारिक जाहलों ह्मणून जगत्रीं बोलिलें भले. परंतु, बिशाद पावोन बोलावें ऐसें सहसा नसावें. चांचा येऊन प्रविष्ट जाहाले वक्तीं सरदार मजकूर याणें करणें न केलें. याजवरून ते नसीयत खामखा पावतील ऐसें इजानेबीं करार मानिलेंच असे. एकबल व इजाल पन्हा कोंद विजुरे साहेबी सर्व खलबती याच्या ध्यानास न आला असता, आपलेंच मतें आपणावर घेतला. आशाहामतपन्हास मालूम जाहाले पाहिजे. हे मनसबेची कुल जबाबसाल साहेब मजकूर यासी इजानेबीं द्यावा लागतो. आणि त्याही ज्याहां पन्हायांसी हा सर्व विचार इजानेबीं पुन्हां आपले नजीक येऊन जाहीर करावा ऐसें असलेवर जें जे ठाऊक असेल तें सर्व आयां केलें जाईल.

इंग्रज यांणीं आपले सरदार आमच्या जाहाजांवर पाठवून आपले पादशाही तर्फेनें सांगोन घेतलें जें, आपणासी बिगाड न करावें. ह्मणोन सिद्दीनें आपणास किल्ले सोडून दिलेचा दाखलेही पाठविले. त्याच्या नकला देसाई विष्णु नाईक याजकडे रवाना केल्या असत. प्रविष्ट होतील.

इलायतामध्यें उभयतां ज्यांहांपन्हामध्यें खुलासा चालतो, तेव्हां त्यांसी बिगाड करितां नये, व त्याच्यानेंही आह्मांसवें करितां होत नसे. कां ह्मणाल तर, ज्यापासोन अंतर येईल, त्याणें आपलाले डोईनें खावंदासीं जबाबसाल करावा लागतो. ह्मणोन आशाहामतपन्हास गौस गुजार केले जातें.

आह्मांस दिरंग लागोन एवढें घडोन आलें ह्मणोन भलतें अशुभचिंतक बोलतील तर खुदाई आज्ञेवर मनुष्य विचार करील ऐसे ह्मणतां नये. माहे नोवेंबर थोर तुफान येऊन आह्मांकडील अनेक तरांडी नाश जाहालीं. गोमांतक मोहोरावर दोन गलिया

व ७४ चौऱ्याऱ्सर तोफांचे दर तोफा बारा व चोवीस लीब्र वजनी गोळचे ऐसे नासोन गेले. इंग्रजांचींही मोठीं जाहाजें आठ बुडालीं. तुफान सर्वेत्रीं समान लागले. ते समयीं आशाहामतपन्हा आपले फौजेनसीं लोणीवर मोकाम होत.

इंग्रज याणें जे बोली केली ते पाहिजे ते वक्तीं करणार होते. कां जे, मुंबई होऊन जंजिरा दहा कोस असे. गोमांतकी होऊन शंभर अधिकच आहे. आह्मांकडील एवढा मोठा सामान तयार जाहाला होता, त्याचें वर्तमान गुप्त असणार नव्हतें. याजवरून त्यास जवळ होऊन पाहिजे तेव्हां कावू साध्य करून घेऊस (घेण्यास) वक्त मिळतोच.

सदरहू कलमें केल्या मजकुरावरून जंजिऱ्यास आह्मांकडील बाकी उरला जमाव काढून आणिला, तदपूर्वी आशाहामतपन्हाचे सरदारांस इजानेबीं सांगोन पाठविले जे, सरकारच्या कामास जमाव मजकुराचे जरूर असेल तर ठेवून घ्यावें. त्याणें तें सेखून अंगिकारिलें नाहीं. आह्मीं याखेरीज कांहींच सागोन न पाठवितां त्यांणींच होऊन अगोदर निश्चय, जमाव रवाना करोन यावा ऐसा, केला होता. आह्मीं इंग्रज याणें सांगोन घेतलेचा जबाब कलमीं केला जो, जंजिरा बंदर सिद्दी याचें, त्यांणीं तुह्मांस वोपून दिले. तुह्मीं आपली निशाण लाविली. तेथें आमचा जमाव आहे. याजकरिता तो न्यावयासी आंत आलों. इतुके त्यांसी कलमीं करून, सरकारचें किफायती युक्त जे कामकाज असेल तें आशाहामतपन्हा याचे सरदारासी निभ्रांत मनासी आणावें, फैसले करावेसे होतें. त्यासी विष्णु नाईक याणें रामाजी बारवे व रामाजी महादेव यांचे नांवें आह्मांस इशारत केली जे, जेथं आरमार नागराऊस होतें, तेथंच जाऊन असावें. योग्य असे, ह्मणून आह्मी तेंच बरहुकूम केलें.

सर्व इंग्रज यांचाच उपदेश ऐसा आह्मास अखेर निदर्शनासी आले. आपणाकडील मोजणा (?) आह्मास समजोन यावयाचा प्रसंग नसावा. यासी साक्ष कोण ह्मणावें तर आशाहामतपन्हाचे सरदारास सागोन पाठविलें जे, इजानेब जहाजावरून खाली जातील, तर आपण खामखा शाहामतपन्हाच्या गुराबा वगैरे तराडीं आत आहेत, त्यांवर मारामार करूं ह्मणून.

आशाहामतपन्हाकडील चौदा गुराबा व साठ मोबलग गलबतें तिकडेस तयार असून कोणीच धैर्य धरून मर्दानगीने पुढें निघोन गेला नाही. एकादा नौकर धणीकामावर रत होऊन चालतो, आणि एकादा आपले लुब्धतेवर चाड धरून धणीकाम विस्मरण होतें. ह्मणून आशाहामतपन्हास न सागता नये.

बयाणवार मजकूर कलमीं केला ह्मणून आशाहामतपन्हांनीं विशाद न मानावा अखेरीं हुजूर जाऊन भेट घेतलेचा मोठासा बहुमान पावलों हें यथार्थ आहे. रवाना ता. ४ माहे अप्रील इ. स. १७६१.

ज्याक फिलिफ देकद्रेज.



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक २ रें.] जुलै १९१०. [अंक १२ वा.

## विषयानुक्रम.





मुंबई:—काळकादेवीच्या रस्त्यावर कोलभाट गल्ली, घरनं. २३ येथें
तुकाराम जावजी यांच्या निर्णयसागर छापखान्यांत
बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर यांनीं
मालकांकरितां छापिला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

गंगाधर गोविंद यांच्या विचारें आकोडी किल्ला पर्णेवालीयाचा आहे, तो दतीयेकरास दिल्यानें ठीक नाहीं. आकोडीसभोंवता मुलूक सरकारचा, जालवण व उरई वगैरे महाल आहेत. हल्लीं माजी (?) होती, तेव्हां आमचीं कुटुंबें आकोडीच्या किल्लीयांत राहतात. पर्णेवालीयाची बदनजर नाहीं. दतीयेवाला बदमामली आहे. याजकरितां त्यांजकडे देऊं नये. सरकारांत ठेवलियास गुंता नाहीं. ऐसे जाबसाल पडले आहेत. दतीयेवालीयानें मोर्चेही लाविले, तर साहा महिने लागतील. खंदकांत पाणी आहे. टेकडीवर किल्ला आहे. याजकरितां राजश्री अलीबहादूरबाबा यांसी पत्र पाठवावें कीं, आकोडीचा तालुका किल्लीयासुद्धां सरकारांत ठेवावा; दतीयेकर राजा छत्रजीत यांजकडे न द्यावा. आणिकही ठाणीं वेत्रवतीअलिकडे असतील तीं न द्यावीं, ह्मणून पत्र पाठविलें पाहिजे. दतीयाचें राज्य तेरा चौदा लक्षांचें आहे. त्यांजपाशीं हमेशा फौजा येतात. ते दोन अडीच तीन लक्ष रुपये घेत आले. तुह्मीं पाऊण लक्ष रुपये घेऊन त्यास दोन लक्षांची जहागीर देऊं केली, हें चांगलें कीं काय? ह्मणून गंगाधर गोविंद व शिवराव हरी ह्मणतात. सरकारचाकरी तऱ्ही दतीयेकरांनीं करून दाखविली असती, मग जहागीर द्यावयाची होती. तूर्त आकोडी त्यांजकडे दिलियानें पर्णेकर वगैरे बुंधेले यांस विषम वाटेल. सर्व बंदोबस्त जालीयावर मग करणें तें करावें. हल्लीं हिंमतबहादूर गोसावी यांजपासीं हजार बाराशें स्वार व तीन चार हजार पायदळ जमा जालें आहे. त्यांजपैकीं दोन हजार नंगे गोसावी आहेत, ते दूर करावे ह्मणून आह्मीं सांगितलें आहे. ते दूर करणार. बाकी दोन हजार राहिले. त्यास पोटास पंधरा हजार रुपये दरमाहा तूर्त द्यावे लागतील. नाहींतर दोन तीन लक्षांचा मुलूक त्यांजकडे लावून द्यावा, ऐसें सरदार ह्मणतात. आह्मी पूर्वींपासून सांगत आलों कीं, गोसावी याची जमात वाढवूं नये; परंतु जमाव जाला. लखनौ प्रांतीं हत्ती व तोफा होत्या, त्यांजपैकीं दोन तोफा दहा बारा शेरी गोळीच्या लष्करांत दाखल जाल्या, व मागाहून साहा तोफा जिलबीच्या येणार., हत्ती तीन च्यार आले आहेत. पूर्वीं स्वामींचें पत्र आलें, तेथें आज्ञा कीं, गोसावी यांसी झांशीस ठेवावें. येविषयीं आह्मीं दोन तीन वेळां बोलिलों, परंतु तूर्त ठेवावयाचा नाहीं. सध्यां कामकारभार सर्व त्याच्या हातून घेत आहेत. मुलुकाचें काम राजश्री गंगाधर गोविंद यांच्या हातून घ्यावयाचें केलें, याजमुळें ठिक आहे. तपसीलवार वर्तमान सेवेसीं विदित व्हावें ह्मणून विनंतिपत्रीं लिहिलें आहे. येथील सरदाराची मर्जी राखोन, कल सांभाळून, सरकारउपयोगी ते सल्ला सांगत आहों. गोसावी हिंमतबहादूर यांसी

दरमाहा खर्चास द्यावयाची सोय होणार नाहीं, ह्मणून तीन लक्षांचा मुलूक लावून द्यावा ऐसा विचार केला आहे. हिंमतबहाद्दर गोसावी याचा बंदोबस्त कोणे रीतीनें करावा, त्याची आज्ञा निक्षून सरदारास पत्र पाठविण्याची मर्जी असेल, त्याप्रमाणें पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे; व राजश्री गंगाधर गोविंद व राजश्री शिवराव हरी यांस पत्रें कीं, तुह्मीं फौज सुद्धां राजश्री अलीबहादर यांजपासीं राहोन डंघाईचा वगैरे बंदोबस्त यथास्थित करणें ह्मणून पाठविलीं पाहिजेत. नेक सल्ला तीच आह्मी सांगत आहों. परंतु त्यास दिकती पडतात. यास्तव स्वामींचींही आज्ञापत्रें आलियानें येथें वोढ पडणार नाहीं. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे हे विज्ञापना.''



## २ इंग्रज, पेशवे व निजाम ह्या त्रिवर्गांची टिपूवरील स्वारी.

[ इ.स. १७९१–९२ मध्यें गव्हरनर जनरल लॉर्ड कार्नवालीस ह्यांनीं पेशवे व निजाम ह्यांच्या बरोबर टिपूवर मोहीम करण्यासाठीं ऐक्यभावाचा तह करून त्याच्या राज्यावर स्वारी केली. ह्या स्वारीमध्यें लॉर्ड कार्नवालीस हे जातीनसीं हजर असून, मराठ्यांचे वतीनें त्यांच्या बरोबर हरिपंत फडके, व निजामाच्या वतीनें त्याचा मुलगा शिकंदरजहा व दिवाण मैनुद्दौला, हे आपआपल्या सैन्यानिशीं हजर होते. ह्या त्रिवर्ग फौजेनें टिपूच्या प्रांतावर स्वारी करून त्याचा बराच मुलूख काबिज केला, व इ. स. १७९२ च्या प्रारंभीं टिपूची राजधानी जें श्रीरंगपट्टण शहर त्यावर चाल केली. श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यास ह्या त्रिवर्ग फौजांनीं वेढा घातला व इंग्रजी फौजेनें त्यावर जोराचा हल्ला केला. ह्या योगानें टिपू विनम्र होऊन तह करण्यास राजी झाला. त्यानें आपले दोन मुलगे ओलीस पाठविले व ह्या त्रिवर्ग सरकारांस तीन कोट रुपये रोख व दीड कोटीचा मुलूख, व दरबारखर्च ३० लाख रुपये देण्याचें कबूल केलें. ह्या हकीकतीचीं सविस्तर पत्रें श्रीरंगपट्टण येथील रणभूमीवरून हरिपंत फडक्यांनीं पेशव्यांचे कारभारी नानाफडणवीस ह्यांस लिहिलीं आहेत. हीं पत्रें अतिशय महत्त्वाचीं व मनोरंजक असून अतिशय निःपक्षपातपणानें लिहिलेलीं आहेत. इंग्रजांच्या शौर्या-बद्दल त्यांत यथायोग्य उल्लेख असून, सर्व वृत्तांत विशेष पाल्हाळ न लावितां, थोडक्यांत मुद्देसूद रीतीनें लिहिला आहे. ह्या प्रकरणाची हीं पत्रे संगतवार एके ठिकाणीं सांपडलीं, तीं येथें प्रसिद्ध केलीं आहेत. ह्याच मोहिमेचा इंग्रज इतिहासकारांनीं दिलेला वृत्तांत व ह्या पत्रांतील वृत्तांत, ह्यांची तुलना करून पाहणारास, हरिपंत फडक्यांच्या पत्रांत सत्यवक्तेपणा व इंग्रज योध्याविषयीं आदर बुद्धि चांगली दिसून येईल. ]

---

### लेखांक १

पैवस्ती चंद्र १ साबान
इसने तिसैन हस्तें डांक.

श्री

"सेवेसीं विज्ञापना तागाईत चंद्र १२ ज़मादिलाखर वर्तमान यथास्थित असे विशेष:– याकलीदुर्गाहून कूच करून, एक मुक्काम मधीं करून, दुसरे मजलीस श्रीरंगपट्टणाजवळ तीन कोसांचे फासल्यानें मुक्काम जाला. पुढें इंग्रेज, पाठीमागें आमची व नवाबाची फौज, याप्रमाणें मुक्काम चंद्र ११ जमादिलाखरीं जाहाला. पट्टणचे उत्तरेचे आंगें राहिलों आहों. टिपू पट्टणांत आहे. या मुक्कामास आलों ते दिवशीं रात्रौ, इंग्रज राहिले आहेत त्यांचेपुढें निकट पाहारे असतात, त्यांजवर मध्यरात्रीस बाण टाकिले. पाहारेकऱ्यांनीं सिलका केल्या. चार घटिकापर्यंत

पातळ पातळ बाण सुटत होते. दाहा बाण लष्कराजवळ टेकड्या आहेत, त्यांजवर उभे राहून लष्करावर बाण टाकिले. लष्करांत पडले नाहींत. याप्रमाणें प्रथम दिवशीं जालें. अद्यापि मोर्चे कोठें लावावे याचा निश्चय जाला नाहीं. इंग्रेज त्याच उद्योगांत आहेत. लष्करांत महर्गता मोठी. आठ चार दिवस गवत थोडें बहुत मिळेल. पुढें संकट आहे. दीड शेराची धारण आहे. विदित जालें पाहिजे. राजश्री परशरामपंतभाऊ बिदनुराकडे गेले आहेत. प्रस्तुत त्यांजकडील कांहीं पत्र आलें नाहीं. पुढें घडेल तें लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २.

### श्री.

"सेवेसीं विज्ञापना. पट्टणापासून तीन कोसांवर मुकाम जाला. इंग्रजांचें बोलणें जालें कीं, येथें काम पायदळाचें, तें आह्मी करितों. फौजेचें काम, तिही लष्करची रखवाली बेदड रक्षिणे, फौज घोड्यांशीं लढणें, हें तुमचें. आह्मीं ह्मटलें कीं, मोर्चे आह्मांस लावितां येतात. त्याजवर ह्मणाले कीं, एकेक काम आटपावें. तें दिवशीं मुकामच जाला. दुसरे रोजीं, चंद्र १३ जमादिलाखरीं, दीड प्रहर रात्रीस, आह्मांस चिठी पाठविली कीं, पट्टणास महसरा आज करावा, असें आमचे सर्वांचे विचार जालें. त्यास आह्मीं आज रात्रीस जातों. वरकड कारखाना, थोर तोफा येथें ठेवितों. याचा इतल्ला केला. दोलास याप्रमाणें चिठी पाठविली. तेव्हां दोन्ही फौजा मुकाम इंग्रजांनी सडे पुढें जावें, असें ठरलें होतें. त्याजवर रात्रीस इंग्रज, पलटणें पंधरा पर्यंत समागमें घेऊन निघाले. तोफा घेतल्या नाहीं. नीट पटणास जाऊन पट्टणचे उत्तरेस टिपूचा मुकाम होता, त्या सुमारें जाऊन, गोटावर एक सिलक केली. तेव्हां तेही सावध जाले. टिपूची गाडद भारी. तोफा, बाण, सरंजाम पुष्कळ, यांची मार चालली. इंग्रजांनीं तोफा समागमें नेल्या नव्हत्या. बंदुखांची सिलक. याप्रमाणें चौदा घटका रात्रीस अवसीचे, लढाई सुरु जाली. ती सारी रात्र एक सारखी. दुसरें दिवशीं प्रहर दिवसपर्यंत मचली. टिपूचा सरंजाम भारी. इंग्रजांची जुवामर्दी भारी. त्याप्रमाणें लढाई कधीं पाहिली नाहीं. इंग्रेज बंदुखांच्या सिलका मारीत करीगट्याचें टेकडी पर्यंत गेले. टेकडी घेतली. तेथून पुढें शहर गंजम, लालबाग, कावेरीच्या चिमट्यांत आहे, ती जागा कायम केली. टिपूची लढाई तेथें भारी जाली. एक दोन वेळ इंग्रज मागें सरले. यांनीं निकड करून जागा कायम केली. माणूस परस्परें फार जायां जालें. इंग्रजांकडील पांच सातसें गोरा व हजारपर्यंत दुसरे पलटणांतील माणूस जाया

जालें. टिपूकडील दोन हजार माणूस पडलें. या लढाईतील शर्त टिपूकडे गोळी, तोफा, बाण इंग्रजांकडे. इंग्रजांकडे एक गोळी मात्र. याप्रमाणें मोठें युद्ध जालें. प्रातःकाल जाल्यावर इंग्रज तर फौज पाठविण्याविसीं लिहीत नाहीं. तीन कोसांचें अंतर. लढाई भारी होते. याजकरितां पांच हजार फौज आह्मीं इंग्रजांकडे पाठविली. लढतां लढतां दोघेही थकले. दोन प्रहर जाल्यानंतर इंग्रजांनीं आपला मुकाम करीघट्याजवळ ठराविला. तों तेथें टिपूकडील बेदड्यांचा उपद्रव भारी जाला. इतक्यांत आमची फौज जाऊन पोहोंचली, तेणेंकरून संतोष मानिला. फौज पाहतांच टिपूकडील राऊत निघोन गेले. इंग्रजांचा मुकाम तेथें निमे पलटणाचा जाला. निमे सरंजाम, पहिला मुकाम आह्मांजवळ होता, तेथें आला. उदयीक आह्मी व नवाब कूच करून, इंग्रज करीघट्याजवळ राहिले आहेत, तेथें मुकामास जातों. रवाना चंद्र १३ जमादिलाखर. हे विज्ञापना."

५वस्ती चद्र ८ रजब इमन्ने
 ।मैन हस्ते टाकु अस्तमान.

## लेखांक ३.

श्री.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत चंद्र १५ जमादिलाखर वर्तमान यथास्थित असे. विशेषः— आह्मीं, नवाब, इंग्रेज चंद्र ११ जमादिलाखरीं कूच करून पट्टणापासून तीन कोसांवर मुकाम केला. दुसरे दिवशीं तेथें मुकाम जाला. इंग्रजाचें बोलणें पडलें कीं, येथें पाव प्याद्यांचें काम, त्यास आह्मीं महसरा करितों. तुह्मी फौजेचे सरदार. तिही फौजेचें रक्षण व बेदड फौज आली तर त्यांसीं झुंजणें, ही गोष्ट करावी. आह्मीं बोलिलों कीं, आह्मांस मोर्चे लावितां येत नाहीं कीं काय? त्याजवर बोलिले, मोर्चाचें आह्मीं करितों. दुसरें तुह्मी करा. त्याजवर तिसरे दिवशीं आवशीस चिठी पाठविली कीं, आह्मीं पंधरा पलटणें सडीं घेऊन पुढें जातों. तोफा वगैरे सरंजाम येथें ठेविला आणि सडे पुढें गेले. ते नीट टिपू किल्याचे उत्तरेचे आंगें उतरला होता, त्या गोटाजवळ गेले. तेथें इंग्रजांनीं सिलक केली. तेही सावध जाले. त्याचा जमाव पलटणाचा भारीच होता. तिकडून तोफा बाण वगैरे ह्यांची सिलक या प्रमाणें होऊं लागली. आवसीचे बारा घटिका रात्रीपासून लढाई सुरू जाली. ते दुसरे दिवशीं प्रहर दिवसपर्यंत एक सारखी लढाई चालली होती. टिपूचा सरंजाम भारी व इंग्रज जवामर्द. यांनीं, तोफा जवळ नसतां, एक बंदुखीच्या मारानें, टिपू गोटांतून उधळला. त्याजकडून चतुरस्र मार होत होता. पाहाटेस इंग्रजांनीं करीघाटची टेकडी घेऊन, किल्याचे पूर्वेस लालबाग आहे ती घेतली, व शहर गंजमांत शिरले. टिपूनें लढाई फार चांगली दिल्ही. इंग्रजांचे शिपायगिरीची शर्त जाली. अशी लढाई

कधीं पाहिली नाहीं. मोठी शर्त केली. इंग्रजांकडील गोरे पांच सातसें व हजार पर्यंत दुसरे माणूस पडले. टिपूकडील दोन तीन हजार पडले. इंग्रेजांनीं घेतली जागा कायम करून राहिले. टिपू उत्तरेकडून कूच करून, फौज कावेरीचे पलीकडे घालून पश्चिमेकडे राहिला. खासा किल्ल्यांत येऊन राहातो. बाहेर असतो. अद्यापि किल्ल्या बाहेरील जागा इंग्रजांचे कबज्यांत आली नाहीं. पहिले दिवशीं जागा घेतली, त्याचीच काईमी होते. लढाई जाली ते दिवशीं रात्रीचे आह्मीं मुक्कामींच होतों. प्रातःकाल जाल्यावर आह्मी फौज तयार करून, लाड साहेबांकडे पांच हजार पाठविली. नवाबाकडील फौज गेली. त्यांस वर्तमान कळल्यावर खुसी मानली. सांगोन पाठविलें कीं, "आह्मीं मुकाम करितों. बेदड उपद्रव करितात. तुह्मी फौज सुद्धां उभें राहावें. मुकाम जाला ह्मणजे गोटास जाणें. सकाळीं कूच करून यावें." त्याजवरून फौज उभी राहिली. इंग्रजांचा सडे स्वारीचा मुकाम जाला. मग फौज गोटास आली. दुसरे दिवशीं आह्मीं कूच केलें. इंग्रज पटणापासून कोसावर राहिले आहेत. आह्मी व नवाब त्यांस लगतेंच राहिलों आहोंत. पहिले दिवशीं लढाई जाली. दुसरे दिवशीं उभयतांनीं विसावा घेतला. आतांही इंग्रज जागा काईम करीत पुढें जातात. टिपूकडील मारगिरी तितक्या पुरती होते. लढाई जाली ते दिवशीं, टिपूकडील माणूस पांच सात हजार फरारी जाले. जखमी आमचे लष्करांत येतात. लढाईचा दम आहे. याप्रमाणें इकडेही आहे. दाणा दोन शेर कमपेश मिळतो. वैरणही मिळते. परंतु आठां दिवसानंतर मिळणार नाहीं. कसें होईल पाहावें. टिपूचा सरंजाम मजबुदी भारी आहे. लवकर स्थल येईल असें दिसत नाहीं. इकडील उद्योग चाललाच आहे. काम आहे, चार दिवस अधीक आगळे लागल्यास चिंता नाहीं. वैरण नाहीं! दाणा महाग! आह्मां जवळ पैका नाहीं!! सर्व गोष्टी श्रीमंतांचे प्रतापेंकरून पार पडतील. राजश्री भाऊ बिदनुराकडे गेले. इकडे येते तर फौजेचें काम याहून चांगलें दिसतें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र ९ रबज रमजे तिमैन हस्ते भाऊकडील डाके-बराबर आलेले.

## लेखांक ४.

श्री.

"सेवेसीं विज्ञापना. तागाईत चंद्र १७ जमादिलाखर वर्तमान यथास्थित असे विशेषः—पटणापासून तीन कोसांवर मुक्काम होता. तेथून चंद्र १३ जमादिलाखरीं इंग्रजांनीं पंधरा पलटणें सडी घेऊन आवसीस निघाले. पट्टणचे उत्तरेस टिपूचा मुक्काम होता, तेथें जाऊन सिलक केली. टिपू सावध होऊन तिकडील मारगिरी

तोफा बाण बदुकांची जाली. इंग्रजांकडील फक्त सिलक होत होती. टिपूचा गोट उधळला. ते निघोन कावेरीपलीकडे, दक्षण तीरास फौज गेली. इंग्रजांनीं करीघाटची टेकडी घेऊन, लालबाग व शहर गंजम यांत गेले. ती जागा कायम केली. चौदा घटिका रात्र आवसीची तेव्हांपासून लढाई सुरु जाली, ती दुसरे दिवशीं प्रहर दिवसपर्यंत धूम जाली. इंग्रजांकडील पांचशें गोरा व पलटणी माणसें हजार पर्यंत जायां जालीं. टिपूकडील तीन हजार माणूस पडलें. इंग्रज जाग्याची काइमी करितात. टिपूचा किल्याचा बंदोबस्त चांगला आहे. लढाईचे दिवशीं लढाईची शर्त इंग्रेजांची जाली. जवामर्दी अधीक. दुसरे दिवशीं कूच करून पट्टणांपासून कोसांवर इंग्रज उतरले. आह्मी व नवाबाची फौज लगती आहे. राजश्री परशुरामपंत भाऊ बिदनुराकडे आहेत. यासमयीं फौजसुद्धां इकडे येते, तर फार चांगलें होतें. परंतु येणें न जालें. आह्मीं लिहिण्यास कसर केली नाहीं. परंतु मर्जी! इलाज नाहीं!! अद्यापि आमचीं पत्रें जातच आहेत. दुसरा मजकूर, टिपूचें पत्र इंग्रजांस व आह्मांस आलें कीं, मातबर पाठविण्याविसीं पत्रें पाठवावीं ह्मणजे पाठवितों. त्याजवरून इंग्रजांचे मतें मातबर आणावा, त्यासीं बोलावें. अकलेस आलें तर बरें, नाहींतर निरोप द्यावा. याप्रमाणें ठरोन पत्रें पाठविलीं आहेत. वकील येईल. परंतु ठरेलसें दिसत नाहीं. दोहीकडील हिंमत भारीच आहे. जालें वर्तमान लिहिलें आहे. पुढें घडेल तें लिहून पाठवूं. स्वामीकडून तीन महिने अधिक जाले, पत्र येत नाहीं. यावरून कांहीं चैन पडत नाहीं. आह्मी इकडून वरचेवर पत्रें पाठवितों. पावतात कीं नाहीं, कळत नाहीं. कसेंही करून तिकडील वर्तमान आह्मांस कळे असें केलें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ५.

पैवस्ती चंद्र १६ रजब इसनै तिसैन श्री.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत २० जमादिलाखर मुकाम नजीक श्रीरंगपट्टण एक कोस वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १३ जमादिलाखरीं पटणापासून तीन कोसांवर मुकाम होता. तेथून रात्रीस पंधरा पलटणें सडीं घेऊन इंग्रज निघाले. ते टिपूचा गोट पट्टणचे उत्तरभागीं होता तेथें जाऊन सिलक केली. तो सावध जाला. गोट उधळला. आवसीचे चौदा घटिका रात्रीपासून लढाई सुरु जाली, ती दुसरे दिवसीं सकाळचे प्रहर दिवसास राहिली. परस्परें माणूस फार जायां जालें. तेच रात्रीस इंग्रजांनीं करीघाटची टेकडी घेऊन, लालबाग व शहरगंजम घेऊन, जागा कायम केली. पुढें रान सोडवीतच आहेत. टिपू पहिले दिवशीं

उत्तरेकडून कूच करून कावेरी दक्षण तिरास गेला. किल्ल्याबाहेर चौथाई अंमल टिपूचा, तीन वाटे इंग्रजांचा, याप्रमाणें आहे. इंग्रजांनीं किल्ल्यास महसरा करावयाचा जागा अद्यापि कायम केला नाहीं. मोर्चाचा सरंजाम भारी केला आहे. नित्य लढाई किल्ल्याजवळील होते. त्यावरून तोफा टिपू मारितो. बाहेरील बतेऱ्या इंग्रजांनीं घेतल्या आहेत. त्याजवरून हे मारगिरी करतात. पहिले दिवशीं लढाई भारी जाली. समागमें इंग्रजांचे, तोफा नसतां फक्त सिलका मात्र करीत गेले. जवामर्दीची शर्त जाली. या मजकुराचीं पत्रें तपशीलवार दोन चार रवानग्यांनीं स्वामीकडे पाठविलीं आहेत. दोनतीन पत्रें राजश्री परशराम भाऊकडे पाठविलीं, त्याजबरोबर स्वामीचे नावें पाठविलीं आहेत. तीं ते आपले डांकेवर रवाना रकतील. भाऊ बिदनुराकडे रामचंद्र कणवी (?) पर्यंत गेले. बिदनूरचा उद्योग करावा तर झाडी व वाटा अडचणीच्या. याजकरितां तिकडे गुंतावयाचे ठेवून पटणाकडे यावयाकरितां चंद्र ५ जमादिलाखरीं कूच केलें, ह्मणून आह्मांस पत्र आलें. तें चंद्र १७ मिनहूम पावलें. त्यांत लिहिलें जे दरमजल येतों. त्यास आमचीं पत्रें नित्य जातच आहेत. हें पत्र पावल्यावर लवकर येऊन पोहोंचावें ह्मणून पत्रें पाठविलीं आहेत. किती जवळ आले हें पत्र आलें नाहीं. परंतु निघाले त्यापक्षीं लौकर येतीलसें दिसतें. भाऊ आल्यावर फौजेचा जथ चांगला पडेल. श्रीमंतांचे फौजेचें कामही चांगलें दृष्टीस पडेल. टिपूनें आपल्याकडील वकील पाठविण्याविसीं लिहिलें होतें. त्याचें उत्तर गेलें कीं पाठविणें. त्याचें उत्तर आलें कीं, पाठवितों. वकील येईल. त्याजवरतीही सरकारचे मातबर जाऊन त्यासीं बोलतील. त्याचा भाव कळेल. त्याजवर यांची उत्तरें होतील. निश्चयांत कैसें येतें पाहावें. प्रायशा सलूख होईलसें दिसत नाहीं. घडेल तें लिहूं. दोन शेराची धारण आहे. वैरणीचें संकट आहे. श्रीमंतांचे प्रतापें करून पार लागेल तो खरा. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

पैवस्ती चंद्र २० रजब इसनै तिसैन हस्ते डाक.

## लेखांक ६.

श्री.

''सेवेसीं विज्ञापना तागाईत चंद्र २९ जमादिलाखर वर्तमान यथास्थित असो. विशेषः— इकडील वर्तमान इंग्रजांची व टिपूची लढाई पटणास प्रथम दिवशीं जाली, त्याचा मजकूर पूर्वीं सेवेसीं लिहिलाच आहे. त्याजवर टिपूनें सलुखाचा पैगाम केला. वकील पाठविले. त्यांसीं बोलणें भवती न भवती फार जाली. शेवटीं गोष्ट ठरली कीं, तीन सरकार मिळोन ही मसलत केली आहे. त्यास सलूख करितां, त्यापक्षीं आह्मी सांगतों तें ऐका. निमे मुलूख व तीन करोड रुपये द्यावे. हा फैसल्ला होय तों दोघे पुत्र ओलीस ठेवावे. याप्रमाणें बोलणें जालें.

वकील टिपूकडे जाऊन याद दाखविली. त्यांणीं कबूल केली. त्याप्रमाणें मान्य ह्मणोन याद करून मोहोर करून पाठविली. दोघे पुत्र इंग्रजांचे गोटाजवळ येऊन उतरले. दोन चारसें माणूस समागमें आहे. मुलुकाचे वांटणीचे जाबसाल पडतील. त्यास, आह्मांजवळ यादी नाहींत. राजश्री परशरामपंतभाऊ बारा कोसांवर आहेत. त्यांस माहीतगारी आहे. जसें घडेल तसें लिहून पाठवीन. करोडीचा तपसील दीड करोड तूर्त द्यावे. त्यांत कांहीं जिन्नस घ्यावा ह्मणत होते. ती गोष्ट कबूल केली नाहीं. पुत्र लष्करांत पाठविले, तेव्हां दीड करोड तूर्त येईल. राहिले दीड. त्यास, चार चार महिने प्रमाणें तीन हप्ते ह्मणजे वर्षांत झाडा करावा. याप्रमाणें ठरलें. जालें वर्तमान स्वामींस कळावें ह्मणोन लिहिलें असे. पुढें घडेल तें लिहून पाठवूं. सर्व गोष्टी श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून जाल्या. विदित जालें पाहिजे. प्रथम दिवशीं इंग्रजांची लढाई जाली त्याची जरब भारी बसली. कळलें पाहिजे. टिपूस पुर्तें समजलें कीं, तिन्ही सरकार एक, त्यापक्षीं परिणाम नाहीं. असें समजोन सलुखाची गोष्ट ठरली. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ७.

### श्री.

"सेवेसीं विज्ञापना:—इंग्रजांचें बोलणें पहिल्यापासून होतें कीं, टिपूची मगरूरी गेल्याखेरीज तह करूं नये. तेंच चाललें. पट्टणावर प्रथम दिवसीं लढाई जाली. ते दिवसीं उभयतांची लढाई चांगली जाली. परस्परें माणूस फार पडले. त्यांजवर टिपूनें कोईमतुरास सांपडले इंग्रज दोन पाठवून दिले. सलुकाचा पैगाम केला. त्यांजपासून मनाजोगी गोष्ट जाली तर सलूक करावा, ह्मणून बोलले. पुढें जाला तो मजकूर आलाहिदा लिहिला आहे. कोणी कोणी 'ह्मणतात कीं, इंग्रजांनीं अंतस्त कांही घेतलें. परंतु पाहातां खरें वाटत नाही. दुसरा मजकूर, टिपूचे निरोप आह्मांकडे येत असतात. आह्मीं सांगतों कीं, त्रिवर्ग एक. सख्य करणें असेल तर करावें. आह्मीं कोसीस करणार नाहीं. सेवटची गोष्ट ठरली. ही मोठ्या प्रेत्नेंकरून ठराविली. असें सांगोन पाठविलें. त्यांत आंतून इंग्रजांचे सोईरिकेचा दाखला कोठें पुरला नाहीं. वास्तविक इंग्रज निखालसतेनेंच करितात. परंतु लोकवार्ता ऐकिली, ती लिहिली आहे. इंग्रज लढाईत दमले. टिपू समजला कीं, तिनी सरकारें एक, तेव्हां परिणाम नाहीं. याजकरितां सलूक जाला. रवाना छ २ रजब हे विज्ञापना."

---

# लेखांक ८.

श्री.

"सेवेसीं विज्ञापना:-टिपूकडील वकील मुसलमान दोघे पालंखीनसीन आले. त्यास लष्करापासून अर्धकोसावर उतरले. चौकी इंग्रजांकडील राहिली. प्रथम वकील येण्यापूर्वी लाडसाहेबाचें किनवीचें बोलणें जालें कीं, वकिलासीं बोलावें, कीं, तुह्मीं आलां, तुमचे धण्यानें काय सांगितलें आहे ? त्यांणीं सांगितलें तर उत्तम; नाहीं [तर] तुमची काय मर्जी आहे, ती सांगावी. असें ह्मटल्यास सांगावें कीं, तीन क्रोडीचा मुलूख व आठ क्रोड रुपये द्यावे. याप्रमाणें बोलणें जालें. त्यानंतर आह्मांस व मैनुदौला यांस सांगावें. त्यांचें मत कसें तें मनास आणावें, ह्मणून किनवी व मिरकासम आमचे येथें आले. दौलाही आले. वकिलासीं काय बोलावें ह्मणून किनवीनें प्रश्न केला. त्यांजवर दौला ह्मणाले, तुह्मी आह्मी एकीकडे बसून बोलूं. एकीकडे बसलों, बोलणें जालें. दौला बोलिले कीं, एक करोड रुपयांची दौलत टिपूकडे ठेवावी. पंधरा करोड रुपये मागावे. आह्मीं बोलिलो कीं, चांगलें आहे. परंतु असें बोलावें कीं ज्यांत काम होय. तेव्हां बोलले कीं, किनवीजवळ याप्रमाणें बोलावें, ह्मणजे त्याचा खुलासा कळेल. त्याजवर किनवी, मिरकासम, दौले, आह्मी, गोविंदराव, बच्याजीपंत व राजश्री आपा याप्रमाणें बसोन किनवीस सांगितलें. तो बोलिला कीं, बोलणें भारी. लाड साहेबांनीं पराकाष्ठा तीन क्रोडीचा मुलूक, सा करोड रुपये बोलावे ह्मणून सांगितलें आहे. त्याजवर दौलाचे बोलणें चढाचें फार जालें. किनवी ह्मणाला कीं, हीं बोलणीं चढाचीं आहेत. असें तिरस्कारानें बोलिला. आह्मांस पुसूं लागला. आह्मीं बोलिलों कीं, दोन्ही बोलणीं ऐकिलीं आहेत. याजवर लाडसाहेब मुनासिब जाणतील, तसें बोलावें. त्याजवर बोलिला कीं, तीन क्रोडीचा मुलूक व आठ करोड रुपये बोलतों. उत्तम ह्मणोन सांगितलें. तें वर्तमान लाडसाहेबांस किनवीनें सांगितलें. दौलाचे भाषणाचा प्रकार सांगितला. त्याचें उत्तर केलें कीं, त्यांस बोलावयास काय होतें ? शब्द लावून बोलिले. त्यांजवर वकिलासीं बोलावयास इंग्रजांकडील किनवी, नवाबाकडील मिरकासम, व सरकारचे बचाजीपंत याप्रमाणें निश्चय जाला. दुसरे दिवसीं वकील आले. तिघे जाऊन त्यांस भेटले. आगतस्वागत होऊन, किनवीनें डेरा दिला होता, तेथें बसले. वकीलास पुसलें कीं, तुह्मीं कां आला ? त्यांणीं सांगितलें, तह करावयास आलों. काय सांगितलें आहे तें बोलिलें. तिन्ही सरकारचा तह करावा. त्यांची मर्जी कसी ती ऐकावी. त्याजवर किनवी बोलला कीं, सलूक करणें तर तीन क्रोडीचा मुलूक व आठ करोड रुपये द्यावे. त्याजवर बोलिले कीं, इतका

मुलूख पैका कोणाजवळ आहे? तथापि तुह्मी ह्मणतां, मी जाऊन त्यांस सांगतों. तें सांगतील तें येऊन विदित करूं. त्याजवर वकील गेले. एकदिवस राहून आले. तेव्हां बोलिलें कीं, तुह्मी तीन क्रोडीचा मुलूक घेणार, तेव्हां आह्मांकडे किती आहे? पैका कोठें आहे? त्याजवर किनवीजवळ दौलानीं, कांहीं कम सात लक्षांचे मुलूकाची याद दिली होती, ती बेरीज सांगितली. त्याजवर वकील बोलिले कीं, इतका मुलूख नाहीं. त्याजवर किनवी बोलिला की, आह्मी, सिद्धांताचें बोलणें, लाडसाहेब व उभयतां शरीक यांचें जालें आहे, तें बोलतों. तें सर्व सांगितलें की, जी दौलत तुह्मांकडे होती, त्यापैकीं निमे व साहा क्रोड रुपये द्यावे. याचा फैसला होय तों, दोन पुत्र वोलीस ठेवावे. हें बोलणें वकिलांनीं ऐकोन टिपूसीं बोलतों ह्मणोन सांगितलें. फिरोन गेले. दुसरे सांगितलें की, फडशा सांगितल्याप्रमाणें कर्तव्य असेल तर करा, नाहींतर मोर्चे लागल्यावर आह्मी ऐकणार नाहीं. त्याजवरून उभयतां वकील टिपूकडे गेले आहेत. काय येऊन सांगतात पाहावें. दुसरे दिवसीं टिपूकडे जाऊन बोलोन आले. फिरोन त्रिवर्ग बोलणें ऐकावयास गेले. त्यांणीं सांगितलें कीं, आह्मांमधीं इतका मुलूक द्यावयाची ताकद नाहीं. चौथाई मुलूक व करोड रुपये देऊं. सल्ला करावा. ती गोष्ट ऐकावयाची नाहीं, असें साफ सांगितलें. त्याजवर बोलतां बोलतां शेवट निदानची गोष्ट सांगितली की, निमे मुलूक व तीन करोड रुपये मान्य करितों. या उपरी वोढूं नये. त्याजवर किनवीनें जाबसाल केला कीं, सा करोडींत उणें घ्यावयाचें नाहीं. त्याजवर लाचार जाले. एकवेळ वर्तमान त्रिवर्गांस सांगावें. नाहींच ह्मटलें तर जाऊं. त्याजवर त्रिवर्ग आले. जिकडील तिकडे वर्तमान सांगितलें. दुसरें दिवसी किनवीस आह्मांकडे पाठविलें, व दौलांनीं मिरकासम यांस पाठविलें की, कसें करावें? आह्मीं सांगितलें कीं, सर्वांचे मतें ठरेल ती गोष्ट खरी. त्याजवर किनवी बोलिला की, आपले खातरेस कसें येतें? आह्मी सांगितलें, लाडसाहेबांचे मर्जीस कसें येतें? त्यांणीं सांगितलें. पैक्याची गोष्ट आहे. आतां वोढूं नये. निमे मुलूक व तीन करोड रुपये घ्यावे. सल्ला करावा. आह्मी उत्तम ह्मणोन सांगितलें. त्यांजवर त्रिवर्ग वकिलांसीं बोलावयास गेले. त्यांणीं मान्य केलेंच होतें. त्याजवर दरबारखर्च तीस लक्ष. रुपये सांगितले. त्यांणीं कबूल केले. त्याजवर टिपूची चिठी मोहरेनसीं याप्रमाणें कबूल ह्मणोन लिहून आणावी, याप्रमाणें सांगितलें. त्यांणीं मान्य करून टिपूकडे गेले. चिठी घेऊन येतील असें दिसतें. आतां 'नाहीं' ह्मणोन परिणाम नाहीं. मोर्चातून गोळागोळी झीट पीट चाललीच आहे. इंग्रजांचे मनांत सल्ला करावा असा नवता. परंतु लढाई जाली ते दिवसीं खराबी फार जाली. त्यावरून सलुकाकडे मन लागलें. निमे मुलूक, तीन करोड रुपये, यांहून अधिक मागूं नये, असा निश्चय इंग्रजांचा कळला. मग

आह्मीं कशास ओढावें? याप्रमाणें मजकूर छ २५ जमादिलाखरपर्यंत जाला. रवाना छ २ रजब पंचविसावीः–पुढें दोन ,चार दिवस बोलण्याची घालमेल होऊन मुलूक, तीन करोड रुपये, तीस लक्ष दरबारखर्च, याप्रमाणें ठरलें. आज टिपूचे दोघे लेक लष्करांत येणार. मोर्च्यांतील गोळी परस्परें बंद जाली. राजश्री भाऊ आज दोनकोसांवर येऊन उतरले. मुलकाचे वांटणीचे प्रकार कसकसे ठरतात, तें मागाहून लिहून पाठऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. टिपूकडील गुलाम अल्लीखान, अल्लीरजाखान, प्रथम दिवसापासून बोलण्यांत आहेत. हे विज्ञापना"

## लेखांक ९.

श्री.

"सेवेसीं विज्ञापनाः—टिपूचे लेंक दोघे वोलीस यावयाचे, त्यास येण्याचा सिद्धांत जाला. तेव्हां वकिलांनें बोलणें पडलें कीं, सन्मानेंकरून घेऊन यावें. मिरकासम, किनवी व बचाजीपंत यांणीं वर्तमान लाडास सांगितलें. त्यांणीं मान्य-केलें. त्याजवर लाड बोलले कीं, त्रिवर्गांनीं इस्तकबल जावें. भेटून त्यांस घेऊन आमचे डेऱ्यास यावें. भेटून घटकाभर बसतील. मग त्यांचे खेमे उभे राहिले आहेत, तेथें जातील. दुसरे दिवसीं त्यांचे डेऱ्यास जाऊन येऊं. एकेच दिवसीं तिही सरदारांच्या भेटी होणार नाहींत. तो मजकूर बच्याजीपंतांनीं आह्मांस सांगितला. मिरकासम दौलाकडे गेले. त्यांणीं आह्मांकडे सांगून पाठविलें. त्याजवर त्यांचे आमचे विचारें ठरलें कीं, आमच्या डेऱ्यास प्रथम दिवसीं येत नाहीं. त्यापक्षीं आपण इस्तकबल पाठऊं नये. ज्या दिवसीं ज्यांजकडे येतील त्यांणीं इस्तकबल पाठवावें. घेऊन यावें. याप्रमाणें लाडकडे सांगून पाठविलें. त्यांणीं सांगितलें, उत्तम आहे. टिपूचे वकिलांचें बोलणें त्रिवर्गाजवळ जालें कीं, दोन पुत्र पाठवितों; व लाडसाहेबांचे हातीं द्यावे. त्यांचे पुत्र असे समजोन ठेवावें. याप्रमाणें जालें. छ ३ रजबीं दोघे पुत्र आले. लाडाची भेट होऊन, घटकाभर बसून, आपल्या डेऱ्यास गेले. आंतून इंग्रजाचें टिपूचें मिळालें ह्मणून तह जाला, असें सर्वत्र ह्मणतात. त्याचा शोध कशानें लागावा? जाला मजकूर लिहिला असे. पुढें घडेल तें लिहून पाठवूं. रवाना छ ४ रजब हे विज्ञापना"

## लेखांक १०.

पैवस्ती छ २४ रजब इसनै तिसैन. श्री.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत छ ४ रजब मुक्काम श्रीरंगपट्टण स्वामींचे कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान, श्रीरंगपट्ट-

णास आलीयावर एक लढाई टिपूची जाली. त्यांत ताकत राहिली नाहीं. याजकरितां सलुखाचा संदर्भ लाविला. शेवटीं तीन सरकार मिळोन, निमे मुलूक व तीन करोड रुपये द्यावे, दोन पुत्र फडशा होई तोंपर्यंत वोलीस द्यावे, याप्रमाणें ठरलें. दोन पुत्र काल छ ३ रोजीं लष्करांत येऊन उतरले. याउपरी करारप्रमाणें फडशा जाला ह्मणजे माघारें कूच होईल. श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकडून मसलत शेवटास गेली. येविसींचीं वर्तमानें डाकेवर पत्रें पाठविलीं आहेत. तीं पावोन वर्तमान विदित जालें असेल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ११.

### श्री.

''सेवेसीं विज्ञापना:—टिपूचे लेंक लार्ड साहेबांस भेटले. दुसरें दिवसीं लाड त्यांचे घरास गेले. दोन घड्याळें, एक बंदूख, व दोन पिस्तुलें मुलांस दिल्हीं. दोन घटका बसले. आगतस्वागत, घोड्यावर कसे बसतां, लिहितां पढतां काय, इकडील तिकडील गोष्टी जाल्या. डेऱ्याम् ल्कड गेले. यांची ज्याफत करावयाची गोष्ट काढली. लाडानीं सांगितलें की, आमची रीत नाहीं. त्यांजवर गुलामअल्लीखान बोलिले की, मुलें तुमचीं आहेत. ते ह्मणतील तें ऐकावें लागेल. तेव्हां पोशाक व सिरपेंच जेगा व एक तरवार खाशांस दिली. त्यांणी पोशाक घेतला नाहीं. दागिने तरवार घेतली. याप्रमाणें किनवीस दिल्हें. व चेरीस पोशाक व जेगा सिरपेंच दिला. आपल्याकडील बच्याजीपंत व नवाबाकडील मीरअलम समागमें होते, यांपुढें पोशाक ठेविले. यांणीं सांगितलें की, खावंदाची भेट जालीयावर [घेऊं]. त्यांजवर लाडांनीं सांगितलें कीं, ठीक आहे. याप्रमाणें होऊन इंग्रज आपले डेऱ्यास आले. अनंतर बच्याजीपंतांस सांगितलें कीं, उदईक नवाबाची व हरीपंताची भेट. यास सांगितलें होतें कीं, एके दिवसीं दोहींकडील भेट ठीक नाहीं. 'त्याजवरून आज छ ५ रजबीं नवाबाचे येथें जाणार. इस्तकबल दौलाचे पुत्र इस्तकबल जाऊन, दोघा मुलांस घेऊन आले. दौला देवडीजवळ जाऊन डेऱ्यांत घेऊन आले. तिकडून साहेबजादे येऊन गादीवर उभे राहिले. मुलांनीं जवळ येऊन कुरनीस केली. एकसष्ट एकसष्ट मोहरा नजर केल्या. जवळ आल्यावर बसावयास सांगितलें. घटकाभर आगतस्वागत जालें. तेथें पानदान घेऊन दौलाचे डेऱ्यास गेले. तेथें घटकाभर बसून आपले डेऱ्यास गेले. याप्रमाणें नवाबाचे येथील समारंभ जाला. छ ६ रजबीं आमचे डेऱ्यास येणार. याजकरितां राजश्री आपा यांस इस्तकबल पाठविले. डेऱ्यास घेऊन आले. आह्मी देवडीचे बाहेर जाऊन त्यांस भेटून डेऱ्यांत घेऊन

आलों. दोघा पुत्रांस दोन पोशाक व जेगा सिरपेंच याप्रमाणें व गुलाम अल्ली-खान व रजाअल्लीखान यांस वस्त्रें व एकेक सिरपेंच दिला. दोन प्रहर दिवस डेन्यास यावयास लागले. दोनघटका बसलों. इकडील तिकडील गोष्टी [ जाल्या ]. मग ह्मणाले, आह्मांस भूक लागली. त्याजवर दोनमुलें व रजाअल्लीखान राहुटींत गेले. पेढेबर्फी, मुरंबा, बदाम, पिस्ते यांचा फराळ केला. पाणी प्याले. राजश्री आपांनीं परामर्ष केला. मग फिरोन आह्मी डेन्यांत बसलों. तेथें आले. अत्तर पानदान देऊन निरोप दिला. आपा इस्तकबल गेले. त्यांस त्यांणीं वस्त्रें, सिरपेंच जिगा, एक हत्ती दिला. आह्मी मुलांस दोन घोडीं दिल्हीं. ही प्रथम ज्याफत. कळलें पाहिजे हे विज्ञापना. रवाना छ ६ रजब हे विज्ञापना."

---

## लेखांक १२.

पैवस्ती छ. २५ रजब इसन्ने. **श्री.**

"सेवेसीं विज्ञापनाः—टिपूकडील वकिलासीं मुलुकाचे व पैक्याचे जाबस्वाल जाले पाहिजेत. त्यास, सरकारांतून बचाजीपंत, व नवाबाकडील मीरआलम, व इंग्रजांकडील किनवी आहेत. त्यानंतर महालचे जाबसाल पडतील. याजकरितां नवाबाकडून राय राया मुकरार जाले. आह्मीं आपल्याकडून राजश्री गोविंदराव कृष्ण, व गोविंदराव भगवंत मुकरार केले. यांणीं जाऊन बोलत जावें. जो प्रकार बोलण्यांत येईल, तो सांगावा. आह्मी व राजश्री भाऊ, आपा यांणीं माहितगारीनें करणें तसें करावें, याप्रमाणें केलें. टिपूकडून पूर्णया येणार. पुढें घडेल तें लिहून पाठऊं. रवाना छ ६ रजब. हे विज्ञापना."

---

## लेखांक १३.

**श्री.**

"सेवेसीं विज्ञापनाः—लाडसाहेबांचे व मेडूस यांचें भाषण जालें. काय बोलले असतील तें ते जाणत. त्यानंतर मेडूस डेन्यास गेला. नंतर एकांतीं डेन्यांत बसला. दोन पिस्तुलें गोळ्या घालून भरलीं; आपल्या पोटांत मारून घेतलीं. एक लागू जालें. बाहेर लोक होते, त्यांणीं आवाज ऐकिला. आंत गेले तों असा प्रकार! तेव्हां डाक्टर आणून गोळी काढली. येविसींचें कारण चेरीनें बच्याजी-पंताजवळ सांगितलें कीं, याची प्रकृत खास्ती. पहिल्यानें पट्टणास आलों ते दिसीं तीन तुकड्या केल्या. दोन तुकड्या लालबागांत गेल्या. मेडूस वाट चुकले. ही

खिदत! याजकरितां असें केलें. जखमेनें जेर आहे! वांचणें कठीण! दुसरे कोणी कोणी बोलतात कीं, सल्ला जाला ही गोष्ट मेडूसाचे खातरेस आली नाहीं, याजकरितां असें केलें. सारांश, मर्दमाणूस मेडूसासारखा इंग्रजांचे मंडळांत थोडा! रा। छ. ७ रजब. हे विज्ञापना."

## लेखांक १४.

श्री.

"सेवेसीं विज्ञापना:–इकडील मसलतीचा प्रकार, सलुखाचा प्रकार जाला, तेव्हां आटोपल्यांतच (जमा आहे.) फडशासाठीं काय दिवस लागतील ते लागतील. पुढें कसें कर्तव्य? भाऊ आह्मी मिळोन, फौज, गारद खर्च भारी, याचें कसें करावें? त्रिवर्गाचे विद्यमानें तह जाला, तेव्हां छावणीस फौज ठेवावी नलगे. तालुका सुटला तो भाऊंकडेच आहे. येथील गुंता उरकल्यावर इतका खर्च ठेवणें कशास? देशास येणें, तेव्हां फौज समागमें किती आणावी, किंवा सर्वांस निरोप द्यावा, याची आज्ञा आली पाहिजे. येथील फडशा जाल्यावर इंग्रेज ठरणार नाहीं. चिनापट्टणास जातील. रवाना छ. ७ हे विज्ञापना. इंग्रेज जाऊं लागले तर यांसीं कसें बोलावें, तेही आज्ञा असावी हे विज्ञापना."

## लेखांक १५.

पैवस्ती छ २५ रजब इसनै तिसैन

श्री.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत छ. ७ रजब मुक्काम नजीक श्रीरंगपट्टण वर्तमान यथास्थित असे:—इकडील वर्तमान, सलुखाची गोष्ट तीन सरकार मिळोन निमे मुलूक, व तीन करोड रुपये, व तीस लक्ष दरबार खर्च याप्रमाणें टिपूपासून घ्यावयाचें ठरलें, हा मजकूर दोन पत्रीं सेवेसीं लिहिला आहे. या उपरी तहनामे ठरणें, कलमें लिहिणें, यांचें कसकसें ठरतें, मुलुकाची वांटणी, पैका येणें याचें कसें होतें, तें लिहून पाठऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १६.

पै॥- छ. २ साबान
इसनै तिसैन

श्री.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत छ १२ रजब मुकाम नजीक श्रीरंगपट्टण वर्तमान यथास्थित असे विशेष:–इकडील वर्तमान टिपूचा सलूख जाल्याचा मजकूर दोन चार पत्रीं लिहिला आहे, त्याजवरून विदित जाला असेल. निमे ऐवज तूर्त येणें, त्याचा

भरणा फार करून जाहाला. एक दों रोजांत फडशा होईल. मुलुकाच्या वांटणीच्या यादी त्याजकडून आल्या आहेत. तिही सरकारांत मुलूख देणें त्याच्या बेरजा जाजती लिहिल्या आहेत. आपल्याकडे महाल ठेवणें त्याच्या कमी लिहिल्या आहेत. दोन करोडींची जमा मुलुकाची लिहिली आहे. परंतु माहितगारांचे मतें व कांहीं आह्मांकडील माहितगारी, त्यास तीन करोडीचा मुलूक, मग कांहीं कमी होईल असें दिसतें. त्याची कची देणारे टिपणें आणविलीं आहेत. या घसघसेस कांहीं दिवस लागतील. हा फडशा जाला ह्मणजे येथून कूच होईल. वैरण लांब गेली! तट्टू नाहींत! बैलही थकले! डोईभाऱ्यावर काम चालतें. धारण तीन शेरांची आहे. विदित जालें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना".

---

## लेखांक १७.

### श्री.

"सेवेसीं विज्ञापना:—"टिपूकडील तह ठरावांत आला ह्मणोन राजश्री परशरामपंत भाऊंनीं व गोविंदराव यांनीं लिहिलें, तेव्हां तह जाला असेल. लिहिल्याप्रमाणें तह जाला असल्यास चांगलें. तुह्मी मोकळे जाला. पैक्याची अडचण. महागाई पुरवली. श्रीमंतांचे प्रतापेंकडून गोष्ट घडली. याउपर तुमचें येणें लौकर व्हावें. पुढें मुलुकाची वांटणी होणें ही एक गोष्ट मोठीच आहे. जनराल कांहीं दिवस कोठें राहणार, किंवा कलकत्त्यास जाणार? नवाबाची लाडाची भेट दौला करणार ह्मणोन ऐकतों, याचें कारण दिसत नाहीं. परंतु दौला भेटीस बळकटी मानितात. याप्रकर्णी तुमचें राहाणें जरूर असें जाल्यास, उपाय नाहीं. अवल दरजा, कसें करून तुमचें येणें व्हावें. कांहीं दिवस मसलतीमुळें राहणें जाल्यास राजश्री परशरामपंत भाऊ यांचें तरी येणें लौकर जाल्यास बरें. सुचनार्थ लिहिलें असे. तसा डौल तुह्मी धराल." ह्मणोन आज्ञा केली, ती कळली. त्यास लढाईपासून तह जाला; पैका निमे आला; मुलुकाची वांटणी जाली; हे दिनचर्येचे प्रकार लिहून स्वामीकडे पाठवीत गेलों. परंतु पत्रें पावलीं नाहींत, यास इलाज नाहीं. लिहिण्याचे श्रम केले, ते व्यर्थ गेले. असो. आगें मागें पत्रें पाठवून सविस्तर अर्थ ध्यानांत आले असतील. या मसलतींत लाभ मोठा, व खराबी मोठी. असा समेट व्हावा असें नवतें. परंतु श्रीमंतांचे प्रतापेंकडून गोष्ट घडली. आह्मी मोकळे जालों. देसीं लौकर जाणें घडावें, हाच इरादा. परंतु इंग्रजाचें बोलण्यांत पडलें कीं, तुह्मी आह्मी सर्वांनीं शिवगंगेपर्यंत चलावें; तेथें परस्परें निरोप घेऊन जावें. आह्मीं ह्मटलें कीं, आतां तिकडे फिरोन यावयाचें काम नाहीं. येथेंच दोन चार मुक्काम करून निरोप व्हावा. परंतु आग्रह पाहिला. याकरितां गोष्ट कबूल केली. इतके दिवस त्यांची मर्जी रक्षिली,

# होळकरदरबारांतली हिंगण्यांची वकिली.

## लेखांक १.

**श्रीराम.** ता. २ नोव्हेंबर १७९४.

"चिरंजीव राजश्री राजारामपंत भाऊ यांसीः—

प्रती देवराव महादेव आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागाईत चंद्र २७ रबिलावल मुक्काम इंदूर, लष्कर राजश्री तुकोजी होळकर सुभेदार, जाणून स्वक्षेम लेखन करित गेलें पाहिजे. यानंतर बहुत दिवस जाले, तुम्हांकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर असें नसावें. यानंतर आमची रवानगी इकडे सरकारांतून राजश्री पाटिलबावांचे विचारें जाली. त्यांत होळकरांनीं कलह न करावा, पटाल्यापलीकडे मसलत करावी. किंवा गुजराथची मसलत कच्छ भूजपर्यंत करावी, अगर देशीं हुजूर यावें, आज्ञा होईल त्या अन्वयें वर्तणूक करावी. म्हणून सरकार आज्ञा. व याच भावें बावाकडे गेलों. ते दिवशीं बावाचींहि बोलणीं, मागील पुढील अर्थ मजला माहित केले. तुह्मी ते दिवशीं नव्हतां. राजश्री आबा होते. त्यांत मुख्यत्व मसलत करावी. घराऊ रीतीचा स्नेह असावा. तर दहा वेळ बोलणीं पडलीं. शफथा जाल्या. परंतु निर्वाहांत एकहि गोष्ट आली नाहीं. बहुवशता सरदारांची व कारभारी यांची. तेव्हां पुन्हाहि वारंवार तीच गोष्ट. यास्तव दुरून संमंध असून नाहींसें असावें हेच गोष्ट करावयाची, दुसरें नाहीं. येविषयीं बहुत बोलणें जालें. त्यानंतर मास पक्ष आमचें राहाणें पुण्यास होऊन निरोप घेतला. ते दिवशींहि आज्ञा पूर्ववत् होऊन येथें आलों. प्रथम महेश्वरीं आलों. गंगाजळनिर्मळ बाईची भेट जाल्यास मासपक्ष तेथें राहून, साकल्य आज्ञेप्रमाणे बोलिलों. सरकारचीं पत्रें दिधलीं. बोलणीं बहुतच जालीं. त्यांत दुराग्रह वाढता. "उभयपक्षीं नुकसानी जाली व होत जाते. येणेंकरून सरकारची नुकसानी. रात्रं दिवस खलष हा ठीक नाहीं. मोठालीं कामें बाहेरचीं होऊन उभयपक्षीं व सरकारांत नफे व्हावे, ह्या चाली चालाव्या, त्या काळमहात्म्यानें ऐशा घडतात! व लोक तमाशा पाहतात! शत्रु दिवस मोजितात. तहबाऱ्या मनस्वी होतात. ह्या गोष्टी विवेकास व पूर्व चालींस उचित कीं काय? तुह्मी वडील व विवेकी. तेथें या अपेशास अधिकारी होऊन समेट न व्हावी, ही दुर्नाम कोणाची? याचा विचार पुरतेपणें करावा." तेव्हां उत्तर केलें कीं, "मजला प्रयोजन काय, कीं उभयपक्षीं दोष निर्दोष निवडावे. विवेक उभयतांस सांगावे व उभयतांनीं विवेक करावा. व धन्यांनीं आज्ञा करावी. त्याअन्वयें वर्तावें. आह्मीं वडिलांवडिलीं चाली पाडिल्या. त्यांत उभयपक्षीं सांप्रत चाली पडतात, त्या हिंदुस्थान प्रांतीं पातशाई

आपसांत होऊन, दक्षिणच्या फौजा जाऊन, एकमेकानें आपलीं घरें दाखवून, एकमेकास जख द्यावी. पैका, प्रांत आह्मांस मिळावा, व कांहीं दिवसांत राहिला त्याचा हलकेपणा पाहून आमचे फौजांनीं त्याचा निर्वाह करावा. असें होत होत, आह्मांस मोठेपणें मिळालीं. पराक्रम जाले. पादशाई घरांत येऊन श्रीमंताचे राज्याची व आमचे सरदारियांची वृद्धिच आजपर्यंत जाली. आणि मराठे ज्याचा पक्ष करितील तोच सबळ पडेल, असेंहि कांहीं दिवस होऊन, दक्षिणी फौजांस आब चढला, हेंहि पाहिलें. सरकारांत कोट्यावधीचा प्रांत व द्रव्य व सरकार वांटणीचे कमाविसदार गोविंद बल्लाळ आदिकरून बसून, क्रोडों रुपये रसदा सरकारांत बैलावर गोण्या भरून रुपये जात होते. सांप्रत तोच काळ ऐसाहि जाला, कीं जसें पादशाईत लोकांनीं आमच्या फौजांचें सामान बाळगूनहि हिंदुस्थान हलकें व पराक्रमरहित आपसांत केलें, तसें इंग्रजी सामान बराबर बाळगून, आपल्या फौजा निरवीर्यवजें आहेत. ते इंग्रज ऐसे मनांत येऊन त्यांचें विलायतीस बळ पाहून, त्यांचा आब वाढवून, आपसांतील पारिपत्यास त्यांजला भागीदार करून, किल्ले, कोट त्यांचे स्वाधीन केले. बंगाल्यापासून अयोध्या भागिरथी पारवार दिल्लीपर्यंत भागिरथी परतीरीं होते. ते अंतरवेद उर्वरित राहिली होती. तेहि त्यांच्या कबज्यांत गेली. व तह खर्चाची फाजल सरकारांत व आपल्या आपल्यांत उच्छेद उभयपक्षींच्या फौजा नाकारल्या, ह्मणून इंग्रजी सामान पुस्तपन्ह्यास—ऐसाहि काळ व तोच पराक्रम. वृद्धि होते; व उभयपक्षीं अहंभाव हेच होऊन बाहु स्फुरण होतें. त्याचा पल्ला काय? व बदनक्षी व अविचार काय? वडिलावडलीं चाली ह्या होत्या कीं काय? तेव्हां चाली टाकून अर्थ उभयपक्षीं घडतात, याचे विचार श्रीमंतानीं करावे. वडिलांवडिलीं चालीनें कल्याण, उर्जित व नांवलौकिक मिळाले, किंवा ह्या चाली उर्जित भाग्याच्या व चांगल्या? यद्यपि उर्जितसे दोन दिवस वाटले तरी श्रमदायक उभयतांस, हे विवेक ज्यांनीं सरदाऱ्या कराव्या त्यांस असावे. व खांवदांनीं करून वागवावें. व आह्मांस काय म्हणतां!" तेव्हां बोलिलों कीं, "इतके आदेश आपले ध्यानांत, तेव्हां आपले स्वाधीन नसले तरी आपण तुकोजीबावांस वडील, धनी आहांत. इतःपर सरकार आज्ञेची अवज्ञा नसावी. पुढें पाटिलबावाहि या प्रांतीं येतील. भेटी आपल्या त्यांच्या होतील. त्यांनीं समेट विवेकेंकरूनच केली, व फौजा माघाऱ्या नेल्या. आपणहि तुकोजीबावांस सांगून विवेक करून, सरकार आज्ञेप्रमाणें मोहिमेस जावें." याप्रमाणे बोलणीं विस्तारें होऊन, इंदुरास आलों. यांच्या भेटी जाल्या. त्याचभावें कमकसर हेहि बोलले. बाईचें यांचे विचारें सरकार आज्ञेप्रमाणें मोहिमेस गुजराथ प्रांतीं फौजांचा शह टाकून जावे. सरकारांतून उपराळा हिंदुस्थान अन्वयें करावा, अथवा आह्मांस मारवावें हेंच असल्यास न करावा. तेव्हां थोडा बहुत होईलसें होऊन, मसलत मान्य करून, राजश्री काशीराव होळकर यांसी डेरेदाखल केले. खांसा बाईचे दर्शनास महेश्वरास जाऊन सत्वर फौजांत जाणार, सदरहुअन्वयें

सरकारांत लिहिलें. साकल्य तुम्हांस कळतच असेल. पाटिलबावांनीं मनःपूर्वक निर्मळ व्हावें. पूर्वे चालीप्रमाणें निर्वाहांत यावें, हेहि भाव आहेत. बाईचे हातें जें होईल, तें पक्केंच घडेल. महेश्वरीं जाऊन उभयतां एक जाल्यावर होईल तें लिहूं. चांगला योग असल्यास आम्हीच येऊं. उत्तर पाठवावें. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."

## लेखांक २.

**श्रीराम.** ता. १ दिसेंबर इ. स. १७९३.

"पुरवणी स्वामींचे सेवेसी विनंति ऐसीजे, महीश्वरीं येऊन गंगाजळनिर्मळ अहल्याबाई यांची भेट घेऊन राजश्री तुकोजीबावा सुभेदार यांचें करण्याचे भाव ध्यानास आणितां बोलणें करणें, तो पक्कविचार व शाश्वत बुद्धि व दुरआंदेशा बाईपाशींच. बावापाशीं शेरपीठपर्यंत येथून जाईल तो कालक्षेप ! कायम मिजाज किंवा मसलतीस पक्कता यासी ठिकाण नाहीं ! सर्व काळानुरूप जालें आहे ! पुढेंहि सिद्धीस जाणें तें बाईखेरीज कांहींएक जाणें नाहीं. असें ध्यानास येऊन, त्यांसीच बोलणीं खचित करून, रा॰श्री तुकोजीबावांचा दस्तऐवज आणविला, कीं जें बोलणें तें मातुश्री साहेबाशीं बोलावें. कारभारी राजश्री शिवाजी गोपाळ व पाराशर दादाजी तेथेंच आहेत. निश्चयांत आणावेसें करून बाईशींच आधीं अवसानार्थ, बोलून पक्काई विचाराची खचित. कारभारीयासहित बाईचें ध्यानांत येऊन, सरकार आज्ञा व आपला विचार त्याखेरीज दुसरा अर्थ किंवा लगमसलती खेरीज धरूं नये, ऐसी पक्कता दृढ होऊन, बाईनीं राजश्री बाबाजी निंबाजी विद्यमानें पाराशर दादाजी, यांस इंदुरास पाठवून, तुकोजीबावाशीं बोलणें होऊन, मसलत सरकार आज्ञा होईल उभयतांचे विचारें तें मान्य म्हणून, बाईचीं पत्रें तीन, एक सरकार व दोन उभयतांचें नांवें व त्याचप्रमाणें बाईचीं पत्रें एक सरकार व दोन उभयतांचे नांवें एकूण सहा पत्रें, व चार पुरवण्या दोन मसलत संबंधीं उपराळ्यास फौजा देऊन, पुस्तपुन्हा मसलतीचा करावा. ज्याप्रमाणें तिकडे आहे तदन्वयें इतिहासयुक्त व मसलती सरकारच्या कराव्या. त्या पूर्वीपासून मोठालीं कामें, सरकारचाकरी या उभयतां सरदाराकडील वडिलावडिलीं होत आल्या, सरलारांत पैका देतच आलों; सरकारांत फाजिलें काढून सरकार आपले देणेदार पूर्वीं केलें नाहीं. पुढेंहि कोणें करूं नये. येविषयीं दस्ताऐवज गोऊन घेऊन, पुरवणी पत्रें दोन, एकूण चार पुरवण्या बाईचें नांवें स्वामीस एकूण दहा होळकराकडील; व दोन पत्रें माझे नांवें, एक तुकोजी होळकर यांचें माझें नांवें, व एक बाईचें मजला आलें होतें. तें एकूण दोन पत्रें सदरहू बारा पत्रें व कच्चें वर्तमान वर्तलें त्याच्या पुरवण्या चंद्र २२ रबिलावलीं डांकेंत वि॥ राजश्री केसो भिकाजी रवाना जलद साता दिवसांत पावून, साता दिवसांत उत्तरें यावीं. कीं, त्या अन्वयें येथें घडे व पुन्हां जलद उत्तरें येत जात, त्या पत्रास एक महिना चार दिवस जाले, अद्याप उत्तर न आलें. बाईकडील पृच्छा

व सुभेदाराकडील पृच्छा वारंवार प्रतिउत्तराविषयीं होतच आहे. सेवकाची मार्ग-प्रतीक्षा पत्राकडे ! उत्तरें न येतां सेवकाची मातबरी, विश्वास वाढणें सर्व स्वामीचे कृपेचे उपराळ्यावर आहे. तेथील कामें काजें अनेक, त्याजमुळें किंवा श्रीमंत राजश्री तात्याची प्रकृति कांहींशी ठीक नव्हती ह्मणून कळलें. याजमुळें, किंवा पत्रेच पावलीं नाहींत, मध्यें घायाळ जालीं त्याजमुळें, असे अनेक तर्क चित्तास होऊन चिंताग्रस्तता जाली. उत्तरी कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. त्यानंतर राजश्री तुकोजीबावा यांनी राजश्री नारो कृष्ण शेणवाई निसबत शिंदे यांनी बोलणे लाविलें कीं, तुमचे स्नेहाची मजबुती पाटिलबावांशीं करून देतों. तुम्ही एक पाटिलबावास पत्र लिहून द्यावे. येविषयी तुकोजीबावांस विचार असावा की, नारो कृष्ण पात्र केव्हढ्याचें, याचे स्वाधीन पाटिलबावा तरी किती, व एवढा कलह वाढलेला, दरबारी वाद पडलेला, सरदारांची पत्रे परस्परें येणे जाणे बंद. पुण्यांत राजश्री दादाजी गंगाधर याची भानगड, अनस्त सहा महिने कमकसर चाललीच आहे, त्याचा थांक लागून काय जाले ? सरकार समंधी बोलणे होतच आहे. असे असतां नारो कृष्णाचें बोलणे परिणाम काय लावील, हा आंदेशा न करितां महेश्वरी बाईस न विचारितां, आपले पत्र राजश्री पाटिलबावांचे नांवे मशारानेल्हे यासी लिहून दिधलें की, त्याजकडून तपशिल लिहिली की, समेट करावी. आज्ञा कराल तर तुकोजीबावाकडील मातबर घेऊन येतो. याप्रमाणे येथे खंडो महादेव फडणीस दि॥ पारनेरकर यांजकडील कारकून आहेत, त्यांचे विद्यमानें राजकारण करून, पत्रे रवाना करून, बाईस पत्रे तेथील जाब येऊन भाव पुरता न समजून घेतां पाठविली की नारो कृष्ण वकील निसबत शिंदे यांजसमागमे राजश्री पांडुरंग शंकर याजला द्यावयास्तव येथे पाठवावे. याप्रमाणे पत्रे पाठविलीं. तेव्हां बाईस विचार पडला कीं, पत्रे रवाना पुण्यास जालीच आहेत. सरकार दाखल्याखेरीज कारभारी यांच्या विचाराखेरीज कांहीच आम्हांस करणे नाही. तथापि, तुकबाचे पत्र आलें आहे. ज्ञान तेथील समजलें आहे. तुम्ही तेथपर्यंत जावे. त्याची भेट घेऊन राजकारण भानगडी ध्यानास आणून, मुख्य श्रीमंतांची आज्ञा मसलतीची त्यांची पत्रे रवाना केलीच आहेत. इतःपर स्वारीस निघावे. या तगाद्याची बोलणी रगडून बोलून बाहेर काढण्याची तजवीज सत्वर करावी. तो राजश्री पाराशर दादाजी याशी येथून महालचे रसदाचा भरणा पुरवून, सावकार एक दोन बराबर देऊन, फौजेची समजावीस करून, तोफखान्यासुद्धां सिद्धतेस रवाना करितें. म्हणून बोलून महेश्वरीहून रवाना बहुत ममतेनें खातरजमा करून केलें. येथे आलों. सुभेदारांनी राजश्री रामराव आपाजी पळशीकर लष्कराबाहेर अर्ध कोस सामोरा पाठविले, त्यांची भेट होऊन त्याजसहित डेऱ्याशीं आलो. तेथे डेऱ्याचे बाडापाशी ज्येष्ठ चिरंजीव राजश्री काशीराव होळकर यांजला पुढें पाठविलें. त्यांच्या भेटी होऊन मुख्याची भेट जाहली. पूर्वीपासून चाल सरदारांस वस्त्रे द्यावयाची आमची आहे, त्याअन्वयें चार

वस्त्रें दिधलीं. दोन घटका बसून राहुटीस मुक्काम त्यांनीं करविला. तेथें आलों. राजश्री नारो कृष्ण निसबत पाटिलबावा व राजश्री बाळाजीपंत कात्रे भेटीस आले. त्यांच्या भेटी जाल्या. बोलणेंहि कार्याकारण जालें. राजश्री बाळाजीपंत कात्रे यांजकडील मजकूर बोलण्याचा समजून घेतला, व स्वामींनीं पत्र त्याजवळ मजला दिधलें होतें, तेंहि मशारनिल्हेनीं दिधलें. आज्ञेप्रमाणें वर्तणूक होईल म्हणून मशारनिल्हेस सांगितलें. उपरांत दुसरे दिवशीं तुकोजीबावांनीं बोलावूं पाठविलें. गेलों. बोलणें जालें. त्यांत प्रथम आज्ञा काय पुसली ? उत्तर केलें कीं, तीन आज्ञा आहेत. त्याचें बोलणें बोललों. तेव्हां उत्तर करूं लागले. त्यांत परम श्रमी ! मजला देशीं मसलतीस ठेऊन कारभारी यांनीं खराब केले. शिद्याशीं झुंजूं नका, ऐसी थांबाथांब करून, चार चार बंद पत्रें व दादाजी गंगाधर यांजकडून लिहविलें. त्याजवरून झुंज केलें नाहीं. यास्तव तहबारी खर्चाची होऊन ही दशा जाली ! हीं भाषणें बहुतच श्रमयुक्त जालीं. ते दिवशीं शांतवन समाधान करून विशेष न लांबवितां घरास आलों. दुसरे दिवशीं बोलावूं पाठविलें. बोलणें समजुतीचे अर्थ मसलत संमधीं वगैरे जितकें बोलावयाचें होतें तें बोललों. तथापि बहुवशता फार, व करण्याचा प्रकार एक सुद्धां नाहीं ! कैलासवासी मल्हारजी होळकर सुभेदार यांची तऱ्हा बोलण्याची आणून बोलूं लागले. उपरांत एकांतीं खंडोपंत व आपण रात्रौ बसून बोलूं लागले. ममतेंत घेऊन पुढें कर्तव्यता कल्याणाची कोणती विचारीत आहेत, तीं घरोब्याचे रीतीनें व खंडोपंतास ममतेंत घेऊन विचारिलें. तेव्हां मुख्यत्व नारो कृष्णाचे विद्यमानें भानगड आहे ह्मणून बोलले. ती तऱ्ही पक्के आहे कीं काय ? तर 'आहे' म्हणून सांगितलें. तेव्हां नारो कृष्ण सेणवाई यांचे हातें बोलणें लावितां, तेथें दादाजी गंगाधर यांजपेक्षां, तुह्मी कारकून पाठवाल त्याची मातबरी व नारो कृष्णाची वाढेल कीं काय ? असें ह्मणून त्या दिवशीं बोलून आलों. दुसरे दिवशीं नारो कृष्णाची भेट जाली. त्याचा माझा पूर्वीचा दंडक आहे. त्यास पुसलें. त्यानें सांगितलें कीं, मजला बोलावून खंडोपंतांनीं सुभेदारापाशीं नेऊन भानगड लाविली. म्यां सांगितलें कीं, आपलें पत्र लिहून द्यावें. पाटिलबावांकडे पाठवून तपशिलें लिहितों. त्याचें उत्तर येईल तदन्वयें धन्यांनीं बोलाविल्यास तुम्हांकडील जो कोणी द्याल, त्यास घेऊन जाईन. त्याचीं उत्तरें मजला आलीं व यांचेंहि पत्र आलें. तेंच बजिन्नस दाखविलें. त्यांत नारो कृष्णाचे पत्रीं स्पष्ट लिहिलें कीं, दादाजी गंगाधर अंतस्तचें बोलणें बोलतात; त्यांत जीव काय पडेल व सिद्धीस काय गेलें, तें पुरतें पाहून तुम्हांस लिहूं. तूर्त तुम्हीं कांहींएक न बोलणें. बाईचें बोलणें आल्याखेरीज सार्थक नाहीं. याच अन्वयें राजश्री आबा चिटणीस यांनीं व लष्करांतून गोपाळराव रघुनाथ यांनीं लिहिलें, व सुभेदाराचे नांवें पत्रोत्तरें पाटिलबावांचें. त्यांत आपलेकडील दुसरा अर्थ नाहीं; तर आह्मांकडीलहि नाहीं. राजश्री दादाजी गंगाधर येथें आपलेकडून बोलणीं बोलतच आहेत म्हणून उत्तरें आलीं, तीं सर्व पाहिलीं.

नारो कृष्णास पुसलें कीं, तुह्मी जातां कीं काय? त्यांनीं सांगितलें, मजला धन्याची आज्ञा नाहीं. सुभेदार व खंडोपंतास स्पष्ट सांगितलें कीं, अगोधर बाईचें संमत पक्केपणें माझे प्रत्ययास आल्यावर, उपरांत कन्यास व आबास लिहीन. तेथून आज्ञा जी येईल तदन्वयें बोलणें ह्मणून स्पष्ट सांगितलें. तेव्हां फजीत जाले. बाईशीं बोलण्यास ठिकाण नाहीं. आह्मांस सांगितलें, त्यास ठिकाण नाहीं! बाईनीं पूर्वी भविष्य केलेंच होतें व बाईचा निश्चय, जें करणें तें सरकारांत दाखला देऊन, तेथील विचारें करणें. कालानुरूप तें तुम्हांस घराऊ विचार पुसून होईल. तूर्त फौज तयार करून, बाह्य विरुद्ध मोडून, मसलत गुजराथची करणें व फौज ताजी करणें, व सरकार आज्ञेप्रमाणें कलह न करणें. हाच विचार सर्वोपरी उत्तम तोच सिद्ध करावा. आह्मांस सरकार आज्ञा आहेच व बाईचेंहि संमत जाहलेंच आहे, तेव्हां सुभेदारास सक्ती स्वारीस निघण्याविषयीं सांगितली. तेव्हां उत्तर प्रत्युत्तर पूर्वी बोलिल्याप्रमाणें करूं लागले. थोडे सक्त व त्यांचीं कर्तुत्वें त्यांचे आंगीं लाविल्याखेरीज सोईस येत नाहींत, असें पाहून, तसेंहि बोलून सरकारानें अगर कारभारी यांनीं आपलें कल्याणच केलें आहे. आपण इस्तकबिल सरदारी, चाली चुकत गेलां व सरकारांतून संरक्षण व चालढकलच होत गेली. तीं कलमें आंगीं एक एक पुसपुसून लाविलीं. त्याचा तपशील आलादा कलमवार विनंती लिहिली आहे, त्याजवरून ध्यानास येईल. त्यांनीं पाटिलबावांकडे शब्द आणावयाचा मजकूर थोडा थोडा बोलिले. तेहि संदर्भ शुद्ध कलम लिहिलें आहे. सर्व उपयोगानुरूप तेथें करणें, तें स्वामी करितील. हीं बोलणीं होत गेलीं. त्यांत बाईकडील उपराळा पत्रें सरकार लक्षानुरूप आज्ञा करितील तें करावें, हींच येत गेलीं. तेव्हां मसलत मान्य करून, आह्मांकडील बोलणीं जालीं तीं विस्तारें बाईस श्रुत करून जसें सांगतील तसें करावेसें होऊन, राजश्री आनंदराव माधव कारकून महेश्वरास तुकोजीबावांनीं पाठविले. ते बाईशीं बोलून बाईचें संमत पुरतेपणें होतेंच. राजश्री पाराशर दादाजीस ऐवजाची तरतूज करून रवाना केलें. व खासा तुकबांनीं निघावें शरीरास स्वस्त, वायूचे उपद्रव नाहीं, तथापि तसेंच निघावेंसा सिद्धांत करून पत्रें लिहिलीं व पाराजीपंतास सांगितलें. त्या अन्वयें सिद्धतेस लागले. मसलत कबूल केली ह्मणून दोन तीन वेळां आम्ही व बाळाजी काशी कात्रे व आनंदराव वकील व त्यांचे घरची मंडळी व चिरंजीवासहित बसून सांगितलेंच होतें, व पुन्हां सांगून मुहूर्त पहावयासी जोशी यांस कार्तिक वद्य १३ रविवारीं सांगितलें. सरकारांत पत्रें यावीं कीं डेरे दाखल जालों म्हणून. त्यास बाईनीं मजला पत्र लिहिलें आहे. त्यांत पूर्वी पत्रें लिहिलीं आहेत, त्याचीं उत्तरें यावयाची मार्गप्रतीक्षा आहे. तोंपर्यंत कांहीं मसलतीचे सिद्धतेची पैरवी व डेरेदाखल होणें वगैरे निदर्शनास कांहीं आणून पत्रें लिहिल्यास गोडीस पडेल. तेंच पत्र बजिन्नस स्वामीकडे रवाना केलें आहे. मुख्यत्वें बाईस अभिमान पूर्ण पडला आहे कीं, मल्हारजी होळकराचे निशाणाचा

आब गेला, तो सरकारचाकरी मसलतीनें आणावा. आपण आहों तों, आब आहे त्याप्रमाणें संरक्षण करावा. सरकारचाकरीस बेउजूर असून कारभारी याचे विचारें सांगतील तसें चालावें. सुभेदाराचें शरीर अर्धे वायूनें गेलें आहे. तशीच तजवीज व कायममिजाजी व मसलतीचा अर्थ जाला आहे! व जेष्ट चिरंजीव काशीराव त्यांचा एक हात पाय वायूनें कमी जन्मतांच आहे, व तद्वतच बुध्य, मसलत, कायम-मिजाजी आहे!! कनिष्ठ चिरंजीव मल्हारराव त्यांची अवस्था सर्व स्वामीस विदित. जघन्यच आहे, तेंच आहे. बापूजी होळकर पुतण्या आहे, तो मात्र स्वारीशिकारी चाकरीच्या उपयोगी. त्याचे ठिकाणीं यांसी द्रोहबुद्धि विशेष याजला जाली आहे कीं, माझे पुत्र मागें पडतील. यास्तव पुत्रांस रुढीस घालावें. पुत्र जेष्ठ रुढीस घालावे, तर कनिष्ठ मल्हारराव ह्मणतात कीं त्यास जिवें मारीन. जेष्ठ पुत्र म्हणतात कीं, मी जेष्ठ, टिक्याचा धनी. मजला रुढीस न घातल्यास गोसावी होऊन छत्रीपाशीं बसेन. हें जेष्ठाचें भाषण! मुख्यास पुत्रमोह विशेष जाला! व्यसनासक्ति सर्वांस. मादक वस्तूचा संग्रह! तेव्हां सर्वांस जमा करून आह्मीं सांगितलें कीं, यानें बहुतांचे रूग्ण जाले. आपण संग्रह करितां, हें ठीक नव्हे. समय काय गुजरला आहे, व अभिमानरहित होऊन तोच उद्योग चालणें उचित नाहीं. आपलें रुबरू कोणी बोलत नाहीं, परंतु जग विरुद्ध जालें आहे. सुभेदार कैलासवासीचे पुण्याचे पुंज बहुत होते, त्याचा खर्च होत होत आपणहि तेंच पुण्य खर्चितां! पापोत्कर्ष विशेष जाहला. पुण्यसंग्रह सरत आला. तुह्मी सरदार थोर, केवढे तुमचे मान, थोरपणा, त्यास हा बट्टा आहे. ह्मणून पुत्रसहित जमा करून बोलणें झालें. त्याजवरून पुत्रांकडून आपण श्रीमंतांचे पायांची व बाईचे पायांची व श्रीमार्तंडजीचे पायांची शपथ करून, दरोबस्त लष्करचीं दुकानें उठवून, प्रांतांत दरोबस्त मनाई राज्यांतील शिरस्तेप्रमाणें चिट्टीवेगळी विक्री होऊं नये याप्रमाणें ताकीद निक्षून जाली. याप्रमाणें पंधरा दिवस चालतें. जमा प्रांताची दहा हजारांची कमी झाली. बाईसहि संतोष जाला. मुख्य या दौलतीस अहल्याबाईचें पुण्य, धर्म व बुद्धि, कायममिजाज, एकवचन व श्रीमंताचे चरणीं निष्ठा व लौकिकावर दृष्टि कर्तृत्व व पुरुषार्थ आहे; व स्वामीचा पुस्तपुन्हा ममतायुक्त असल्यासच निर्वाह आहे. दौलत खराबींत फार आली व ज्यांनीं मसलत कराव्या त्यांचा अर्थ असा. बाईनीं आव भरला आहे. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. सेवेसी श्रुत होय कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३.

**श्रीराम.** ता. २५ दिसेंबर इ. स. १७९३.

"पुरवणी श्रीमंतराजश्री नानास्वामीचे सेवेसीं विनंति कीं, स्वामींहीं कृपा करून पत्रें पाठविलीं. ते छ १८ जमादिलावलीं पावलीं. त्यांत मजकूर कीं, "सरदारी मोठी, उगेच रिकामें बसणे,- यांत लौकिक नाहीं; व खराबी होते. विना मसलतीशिवाय

उस्तवारी होत नाहीं. व परस्परें सरदारांत वैमनस्य जालें. त्याचेंही निराकरण होत नाहीं. हें जाणोन तुह्मांस रवाना केलें. तीन प्रकार सांगितले, त्याप्रमाणें तुम्हीं बोललां. त्यांचे विचारास बरें वाटलें, असें तुमचे लिहिण्यांत आलें. त्यास, पटाल्याकडील मसलत चांगली. पूर्व चाल सुटत नाहीं. भाऊपणास चांगले. परंतु ती मसलत निर्वेध शेवटास जाणार नाहीं. उगाच खलश वाढतो. याजकरितां गुजराथची मसलत करावयास गुण बहुत येतात. सरदाराची उठवण मोडेल, लौकिक मोठाच होईल, सरकारकामही होईल. स्वतंत्र कोणाचा वेध नाहीं. इतके गुण आहेत. याविशयींचें तुम्हांसीं बोलणें जालेंच आहे. सरकारांतून पुस्तपुन्हा व्हावा असें ह्मणणे, त्यास पुस्तपुन्हा होईल. सरकारचा सरंजाम थोडाबहुत ध्यावयास येईल. याविषयींचें पूर्वीं बोलण्यांत तुम्हांसी आलें आहे. व राजश्री बाळाजी काशी यांस लिहिलें आहे. वांटणीचा मजकूर, तर गुजराथेंत वांटणी पूर्वीपासून सरदारास नाहीं. जें सुटलें तें सरकारचें. त्यांत हिस्सा नाहीं. तेव्हां वांटणी मागूं नये. सरकारकाम करावें. याप्रमाणें व्हावें. यांत बहुत गोष्टी आहेत. सरदारीची उस्तवारी व्हावी, लौकिक व्हावा, यास्तव हा मनसबा मनन करून ठरविला. चांगला आहे. करावा हें उचित आहे. तुह्मीं लिहिल्याअन्वयें खोदून बोलावें आणि गुजराथचे मसलतीचें ठरवावें. होईल तें लिहून पाठवावे. मसलतीचे विचारें चांगलें वाटलें तें लिहिलें असे. याशिवाय भाग सुटत नाहीं. वरकड पूर्वचाली बाईनीं लिहिल्या व पराक्रम केले, सरकार नफे जाले, ह्या गोष्टी खऱ्या आहेत. लोपल्या नाहींत. परंतु तेव्हां दुई नव्हती. त्यानें नीट दिमत होतें. आतां तसें असतें, तर कोणेही गोष्टीचें संकट न पडतें. परंतु तसा प्रकार राहिला नाही तेव्हां कसें करावे? महेश्वरींच राहिलें असतां, लौकिक राहील कीं काय? याचा विचार मनांत यावा. जसी सरदारी, तसें काम करावे. यांतच सरदारीचें स्वरूप व बोज असें जाणून, हा पक्ष योजनेंत आला आहे. याप्रमाणे घडल्यास चांगलें. तुम्ही बोलावयाचे रीतीनें उलगडून बोलून याप्रमाणे घडवावे. यांत सर्व गोष्टी आहेत. होईल तें वरचेवर लिहित जावे. राजश्री तुकोजी होळकर सुभेदार व गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांच्या पत्रांचीं उत्तरें पाठविलीं आहेत. प्रविष्ट करावीं ह्मणून आज्ञा." त्यास आज्ञेप्रमाणे यांचे डेरे मार्गशीर्ष शुद्ध एकादशीस बाहेर गुजराथच्या रोखे देविले, व वद्य ६ सोमवारीं राजश्री सुभेदाराचे चिरंजीव ज्येष्ठ काशीराव होळकर डेरेदाखल केले. एक कोसावर मुक्काम जाला. फौजा दरोबस्त सामानानिशीं होऊन तेथें जातात. तेथून पुढें कूच. फौजा व राजश्री काशीराव, बापुजी होळकर यांचें कूच होईल. सांप्रत लग्न राजश्री मल्हारराव होळकर यांचें व बापुजी होळकराचे बंधूचे कन्येचें, तेही काल छ २० व छ २१ मीनहूस जालीं. इतःपर सत्वर कूच सुभेदारांचें होऊन महेश्वरास गंगाजळनिर्मळ अहिल्याबाईचे दर्शनास चालतील. राजश्री सुभेदार यांणीं मसलतीस जाण्याचा निश्चय बाईचे विचारें करून, श्रीमंतस्वामीचे गांवें व स्वामीचे नावें

व राजश्री तात्यांचे नांवें पत्रें लिहून पाठविलीं आहेत. पावतील. त्याजवरून कळेल. पुन्हा पुन्हा व...कुमकी फौजा व तोफखाना वगैरे उपराळ्याची तजवीज सत्वर व्हावी. दिवस मसलतीस राहिले थोडे. बाईच्या यांच्या भेटी होऊन सकलार्थ सेवेसीं लिहूं, व पत्राची उत्तरें तपशीलें पाठवितों. हल्लीं मसलतीचे मान्यतेचीं पत्रे पाठविलीं आहेत. इतःपर गुंता राहिला नाहीं. राजश्री पाटीलबावांकडील चाल पूर्व चालीनरूप घडून, खलश न राहे, आलीकडील वेध पडले ते निर्वेध होण्याचे अर्थ स्वामी करतील, व तिकडूनही सरकार आज्ञेस उजूर होणार नाहींत. विशेष होईल ते आज्ञेप्रमाणें लिहित जाऊं. विशेष काय लिहिणे, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ४.

**श्रीराम.** ता. २४ जानेवारी इ. स. १७९४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--विनंति येथील अर्थ साकल्य पय दरपय लिहिल्यावरून ध्यानास आलेच असतील. तात्पर्य, कारभारी कोणी वजनदार व विचाराचा माणूस, नारो गणेश गेल्यापासून नाहीं. मुख्य सरदारांनीं यावत् जन्म पैरवाधीन होत्साता, नारो गणेश यांचा निर्वाह केला. तेव्हां त्या रकमेचा कोणी उभा करावा, तें न करितां मनुष्य गेला, याचे बुद्धीचा करण्याचा श्रम राखून एषपोषी जाली होती. त्या अलीकडे पाराजीपंतास गळबंधन नांव मात्र. ते द्विपाद दावे तोडितात. सांप्रतचे प्रसंगीस असून उपयोग नाहीं. यास्तव सरदाराची (अनभव बाईस) बाईनीं फौजेचा बंदोबस्त करितील ह्मणून......ऊन हकबार करून महेश्वरीहून संतोष करून पाठविले. त्यांनीं येथें येऊन फौजेंत उलटी मलई करून शिलेदार वगैरे बहकाविले. यास्तव बाईचीहि त्यांचे ठिकाणीं अनास्था जाली. मुख्य सरदाराचे बुद्धीचा स्तव ! शाश्वत बुद्धि आजची उद्यां नाहीं ! महद् गुणांतील गोष्ट एक ! दुसरें, स्वतः बुद्धि नसतां मनसच्याचे कल्प बोलतात. तें कर्णकडून श्रवण करितां आश्चर्यरूपी. परंतु खामा बहुत आपल्यावर आपण संतोष मानून रिझतात. व मसलती चुकल्या त्या कपाळावर घालून, विवेक करून, इर्षा सर्व टाकली, हा दुसरा गुण. तिसरें द्रव्यलोभ अतिशय. येवढें श्रमांत येऊन सर्वस्व गतश्री व्हावेंसें जालें असतां, जवळ दहा बाराचें वित्त आहे तें प्राणापलीकडे व अन्नाहून पलीकडे ठेविलें. तें न काढतां, बाईकडील मार्गप्रतीक्षा सहस्र फ़ाजल्या सोसून, दौलत बुडते हें ध्यानास न आणून, जात जात जाऊन राहील तितकें पहिलें अव्वलास फार मानून, विवेक करितात ! चवथे, पुत्रमोह अतिशय होऊन चांगलें माणूस नाहींच. आहेत त्यांचा द्रोह अत्यंत! उत्पन्न व हलकें मनुष्य इ॥ गर्धीरक्षा मुख्य सल्लागार, ता॥ खिजमतगार यांची सांगणीं सर्वोत्कर्ष!! असे चार गुण. दवलत तारावयाचे व वाचवायाचे गुण क्रिया एक बाईचे पांयाशीं ! कार्याकारण वरंकड स्मरणच नाहीं. शरीर केवळ गेलें. दोघां मनुष्यांनीं उठवावें, बसवावें, ही दशा आहे. येथें आश्रय पुढें चांगले चालीचा व धर्माचा व पतीचा व कायममिजाजीचा सर्वांचें लक्ष रक्षावयाचा गुण जो कांहीं आहे, तो बाईत.

बुद्धि व कल्याण अकल्याण समजणें व मल्हारजीबावांचे लौकिकास जपणें तेथें आहे. सरदारांची त्यांची गांठ पडल्यावर बाईचे दाबानें हे मार्गावर येतील. व माणसाची नेमणूक नवी करणें अथवा जुन्यांतच योजणा होणें, तें तेथें होऊन कारवाईचें ठरेल, तें विनंति लिहूं. मुख्यत्व सरकारचा उपरोळा पेशजी विनंतीपत्रीं लिहिला, तद-अन्वयें होऊन......मनःपूर्वक असावें. श्रीमंत स्वामींचा प्रताप व बाईची निष्ठा श्रीमंतांचे चरणीं, व धर्म व मनसबा व बाई पुस्तपन्ह्यावर. तेव्हां क्रोडो खर्चून मसलत सिद्धीस नेईल, हा भ्रम व दहशत......येत जाईल. तेणेंकडूनहि बहुत कार्ये घडतील. येथें ऐवजाची भरती समजाविशीस पाहिजे. कित्येक पोंहचले नाहींत तों बाईशीं बोलून त्याचे धरबंद जाले पाहिजेत. यास्तव यांनीं बहुत आग्रह जाण्याविषयीं केला. त्याजवरून बाईस पत्रें लिहिलीं, त्याचीं उत्तरें आलीं. तींच बजिन्नस सेवेसीं पाठविलीं आहेत. त्याजवरून सर्व अर्थ श्रुत होईल. मुख्यत्वें बाईचें लक्ष सरकारमसलतीवर चांगलें आहे. परंतु सरदार, सरदारीचे निभावणी व कारभारी यांची दशा सेवेसीं साकल्य लिहिली आहे. महेश्वरीं याजला सक्ती करून बाईपाशीं नेतों. तेथें गेल्यावर तऱ्हा ठरेल तें साकल्य सेवेसी लिहूं. चंद्र ११ जमादिलाखरीं राजश्री तुकोजीबावा सुभेदार यांचें कूच महेश्वरचे रोखें, इंदुराहून तीन कोस बिजलपुराहून पुढें, एक कोसावर मुक्काम जाला; व राजश्री काशीराव यांचा मुक्काम दोन कोसांवर गुजराथचे रोखें होता. तेथून निघून कोस पुढें इंदुराहून पुढें गुजराथचे रोखें चार कोसांवर, उदयीक आमची रवानगी गंगाजळनिर्मळ बाईकडे. घराऊ कित्येक बोलणें यास्तव करितात. तेथें पावल्यावर हेहि सत्वरच येतील. सेवेसीं श्रुत होय कृपा केली पाहिजे हे विनंति.''

## लेखांक ५.

**श्रीराम.** ता. २१ फेब्रुवारी इ. स. १७९४.

''श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं:— पे॥ देवराव महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाइत चंद्र २० रजब पावेतों मुक्काम महेश्वर स्वामी कृपेंकरून यथास्थित असो विशेष. स्वामींनीं कृपा करून पत्र चंद्र १२ रजबचें पाठविलें, तें येथें चंद्र १९ मिनहूम प्रातःकाळीच पावलें. पत्रीं आज्ञा कीं, पाटीलबावांस नऊ दहा दिवस फार ज्वर आला. माघ शुद्ध १२ त्रयोदशी बुधवारीं प्रातःकाळीं वायूची भावना जाहली. सरकारांतून वैद्य पाठविले, उपाय बहुत जाले, परंतु होणारास इलाज नाहीं. त्याच दिवशीं आवसीचे प्रहर रात्रीस काल जाला! मोटी वाईट गोष्ट जाली!! इश्वरी इच्छेस इलाज नाहीं!! हीं वर्तमानें हिंदुस्थानांत गेल्यावर तिकडे गलबल होईल, याजकरितां राजश्री तुकोजीबावा सुभेदार यांस पत्रें सरकारचीं व आमचीं व राजश्री हरीपंत तात्याचीं याप्रमाणें लिहून पाठविलीं आहेत. तुह्मी पाहून सुभेदारास देऊन, गंगाजलनिर्मळ अहल्याबाई यांस व सुभेदाराशीं बोलून फौजेची तयारी करावी, आणि तिकडे पाटीलबावांकडील सरदार आहेत त्यांस

पत्रें पाठवावयाचे सुभेदाराचे पत्रीं लिहिलें आहे, त्याप्रमाणें पत्रें जावीं. सुभेदाराच्या पत्रांचीं उत्तरें घेऊन पाठवावीं ह्मणोन पत्रीं आज्ञा." ऐसीयासी, हें वर्तमान राजश्री दादाजी गंगाधर यांनीं खेतसी सावकार याचे दुकानीं पत्रें रवाना केलीं, तीं चंद्र १८ मिनहूस सायंकाळीं पावलीं. ते समयीं वर्तमान श्रवण जालें. सरकारचीं पत्रें जांबचे घाटापर्यंत जाऊन परतून येथें आलीं, तीं चंद्र मजकुरीं प्रातःकाळीं पावलीं. आकस्मात ईश्वरें परम अनुचित केलें. या प्रसंगीं हा प्रकार घडणें सहसा ठीक नव्हतें. मारवाडी, जयनगरवाले वगैरे जमीदार आपलाले जागां बहबाहा होऊन लबाड्या कराव्या ऐसें इच्छितात. स्वारी त्या प्रांतीं राहिली, यामुळें त्यांत हा प्रकार फारच वाईट जाहला. सर्व एक पेटी, दुसरीकडील अर्थ करण्याचा सर्वत्र सिद्धांत, अशीं मनुष्यें परम दुर्लभ ! श्रीइच्छा प्रमाण. आज्ञेप्रमाणें पत्रें प्रविष्ट केलीं. त्यांनींही वर्तमान ऐकतांच, नौबतखाना बंद करून स्नान केलें; श्रम मानिले. आज्ञेप्रमाणें पत्रें रवाना जागा जागा, जोड्या मुजरद रवाना, पाटीलबावाकडील नवघे सरदार जिवाजी बल्लाळ, गोपाळराव रघुनाथ, खंडेराव हरी, अंबोजी इंगळे यांस पत्रें खातरजमेचीं व फौजा येऊन पोहोंचतील, तुह्मी खातरजमा राखावी व राजेरजवाडे यांशीं दाबाचीं व पादशहास आर्जी व शहाजीस पत्रें व दुभाई साहेब इंग्रेज यास पत्र येणेंप्रमाणें पत्रें लिहविलीं, तयार जालीं. राजश्री पाटीलबावांकडील नारो कृष्ण यांचीं पत्रें व आमचीं पत्रें चौघां सरदारांस व सरकारचे पत्रांच्या नकला देऊन रवानगी केली. आज पत्रें रवाना होतील. दोचौं घटकांत उपरांत सरकारचीं पत्रें यांचे जाबसाल आमचे हवालीं करणार व एक पत्रें राजश्री दादाजी गंगाधर याजकडे रवाना केलीं. त्यांत विशेष सरकारचे पूर्वीचे भाऊपणाचे श्रमानें पत्रें रवाना केलीं म्हणून लिहिण्यांत कारकुनाची कारेगिरी जाणविली आहे. पत्रें सदरहू लिहविलीं. फौजेची रवानगी गुजराथचे मसलतींत तेच त्या प्रांतीं होईल. सरकारचीं उत्तरें खचित दस्तऐवजीं घेऊन, आज रवाना दोनप्रहर सायंकाळ पर्यंत करतों. दुंडी त्या प्रांतीं होईल परंतु श्रीमंतांचा प्रताप व पाटीलबावांकडील बंदोबस्त, सरदार चांगले आहेत, व यांचाही दुसरा अर्थ होणार नाहीं. प्रसंगीं फौजा रवाना व्हाव्या हे नेट बहुत लाविलें आहे. गंगाजलनिर्मळ बाईची ताकीद भारी आहे. प्रसंगीं कमी होणार नाहीं. तेथें राजश्री दवलतराव शिंदे व फौजा सरंजामी आदीकरून जलद कुचाची आवई पडून, चार मजली अलीकडे यावें. साकल्य विनंति आलाहिदा लिहून पाठवितों. श्रुत होय हे विनंति."

## लेखांक ६.

**श्रीराम.** ता. २३ फेब्रुवारी इ. स. १७९४.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-प्रति देवराव महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र २२ माहे रजब पावेतों मुक्काम महेश्वर येथें स्वामीकृपेकरून यथास्थित असो विशेष. महादजी शिंदे यांचा काल

जाहला, याकरितां बंदोबस्ताचीं पत्रें श्रीमंतांचीं व आपलीं व राजश्री तात्यांचीं राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचे नांवें पाठविलीं, तीं सुभेदारास व गंगाजलनिर्मळ अहल्याबाईस दिलीं, आणि त्यांजकडील उत्तरें घेऊन सेवेसीं पाठविलीं आहेत, पाव-तील. सरकारआज्ञेप्रमाणें यांजकडील फौजेची सिद्धता आहे व होते. शिंद्यांकडील सरदारांस पत्रें यांजकडील घेऊन पाठविलीं आहेत. तिकडील इशारा आला म्हणजे यांजकडील गुंता नाहीं, फौज तयार कांहीं आहे व कांहीं होते. बहुतेक इतकी दुंडी त्या त्या प्रांतीं होणार नाहीं. राजश्री नारो कृष्ण वकील, राजश्री पाटीलबावांकडील, यांची रवानगी करणार होते, ती सांप्रत राहिली. सरकारचीं उत्तरें या पत्रांचीं आल्यावर करणें तसें करावें. त्यास स्मरणपूर्वक उत्तरीं आज्ञा करावी. येथील राह-ण्याचा सेवकाचा अर्थ तूर्त काय? एकवेळ सेवेसीं येऊन आज्ञा जाहल्यास साकल्य इकडील व हिंदुस्थान प्रांतीचे निवेदन करीन. पुन्हां आज्ञा जाहल्यास येऊं. साकल्य वर्तमान होईल तें सत्वरच लिहून पाठवितों. सेवेसीं श्रुत होय, कृपा केली पाहिजे हे विनंति. पूर्वी पत्रें दोन स्वामींचे नांवें व तात्यांचे नांवें चंद्र ११ जमा-दिलाखरीं पाठविलीं, त्यांचीं उत्तरें सत्वर यावीं, किंवा खुलासा कर्तव्य न कर्तव्य यावा. सेवकास उत्तरें येऊन सत्वर पोहोंचल्यानें आज्ञेचे भाव ध्यानास येतात व येथेंही आब राहतो. पुढें आज्ञा सत्वर व्हावी. श्रुत होय हे विनंति."

## लेखांक ७.

### श्रीराम.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसी जे:– चंद्र १२ रजबचीं पत्रें आलीं तीं चंद्र १९ मिनहूस प्रविष्ट जाहलीं. महादजी शिंदे यांस नऊ दहा दिवस ज्वर आला. अकरावे दिवशीं माघ शु॥ १३ बुधवारीं वायूची भावना होऊन अवसीचे प्रहर रात्रीस काल जाहला, ही गोष्ट ठीक न जाली! हीं वर्तमानें तिकडे जातील. त्यांचे मुलखांत वगैरे गलबल होईल. त्यास पूर्वद्वेष मनांत न आणितां, त्यांचे महालांस अगर खेड्यांस तुह्मांकडून उपद्रव न लागे, असा बंदोबस्त करणें. दुसरें, त्यांजकडील सरदार हिंदुस्थानांत आहेत त्यांस पत्रें पाठवावीं कीं, शिंदे यांचा काल जाहला, ईश्वरी इच्छेस इलाज नाहीं; तुह्मीं फौजेचा बंदोबस्त राखून दिल्लीचा बंदोबस्त चांगला करणें. आह्मी फौज सुद्धां तयार आहों. तुमचा इशारा येतांच येऊन पोहोंचतों, अशीं पत्रें राजश्री सुभेदार यांसी श्रीमंतांचे नांवें व आपले नांवें व राजश्री तात्यांचे नांवें आलीं, तीं गंगाजळनिर्मल अहल्याबाईस दाखऊन सुभेदारास प्रविष्ट केलीं. हिंदुस्थानांत पत्रें रवाना करण्याचें व सरकारचे जाब जलद रवाना करण्याचे उभयतांसी बोलण्यांत आणिलें. पाटिल-बावांचा काल जाला, त्यांचे श्रम या उभयतांस होऊन, नौबद बंद केली. बाई व सुभेदार श्रमी बहुत जाले. पत्रेंही लिहिण्याविषयीं जलद सरकारांत वर्तमान कळावें, यास्तव चंद्र २० मिनहूस डांकेंत पत्रें सेवेसीं रवाना केलीं. वरकड मागा-

हून पत्रे रवाना जाल्यावर सरकारचे व स्वामीचे व तात्यांचे पत्रांचे जाब घेऊन सेवेसी रवाना करितों ह्मणोन विनंति लिहून पत्रे पाठविलीं, तीं पावलींच असतील. त्या अलीकडे पत्रे सरकारांत व हिंदुस्थानात सरदारास रवाना होण्याची भवती न भवती होऊं लागली. त्यास एक दिवस अधिक लागला, त्याचे कारण आमचे दस्तऐवज गांव खेड्यापर्यंत लिहिण्यात आणावेसें घडते. त्यांचा मृत्यु जाला, समय रक्षावा; प्रांताचा बंदोबस्त राखावा; दुंडी होऊं न द्यावी; हा मुख्यार्थ खराच; व दस्तऐवजीही गुंतों नये. याचे कारण की, तुमची त्याची येमनस्कता वांटणीमुळें दिल्ली आगरें, पादशाहा मुद्दा हिंदुस्थानचा वाटा घेणे हा मुख्य पक्ष. अलीकडे महादजी शिंदे यांनी खुरजे वगैरे महाल अनरवेदीत आपले होते. त्यांनी प्रांत दिधला त्यात अंमल आमचे कमाविसदार बसले. तेव्हां फाजला मुद्दा चर्चाही नाहीं. तूर्त हे महाल घ्यावे, पुढे मसलतीहून आल्यानंतर यथाविभागें वांटणीचा फडशा होईल, याप्रमाणे ठरले. अलीकडे दुराग्रह वाढून कलहाची वृद्धी जाली व सरकारांत सात आठ कोड फाजील काढले, त्याचीही कमजास्त मखलासी सरकारांतून करून घेतली म्हणून ऐकतो. आमची समजूत यथाविभागें व्हावी. तोहा अर्थ न होतां, तूर्त खुरजे वगैरे महाल दिधले, तेहा जप्त करून आमचे कमाविसदार उठवून दिधले व महाल दुभाई इंग्रज यासी लावून दिले. तेथे लखनोकर इंग्रजाच्या कोठ्या दुभाईनें करविल्या. तेव्हा सुटणे दुरापास्त! सरकारचे वांटणीचा प्रांत फाजलांत लावून घेतला म्हणून ऐकतो. त्यांचे दुराग्रहामुळें तूर्त कलह तुटावा व दाखला असावा यास्तव पटाले, गुजराथची मोहीम करावी हे आज्ञा. तेव्हां सरकारांत व उभयतां कारभारी यांस पत्रे तुमचे विद्यमानें पाठविली कीं, हिंदुस्थानचा वारसा पूर्वे चालीप्रमाणे राखून, आज्ञा होईल त्या मसलतीस सिद्ध आहो. त्याचीं उत्तरें समर्पक उभयतांची आलीं कीं, हिंदुस्थानचा दाखला आहे. तूर्त समजुतीमुळे गुजराथची मसलत कबूल करावी. यात नफे बहुत आहेत त्याजवरून स्वच्छ दस्तऐवज मसलत गुजराथची कबूल करण्याची पत्रे श्रीमंताचे नावे पाठविलीं. ते दस्तऐवज गेले. असा प्रसंग येऊन गुदरला. तेव्हा त्याचे कारभारी वगैरे यास पत्रे लिहून सरकार आज्ञेप्रमाणे पाठवावी की दिल्ली, आगरें, वगैरे बंदोबस्त राखावा. आंह्माकडील दुसरा अर्थ नाहीं. व जमीदारास, राजेरजवाडे सर्वास पत्रे कीं, त्याजकडील सरदारासी रुजू राहणें, दुसरा अर्थ केल्यास ठीक नाहीं. तेव्हा आमचे दस्तऐवजांनी त्यांचे स्वाधीन हिंदुस्थान केलें. सरकारांत पत्रे लिहावी त्यांतही ह्याच अन्वयें लिहून, फौज मात्र तयार करून, त्याजकडील सरदाराचे उपराळ्यास फौज मात्र तयार राखावी. हा भाव होऊन, पुढें बाज राहोन सरकारात त्यांहीं फाजील काढून त्यांनीं आपला दस्त केला, तर सरकार धणी आहेत. व त्यांची दवलत यारगिरीची, तेव्हां जें आहे तें सरकारचें त्यांचे अर्थ सरकारांनी बोलून, तोडी राखणे त्या राखल्याच असतील. या वहिवाटीत आमचा दस्तऐवज गुंतून लिहिण्यांत आणावेसें घडतें.

त्यांचा मृत्यु जाला, समय रक्षावा, प्रांताचा बंदोबस्त राखावा व दुंडी होऊं न द्यावी हा मुख्यार्थ खराच, हेही दोष या कर्मास पडतात. धन्यानीं कारभारी यांनीं लिहिले, प्रसंग नाहीं ह्मणतां बाह्य विरुद्ध व दस्तैवज देतां. महादजी शिंदे खासा असतां दुराग्रह पडले, त्यांत सरकार गुंतलें म्हणोन ऐकतों. त्याची तोड सरकारांनीं राखलीच असेल. सांप्रत आह्मीं गुंतावें हें होतें. त्यांत महादजी बावा असते तर विवेक अविवेक जाले, त्याचें निराकारण होऊन पूर्व चालीप्रमाणें घाटास यावें हें सरकार व उभयताचे अन्वयें होतें. सांप्रत त्यांचे सेवक सरदार वगैरे व सरदारी त्यांचे वंशींचे सरदारीची वहिवाट करतील. त्यांस वाटेल कीं वडिलाचे व्रत ग्रहण आपण कसें मोडावें? त्यांचे सेवकांस वाटेल कीं, खावंदाचें केलें आपण कसें मोडावें? सांप्रत बळकटी जाहलीच आहे, त्या अन्वयें वर्तावें. असे प्रकार पुढें पेंचाचें दिसतात. आजपर्यंत सरकारांतून त्यांचे मर्जीप्रमाणें लिहिणें करणें, मसलती घालणें, प्रसंगानुरूप करणें प्राप्त जालें व केलें. सांप्रत त्यांचा काल जाला हें परम अनुचित जालें! ते असते तर विचाराचे माणूस व दूर अंदेश. एक वेळ दुराग्रहानें गोष्टी जाल्या, त्या अविवेकानें जाल्या, हें ध्यानास येऊन सरकारासीं व भाऊपण्यासीं पूर्व चालीनें चालून मार्गावर येते. तो प्रकार घडावयाचा होता. सांप्रत ऐसा प्रकार घडला. श्री इच्छा! पुढें कारभारी व धणी दवलतीस होतील, त्यांचे कुलधर्मांत हे गोष्ट न यावी. जाला तो अविवेक, पुढें उभयतां सरदाऱ्या, दौलती, सरकारच्या भाऊपण्याप्रमाणें निभावणी व मोठेपणीं दिधली, वारंवार राज्यांत दुई पडावी व धन्याची अवज्ञा दिसून बाह्य विरुद्ध पडावें हें राज्यास ठीक नाहीं हिंदुस्थानची दुंडी व्हावी तर इंग्रजाचा व सरकारचा तह बनला आहे. राजेरजवाडे ह्मणतां, जयनगर, मारवाडवाले, उदेपुरवाले मातबर. ते चोळणीखालीं राज्यें खराब जालीं. त्यांत हाल राहिले नाहींत. कदाचित गंवार गर्दीस उभे राहावे, तर फौजा शिंद्यांकडील, व आह्मी फौजेसुद्धां ऐशा समयीं कमी न करितां सिद्ध. व इंग्रजाचा आश्रय तहामुळें राजेरजवाडे यांस सांपडत नाहीं, तोंवर कोणाची जुरत बखेड्यास वाढते असें नाहीं. बंदोबस्त कायम आहे. जाल्या अविवेकाचें निराकरण करून, उभयतां सरदाऱ्यांची वहिवाट पूर्व चालीप्रमाणें राखून, उभयतांनीं सरकारचाकरी व मर्यादा वडिलोपार्जित कुलधर्मानुरूप चालवून, उभयतांनीं सरकार उपयोगी, आज्ञा होईल तेव्हां हजर असावें. उभयतां सरदारांचा आब व सरकारच्या उपर उभयतावर. व सरकार वांटणीवर सरकारचे कमाविसदार, व आमचे वांटणीवर आमचे, व त्यांचे वांटणीवर यांचे, व पादशहासुद्धां बंदोबस्तांत सरकारचा आणि श्रीमंत रावसाहेब कैलासवासी यांचे समयीं मर्यादेंत राहून केले चाकरीचा मद मारून, सेवाधर्मास सादर व सरकार किफायती होत होत्या त्या अन्वयें वर्तणूक व कलह निःषेश तोडण्याचा समय हाच. यांत सरकारचे नफे व आमच्या उभयतांच्या समर्याद भाऊपण्यास व सरकारांत चालण्याच्या बंदोबस्ताचा समय हाच आहे. पुढें चाकरचाकरी कारभार. त्यांची रवा-

नगी तेथून होईल तेथें निश्चयांत येऊन आमची खातरजमा व्हावी, आणि त्यांची रवानगी व्हावी, हा पक्ष सरकारांस व उभयतांस आतांच घडेल. येविषयीं सरकार व उभयतांनीं आमची खातरजमा करून आह्मांस पेंच न पडे हें करावें. हेंही सरकार उपयोगी, व दौलत सरकारची. आजपर्यंत सरकारचे व उभयतांचे आज्ञेवर मसलतीवर सादर आहों. राज्यांत अनेक प्रकारचे बहदे जाले, त्यांचीं निराकरणें होऊन श्रीमंतांचे प्रतापें उभयतांस यशें आलीं. आमच्या उभयता सरदारांनीं चाकऱ्या केल्या, तहबारी जाली, तर पूर्वापर चाकरी करीतच आलों; व तहबाऱ्याही श्रीमंताचे प्रतापें सांभाळून, सरकारचाकऱ्या केल्या. फाजले काढली नाहींत. सरकारांत यावत् शक्ति देतच आलों, तेंच चालवतों. भाऊपणा व तेच निष्ठा श्रीमंताचे पायापासीं असावी. चाकऱ्या वडाव्या, अशी मर्यादा करून दिल्यानें उभयतांस अघटित यश! राज्याचें सर्व रक्षण. त्यांत निमे राज्य उभयतां सरदार हे संरक्षण व मर्यादेनें चालेल त्याचा गौरव, व चाल टाकील त्यावर दाब असोन पुढें सरकार व भाऊपण्याच्या वाटण्या नीट चालून महत् यश संपादावें व राज्यांतील दुही निःशेष नाहींसी करावी. पुढें बळ विशेष पडेलसें न व्हावें. ये विषयीं आम्हांस खातरजमा उभयतांचे व सरकारचे पत्रांत असावी. चाकरीस हजर आहों. या प्रसंगीं चालीवर सहसा न टाकावें, ह्मणजे कोणासही नड पडणार नाहीं. महत् यश आहे. या प्रसंगीं प्रसंगही संरक्षण करावा. बाह्य विरुद्ध मोडावें, व दस्ताऐवजीं गुंतू नये, असें भाव बोलण्यांत येऊन संशय मानिला. यास्तव आम्ही सांगितलें कीं, संशयात्मक ठीक नाहीं. तुमचा अभिमान सर्वस्व उभयतांस. दौलत श्रीमंताची व रोपें लावलेलीं त्यांचींच. त्यापक्षीं यास बाद कसा पडेल? दोहो बाजू सारख्या. दोहोंची संरक्षणें सरकारांतून. व उभयतांस एकरूप करणें हें सर्व अंदेशे त्यांचे ध्यानांत असतील. गुजराथचे दस्तैवज गेले, तेही त्याजपासीं. चौघा सरदारांस मात्र शिंद्याकडील पत्रें तुमचीं, व रजवाड्यास रुजू राहण्याविषयीं पत्रें द्यावीं. त्यांस जसे धनी शिंदे त्यांजला, तसेंच त्यांचे सरदारांस तुह्मी धनी. तेव्हां चिंता नाहीं. याची तोड सरकार व उभयतां राखतील. तुम्ही या प्रसंगीं दिकंत घेतल्यास व लौकिकविरुद्ध भाऊपण्यास व सरकारचे आज्ञेचा भंग व उभयतांस काय वाटलें हें नकळे. यास्तव सर्व अर्थ मर्जीवर व विश्वासावर ठेऊन सरकार आज्ञेची जलदी करावी. त्याप्रमाणें पत्रें रवाना. दिल्ली, आगरें, वगैरे बंदोबस्त शिंद्याकडील सरदार तेथें आहेत त्यांनीं करावा. आह्मी उपराळ्यास आहों, फौज तयार आहे, अशी पादशहास अर्जी व शहाजी कारभारी यास पत्र. व राजेरजवाडे यांस पत्रें कीं त्यांचे अमलासी कोणी बोलल्यास आम्हांस पारपत्यास यावें लागेल. यास्तव शिंद्यांच सरदार यांसी रुजू व्हावें. याप्रमाणें पत्रें लिहून चौघे सरदार राजश्री गोपाळराव रघुनाथ व जिवाजी बल्लाळ व खंडेराव हरी व अंबोजी इंगळे यांस पत्रें खातरजमेचीं कीं, महादजी शिंदे यांचा काल जाला, त्यावरून तुह्मी उदास व्हाल, तर ऐसें नसावें. तुह्मी

खातर जमेनें दिल्ली, आगरे, अजमेर वगैरे पादशहासुद्धां बंदोबस्त राखावा. आमची फौज तयार आहे. अविलंबें रवाना करितों. सर्वांस पत्रें पाठविलीं आहेत, तीं पावतील. त्यांस देऊन बंदोबस्त राखावा. याप्रमाणें पत्रें रवाना केलीं. व आह्मीं आपलीं पत्रें चौघा सरदारांस लिहून त्यांचे वकील नारो कृष्ण येथें आहेत, त्यांचे स्वाधीन व सरकारच्या पत्रांच्या नकला होळकरांचे नांवें पत्रें होतीं, त्यांचा वकील मजकूर याच्या स्वाधीन केल्या. सरकार आज्ञेप्रमाणें होळकर यांजकडील वर्तणूक आहे. पत्रें रवाना सरकार आज्ञेप्रमाणें केलीं. होळकरांकडील फौज तयार आहे. तुह्मी लिहाल त्या अन्वयें यांची रवानगी फौजेची त्या रोखें होईल. याप्रमाणें पत्रें कासद छडे पदमगी सावकार मातवर होळकरांकडील त्याचे छडे कासदाबराबर पांच जोड्या, एक शियांचें वकीलाचें पत्र व एक आमचें पत्र, व होळकरांचीं पत्रें चवघा सरदारांस रवाना केलीं. व होळकरांचीं पत्रें संस्थानिक रजवाडे व पादशहास कासदासमागमें वकीलाजवळ चंद्र २० मिनहूस रवाना केलीं. तैशीच या पूर्वीं शियांस समाधानाचीं व राजश्री दादाजी गंगाधर यांचे विद्यमानें सरकारांत रवाना केलीं आहेत. पत्रोत्तरें या पत्रांचीं फार जलद पाठवावीं. आजपर्यंत या वर्तमानासगट दोन उत्तरें मात्र सेवेसीं पाठविलीं. याचे उत्तर आल्यास गंगाजल निर्मळ अहल्याबाईस तोष होईल. येथील अर्थ साकल्य समक्षतेनेंच निवेदन होतील. सेवेसीं श्रुत होय, विशेष काय लिहिणे, कृपा केली पाहिजे हे विनंति.

## लेखांक ८.

**श्रीराम.** ता. २१ मार्च इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति ऐसी जेः- येथें आल्यातागाईत जालें वर्तमान कचें आलाहिदा व यांजकडील पडदा राखून लिहिणें तें लिहिलें, व मसलतीस सिद्ध करण्याचे प्रकार ऐशा रवानग्या सेवेसीं सुचल्या अर्थाच्या व यांचीं बोलणीं अस्ताव्यस्त पडलीं त्याचा संदर्भ लावून साकल्य लिहिलें. त्या अलीकडे इंदुराहून राजश्री तुकोजीबावा सुभेदार यांचें कूच, गंगाजळनिर्मळ अहल्याबाई यांचें नेट व सरकार आज्ञेप्रमाणें मसलतीस जाण्याचें पक्कें व सरकार तर्फेची सख्ती गरम नरम बोलणें बोलून, बाईचा आसरा धरून, सरकार रीतीचे पल्यावर आणिलें. सात आठ लक्ष रुपये बाईनीं इंदुरास रवानगी केली कीं, समजावीस लोकांची करून स्वारीस निघावें. कारभारी पाराशर दादाजी व पारनेरकर फडणीस व सरदार तुकोजीबावा. सर्वांचें कारण, जो पैका आला तो बाईपासून घ्यावा, व पुढें मागतच जावा. मुक्कामा खालें व पोटा खालें व आपलीं आपलीं रद्दकर्जें सरदारासुद्धां घेत जावीं, असें करून पागासुद्धां ठीक बंदोबस्त नाहीं. इंदुराहून गवगवा न आणितां, पाठविला पैका त्यांत समजूत करून, जलदीनें फौज तयार करून, गुजराथेंत उतरावेंसें बोलणें होऊन, राजश्री पाराशर दादाजी यांची रवानगी महेश्वरीहून बाईनीं केली. मशारनिल्हे तेथें गेले. सरदारांचें मत एक, कारभारी यांचें मत एक!

व आवण्यांची वर्तणूक चोरासारखी! धनी कोणीही नाहीं. बाई बायको माणूस. दाब तिळप्राय कोणी मानीत नाहीं. तथापि, सरकारलक्ष्यास जपावें येविषयीं वारंवार ताकीद, व सरकारलक्ष्याखेरीज व आपले उभयतांचे मर्जीखेरीज कांहींएक करूं नये, हें लक्ष बाईचें पक्कें. व गुदस्तापासून पैका माहालचा वगैरे जमा करून व फौजेची रवानगी करणें तितकी केली. एक आपण मसलतींत जावें तर स्त्रियांचा व्यवहार नाहीं! पुढें सरदार खांसा, त्यांची दशा! आपण खांसा व पुत्र व रक्षा, पुतण्यासुद्धां उदकाप्रमाणें अनाचाराची पराकाष्ठा!! नारो गणेश यांनीं कारभार केला, तोहि लौकिक मिळवावा, अघटित कामें होऊन चांगलें दिसावेंसें कांहीं केलें नाहीं. परंतु सरदारीचा भ्रम रक्षून ज्ञान बाहेर पडूं दिधलें नाहीं. सांप्रत तसेंहि माणूस कोणी नाहीं, व असल्यास सरदार कर्तृत्वेंकरून यश मिळवून कृतार्थ जन्मादारभ्य कांहींएक केलें नसतां, एवढी खिदत खादली, फौज बुडाली, उठवण्यास आलें, तें अद्याप उठवत नाहीं! पागा उपासाखालीं बुडाल्या! फौजा उठून गेल्या! हजार पंधराशें पागा, त्यास बारगीर पोरग्याची भ्रांति! शिलेदार आठ दहा हजार फौज होती, ती खांसा व कारकून मात्र मागील बाकी मागावयासी येथें; बरकड शिलेदार उठून गेले! सरंजामी पथकें हजार बाराशें, तीं रामपुऱ्यास बंदोबस्तास पाठविलीं आहेत. गारद, फरासीस हजार बाराशें व पांचशें माणूस कमकसर, त्यांजला मागील समजाविसीस चार चार रोजमुरे दिधले. ते खाऊन पुन्हां त्यांजला दरमहाचा दरमहा पाहिजे. न दिल्यास इतक्यासहि तेवढे भारी आहेत. सर्वां लोकांचे गवगव्याचे बचावास डेऱ्याभोंवते दोन चारशें माणूस गारद मात्र व पांच तोफा इतकी रखवाली असतां, तेथेंहि गारद लोकांचा गवगवा होऊन, त्या गवगव्यांत तुकोजीबावांनीं मारलें जावेंसें जालें होतें, परंतु तो दिवस टळला. या अवस्था गुजरतात! जवळ वीस पंचवीस लक्षांचें वित्त, नगदी वगैरे, रखमाबाई मेली तिच्या वित्तासुद्धां पोरेंबाळें दहा लक्षपर्यंत, इतकें जवळ व याखेरीज महालची दायेती सरदारीची त्याच्यासुद्धां जमा करितात; परंतु सरदारी बुडते! सरंजामाचा आजमास काय व फौज काय? आपले सरदारीचे खर्च मनस्वी, ते खर्च असावे; पैका आपण खाणें तो खावा; लोकांनीं व चवघा चोरापोरांनीं खाणें तो खावा; व दिवाण व्हावा त्यास महालचा पैका वगैरे भरणाखर्च उणा पडून महालकऱ्याचीं फाजलें निघालीं त्यांपैकीं रदकर्जी पडून, राहिला पैका तो दिवाणांनीं घेऊन, फौज तोफखाना व यांचे सरदारीचे व मनस्वी कर्माचे खर्च बाळगून, मल्हारजी होळकर व याखेरीज रक्षा राधी बटीक, तिजकडे पांच हत्ती, आठशें घोडे पागेचे, व चिरंजीव मंडळीकडे पागा, त्यांस पैका द्यावा; चाकरी सांगूं नये; सरदारांनीं आज्ञा करावी त्या अन्वयें पैका द्यावा, व दिवाणगिरी करावी. तोहि परका नसावा, पुण्याचा हुजूरहून असल्यास आपली विलक्षणता चालूं देणार नाहीं, हें सरदाराचें मत! व कारकून यांचें मत, जो दिवाण व्हावा त्यानें आमच्या लक्षांत चालावें.

पैका पडेल तो सरदारीस लावणें, वो त्यानें लावावा. आपले दरखास्त व प्रार्थीस अनकूळ असून कारभार आपले विचारें व्हावा, म्हणजे चार रुपये मिळतील. नवा असल्यास ठीक नाहीं. तेव्हां लक्ष बाईं दादाजी गंगाधर यांजला भरउभर देऊन आणून होमावें. दादाजी न येत, तर नारो गणेश यांचे पुत्र गणपतराव नारायण व भाचे बाळाजी लक्ष्मण यांजला पुढें करून, पैका असेल तो खाली करावयाची विवंचना नित्यशः चालली आहे. उमरेपट्टी वगैरे करण्यास प्रारंभ होणार. अशी अवक्रियेची पराकाष्ठा!! सरदार व कारभारी सदरहू आहेत त्यांचीं करणीं चाललीं आहेत. इतकें करून मसलत पुढें कोणती करणार? तर गुजराथची मसलत नाहींशी जाली! हे सरकारचाकरीपासून कृतार्थ व पाटिलबावांकडील हा अर्थ गुजरल्यानें भय मनांतील जाऊन, हिंदुस्थानचे अधिकारी जालों याजवर कृतार्थता मानून, मद्यादिक महापानाचा योग! शपथा केल्या ते दिवशीं श्रीमंतांचे पाय व कैलासवासी सुभेदार यांचे पाय व बाईचे पायाच्या शपथा वाहिल्या काय? प्रांतांतील व लष्करांतील दुकानें मोडविलीं, सरकारचे जासूद हुजरे व त्यांनीं आपले जासूद समागमें देऊन मोडविलीं, व ताकीद आजपर्यंत चालली असतां, पुन्हां प्रसिद्ध वर्तणूक व दुकानें यांसी परवानगी राजरोष चालली! आम्ही, स्वामींचें पत्र माझे नांवें आलें, त्यांत अनाचाराचा बंदोबस्त केला हें फार चांगलें जालें म्हणून लिहिलें होतें, त्याजवरून सांगितलें कीं, "आपण बंदोबस्त केला, तेणेंकरून श्रीमंतांस व श्रीमंत राजश्री नाना, तात्यांस संतोष जाला; व पुढें या पापापासून निवृत्त जाल्यानें कल्याणाची उमेद जाली कीं सरदारांची क्रिया चांगली जाली, कल्याण होईल, व दिल्लीआगरे जेथपर्यंत तुमचा लौकिक आहे, तेथपर्यंत तुमचा सद्लौकिक जाला. तेथपर्यंत बातम्या आपल्या अखबारींत गेल्या. असें असून पुन्हां लष्करांत दुकानें प्रसिद्ध बसलीं, तेव्हां ताकीद असावी." याचें उत्तर केलें कीं, "महापानावेगळें माणूस वांचणार नाहीं. यास्तव नर्मदा उत्तरतीरीं सुटत नाहीं." तेव्हां उत्तर केलें कीं, "सुभेदार, तुम्ही शफथा पुत्रांसहित कोणकोणाच्या वाहिल्या, आणि त्याचें उत्तर हें खासें! सरदार व हे निघाले तेव्हां न कूच (?) गोष्टीवर क्रिया तुमची ठीक न राहिली! तेव्हां तुमची शफथ किंवा क्रिया मोठे कामांत राजकारणांत कशी पथ्य पडेल? व खातरजमेवर कसें राहतील? बाह्य इतका लौकिक तरी कशास्तव केला? तर फजीती करून घेऊं नका. राज्यांत मनाई त्या चालीनें तुम्ही चाला. नाहीं तर दाखल्यास तुम्हांसीं लोक बोलतील, हें करणें उचित नाहीं." परंतु मदांधता अविवेकामुळें शपथा केल्या, त्यावर लक्ष राहिलें नाहीं! कारकून कारभारी बाईसुद्धां फजीत करीतच आहेत. चाळीस अंतर तिळप्राय नाहीं! सरदारीची अब्रू नाहीं! जवळचा पैसा खर्चिणें नाहीं! दाभाड्याचे घरचा कारभार ऐकत होतों, ती दशा सांप्रत सर्व प्रकारें येथें प्राप्त जाली आहे. त्यांत दाभा-

त्याचे घरीं मद्य नव्हतें; वरकड विषय होते. येथें मद्य व अविचार, रयत लुटणें, मल्हारजी वगैरे केवळ लुच्च तऱ्हा! जेथें मुक्काम जाला, तेथें अविचार लिहितां विस्तार!! इंदुरास होते तों बाईचा रोब व सरकारचें भय मनांत होतें. सांप्रत हें वर्तमान श्रवण जाल्यापासून गुजराथेची मसलत नाहीं, व हिंदुस्थान आपले कबजेंत आलें, सरकारचें भय तिळप्राय नाहीं; पुढें तरतूद तरी कोणे गोष्टीची हें कांहींएक नाहीं. दादाजी गंगाधर यांसी पत्रे पयदरपय व लक्ष्मणपंत पारनेरकर शिंद्याचे लष्करांत रवाना केले. त्यांनीं दुखावल्याचा शेला देऊन, त्यांजकडे भानगड लावून, त्यांचे लष्करांत राहून, ते आपण एक व्हावें, त्याचे आश्रयानें सरकारास दाबून आपली निभावणी करावी, ही चाल आरंभिली आहे. व गुजराथचे मसलतीचे दस्ताऐवज करण्याचे गेले आहेत, त्याजला उत्तर श्रीमंतांचे नावें व आपले नांवे पत्रें आणून घ्यावीं कीं, गुजराथची मसलत न करावीसें जालें, पुढें हिंदुस्थानांत जावे, याप्रमाणें आणवावे. यास्तव पत्रावर पत्रें रवाना केलीं आहेत. व येथें दादाजी गंगाधर यांचें पत्र आलें. त्यांतील लिहिणें कीं, श्रीमंत, राजश्री नाना, तात्यांनीं सांगितलें कीं, गुजराथची मसलत न करावी, हिंदुस्थानांत जावे, म्हणून दादाजींनीं लिहिलें. याप्रमाणें बाहेर लोकांस कळवयासी बोलतात. त्यास स्वामींची पत्रे आलीं, त्यांत फौज तयार राखणें, पुढें लिहूं तसें करणें, असें आहे. आम्हीं सांगितलें कीं, "तुम्ही फौज तयार करा. मग तुम्हांस सरकारांतून आज्ञा येईल तसें सांगूं. फौजेस व माणसास ठिकाण नाहीं. मनसबे कसचे करितां? व गुजराथ तुम्हांस सुटली हें कशावरून? व शिंद्यांकडील सरकारचे विद्यमानें तहास आल्याखेरीज चमेलकडे तुम्हांस येऊं कोण देतो? जें करणें तें सरकारलक्षानें, तेथें ठराव होऊन येईल तदन्वयें, वर्तावें लागेल. शिंद्याचे सरदार तुम्हांस तिकडे पाहूं देणार नाहींत. त्यांजकडे सूत्र लावून करा. किंवा, पुढें जाऊन पहावें तर फौज सामान किती व सरकारची आज्ञा कोणती याचें अनुसंधान पाहून चाल चालावी. वारंवार पेंचांत यावें व चुकतच जावें, हे चाल चांगली नाहीं. सरदारी नौकरपणानें व हलक्या माणसांच्या चालीनें व दैवप्रतिकूळतेनें बसून चुकली! पुढें उस्तवारी, चांगला माणूस घालून, तुमची क्षणिकता व दुर्व्यसनें व पुत्रमोहामुळें रयतीसुद्धां बुडविणें, अन्याय वर्तणूक कारणें आहेत. सावकार, रयत, त्यांस लुटावयाची क्रिया यानें सर्व भयभीत जाली. त्यांचें समाधान व त्या मर्जा तुमच्या अनिष्टाच्या, त्या मोडणें. व ज्यानें धर्म, न्याय, नीति राखणें व रयत सावकार आबाद करणें, त्या गोष्टी वढाव्या. तेव्हां सरदारीस आळा बसेल. हें सरकारांतून व्हावें, किंवा तुम्हीं शुद्धीवर येऊन करावें. तो अर्थ न जाल्यास दौलत व सरदारी सरकारची खराब होतेसें जालें, तेव्हां आटोपून बंदोबस्त करणें प्राप्त. करितील. तुमचा आब सर्व प्रकारें गेला! राहिला हाहि जातो.. कितीहि बोलले तरी यांची चाल आहे ती आहे. सर्व अनकूल

असून बुडते. यास्तव सरकारांतून यांजला दाबून, सुर्त गुजराथची मसलत सुटली हें नसतां, ताकीदीवर ताकीदी येत जाव्या, व माळवा प्रांत व देश वगैरे सर-देशमुखी वगैरे हिशेब करून, दहा पांच लक्ष बाकी काढून, वरात, एक कारकून, दोनशें राऊत, तगायास व फौज तयार करून, गुजराथेस जाण्याविषयीं दाब असावाच. ज्येष्ठ मास जवळच आला. कार्तिकपर्यंत हे येथेंच पागासुद्धां व शिलेदार राहिले ते गारत होतात, ते होणार नाहींत. सरकारचा तगादा मसलतीचा व पैक्याचा लावून यांजला धाडवून कामास लावावें. किंवा कारभारी करून त्यांचे आज्ञेंत चालवावें. याजशिवाय सरदारी बुडते! स्वामींनीं दोन वर्षे यांचा आब रक्षिण्याची कमी केली नाहीं. परंतु येथील चिन्ह तुकोजी होळकर यांचे दैवाची दौलत उतरली! पुढें सरकारांतून कैलासवासी मल्हारजी होळकर यांचें नांव चाल-विणें, तर दुसरा सरदार सरदारीजोगा व कारभारी कारभाराजोगा करून निशाण चालवावें, किंवा सरदार दुसरा करावा, ही दशा येथील आहे. ती साकल्य श्रुत व्हावी यास्तव विनंति केली. या प्रसंगीं दोन्ही सरदाऱ्यांचा बंदोबस्त करून हिंदु-स्थानचा कबजा, सरकार व अलीबहादर व सरंजामी पथकें पाटिलबावांसमागमें होतीं तीं, व आठ दहा हजार फौज आणखी ठेऊन, त्यांस नालबंदी व हिंदु-स्थानांत पोंहचण्याजोगे रोजमुरे देऊन, उभयतां सरदारांनीं, सरकारांनीं मुखत्यार करून द्यावा; त्याचे अनुसंधानें वर्तावें; व फौजेचा खर्च तिकडे निघून सरकारांत चाळीस पन्नास लक्षाचा प्रांत सुटावा. व श्रीमंत रावसाहेब कैलासवासीचे वेळेस यश होऊन हिंदुस्थानांत सरकारचा कबजा व सरदार आज्ञांकित हे प्रकार घडले, तोच समय. परंतु त्या प्रांतीं त्या वेळेस पाळेगार मातबर होते. सांप्रत कोणी नाहीं. इंग्रजांचा तह बनलाच आहे. त्याचीच मजबुती करून, इंग्रजांपाशीं वकील कोणा सरदाराचा असूं नये, एक सरकारचा मात्र असावा. व इंग्रजांनीं कोणास आसरा देऊं नये. व पादशाहा दिल्लीचा बंदोबस्त सरकारचा व सरकारची फौज व उभयतां सरदारांची फौज असावी. व सरकारतर्फेनें जातील त्यांचे आज्ञेंत उभयतांनीं चालावें. व इंग्रजांचा वकील पुण्यासी आहेच. व हिंदुस्थानांत असणें तर सरकार-फौजेंत असावा. समय हाच आहे. पाटिलबावा विचाराचें माणूस असतां काल-गतीनें मनांत कल्प काय काय उठले व करणी जड पाडावी हेंहि जालें. थोर सरदार, भावी पदार्थ होणार तें जालें! पुढें चाकराचुकरीं कारभार तितकी-ही क्रिया राखावी, बाह्य विरुद्ध न दिसावें, सरकारनक्ष व उपयोग होत जावे, हें होणें दुरापास्त! शिंदे या प्रांतांत आल्यावर बहुवशता होईल. यास्तव उभयतां सरदारांचे चालीचा बंदोबस्त, त्यांत सरकारचा बंदोबस्त करून, पुढें सरकारांत एखत्यार व फौजा उभयतां सरदार भय मानून पन्नास हजार फौज, सरदार व सरकारची मिळून तयार राहून, बोलाविलें तेव्हां हजर व्हावें. सरकारची फौज आहेच. आणखी जय बसून राखली म्हणजे अल्प आयासें कार्य, व उभयतां

सरदारांस चढ न होतां सरकारमर्यादेंत चालतील. उपयोग फौजेचा व पैक्याचा, पूर्व चालीनुरूप बंदोबस्त होईल. स्वामीस सर्व यशें आलीं, कर्नाटकाचें अघटित कार्य जालें, हिंदुस्थानचा बंदोबस्त होऊन, पूर्वस्थितीनुरूप बंदोबस्त होऊन फौज तयार राहणें व रसदा प्रांताच्या पुण्यास येणें, याचा समय हाच आहे. श्रीमंतांचा प्रताप व स्वामींस यश अघटित. व पादशाहाची आबळ, फांके गुजरतात. शहाजी कारभारी यानें केवळ तंग केलें आहे! इंग्रजांचे हातीं फिरून पादशाहा प्रयागेहून आलेला जातो. पुढें चमेलपर्यंत व अलीकडे बखेडा पादशाहा गेल्यानें पडेल. सुचली विनंति लिहावी व येथील अर्थाचा प्रकार ऐसा! सेवकास येथें ज्या कार्यास पाठविलें त्याचा अर्थ तूर्त मागें पडला? पुढें कर्तव्यता असेल त्यास विना जोर जरब यांसी समजल्याखेरीज येथील प्रकार मदांध व बुद्धिमंद! नुसत्या गोष्टीनें काय करणें व काय होणें? मजसमागमें खर्च पथकसुद्धां किती? इतका खर्च बाळगून येथें रहावें, तर सरकारउपयोगी कामे होत जावीं, व यांचा आब वाढत जावा, तीं चिन्हें येथें कांहीं नाहींत! सुचतें बहुत, परंतु येथें कांहीं होत नाहीं. जाला खर्च खाणे व सरकारनुकसानी मात्र! यास्तव समक्ष येथें कोणी कारकून ठेऊन यावे. साकल्य अर्थ इकडील तिकडील हिंदुस्थानसंबंधीं माहितगिरीचा व उभयता सरदारीसंमधें माहितगिरीचें निवेदन करावें. करणे करावे. नसल्यास न करावें. येथें राहण्यांत उपयोग विना बंदोबस्त कांहीं नाहीं. कालहरण खर्चाखालीं येथें, व उपयोग बातनीचा मात्र! त्यास सरकारचे कारकून आहेतच. सांप्रत मीहि आपला कारकून ठेवितों. यांचेंहि म्हणणे एक दोन दिवसांपासून जावें, वांटणीचा ठराव असावा, होणें तें तेथें व्हावे, हें म्हणणें. त्यास येण्याचे आज्ञेविषयीं पूर्वी चंद्र २२ रजबीं विनंति लिहिली. सांप्रत यांनींहि बोलणें लावलें आहे. निकड जाल्यास सडा येतों. सर्वार्थ विनंति करीन. पुढें आज्ञा होईल तदन्वयें येथें यावेसें जाल्यास येईन. सेवेसीं हजर रहावेंसें जाल्या, तेथें राहीन. त्यांत परम संतोष! शरीर अशक्त, ताकद नाहीं. यास्तव स्नानसंध्येस आज्ञा जाल्यास स्वामिचरणप्रतापें इहलोक नीट, व परलोक नीट, दोन्ही घडतील. मजला श्रीरामचंद्रस्थानीं स्वामी. तेव्हां स्वामिचरणसेवा व आज्ञा तेंच शरीराचें सार्थक! आज्ञा होईल. उत्तरीं सत्वर आज्ञा यावी. पत्रास बहुत दिवस लागतात. यास्तव विनंति कीं उत्तर सत्वर यावे. येथील अर्थ वर्तत आहे, तो साकल्य श्रुत व्हावा, यास्तव विनंति लिहिली. येथें मनुष्य कोणी नाहीं व आहेत ते कालग्रस्त! विना मातबर माणूस सरकारलक्षानें असून, यांजला दाखवून कारभार करून, यांचा भ्रम राखी व सरदारीचा आब जाऊं न देत, तरच परिणाम! पातकाची वृद्धी, व बुद्धीस क्रिया, सरदारांचे व आहेत माणसें त्यांच्या नाहींत. तेथून बंदोबस्त केल्यास अगाध नाहीं. सांप्रत येथील कोणेका गोष्टीचें संकट चित्तांत न यावें. तथापि ऐशा प्रसंगीं यांजला हुजूर आणावें. तेथें पावल्यावर सर्व अर्थ यांचे ध्यानास

येतील. सरदारसुद्धां बुद्धीचे प्रसीर व आचरणाचे व शरीराचे व पुरुषार्थाचे व मनसब्याचे चालीचे व मनुष्यें संग्रहीं त्यांचे व फौजेचे ध्यानास येतील. पुत्रसहीत पुढल्या पिढीस चालावयाचे अर्थ, व पुण्योत्कर्ष, पापोत्कर्ष पुढें चिरायु चालण्याचे अर्थ ध्यानास येतील. पुढें श्रम राखून कांहीं दिवस चालणें तर, उपयोग गैरउपयोग मनुष्याची छांट होऊन, कित्येक नसावेत, व कित्येक आसावे त्यांनीं सरकारलक्ष धरून चालावें; व सरकारच्या फौजा त्यांनीं व मुखरार करून द्यावा. त्यांनीं, कारभारी लक्षांत ठेऊन, उपराळा त्यांचा राखावा. बदमामलीची चाल किंवा अविवेकपूर्वक कोणासहि करूं न द्यावी. फौज तयार सरकारलक्षांत राखावी. याप्रमाणें घडण्यास समय हाच. व असेंहि घडून यथास्थित दोन वर्षे चालल्यास सरदारीस आब येत येत येईल. गेलें कांहीं नाहीं! प्रांत चांगला. सर्व अर्थ आहेत. उभयतां सरदारांचा बंदोबस्त व मदांधता कोणासहि न होतां, चाल टाकून गोष्टी न घडेत. श्रीमंत नारायणरावसाहेबांस कैलासवास जाला, घरचे बाहेरचे बखेडे अनेक प्रकारचे उभे राहिले, त्यामुळें कित्येक गोष्टी चालीवर टाकणें प्राप्त जाल्यामुळें सरकारनुकसानी व बाह्य विरुद्ध पडलें. तितकी श्रीमंत राजश्री रावसाहेबांचें दैव व स्वामीचे कारणीं, दम खाऊन मसलतीनें, तेणेंकडून कर्नाटकाचा बंदोबस्त अघटित होऊन यश आलें. तद्वत् हिंदुस्थानचा बंदोबस्त श्रीमंत नानासाहेब कैलासवासीचे समयाप्रमाणें होऊन पूर्ववत् चालावयाचा समय हाच. तेंहि यश स्वामींस येऊन श्री त्रिस्थळीयात्रेचा योग कांहीं दिवसांत घडावा. ह्या गोष्टी घडल्या, तर स्वामींचा पुण्योत्कर्ष व सत्यप्रतिज्ञ, न्यायनिष्ठुर व श्रीमंताचे चरणीं दृढ भाव व तात्यासारखे साधक, श्रीसर्वोत्तम मनेप्सित करील. हिंदुस्थानचा बंदोबस्त इंग्रजांचे तहावर वकील पृथकाकारें व सूत्रें अन्य सरदारांनीं राखूं नयेत, हें करणें जरूर आहे. येथील वृत्त ध्यानास यावें. मुखली विनंति लिहावी. पुढें मजला आज्ञा यावी. तदन्वयें वर्तावें. यास्तव विनंति. यांचीं करणीं बारा मार्गांचीं बारांचीं! तेथें जो बोलेल त्यासी स्वामी बोलतील, तर येथें अविचार आहेच त्यास बळ पडेल. यास्तव दाब व एकहाती जाबसाल व सरकारतर्फेनें राहील त्याचा आब राहील. व मुख्य पक्ष यांसी देशीं आणवावें. दोन्ही बंदोबस्त तेथें करावे. मजला आज्ञा यावी. समक्षतेनें विनंति करीन. उभयतां सरदारीचा बंदोबस्ताचा समय, दोन पिढ्या सरदारांच्या व दोन पिढ्या आमच्या सरकारतर्फेनें याजवर लक्ष सरकार उपराळ्यानें राखून, सरकारनफे श्रीमंतांचे प्रतापें जाले. मध्यें सखारामपंताचे द्वेषामुळें आमचा उच्छेद व्हावा त्या संकटांत बत्तीस तेहतीस वर्षे स्वामिप्रतापें जीवन होऊन जन्म पार जाला. याचें उत्तीर्ण शरीर स्वामिकार्यावर खर्चलें तरी होणार नाहीं. पुढें मुलांलेंकरांचें चालणें हिंदुस्थानांत व उभयता सरदारांवर उपर राखून त्यांत महत्व वाढविणें याचा समय हाच. येविषयीं कित्येक वेळ अभयोत्तरीं आज्ञा जाली आहे. सूचनार्थ विनंति लिहिली. पत्र वाचून फाडून टाकावें. मर्जीस

येईल तसें करावें. पूर्ववताचा समय जाणून विनंति लिहिली. येथें कारकून व एक चिरंजिवास आज्ञा जाल्यास ठेऊन येईन. पुन्हां जलद यावेंसें जाल्यास येईन. उत्तरीं आज्ञा होणें तैशी सत्वर व्हावी. पूर्वी श्रीमंतांजकडील बोलण्याचे अर्थ लिहिले, त्यांत सूचना लिहित गेलों. त्याचें उत्तर तसेंच सत्वर यावें. विशेष काय लिहिणें. स्वामिचरणीं प्रतरणा नाहीं, यास्तव लडिवाळपणें लिहिलें. न्यूनाधिक्यतेची क्षमा आजपर्यंत पुत्रवत् जालीच आहे व पुढेंहि निर्वाह करणार स्वामी समर्थ. श्रुत होय, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

## लेखांक ९.

श्री. ता. २८ मार्च इ. स. १७९४.

"सेवेसी विनंति ऐसीजेः—येथील अर्थ राजश्री तुकोजी होळकर व येथील कारकूनमंडळ यांचें मानस कीं, तुकोजी होळकर यांचें शरीर अशक्त, व शरीर व बुद्धीस ठिकाण नाहीं, तेव्हां भरंवसा कोणेका गोष्टीचा नाहीं. यास्तव राजश्री काशीराव होळकर, ज्येष्ठ पुत्र, यांजला गंगाजळनिर्मळ अहल्याबाई यांजकडून वस्त्रें देऊन, सरदारीचे कामकाजाची वहिवाट यांजकडून करवावी. त्याजवरून बाईचे मनास घेऊन, राजश्री काशीराव होळकर इंदुरास होते त्यांस बोलावून आणलें आहे. ते चंद्र २२ साबानीं येथें दाखल जाले. चैत्र शुद्धांत वस्त्रें होणार. आम्हांस गंगाजळनिर्मळ बाईनीं पुसलें कीं, हा विचार तुकोजीबावांचे मनांत फार. यास्तव त्यांचा हेत पूर्ण करावयासी केलें आहे. विचार कैसा? तेव्हां आम्हीं सांगितलें कीं, "ते खासा असतां यांजला वस्त्रें देतां, ते मुतालकीची किंवा शिक्केच मोडून यांचे नांवें करितां, ही चाल कोठें स्वराज्यांत आढळली नाहीं. तुकोजीबावांमागें सरदारी, सरकारआज्ञेनें, त्यांचे चिरंजीव असतील तेच करतील. मुतालकी म्हणतां, कोणते मसलतीस रवाना करणें कीं, त्या निमित्यानें तऱ्ही करावें. त्यास सरकारचें अनुमत पाहिजे. येविषयीं काय आणिलें?" त्याचें उत्तर बाईनीं केलें कीं, "कैलासवासी महादजी शिंदे पाटिलबावा होते, ते समयीं राजश्री नाना व तात्या यांचें अनुमतपत्र व त्याच अन्वयें पाटिलबावांचें पत्र आणून ठेविलें..................
....................कारभार सांप्रत करितों. शिक्के तूर्त..."...............
......याप्रमाणें बोलणें जालें. पत्रें कांहीं आह्मीं पाहिलीं नाहींत. दाखवूं ह्मणाले. व राजश्री नारो गणेश यांचे पुत्र गणपतराव नारायण व भाचे राजश्री बाळाजी लक्ष्मण, यांसी दिवाणगिरीचीं वस्त्रें यावीं. त्यांनीं पैका लावून सरदारी उभी करावी, यास्तव वस्त्रें यावीं न यावीं? तेव्हां आह्मीं सांगितलें कीं, येविषयीं सरकारचें अनुमत घेणें जरूर. त्याजवरून बाईनीं उत्तर केलें कीं, "येविषयीं सरकारांत उभयतां कारभारी यांसी लिहिलें आहे. त्यांचीं उत्तरें आल्यावर करूं. तुह्मी लिहून पाठवून उत्तरें आणावीं." तेव्हां आह्मीं उत्तर केलें कीं, "पूर्वी उभयतांस पत्रें राजश्री गणपतराव नारायण व बाळाजी लक्ष्मण यांचे नांवें गेलीं. त्यांचीं उत्तरें

कांहींएक आलीं नाहींत, असें गणपतराव व बाळाजी लक्ष्मण यांचें म्हणणें. तेव्हां पत्रोत्तरें देखील दिधलीं नाहींत. याजवरून सरकारमर्जी कशी हें ध्यानास आणावें." तेव्हां उत्तर केलें कीं, "सांप्रत पत्रें आम्हीं लिहिलीं आहेत. विना कारभारी परिणाम लागत नाहीं. यास्तव करणें प्राप्त. सरकारांत आम्हीं लिहिलें आहे. तुम्हीं लिहून अनुमत आणावें." म्हणून सांगितलें. मुख्यत्व, सर्वांस एक अनुवादक दिवाण नांव ठेवून असावा. त्याचें दारीं धरणें शिलेदारांसी बसावयासी व तूर्त सावकार वगैरे त्याचे आधारावर उभा करून बुडवावा. यासी तूर्त आश्विन कार्तिकपर्यंत कालहरण मात्र दिसतें. त्या कारभाऱ्याचा कारभार महालसुद्धां वहिवाट सर्वानुमतें व्हावी. सावकार या चालीनें उभा राहत नाहीं. महालचा पैका दुसाला घेऊन चुकले. पुढें बाईनीं पैका कोठून द्यावा ? मनस्वी खर्च ! मोठी शिकस्त खाऊन इंदुरास येऊन भुईस भार व अभ्यास काळ कमकसर एक वर्ष बसल्या मुक्कामींच जाले. मनस्वी खर्च ! त्यांत दुसाला सरंजामाचा पैका सालमजकुरीं व पेस्तर सालाचा खादला ! इकडे सावकार कोणी उभा राहत नाहीं. तिकडील सावकार.............. .................धान करून मागतात........................सावकारास द्यावा. महालकऱ्याचे मागील फाजिलाचे हप्ते बांधून फडशा करावा. फौजपागा दिवाणाचे अकत्यारीची असावी, व सरकारचें अभय असून, पेंच पडूं देऊं नये असें असावें तेव्हां हे कारभारी केल्यानें बंदोबस्त बसतो. परंतु येथें शागिर्दी व पारनेरकर व पाराशर दादाजी व सरदारसुद्धां सर्वानुमतें कारभार व्हावा. सर्वानुमतें मनस्वी खर्च व मनस्वी दरबारखर्च खाणें ह्या चाली न टाकतां कारभाराची वहिवाट व्हावी. यास्तव कुळें दोन यांनीं आपले सरकारींत नेमलीं. एक दादाजी गंगाधर, व दुसरे नारो गणेश यांचे पुत्र गणपतराव नारायण. त्यांत पारनेरकर शिवाजी गोपाळ वगैरेंचें मानस, अनुवादक दिवाणगिरीस दादाजीस करावें. त्यांत दोन मतलब त्यांचे होतात. नारो गणेश त्यांचे येथें कैदेंत पडून शेवटास लागले, यास्तव त्यांचे पुत्र व भाचे आपले विचारांत राहणार नाहींत; अथवा द्वेषास प्रवर्तक होतील. यास्तव भगीरथ प्रयत्नें दादाजीस आणावें. पैक्याविषयीं व श्रम भोगण्याविषयीं त्यास पुढें करावें. दरबारांत आपला कोणी नाहीं. दादाजी दिवाणगिरीचे कामांत आल्यावर उलगडूं पावतच नाहींत. कारण कीं, या चालींत जो उभा राहील, तो उलगडणेंच नाहीं. तेव्हां दरबारसुद्धां बंदोबस्त आपला होईल. व आंच कवडीची नसतां सर्व आपले स्वाधीन राहील. बाईचे विचारें, यांनीं आपल्यास पैका द्या, असें म्हटल्यास कोठून द्यावा ? तेव्हां ज्यांस चवघे मिळून सरदार संमत होईल, त्यास रुकार आपणहि देऊन, आपलें महत्व रक्षावें. ही तऱ्हा होऊन शत्रुमित्रास फळें व परिणाम एकरूप व शिकस्तफत्तेचा संतोष एकरूप ! पुढें कर्तव्यता मसलतीची अखेरसाल येथेंच जाली व होईल. पुढें छावणीच आहे. कार्तिक मासानंतर पाहतील तसें करतील. छावणीस

# ५१. मराठ्यांच्या लष्करांत मरीचा उपद्रव.

महामारीचा उपद्रव हिंदुस्थानांत पुष्कळ वर्षांपासून चालू आहे. मुसलमानी अमदानीमध्येंही महामारीचे उपद्रव झाल्याचे दाखले सांपडतात. त्याप्रमाणें मराठ्यांच्या कारकीर्दीमध्येंही महामारीचे उपद्रव उद्भवल्याचे उल्लेख जुन्या कागदपत्रांतून आढळून येतात. इ. स. १७८६ सालीं हरिपंत फडके ह्यांचें सैन्य कर्नाटकामध्यें टिपूवरील स्वारीमध्यें गेलें असतां, मराठ्यांच्या लष्करांत मरीचा उपद्रव फारच जोरानें झाला. त्याबद्दलची हकीकत रा. हरिपंत फडके ह्यांनीं नाना फडणविसांस कळविली आहे, ती फार हृदयद्रावक आहे. हरिपंताच्या एका पत्रामध्यें, मराठी सैन्यांतील लष्करी वैद्य, रा. धोंडभट वैद्य, हे उपद्रवास बळी पडले; तेव्हां दुसरे वैद्य, अण्णाभटाचे पुत्र मोरेश्वरभट, ह्यांस पाठविण्याबद्दल विनंति केली आहे. ह्यावरून मराठ्यांच्या सैन्यामध्यें सांप्रतच्या मिलिटरी सर्जनप्रमाणें 'लष्करी वैद्य' असत, हें सिद्ध होतें.

## लेखांक १.

पैवस्ती छ. ८ रविलाखर | श्री. | ता. ३ फेब्रुवारी इ. स. १७८६.
सबा समानीन. प्रातःकाळ

"सेवेसीं विज्ञापना तागाईत छ ३ रविलाखर वर्तमान यथास्थित असे विशेषः— इकडील वर्तमान टिपूचा मुक्काम कोपजवळ होता, तेथून कूच करून चार कोस आनेगोंदीचे रोखें चालला. आह्मीं कनकगिरीचे सुमारें कूच केलें. पुढें........लिहून पाठवूं. लष्करांत मरीचा उपद्रव जाला आहे, तो शमत नाहीं. शेंकडों माणूस मरतें. इलाज नाहीं! ईश्वर कृपा करील तेव्हां खरें. सेठ्याकडील सखारामपंत नवज्वर होऊन मृत्यु पावले. सेटेपणाची येथील भिस्त सारी त्यांजवर होती. यास्तव बापूजी वामन यांस सांगोन दुसरा शहाणा माणूस पाठविला पाहिजे. बिनीवाल्याकडील आपाजीपंत........वाखा जाला; मृत्यु पावले. सांप्रतकाळीं माहितगारीस आपाजीपंताचा उपयोग फार होता. असे किती रोज जातात, त्याचा तपसील काय लिहावा? ईश्वर ज्याचें रक्षण करील तें करोत. मागें मऱ्यांचे उपद्रव पाहिले, परंतु सांप्रत हे तऱ्हा आहे. पुण्याहून ओढेकर वगैरे रवाना जाले, ते कोठें आले याचें वर्तमान लागत नाहीं. लवकर आल्यास बरें. नवाबाकडील यादीचा गुंता होता, त्याचें काय जालें, ते आज्ञा करावी. सिरहट्टी, लक्ष्मेश्वरांत सरकारचीं ठाणीं आहेत. त्यांनीं हजार माणूस मेळवून सावनूर घेतलें. टिपूकडील पांच सातशें माणूस होतें, तें पळून गेलें.

सावनूर घेतलें परंतु रक्षणाचें कठीण ! सावनूरकराकडील येथें कारभारी आहेत, त्यांस सांगतों. चार दिवस खटपट करितील. टिपूचा जोर जाल्यास टिकणें कठीण ! जालें वर्तमान लिहिलें असे. लष्करांत खर्चाची अडचण येऊन पडली आहे. पौष मासचे ऐवजीं वराता केल्या; त्यास पैसा पावत नाहीं. याजकरितां दुसरे कोणी देत नाहीं. पहिले नेमणुकेपेक्षां अधिक खर्च पडला आहे. तो मजकूर पेशजीं लिहिला आहे. पौष, माघ, रोख ऐवज रवाना होईल कीं चिठ्या कराव्या, ती आज्ञा केली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २.

पैवस्ती छ. १० रविलाकर **श्री.** ता. ५ फेब्रुआरी इ. स. १७८६.
सन सबा समानीन माघ मास.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत छ ५ रविलाखर वर्तमान यथास्थित असे विशेषः— टिपूकडील वकील काल लष्करांत आले. आज होळकर, रास्ते, यांसीं बोलणार. काय खुलासा कळेल, तो उदेक लिहून पाठवूं. मरीचा उपद्रव फार जाला, लिहिलां येत नाहीं. राणोजी नाईक निबाळकर आकलूजकर एका दिवसांत वाखा होऊन छ ४ रोजीं वारले. जानराव पाटणकर गोळा लागून पडले, त्यांचे पुतणे धोंडजीराव पाटणाहून लष्करांत आणिले होते. त्यांचा वाखा होऊन काळ जाला. बाबूराव हरी यांचे पुत्र दौलतराव आजच प्रातःकाळीं वारले. प्रतिनिधीकडील राणोजी वागमारे वारले. रोज शें, दोनशें, चारशें, याप्रमाणें वर्तमान ! लोक त्रास पावले आहेत. ईश्वर कृपा करील ती खरी. उपाय करावयास कोणी चुकत नाहीं. परंतु मर्यादेस कोणाचा इलाज नाहीं ! सेवेसीं श्रुत होय. पैक्याची अडचण लष्करांत भारी. येविसीं वारंवार काय लिहूं ? स्वामी सर्वज्ञ आहेत. हे विज्ञापना."

[ मेणवली दप्तर ]

## लेखांक ३.

**श्री.**

"सेवेसीं विज्ञापनाः—लष्करांत मरीचा प्रलय जाला आहे, तो लिहितां येत नाहीं. माणूस फार मरतें. इलाजही होतात, परंतु चालत नाहीं. चार माणसें ज्याचीं त्याजवळ, एक राहिलें नाहीं. अशी कितेकांची अवस्था ! नवें माणूस देशीहून येतें, तें लष्करांत रहात नाहीं. पळतात. जुन्यांतील पळतात; निरोप मागतात. मरीच्या उपद्रवामुळें लष्करांत गलबल आहे. शांत केली, आणखी टाणे टोणे केले, परंतु अद्यापि शमन होत नाहीं. वे॥ धोंडभट वैद्य आह्मांजवळ होते; एक दिवसांत वाखा होऊन देवाज्ञा जाली. चांगला माणूस गेला ! असी कितेकांची अवस्था. ब्राह्मण, शूद्र, यवन, ही कांहीं निवड नाहीं. चार चार घटिकांत माणूस नाहींसें होते. पौष मास असतां

ऊन लागतें, तें विजातीय! टिपूचे लष्करांत मरीचा उपद्रव नाहीं. आमचे लष्करांत फार आहे. मुलुकांत गांवगन्ना ह्मणावा तर उपद्रव नाहीं. लष्करांत वैद्य नाहीं. त्यास यावयाजोगे आण्णाभटाचे पुत्र मोरेश्वरभट आहेत, त्यांस पाठऊन दिल्हे पाहिजेत. येवढें लष्कर, कोणी आला तर सरकारांस पुसावयास येतो. याजकरितां लिहिलें असे. मोरेश्वरभटास रवाना करावें. हे विज्ञापना.''

* * *

## ५२. दिल्लीच्या कारागिरीची इ. स. १७८७ मधील स्थिति.



नाना फडणविसांस दिल्ली, जयपूर वगैरे ठिकाणांहून नाना प्रकारच्या नमुनेदार मिन्याच्या जिनसा, तसबिरी वगैरे कारागिरीच्या व कलाकौशल्याच्या वस्तू आणण्याचा फार नाद होता, हें प्रसिद्धच आहे. ह्याचा उल्लेख अनेक वेळां तिकडील पत्रांतून आढळतो. दिल्ली येथील कारागिरांची निकृष्ट स्थिति झाली होती, हें इ. स. १७८७ च्या दिल्ली येथील वकिलाच्या पत्रांत लिहिलें आहे. ह्याच पत्रावरून दिल्ली येथून नासपातीं, द्राक्षें वगैरे मेवाही पुण्यास आणविण्याचा प्रघात होता असें दिसतें. हें पत्र येणें प्रमाणें:—

[ मेणवली दप्तर ] श्री.

पैवस्ती चंद्र ६ साबान

''श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:- विनंति सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र ९ माहे रजब मुक्काम लष्कर नजीक जयपूर सात कोस, जाणून स्वानंद लेखन करीत असावें. विशेष:—आपण चंद्र ९ रबिलावल व चंद्र १२ रबिलाखरचीं पत्रें पाठविलीं, तें पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, तिकडील कच्चें पक्कें वर्तमान होत जाईल, तें वरचेवर लिहित जावें; व पूर्वी मिनेगार दागिने करावयाचे, नक्षे कमलाचे, वगैरे पाठविले, ते कोठें आहेत हें लिहून पाठवावें. यंदा मेवा नासपातीं, व द्राक्षें वगैरे चांगला पाठवून द्यावा ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास इकडील वर्तमान सविस्तर पेशजीं चंद्र १६ जमादिलावलीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावून वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं इकडील सविस्तर आमचे यजमानास ही विनंति लिहिली आहे, त्याजवरून ध्यानारूढ होईल. विलायती मेवा यंदा उशीरा आला, व कांहीं पांच सात उंट मार्गांत लुटले गेले, व गरमीचे दिवस समीप आले. एक्या महिन्याचे मुदतीनें मेवा न पोंहचे, व मार्गांतच सडून जाईल, ह्मणून विलायतचे मेवे फरोशाही सांगितलें, त्याजवरून नासपातीं व द्राक्षें न पाठविलीं. मार्गेश्वर, पौष

मासीं मेवा दिल्लीस येतो, तो माघ पावेतों पुण्यास बेजोखम, न सडतां, पोहोंचतो; आणि माघमासीं मेवा आला ह्मणजे तो तूर्तच आठा चौ रोजांत खर्च करावा, इतक्याच कामाचा राहतो. याजकरितां बेदाणा, डाळिंब, व बिहीचा व सेवचा मुरंबा मदांतील घेऊन पाठविला होता, तो पावलाच असेल. व मिनेगार दागिने करावयाचे नक्षे कमलाचे वगैरे पाठविले, ते कोठें आहेत ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास ते नक्षे आह्मांस ठाऊक नाहींत, व आह्मांपासीं पावले नाहींत. व कारागीर मिनेगार वगैरे हरयेक माणूस पेशजीं दिल्लीस होते, ते तीन वर्षे काळ पडला, याजकरितां कांहीं उपासानें माणसें मेलीं, कांहीं उठोन लखनऊकडे गेलीं. दिल्ली आतां आपण पाहिली होती, तैसी राहिली नाहीं. नजाफत, व कारागिरी, व चांगली वस्त, पूर्वी आपण पाहिली आहे, त्याप्रमाणें आतां कांहीं दृष्टीस पडत नाहीं. उगेंच दिल्लीचें नांव मात्र राहिलें आहे. याप्रमाणें दिल्लीची अवस्था आहे. व आह्मी स्वामीस दोन चार वेळां विनंति लिहिली होती कीं, चिरंजीव भैराळपंत व रामचंद्रपंत हे दोघेजण, राजश्री देवराव तात्या समागमें आहेत. कांहीं संसाराची सोय नाहीं. व आह्मी इकडे राहून बारा वर्षे जालीं, स्वामीसेवा केली; परंतु तलब न मिळाली, व पुढें तलब मिळेल हें ठिकाण नाहीं. याचें कारण हेंच कीं, आमचे यजमान कर्जदार. यांचें कर्ज फिटून सुखी होतील तेव्हां आह्मांस वेतन मिळेल, हे अवस्था आहे. याजकरितां वारंवार आपणास उपद्रव देऊन विनंति लिहितों. आमचा त्राता आपले खेरीज दुसरा नाहीं. याजकरितां हरयेक जागा, हरयेक असामी, चिरंजीवास देऊन, सोय करून देविणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

* * *

## ५२. प्रेमसुख जोहरी.

पेशवाईमध्यें अराजनिष्ठ व कारस्थानी लोकांवर चांगली नजर असून, त्यांना प्रसंगविशेषीं दूरदूरच्या ठिकाणींही अटक करीत असत. प्रेमसुख जोहरी नांवाचा एक जयनगरचा इसम निजामाच्या पदरीं होता. तो कांहीं राजकारणानिमित्त जयनगरास ह्मणजे जयपुरास परत जात होता. त्याची बातमी पेशव्यांचे हैदराबादचे वकील गोविंदराव कृष्ण काळे ह्यांनीं नानांस दिली. त्याबरोबर नानांनीं त्यास बऱ्हाणपूरच्या टापूमध्यें कैद करविलें. बऱ्हाणपूर येथून ता. ९ फेब्रुवारी इ. स. १७९५ रोजीं, रघुनाथ आनंदराव, कारकून दिमत राजश्री दौलतराव शिंदे, ह्यांचें पत्र नानांस आलें आहे, त्यापत्रामध्यें ह्याबद्दलची सविस्तर हकीकत दिली आहे. ती येणें प्रमाणें:—

[ मेणवली दप्तर ]

श्री.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामी, स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक रघुनाथ आनंदराव कारकून दिमत राजश्री दौलतराव शिंदे. साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ रजब मुकाम शहर बराणपुर सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- स्वामींनीं आज्ञापत्र छ ७ मीनहूचें सेवकास सादर केलें, तें छ १२ मीनहू पावलें. शिरसा वंदिलें. पत्रीं आज्ञा कीं, "प्रेमसुख जोहरी जयनगरकर नवाब निजाम अल्लीखानबहादूर यांजपाशीं होतां. हल्लीं राजकारण घेऊन जयनगरास जात आहे. त्याचें बातमीचें पत्र राजश्री गोविंदराव कृष्ण यांचें आलें. त्या पत्राची नकल पाठविली, त्यावरून कळे समजलें. त्याबरोबर गोविंदराव कृष्ण यांचे कासीद जोडी आहे. बराणपूर नजीक पोहोंचतांच तुह्मांकडे येऊन मशारनिल्हेचें पत्र तुह्मांस आहे तें देतील. तेच समयीं, स्वार, प्यादे व शहाणा चौकस कारकून पाठवून, जेथे असतील तेथें अटकावून, एक माणूस त्यापैकी जाऊं न देतां, चीजवस्त सुद्धां जाहेरीमजकूर हस्तगत करून, पक्क्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन, धरल्याची बातमी जलद सरकारांत लिहिणें. बरोबर पंचवीस तीस माणूस आहेत, त्यापेक्षां अधिक परवाटेस पाठवून बंदोबस्त राखणें." त्यास याची विज्ञापना ऐसीजे, यापूर्वी यजमानसाहेबांचें आज्ञापत्र छ ४ जमादिलाखरचें एक सेवकास आलें, तें छ ८ मीनहूस पोहोंचलें, व दुसरें पत्र छ २४ जमादिलाखरचें आलें, तें छ २९ मीनहूस पावोन, दोन्हीं पत्रें शिरसा वंदिलीं. त्यांत पहिले पत्रीं, हेंच प्रेमसुख जोहरी यासीं धरून अटकेंत ठेऊन, लखोटे कागदाचे न फोडितां, जें काय कागद सांपडतील तें हुजूर पाठविणें. येविषयीं श्रीमंतांकडील वकील राजश्री गोविंदराव कृष्ण नवाबापाशीं आहेत, त्यांनीं तुमचें नांवें पत्र लेहून जासूद जोडी रवाना केली आहे. तें पत्र पावतांच, त्या गृहस्थास हस्तगत करून, अटकेंत ठेऊन, त्याची चीजवस्त मोजदाद करून ठेवणें. व दुसरे पत्रीं आज्ञा कीं, जैपुराकडून एक ठाकूर सांडणीस्वाराच्या वेशानें निघोन नवाबाकडे गेला आहे ह्मणून बातमींत समजलें. तो इकडून जाणार अथवा तिकडून येणार. त्या सांडणीस्वाराची चौकशी नाक्यावर ठेऊन, नवाबाकडे गेला आहे तो थोडक्यांत दिवसांत माघारा येणार, त्याची बातमी राखोन, त्यास धरून अटकेंत ठेऊन, त्याजवळ लखोटे जयपुरचे सांपडतील तें हुजूर पाठविणें. त्याजवरून अगोदर किल्ले आसेर व परगणे जैनाबाद व शहर बऱ्हाणपुर व खांडवे वगैरे महालचे थोर रस्ते व चोरवाटा व आडमार्ग, पायवाटांची नाकेबंदीचा बंदोबस्त करून, राजश्री गोविंदराव कृष्ण यांचें पत्र ज्या कासीद जोडीपाशीं होतें, त्या कासिदाची येण्याची मार्गप्रतीक्षा बातमीची करीत होतों. तो छ ६ रोजीं.........................................................

...एक गोसावी याचे मठींत उजेड पाहिला. तेथें जाऊन त्या मठीसभोंवतां घेरा घालून, प्रेमसुख जोहरी यास धरून, त्याची पालखी व एक डोली व उंट नफर दोन व तट्टे सात हे एकत्र करून, त्याजला शहरांत आणून, अटकेंत ठेऊन, पक्का बंदोबस्त मजबुतीचा करून, त्याजबरोबर नवाब निजाम अलीखानबहादर यांचा खलिता जयपुरकर राजाच्या नांवें एक व दुसरा खलिता मुशीरलमुलुकाचा राजाच्या नांवें राजास आहे, हे दोन्ही खलिते व राजानें जयपुराहून पत्र प्रेमसुख जोहरी मजकूर याच्या नांवें पारशी खत पाठविलें, त्याजवर राजाची मोहोर आहे, तीं पत्रें पाहून येथेंच ठेऊन, छ ८ रजब मजकुरीं त्याच रात्रीस यजमानसाहेबांचे सेवेसीं विनंतिपत्र लेहून पाठविलें कीं, जोहरी मजकूर जयपूरकर, नवाब निजामअलीखानबहादर यांजकडून बेदराहून जयपूरकर राजाकडे राजकारणास, हिंदुस्थानांत सरकारतालुक्यांत हंगामा करण्यास जात होता. तो साहेबांचे आज्ञेवरून आसबाबसुद्धां व पस्तीस माणसांसुद्धां धरून अटकेंत ठेविला आहे. याची चीजवस्तीची मोजदाद उदईक जमीनदार व दरकदार कारकून यांच्या विद्यमानें करीन. त्याजपाशीं खलिते सांपडले, तेही डाकेबरोबर पाठऊं, किंवा मुजरद कासीद जोडी कासारबारीच्या वाटेनें पाठविण्याची, जैशी आज्ञा होईल त्याअन्वयें, येथून खलिते सरकारांत पाठवून देईन. याप्रमाणें जोहरी मजकूर धरून अटकेंत ठेऊन यजमानसाहेबांस विनंतिपत्र पाठविलें आहे. तों त्यावर छ ७ रजबचें साहेबांचें आज्ञापत्र सेवकास आलें, तें छ १२ मीनहू पोहोंचून शिरसा वंद्य केलें. त्या सरकारच्या आज्ञापत्रासमागमें गोविंदराव कृष्ण सरकारचे वकील यांचे बातमीचे पत्राची नकल पाठविली, ती पोहोंचली. ती वाचून पाहून कच्चें वर्तमान मनन केलें. त्यांत लिहिलें आहे कीं, जोहरीमजकूर याजपाशीं जोहार आमके किंमतीपर्यंत आहे, त्यांत एक कंठी थोर आमके किंमतीची आहे, त्याजवरून त्या प्रेमसुख मजकुरासच जवळ बसवून पाहिली. त्याची वस्तभाव मोजदाद केली आहे. त्या वस्तभावेची किंमतीची चौकशी करून, ते जमीदार, कानगो, दरकदार कारकून यांस जवळ बसवून, प्रेमसुख जोहरीमजकूर याच्या तोंडचे, त्याच्या वस्तभावेची किंमत यादीस लिहिविली आहे. त्याची वस्तभाव मोजदाद तर जाली आहे, परंतु त्या वस्तांची किंमत त्या जोहरी याजकडून त्याच्याच तोंडचे बोलवून पाहिली. याद जाली आहे. त्याचा आजमास यजमानसाहेबांस विनंतिपत्रीं दहा पंधरा हजार रुपयांपर्यंत त्याच्या वस्तांचे किंमतीचा अजमास लिहिला आहे.......ते पाहणें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, माझी वस्तभाव झाडून जमा आहे. त्यांत कांहीं घायाळ जाली नाहीं. तेव्हां त्याच्या वस्ताचा अजमास, त्या मोजदाद करतेसमयीं जे जवळ बसविले होते, त्यानीं अदमास दहा पंधरा हजार रुपयांचा केला. त्यावरून तिसरें विनंतिपत्र तिसरे रोजीं यजमानसाहेबाचें सेवेसीं लिहिलें होतें कीं, पंधरा हजार रुपयांच्या नगनगोट्याचा अजमास आहे. याजवर याजला आणीक पुसतपास करितात. काय ठरेल तें मागाहून विनंति लिहीन. त्यास, त्याचा सारांश कीं, गोविंदराव कृष्ण यांनीं

ज्या किमतीचा दागिना लिहिला, तो दागिनाच याजपासीं नाहीं. आणि तितक्या किमतीचा ऐवजही याजपाशीं नाहीं. याजपाशीं जो ऐवज आहे, त्याचा अजमास यजमानसाहेबांच्या विनंतिपत्रीं व स्वामींचे सेवेसीं लिहिला आहे. त्याजवर वकिलाच्या पत्राची नकल सेवकापाशीं आली. त्या नकलेच्या अजमासावरून प्रेमसुखाच्या वस्ता-भावेची किंमत प्रेमसुखाच्याच तोंडें ठरविली आहे, व दुसरा एक शहरचा चौकशीदार जवळ बसविला होता. काय त्याचा अजमास किमतीचा एकंदर होईल, तो मागाहून यजमानसाहेबासी याद पाठवून देतों. यानंतर त्याच्या समागमेच्या माणसांपैकीं त्याचा आचारी एक बाजारांत कोठें आटाडाळीस किंवा पांघुरण्यास गेला होता, तो तिकडून पळाला, आणि एक हलकारा होता, तो कोठें बातमीस गेला होता. तो बिऱ्हाडास नव्हता. तो हरकारा परभारेंच कोणीकडे गेला, तो नकळे. या दोघांमाण-सांचा तलास नाक्यावर फार केला, परंतु ठिकाण लागलें नाहीं. त्याचे बिऱ्हाडीं पसतीस माणसें आहेत, तेही अटकेंत टेविलीं आहे. ऐसें एकंदर माणूस आसामी एकोनचाळीस व स्त्री एक, एकूण चाळीस माणसें, तीशिवाय प्रेमसुख एक, एकूण एके-चाळीस माणूस अटकेंत आहे. त्यांत खुद्द प्रेमसुख एकला किल्ले आसेर येथे बालेकि-ल्ल्यावर कैदेत ठेविला आहे. बाकी चाळीस माणसें, शहरांत किल्लेआर्क येथें एक जागा कैदेत टेविलीं आहेत. मुख्यार्थ कीं, प्रेमसुख जोहरी मजकूर पक्क्या बंदोबस्तानें किल्ले आसेरीस बालेकिल्ल्यावर कैदेत ठेविला आहे. याजवर यजमानसाहेब यांसीं स्वामीची आज्ञा होऊन, तेथून सेवकास आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. आज्ञा करणार धनी स्वामी समर्थ आहेत. स्वामीचे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

✽ ✽ ✽

## ५४. मुक्ताबाई फणसे.

अहल्याबाई होळकर हिजला मुक्ताबाई ह्या नांवाची एक कन्या होती. ही यश-वंतराव फणसे ह्यांस दिली होती. यशवंतराव ता. ३ नोव्हेंबर इ.स. १७९१ रोजीं मृत्यु पावले. त्यांच्या बरोबर मुक्ताबाई सती गेली. त्यामुळें अहल्याबाईस परम दुःख जालें. ह्या प्रसंगाचें एक अस्सल पत्र उपलब्ध झालें आहे, तें वाचनीय आहे. त्यावरून अहल्याबाईच्या शोकग्रस्ततेची कल्पना करितां येते. ह्या पत्रामध्यें मुक्ताबाईबरोबर आणखी दोन स्त्रिया सती गेल्या, असाही उल्लेख आहे. त्यावरून मुक्ताबाईस आणखी कांहीं सवती होत्या असें दिसतें.

श्री.

''सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागा-ईत चंद्र १२ माहे रबिलाखर पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—

येथील वर्तमान चंद्र ७ रबिलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत मार्गेश्वर शुद्ध अष्टमी सह नवमी शनिवारीं यशवंतराव फणसे यांचा काल जाला. त्याजसमागमें सौभाग्यवती मुक्ताबाई सुद्धां तिघी स्त्रियांनीं सहगमन केलें. हें वर्तमान पूर्वी लिहिलें. दुसरे दिवशीं त्यांचे घरची वस्तभाव त्याजकडून कारकून बोलाऊन शोध केला. कापड द्रव्य वगैरे त्याच्या यादी सांभाळून घेतल्या. ऐवज मुबलग. त्यास, घाट व छत्री बांधावी, कांहीं द्रव्य क्रियेस लावावें, क्षेत्राक्षेत्रीं पाठवावें, ही विवंचना केली आहे. आपण उदास होऊन श्री महायात्रेस जावयाचा उद्योग आपले ठिकाणीं व समागमीं कारभारी यांस सल्ला विचारून, राजश्री सुभेदार सांजकडे पत्रें चंद्र १० व चंद्र ११ रबिलाखरीं दोन पत्रें लागोलाग पाठविलीं कीं, तुम्हीं पत्र देखतांच स्वार होऊन येणें; आम्ही महायात्रेस जातों. अशी निकडीचीं त्यांजकडे पत्रें पाठविलीं. नंतर एक पत्र राजश्री दादाजी गगाधर यांस लिहून चंद्र ११ रबिलाखरीं पाठविलें. त्यांत मजकूर कीं, हें वर्तमान श्रीमंतास निवेदन करून उत्तर चांगले घेऊन पाठवून द्यावें. स्वामींच्या नांवें पत्र लिहिलें. त्यांत दादाजी विनंति करितील ते ध्यानास आणोन उत्तर पाठवावें, असें वर्तमान ऐकिलें. आम्हांस वर्तमान अगोदर कळले होतें. सरकारांत विनंतिपत्रें लिहितात किंवा नाहीं यास्तव अगोदर लिहिलें नवतें. कालचे तारखेस त्यांचीं पत्रें गेलीं हें कळलियावर सेवेसीं विनंति लिहिली आहे. यांचा निग्रह श्रीस जावें, याउपर दुःखाचे पर्वत पहाणें काय राहिले आहेत. राजश्री सुभेदाराचें वृद्धपण अखंड. त्यांच्या शरीरास समाधान नसतें. ते आहेत तोंवर त्यांच्या गळां दौलत घालून आपण वेगळें व्हावें. आमचें दैव तर दुःखेंच पाहावीं. त्यामुळें मागें पुढें कांही विश्रांत राहिली नाहीं. यास बरें वाईट जालें, तर मग तोंड दाखवावयास जागा नाहीं. जहर खाऊन प्राण द्यावा. अशी भावी कल्पना मनांत आणून, राजश्री सुभेदारास बोलाऊं पाठविलें. दररोज एक पत्र डाकेस लिहून द्यावे अशी ताकीद कारभारी यांस केली. सात रोज सात पत्रें वेगळीं तारीखवार जाऊं द्यावीं. त्यावरून चंद्र १० व चंद्र ११ दोन रोज पत्रें गेलीं, आजही जातील. याप्रमाणें येथील वर्तमान विनंति सरकारांत राजश्री दादाजी गंगाधर करतील. त्यांजपाशीं आज्ञा कर्तव्य ती होईल. येविसींची आज्ञा सेवकास असली पाहिजे. राजश्री सुभेदाराचें येणें कसें घडतें, यांचें जाणेंही तसेंच दिसतें. फौज त्यांजपाशीं नाहीं. यावें तर जयपूरचा निर्गम जाला नाहीं. भावी काय हें कळत नाहीं. यांचा आग्रह तों निकडीचा दिसतो. मजपाशीं जासूद जोड्या २ आहेत, त्या बातमी घेऊन बऱ्हाणपुरास कागद पोंहचावितात; तेथें जोड्या नसल्यास पुढें जातात. त्यामुळें कासद जवळ राहत नाहींत. पल्ला लांब पडला. येतांनीं जातांनीं एक महिना लागतो. येथें वर्तमान कोणे वेळेस काय होईल हें कळत नाहीं. त्यावरून विनंति लिहिली आहे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

* * *